




This book contains the so-to-say new or amended Dasavatar which uses more of "Hindu" or "Indian" outwardly-looks/words/terms in place of "Islamic" or "Arabic" terms, used in original Dasavatar preached since formation of Satpanth.
It is understood that this is done to attract Hindus

# मुखपृष्ठ परिचय

या सृष्टितलावर ज्या ज्या
वेळेस धर्म क्षिण होतो,
अधर्म बळावतो, जगतात
अधर्माचे साम्राज्य
विकोपास जाते
त्या त्या वेळेस
संत सज्जनांचे पालन,
सद्भक्तांचा उध्दार
व सत् धर्माची स्थापना
करण्याकरिता भगवंत या
पृथ्वीतलावर अवतार
रुपाने प्रगट होतो.
सृष्टिला सुरक्षितता देतो.
सौख्य, शांति, समृध्दता,
धर्मपालन, परोपकार,
अहिंसा,
धनधान्य संपन्नता,
आरोग्य संपन्नता,
आनंद प्राप्ति,
सर्वधर्म समभाव
सहिष्णुता, आत्मविश्वास,
दृढनिष्ठा पालन
या सद्गुण संपन्नतेने
संपूर्ण सृष्टीचा विकास
घडवून आणतो.

दसही अवतार एक करी सेवो पात्र दुजा मत जाणोरे ।
जेणे नही माण्या तेणे सुबकुछ खोया तेणे यमका फासारे ॥



वैदिक सनातन सतपंथ संप्रदायाचे
उपास्य दैवत

# श्रीमद् दशावतार

ध्यानमूलं गुरोमूर्ती पूजामूलं गुरुः परम ।
मंत्रमूलं गुरोर्वाक्यम मोक्षमूलं गुरुः कृपा ॥




वैदिक सनातन सतपंथ संप्रदायाचे प्रवर्तक व
धर्मपीठ पीराणाचे संस्थापक

## सद्गुरु श्री इमामशाह महाराज

(श्रीमद्दशावतार ग्रंथाचे मूळ लेखक)




# श्रीमद् दशावतार

प. पू. श्रीमत्सद्गुरु इमामशाह महाराज प्रणित
श्री सतपंथ तत्वज्ञान दर्शन मधिल
मुळबंध शास्त्रान्तर्गत श्रीमद् दशावतार
मूळभाषा गुजराथीचा मराठी अनुवाद

प्रकाशक
**श्रीसतपंथ साहित्य प्रकाशन, फैजपूर**
सतपंथी मंदिर, फैजपूर
ता. यावल जि. जळगाव

प्रकाशक :
श्रीसतपंथ साहित्य प्रकाशन
**प.पू. आचार्य श्री जनार्दन महाराज**
कार्यालय, श्री सतपंथी मंदिर,
मु.पो. फैजपूर (४२५ ५०३)
ता. यावल जि. जळगाव



अनुवादक
**ब्र. आचार्य श्री जगन्नाथ गुरु पुरुषोत्तम महाराज**
श्री सतपंथी मंदीर, फैजपूर
ता. यावल जि. जळगाव
फोन नं. (०२५८५) २४५४१७

प्रथम संस्करण - १९९३
द्वितीय संस्करण - १९९९
तृतीय संस्करण - २०१०

**देणगी मुल्य रु.३००/-**

मुद्रक
**विजय ऑफसेट**
फैजपूर, ता. यावल, जि. जळगाव
फोन (०२५८५) २४५६४२

॥ ॐ ॥

# सत्पंथ तत्व दर्शन

**- सदगुरु इमामशाह महाराज**

*दृढनिश्चय*

**१) सत्य** : बोलतांना, वागतांना, सत्य मृदु, नम्र, निष्कपट, कल्याणकारक वाणीचा अवलंब करणे.

**२) पुरुषार्थ** : धर्म, अर्थ, काम व मोक्ष या पुरुषार्थांचा जीवनात अवलंब करणे.

**३) प्रेम** : आत्मौपम्य बुध्दीचा अवलंब करून सर्वांशी प्रेम भावाने वागणे.

**४) समानभाव** : विश्वबंधुत्वाच्या भावनेने सर्वांशी वर्तन करावे.

**५) अहिंसा** : काया, वाचा, मनानेही कोणत्याही प्राणिमात्रास दुखवू नये.

**६) परोपकार** : मोबदल्याची इच्छा न धरता प्रत्येक प्राणिमात्राचे कल्याण करणे.

**७) क्षमा** : उदार, नम्र अंतःकरणाने प्राणिमात्रांशी लीनतेने वागावे.

**प्रतिज्ञा**

१) सतपंथाच्या नीतिनियमांचे, शिक्षापत्रीचे यथाशक्ति पालन करणे.

२) बालकांना सत् तत्वांचे शिक्षण देऊन सुसंस्कारी बनविणे

३) अंधश्रध्देचा त्याग व ज्ञानदृष्टीचा अवलंब करून गुरुवचनावर दृढश्रध्दा व निष्ठा ठेवणे.

४) नित्यपाठ स्वाध्याय व जप, पूजा, ध्यान, सेवा नियमीतपणे करणे.

**नियम**

**१) हृदयशुध्दि** : मादक, व्यसनी व तामसी पदार्थांचे सेवन न करणे.

**२) शरीरशुध्दि** : लाईसुतक अथवा जननाशौच, मरणाशौच, अस्पर्शाशौच, स्नानशुध्दि वगैरे नियमांचे पालन करणे.

**३) व्रतोपवास** : चंद्रदर्शन, अजवाली बीज, थाऊरबीज, दसवंत सुक्रित वगैरे सतपंथ पूजा विधीनुसार उपासना करावी.

**४) उपासना** : ॐ प्रणव ब्रह्माचे ज्योतिस्वरूपातून ध्यान व कलश पूजा करणे.

**५) ध्येय** : युगधर्मानुसार ध्येय पुरुष श्री निकलंकी नारायणाचे ध्यान, स्मरण, चिंतन करून आत्मोन्नति करणे. मानसपूजा आणि आत्मिक ध्यान करणे.

॥ ॐ ॥

ज्यांच्या चारित्र्याचा लोभनिय गौरव-केवळ विशिष्टच नव्हे तर सर्वच अवस्थातून निरंतर प्रगट होत असतो तोच खरा थोरपुरुष म्हणावा. यथार्थ श्रेष्ठता त्याच्याच ठायी नांदत असते. त्या ज्योतिर्मय परमपुरुषाचे हे जे पुत्र, ज्यांचे ठायी तीच ब्रह्मज्योति प्रकाशमान आहे, जे स्वतःच ब्रह्मज्योतिस्वरूप आहेत त्यांची आराधना केल्यास ते आपल्याशी आणि आपण त्यांच्याशी जणू तादात्म्य पावून संपूर्ण एक होऊन जात असतो.

अशा प्रकारचा दिव्य आणि अमर संदेश ज्यांनी दिला व ज्यांनी अवघड अशा गुजराती भाषेत असलेल्या या दिव्य 'श्रीमद् दशावतार' ग्रंथाचा अनुवाद मराठीत केला, प.पु सदगुरू इमामशाह महाराजांचे सनातन वैदिक भागवतधर्माचे ज्ञान जनता जनार्दनापर्यंत पाहोचविले त्या माझ्या स्वधामनिवासी गुरुवर्य...

**आचार्य श्री जगन्नाथजी महाराज यांना**
**ही तृतीय आवृत्ती सादर समर्पित.**

जनार्दन महाराज

ॐ श्री गुरुवे नमः ।।



श्री सतपंथी मंदीर फैजपूरचे भूतपूर्व आचार्य

## गुरुवर्य जगन्नाथजी महाराज

श्रीमद् दशावतार ग्रंथाचे मराठी अनुवादक

# ★ प्रास्ताविक ★

सतपंथ संप्रदाय एक महान वैदिक सनातन धर्माचा पारंपारिक तत्वबोध देणारा मार्ग आहे. भगवान श्रीकृष्णांनी श्रीमद् भागवतात परमभक्त उध्दवाला भागवत धर्माचा उपदेश दिला. त्याच मार्गाला पुष्टी देणारा हिंदु सनातन संप्रदायात मान्यता देणारा सद्गुरु इमामशाह महाराजांनी १५ व्या शतकात दर्शविलेला आहे. मार्गदर्शक सैयद वंशात जन्माला आलेला असून सुध्दा वेद उपनिषदाचे ज्ञान उपदेशिनारा ज्ञानसंप्रदाय अध्यात्मिक तत्वज्ञानाचा दार्शनिक अभ्यासक आणि अनुभवी होता. म्हणून त्यांनी हा सत्य मार्ग मुक्तिप्रद घेऊन जाणारा देवयान मार्गाचा उपदेश दिलेला आहे.

सतपंथाचा प्रचार खास करून गुजराथ, कच्छ, सौराष्ट्र, खानदेश आणि मध्यप्रदेश या विभागात गांवोगांव आहे. त्यात विशेष करून हिन्दुंच्या विशिष्ट जातीत त्याचा प्रभाव चांगलाच टिकून राहिला. आज तर श्री सद्गुरु इमामशाहांना मानणारांची संख्या फारच मोठी आहे. त्यांत ज्ञाती जातीचा तर भेदच नाही. सद्गुरु श्री इमामशाह महाराजांनी शोधून पवित्र केलेला हा मार्ग आहे. याला 'सतपंथ' या शुध्द आणि पवित्र नावाने ओळखतात. त्यास मात्र हिंदुनीच मानण्याचा प्रयत्न केलेला आहे. आणि ती गोष्ट सुध्दा फलीत झालेली आहे की या युगपुरुषाने आपल्या जीवनकाळात केवळ वैदिक सनातन धर्मासच उजाळा दिलेला आहे. या अंतर्मुखी व तत्वमुखी ज्ञानी महात्म्याने आपल्या वाणीद्वारा उद्बोधलेल्या विपुल ज्ञानाचा त्या काळच्या लेखकांनी अक्षरदेह दिलेला आहे. जे त्यांच्या सद्भक्त आणि अनुयायांना अनमोल धर्मभांडार रूप आहे. त्यासच 'मूळबंध' या नावाने ओळखतात.

महात्मा श्रीसद्गुरु इमामशाह महाराजांच्या या महामूल्य धर्मग्रंथात शब्दाशब्दात तत्वचिंतन आहे, आत्मस्फूरण आहे, मानवकल्याणाची पावन परिभाषा आहे. ज्यात त्यांच्याच भाषेत एक पध्दतशिर एक पवित्र कार्य होत आहे. या ग्रंथाच्या विविध विषयांचे श्रेणीबोध प्रकाशन करण्याचे सद्भाग्य गुरुकृपेने प्राप्त होत आहे. आज प्रस्तुत तैयार होणारा ग्रंथ 'श्रीमद्दशावतार' सतपंथीयाकरितां एक उत्तम उद्बोधनकारक ग्रंथ होत आहे. भगवंताच्या दहा अवतारांचे वर्णन बऱ्याच ठिकाणी आलेले आहे. पण याच वस्तुकथेला सद्गुरुजींनी प्रसंगोचित शब्द प्रयोगात विशिष्ट रूपाने वर्णन केलेले आहे. ज्यांत त्यांच्या ज्ञानाची एक आगळीवेगळी प्रतिभा आहे. साधी, सरळ आणि अर्थगर्भ वाणीचा शब्दसंगम या मुळबंध नामकमहाग्रंथामधूनच वहात आलेला आहे. हा ग्रंथ प्रत्येक ज्ञानपिपासुंच्या आकांक्षा पूर्ण करील.

- आचार्य श्री जगन्नाथजी महाराज
(द्वितीय आवृत्तीतून)

# श्री दशावतार माहात्म्य

१) श्री मत्स्य अवतार - शंकारुपी असूराचा नाश करा.

२) श्री कुर्म अवतार - सत्कर्म करताना परमात्मा पाठीशी उभा असतो.

३) श्री वराह अवतार - नरकातही जाऊन अधर्माला संपविण्याची तयारी.

४) श्री नृसिंह अवतार - भगवंताला समर्पित झाल्यास दुःखाचा नाश होतो.

५) श्री वामण अवतार - दानधर्म करताना त्यात अहंकार ठेवू नका.

६) श्री परशुराम अवतार - आवश्यकते वेळी धर्मरक्षणासाठी हातात शस्त्र धारण करा.

७) श्री राम अवतार - जिवनात आलेली प्रत्येक कर्तव्ये प्रामाणिकतेने पूर्ण करा.

८) श्री कृष्ण अवतार - जगत प्रेममय आहे, जगावर प्रेम करा
जग तुमच्यावर प्रेम करेल.

९) श्री बुध्द अवतार - एकचित्त व्हा. नामस्मरण करीत रहा.

१०) श्री निष्कलंकी अवतार - आयुष्याला कलंकीत करू नका. निष्कलंकी बना

धर्म वह है जो अन्तर चेतना को जगा दे
धर्म वह है जो बिछूडो को गले लगा दे
धर्म की सिधी सी पहचान है की,
वह शैतान को इन्सान और इन्सान को भगवान बना दे.

**- आचार्य श्री जनार्दनजी महाराज**



श्री सतपंथी मंदीर संस्थानचे वर्तमान गादीपती

**प.पू. आचार्य श्री जनार्दनजी महाराज**

# ❖ प्रकाशकाचे मनोगत ❖

परमकृपाळू परमात्म्याच्या असीम कृपेने सद्‌गुरु श्री इमामशाह महाराजांच्या साहित्य वाटीकेतील अत्यंत सुंदर लोभस आणि नाजुक मनाचा ठाव घेणारे श्रीमद् दशावतार ग्रंथाचे हे तृतीय पुष्प जनता जनार्दनाच्या हाती सूपूर्द करताना मनस्वी खूप आनंद होत आहे. या भावपुष्पातील तत्वरूपी जीवनसुगंध आमजनतेपर्यंत पोहोचून त्याचा मनमुराद आस्वाद त्यांना घेता यावा व त्या तत्वबोधाने सर्वांची अंत:करणे ओतप्रोत होऊन प्रभुप्रेमाने व सहिष्णु जीवनाने तृप्त व्हावे या उद्देशाने तत्वनिष्ठ गुरूवर्य श्री जगन्नाथजी महाराज यांनी सद्‌गुरू इमामशाह महाराज लिखीत मूळबंध या ग्रंथाचे सखोल चिंतन करून अतिशय कठीण असलेल्या मोळी गुजराती भाषेतील हे श्रीमद् दशावतारांचे चरित्र अगदी सोप्या मराठी भाषेत अनुवादीत केले. मराठी मातृभाषा असणाऱ्या भाविकांना या सुंदर चरित्र ग्रंथाचा आस्वाद घेता आला तो फक्त गुरूवर्य जगन्नाथ महाराजांच्यामूळेच.

या ग्रंथातील सद्‌भक्तांचे व भगवंताचे प्रेरक असे चरित्र भाविकांपर्यंत पाहोचले पाहिजे म्हणून गुरूवर्य जगन्नाथ महाराजांनी श्रीमद् दशावतार कथांची सुरूवात केली. इतर सद्‌ग्रंथाप्रमाणे श्रीमद् दशावतार ग्रंथाचे ज्ञान सर्वांपर्यंत पोहचावे ही त्यांची तळमळ होती. सदगुरु श्री इमामशाह महाराजांनी खुपच सुंदर अशी मांडणी या दशावतारांच्या चरित्राची केली आहे. दशावतारांबद्दल एवढी विस्तृत माहिती इतर कोठेही दिसून येत नाही. भगवंताच्या या दहाही अवतारांच्या चरित्रामुळे सर्व देव एकच आहेत, त्यांची नावं व स्वरुपं वेगवेगळी आहेत. असा सुंदर संदेश भक्तांना मिळतो. सध्या गुरुकृपेमुळे या श्रीमद् दशावतार कथांची व ग्रंथाची खूपच मागणी वाढली आहे. हे सर्व आपणासारख्या भाविकांमुळेच शक्य होत आहे. परंतु आपण या कार्याला आणखी गती देणे आवश्यक आहे. सद्‌गुरू इमामशाह महाराज व गुरुवर्य श्री जगन्नाथजी महाराज यांचा आशीर्वाद स्वरूप हा सद्‌ग्रंथ सर्व

भाविकांपर्यंत पोहोचविण्यासाठी आपण सर्वांनी संकल्प करूया व गुरुसेवेचा आनंद घेवू या.

सनातन सत्पंथाचा श्रीमद् दशावतार ग्रंथ हा अनमोल ठेवा आहे. अशी बरीच ग्रंथ संपदा सद्गुरुंनी आपणाला दिली आहे. याचा लाभ घेवून, आत्मज्ञानी बनून आपण आपल्या जीवनाचे कल्याण करुन घेवू शकतो.

या ग्रंथाच्या तृतीय आवृत्तीच्या प्रकाशनासाठी ज्या भाविकांचे आर्थिक सहाय्य लाभले त्यांचे आम्ही आभारी आहोत. तसेच ज्यांनी खूपच सुबक अशी छपाई करून दिली अशा विजय ऑफसेट, फैजपुर व ऑफसेटच्या सर्व कर्मचाऱ्यांचेही आम्ही आभारी आहोत. आर्थिक सहाय्य करणाऱ्या भाविकांच्या व प्रिंटिंग प्रेसच्या अनमोल सहकार्यानेच हा ग्रंथ सर्व इच्छुकांना माफक दरात प्राप्त होत आहे.

प. पू. गुरूवर्यांच्या चरणी ही तृतीय आवृत्ती समर्पित करुन माझे मनोगत संपवितो.

जय श्री सद्गुरु!

प्रकाशक

जनार्दन महाराज

## ★ श्रीमद्दशावतार कथा पारायण सप्ताह पध्दती ★

सामुहिक रूपाने श्रीमद्दशावतार ग्रंथाचा कथा सप्ताह करावयाचा असल्यास त्याची रचना मांडणी खालीलप्रमाणे करावी --

सभामंडप तयार करून सर्वांना सामोरे येईल असे स्टेज ५ अथवा ३ जण बसू शकतील असे जमिनीपासून म्हणजे श्रोत्यांच्या बैठकीपासून ३ फुट उंच तयार करावे. स्टेजच्या उजवीकडे सप्ताहापुरती अखंड ज्योत व कलशस्थापनेची मांडणी करावी. २ आचार्य, मध्ये १ व्यास व वाचन करणारे २ पंडित अथवा १ आचार्य, १ व्यास, १ पंडित अशा प्रकारची आसने मांडावी. स्टेजच्यासमोर किंचित उंच असे आसन घालून अध्वर्यु पतिपत्नीची बैठक घालावी. प्रथम उदधूप फिरवून आसन पवित्र करावे. नंतर ग्रंथाचे आचार्यांचे व पंडितांचे पूजन करावे, आरती करावी. नित्यपाठ, मंगलाचरण म्हणून कथावाचनास सुरवात करावी. सकाळी, दुपारी वेळ ठरवून (वेळ पडल्यास रात्रीसुध्दां) कथावाचन करावे. रात्री सत्संग, भजन, प्रवचन, कीर्तन करावे. शक्यतो वक्त्यांनी व श्रोत्यांनी सुध्दां एकभुक्त राहावे, फलाहार करावा. कथा सप्ताहाची सुरवात शक्य असल्यास गावातून ग्रंथाची मिरवणूक शोभायात्रा काढून करावी. सात दिवसांचा अथवा शक्य असल्यास १० दिवसांचा सप्ताह करावा. शेवटच्या दिवशी धर्मपीठाचार्यांना अथवा वंदनीय व पूजनीय अशा महात्म्यास आमंत्रीत करून त्यांचा मानसन्मान, स्वागत सत्कार करावा. ग्रंथवाचनाची पूर्णाहुति करून आचार्य, व्यास, पंडित यांना यथोचित दानदक्षिणा अन्न, वस्त्र, वा वस्तुदान करून सत्कार करावा. जमल्यास प्रितीभोजन महाप्रसादाची योजना करून कलश ज्योत यांचे उत्थापन करावे. ग्रंथाची मिरवणूक दिंडीसोहळा करून रात्री सत्संग, भजन, प्रवचन, कीर्तन कार्यक्रम करावा व सप्ताहाची सांगता करावी. सप्ताह केवळ नावलौकिकाकरिता अथवा द्रव्याची आरास दाखविण्याकरिता करायचा नसून ज्ञानदान व अन्नदानाला प्राधान्य देऊन सप्ताहाची आयोजना करावी ही अभिलाषा.

- आचार्य श्री जगन्नाथ महाराज

# आशीर्वाद

**प्रेम सत्पंथी आत्मीय जन हो....**

*ब्रम्हावतार सद्‌गुरू श्री इमामशाह महाराजांच्या असीम कृपेने आपण सर्व त्यांनी दिग्दर्शित केलेल्या आर्य वैदिक सनातन पवित्र अशा धर्ममार्गाने वाटचाल करीत आहोत. सत्पंथ हा वैष्णव, भक्तिमार्ग आहे. यात विष्णुंच्या दशम अवताराची श्री निष्कलंकी नारायणाची सेवा, नामस्मरण सांगितले आहे. पवित्र आचरणाची शिकवण दिली आहे. या मार्गाची वाटचाल सर्वांना लाभदायी आहे.*

*श्रीमद् दशावतारासारखा महाग्रंथ ज्यात भगवान नारायणाच्या अवतार मालिकेचे व कार्याचे वर्णन केलेले आहे. अशा अनुपम ग्रंथाचे आलेखन सद्‌गुरु इमामशाहांनी मुळबंध या ग्रंथात केले आहे. त्याचा सखोल अभ्यास करून प. पू. जगन्नाथ महाराजांनी हा अनमोल ग्रंथ आपल्याला उपलब्ध करून दिला त्याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावे तेव्हढे थोडेच आहेत.*

*प. पू. जगन्नाथ महाराजांच्याच परंपरेनुसार फैजपुरचे वर्तमान गादीपती श्री जनार्दनजी महाराज कार्य करीत आहेत. श्री जनार्दन महाराजांना आज सतपंथाचे मुकुटमणी म्हटले तर वावगे होणार नाही. त्यांना भावी वाटचालीस माझ्या शुभेच्छा व आशीर्वाद*

*प. पू. जगद्‌गुरू सतपंथाचार्य*

**श्री नानकदासजी महाराज**

*प्रेरणापीठ पीराणा( गुजरात)*

॥ ॐ ॥

# ❋ अनुक्रमणिका ❋

॥ ॐ ॥

॥ श्रीमत्परमात्मने नमः ॥

# ★ सुमंगल प्रभात ★

ॐ ॐ ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय भस्मायुधाय विद्महे दिव्य नेत्राय धीमहि तन्नोज्वरहरः प्रचोदयात्। ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥।

| | |
|---|---|
| ईशस्तुति | मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरीम्।<br>यत्कृपा तमहं वन्दे परमानन्द माधवम्॥ |
| गुरुस्तुति | गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः।<br>गुरुर्साक्षात्परब्रह्म तस्मै श्री गुरवे नमः॥<br>ध्यानमूलं गुरोर्मूर्तिः पूजामूलं गुरोः पदम्।<br>मंत्रमूलं गुरोर्वाक्यं मोक्षमूलं गुरोः कृपा॥ |
| परब्रह्म परमात्म ध्यान | यं ब्रह्मा वरूणेन्द्र रूद्रमरूतः स्तुन्वन्ति दिव्यैस्तवैः।<br>वेदैस्साङ्गपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः॥<br>ध्यानावस्थिततद्गतेनमनसा पश्यन्ति यं योगिनो।<br>यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः॥ |
| श्रीआद्यशक्ति देवी ध्यान | माया कुंडलिनी क्रिया मधुमति कालिकलामालिनी।<br>मांतगी विजया जया भगवती देवी शिवाशाम्भवी॥<br>शक्तिशंकरवल्लभा त्रियनया वाग्वाहिनी भैरवी।<br>ॐ कारि त्रिपुरासुरासुरमयी माता कुमारीश्वरी॥<br>नमो देव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः।<br>नमः प्रकृत्यै भद्रायै नियताः प्रणताः स्म ताम्॥ |
| श्रीसद्गुरु ब्रह्मदेवध्यान | ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम्।<br>द्वन्द्वातीतं गगनसदृशं तत्वमस्यादिलक्षम्॥<br>एकंनित्यं विमलमचलं सर्वधी साक्षिभूतं।<br>भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि॥ |
| श्रीविष्णु नारायण ध्यान | शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशम्।<br>विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगम्॥<br>लक्ष्मीकान्तं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यम्<br>वन्दे विष्णु भवभयहरं सर्वूलोकैकनाथम्॥ |

| | |
|---|---|
| श्रीमहेश्वर ध्यान | वन्दे देव उमापति सुरगुरु वन्दे जगत्कारणं।<br>वन्दे पन्नगभूषणं मृगधरं वन्दे पशूनां पतिम्॥<br>वन्दे सूर्य शशांक वन्हिनयनं वन्दे मुकुन्दप्रियं।<br>वन्दे भक्तजनाश्रयंच वरदं वन्दे शिवं शंकरम्॥ |
| शान्तिपाठ | ॐ भद्रं कर्णेभि: श्रुणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्रा:।<br>स्थिरैरङ्गै स्तुष्टुवाँ सस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायु:॥<br>स्वस्ति न इन्द्रौ वृध्दश्रवा: स्वस्ति न: पूषा विश्ववेदा:।<br>स्वस्ति नस्ताक्ष्यों अरिष्टनेमि: स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु॥ |
| प्रार्थना | ॐ असतो मा सद्गमय।<br>तमसो मा ज्योतिर्गमय।<br>मृत्योर्मा अमृतं गमय।<br>सर्वे भवन्तु सुखिन: सर्वे सन्तु निरामया:।<br>सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दु:खमाप्नुयात्॥<br>ॐ शांति: ! शांति: !! शांति: !!! |
| गीतासंदेश | यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।<br>अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥<br>परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम्।<br>धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे॥ |
| गुरुवाणी | प्रत्येक पात्र परखीने प्रेमे जाणो पाये।<br>चौदा भुवननो धणी प्रगट छे जुगमाहे॥<br><br>प्रत्येक रूपे आव्या रमता रमता राम।<br>मनुष्य रूपे जुगो जुगे आपी पुरण काम॥<br><br>भक्तकारण हरी आव्या आप धरीया दश अवतार।<br>दैत्य दानवोने संहारवा करवा साधुनी सार॥<br><br>कुडकपट टाळवा पाखंड छे जुगमाहे।<br>निर्मळ करवा प्रिथमी आव्या त्रिभुवन राये॥ |

दसही अवतार एक करी सेवो, पात्र दुजा मत जाणो रे।
जेणे नही मान्या तेणे सबकुछ खोया, तेने यमका फासारे॥

उग्या तेने वंदिये, मानो तेणी आण।
आज स्वामीने ओळखी, तेना करो वखाण॥

ॐ नमोजी गणनायका स्वरूपसुंदरा विनायका।
एकदन्ता वरदायका कृपा करावी मजवरी॥
आता नमु ब्रह्मकुमारी हंसारूढ वागेश्वरी।
वीणा शोभे दक्षिणकरी विजयमूर्ति सर्वदा।
नमन माझे गुरुवर्या सुखमूर्ति करूणालया।
नमु संत श्रोतीया ते पाया भेदाभेद करूनी॥
गुजरातभाषेची कथा सतपंथाची तत्वता।
ही ऐकता एक चित्ता सर्व संशय मिटतील॥
नमन माझे गुरु इमामशहाला, यावे तुम्ही कथेचीया प्रसंगाला।
नीरसुनी माझीया भवसंगाला, ज्ञान देईजे मजलागी॥

॥ ॐ ॥

# श्रीमद्दशावतार स्तोत्र

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ १ ॥

मी ईश्वर जन्मरहित असून, अव्ययस्वरूप आणि भूतांचा अधिपति असूनहि, स्वकीय मायेला वश करून, आपल्या मायेच्या योगाने जन्म घेतो.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ २ ॥

जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानि होते, आणि अधर्म बळावू लागतो तेव्हा मी स्वत:ला जन्मास घालतो.

परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम्।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ३ ॥

सज्जनांच्या संरक्षणाकरिता, दुर्जनांच्या नाशाकरितां व धर्माची संस्थापना करण्याकरितां मी युगायुगांच्या ठायी अवतार घेतो.

जन्मकर्मच मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वत:।
त्यक्त्वादेहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ४ ॥

या प्रकारचे माझे दिव्य जन्म व कर्म जो यथार्थ जाणतो तो (आपला) देह टाकल्यावर पुन्हा जन्मास येत नाही, तो मजप्रत येतो.

न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥५॥

कर्मे मला बंधन करीत नाहीत. कर्मफलाविषयी माझी आसक्ति नाही, मला अशा प्रकारे (म्हणजे मी अकर्ता आत्मरूप आहे असा) जो जाणतो तो कर्मापासून बंधन पावत नाही.

भूतलातल मध्यस्थो हत्वा तुं शंखासुरः।
उद्धृता येन वै वेदास्तस्मै मत्स्यात्मने नमः ॥६॥

ज्या परमात्म्याने भूतल आणि अतळादि सप्त पाताळात जाऊन शंखासूर नामक दैत्याचा संहार करून वेदांचा उध्दार केला त्या मत्स्यरूप भगवंताला मी नमस्कार करतो.

ससागरवनां बिभ्रत्सप्तद्विपां वसुंधराम्।
यो धारयति पृष्ठेन तस्मै कूर्मात्मने नमः ॥७॥

ज्या भगवंताने प्रचंड असे कासवाचे रूप धारण करून सप्तसागर, पर्वत व वनासहीत सप्तखंडवती पृथ्वीला आपल्या पाठीवर धारण करून मधुकैटभ दैत्याचा संहार केला अशा त्या कूर्मरूप भगवंताला माझा नमस्कार असो.

एकार्णवे हि मग्नां गां वराहं रूपमास्थितः।
उध्दार मर्हीं योऽसौ तस्मै कोडात्मने नमः ॥८॥

ज्या भगवंताने महासागरात बुडत असलेल्या पृथ्वीचा एका दाढेवर उध्दार केला व दुसऱ्या दाढेने महाप्रचंड मायावी दैत्य मोरध्वज अथवा हिरण्याक्षाचा संहार केला अशा त्या महावराहरूपाला मी नमस्कार करतो.

नरसिंह वपुः कृत्वा यस्त्रैलोक्य भयंकरम्।
हिरण्यकशिपु जघ्ने तस्मै सिंहात्मने नमः ॥९॥

ज्याने त्रैलोक्याला भयकंपित करून सोडणारे असे महाभयंकर रूप धारण करून हिरण्यकश्यपुचा नाश केला अशा श्री नृसिंहभगवंताला नमस्कार असो.

वामनं रूपमास्याय बलिं संयम्य मायया।
इमे क्रान्तात्स्त्रयो लोकास्तस्मै क्रान्तात्मने नमः ॥१०॥

ज्याने बटू रूप धारण करून बुध्दि व मायेच्या बळाने बळी दैत्याला वश करून तीन पावलांनी त्रैलोक्य व्यापले त्या वामन अवताराला मी नमस्कार करतो.

जमदग्नि सुतो भूत्वा रामः परशुध्रग्विभुः।
सहस्त्रार्जुन हतैव तस्मै उग्रात्मने नमः ॥११॥

जमदग्नि रेणुकेच्या उदरी जन्माला येऊन हातात परशुधारण करून सहस्त्रार्जुनाचा नाश केला त्या उग्रमूर्ति परशुरामास मी नमस्कार करतो.

रामो दाशरथिर्भुत्वा पौलस्त्य कुलनंदनम।
जघान रावणं संख्यै तस्मै क्षत्रात्मने नमः ॥१२॥

दशरथाच्या घरी पुत्ररूपाने जन्म धारण करून पुलस्त्यकुळात उत्पन्न झालेल्या दशाशिर रावणाचा ज्याने युध्दात नाश केला त्या श्रीराम भगवंताला मी नमस्कार करतो.

वसुदेवसुतः श्रीमान्वासुदेवो जगत्पतिः।
जहार वसुधात्भारं तस्मै कृष्णात्मने नमः ॥१३॥

जगत्पति अशा श्रीमान वासुदेवाने कंसकौरवादि दुष्टांचा संहार करून पृथ्वीवरील भार उतरविला त्या भगवान कृष्णाला मी नमस्कार करतो.

बुध्दरूपं समास्याय सर्वरूपं परायणः।
मोहयन्सर्व भूतानि तस्मै मोहात्मने नमः ॥१४॥

सर्वरूप परायण अशा परमात्म्याने बुध्दरूप धारण करून सर्वप्राणिमात्राला मोहित करून व दुर्योधनाला केवळ दर्शनाने मुक्त केले. पांडवांना उपदेश करून मौन रूप धारण केले अशा मौनरूप भगवंताला मी नमस्कार करतो.

हनिष्यति कलेरन्ते म्लेच्छांस्तुरगवाहनः।
धर्मसंस्थापनार्थाय तस्मै कल्क्यात्मने नमः ॥१५॥

धर्माची झालेली ग्लानी पाहून त्याची पुनर्स्थापना करण्याकरितां व पापाचारी अधर्मीयांचा उच्छेद करण्याकरितां श्वेत अश्वावर आरूढ होऊन प्रगट होईल त्या निकलंकी नारायणाला मी शतशः प्रणाम करतो.



॥ ॐ ॥

# श्री दशावतारांची भूपाळी

जन म्हणा हो श्रीहरी, प्रात:काली स्मरण करी ॥
तेणे तराल भवसागरी, हा निर्धारी भरवसाऽऽ ॥ धृ ॥

वेद नेले निशाचरी, मत्स्यरूप झाले हरी ॥
काय ब्रह्मायाचे करी, शंखासूर वधोनियाऽऽ ॥ १ ॥

दैत्य मातले भूमंडली, पृथ्वी नेली रसातळी ॥
कूर्मरूपे हो वनमाळी, पृष्ठे धरीली मेदिनीऽऽ ॥ २ ॥

मही डळमळली पहाहो, देव जाहाले वराहो ॥
मग वधविले दैत्य दानवो, पृथ्वी दाढे धरूनिया ॥ ३ ॥

पुत्र पित्याने गांजीला, तो नरहरी स्मरता झाला ॥
स्तंभी अवतार धरीला, भक्त रक्षिला प्रल्हादऽऽ ॥ ४ ॥

याग करिता झाला बळी, ईन्द्र कापिन्नला चळाचळी ॥
वामन रूपे हो वनमाळी, घालो पाताळी बलीराजाऽऽ ॥ ५ ॥

रेणुके उदरी भार्गव झाले, राजे समस्त संहारिले ॥
राज्य ब्राह्मणा दिधले, सुखी केले भूदेवऽऽ ॥ ६ ॥

सूर्यवंशी रघुनंदन, वानर सैन्य मेळवून।
सागर पाषाणी घालून, संहारीले राक्षसाऽऽ ॥ ७ ॥

कारागृही अवतरले, कृष्ण गोकुळी वाढीन्नले ॥
कंसचाणूर मर्दियेले, राज्य दिले उग्रसेनाऽऽ ॥ ८ ॥

बौध्द अवतारधरीला, जन हा बहुत कष्टी झाला ॥
मग कलीस वर दिधला, आपण राहिला ध्यानस्थऽऽ ॥ ९ ॥

पुढे निकलंकी होणार, ऐसा शास्त्रांचा निर्धार ॥
मग फिटेल भव संदेह, याही विश्वजनाचाऽऽ ॥ १० ॥

दशावताराची भूपाळी, नित्य स्मरता प्रात:काळी ॥
दास म्हणे भूमंडळी, भाग्यवंत गातीलऽऽ ॥ ११ ॥

# ★ श्री दशावताराची आरती ★

जयदेव जयदेव जय निकलंकी रूपा।
मनभावे आरती भावार्ती आरती। तुजे स्वरूपा॥ जयदेव जयदेव॥ धृ॥

मच्छ, कच्छ, वराह, नृसिंह अवतरीला। नृसिंह अवतरीला॥
हिरण्यकश्यप हिरण्यकश्यप दैत्य मर्दिला॥ जयदेव जयदेव ॥ १॥

वामन, परशुराम, श्रीराम, हरी। श्रीराम हरी।
दैत्य दशाशीर दैत्य दशाशीर रावण मारी॥ जयदेव जयदेव ॥ २॥

श्रीकृष्ण, बौध्द गोवर्धन धारी। गोवर्धन धारी॥
दैत्य कंसासुर दैत्य कंसासुर दुर्योधन मारी॥ जयदेव जयदेव ॥ ३॥

दहावे अवतारी श्रीनिकलंकी हरी। श्रीनिकलंकी हरी॥
दैत्य कालिंगावर दैत्य कालिंगावर करतील स्वारी॥ जयदेव जयदेव ॥ ४॥

साधुजन येती भक्तजन येती भक्तगण येती॥
ओवाळी वसुंभा ओवाळी वसुंभा देव निकलंकी॥ जयदेव जयदेव ॥ ५॥

# ॐ श्री मत्स्य अवतार



चारे वेदने वाळवा, दैत्य शंखासुरने मारवा ।
श्रीहरीयें मत्स्यरुप लिधुं भक्तोने उगारवा ।।

॥ ॐ ॥

श्रीमत्सद्गुरवे नमः

श्रीमत् परब्रह्म परमात्मने नमो नमः

# श्रीमत् दशावतार ग्रंथ प्रारंभ

## ★ मंगलाचरण ★

श्री सद्गुरु ब्रह्माची अमृतोपम अमोघ वाणी सत्य आहे. परमपुरुष परमदिव्य अशा प्रेमस्वरूप पुरुषोत्तमास प्रणाम असो. अखिल जगतास जीवन देणाऱ्या, सदैव सत्कृत्यात निमग्न असणारे सत्पुरुष ज्याचे दिव्य प्रेमाने ध्यान करतात ( सत्कृत्य करणाऱ्या सत्पुरुषांचे परम ध्यान निधान ) दुष्कृत्य करणाऱ्या दुर्जनांचा संहार करणाऱ्या; जीवप्राणिमात्रांचा कृपाकटाक्षाने उध्दार करणाऱ्या, अनंत कल्प अनंतयुगापर्यंत जीवगत प्राणिमात्रांना धारण करणाऱ्या सर्वसाक्षी परमेश्वरा तुला अनन्य भावाने प्रणाम असो.

कधीही कशानेही नाश न पावणाऱ्या अलक्ष अगोचर, मायाप्रपंचविरहीत, निराभास - जन्ममरणादि आभासरहित परमेश्वरास नमस्कार असोः अनंतरूपांनी स्वतः स्वयंसिध्द मूर्त रूपाने विनटलेला असूनही मन - बुध्दि - दृष्टीच्या अगोचर, विश्वरूप धारण करणाऱ्या सर्व जीवप्राणिमात्रांचे भरण पोषण संगोपन, संरक्षण करणाऱ्या निराकार परब्रह्म परमेश्वरास वंदन असो.

जगाचा उध्दारकरण्याकरिता म्हणजे सुष्टांचे पालन पोषण, संरक्षण करणे, दुष्टांचे निर्दालन करणे आणि विस्कटलेल्या समाजधर्माची घडी नीट बसविण्याकरिता भगवान विष्णु नारायण या जगात निरनिराळ्या रूपाने अवतार धारण करतो.

त्या ईश्वरी अवतारांची जगात जाणीव करून देण्याकरिता सृष्टगुरु ब्रह्मदेव निरनिराळ्या स्थळी, निरनिराळ्या वेळी, निरनिराळ्या रुपांनी अवतार धारण करून संपूर्ण जगतास ब्रह्मज्ञानाचा आत्मोन्नतीचा दिव्य उपदेश करून प्रकाशित करीत असतात.

चन्दनाने वेष्टिलेले अरण्य जसे चंदनाच्या सुगंधाने भरून जाते, चंदनवृक्षाच्या संगतीने इतर सर्व वनस्पती सुगंधीत होत असतात तद्वत सद्गुरु हे त्यांच्या सान्निध्यात संसर्गात येणाऱ्या संपूर्ण प्राणिमात्रास आपल्याप्रमाणे करीत असतात. अळी ज्याप्रमाणे भिंगोटीच्या सतत सान्निध्याने व ध्यासाने अखेर भिंगोटीरूप होऊन जाते तद्वत् सत्गुरु आत्मज्ञानरूपी प्रकाशाच्या योगाने सच्छिष्यास प्रकाशित करीत असतात.

ज्याप्रमाणे परिसाच्या सान्निध्यात लोखंड आल्याने त्याच्या संसर्गाने लोखंडाचे सुवर्ण होत असते, तद्वत् मनुष्य कितीही जडबुध्दि अथवा मंदमति असला तरी सद्गुरुंच्या सेवेने, त्यांच्या दर्शन स्पर्शाने, ज्ञानोपदेश ग्रहणाने त्याचे सर्वप्रकारचे गुणधर्म बदलून सुवर्णरूप म्हणजे शुध्द चैतन्यरूप बनून अनुपमेय अशा सत्‌चित् ब्रह्मधामात तदाकार होतो. ( श्लोक १ - ६ )

एवं गुणविशिष्ट सद्गुरु महाराजास त्रिवार वंदन असो.

प्रथम निलवर्ण धुंधु:कार अशा महदाकांशात निर्गुण निराकार निरंजन नारायण स्वयं प्रकाश ज्योतिस्वरूपाने स्थित होता, त्या सत् - चित् - ब्रह्माचे ठायी एका संकल्पाचे स्फुरण झाले कीं आपण अनंत रूपाने प्रगट व्हावे. ''बहुस्यां प्रजायेय'' परिवर्तनशील अशा कालचक्रास गति द्यावी आणि त्यानुसार नारायणाच्या प्रथम स्फुरणापासून ॐ हा आद्याक्षर बीजमंत्र निर्माण झाला. तदनंतर अनंतकाळ अनंतयुगे निघून गेली तरिही तो परमेश्वर आपल्याच निर्गुण निराकार स्वयंप्रकाशपूर्ण ज्योतिस्वरूपाने स्थित होता. त्यावेळेस पृथ्वी, जल, तेज, वायु आकाशादि पंचमहाभूते व त्यांचे कोणतेही तत्त्व उत्पन्न झालेले नव्हते. ते सर्व त्या परब्रह्म नारायणात सामावलेले होते.

निल प्रशांत धुंद अशा धुंधु:कारमय वातावरणात ध्यान करून त्या आदिपुरुषाने आपल्या स्वत:च्या स्वरूपासच जाणण्याकरितां मनात हेतु धरून संकल्प करून ब्रह्मज्ञान प्रकाशित केले. त्या ज्ञानाच्या योगाने त्या आदिपुरुषाने स्वत:चेच स्वरूप ओळखून ते प्रगट होण्याकरितां अथवा मनातील इप्सित हेतु पूर्णपणे साध्य होण्याकरिता अनंत काळपर्यंत अजंपाजाप - गायत्रीमंत्राचा जाप करू लागला. अशा रीतीने अजंपाजापाचे स्मरण करण्यास सतरा लाख करण वर्षे एवढा दीर्घ कालावधी सर्गकालात निघून गेला. नंतर आठ लाख करण वर्षे या कालावधीत त्या ईश्वराने मनिच्छा धारण करून तपश्चर्या सुरु केली.

तो आदिपुरुष आपल्याच निरूपमेय स्वरूपात स्थित होता. त्याने आपल्याच करकमलात आपल्याच बींबाचे ध्यान केले. सत्तर हजार युगापर्यंत एकाग्र दृष्टी करून त्या करकमलातील बींबाचे त्या नारायणाने निर्मळ रीतीने ध्यान केले. नंतर तेच आपले बींब नाभीकमलाचे ठायी स्थापन करून आपल्याच हाताची त्यास वाफ देऊन एका कमलाची उत्पत्ति केली.

त्या निलवर्ण धुंधु:कारामधून आद्यनिरंजन विष्णु नारायणाने आपल्या नाभीकमलाचे ठायी स्थापन केलेल्या आपल्या बींबात नूर मिसळून चतुर्मुख ब्रह्माची रचना केली आणि त्यापासून अनंत अशा ब्रह्मलीलांची उत्पत्ति झाली. तेच सदगुरु ब्रह्मा म्हणजे ब्रह्मरूप सद्गुरु होत.

छत्तीस युग आणि चौऱ्याशी चौकडी (चतुर्युगे) एवढा काळपर्यंत ब्रह्मा आपल्याच ध्यानात मग्न होता. त्यानंतर मत्स्यनिळारंभावर आसन स्थिर करून त्या ब्रह्माने पुरुषोत्तमाच्या बींबाचे ध्यान केले. ब्रह्मदेव त्या पुरुषोत्तम नारायणास हात जोडून म्हणाला, 'हे स्वामीन् शुन्याकार अशा या अखिल वातावरणात आपण दोघच आहोत. माझा उत्पत्तिकर्ता माता व पिताही तूच निरंजन निराकार आहेस. स्वामीन् हे शरीर कोणी आणि कसे कशाकरितां निर्माण केले ते सांगण्याची कृपा करावी.' ब्रह्मदेवाची आर्तवाणी ऐकून नारायणाने त्यास सांगितले की, 'हे ब्रह्मदेवा तुझे हे शरीर मीच संकल्पमात्राने सृष्टीनिर्माण करण्याकरिता केले आहे.' असे सांगून नारायणाने ब्रह्मदेवास दीक्षा देऊन मंत्र जपाचा उपदेश केला. त्यातूनच वेदांची निर्मिती झाली. (श्लोक १ - २१)

ब्रह्मदेवाने प्रणवब्रह्म ॐ या मंत्राचा आपल्या हृदयाच्या ठायी ध्यास करून वेदांची निर्मिती होण्याचा संकल्प करताच नारायणाने ब्रह्मदेवास तत्वोपदेश केला व त्या तत्त्वोपदेशापासून वेदांची निर्मिती झाली. अशारीतीने नारायणाने ब्रह्मदेवास प्रवृत्ति व निवृत्ति मागाचे दर्शन करविले. नारायण म्हणाले, 'हे ब्रह्मदेवा ऐक, ह्या तत्वोपदेश ग्रहणाने संकल्प मात्राने तूं सृष्टीची निर्मिती करू शकशिल व त्याच तत्त्वोपदेश ग्रहणाने तू सर्वकर्म दोषापासून मुक्तही होशील. याहून अनुपम अशी अन्य गोष्ट नाही. कुदरत अथवा ईश्वरी योगमाया जगताच्या उत्पत्तिचा हा फापट पसारा घडवून आणते. हे ब्रह्मदेवा, जगातून मुक्त होण्याकरिता या आत्मज्ञानरूप युक्त साधनांचा युगा युगाचे ठायी निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या रूपाने प्रगट होऊन उपदेश कर.' असे नारायणाने ब्रह्मदेवास सांगितले.

ब्रह्मदेव हात जोडून म्हणाला, 'हे ईश्वरा तुझ्या सांगितलेल्या वचनाप्रमाणे मी मृत्यूलोकात या मुक्तीच्या तत्त्वांचा उपदेश करीन. स्वामी! मी ज्या जीवात्म्यांना तत्त्वोपदेश करून कर्म, भक्ति व ज्ञानयोगाच्या साधनांनी युक्त अशा मुक्तिमार्गाचा अधिकारी कर.' निरंजन नारायणाने सांगितलें, 'मी त्या जिवात्म्यांना मुक्तिमार्गाचे अधिकारी करीन, पण ते जर तुझ्या म्हणजे गुरुच्या मार्गदर्शनाप्रमाणे पूर्णपणे योगमार्गाचे व

युगधर्माचे आचरण करूं लागले तरच. जे जीवात्मे युगधर्मानुसार प्राधान्यभूत वैदिक क्रियाचरणाने युक्त होऊन त्यांचेच आचरण करतील ते आपल्या ह्या निरंजन निराकाराच्या घरी येऊन पोहोचतील. हे ब्रह्मदेवा माझे हे वचन तू अगदी पूर्णपणे सत्य मान व त्याप्रमाणे मुक्तीची युक्ति करून त्याचे मार्गदर्शन तू या मृत्युलोकांतील जीवात्म्यांना कर व त्याकरिता तू मृत्युलोकात अवतार ग्रहण करून या गहन व गूढ तत्त्वांचा उपदेश कर.'

ब्रह्मदेवाने अनन्यभावाने नारायणाच्या चरणी शिर नमविले व तो मृत्यूलोकातील जीवात्म्यांना मुक्ति मिळण्याकरिता लागणाऱ्या साधनांचा विचार करू लागला. त्यातच वीस युगे निघून गेली. नंतर मनात हेतु धरून संकल्प करून ब्रह्मदेवाने ध्यान केले व आकाश निर्माण केले. आकाशापासून तेज अथवा नुर निर्माण केले व त्यापासून चंद्र-सूर्य निर्माण करून ते तेज त्यांना दिले. नंतर तेजापासून वायु निर्माण होऊन वायुपासून पाणी निर्माण झाले व पाण्यापासून पृथ्वी निर्माण झाली. अशा रितीने अनंत युगांच्या कालावधीत हे पंचमहाभूत निर्माण करून सृष्टीची उत्पत्ति झाली. हे सर्व त्या नारायणापासून ब्रह्मदेवास प्रेरणा होऊन व ब्रह्मदेवाने संकल्प करून निर्माण केले. पण स्वत: नारायण हा अलक्ष्य निरंजन निराकार रूपाने सर्वाहून अलिप्त राहिला.

सद्गुरु ब्रह्मापासून म्हणजे ब्रह्मदेवापासून सकळ सृष्टीचे मंडाण मांडले गेले. त्या सृष्टीगुरु ब्रह्माने इच्छामात्रेकरून चार खाणी, चार वाणी, व चार वेद यांची रचना करून स्वेदज, अंडज, उद्भीज व जरायुज या चार खाणीमध्ये प्रत्येकी २१/२१ लाख अशा एकंदर चोर्यायशी लक्ष जीवयोनी निर्माण करून या सृष्टीची उत्पत्ति व रचना घडवून आणली. पहिल्या आठलाख करण एवढ्या दीर्घकाळात ब्रह्माने १३ अवतार धारण केले. (ब्रह्मा निश्चल, स्थिर व ध्यानमग्न राहून सृष्टीची उत्पत्ति व रचनादि कार्ये घडवून आणण्याकरिता ब्रह्मदेवाने १३ मानसपुत्रांची उत्पत्ति केली.) त्यांच्या जप तप कर्म भक्ति ज्ञान व्रत उपवास आदि अनेकानेक साधनांनी अनंतकोटी जीवांचा उध्दार झाला.

प्रत्येक चतुर्युगांच्या शेवटी कल्पांत म्हणजे नित्यप्रलय होत असतो. त्या नित्य प्रलयाचे वेळी सृष्टीमध्ये जलप्रलय होत असून सर्व सृष्टी त्या प्रलयजलांमध्ये बुडून नाश पावते तेव्हा एकटा परब्रह्म परमेश्वर बालक रूप धारण करून वडाच्या एका पानावर शयन करून आपल्या योगनिद्रेत निमग्न असतो. असे एक हजार युगे गेल्यानंतर

ब्रह्मदेवाची एक रात्र पूर्ण झाल्यामुळे व नवीन दिवसास सुरुवात झाल्यामुळे सृष्टीच्या रचनेस सुरुवात होते. त्यापैकी शेवटच्या चार कल्पांची रचना सद्गुरु महाराजांनी दर्शविली आहे. या चार कल्पामध्ये प्रत्येक चार युग याप्रमाणे सोळा युगे झाली आहेत.

सर्वप्रथम ब्रह्मदेवाने संकल्प करून 'प्रज्ञानमानन्दंब्रह्म' या वेद मंत्राचा उच्चार करून त्याचे सतत स्मरण चिंतन करून त्या मंत्राचे विशेष प्रकारे वर्णन केले तोच 'ऋग्वेद' होय. या ऋग्वेदांची ज्यावेळेस रचना झाली तेव्हा निरंजन नारायणाने हव्य, कव्य, केशव व प्रेम (परम) असे चार स्वरूप धारण केले व त्यांनी त्या काळी असलेल्या जीवात्म्यांना सध्दर्माचा उपदेश अथवा मार्गदर्शन करून त्यांचा उध्दार केला. प्रथम दशरायण कल्पाचा संकल्प करून ब्रह्मदेवाने श्री हरीचे नामस्मरण केले. श्रीहरीने ब्रह्मदेवास जाप (मंत्रोपदेश) देऊन संकल्प सिध्द होण्याचा वर दिला. अशारीतीने अतिशय प्रेमभावनेने युक्त होऊन ज्याने गुरुमंत्राचे सतत स्मरण केले ते सर्व जीव भव बंधनातून मुक्त होऊन देवगतीस प्राप्त झाले. याप्रकारे देवगतीस प्राप्त झालेले नवाणु करोडी यक्ष नावाचे जीव त्या दशरायण कल्पात होऊन गेले. कल्पांत पूर्ण होण्याचे वेळी ते सर्व यक्ष देव अमरापुरीला म्हणजे अमर अशा वैकुंठ धामात जाऊन मिळाले.(श्लोक ३७ - ४९)

दशरायण कल्पाची चतुर्युगी पूर्ण झाल्यानंतर ब्रह्मदेवाने आपल्या आसनावर स्थिर होऊन पाण्यास (वरूण देवतेस) पाचारण करून आपला संकल्प विदित केला. ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणे पाणी भराभर चक्राकार गतीने वरवर चढू लागले व थोड्याच काळात षड्गगन भेदून थेट ध्रुवमंडळापर्यंत जाऊन पोहोचले. अशारीतीने सप्तपाताळ, पृथ्वी, एकवीस स्वर्ग, इंद्रभुवन, सूर्यमंडल, नक्षत्रमंडल आणि वायुमंडलापर्यंत सर्वभुवन त्या कल्पान्त जलामध्ये बुडून गेले. त्या कल्पान्त काळात सर्व जीवप्राणिमात्र नाश पावून संपूर्ण जीवसृष्टी परब्रह्माच्या समष्टित (प्रकृतीत) सामावली गेली. अशारीतीने संपूर्ण पृथ्वी त्या कल्पान्त जलाने धुतली जाऊन पवित्र व शुध्द झाली. ज्याप्रमाणे योगी लोक सत् (सत्संग) दत् (दान अथवा त्याग करणे), दया (जीव प्राणिमात्रांचे रक्षण) व क्षमा (उदार अंत:करणाने सर्व प्राणिमात्रांचे ठायी लीन होणे) या अलौकिक चतुर्गुणांनी युक्त होऊन श्रीहरीचे स्मरण करून शुध्द व पवित्र होऊन आत्मपद प्राप्त करून घेतात, त्याप्रमाणे सर्व पृथ्वी त्या कल्पान्त जलाने शुध्द पवित्र व मंगलमय

होऊन जाते. या कल्पान्त काळाच्या वेळी सर्व जीवमात्र नाश पावतात. क्षर प्रकृति नाश पावते पण अक्षर अनादि प्रकृति म्हणजे योग माया व ब्रह्मा, विष्णु, महेश यांची सृष्टी मात्र नाश पावू शकत नाही, ते अविचल अशा आपल्याच ध्यानात स्थित असतात. (श्लोक ५० - ५८)

पहिल्या दशरायण कल्पामध्ये 'यक्ष' नावाच्या जीवात्म्यामध्यें ईश्वराने जो मुख्य यक्षाचा अवतार धारण केला त्याच्या स्वरूपाचे वर्णन असे 'सूर्याप्रमाणे अतिशय तेजस्वी, नीलतेज अशाप्रकारचा त्याचा रंग होता. डोळे सवातसु प्रमाणात होते, हात सवावीत लांबीचा होता. त्याची बोटे चार तसुप्रमाणे होती. बोटावरील नखे सवा तसुप्रमाणे होती त्याचे शिर सवा पाच शेर वजनीहोते. त्याचे नाक सवा तसुप्रमाणे होते. त्याची मुछ सवा तसुएवढी होती. त्याचे ओठ सवातसुचे होते. त्याचे दात सवातसु प्रमाणाचे होते. त्याची हनुवटी पाऊण तसु प्रमाणाची होती. त्याच्या शरीराचे बंध (स्नायु) मुख्य तीनशेंसाठ होते. त्याचे हृदय सात गज प्रमाणाचे होते. त्याचे बाहु दोन असून ते सवादोन हाताचे होते. त्याचे पाय दोन असून ते सुध्दा सवादोन हाताचे होते. ठेंगणे, जाड, गोलाकार असे त्याचे शरीर होते. त्याच्या पायाच्या आंगठ्या (पायाची बोटे) चार बरोबरीच्या सवातसुप्रमाणे होत्या. पाचवा आंगठा दीड तसुप्रमाणे लांब होता.' अशापक्रारचे स्वरूप 'यक्ष' देवतेचे होते. त्याचे तेज अपरमपार होते त्या यक्ष अवताराचे स्वरूप पाहून ज्याने त्याची भक्ति केली असे नव्वाणु कोटी यक्षगण उध्दरले जाऊन अमरापूर धामात जाऊन मिळाले.

यक्ष जीवागणामध्ये सर्व जीव उध्दरले गेले, फक्त दोन जीव अधोगतीला गेले. एक सुंदर राजाची कन्या मालकबाई आणि भक्त सवदाससेन राजाचा मुलगा. हे दोन जीव नरक गतीस प्राप्त झाले. कारण त्यांनी मनात भ्रान्त - कुकल्पना धारण करून ईश्वराची उपासना केली नाही. आणि सद्भक्तांची गतगंगेची निंदा केली म्हणून ते जीव अधोगतीला गेले. जो जीव आपल्या स्वामीस ओळखत नाही. (ज्याने आपणास निर्माण केले भरण पोषण करून संरक्षण संगोपन केले, ज्याच्या कृपाकटाक्षाने हे सर्व जग दोलायमान होते त्या परमेश्वरास ज्याने ओळखले नाही; त्याची भक्ति केली नाही.) ते कोठून अमरपदास जाऊन पोहोचणार!!

दशरायण कल्प समाप्त झाल्यानंतर कल्पान्तकाळ म्हणजे सर्गकाळ संपल्यानंतर ब्रह्मा, विष्णु आणि महेश यांनी ध्यान करून आद्यनारायणास पुढे काय करावे अशी

पृच्छा केल्यावरून नारायणाने ब्रह्मास आज्ञा केली कीं, माझे तेज धारण करून तू पुढच्या कल्पाची रचना कर, नारायणाचे वचन शिरसावंद्य मानून त्याचे तेज ग्रहण करून ब्रह्मदेवाने दुसऱ्या कल्पाची रचना करण्यास सुरुवात केली. ( श्लोक ५९ - ८० )

प्रथम दशरायण कल्प संपल्यानंतर सर्गकाल पूर्ण झाला. नारायणाने गुरु ब्रह्मास दुसऱ्या यजुर्वेदाच्या तत्वाचा 'अहं ब्रम्हास्मि' मंत्राचा पाठ देऊन सृष्टीत ( जीव प्राणिमात्रांची रचना करण्यास सांगितले. त्याप्रमाणे सृष्टीत ) मेघ नावाच्या जीव प्राणिमात्रांची उत्पत्ति झाली. त्यावेळेस विष्णुनारायणाने तत्त्व, नाद आणि उत्तरा असे तीन अवतार धारण केले. त्या अवतार पात्रांना जाणून त्यांची भक्ती ज्यांनी केली असे सद्भक्त छप्पन कोटी मेघगण उध्दरले जाऊन अमरपदास प्राप्त झाले.

देवगण कल्पात बारा युगांची रचना झाली. बारा युगे पूर्ण झाल्यानंतर कल्पान्तकाळ झाल्यामुळे कल्पान्तजल भराभर वर चढत जाऊन ध्रुवमंडलापर्यंत भिडले. ब्रह्मा, विष्णु आणि महेश ही त्रिगुणात्मक अक्षरसृष्टी फक्त कायम राहून सर्व जीव प्राणिमात्र त्या कल्पान्तकाळात नाश पावले त्या काळात सर्व पृथ्वी कल्पान्त जलाने धुतली जावून पवित्र व शुध्द झाली.

दुसऱ्या देवगुण कल्पामध्ये परमेश्वराच्या अवताराचे रूप वादळाप्रमाणे होते. ज्याप्रमाणे मेघांचा वर्ण घननिळा असतो, त्याप्रमाणे वायुस्वरूप त्या परमेश्वरी अवताराचा वर्ण घननिळा होता. रात्रीच्या समयी अशाप्रकारे निलवर्ण घन:शाम प्रभु सकाळी सूर्याप्रमाणे अत्यंत तेजस्वी निरामय स्वरूप धारण करून दुपारच्या वेळेस त्या काळच्या मानव प्राण्याप्रमाणे म्हणजे 'मेघ' नावाच्या जीव प्राणिमात्राप्रमाणे रूप धारण करीत असे. अशारीतीने तो अवतार तीन स्वरूप धारण करून अगम्य लीला करीत असे. त्याकोळातील जीव मेघगण गुरु ब्रह्मा, नर विष्णु आणि स्वामी महेश्वर यांची उपासना करीत असत. परमेश्वराच्या अवतारांची उंची सव्वादहा ताल ( म्ह. हात ) होती व इतर मेघ प्राण्यांची उंची सवापाच ताल होती. अवताराचे शिर सवापाच हात होते. अडीच तसु डोळे होते. पाच तसु नाक होते. चार तसु मुछ होती, चार तसु ओठ आणि पाच अंगुल जीभ होती. बत्तीस दात होते. पाच तसु त्याची लांबी होती. दाढ सवाचार तसूची होती. हृदय पन्नास गज लांबीचे होते पण जसे रूप पालटत होते

तसे हृदयाचे आकार बदलत होते. त्याचे हात सवा गजाचे होते. पाय चार वीत होते. बाहु पाच गजांचे होते. अशाप्रकारचे अलौकिक दिव्य स्वरूप देवगुण कल्पातील अवतार विग्रहाचे होते.

देवगुण कल्पामध्ये जे मेघगण छपन्नकोटी जीव झाले त्यांच्यामधून फक्त चार जीव अवगतीला गेले. एक तर मोठा सिध्द पुरुष म्हणून गणला गेलेला पारसनाथ मुखी होता. दुसरा अरजमुनि, तिसरी पंजादेवी आणि चौथा माधवभाई असे हे चार लोक अवगतीला गेले. ज्याने परमेश्वराच्या अवतार पात्राची ओळख करून घेऊन त्यांची भक्ति केली असे जीव अमरफळ प्राप्त करवून वैकुंठास गेले, पण ज्यांनी त्या परमेश्वराच्या स्वरूपाची मनात कुकल्पना धरून शंका आणली. कोणत्याही प्रकारची श्रध्दा न बाळगता शंकाकुल होऊन त्याची निंदा केली, मन चंचल करून गतगंगेत वावरला असे भुंडा पापी जीव कायमचे नराकागारात जाऊन राहिले, त्यांना सद्‌गति कोठून लाभणार? सद्‌गुरु महाराज सांगतात कीं, हे ऋषिवरा याकरितां गुरुवचनावर दृढ श्रध्दा ठेऊन त्यांच्या वचनाप्रमाणे तू वाग म्हणजे तुला सद्‌गती प्राप्त होईल.

दुसरे देवगुण कल्प संपल्यानंतर भगवान विष्णु नारायणाने ध्यान करून ब्रह्माला पुन्हा सृष्टीमध्ये जीवसृष्टी निर्माण करण्याची आज्ञा केली व त्या आज्ञेनुसार ब्रह्मदेवाने पुढील जीवांची निर्मिती व रचना केली. (श्लोक ८१ - ११३)

भगवान नारायणाने गुरु ब्रह्मास म्ह. ब्रह्मदेवास पुढच्या कल्पाच्या सृष्टीची रचना करण्याकरीता 'तत्त्वमसि' या महावाक्याचा मंत्रपाठ देऊन मार्गदर्शन केले. त्याप्रमाणे ब्रह्मदेवाने सामवेदाची रचना करून सृष्टीमध्यें जीव प्राणिमात्रांची निर्मिती केली. त्या काळात विष्णु भगवंताने दोन रूप धारण केले. 'धर्म' आणि 'तत्त्व'. त्यांचे ज्यांनी साक्षात दर्शन घेऊन भक्ति केली असे जीव अमरपदास - मोक्षगतीस प्राप्त झाले.

तिसऱ्या पंखला कल्पाचे जेव्हा मंडान मांडले गेले रचना केली तेव्हा बत्तीस कोटी किन्नर नावाचे जीवप्राणी निर्माण केले. या किन्नर गणांचे स्वरूप हल्लीच्या मानव प्राण्याच्या स्वरूपाप्रमाणेच होते, पण त्याचे हात मानवाच्या हातापेक्षा मोठे होते. परमेश्वराने त्या कल्पात जो अवतार धारण केला तो बालकाप्रमाणे रूप धारण केलेला होता. त्या ईश्वरी अवतारावर ज्यांनी इमान राखून म्ह. दृढश्रध्दा ठेवून त्याची

भक्ति केली असे बत्तीस कोटी किन्नर गण उध्दरले जाऊन मोक्षपदाचे अधिकारी झाले. फक्त एक जीव गोविंदमुखी अधोगतीस म्हणजे आवागमनाच्या जन्ममरणाच्या फेऱ्यात पडला कारण त्याने गतगंगेची सद्भक्तगणांची निंदा केली म्हणून त्यास जन्ममरणाचे दुःख भोगावे लागले.

तिसरे पंखला कल्प पूर्ण झाले तेव्हा बत्तीसकोटी किन्नरगण अमरापुरीस जाऊन मिळाले. या पंखला कल्पात आठ युग पूर्ण होऊन नंतर कल्पांत काळ झाल्यामुळे ध्रुवमंडळापर्यंत जलमय झाले. अक्षर प्रकृति कायम राहून क्षर प्रकृतिचा म्हणजे त्रैलोक्यातील जीव प्राणिमात्रांचा नाश झाला. ईश्वराने कल्पान्त जलाने सर्व पृथ्वी धुवून शुध्द व पवित्र करून पुढील कल्पातील जीवप्राण्यांच्या निर्मितीसाठी युक्त केली.

अशाप्रकारे दशरायण, देवगुण व पंखला हे तीन कल्प पूर्ण झाले. त्यात यक्ष मेघ आणि किन्नर हे जीव सत्, दत्, क्षमा व ईश्वरभक्ति करून अजर अमर अशा निर्वाणपदास पोहोचले. या तीन कल्पात परमेश्वराचे सोळा अवतार झालेले आहेत. ब्रह्मदेवाने निरनिराळ्या काळात निरनिराळे दहा अवतार धारण करून नरनारायणाच्या अवतार पात्रांची जाणीव करून देवून जगतातील जीव प्राणिमात्रांना आत्मोन्नतीचा ज्ञानोपदेश करून मोक्षपद प्राप्तीचा मार्ग दाखविला. अशारीतीने तीन कल्पात अगम्य रूप धारण करून ईश्वराने अनंतलीला केल्या व नंतर चौथ्याकरण कल्पाची रचना करण्याचे कार्य गृहीत धरून त्याचे मंडाण मांडले. ( श्लोक ११४ - १३० )

# " प्रथम श्रीमत्स्यअवतार प्रारंभ "

सर्वप्रथम सृष्टीमध्ये नीलवर्ण धुंधुःकाराने सर्व वातावरण व्याप्त झालेले होते. केवळ एकमेव निरंजन निराकार विश्वाधार नारायण आदिअंतरहित स्वयमेव भगवान निर्गुण निराकार स्वयंज्योतिस्वरूपाने स्थित होता. त्या नारायणाने आपल्या अंशभूत तेजशलाखेपासून ब्रह्मदेवास संकल्पमात्राने निर्माण केले. नारायणाने विचार करून ब्रह्मास ज्या शब्दाद्वारे मंत्रोपदेश केला तो शब्द ॐ होय. 'अ' कार, 'उ' कार, व 'म' कार या रज सत्त्व तम त्रिगुणाच्या तीन कलात्मक शब्दांची रचना करून नारायणाने त्याचा उपदेश केल्यानंतर ब्रह्माने त्या प्रणव मंत्राचा उच्चार करून अनंत कळा प्रकाशित केल्या.

ब्रह्माने सागर तीरावर सागराप्रमाणे धीरगंभीर होऊन ध्यान करून ब्रह्मतत्वाचे चिंतन केले व वेद निर्माण केले. मग नारायणाने ब्रह्मदेवास जीवसृष्टीची रचना करण्याची आज्ञा केल्यामुळे ती आज्ञा शिरसावंद्य मानून चार खाणीची रचना करण्याचा विचार करून नारायणास या चारही खाणीतील जीव प्राणिमात्रांचा उध्दार करण्याविषयी विनविले. नारायणाने अभयवचन देऊन सांगितले कीं, मी जे जे काही रूप धारण करून मृत्यू लोकांत येईन त्याची भक्ति करणारा जीव मुक्त होईल. नंतर ब्रह्मदेवाने युगसृष्टीची व प्राणीजसृष्टीची रचना करण्यास सुरुवात केली. (श्लोक १३१ - १४४)

जेव्हा प्राणिज सृष्टी उत्पन्न होण्याचा संकल्प नारायणाने ब्रह्मदेवाकडून करविला त्यावेळेस संकल्प मात्राने ब्रह्मदेवापासून श्वेदज, अंडज, उद्भिज जरायुज या चार खाणीमद्ये प्रत्येकी २१/२१ लक्ष जीवयोनी निर्माण होऊन त्यांची पुण्यपापमय कर्माप्रमाणे सद्गति वा अधोगति होवून गतिचक्र सुरु झाले. एकदा ब्रह्मदेवाच्या क्रोधरूप संकल्पापासून एकमानसपुत्र निर्माण झाला, त्याचे नांव 'शंखवा' असे होते. तो उपजताच त्याचे अवास्तव आचार-विचार, व्यवहार व मनस्वी क्षोभ उत्पन्न करणारे चाळेपाहून ब्रह्मदेवाने त्याच्या जन्मकुंडलीवरून भविष्य पाहिले, तो त्यास आढळून आले कीं, या आपल्या मुलापासून आपला पुढे कार्यनाश होईल. ब्रह्मदेवाने त्यास एकान्तात बोलावून सांगितले कीं, 'बाळा! तू माझा प्रिय मुलगा आहेस म्हणून मी तुला तुझ्या हिताची गोष्ट सांगतो. तू तूझ्या मनाच्या सर्व उच्छुंखल वृत्त्या सोडून देऊन मन शांत व स्थिर एकाग्र करून सर्व समर्थ बलवान अशा एकेमव 'गणईश' अशा परब्रह्म नारायणाची निश्चल मनाने भक्ति कर. यातच तुझे सार्थक आहे.' पित्याचे वचन मान्य करून शंखासुराने हिमालयात जाऊन एकान्तवास पत्करला ज्याठिकाणी मन प्रसन्न व शांत राहून एकाग्र करता येईल अशी गिरीकंदराची जागा शोधून निर्विकार मनाने सर्व देवगणांचा ईश भगवान नारायणाची मनोभवाने पूजा अर्चा करू लागला. संपूर्ण रात्रभर व सवा प्रहर दिवस वर येईपर्यंत अतिशय खडतर अशी तपःसाधना तो नित्य नियमाने करू लागला. (श्लोक १४५ - १५१)

ज्यावेळेस नारायणाने 'बहुस्यां प्रजायेय' आपण अनेक रूपाने प्रगट व्हावे असा, संकल्प करूनआपल्या योगमायेचा (सच्चिदशक्तीचा) विस्तार करण्याचा विचार केला, तेव्हा जो चैतन्यप्रवाह निर्माण झाला, त्यातून ब्रह्म (प्रणव) व माया निर्माण होऊन

त्यापासून रज सत्त्व तमात्मक त्रिगुणमयी प्रकृति निर्माण झाली. अशारीतीने नारायणाने आपल्या केवळ एका निमिषार्धात ह्या चार मूर्ति प्रगट केल्या. सत्त्व, रज तमाच्या अनुक्रमें विष्णु, ब्रह्मा व महेश यांच्या प्रकृत्या निर्माण करून चौथी आद्यशक्ति अथवा योगमायेची प्रकृति स्वतंत्र ठेवली. नंतर योगमायेने सुध्दां आपल्या स्वत:स तीन गुणांनी विभागून घेऊन चौथ्या अंशाने स्वतंत्र राहिली. त्यापैकी तमोगुणाने अधिष्ठित अशी शक्ति सावित्री रजोगुणी ब्रह्मास; रजोगुणाने अधिष्ठित अशी शक्ति लक्ष्मी सत्त्वगुणी विष्णुस; सत्त्वगुणाने अधिष्ठित अशी शक्ति पार्वती तमोगुणी महेशास देऊन त्यांच्यात संमिलनाने विकृत्या घडवून आणल्या. व नंतर त्यातून पंचमहाभूतादिक अविद्या लिंगदेहात्मक निर्माण होऊन जीवसृष्टीची निर्मिती झाली. प्राणिज सृष्टी निर्माण होण्याचे वेळेस योगमायेने सृष्टिचक्र निटसुरळीत चालण्याकरिता तिनही प्रकृत्याकडे तीन कार्ये विभागून दिले. त्याचप्रमाणे या त्रिगुणाचे महत्वाचे कार्य सुध्दां विभागले आहे. रजोगुणी ब्रह्मा हा ॐ प्रणव ब्रह्मस्वरूपी असल्याने मनुष्यप्राण्यास आत्मज्ञानाचा उपदेश करून मोक्षमार्गाप्रत घेऊन जाणे. सत्त्वगुणी विष्णु अक्षर स्वरूपी असल्याने आत्मज्ञान मिळवून सन्मार्गाने वागणाऱ्या व मोक्षपद प्राप्त करवू इच्छिणाऱ्या जिवात्म्यांचे संगोपन व संरक्षण करणे व तमोगुणी महेश्वर महत्तत्त्व स्वरूपी असल्याने योग्यांच्या ठायी कर्मभक्ति ज्ञानोत्तर येणाऱ्या अहंकाराचा संहार करणे ही तीन कार्येसुध्दां याच त्रिगुणात्मक प्रकृतिकडे विभागलेली आहेत. अशा रीतीचे हे सृष्टिचक्राचे ज्ञान शंखासुराने जाणून घेतले. नंतर विचार करून त्याने आपले सुध्दां या सृष्टीत स्थान असावे या उद्देशाने प्रेरीत होऊन तपश्चर्या सुरु केली. अंतर्ज्ञानाने नारायणास जाणून त्याने आपला संकल्प नारायणास निवेदन केल्याने नारायणाने सुध्दां त्यास आपल्या सृष्टीचक्राच्या विस्ताराच्या कार्यात योग्य उपयोग करून घेण्यांकरिता स्थान दिले.

एकदा पृथ्वीवर अमरीख नावाचा राजा झाला. त्याने आपल्या गुरुकडून ग्रहण केलेल्या ज्ञानाच्या द्वारे समजावून घेतले की मानवजन्म हा चोर्यायशी लक्ष जीवयोनीतील एक फेरा असून आपल्या जीवात्म्याचा उध्दार करण्याकरितां व जन्ममरणाच्या जंजाळातून मुक्तता करून घेण्याकरिता प्राप्त होत असतो. ही मुक्तता होण्याकरीता काय उपाय करावा असे गुरुला विचारल्यावरून त्यांनी त्यास यज्ञ करण्याचे सुचविले. यज्ञद्वारा सर्वदेवता संतुष्ट झाल्यावर ते तुला इच्छित फळ देतील. म्हणून त्यांच्या प्रसन्नतेकरितां तू यज्ञ कर असे गुरुंनी त्यास सुचविले.

गुरुची आज्ञा शिरसावंद्य मानून अमरीखाने अमर होण्याच्या ईच्छेने प्रेरीत होऊन एक अत्यभ्दूत विश्वयज्ञ आरंभिला. अत्यंत भव्य व सुमनोहर असा यज्ञमंडप उभारून त्यात विश्वातील सर्व ऋत्वीजांना आमंत्रीत करून वेद मंत्रोच्चाराच्या घोषाने सर्व गगनमंडळ गर्जवून सोडले. मंत्राहुती द्वारे इंद्र, चन्द्र, वायु, वरूण, सोम, अग्नी, सूर्य आदि देवदेवता यक्ष, किन्नर, चारण, मेघ, आदित्य, नक्षत्र, ग्रह वगैरे विश्ववंदित देवगण, ऋषि, मुनि, योगी, यति, सिध्द आदि महापुरुष तर उपस्थित होतेच पण आद्यनारायण, आद्यशक्ति, ब्रह्मा, विष्णु, महेश हे प्रमुख पंचायतन सुध्दां आपापल्या शक्तिगणासह यज्ञात उपस्थित झाले. सर्वांनी आपापला हविर्भाग स्विकारून संतुष्ट झाले. सर्वांनी अमरीखास इच्छित फल अमरपद प्राप्तीचा वर देऊन संतुष्ट केले.

यज्ञ समाप्तीच्या वेळेस पूर्णाहूति होऊन ब्रह्मभोजनाचा कार्यक्रम सुरु झाला. ब्रह्मभोजनास सर्व देव, ऋषी-मुनि, मानवगण उपस्थित होते. पण शंखासूर नव्हता. तप:साधना करण्यात त्यास वेळ लागला असावा किंवा अन्य कांही कारणाने तो वेळेवर उपस्थित राहू शकला नसावा असा साधक बाधक विचार करून ब्रह्मभोजनाचा मुहूर्त टळू नये व त्याच्या एकट्याच्याने सर्वांचा विरस होऊ नये म्हणून ब्रह्मदेवाने अमरीखास आज्ञा करून ब्रह्मभोजन उरकून घेण्यास सांगितले. ब्रह्माच्या आज्ञेवरून ब्रह्मभोजनाचा कार्यक्रम सुरु झाला. तरीही शंखासूर आला नाही. ब्रह्मभोजन आटोपल्यावर सर्वांनी तृप्त व प्रसन्नचित्त झाल्यावर अमरीखास अनेकानेक शुभ वर प्रदान करून सर्व आपापल्या स्थानी जाऊन पोहोचले.

सर्व निरवानिरव होत आहे अशा वेळेस शंखासुर तेथे येऊन दाखल झाला. पाहतो तो सर्व तृप्त होऊन कांही आपापल्या स्थानी जाऊन पोहोचलेसुध्दां आहेत, कांही जात आहेत असे जाणून शंखासुरास फार राग आला. आपली वाट पाहिल्याशिवाय अथवा आपली येण्याबद्दलची कोणत्याही प्रकारची दखल न घेता ब्रह्मभोजन उरकून टाकले हे जाणून त्यास अतिशय क्रोध आला. कोपायमान होऊन त्याने अमरीखास शाप दिला की,'हे अमरीखा! मी कोण आहे आणि माझी पात्रता - योग्यता काय आहे, माझे तपसामर्थ्य तपोबल किती आहे हे न जाणता माझी कोणत्याही प्रकारची दखल न घेतां तू यज्ञाची पूर्णाहूती करून ब्रह्मभोजनाची सांगता केलीस. हा माझा धडधडीत अपमान केलास. याचे फल मी तुला शाप देतों की ज्या उद्देशाने तू यज्ञ केलास तो उद्देश सफल न होता तुला शंभरवेळेस गर्भवासाचे दु:ख भोगावे लागेल.'

अमरीखास तर जणू आकाशच कोसळून पडावे अथवा प्रलयंकारी मेघगर्जना व्हावी असे वाटून सोसाट्याच्या वादळाने जसा वृक्ष बुंधापासून कंपायमान व्हावा तसा शंखासुराचा तो रूद्र अवतार पाहून अमरीख थरथर कापू लागला व क्षमा मागू लागला. पण काहीही उपयोग झाला नाही. शंखासूर तसाच कोपायमान होऊन आपल्या स्थानी निघून गेला. अमरीखास काय करावे हे सुचेनासे झाले. त्याने आपल्या हृदयांतरात नारायणाचे ध्यान करून नविन उपस्थित झालेल्या संकटाचे व त्यातून मुक्त होण्याविषयी आर्ततेने करूणा भाकली. (श्लोक १६० - १६६)

अमरीख राजाने नारायणास अनन्यभावाने नमन करून निवेदन केले कीं, 'हे नारायणा! सच्चिदानंद प्रभु! हे सर्वान्तर्यामी सर्वसाक्षी भगवंता! आपण मला या भवसागरातून मुक्त होण्याचा वर दिला पण शंखासुराने कोपायमान होवून शंभर वेळेस गर्भवासाचे दुःख भोगण्याचा शाप मला दिला. हे दयानिधे, कृपासागरा, मला या भवजंजाळातून - जन्ममरण रूप संसारचक्रातून सोडविणारे आपणाशिवाय अन्य कोणी नाही. या दीन दासावर करूणा करून मुक्त होण्याचा उपाय सुचवा.

नारायणाने आश्वासन देऊन अमरीखास स्वस्थ राहण्यास सांगितले व ब्रह्मदेवास पाचारण करून शंखासुराचा गैरसमज दूर करण्याविषयी सुचविले. ब्रह्मदेवाने शंखासुरास बोलावून त्यास सांगितले की, 'बाळा, आम्ही सर्वांनी मिळून अमरीखास अमर होण्याचे वरदान दिलेले असतांना तू का म्हणून त्यास शाप दिलास?' शंखासुर म्हणाला, 'पिताजी, माझा अपमान करून, मला न बोलावता त्याने यज्ञाची सांगता कां केली?' ब्रह्मदेव म्हणाला, 'अरे शंखवा! यात अमरीखाचा मुळीच दोष नाही. तुला येण्यास उशिर लागला. मुहूर्त टळू नये याकरिता आम्हीच तसे करण्यास त्यास सांगितले. यात दोष तुझाच आहे, म्हणून तू त्याला दिलेला शाप मागे घे.' शंखासूर माघार घेण्यास कोणत्याही परिस्थितीत तयार नव्हता. पण नाइलाज होऊन त्याने आपल्या पित्याच्या शब्दाकरिता थोडी माघार घेऊन सांगितले, 'पिताजी, माझे वचन कधीच अन्यथा होणार नाही. अमरीखास जन्म मरणाचे दुःख भोगावे लागेल. पण तुमच्या प्रित्यर्थ मी त्याचे वीस जन्म कमी करतो, मात्र ऐशी वेळेस त्यास जन्म घ्यावा लागेल.

ब्रह्मदेवाचा नाइलाज झाला, त्यास पूर्ण खात्री होती की आता आपण आणखी जर आगळिक केली तर शंखासूर आपला अपमान करील, म्हणून विचार करून ब्रह्मदेवाने महादेवास शंखासूराची समजूत घालण्यासाठी सुचविले. महादेवाने शंखासूराजवळ जाऊन शाप मागे घेण्याकरिता सांगितले. परंतु शंखासुराने आणखी वीस जन्म कमी करण्याचे मान्य केले. अशाच रीतीने शक्तिने व विष्णुने सुध्दां शंखासूराची समजूत घातल्यामुळे त्यांच्या प्रत्येकाकरीता वीस वीस जन्म त्याने कमी केले. अशा प्रकारे अमरीखाचे ऐंशी जन्म कमी होऊन बाकी वीस जन्म राहिले.

दैत्य स्वभावास अनुसरून शंखासुराने विचार केला की या सर्व देवांनी घाट घालून आपणास फसविले. पर्यायाने आपले वचन मिथ्या होत आहे. म्हणून मनाशी पक्का निश्चय करून त्याने ठरविलें की, 'आता कोणीही आला तरी न ऐकता कोणत्याही प्रकारची माघार घ्यायची नाही. आपले वचन सत्य होण्याकरिता अमरीखास वीस जन्म घ्यावेच लागतील.

शेवटी नारायणाने शंखासुरास सांगितले कीं, 'अरे शंखवा तू तर तुझे वचन कदापि माघार घेणार नव्हतास, मग ऐंशी जन्मांची माघार कशी घेतलीस! तशीच वीस जन्माची सुध्दां माघार घेऊन टाक व भक्तास अमर होऊ दे.' शंखासुराने कोपायमान होऊन म्हटले. 'नारायणा! या सर्व देवांनी मला फसविले परंतु आता मी फसणार नाही. हे वीस जन्म तर त्यास भोगावेच लागतील. यात तीळमात्र बदल होणार नाही.'

नारायणाने जाणले की शंखासुर आता कोणत्याही प्रकारची माघार घेणार नाही. त्यास उपदेश करणे व्यर्थ आहे. म्हणून दंडनीतीचा अवलंब करून नारायणाने सांगितले,' शंखवा! आम्ही भक्तास दिलेले वरदान तर सत्य होईलच (अमरीख तर अमर होईलच) पण तुझे सुध्दां वचन सत्य होईल. पण ते निराळ्या दृष्टीने सत्य होईल. अमरीखाच्या वीस जन्मांपैकी दहा जन्म तुलाच घ्यावे लागतील.कारण तू क्रोधायमान होऊन माझ्या भक्तांची, त्याचा कोणत्याही प्रकारचा अपराध नसतांना छळणा केलीस, त्याचे फळ तूलाच दहा जन्म भोगावे लागतील व बाकी राहिलेले दहा जन्म माझ्या भक्ताच्या प्रित्यर्थ मी धारण करीन. तू ज्या ज्या वेळेस पृथ्वीवर अवतार धारण करून तुझ्या दैत्य स्वभावास अनुसरून धर्मभावना नीतिनियम वगैरे

झुगारून देऊन अधर्मास प्रवृत्त होशिल, त्यावेळेस तुझ्या त्या अधर्ममुलक कृत्यांचा नाश करण्याकरितां व सध्दर्मप्रवर्तक अशा सृष्टजनांचे कल्याणाकरितां मी अथवा माझ्या अंशाने विष्णु अवतार धारण करून तुझा संहार करीन.' अशा रीतीने ईश्वराने या सृष्टितील चक्र सुरळीत करण्याकरीता ही अवतार धारण करण्याची योजना अमलात आणली. त्याकरिता ईश्वरास दहा अवतार घ्यावे लागले. (१६७ - १८१)

ज्या वेळेस चौथ्या करण कल्पांचे मंड्याण मांडले गेले त्यावेळेस नारायणाने ब्रह्मदेवास अपरिमित शक्ति देऊन चारही वेदांची रचना केली व त्यामुळे सृष्टीमध्ये ज्ञानरूपी प्रकाश सर्वत्र पसरून सृष्टीचक्र सुरळीत सुरु झाले. पण ब्रह्मदेवास अहंकार उत्पन्न झाला की, ही सर्व वेदरचना मी केलेली आहे. सर्वत्र माझ्याच ज्ञानशक्तीची प्रभा फाकलेली आहे. माझे सामर्थ्य अपरंपार आहे व माझ्याच सामर्थ्याने हे सृष्टीचक्र सुरळीत चालू आहे. असा एक प्रकारचा अहंकार ब्रह्मदेवाचे ठायी उत्पन्न झाल्यामुळे तो अहंकाराचा किंतु काढून टाकण्याकरितां नारायणाने शंखासुरास बोलावून ब्रह्मदेवाची वेदविद्या हरण करून नेण्याविषयी सांगितले. सृष्टीचा विस्तार व मर्त्यलोकांतील जीवात्म्यांचा उध्दार करण्यासाठी कांहीतरी कारण हवेच होते म्हणून नारायणाने शंखासुरास तशी प्रेरणा करून वेदविद्येचे हरण केले.

ब्रह्मदेव एकदा ध्यानस्थ बसलेला असतांना आपली वेदविद्या आठवू लागला, पण कांही केल्या त्यास त्या विद्येची स्मृती होईना. बराच प्रयत्न करून पाहिला पण व्यर्थ. त्यास कोणत्याही प्रकारे त्या वैदिक ज्ञानाची स्मृती होईना. त्यास संभ्रम पडला. ब्रह्मदेव चिंतातूर झाला व विचार करू लागला कीं, आता जर हे ज्ञान नाही स्मरले तर जगतात सर्वत्र अज्ञानरूपी अंध:कार पसरून सर्व कार्यनाश होईल व सृष्टीचक्र विस्कळित होईल. म्हणून ते ज्ञान प्राप्त होण्याकरीता काय उपाय करावा याचे ब्रह्मदेव चिंतन करीत बसला. त्याने अंतर्मुख होऊन जाणले कि, शंखासुराने चारही वेदांचे ज्ञान हरण केलेले आहे.

ब्रह्मदेवास असे सचिंत व निर्माल्यवत बसलेला पाहून महादेव तेथे आला व आश्चर्यचकित होऊन म्हणाला, 'हे ब्रह्मदेवा तू असा चिंतामग्न का झालेला आहेस? तुझे तेज कोठे लोप पावले? तुझी अशी अवस्था होण्याचे कारण काय घडले ते मला सविस्तर निवेदन कर.'

ब्रह्मदेव म्हणाला, 'हे रूद्रा, नारायणाची कळा अगम्य आहे. ती आपल्या जाणीवेला येऊ शकण्यासारखी नाही. अपरंपार कळाधारी नारायणाने माझ्या चित्ताचे ठायी उत्पन्न झालेला वैदिक ज्ञानाचा अहंकार घालविण्यासाठी शंखासुराकरवी वेदविद्येचे हरण करविले व त्या योगे सृष्टीत हा सर्व अज्ञानरूपी अंध:कार पसरून हे सर्व सृष्टिचक्र विस्कळित झालेले आहे. हे सदाशिवा, तू नारायणाजवळ जाऊन मी केलेल्या अहंकाराबद्दल क्षमा करावयास लाव.'

ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून सदाशिवाने नारायणाजवळ जाऊन अनन्यरीतीने नारायणाची स्तुति करून प्रसन्न केले व ब्रह्मदेवाच्या अवस्थेचे वर्णन करून वेदविद्या ब्रह्मदेवास प्राप्त करून देण्यास सांगून सृष्टिचक्र पूर्वीप्रमाणे सुरळीत करण्याविषयी विनंती केली. (श्लोक १८२ - १९४)

सदाशिवाची विनंती ऐकून श्रीहरी नारायणाने कौतुकाने म्हटले कीं, 'हे महादेवा, ब्रह्मदेव जर सर्व समर्थ आहे तर त्याचाच मुलगा जो शंखासुर वेद कसे बरे घेऊन गेला. शंखासूर वेद घेऊन गेला तोपर्यंत ब्रह्मा काय, विष्णु काय अथवा शक्ति काय स्वस्थ कसे बसले. हे एक आश्चर्यच आहे. तुम्ही असे कळाहीन, सामर्थ्यहीन कसे झालात.

महादेव म्हणाला, 'हे नारायणा, सर्व सृष्टी उत्पन्नकर्ता व हे जगत्‌चक्र चालविणारा तूच सर्व समर्थ आहेस. हे सृष्टिचक्र चालविण्याकरीता आम्हा चार मूर्तींची योजना सुध्दां तूच केलेली असून आमच्या हृदयात तूच वसून सृष्टीउत्पत्ति, पालन, संरक्षण व लय इ. कार्ये सुध्दां तूच करवित आहेस. हे जगन्नियंत्या तुझ्या कृपाकटाक्षाने उत्पन्न होणारे आम्ही, तुझ्या अपरिमित सामर्थ्यापुढे आमचे बळ तरी काय चालणार? तूच तुझे बळ देऊन आम्हास पावन करून घे, व पूर्ववत हे सृष्टिचक्र सुरळित चालविण्याचे सामर्थ्य आम्हास दे.'

अशा प्रकारे महादेवाने केलेली स्तुति ऐकून सत्‌चित्‌आनंदघन नारायण परम संतोषित झाले. त्यांनी विष्णुला व शक्तीला सुध्दां तेथे बोलाविले व आपल्या अलौकिक सामर्थ्याचे चार भाग करून त्रिमूर्ती व चौथी शक्ति यांना अर्पण केले. शंखासुराला नारायणाने आधीच अपरिमित बळ देवून या चौघा मूर्तिंना झालेला अहंकार नाहिसा करण्याचे सामर्थ्य दिलेले होते. त्याने आपले काम बरोबर बजावले पण

विजयप्राप्तीनंतर अहंकाराने तो सुध्दां प्रेरीत झाला. त्याने तपश्चर्या करून महादेवाला सुध्दां प्रसन्न करून घेतल्यामुळे महादेवाचे बळ त्याच्यापुढे कमी पडू लागले. म्हणून नारायणाने विष्णुस आपले अतुल्य बळ देऊन शंखासुराचा नि:पात करण्यास सांगितले. अशारीतीने दानवकुळाची सुध्दां रचना होऊन सृष्टी विस्ताराच्या कार्यात त्यांचासुध्दां समावेश झाला.

दानवकुळाची उत्पत्ति ब्रह्मापासून, त्यांना सामर्थ्य महादेवापासून व त्यांचा संहार विष्णु व शक्तिपासून अशी ही योजना आखली गेली. अशा प्रकारे एकमेव ॐ या अक्षर ब्रह्मापासून हा सर्व विस्तार झालेला आहे.( श्लोक १९५ - २०९ )

शुध्द सत्वांश गुणाने अधिष्ठित असलेल्या नारायणाने आपल्या समान गुणवान असलेल्या सत्त्वगुणाधिष्ठित विष्णुस सांगितले कीं, 'तू आणि मी आपण दोघे एकत्र आहोत म्हणून मी तुला वरदान देत आहे कीं, तू मृत्युलोकांत जाऊन अवताररूपाने प्रगट होऊन दुष्टांचे निर्दालन कर, सृष्टांचे पालन व संरक्षण कर आणि बिघडलेली समाजस्थिती नीट करून मानव समाजास भक्तिमार्गाचे योग्य वळण लाव. याकरीता मी माझे बळ तुला अर्पण करतो. जे सत्यवादी जीवात्मे तू घालवून दिलेल्या सन्मार्गाचे शुध्द रीतीने आचरण करून तुझे चरण पूज्य मानून तुझी भक्ति करतील त्या अनन्यनिष्ठ सद्भक्तांचा सर्व प्रकारचा योगक्षेम मीच चालविल. ते सद्भक्त मलाच येऊन मिळतील. सांप्रत तू ब्रह्मदेवाजवळ जाऊन त्याला धीर देऊन कुशलतेने विचारपूस करून तो दुष्ट शंखासूर वेद घेऊन जेथे गेला असेल तेथून वेद परत घेऊन ये. जर त्याने सहजासहजी नच दिले तर बळाचा वापर करून, वेळेस त्याचा संहार करून वेद घेऊन ये, हे कार्य तू केलेस म्हणजे चतुर्मूर्तिमध्ये तू श्रेष्ठ गणला जाशिल.'

विष्णुने नारायणास नमन केले. नम्रतेने तो म्हणाला, 'स्वामीन् माझी एवढी पात्रता नसतांना आपण ही माझ्यावर केवढी मोठी जबाबदारी टाकीत आहांत? आपण दिलेल्या अलौकिक सामर्थ्यांच्या बळावर तर मी हे कार्य तडीस नेऊ शकेल पण तत्प्रित्यर्थ माझ्या संसर्गात येणाऱ्या सद्भक्तांच्या आशा आकांक्षा, जे मी त्यांना वर प्रदान करेल ते वचन आपण पूर्ण करण्याची कृपा करावी.'

अत्यंत संतुष्ट होऊन नारायणाने विष्णुस आश्वासन दिलें की, प्रत्येक युगायुगाचे ठायी तू जे जे अवतार धारण करशिल व दुष्टप्रवृत्तीस प्रेरीत होऊन अधर्म कृत्य

करणाऱ्या दानवांचा संहार करून सन्मार्गाने नीति-नियमाने वागणाऱ्या सत्पुरुषांचे पालन व संरक्षण करशिल आणि शुध्द वैदिक सनातन धर्माचा उपदेश सद्भक्तांना करशिल त्या सध्दर्माप्रमाणे वागणाऱ्या सद्भक्तांचे वचन मी पूर्ण करेन. जे अनन्यश्रध्देने तुझे नामस्मरण करतील ते मलाच येऊन मिळतील.

अशारीतीने विष्णुची नियतकार्यावर नेमणूक करून त्याच्याकडून या सृष्टीचक्राचे पालनपोषण संरक्षणादि कार्याची जबाबदारी टाकून नारायणाने हे सृष्टिचक्र सुरळीत होण्यास गति दिली. (श्लोक २१० - २२३)

श्री नारायणाच्या आज्ञेनुसार विष्णु ब्रह्मदेवाजवळ आला व उदास मन झालेल्या ब्रह्मदेवाची ती विकल अवस्था पाहून त्यास फार वाईट वाटले. ब्रह्मास धीर देऊन विष्णुने सांगितले, 'ब्रह्मदेवा, तू आता ही उदासिनता सोडून दे. अशा चिंतेने तुझे कार्य तडीस जाणार नाही. तू चिंता करू नकोस तू निश्चल मनाने ध्यान धर. तुझे वेद परत आणून देण्याचे कार्य नारायणाने मजवर सोपविलेले आहे. त्यानुसार मी वेद आणण्याकरिता जात आहे.'

विष्णुचे आश्वासनपर भाषण ऐकून ब्रह्मदेवास धैर्य आले. त्यांनी म्हटले, 'हे अपार कळाधारी भगवंता, तू मजवरकृपा करून वेद घेऊन ये. हे स्वामीन्, वेदाशिवाय सृष्टीत सर्वत्र अंध:कार पसरलेला आहे. धर्मकार्य बंद पडून सर्व सृष्टीची घडी विस्कटलेली आहे. वैदिक ज्ञानाशिवाय अध्यात्मिक साधना साध्य होण्यासारखी नसल्याने लोक संकल्प-विकल्पाच्याच भोवऱ्यात फिरून घोटाळत आहेत. त्यांना सद्गति लाभू शकत नाही. त्या कर्मजालातून मुक्त होण्याकरिता त्यांना वैदिक विद्येची गरज आहे. व ती सर्व वेदविद्या शंखासुराने आत्मसात करून निघून गेलेला आहे. तो त्या विद्येच्या बळावर अतिशय बलवान बनून कोणाला जुमानीनासा झाला असून सर्व सुष्ट लोकांना भुलविण्याकरितां व आपल्याच छंदी लावण्याकरिता त्या विद्येचा गैरवापर करीत आहे. तू त्याचा नि:पात करून ती वेदविद्या त्याच्याजवळून काढून आण.

विष्णूने विचारले, हे ब्रह्मदेवा, तो शंखासुर वेद घेऊन कोठे गेला व त्याने कोणती कळा धारण करून कोठे तो लपून बसला ते मला सांग. ब्रह्मदेव म्हणाला, तो दुष्ट मला दिसला नाही. पण स्वर्गातून मृत्युलोकापर्यंत जाणाऱ्या कूर्मनाडावरून तो पृथ्वीवर उतरला असावा असे मला वाटते.

ब्रह्मदेवाच्या कथनानुसार विष्णु कूर्मनाडावरून जाऊन पाहतो तो शंखासुर तेथे उभा असलेला त्यास दिसला. विष्णु आपल्या पाठलागावर आलेला असावा असे जाणून शंखासुर वायुवेगाने त्या नाडातून खाली म्हणजे पृथ्वीवर उतरला. विष्णुसुध्दां त्याला पकडण्याकरितां वायुवेगाने त्याच्या मागोमाग धावू लागला.( श्लोक २२४-२३५ )

परमेश्वर विष्णु आपल्याला पकडण्याकरिता पाठीमागून येत आहे असे जाणून शंखासुर पृथ्वीतलावर आला व पृथ्वीस अत्यंत विनवणीच्या स्वरात म्हणाला कीं,' हे धरणीमाते, माझे रक्षण कर, मला मारण्याकरिता विष्णुभगवान मागाहून येत आहे. त्यांच्यापासून संरक्षण करण्याकरिता हे माते तू मला आश्रय दे. तुजशिवाय मी अन्य कोणाला शरण नाही. मी ब्रह्मदेवाचे वेद हरण करून आणले आहेत. त्यांच्या संरक्षणाकरिता तरी तू मला आश्रय दे.

पृथ्वी म्हणाली, अरे शंखासुरा, तु गुरुब्रह्माचे वेद चोरून आणलेले असून उलट मला आश्रय मागत आहेस. तुझी विपरीत बुध्दी पाहून मला आश्चर्य वाटत आहे. अशा चोरास आश्रय देणे मला लांछनास्पद आहे. सबब तुला आश्रय देता येणार नाही.'

शंखासुर म्हणाला, 'माताजी, मी वेद कशाकरिता आणले आहेत हे तुला माहित आहे काय? या वैदिक ज्ञानामुळे जगतातील जीवात्म्यांचा उध्दार करण्याकरिता मी हे वेद आणलेले आहेत. हे वेद पूर्वी ब्रह्मदेवाजवळच असल्याकारणाने त्यास मोठा अहंकार झालेला होता. त्याचा तो ज्ञानाचा अहंकार हरण करण्याकरिता व त्यायोगे अनायासे जगच्चक्राचे व्यवहार सुरळीत चालण्यांकरीता ब्रह्मदेवाजवळून ते वेद हरण करण्याविषयी नारायणानेच मला सांगितलेले आहे. म्हणून तू मला आश्रय दे. जर तू माझे संरक्षण करशिल तर हे वेद मी तुजजवळ ठेवतो. हे माता, सर्वांना सामावून घेणे हे तुझे ब्रीद आहे. हे तुझे गुण ऐकूनच मी तुजकडे आश्रयार्थ आलेलो आहे. मी तुला अनन्यशरण आहे. तू जर मला आश्रय देण्याची टाळाटाळ करशिल तर श्रीहरी मला मारून वेद घेऊन जातील. म्हणून हे धरणीमाते माझे संरक्षण कर.'

शंखासुराचे वचन ऐकून धरणी मातेस त्याची दया आली पण त्याने वेद चोरून आणल्याकारणाने अशा चोरास आश्रय द्यावा किंवा नाही या संकल्प विकल्पात ती गोते खाऊ लागली.

शंखासुर म्हणाला, 'हे धरणीमाता, तू जर मला आश्रय देणार नसशील तर तुझ्या ब्रीदास कलंक लागेल. त्रिमूर्तीसमोर तुझी लाज राहू शकणार नाही. याचा तू विचार कर व माझ्या विनंतीस मान देऊन मला आश्रय दे.

शंखासुराचे निर्वाणीचे वचन ऐकून पृथ्वीने विचार केला कीं, 'हा चोर जर वेद घेऊन आलेला आहे तर अनायासे याला मारण्याकरितां विष्णु भगवान याला शोधत येथे येतील मग अनायासे त्यांचेकडून आपला कार्यभाग आपण करून घेऊ. ही योग्य संधी दवडू नये. असा विचार करून पृथ्वीने शंखासुरास आश्रय दिला. (श्लोक २३६-२५३)

शंखासुराने पाहिले कीं विष्णु भगवान आपल्याला मारण्यास आल्याशिवाय राहणार नाही, म्हणून धावपळ करीत करीत तो पृथ्वीमातेच्या मंदिरात स्वसंरक्षणार्थ दडून राहिला. एवढ्यात भगवान विष्णु पृथ्वीच्या द्वारावर येऊन ठेपले. त्यांनी पृथ्वीस संबोधून शंखासुराविषयी विचारपूस केली. त्याच्या पोटात धस्स झाले. तेथून पळून जाण्याचा तो विचार करू लागला. पण पृथ्वीने आपणास आश्रय दिला आहे ती आपले रक्षण करीलच असे जाणून तो लपून बसला.

पृथ्वीने अतिशय आदरभावाने विष्णु भगवंताचे आदरातिथ्य केले. मान सन्मानाने बसावयास आसन वगैरे देऊन षोडशोपचारे पूजाअर्चा केली व हात जोडून अत्यंत नम्रतेने विचारले कीं, हे भगवंता, आपले शुभागमन कशाकरिता झाले? माझे अनंत जन्मांचे पुण्य उदयास आले, तेणेकरून आपले साक्षात दर्शन घडत आहे, तर आपली काही आज्ञा असल्यास या दासीस निवेदन करावी.'

विष्णु भगवान म्हणाले, 'हे पृथ्वी, शंखासुर दैत्य गुरु ब्रह्माचे वेद चोरून घेऊन आलेला आहे. त्याच्या विषयी विचारपूस तपास करण्याकरिता मी आलेलो आहे. व मला असे वाटते की तो इथेच कोठेतरी तुझ्या मंदिरात दडून बसलेला असावा. त्याला वळवून, त्याने नाहीच ऐकले तर मारून सुध्दां वेद परत घेऊन जाण्याकरितां मी आलेलो आहे. तुला त्याचा ठावठिकाणा माहीत असल्यास मला सांग.'

पृथ्वी म्हणाली,' हे भगवंता तुझा चोर कोणाच्याने दडवून ठेवता येणार नाही, कारण तू सर्वसमर्थ आहेस. अपरंपार बळ तुझे ठायीवसत असल्याने तुझ्यापुढे कोणाचीही शक्ति चालू शकणार नाही तिथे माझ्या अबलेचे बळ काय चालणार.'

पृथ्वीची अशी द्विधा झालेली वृत्ति जाणून विष्णुने निर्धाराने सांगितले, 'अर्थात माझा चोर तुझ्याच मंदिरात तूच दडवून ठेवलेला आहेस. तो ताबडतोब माझे स्वाधिन कर. शरण आलेल्यास मरण न देणे अथवा सर्वांना आपल्यात सामावून घेणे वगैरे हे तुझे ब्रीद आहे, हे मी जाणून आहे. पण पात्रापात्र पाहून अपात्रास आश्रय देणे हे अकर्तव्य आहे हे जाणूननिमुटपणे शंखासुरास माझे स्वाधिन कर. नाहीतरी मी बळजबरीने त्यास घेऊन गेल्याशिवाय राहणार नाही. (श्लोक २५४-२७२)

पृथ्वीने विचार केला आता टाळाटाळ करण्यात कांही हशिल नाही. भगवान शंखासुरास नेल्याशिवाय तर राहणार नाहीच, पण आपण योजून ठेवलेल्या कार्याचा सुध्दां त्यामुळे बिघाड होईल. म्हणून अत्यंत नम्रतेने पृथ्वीने भगवंताची प्रार्थना करून विनविले कीं,' हे श्रीहरी मी माझ्या मंदिरात शंखासुरास पाहून येते, कारण मी त्याला आश्रय दिला ही गोष्ट सत्य आहे, पण मला असे वाटते आपले आगमन झाले हे त्यास समजल्यामुळे तो पळून गेला किंवा काय हे मी पाहून येते व असल्यास त्यास आपल्या स्वाधिन करते. हे भगवंता आपण साक्षात दीनदयाळू कृपासागर आहात. शंखासुराचे निमित्त करून मजवर कृपा करण्यासाठीच माझ्या द्वारी आलेला आहात. हे भगवंता, बऱ्याच दिवसापासून मी एक सदिच्छा उराशी बाळगून आहे. माझी आशा आकांक्षा आज सफळ होण्याची सुयोग्य संधी उदयास आली आहे, म्हणून मी आज धन्यता मानीत आहे. हे श्रीहरी, आपण अंतर्यामी असल्यामुळे माझे हृदय आपण जाणतच आहांत, पण हृदय खोलून मी आज आपणाजवळ वर मागत आहे कीं आपल्याशी लग्न करण्याची माझी इच्छा सफळ करावी.' (श्लोक २७३-२८०)

भगवंतानी पृथ्वीस आश्वासन देऊन सांगितलें कीं, हे पृथ्वी. तुझी इच्छा मी पूर्ण करीन, पण आताच पूर्ण करता येण्यासारखी नाही. कारण मी भक्ताला वचन दिलेले आहे कीं, तुझ्याऐवजी मी दहा जन्म धारण करेन. त्यापैकी अजून माझा एकही अवतार पूर्ण झालेला नाही. म्हणून ऋतुकाळ प्राप्त झाल्याशिवाय ज्याप्रमाणे फलनिष्पत्ति होत नाही त्याप्रमाणे योग्य संधी आल्याशिवाय तुझे हे वचन मी पूर्ण

करू शकणार नाही. चार युगामध्ये माझे हे दहा अवतार पूर्ण होतील. तेव्हा दहाव्या अवताराच्या वेळेस जेव्हा तेहतीस कोटी देवता आपापल्या इच्छेनुसार मृत्युलोकांत मानवरूपाने प्रगट होऊन भरतखंडातील जांबुद्विपात मुक्त होण्याच्या इच्छेने एकत्रीत जमतील त्यावेळेस माझे रूपाने आद्यनारायण निकलंकीनारायण हे नाव धारण करून प्रगट होतील व सर्व सद्‌भक्तांना दर्शन देतील. अनंत कळा धारण करून मी कुवारीका भूमीवर आपले आसन मांडून निकलंकी अवतार धारण करेन व सद्‌गुरु ब्रह्मा हे इन्द्र इमामशहा या नावाने प्रगट होऊन वैदिक ज्ञानाचा सर्वत्र प्रचार करतील. त्याप्रमाणे आचरण करून जे सद्‌भक्त मुक्त होण्याच्या इच्छेने प्रेरीत होऊन त्या अनंत करोडी देवतांच्या मेळाव्यात एकत्र येतील त्यावेळेस हे पृथ्वी मी तुझे वचन पूर्ण करीन. ज्यावेळेस जगतात सर्वत्र हीन-क्षीण-लहान-मोठा, उच्च-नीच वर्णीय असा कोणत्याही प्रकारचा भेद राहू शकणार नाही. वर्णभेद अथवा जातीभेदनाश पावून सर्व मानवजात एकाकार होऊन जाईल. द्वैतभेद रूपी कलंक उतारून सर्व मानवजात मी निष्कलंक करीन. हे धरणी त्यावेळेस तुझे वचन मी पूर्ण करीन. अनंत काळापासून वेदांची अपौरूषेय वाणी ज्या अद्वैत ज्ञानाचा दिव्य संदेश देत आली. त्या अव्दैत ज्ञानाप्रमाणे वर्तणूक सर्वांकडून घडवून आणण्याकरितां मी प्रगट होईल, तेव्हा हे धरणी तुझे वचन मी पूर्ण करीन.

'आतापर्यंत जेवढे सद्‌भक्त उध्दरले आहेत व त्यांच्याबरोबर अथवा पुण्यप्रभावाने ज्या ज्या सद्‌भक्तांना प्राप्त झालेलीआहे असे अनंतकरोडी भक्तगणांच्या उध्दारासाठी व त्यांच्या भक्तीच्या सफलतेसाठी त्यांना मोक्षगति प्राप्त करवून देण्यासाठी आणि त्यांना तशा प्रकारच्या दिलेल्या वचन पूर्ततेसाठी मी नऊ अवतार पूर्ण करून दहाव्या निष्कलंक रूपाने प्रगट होईल तेव्हा हे पृथ्वी तुझे वचन मी पूर्ण करीन.'

भगवंताचे वचन ऐकून पृथ्वीने स्वत:स कृतार्थ मानले. श्रीहरीची मनोमन षोडशोपचारे पूजा करून हात जोडून अनन्यभावाने नमन केले. तेव्हां श्रीहरीचा व पृथ्वीचा झालेला सर्व वार्तालाप शंखासुराने ऐकून तो भयभीत झाला. तो मनाशीच विचार करू लागला की आता आपले येथे थांबणे योग्य नाही कारण पृथ्वी आणि श्रीहरी यांची वचनबध्दता होऊन एकरूप झालेले आहेत. याठिकाणी आपला पिंडप्राण आता सुरक्षित राहू शकणार नाही. पृथ्वी आता आपले रक्षण करू शकणार नाही. जरी पृथ्वीने आश्वासन दिले

तरी तिचे बळ श्रीहरीपुढे चालणार नाही. उलट ती आपण होऊनच मला त्याचे स्वाधिन करीन. असा विचार करीत आहे तोच पृथ्वी आपणास पकडण्याकरिता येत आहे असे मानून तो तेथून निघून पळून गेला. पृथ्वीवरून निघून शंखासुर शंखनागपाताळाच्या मार्गाने पळू लागला. श्रीहरीस ते समजल्यावरून ते सुध्दा त्याचा पाठलाग करीत तेथून निघाले. (श्लोक २९४-३०४)

भूतलावरून शंखासुर पाताळात ज्याठिकाणी उतरला तेथे शंखनाग राजाचे राज्य होते. राज्यद्वारावरून जात असतांना शंखासुरास शंखराजाची स्त्री आपल्या लहान मुलास घेऊन बसलेली त्यास दिसली. त्या कारूण्यमूर्ति राजमातेस पाहून शंखासुरास आनंद झाला व धैर्य धरून तो पुढे गेला व नमन करून राजमातेस म्हणाला, 'हे राजमाता, मी तुला शरण आलेलो आहे. श्रीहरी मला मारण्याकरितां माझा पाठलाग करीत आहे. त्यांच्यापासून माझे संरक्षण कर.'

राजमातेने विचार केला कीं, हा प्रत्यक्षच सांगत आहे कीं, श्रीहरी मला मारण्याकरिता येत आहे. त्याअर्थी हा कोणीतरी दुष्ट असावा आणि अशा दुष्टास आश्रय देणे शास्त्रदृष्ट्या अयोग्य आहे म्हणून तिने स्पष्ट शब्दात त्याची निर्भत्सना केली की नारायणाच्या चोरास मजकडून आश्रय मिळणार नाही. राणी एवढे म्हणत आहे तोच श्रीहरी तेथे येऊन ठेपले. त्याआधीच शंखासुर तेथून निसटून गेला. श्रीहरीने दैत्याचा तपास करीत असता राणीने आपल्या बालकास श्रीहरीच्या चरणावर वाहून स्वत: दोन्ही हात जोडून नमस्कार केला. तेव्हा भगवंतानी त्या दोघा मातापुत्रांना आशिर्वाद दिला की, ज्या वेळेस मी सातवा रामाचा अवतार धारण करेन तेव्हा तू राजा हरिश्चन्द्राच्या घरी राणी तारामती होशिल व हा बालक कुमार रोहिदास होऊन अवतरेल. अपार कसोटीच्या भट्टीत तावून सुलाखून शेवटी तुम्ही माझ्या सत्स्वरूपी येऊन मिळाल. (श्लोक३०५-३१६)

तेथून शंखासुर निघाला तो पळत पळत वितल पाताळामधील एका नगरात गेला. त्या नगराचा राजा अन्नपाल नावाचा होता. सदैव धर्मरत असल्याने त्याच्या राज्यात अन्नधान्य वगैरे सर्व साधनांची संपन्नता होती. राजा सत्यवादी व सत्यप्रिय असल्याने व सत्याचे पालन करणाराचे रक्षण करणारा असल्याने प्रजाजनात कोणीही दु:खी कष्टी अथवा असत्याचरण करणारा नव्हता.

रात्रीची वेळ असल्यामुळे सभाभरून श्रीहरी-किर्तन-भजन-पूजन चालू होते. शंखासुर पळत जाऊन आपले मूळ रूप पालटून त्याने कपट रूप धारण केले. सभेमध्ये जाऊन त्याने दिवटी धारण करणाराचे रूप घेतले. राजाजवळ जाऊन तो उभा राहिला. एवढयात श्रीहरी सुध्दा त्याच्या पाठीमागून येऊन त्यांनी एका सभासदाचे रूप घेतले व शंखासुराने धारण केलेल्या दिवटीचेच तेज हरण केले. सर्वत्र अंधार पडला. सर्व सभा अंधाराच्या काळोखात बुडाली. शेजारी बसलेले लोक सुध्दा ओळखून येत नव्हते. अशा निबिड अंधारामुळे सर्वत्र एकचगलकाउडाला व सभेत सर्व हलकल्लोळ उडाला.

श्रीहरीने दुसरे रूप धारण करून द्वाररक्षकाजवळ जाऊन त्यास सर्व हकीकत सांगितली व शंखासुराचा भेद निवेदन केला. तेव्हा द्वाररक्षक पळत राजाजवळ गेला व राजास सर्व हकिकत निवेदन करू लागला.

द्वाररक्षक राजसभेत येऊन पाहतो तो सभेत सर्वत्र अंध:कार पसरलेला असून गोंधळ माजलेला आहे असे त्यास समजून आले. राजा चिंतातूर होऊन विचारमग्न झालेला दिसला व जवळच ब्रह्माचा चोर शंखासुर उभा असलेला त्यास दिसला. द्वाररक्षक हात जोडून राजास म्हणाला, महाराज हा सेवक आपणास एक सुचना देत आहे कीं, आपल्या राजद्वारावर एक अलौकिक पुरुष उभा असून तो सर्व आगम निगम जाणणारा अंतर्ज्ञानी आहे. तो अगदी मितभाषी असून जे कांही वचन बोलतो ते अमृताप्रमाणे व प्रकाशमान करणारे असल्यामुळे व त्यानेच मला सभेतील गोंधळाचे कारण सांगितल्यामुळे आपणास सांगण्याकरिता मी आलेलो आहे. तो पुरुष आपल्या देशाचा नसून अलौकिक प्रकाशमान आहे.'

द्वाररक्षकाचे वचन ऐकून सत्यवादी राजाने मनाशी विचार केला की, हा अलौकिक पुरुष दुसरा कोणी नसून परलोकाहून आलेला, ज्याने स्वर्गमृत्यू पाताळादि चौदाभुवन बांधलेले आहेत, असा विष्णु भगवानच असावा असा विचार करून गडबडीने उठून उभा राहिला व त्याच्या दर्शनाकरिता धावपळ करीत धडपडू लागला. गडबडीने त्यास वस्त्राचे सुध्दा भान राहिले नाही. हृदयात फक्त एकच विचार कीं, त्या पूर्णब्रह्म भगवंताला मी केव्हा जाऊन मिळेल. एवढया आतुरतेने प्रेरित होऊन राजाद्वारावर जाऊन पोहोचला व त्या अलौकिक पुरुषास पाहून दोनही हात जोडून त्याच्या चरणी

लागला. अनन्यभावाने विनवणी करू लागला की, 'हे दिनदयाळा, नारायणा माझे अनंत जन्मांचे पुण्य आज उदयास आले. भगवन् मी अती पतीत असूनही आपण कृपा करून माझे अवगुण ध्यानी न घेता मुक्तिपदाचा अधिकारी केले. मी रंक असूनही माझ्या जन्माचे सार्थक करण्याची कृपा मजवर केली. ह्या अनंतउपकारातून मी कसा उतराई होऊ! हे भगवंता, मजवर दया करून जसा तू मानव जन्म दिलास तसे त्याचे सार्थक करण्याकरिता, लाज राखण्याकरिता, मुक्त होण्यांकरितां मला बळ दे.'

प्रेमभावाने परमेश्वराने अन्नपाळ राजास मुक्त होण्याचा वर दिला व सांगितलें कीं हे राजा मृत्युलोकात तू भक्त रूख्मांगद होऊन अवतरशील व माझ्या वरदानाप्रमाणे अपार पुण्यशील होऊन अंती अमरापुरीला जाशील असे वरदान देऊन भगवान तेथून शंखासुरास पकडण्यांकरिता धावले तोच शंखासुर पळत निघाला. (श्लोक ३३०-३५३)

तेथून शंखासुर पुढे निघाला व सुतल देशाच्या मार्गाने धावू लागला. सुतल पाताळाच्या मार्गाने तो जेव्हा जाऊ लागला तेव्हा अतिशय बिकट अशा अरण्याचा भाग त्यास दिसला. तेथून पुढे कसे जावे व मार्ग आहे किंवा नाही वगैरे विचार करीत आहे तोच त्यास तिथे एक स्त्री आपल्या लहान मुलास खेळवीत असून कांही ज्ञानाच्या गोष्टीही त्यास सांगत आहे असे त्यास दिसले. तो त्या स्त्रीचे ज्ञान ऐकून आश्चर्यचकित झाला व त्यांच्याजवळ जाऊन हात जोडून म्हणाला, हे माते, तू तुझ्या बालकास ज्याप्रमाणे ज्ञानोपदेश करीत आहेस तशीच मजवर कृपा करून येथून पुढे जाण्याचा मार्ग दाखीव. मी या वैवतास बंधुच्या ठिकाणी मानतो. हे बंधु तू मला पुढे जाण्याकरितां मार्गदर्शन कर. दोघा मातापुत्रांना त्याची दया येऊन त्यांनी त्यास मार्गदर्शन केले व त्यास त्याचे नाव विचारले. नाव ऐकून त्यांना शंका आली की शंखासुर तर ब्रह्मदेवाचे वेद चोरून घेऊन आलेला आहे. अशा तस्कराला मार्गदर्शनही करणे पाप आहे असे जाणून ते पश्चाताप करीत आहे तोच विष्णु भगवान तेथे येऊन ठेपले.

दोघा मातापुत्रांनी श्रीहरीस जाणून त्यांचे पाय धरून अनन्य भावाने विनवणी केली कीं, 'हे भगवंता, आम्हा पतीत जीवावर अपार दया करून पावन करून घेण्याकरीता आपले आगमन झालेले आहे. म्हणून आम्ही अनन्यरीतीने आपणास शरण आलेलो आहोत. आपली कांही आज्ञा असली तर आम्ही शिरोधार्थ मानून पालन करू! श्रीहरी म्हणाले, 'माझा चोर जो शंखासुर तो याठिकाणी आलेला आहे त्याला पकडून वेद परत घेऊन जाण्याकरीता मी आलेलो आहे.'

भगवंताचे वचन ऐकून वैवत बाळ हात जोडून म्हणाला,'हे भगवंता तू याठिकाणीच उभा राहा. मी त्या शंखासुराला पकडून येथेच घेऊन येतो. माझ्या बालवयाकडे पाहू नका. मी आपल्या सामर्थ्याने त्या दैत्यास जीवंत पकडून घेऊन येतो.'

भगवंतास त्या चिमुकल्या बाळाचेकौतुक वाटले. सुसंस्कारी व आपला अनन्य भक्त असे जाणून श्रीहरीने त्या वैवत बाळास सांगितले, 'बाळा वैवता, तूं जाऊ नकोस. तुझे हृदय मी जाणत आहे. तुझी माझे ठायी अनन्यनिष्ठा आहेहे जाणून मी तुला वर देतो की मृत्युलोकांत सिलोन देशात बिभिषण या नांवाने तू जन्म घेशील व अत्यंत पुण्यवान धर्मशील असा सद्भक्त होशील. ज्यावेळेस मी सातवा राम अवतार धारण करून हा शंखासुर तुझा वडिलभाऊ रावण रूपाने प्रगट होईल तेव्हा त्यास ठार मारूनच सर्व लंका देशाचे राज्य तुझ्या स्वाधीन करेन व तुझा उध्दार करून मोक्षगतीचा अधिकारी करीन.' अशा प्रकारचा वर वैवत बाळास देऊन श्रीहरी शंखासुरास पकडण्याकरितां त्याच्या मागोमाग धावू लागला. (श्लोक ३५४-३७२)

वैवत बाळास आशिर्वाद व वरदान देऊन श्रीहरी शंखासुरास पकडण्याकरिता पुढे जाऊ लागले. तेव्हा शंखासुर मार्गातच पळत असतांना त्यास दिसला. श्रीहरी जोराने त्याचा पाठलाग करू लागले. परंतु शंखासुराने आपल्या दानवी मायेचा अवलंबकरून श्रीहरीस आपणापर्यंत येण्यास शक्य तेवढा विलंब व्हावा व आपणास पळून जाता यावे या उद्देशाने त्याने मायावी दैत्य निर्माण केले व त्यांना श्रीहरीशी युध्द करण्यास सांगून आपण स्वत: पुढे पळू लागला. अशा रितीने शंखासुराने कपटनीतीचा अवलंब केलेला पाहून श्रीहरीने सुध्दां आपल्या अतुलनीय बळाचा अवलंब करून दैत्यांचा संहार सुरु केला. मार्गात अडथळा आणणाऱ्या दैत्यांचा संहार केल्याशिवाय पुढे जाणे अशक्य झाल्यामुळे अनायासेच शंखासुरास पुढे पळून जाण्यास वाव मिळाला.

तेथून शंखासुर अतल पाताळाच्या मार्गाने धावू लागला व रस्त्याने मधून मधून योध्दे निर्माण करीतच गेल्यामुळे भगवंतास त्यांचा संहार करावा लागला. कित्येक दैत्य भगवंताशी युध्द करू लागले, तर कित्येक त्यांना शरण येऊन मिळाले. अशा रितीने भगवंताला आपल्या अतुल बळाचा वापर करून संकटाचे निवारण करावे लागले.

शेवटी शंखासुर अतल पाताळातील राजा 'जयवंत' याच्या राजवाड्यात आश्रयार्थ निघून गेला. पण तिथे आत्मप्रौढी मिरवून आपल्या पराक्रमाचे वर्णन करू लागला. अशारितीने राजवाड्यात त्याचा वार्तालाप ऐकून व विशेषत: श्रीहरीविषयी शंखासुराने राजाच्या मनात करून दिलेल्या दुराग्रहामुळे राजाचा द्वाररक्षक भोममंडलिक यास फार वाईट वाटले. श्रीहरीची निंदा ऐकून त्यास शंखासुराचा मोठा राग आला. परंतु तो सामान्य द्वाररक्षक असल्यामुळे त्यास कांही करता येण्यासारखे नव्हते. म्हणून मनातच चुरुमुरुन तो श्रीहरीचा धावा करू लागला. तोच श्रीहरी तेथे येऊन ठेपले.

भोममंडलिकाने श्रीहरीचे पाय धरून अत्यंत करूण भावाने त्याची विनंती केली कीं, 'हे भगवंता तू अपार बलवान सर्व समर्थ आहेस. तुझी कळा अगम्य आहे.तिचा पार लागू शकणार नाही. जरी शंखासुराने कितीही द्वेषबुध्दीने तुला त्रास दिला तरी तुझ्या बळापुढे त्याचे कांही एक चालणार नाही. पण त्यापेक्षा आपण मला आज्ञा करावी मीच त्याला पकडून येथे घेऊन येतो. भोममंडलिकाची तशी बुध्दी पाहून श्रीहरी त्याजवर प्रसन्न झाले व त्यांनी वर दिला कीं हे भोममंडलिका, तू मृत्युलोकात सद्भक्त अंबरीष होवून पृथ्वीवर राज्य करशील, जेव्हा मी समुद्रमंथन करून रत्न काढण्याकरितां मृत्युलोकांत कूर्मरूपाने अवतरेन तेव्हा तुझे जन्माचे सार्थक करून उर्ध्वगतीस घेऊन जाईन. (श्लोक ३७३-३९७)

सर्व दैत्य जरी श्रीहरीबरोबर युध्द करीत होते तरी श्रीहरीच्या दृष्टीपाताबरोबर कित्येक निश्चेष्ट खाली पडत होते. कित्त्येक युध्द करून पराभव पावून जमिनीवर पडत होते तर कित्त्येक मूर्च्छा निघून गेल्यावर जागृत होऊन परत युध्दास तयार होत असत. अशारीतीने मार्गावर अडथळा करीत करीत शंखासुर रसातळ पाताळात जाऊन पोहोचला. रसातळ पाताळाचा राजा दमन व त्याचा बुध्दिशाली प्रधान दत्त हे दोघे राजवाड्यात उपस्थित असतांना शंखासुराने वेष पालटून ब्राह्मणाचा वेष धारण करूनराजास लांबलचक आशिर्वाद देऊन विनंती करूं लागला की,'हे दमन राजा,

मी विप्र असून तुझ्या येथे रक्षणाकरितां आलेला आहे. तर तू मला आश्रय दे. दत्त प्रधानाने त्यास आपादमस्तक अवलोकन करून ओळखून राजास सांगितले,' महाराज, ह्या विप्राचे आपल्याकडून रक्षण होण्यासारखे नाही. कारण एकतर याच्या डोळयावरून, वाणीवरून व इतर लक्षणावरून हा कपटी दिसत असून शिवाय चोर व युध्दखोर दिसत आहे. यानेच ब्रह्माचे वेद चोरून आणले असावे असे वाटते म्हणून अशा तस्कर दानवास आपल्या येथे आश्रय देऊ नये अशी मी विनंती करतो.'

दत्त दमनराजास हे सांगत आहे तोच श्रीहरीसुध्दां तेथे उपस्थित झाले. श्रीहरीची ती तेजस्वी व प्रफुल्ल मूर्ति पाहून राजा आणि प्रधान दोघांनी धावत पळत जावून त्यांचे पाय धरले व हात जोडून श्रीहरीची स्तुति करून म्हणाले, 'हे स्वामीन् आम्हां पतीत जीवावर कृपा करून आपल्या अनेकानेक सद्भक्तांवर कृपादृष्टी करून त्यांचे कार्य सिध्दिस नेण्याकरिता हे ईश्वरा तू प्रगट होऊन या स्थानी आलेला आहेस. आपले दर्शन होऊन आम्ही कृतार्थ झालो आहोत. आपण येथेच थांबावे. आम्ही दोघे शंखासुरास पकडून आपल्यासमोर घेऊन येतो.' श्रीहरी म्हणाले, 'अरे तो किती बलशाली आणि मायावी आहे याची तुम्हाला कल्पना तरी आहे काय? तो तुमच्याने पकडला जाण्यासारखा नाही. तुम्ही त्याच्या फंदात पडू नका.' दत्त दमन म्हणाले, 'हे ईश्वरा, तू आम्हास तसा आशिर्वाद देऊन आमच्याकडून हे कार्य करवून घे. आपले बळ आमच्या पाठीशी असल्यावर हा शंखासुर सप्त पाताळात काय अथवा धरणीवरच काय पण चौदा भुवनात जरी गेला तरी आम्ही त्यास आपल्यासमोर ओढून आणू.'

दोघांचे ते भाषण ऐकून श्रीहरी संतुष्ट होऊन त्यास म्हणाले, 'हे दत्त दमन हो, तुमचे विचार जाणून मी तुम्हास आशिर्वाद देत आहे कीं मृत्युलोकात तुम्ही अवतार धारण कराल. दत्त प्रधान सार्वभौम असा अति पुण्यशाली प्रतापी राजा होऊन धर्मनितीनियमाप्रमाणे आपल्या प्रजेचे पुत्रवत पालन करून ईश्वरभक्तिचा महिमा वाढवशील व दमन राजा भक्त प्रल्हाद होऊन या दैत्याच्याच घरात जन्म पावेल, पण आपल्या पुण्यप्रतापाने वभक्ति सामर्थ्याने पाच कोटी सद्भक्तांना आपल्याबरोबर अमरापुरीला घेऊन जाईल.

भगवंताचा आशिर्वाद जाणून दोघांनी निरहंकारी पूज्य बुध्दिने व विनीतभावाने परमेश्वराची आराधना केली की हे ईश्वराआपण आमच्यावर हे महद् उपकार केलेले आहेत पण आमच्याने हा भार सांभाळता येण्यासारखा नाही. म्हणून आपली प्रेरक शक्ति आमच्या पाठीशी ठेऊन सतत कसणीच्या योगाने तुझे स्मरण आम्हास घडत राहील अशी कृपा करावी. श्रीहरीने तथास्तु म्हणून त्यांना संतोषित केले.

शंखासुर त्यांच्या जवळच उभा होता. त्याने ते वचन ऐकून मनात अत्यंत कोप धरून मायावी विद्येच्या सामर्थ्याने त्यांचाघात करण्याचा विचार करीत आहे असे जाणून श्रीहरीने त्यास पकडण्याकरिता त्याच्याकडे झेप घेतली तोच तो चतुर दैत्य तेथूनही निसटून गेला व अनेकानेक मायावी चरित्र करीत करीत व श्रीहरीस झुलवीत झुलवीत तेथून पुढे निघून गेला. श्रीहरीही त्याचा पाठलाग करीत तेथून निघाले. (श्लोक ३९८-४२७)

तेथून दैत्य शंखासुर रसातळ पाताळाच्या तळाशीअसलेल्या एका नगरातगेला. तेथील राजाच्या प्रतिहारी सेनापतीकडे जाऊन शंखासुराने आपली सर्व हकिकत सांगून आपल्या संरक्षणाकरितां त्याची विनंती करू लागला. प्रतिहारी म्हणाला, 'तू जर सर्व समर्थ आहेस व मोठ्या पराक्रमाने ब्रह्मदेवाचे वेद घेऊन आलेला आहेस तर दुसऱ्या कोणाच्या सहाय्याची का म्हणून अपेक्षा करतोस? येथे तुला कोणीही संरक्षण देणार नाही. तू मुकाट्याने वेद परत करून मोकळा हो नाहीतर श्रीहरी तुला मारून तुजकडून वेद घेऊन गेल्याशिवाय राहाणार नाही.'

प्रतिहारी शंखासुराची कान उघाडणी करीत आहे तोच श्रीहरी सुध्दां तेथे येऊन उभे राहिले व प्रतिहारीचे ते विशुध्द अंत:करण व भक्तिभाव जाणून ईश्वराने त्यास वरदान दिले कीं, 'हे प्रतिहारी तू मृत्यूलोकात भक्त ध्रुव म्हणून अवतार धारण करशील.ज्यावेळेस मी वराह रूप धारण करून अवतार लीला करीन त्यावेळेस तुला मी अमरापुरीचा अधिकारी करीन.' अशा प्रकारचे वरदान देऊन भगवान तेथून शंखासुराच्या पाठोपाठ धावू लागले. (श्लोक ४२८-४३८)

तेथून शंखासुर तलातल पाताळाच्या मार्गाने धावू लागला. तलातल पाताळातील तपनगराचा राजा गंधर्वसेन हा अतिशय सत्यवादी व ईश्वरभक्ति परायण असून सुजनांचे चांगल्याप्रकारे पालन करणारा व दुष्ट जनांना योग्य असे शासन करणारा होता.

आपल्या सर्व सरदार लोकांची मंत्री, प्रधान व मांडलिक राजांची सभा भरवून गंधर्वसेन सभेत बसलेला होता. अशारीतीने सभेचे कामकाज चालू असतांना शंखासुर तेथे गुप्तवेष धारण करून राजाजवळ जाऊन बसला व आपल्या अंगच्या अनेकानेक मायावी कळा तेथील सभाजनांना दाखवू लागला.

अगांतुक उपस्थित झालेल्या अपरंपार चरित्र करून अनेकानेक चमत्कार दाखवून लोकांचे मनोरंजन करणाऱ्या त्या दानवास तर कित्त्येक लोक ईश्वरस्वरूपच कल्पून त्रिभुवनपतीच समजून त्याच्या अंकीत झाले व त्याच्या प्रत्येक कृतीची स्तुती करून त्याचा जयजयकार करूं लागले. परंतु सुसंस्कारी व ईश्वरभक्ती परायण अशा गंधर्वसेन राजास शंखासुराचे ते मायावी कृत्य पाहून फार राग आला. त्याने विचार केला कीं आपले प्रजाजन सर्व भोळे आहेत. त्याचा फायदा घेऊन हा शंखासूरत्यांना अंकित करीत आहे, हे जाणून सर्व सभासद, दरबारी व मांडलिक राजे वगैरेंना उद्देशून म्हणाला. (श्लोक ४३९-४५३)

गंधर्वसेन राजा आपल्या प्रजाजनाला उद्देशून म्हणाला की, मी गुरु मुखातून असे ऐकले आहे कीं शंखासुर हा दानवी अवतार घेऊन ब्रह्मदेवाचे चार वेद चोरून येथे येईल. तो दानव असल्यामुळे आपल्या तपोबलाच्या योगाने अनेकानेक मायावी चमत्कार करून दाखवील व सर्व लोकांची ईश्वराकडील श्रध्दा डोलायमान करून स्वत:कडे आकर्षून घेईल. तोच हा दानव असावा असे मला वाटते. म्हणून तुम्ही सर्व याच्या चमत्कारावर भुलू नका. हा दानव त्याच्यासकट आपल्या सर्वांच्या नाशास कारणीभूत होईल. याला मारण्याकरिता श्रीहरी येतील. आपण त्यांची आराधना करून आपली उध्दरागती करून घेऊ. अशाप्रकारचे राजाच्या मुखातून निवेदन ऐकून सर्व प्रजाजनाला आश्चर्य वाटले.

गंधर्वसेन सुसंस्कारी व सत्यमार्गाप्रमाणे वागणारा सत्पंथी राजा होता. अमर होण्याकरिता त्याचा सतत ध्यास लागला होता. त्याकरिता त्याने त्या काळात प्रगट असलेल्या युगगुरुंच्या नामाचा (प्रेमऋर्षींचा) सतत जाप सुरु केला होता. त्यांचेच चरणामृत व ज्ञानामृत सततप्राशन करीत असल्यामुळे तो सच्चरित्रवान व सुविचारी झालेला होता. अशा परम उज्वल संस्कारी जीवाच्या मनात दुष्ट भाव कोठून उद्भवणार, व दुष्ट प्रवृत्तीच्या लोकांचे मुख तरी तो कशाला अवलोकन करणार?

राजाचा प्रधान पुष्पसेनयाने राजाचे भाषण ऐकून विचार केला की, खरोखरच ही दानवी माया असून त्या बळावर हा दैत्य सर्वांना भुलवीत आहे. आपणयाला येथून जाऊ न देता येथेच पकडून ठेऊ व श्रीहरी आल्यानंतर त्यांच्या स्वाधीन यास करू. असा विचार करीत आहे तोच द्वाररक्षक एका वेदविद्यासंपन्न अशा ब्राह्मणास सभेत घेऊन आला.

त्या ब्राह्मणास पाहताच राजा, प्रधान, राजपुत्र व राजकुमारी या चौघांनी त्याचे पाय धरले. राजपुत्रतर म्हणाला, 'आपण विप्रवेषधारी त्रिभुवनपति आहात.मला आपल्या वैकुंठधामी येण्याची फार इच्छा आहे. मला तुमच्या सोबत घेऊन जावे. (आपल्या सोबत येण्यास मी फार उत्सुक आहे.) राजकुमारी तर आपल्या पित्यास व प्रधानास म्हणाली, 'पिताजी आम्ही या शंखासुरास येथे डांबून ठेवतो. आपण श्रीहरीच्या स्वागताची व आदरातिथ्याची तयारी करावी. आपल्या अनंत जन्मांचे सुकृत आज फळास आले आहे. परमेश्वर अवतार धारण करून आज आपल्या द्वारी आलेले आहेत. आज आपले अहोभाग्य उजळले आहे.' आपल्या सत्यवादी, सुशिल व तप:सामर्थ्यवान अशा कन्येच्या मनाची गती जाणून राजा व प्रधान दोघे धावत जाऊन वेदविप्र वेषधारी परमेश्वराच्या चरणावर जाऊन दंडवत पडले व अनन्यरीतीने करूणा भाकू लागले. (श्लोक ४५४-४७७)

राजा गंधर्वसेन आणि प्रधान पुष्पसेन म्हणाले, 'हे भगवंता आमचे जन्मोजन्मीचे सुकृत आज उजळले. धन्य आजची घडी आपण साक्षात परब्रह्म नारायण आमचे अभ्यागत म्हणून आलेला आहात, आमची किंचीत सेवा गोड करून घ्यावी.'भगवंत त्यांची आंतरिक तळमळ व भावना जाणून परम संतुष्ट झाले पण वरवरून उपरोधाने त्यांच्यावर प्रेमकोप करून म्हणाले, 'तुम्ही स्वत:ला भाग्यवान समजत आहातपण माझा चोर तर घरात दडवून ठेवलेला आहे. ज्याने स्वर्ग, मृत्यु पाताळ त्रैलोक्यात एवढा डामडौल करून ठेवलेला आहे कीं सर्व सृष्टी त्याच्यामुळे कंपायमान झाली आहे अशा कपटी मायावी दुष्ट शंखासुराला तुम्ही आश्रय देऊन घरात दडवून ठेवलेला आहे, तो ताबडतोब माझे स्वाधीन करा नाहीतर विनाकारण माझ्या क्रोधास बळी पडाल.'

भगवंताचे ते उपरोधाचे भाषण ऐकून स्वत:स धन्य मानून राजा म्हणाला, 'हे भगवंता, आपली आज्ञा आम्हांस शिरसावंद्य आहे. आपण सर्व समर्थ आहात, पण

आमच्या सारख्या पामर जीवावर कृपा करण्याकरिताचसगुणरूपाने साकारलेला आहांत. आपण आगम निगम एक अनाद्यनंत चिन्मयस्वरूप असून आपल्या योगमायेच्या साहाय्याने हे जगच्चक्र चालविण्याकरिता वेगवेगळ्या रूपाने विनटून हे जगन्नाटक करीत आहांत. आपली कळा आमच्या सारखे पतितजीव जाणण्यास असमर्थ आहेत.'

राजा सद्‌गदीत होऊन विनंती करीत आहे तोच राजपुत्र गंध शंखासुरास पकडून आणण्याकरीता धावला पण शंखासुराने सर्व चलिंत्र पाहून अगोदरच तेथून पोबारा केलेला होता. सर्वांच्या नजरा चुकवून शंखासुर जसा अदृश्य रूपाने आला होता तसाच निघून गेला. शेवटी निराश होऊन गंध व राजकुमारी दमनी दोघेही श्रीहरी जवळ जाऊन खिन्नमुखाने श्रीहरीची करूणा भाकू लागले. श्रीहरीने सर्वावर प्रसन्न होऊन प्रथम गंधर्वसेन राजास वरदान दिले की, ज्यावेळेस मी वामनरूप धारण करेन तेव्हा तू मृत्युलोकांत अत्यंत पराक्रमी सद्‌भक्त कमळाधेन नावाचा राजा होशील व हा पुष्प त्यावेळेस सुध्दां तुझा प्रधान होऊन दोघेही सद्‌भक्तीच्या योगाने ब्रह्मानंदात विलीन होऊन शेवटी मला येऊन मिळाल.'

नंतर राजकुमार गंधास भगवंताने वरदान दिले, की, 'जेव्हां मी परशुराम अवतार धारण करून पृथ्वीवरील पापाचा भार उतरवून पृथ्वी पवित्र व शुध्द करेन. त्यावेळेस तू भक्त कमळापति म्हणून अवतार धारण करून या दमनीच्याच उदरी तू जन्माला येशील व आपल्या तपसामर्थ्याने त्रैलोक्य उजळून टाकशील व शेवटी तुम्ही सर्व मलाच येऊन मिळाल.' अशाप्रकारचे दिव्य वरप्रदान करून श्रीहरी पुढील कार्याकरीता तेथून अंतर्धान पावले. (श्लोक ४७८-५००)

पुढे शंखासुराने पुन्हा मायावी बलाने श्रीहरीस चुकविण्याकरिता निरनिराळ्या युक्त्या प्रयुक्त्या योजून अडथळा करू लागला. परंतु त्याचे सारे डाव उधळून लावून श्रीहरी त्याचा पाठलाग करू लागले. शेवटी शंखासुर तलातल तळाशी येऊन ठेपला. तेथील धवल नगरात धवलिंग राजाच्या घरी जाऊन शंखासुराने आपला मायावी पाश तेथे टाकला.

राजा धवल आपल्या सुखासनावर स्वस्थ बसलेला असून राणी त्याची सेवाचाकरी करीत आहे. अशावेळेस शंखासुर तेथे जाऊन पोहोचला व उभयतास नमन करून अत्यंत दीन बनून आपली हकिकत सांगून शेवटी संरक्षणाची विनंती करू लागला.

पण राणीने त्याचे कपट जाणून क्रोधयुक्त होऊन त्याची निर्भत्सना केली व सांगितले, 'येथे तुला मुळीच आश्रय मिळणार नाही. प्रत्यक्ष आपल्या पित्याजवळून वेद चोरून आणून पित्यास कळाहीन करणाऱ्या कुपुत्राचे रक्षण आम्ही करू इच्छित नाही. तुला हवे तेथे तू जा पण या असत् कृत्याचे प्रायश्चित तुला भोगावे लागेल तू निमूटपणे त्या श्रीहरीसच शरण जा व आपणावरील अनर्थ (संकट) निवारण करून घे.'

राणीचे वचन ऐकून क्रोधाविष्ट झालेला तो दैत्य तेथे पळभरही थांबला नाही. तो तसाच तेथून पुढे निघून गेला. तेवढ्यात श्रीहरी तेथे उपस्थित झाले व त्यांनी अंतर्ज्ञानाने राणीची मनस्थिती व तिने दैत्याची केलेली निर्भत्सना जाणून वरदान दिले कीं हे राणी मी ज्यावेळेस आठवा श्रीकृष्णाचा अवतार धारण करेन तेव्हा तू द्रौपदी रूपाने प्रगट होशील. तुझ्या अनन्यनिष्ठ भक्तीने मी तुझे सद्वचन पूर्ण करीन व तुझे ब्रीद पाळून संरक्षण करील. (श्लोक ५०१-५११)

दैत्य शंखासुराचा पाठलाग करीत करीत व मार्गात मिळालेल्या सद्भक्तांना वर देत देत व दुष्ट जनांचा संहार करीत करीत श्रीहरी पुढे पुढे जाऊ लागले. पुढे शंखासुर तल पाताळाच्या मार्गास लागून श्रीहरीच्या येण्याची वाट पाहू लागला. लांबून श्रीहरी दिसताच त्याने परत मायावी युध्दाचे जाळे पसरविले व मोठ्या आढ्यतेने श्रीहरीस म्हणाला, 'हे भगवंता, नारायणाच्या प्रेरणेने व ब्रह्मदेवाचा वैदिक ज्ञानाविषयीचा अहंकार घालविण्याकरीता मी हे कार्य अंगिकारले असतांना आपण विनाकारण त्रास घेऊन माझ्या कार्यात अडथळा करीत आहात. तेव्हा आपण मुकाट्याने परत जावे. हे वेदआता परत तुमच्या हाती लागणार नाहीत.'

श्रीहरी म्हणाले, 'दुष्टा, हे लाघव तू कोणाला सांगतोस? तुला मारण्याकरिता आणि वेद परत नेण्याकरिता तर मी आलेलो आहे. माझे कार्य सिध्दिस नेल्याशिवाय मी जाणार नाही. तू निमुटपणे वेद परत कर नाहीतर युध्दास तयार हो, असे म्हणून भगवंताने त्याच्यावर पाश टाकला, पण तो चतुर दानव अलगद त्यातून निसटून पळत जाऊन कनकनगरातील कनकासुर राजाच्या आश्रयार्थ त्याच्याकडे धावला.

सद्गुरु महाराज सांगतात हे विद्वतजनहो त्या अपार गुणवान अशा दैत्याच्या गुणांची स्तुती करावीशी वाटते, कारण तो ज्या ज्या सद्भक्ताकडे गेला त्याच्या भक्तीची परिपूर्णता झाल्यामुळे त्यांना श्रीहरीकडून इष्ट फलप्राप्ति व्हावी या उद्देशाने शंखासुराने तशाच स्थानांचा आश्रय घेतला. अनायासे त्याला मारण्याच्या उद्देशाने श्रीहरी त्या भक्ताकडे गेल्यानंतर त्यांचे इच्छित मनोरथ पूर्ण होत गेले.

सद्गुरु महाराज सांगतात खरोखर धन्य होय त्या सद्भक्तांची, की ज्याच्या प्रेम भक्तीच्या आकर्षणाने श्रीहरी त्याच्याकडे ओढले गेले. चौदा भुवनातील देवगतीस पावलेले जीवात्मे सुध्दां आपल्या उध्दरागतीकरीता या मृत्युभूमीस जन्मास येत असतात. कारण ही मृत्यूभूमी कर्मभूमी आहे. इतर भुवन हे केवळ भोगभूमी आहे. कृतकर्माचा उपभोग फक्त त्या स्वर्गादिलोकात घेता येतो पण मुक्त होण्याकरिता त्यांना मृत्युलोकातच अवतार घ्यावा लागतो. अशा संस्कारी जीवांच्या उध्दारासाठी ईश्वर निरनिराळे अवतार धारण करून प्रगट होत असतात. सुष्टांचेपालन, दुष्टांचे निर्दालन व मानवसमाज सुरळीत सुस्थितीप्रद व्हावा यासाठी धर्माची स्थापना करण्याकरितां ईश्वर अंश रूपाने अवतार धारण करतात व त्या अवतार पात्रांची ओळख करून देण्याकरितां ब्रह्मदेव ब्रह्मस्वरूप अशा सद्गुरुंची योजना करून, त्यांच्यातर्फे सद्भक्तांना सन्मार्गाचे नीतिनियम व ईश्वरभक्ति जप, पूजा, ध्यान, सेवा इ. चे मार्गदर्शन करून त्यांच्याकडून त्या मार्गाचे आचरण करावयास लावून मुक्तीपदाचे अधिकारी करतात.

अशारीतीने आदिनारायणापासून मिळालेल्या वरदानाप्रमाणे व वचनपूर्तिकरिता विष्णुस व ब्रह्मास निरनिराळे अवतार धारण करावे लागतात. याकरिता सद्गुरु सांगतात ईश्वरासमुध्दां दिलेले वचन पालन करावे लागते तर आपणही दिलेले वचन कां पाळू नये? जर दिलेले वचन तुम्ही पाळू शकणार नसाल तर तुम्ही दु:खी कष्टी व्हाल. याकरितां जागृत व्हा व आपल्या जीवितांचे सार्थक करून घ्या. (श्लोक ५१२-५३१)

सद्गुरु महाराज सांगतात कीं, 'जे सुसंस्कारी जीव ज्ञान व ध्यानाने युक्त होऊन ब्रह्मस्थितीची म्हणजे आत्मजागृतीची प्राप्ति करवून घेतात अशा सद्भक्तगणांच्या उध्दाराकरिता आणि तत्प्रित्यर्थ त्यांना दिलेल्या वचनपूर्तीकरितां ईश्वराकडून प्रेरणा मिळालेले आधिकारिक जीवन्मुक्त महात्मे मानव जन्म धारण करून अव्दैत तत्त्वाचा ब्रह्मोपदेश करतात. वंशभेद, जातीभेद अथवा कुळभेद वगैरे न ठेवता ते महात्मे मानवमात्रास दिव्य ज्ञानोपदेश करतात. जे सद्भक्त ते अद्वैतज्ञान ग्रहण करून त्याप्रमाणे वागतात ते वंश-जाती भेद रहित होऊन आमच्यात म्हणजे ब्रह्मपदास येऊन मिळतात. याविषयी कथन केले तेवढे थोडेच आहे.'

शंखासुर कनक नगरातील कनकासुर राजाच्या दरबारात जाऊन गुप्तवेश धारण करून बसला. श्रीहरीने अंतर्मनाने जाणून आपल्या अंगच्या अनंत कलांची योजना

करून दैत्याला जेरीस आणण्याचा विचार केला. कनकनगरात प्रवेश करण्याच्या आधीच गावसीमे जवळ श्रीहरी विचार करीत उभे असताच त्यांना एक गंधर्व दिसला तोआपल्या मृदंग्याबरोबर नगरात जाण्याच्या विचारात असल्याने श्रीहरीने त्याची विचारपूस केली. गंधर्वाने सांगितले, 'आमच्या इंद्र राजाच्या आज्ञेवरून मी व माझा मृदंग्या आम्ही दररोज कनकानुराच्या दरबारात जाऊन राजास व त्याच्या सर्व सुसंस्कारी दरबारी अधिकारी मंडळीस गायन वादन कीर्तन करून श्रीहरीचे गुणानुवाद ऐकवीत असतो.'

गंधर्व एवढे सांगत आहे तोच जवळच्या झुडुपातून एक सर्प अचानक येऊन एका क्षणात मृदंग्यास डसला व क्षणातच तो मृदंग्या मरण पावला. गंधर्व अपार शोक करू लागला व म्हणाला या मृदंग्यासारखा गायनवादन कलेत निपूण कोणीही नव्हता. आता मी काय करू? कनकासुराला दिलेले वचन मजकडून पालन होणे शक्य नाही, कारण मृदंग्याशिवाय मला गायन किर्तन करता येणार नाहीव याच्यासारखा दुसरा मृदंग्या मिळणे शक्य नाही. असा मोठमोठ्याने विलाप करीत तो रडू लागला.

श्रीहरीने त्याची समजूत घालून सांगितलें की तुझी हरकत नसेल तर मी ती उणीव पूर्ण करून तुझी साथ करेन. गंधर्वाला हायसे वाटले व त्याने त्यास एक लकेर वाजविण्यास सांगितले. श्रीहरीने एक ताल वाजवून गंधर्वास खूष केले, गंधर्वाने विचारले तू मृदंग वाजविण्याचा भेद कोठून शिकलास? तेव्हा श्रीहरीने सांगितले, सतराय नावाचा एक गंधर्व आहे. त्याजकडून मी ही कला शिकलो आहे. गंधर्वास अपार आनंद झाला व श्रीहरीस बरोबर घेऊन तो कनकासुराच्या दरबारात गेला व त्याने किर्तनाची आरास सुरु केली. ते ऐकून गुप्तवेषधारी शंखासुर चुळबुळ करू लागला. गंधर्व राग, तान, आलाप घेऊन किर्तनास रंग भरू लागला. मृदंग्या प्रत्यक्ष श्रीहरीच असल्याने रंग भरण्यास कोणतीही उणीव भासली नाही. राजा, सर्व दरबारी, प्रजाजन किर्तन ऐकण्यात अगदी तल्लीन होऊन गेले. शंखासुर सुध्दां तल्लीन होऊन डोलू लागला व मृदंग्याची प्रशंसा करू लागला.

श्रीहरीने मधेच एक लकेर अशी अद्‌भुत रीतीने वाजविली की त्या नादाने त्रिभुवन भरून गेले व सप्तपाताळ जणू डोलायमान झाले. अशी ती लकेर ऐकताच शंखासुर एकदम खडबडून जागा झाला व विचार करू लागला, की सामान्य मृदंग्या असता तर त्याच्याने असा कलाविष्कार झाला नसता हा साक्षात् श्रीहरीच असावा असे विचार मनात येताच तो कंपायमान झाला व भयग्रस्त होऊन तेथून पळू लागला. (श्लोक ५३२-५६०)

कनकासुर, करूणासुर, विद्यासुर आणि वहेसुर या चारही सुसंस्कारी आणि तपोबल तेजधारी जीवांनी मृदंग वाजविणाऱ्या श्रीहरीस अंतर्मनाने ओळखले व ते सर्व त्याच्याजवळ येऊन हात जोडून उभे राहिले. सर्व दरबारी अधिकारी लोक व खुद्द गंधर्वसुध्दां आश्चर्यचकित होऊन दिङ्मूढ झाला. चारही बांधव हात जोडून श्रीहरीस म्हणाले, 'हे भगवंता, अहोभाग्य आज आमचे उदयास आले. आमच्या पातालाधिष्ठित लोकांचे अनेक जन्मजन्मांतरीचे पुण्यकर्म आज फळीभूत झाले. आम्ही जी मनिच्छा उराशी बाळगून आजपर्यंत कालक्रमणा केली ती आपल्या कृपामय अमृतसम दृष्टीने पूर्णत्वास आली. खरोखर शंखासुराचे आम्ही पूर्णपणे आभारी आहोत की ज्याने आमच्यावर दया करून आपल्या कर्तृत्वाने आपणास साक्षात स्वरूपाने आमच्या येथे आणून आम्हा अल्पमति जीवात्म्यांना दर्शन करविले, आपले दर्शन घडले, बस! यापेक्षा आम्हाला दुसऱ्या कशाचीही आकांक्षा नाही. हे जगदीश्वरा तुझ्या अनंत लीलामय श्रीविग्रहाच्या एका दृष्टिपाताशिवाय मुक्तिपदाचे सुख आणखी कोणते बरे असणार? आपण आमच्यावर दया करून याठिकाणी आपल्या सध्दर्माची स्थापना करा, सतत दर्शनरूपाने आमच्यावर कृपादृष्टी करून या कर्मरूपी समुद्रातून पार उतरून घेऊन जा.'

चारही भावांची व त्यातल्यात्यात कनकासुराची विनंती-स्तुति-प्रार्थना ऐकून श्रीहरी संतुष्ट झाले व त्यांनी कनकासुरास वरदान दिलेकीं, 'तू मृत्युलोकात त्रेतायुगामध्ये राजा हरिश्चन्द्र नावाने प्रसिध्द होशील व आपल्या सत्त्वाच्या रक्षणाकरिता अपार त्याग करून अनंत कसोटी सहन करून शेवटी मला येऊन मिळशील. एवढेच नव्हे तर तुझ्या अपार सत्कृत्यांच्या - पुण्याईच्या बळाने मी तुझ्याच वंशात माझा सातवा श्रीराम अवतार धारण करेन. हे तुझे तिघ बांधव आणि तूं सर्व एकाच वंशात अवतार धारण करून अगणित पुण्यबळाच्या योगाने अमरापुरीचे अधिकारी व्हाल. (श्लोक ५६१-५७३)

कनकासुर व इतर सद्भक्त गणांना वरदान देऊन श्रीहरी शंखासुरास पकडण्याकरिता धावले व पाहता पाहता तेथून अंतर्धान पावले. शंखासुर अगोदरच तेथून निघून पुढच्या मार्गास लागलेला होता. पण आता त्याच्याने जोमाने पळता येत नव्हते. तो गलितगात्र हतबल झालेला होता. शंखासुर चिंतातुर होऊन मनात विचार करू लागला की आता आपली कांही धडगत नाही. श्रीहरी आपल्यावर पाश टाकून

आपला नाश केल्याशिवाय राहाणार नाही. असे विचार मनात येताच त्याचे सर्वांग थरथर कापू लागले. पण मनाशी कांही गोष्टीचा साधक बाधक संकेत करून तल पाताळातील भूतल देशातील भेदनगर येथे येऊन ठेपला. भेदनगरमध्ये मच्छराज नावाचा महान पवित्र हृदयाचा व सत्यवान राजा राज्य करीत होता. त्याने अतिशय कठोर नितीनियमाने वागून प्रजेचे पुत्रवत् पालन केले. प्रजाहितदक्ष असा तो मच्छराजा स्वत: महान तपश्चर्यावान होता. अति दुस्तर अशी पंचाग्नि साधना करून यम नियमादिके करून प्राण संयमन व त्यायोगे इंद्रियदमन व आत्मनिग्रह करून आत्मस्थितीत मग्न असा तो राजा होता. त्या तपोबलाने त्यास आपापसात परमप्रीती असलेले व मातापितरांची आज्ञा शिरोधार्य मानणारे पाचपुत्र प्राप्त झाले. पाचही पुत्र एक विचाराचे व आईवडिलांच्या सेवेत मग्न असत. सर्व आत्मज्ञानाने परिपूर्ण असूनही सेवाव्रत त्यांनी अंगिकारलेले होते.

हे पाचही बंधू एकमेकाशी परम प्रीतीने बध्द तर होतेच शिवाय त्यांची वागणूक परमसंतोषी, आत्मस्तुति वा आत्मप्रौढीचा त्याग केलेले, आपल्या ठिकाणी कोणते गुण आहेत याची श्लाघा न करणारे व परम धार्मिक होते. सर्वजण एकविचाराने वागून अतिशय तत्परतेने व कठोरतेने धर्मनितीनियमांचे पालन करीत असत. एकाने आपल्या मुखातून काही वाणी उच्चारली की इतर चौघांनी ती शिरसावंद्य मानून आज्ञापालन करावी अशी त्यांची भूमिका होती. अशारीतीने एकमेव हृदयाचे पाच ठिकाणी विभाजन झालेले ते अलौकिक प्रेमळ बंधु व त्यांचा पिता आणि सर्व प्रजाजन राजसभेत बसलेले असतांना शंखासुर तेथे गेला व त्याने आपले पुराण सुरु केले. तो राजाला उद्देशून म्हणाला, 'मी सद्गुरु ब्रह्मदेवाजवळून चारही वेद आणलेले आहेत. ते तुमच्याजवळ ठेऊन तुम्ही माझे संरक्षण करा. हे वेद पळवून नेण्याकरिता व मला मारण्याकरिता श्रीहरी माझ्या पाठीशी लागला आहे. मी तुम्हाला शरण आलेलो आहे. शरण आलेल्यास मरण देऊ नये असा क्षत्रीय धर्म आहे.'

शंखासुराची ती कथा ऐकून पाचही भावांना त्याच्याविषयी संताप आला. त्यांनी सांगितले कीं, 'तू कोणत्याही प्रकारचे अनमानन करता ते वेद ब्रह्मदेवास परत करून दे नाहीतर तो श्रीहरी तुला मारल्याशिवाय राहणार नाही. श्रीहरीशिवाय तुझे रक्षण करण्यास कोणीही समर्थ नाही.' दैत्य मनात समजून गेला, येथेही आपली धडगत नाही. आता कोणता निर्णय घ्यावा याच्याविषयी संकल्पविकल्प तो करू लागला. तेवढ्या वेळात श्रीहरी तेथे येऊन ठेपले. (श्लोक ५७४-५९६)

श्रीहरी मच्छराजाच्या सभेत जाऊन उभा राहिला. मच्छराजा लगबगीने उठून धावत जाऊन त्याने श्रीहरीचे पाय धरले. मच्छराजाचे पाचही मुले त्याठिकाणी धावत येऊन त्यांनी सुध्दां श्रीहरीस साष्टांग प्रणाम केला. अनन्यभावाने परमेश्वराची स्तुति करून त्यांच्या आगमना विषयीचे प्रयोजन विचारले तेव्हा श्रीहरीने सर्वांना प्रेमार्द्र दृष्टीने निरूखून आपले शंखासुराविषयीचे कथानक निवेदन केले ते ऐकून त्या पाचही भावातील वडिल जो मगनीदेव त्याने श्रीहरीस आश्वासन दिले की हे ईश्वरा आपण येथेच थांबा, आम्ही पाचही जण अथवा मी एकटाच जाऊनत्या शंखासुराला पकडून येथे घेऊन येतो. असे म्हणून तो जाऊ लागला. तोच श्रीहरीने त्याची ती कर्तव्यनिष्ठा व प्रेम आपुलकी भाव जाणून त्यास शाबासकी देण्याकरितां पाठीवर प्रेमाने थाप मारून वरदान दिले की, 'बाळा तू जाऊ नकोस. तू द्वापार युगातील धर्मपुरुष आहेस. द्वापार युगामध्ये मी जेव्हा कृष्ण आणि बौध्द अवतार धारण करूनअनेकानेक अवतारलीला करेन, तेव्हा तू पंडुपुत्र युधिष्ठिर रूपाने व तुझे हे चारही भाऊ पांडवांच्या रूपाने अवतीर्ण व्हाल. पृथ्वीवर तुमच्यासारखे सत्यवचनी, एकदिल एकविचार व एकहृदयाचे प्रेमळ बंधु तुम्हीच व्हाल. तुम्हाला तुमच्या पूर्व सुकृतानुरुप सदैव धर्माचरण करण्याचीच बुध्दि होऊन त्यायोगे तुम्हाला अपार कष्ट होतील, अनंत परिश्रम भोगावे लागतील पण एकनिष्ठेने सर्व त्रास सहन करून तुम्ही अंतिम ध्येय अमरपदाची प्राप्ति करून घ्याल. तोपर्यंत तुम्ही येथे आनंदाने कालक्रमणा करा, नितीनियमाने वागून धर्मकृत्ये करा व सर्व प्रजाजनास आनंदी सुखी करा. आता मी माझ्या कामगिरीवर निघतो. तुम्ही परमसंतोषाने भगवंताचे गुणगान करा.' असे म्हणून श्रीहरी तेथून अंतर्धान पावले. (श्लोक ५९७-६१७)

शंखासुर मच्छराजाच्या दरबारातून पळून जाऊन चिंताग्रस्त अंत:करणाने पुढे पळू लागला. पळता पळता विचार करू लागला. आपण भगवान नारायणाच्या आज्ञेवरून हे कार्य अंगिकारले, पण शेवटी ते आपल्याच अंगलट आले. त्यापेक्षा या वेदांचा त्याग केल्यास आपण सुखी होऊ. असा विचार तो करीत आहे तोच दुसरे मन त्यास सांगू लागले, आपण अंगिकारलेल्या कार्याचा त्याग करूं नये. कारण प्रत्यक्ष नारायणाच्या आज्ञाभंगाचे पातक व त्याची शिक्षा आपणास भोगावी लागेल व जगात आपली प्राणभयाने कार्यत्याग केल्याबद्दल नामुष्की होईल. आपण यातुनही योग्य मार्ग काढून अंगिकारलेले कृत्य निर्भयतेने पार पाडू, परंतु आता जावे कुणीकडे?

असा विचार करीत असता त्यास महापाताळाचा मार्ग दिसला. त्यामार्गाने तोमहापाताळात येऊन ठेपला. त्या पाताळलोकाचा राजा सुरजमल शिवउपासक पण दैत्य कुलाविषयी आदर बाळगणारा तामसी होता. व्रत, तप, दान, सेवा वगैरे बाबतीत तो तामसी गुणांचा अवलंब करून उपासना करी त्याप्रमाणे तो तामसी ध्यान भूत, प्रेत, पिशाच्य साधना करी.

शंखासुराने राजाच्या गुणांची पारख करून याठिकाणी आपली दाद लागेलअसे मनात ठरवून मायावी लाघव करून तो राजाची स्तुती करू लागला व अल्पशब्दात आपला परिचय करून देऊन वेदाविषयीची निवेदन केले. सुरजमल राजाचा मुलगा चन्द्रसेन हा विवेकी सत्यशील व धर्मप्रिय असल्यामुळे त्याने शंखासुराचे वचन ऐकून सौम्य शब्दात त्याची निर्भत्सना केली व पित्यासही सांगितले,' पिताजी, या वेदचोरास तुम्ही आश्रय अथवा कोणत्याही प्रकारचे आश्वासन देऊ नका. याच्यावर कोणत्याही प्रकारचा विश्वास ठेवू नका. परंतु सुरजमल राजाने आपल्या मुलाच्या भावनेचा कांहीही विचार न करता तो शंखासुराला जाऊन मिळाला. सर्व प्रजाजन चंद्रसेनाची बाजू घेऊन राजाच्या विरूध्द बंड करू लागले. पण राजाने हुकूम सोडून सर्वांना गप्प बसविले. शेवटी निराश होऊन चन्द्रसेन विचार करू लागला. तेवढ्यात शंखासुराला पकडण्याकरिता श्रीहरी तेथे राजसभेत येऊन थडकले. (श्लोक ६१८-६२८)

लगबगीने धावत जाऊन राजाने शंखासुरास आश्रय देण्याकरिता आपल्या पाठीशी घातले. इकडे कुमार चन्द्रसेनाने धावपळ करीत श्रीहरीच्याचरणी लागून साष्टांग नमस्कार केला. सतगुरु महाराज स्मित करून सांगतात कीं, पहा,जगतामध्ये कसकशा प्रवृत्तिचे लोक भरलेले आहेत. पिता दैत्याला जाऊन मिळाला तर पुत्र श्रीहरीस जाऊन भेटला. जगामध्ये ह्या दोनही प्रवृत्त्या आदिकाळापासून चालत आलेल्या आहेत. दुष्टप्रवृत्ति व सत्प्रवृत्ति यांच्या झगड्यात सारी मानवजात झोके खात आहे. त्यातही दुष्प्रवृत्तीला मान तुकवून तिच्या नादी लागणारे अखेर नाश पावतात पण सत्प्रवृत्तीप्रमाणे क्रियाचरण करणारे मात्र अमौलिक असे आत्मज्ञान प्राप्त करवून घेऊन अंती ब्रह्मस्थितीस -मोक्षगतीस जाऊन पोहोचतात. दुष्प्रवृत्तीच्या लोकांचा संहार व सद्भक्तांना मुक्तीचा लाभ घडवून आणण्याकरिताच ईश्वराने संपूर्ण जगतात हा खेळ मांडलेला आहे. सद्गुरुमहाराज सांगतात की, ज्या लोकात केवळ भोगप्रवृत्ती आहे, भोग भोगण्यातच जे केवळ तत्पर आहेत ते शुन्यव्रत होत. पण आपल्या मानव जीवीताचे सार्थक करण्याकरितां मुक्तिलाभासाठी जे तळमळीने प्रयत्न करतात त्या लोकांची वाखाणणी करावीशी वाटते. तेच लोक स्तुतीस पात्र होत.

मुक्ति लाभासाठीच याठिकाणी दोघा पिता-पुत्र यांच्यात वाद निर्माण होऊन ज्याच्या त्याच्या प्रवृत्तींनी उचल खाऊन जो तो ज्या त्या शक्तींना जाऊन मिळाला. शंखासुर सुरजमल राजास म्हणाला कीं, 'हे राजा दैत्य कुळाची लाज रक्षण करणे सर्वस्व तुझ्या हातात आहे. अनेक देशामध्ये भटकून येऊन मी बराचसा प्रयत्न केला पण दैत्य कुळाचे रक्षण करणारा कोणीही मिळाला नाही.तुझा जन्म रूद्र कुळामध्ये झालेला आहे. मी श्रीनारायणाच्या आज्ञेवरून ब्रह्मदेवाचे वेद घेऊन आलो व विनाकारण या वादविवादास प्रवृत्त झालो आणि श्रीहरीशी वैर निर्माण करून घेतले. आता त्यातून पूर्णपणे निभावून जाण्याकरिता तू धैर्य धारण करून माझ्या पाठीशी राहा. हा तुझा पुत्र आपल्या कुलास कलंक लावणारा आहे. याच्यापासून तुला पुढे फार त्रास होईल व पश्चाताप करण्याची पाळी येईल.म्हणून तू आताच त्याचा त्याग कर. तो श्रीहरी एकटाच आहे आणि तुझा पुत्र त्याचा साहाय्यकर्ता आहे पण आपल्याजवळ सहासष्ट कोटी सैन्य आहे. अतिशय बलवान, महानपराक्रमी असे आपले योध्दे असून आपले बळ किती अपरिमित आहे! आपल्या बाहुबलापुढे त्या दोघांचा काय टिकाव लागणार! म्हणून तू मला सहाय्य कर. तू फक्त माझ्या पाठीशी राहा! अशा रीतीने अनेकानेक युक्त्याप्रयुक्त्यांनी सुरजमलास भारून त्या शंखासुराने आपल्या बाजूस वळविले व सुरजमलाने शंखासुरास आश्रय दिला.

राजकुमार चन्द्रसेन आपल्या पित्याला म्हणाला, 'पिताजी, या दुष्टास आश्रय देऊ नका. हा वेदचोर असून दुष्प्रवृत्तीचा आहे. तो आपला घात करण्याकरिताच याठिकाणी आलेला आहे. अशा या दैत्याला आपल्या राज्यात कोठेही आश्रय देऊ नये. आतापर्यंत याला कोणीही आश्रय दिलेला नाही. म्हणून तो येथपर्यंत येऊन भिडला आहे. पण आता पुढे हा कोठे पळून जाणार? त्यास पुढे मार्गच नाही आणि श्रीहरी त्याला मारून वेद परत काढून घेतल्याशिवाय सोडणार नाही. म्हणून त्याच्या नाशाबरोबर आपला सुध्दा नाश आपण करून घेऊ नका. आपण श्रीहरीचा आश्रय घेऊन आपला उध्दार करून घ्यावा यातच आपले सार्थक आहे.' (श्लोक ६२९-६४९)

चंद्रसेन बाळाचे वचन ऐकून दैत्य शंखासुरास फार राग आला. तो अतिशय मदोन्मत्त दैत्य चन्द्रसेनास म्हणाला,- 'तू माझे बळ किती आहे हे न जाणता अवहेलना करीत आहेस, पण लक्षात ठेव माझा पराक्रम किती अतुलनीय आहे याचा तू विचार कर. मी ब्रह्मदेवाला जिंकून त्याचे वेदच हरण केलेले आहे.

सर्व जगताची प्रेरक जी शक्ति तिला सुध्दा माझ्या पराक्रमाने थक्क केले आहे. विष्णुला तर ओढून काढून येथवर आणलेले आहे. आता शिवशंकरास सुध्दा माझ्या पराक्रमाने थक्क करून सोडले आहे, तर इतर देवदेवतांचे माझ्यापुढे काय बळ चालणार आहे? असा माझा अतुलनीय पराक्रम पाहूनच ब्रह्मदेव चिंतातुर होऊन त्या श्रीहरीस शरण गेला व तो श्रीहरीही त्याच्यासाठी माझ्याशी विनाकारण वैर भावाने वागून स्वत:चा नाश करून घेत आहे. तू त्या श्रीहरीकडे जाऊन सांग की तुला जर युध्द करायचा जोर असेल तर युध्दास मी व माझे सहासष्ट कोटी योध्दे तयार आहेत. आमच्यापुढे त्याचा निभाव लागणार नाही. विनाकारण आत्मनाशास कारणीभूत होऊ नकोस. श्रीनारायणाच्या आज्ञेवरूनच मी या कार्यास उद्युक्त झालो आहे. ज्याने मला निर्माण केले व ज्याने अपार असे बल दिले त्याचीच आज्ञा मला शिरोधार्थ आहे. जोपर्यंत त्याची आज्ञा होत नाही तोपर्यंत मी तुम्हाला येऊन मिळणार नाही. म्हणून मुकाट्याने युध्दाकरिता तयार व्हा.

नाइलाज होऊन चन्द्रसेन श्रीहरीकडे परत आला व भयभीत होऊन श्रीहरीस त्याने सर्व हकीकत निवेदन केली. चन्द्रसेन म्हणाला, 'हे स्वामीन्, हा दैत्य तर क्रोधाविष्ट होऊन सर्वांची निर्भत्सना करीत आहे व म्हणत आहे की या सर्वांना मी माझ्या पराक्रमाने जिंकलेले आहे म्हणून हे श्रीहरी तुम्ही विनाकारण दु:खी होऊ नका. कारण तुम्ही एकटेच असून त्याच्याजवळ सहासष्ट कोटी सैन्य गण आहे. मी बालक आपणाला विनंती करीत आहे की तुम्ही श्रीनारायणाकडे जाऊन ही कामगिरी त्यांच्याकडे सोपवून द्या व निर्धास्त व्हा.' चन्द्रसेनाचे ते बोलणे ऐकून श्रीहरीस हसू आले ते त्यास म्हणाले,- (श्लोक६५०-६६७)

श्रीहरी म्हणाले, 'बाळ चन्द्रसेन ऐक, मी तुला सत्यघटना निवेदन करतो, तू निर्धास्त हो. श्रीआद्यनारायणाने सृष्टयुत्पत्तिचा व विस्ताराचा संकल्प मनात धरून आपल्याच तेजोबिंदूपासून मला निर्माण केलेले आहे व वरदान दिले आहे की, तू जगतामध्ये जाऊन सृष्टितील जीवात्म्यांचे पालनपोषण कर आणि दुष्प्रवृतींनी युक्त अशा दैत्यापासून सद्भक्तांचे व धर्माचे रक्षण कर. अवतार रूपाने प्रगट होऊन ब्रह्माने प्रकाशित केलेल्या वेदोक्त धर्माचे रक्षण करून प्रसार कर. मृत्युलोकात जे तुझी भक्ति करतील ते मलाच येऊन मिळतील. अशा रितीने वचन देऊन नारायणाने एका चौकडीत सत्य, त्रेता, द्वापार व कली असे चार युग निर्माण केले व त्यात

अवतार लीला कार्य करण्याचे वरदान आम्हाला दिलेले आहे. चन्द्रसेना, हा दुष्ट शंखासुर माझ्या समोरून पुढे कोठे पळून जाणार नाही. किंवा त्याचा माझ्यासमोर टिकाव लागणार नाही. आकाश पाताळ चौदा भुवन एक करून मी या दुष्टाचा आताच नाश करीन. त्या नारायणाच्या अंशात्मक तेजोबिंदूपासून मी तेज धारण केलेले आहे. या दुष्ट दैत्याने ब्रह्मदेवास ठकवून वेद चोरून आणले व पृथ्वीवर सर्वत्र हलकल्लोळ उठवून येथे चोरासारखा पळत आला त्याचा संहार करून वैदिक मार्गाचा सर्वत्र प्रसार करण्याकरिताच हा माझा अवतार प्रगट झालेला आहे. या वैदिक सनातन सन्मार्गानुसार सृष्टितील सर्व पापकर्म दग्ध करून त्या ज्ञानानुसार वागणाऱ्या सद्‌भक्तांना मुक्ति मिळवून देण्याकरितां हे वेद उपलब्ध करून देण्यासाठी नारायणाच्या आज्ञेवरूनच मी अवतार धारण केलेला आहे. बाळा चन्द्रसेना, चौदा भुवनातील सद्‌भक्तांना नीजस्वरूपाची (आत्मस्वरूपाची) जाणीव करून देण्याकरितां आणि त्यांचे पापपरिमल नाहिसे करण्याकरिता, दैत्यांचा संहार करण्याकरिता, मला असे दहा अवतार घ्यावयाचे आहेत. अमरीखाला वरदान देऊन त्याला अमर केले पण त्याच्याकरिता या दैत्याला आणि मला दहा दहा वेळेस अवतार धारण करावयाचे आहेत. अशा अवतार कार्याच्या वेळी तुम्ही सर्व सद्‌भक्तांचा उध्दार व्हावा म्हणून मी सर्व सद्‌भक्तांना मृत्युलोकांत अवतरण्यांचे वरदान दिलेले आहे. चन्द्रसेना तू हे माझे वचन नीट पूर्णपणे लक्षात घे. तुझा पिता या दैत्यास जाऊन मिळाला त्याचा त्याबरोबर संहार होईल. पण तुला तुझा उध्दार करून घ्यावयाचा असेल तर माझ्या आश्रयार्थ येऊन राहा, पित्याचा त्याग कर. श्रीहरीचे वचन ऐकून चंद्रसेन परम संतोषित झाला. त्याने अनन्यभावाने श्रीहरीचे पाय धरले. व अनेकानेक प्रकारे स्तुती करून श्रीहरीस आनंदीत केले. श्रीहरीने प्रसन्न होऊन त्यास वरदान दिले की, मी जेव्हा शेवटचा अवतार धारण करीन तेव्हा तू भक्त कमळाकुंवर होशील व तुझ्या पुण्यप्रतापाने या मृत्युलोकातील मानवांचा उध्दार घडवून सर्वांना मोक्षपदाला घेऊन जाशील. अशारितीने त्याचा असूमंत्र काढून टाकून सूर्यमंत्राचा उपदेश करून भगवंताने त्यास कृतकृत्य केले. (श्लोक ६६८-६९४)

शंखासुराने मनात काहीतरी विचार करून सुरजमल राजास सांगितले की तू श्रीहरीकडे जा व त्याची काय इच्छा आहे, तसेच पुढे काय करावयाची योजना ठरविलेलेली आहे वगैरे हकिकत युक्तिप्रयुक्तीने शोधून काढून ये. श्रीहरीला कोणकोण साहाय्य करणार आहेत. व त्याची युध्दाची तयारी कितीक प्रमाणात आहे वगैरे सर्व हकिकत काढून आण.

सुरजमल राजा श्रीहरीकडे जाऊन छद्मीपणाने त्याने श्रीहरीचे पाय धरले व भक्तिभावाचा मोठा डोलारा दाखवून काय आज्ञा आहे हुकुम करावा असे वारंवार विनवू लागला. श्रीहरी त्यास म्हणाले, माझा चोर जो शंखासुर त्याला तू मुकाट्याने माझ्या स्वाधीन कर. त्याला जरी तू कोठेही दडवून ठेवलेस तरी मी स्वर्ग, पाताळ, पृथ्वी एक करून, खेचून काढून त्याचा अंत करीन. त्या दैत्याचा नाश करण्याकरिता व त्याच्यापासून गांजलेल्या पीडलेल्या संत सद्भक्तांचे रक्षण करण्याकरितां तर मी अवतरलेलो आहे. पण राजा तू त्याला साहाय्य करून आत्मघात का करवून घेत आहेस? तू थोडासा तरी समज धर. विनाकारण या अग्नीत उडी टाकू नकोस. हा शंखासूर महादुष्ट आहे. याने जो शंख धारण केलेला आहे, तो महाउत्पात घडवून आणणारा अद्‌भुत शंख आहे. त्याच्या बळावर हा दैत्य एवढा प्रमत्त झालेला आहे. पण तो शंख त्याजकडून काढून त्यात याने दडविलेले वेद काढून त्याचा प्रसार मला मृत्युलोकात करायचा आहे. हे सर्व कार्य आद्यनारायणाने माझ्यावर सोपविलेले आहे. हा शंखासूर मला चकवित चकवित येथवर आला, पण आता येथून पुढे कोठे जाईल? पुढे तर शरण आल्याशिवाय याला दुसरी गती नाही.'

राजा सुरजमल कपट बुध्दिने म्हणाला, 'खरोखरच महाराज त्याला आता शरण आल्याशिवाय अथवा मरण आल्याशिवाय दुसरी गती नाही. हे श्रीहरी तुझ्या पुढे तो टिकाव धरू शकणार नाही. पण एवढा खटाटोप करण्याची तुम्हास गरजच काय? तुम्ही सर्व समर्थ बलवान व अति उदारही आहात या एकट्या शंखासुराकरिता कां म्हणून कष्टी होतात. एकवार त्यास क्षमा करा व आपले ब्रीद सांभाळून माघारे जा.'

सुरजमलचे असे कपटयुक्त भाषण ऐकून श्रीहरीस अतिशय राग आला व क्रोधाविष्ट होऊन त्यांनी राजास श्राप दिला की, 'तू या दैत्याच्या बाजूने शिष्टाई करायला आलास पण त्यायोगे तुझाच नाश आधी करायला हवे आहे. तू कोढग्रस्त, व्याधिग्रस्त होऊन याच दैत्याच्या द्वारी द्वारपाल म्हणून काम करशील. तुला अत्यंत हाल अपेष्टा भोगून जीवन जगावे लागेल.' श्रीहरी असे म्हणत आहेत तोच राजाच्या सर्व अंगावर कोड उठू लागले व तो त्या दुःखात निमग्न होऊन तिथेच दुर्गन्धात खितपत पडला. श्रीहरी शंखासुराला पकडण्याकरिता तेथून निघून गेले. (श्लोक ६९५-७१५)

सद्‌गुरु महाराज पुढे सांगतात की, 'जो कर्माचा भ्रष्ट असतो त्याची मति कशी भ्रष्ट होते ते पहा. श्रीहरी सप्तपाताळात गेले. तेथील दहा राजांना वरदान दिले. त्यांनी श्रीहरीची ओळख करून घेऊन वैकुंठपद प्राप्तीचे वरदान मिळवून घेतले. पण सुरजमल हा एकटा असा कर्मदरिद्री त्यांना मिळाला कीं, अखेर श्रीहरीच्या कोपास पात्र होऊन त्याने आत्मनाश ओढवून घेतला. सत्ता सामर्थ्यांच्या अभिमान मदाने धुंद होऊन त्याने परमेश्वरी अवकृपा आपण होऊन ओढवून घेतली. यास कर्मभ्रष्टाची गति न म्हणावे तर काय! ज्याने श्रीहरीची ओळख करून घेतली अशा त्याच्या मुलास वैकुंठपदाची प्राप्ति झाली व पिता रानोरान भटकून रखडत रखडत हीन स्वरूपाच्या कर्मगतीच्या फेऱ्यात पडून नाश पावला. जो कर्महीन आहे त्याची हीच गती समजावी. जो सत्‌कर्मी, परहितदक्ष आहे त्याची मती श्रेष्ठ, उच्च बलवान असल्याने तो परमज्ञानी समजावा. या जगतातच काय पण हे सर्व जगत सोडून अन्यत्रही कोण कोणाचा पिता अथवा पुत्र, भाऊ इष्टमित्र, स्त्रीपरिवार वगैरे आहे हे शोधून पहा. जो तो जीवात्मा ऋणानुबंधाच्या योगाने एकमेकाशी बांधला गेलेला आहे. ज्याचे ऋण फिटले तो स्वत:च त्याच्या गतीप्रमाणे अन्यत्र निघून जातो. क्षुद्रबुध्दीजीवात्मा हे माझे ते माझे असे ममत्व बाळगून नसता कर्मगतीच्या वादविवादात पडून आत्मनाशास कारणीभूत होतो.

इकडे शंखासुर विचार करू लागला आता कोठे जावे. पळून जाण्यास आता मार्ग नाही. सप्त पाताळाची हद्द संपून आता ब्रह्मांड कटाहाचा शेवटचा भाग आला. ब्रह्मांड कवच फोडून तरआपणास जाता येणार नाही, मग काय करावे? आता श्रीहरीच्या हाती सापडून आपला सर्वनाश झाल्याशिवाय राहणार नाही. असा विचार करून तो थरथर कापू लागला. तरीही मनात युक्ति योजून त्याने शांखाचा आकार धारण करून वरून मोठे अभेद्य असे कवच धारण करून शंखोदर नावाच्या बेटात जाऊन बसला. सर्व दैत्यांनीही त्याच्या साहाय्यार्थ जाऊन आत्मरक्षणासाठी शंखाचे अभेद्य कवच धारण केले. शंखासुराच्या पाठोपाठ श्रीहरीने सुध्दां समुद्रात प्रवेश करून शंखोदर बेटात जातांना श्रीहरीने अतिशयसुंदर व महान शक्तिशाली असे मत्स्याचे रूप धारण करून शंखासुराजळ प्रयाण केले. श्रीहरी शंखासुरास मोठ्याने गर्जना करून म्हणाले, 'अरे चोरा अशा रीतीने स्वरूप बदलवून तू या शंखोदर बेटात शंख होऊन बसला आहेस काय! थांब, आता पाहतो येथून पुढे कोठे जाशील

तर! आता तुला पळून जाण्यास एकही मार्ग नाही. म्हणून आता तरी तू वेद मुकाट्याने परत कर. नाही तर नाशास तयार हो. तू जर चारही वेद परत करीत असशील तर मी युध्द माघार घेतो, नाही तर युध्दास तयार हो.' अशा रीतीने गर्जना करीत करीत श्रीहरी शंखासुराच्या अगदी निकट गेले. (श्लोक ७१६-७३७)

सद्गुरु पुढे कथा सांगत आहे कीं, 'श्रीहरी शंखासुराच्या अगदी जवळ जाऊन त्यास सांगितले कीं, 'हे शंखवा, तू विनाकारण आत्मनाश करून घेऊ नकोस. अनंत कळा, लिला, चमत्कार दाखवून तू मला चकवित येथवर सप्तपाताळाच्या तळापर्यंत आणलेस. आता येथून माझ्या स्वाधीन झाल्याशिवाय कोठे जाशील? असे म्हणून एका हाताने शंखासुरास पकडले. तो काय चमत्कार, शंखासुर एवढा बलवान, पण त्याचे सर्व बळ एकदम नाहीसे झाले. श्रीहरी त्यास म्हणाले, अरे तु एवढा बलशाली म्हणवतोस मग तुझे बळ आता कोठे गेले? तुझ्या वल्गाना कोठे गेल्या? तुझी शक्ति कोठे दडवून ठेवलीस? ती प्रगट कर. दैत्यस्वभावास अनुसरून मोठमोठ्या प्रतिज्ञा केल्या होत्यास त्या सत्य कर व युध्दाकरिता तयार हो. वारंवार अशी वेळ येत नाही. अनायासे युध्द करण्याची संधी लाभली आहे तू युध्दास तयार हो.'

शंखासुर दोनही हात जोडून श्रीहरीचे पाय धरून क्षमा याचना करू लागला. तो म्हणाला,'हे त्रिभुवन धनी, मला क्षमा करा. मजवर दया करा. कृपादृष्टी करून माझ्या अपराधांची क्षमा करा. स्वामीन् तुम्हाला श्री आद्यनारायणाने आज्ञा करून अवतार धारण करण्याची शक्ति दिली व आपले अपरिमित तेज देऊन आपल्यासमान केले. याच्या बळानेच आपण एवढे कार्य करण्यास समर्थ झाला अहांत. हे देव मुरारी मी सुध्दा त्याच नारायणाच्या अंशापासून निर्माण झालेला असल्यामुळे व त्याच नारायणापासून मला सुध्दा बळ मिळालेले असल्यामुळे आपणात आणि माझ्यात अभेद आहे. स्वामीनाथ, ब्रम्हांडाची उत्पत्ति, रचना, पालनपोषण संरक्षण वगैरे कार्य घडवून आणून आपण आमच्यासारख्या पतीत जीववार दया करीत आहात. आमचा उध्दार करण्यासाठीच आपण अवतार धारण करतात. हे श्रीहरी, आपल्या हातून मरण येणे हे मी माझ्या परमभाग्याचेच समजतो; परंतु आपले अवतारकार्य घडवून आणण्यास माझी सुध्दा आपणास आवश्यकता आहे.'

अशारीतीने अनेकानेक प्रकारे स्तुती करून श्रीहरीकडे निरखून पाहात शंखासुर परमेश्वराचे पाय धरून क्षमा मागू लागला. भावभक्तियुक्त अंत:करणाने मस्तक श्रीहरी चरणी नमवून तो स्तुति करू लागला.

श्रीहरी शंखासुरास म्हणाले,' अरे तुला मारण्याकरिता मी आलेलो आहे आणि तू काय माझी स्तुती करीत आहेस. या तुझ्या बाह्य अवडंबराला मी भुलणारा नाही. तू मुकाट्याने स्वर्गलोकातून पळवून आणलेली संपत्ति माझ्या स्वाधीन कर. तू ब्रह्माचे वेद आणि शक्तीचे अलंकार आणि माझे पंच आभूषण व स्वर्गातील मौल्यवान रत्ने आणलेली आहेत ती परत कर व निर्धास्त हो. कशाला एवढा भक्तीचा आव आणून मला भुलवीत आहेस?' (श्लोक ७३८-७६१)

शंखासुर म्हणाला, 'हे श्रीहरी, माझ्या तपश्चर्येच्या बळाने मी महादेवास प्रसन्न करून घेतले आहे. महादेवाने प्रसन्नचित होऊन मस्तकावर धारण केल्याप्रमाणे अपरिमित असे बळ देऊन मला उपकृत केलेले आहे. मेरूसमान अचळ स्थिर असे आत्मनिग्रहाचे बळ देऊन अनन्यसाधारण असे हृदयस्थितीचे ज्ञान देऊन आपल्यासमान केलेले आहे, पण सृष्टीचक्र चालावे म्हणून ह्या सर्व अवतारी लीला करायच्या आहेत.

ब्रह्मदेवाचे ठायी वेदोत्पत्तिचा व सृष्टयुत्पत्तिचा जो अहंकार आलेला होता, तो नाहीसा करण्याकरिता मी त्याचे वेद हरण केले. शक्तिदेवीला जो अहंकार झालेला होता कीं सर्वामध्ये मीच बलवान आहे आणि सर्वांना बळ देणारी मीच आहे. अशा स्वरूपाचा तो अहंकार नाहीसा करण्यासाठी मी तिच्याजवळील रत्नच हिरावून घेतले. नंतर तुमचे ठायी सुध्दा एक प्रकारचा सुक्ष्म अहंकार आला होता की मी सर्व देवामध्ये कांही अंशाने मोठा आहे. मी नारायणाच्या बरोबरीचा असल्याने सर्वांमध्ये श्रेष्ठ आहे हा अहंकार निवारण्याकरिता मी तुमचे पंच आभूषणच हरण केले. अशारीतीने तुमच्या अत्यंत आवडत्या वस्तु हरण केल्यामुळे तुम्ही हतबल झाला असे पाहून सदाशिव नारायणाकडे जाऊन त्यांनी नारायणास सर्व हकीकत निवेदन केली. नारायणाने आपणास बोलवून आपली शक्ति तुमचे ठायी स्थापन करून माझा नि:पात करून ह्या सर्व वस्तु परत आणण्यास तुम्हास पाठविलेले आहे. व त्याप्रमाणे तुम्ही तुमचे कार्य करीत आहात पण तुमच्या कार्यास वाव मिळावा, सर्वत्र तुमच्या नावाचा प्रकाश पडावा व त्याद्वारे ईश्वराची साधना, जपजाप्य वगैरे करून लोक तुम्हास येऊन मिळावेत व त्यादृष्टिने तुमच्या कार्यास पुष्टी मिळावी म्हणून मी ह्या सर्व वस्तु घेऊन चौदा भुवनात भटकलो व अनायासे तुमचे कार्य सिध्दिस गेले. हे श्रीहरी मला कोणत्याही प्रकारची आसना वासना नाही. एकच सदिच्छा आहे की माझे शिरावर आपले चरण धरून मला शुध्द पावन करा व आपणामध्ये सामावून

घ्या. हे स्वामीन्! ब्रह्मा, विष्णू, महेश ह्या तीनही मूर्ति एकरूपच आहे. कोणीही न्यूनाधिक नाही. परंतु हे पिंड व ब्रह्मांड चालविण्याकरिता तुम्ही निरनिराळे गुण धारण करून कार्य करीत आहांत, हे श्रीहरी आपल्या ह्या वस्तूंचा सांभाळ करण्यास मी समर्थ नाही. मजजवळ राखून ठेवण्यासारख्या ह्या वस्तु नाहीत. त्या मी आपल्या स्वाधीन करीन. पण माझी अंतीम ईच्छा पूर्ण करून मला आपल्या स्वरूपात सामावून घ्या असे म्हणून शंखासुर श्रीहरीस अनन्यभावाने नमस्कार करू लागला. आपले सर्व प्रकारचे बळ आणि मान अपमान बाजूस सारून दैत्य स्वभाव दूर झुगारून देऊन अत्यंत दीनपणाने क्षमा याचू लागला.

श्रीहरीने त्याच्या अंत:करणातील शुध्दभाव व तळमळ जाणून सांगितले हे शंखवा, जे तू मुक्ति मिळवण्याविषयीचे मागणे मागत आहेस ते मी देऊ शकेल, पण मी नारायणाशी वचनबध्द होऊन शक्तिचे आणि ब्रह्माचे कार्य सुरळीत घडवून आणण्याकरितां आलेलो आहे. ती जबाबदारी पूर्ण पार पाडली म्हणजे मी तुझी इच्छा पूर्ण करीन. सांप्रत तुझी काय इच्छा आहे ती निवेदन कर. तुला जो कांही वर मागायचा असेल तो मागून घे. मी तुजवर प्रसन्न झालेलो आहे. ( श्लोक ७६२-७८२ )

दैत्य शंखासुर श्रीहरीच्या चरणी लागून वरीलप्रमाणे विनवू लागला तेव्हा श्रीहरी प्रसन्न होऊन त्यास म्हणाले, 'हे शंखासुर तुझे वचन ऐकून मी संतुष्ट झालेलो आहे. तुला काही वरदान मागायचे असल्यास नारायणाच्या कृपेने मी ते पूर्ण करीन.' शंखासुर परम आनंदीत होऊन म्हणाला, 'हे श्रीहरी मजवर कृपा करून मजकरिता दहा अवतार घेण्याचे कार्य आपण अंगिकारले हीच केवढी कृपा आपण मजवर केली. तरीही हे ईश्वरा, जर तू मजवर प्रसन्नच असशील तर एक जगावेगळे मागणे मी मागत आहे ते पुरविण्याची आपण कृपा करावी. मी माझ्या दैत्य स्वभावास अनुसरून तुझे कोणतेही वचन सरळ अर्थाने मानणार नाही. पण तुझ्या हातूनच मला मरण यावे. तुमच्या वेदवचनांचे पालन मी करू शकणार नाही पण माझी अंतीम इच्छा आपल्या हातूनच मरण्याची असल्याने तुजवाचून कोणाकडूनही अवध्य असावा. हे स्वामीन् मी मनात गृहीत धरून दहाही अवतारात तुजबरोबर युध्द करण्याची इच्छा केलेली आहे ती आपण पुरवावी. तुझ्या नावाने ज्याठिकाणी भक्तिभावाने युक्त संकीर्तन, भजन, पूजन चालले असेल त्याठिकाणी जाऊन त्या लोकामध्यें अहंकार, दंभ, दर्प, वगैरे भाव धारण करायला प्रवृत्त करून ते भंगाण पाडण्यात

यशस्वी होईल असा वर मला दे. जेथे वेदवाणीने युक्त असे थोर तत्ववेत्ते तुझ्या स्वरूपाचे लोकांना ज्ञान करून देतील. त्यांच्या सभेत जाऊन सर्व निरर्थक करून सोडता येईल असे बळ मला दे. भजन कीर्तन करून जे तुझे स्मरण करतील त्यांच्याठिकाणी तुझ्याऐवजी माझीच भक्ति ते करायला लागतील तशी मनोवृत्ति बदलण्याचे सामर्थ्य मला दे. जे तुझे नामस्मरण करतील त्यांची मति बदलवून माझी भक्ति करायला लागतील असे वरदान तू मला दे.' अशा रीतीने विचित्र वरदानाची शंखासुराने श्रीहरीकडे मागणी केली व ती पुरविण्याची प्रार्थना केली. तेव्हा श्रीहरीला आश्चर्य वाटून त्यांनी त्याला विचारले, अरे हे जगावेगळे मागणे काय मागत आहेस. तुझ्या जन्माचे सार्थक करून घे. शंखासुर म्हणाला हे ईश्वरा, आणखी एक गोष्ट मागायचीआहे ती म्हणजे सृष्टीकर्त्या ब्रह्मासहीत सर्वांनी मला मान देऊन माझी अवधी पुरेपर्यंत कोणीही माझ्या कार्यात हात घालता कामा नये. दुसऱ्या कोणाकडूनही मला मरण येऊ नये. ज्याप्रमाणे तीघे देव व चौथी शक्ति त्याप्रमाणे तुमच्या बरोबरीने पाचवा मी असा मान मला मिळावा अशाप्रकारचा वर तुम्ही मला द्यावा.'

श्रीहरी म्हणाले,'हे शंखवा तुझी जी इच्छा असेल ती पूर्ण होईल पण त्याकरितां तुला तपश्चर्येचे पाठबळ हवे आहे. तू महादेवाकडे जा. ते तुला सर्व प्रकारचा उपदेश करून साधना वगैरे करवून घेऊन तुला आपला सेवक करून घेतील. त्यांच्याजवळ तप करून प्रसन्न करवून त्यांच्याकडूनही वरदान मिळवून घे. ते तुझे बळ शक्ति पराक्रम वाढवून मान देतील. मीही तुला तसा वर दिला असता पण तुला मारण्याचे कार्य नारायणाने मजवर सोपविलेले असल्याने तू महादेवाचा आश्रय घे. फक्त तुझे पहिले वरदान मी पूर्ण करतो. कारण मला सुध्दा ते युक्तच आहे की जे कोणी माझे भक्त खऱ्या प्रेमाने भक्ति करणारे आहेत की नुसते दांभिकपणाचा आव आणून भक्ताचा मान मिळविणारे आहेत हे तुझ्या कर्तृत्वाने ताबडतोब समजून येईल. पण माझे जे खरे भक्त असतील त्यांना जर तू त्रास दिलास तर मला त्यांच्या प्रित्यर्थ तुझा समाचार घ्यावा लागेल.'

अशारीतीने दोघा देव व दानवांची सल्लामसलत होऊन त्यांनी आपापल्या कार्याची निश्चित योजना केली. श्रीहरी शंखासुरास म्हणाले, 'हे शंखवा जेव्हा जंबुद्विपात मी दहावा अवतार धारण करून शेवटच्या संधीकालात प्रगट होईन तेव्हा सर्व देशोदेशीचे राजे म्हणजे चतुर्युगातले सर्व सद्भक्त एकत्र जमून सर्वांना मोक्षगती प्राप्त होईल

तेव्हा तुला सुध्दा मोक्षगती लाभेल अशी नारायणाची आज्ञा आहे. तोपर्यंत तुला व मला हे जगच्चक्र चालविण्याचे काम करावे लागेल.'असे श्रीहरीने सांगितल्याने परम संतोषित होऊन शंखासुरानेमान डोलवून एकाग्र चित्त करून नारायणाचे ध्यान करू लागला. ( श्लोक ७८३-८१० )

श्रीहरीने नुकत्याच दिलेल्या वचनाप्रमाणे अवतारकार्य घडवून आणण्याकरितां शंखासुराचे ठायी क्रोधाची स्थापना करून त्याच्या चित्तात क्षोभ उत्पन्न करून दिला. क्षणात त्याच्या मनाचे व वृत्तीचे परिवर्तन झाले. सप्त पाताळाच्या खाली ब्रह्मांडाच्या शेवटच्या टोकावर असलेल्या शंखोदर बेटात सत्यरूपी एक मोठी अग्निशिखा होऊन तिने शक्तिरूप धारण करून ती महाशक्ति शंखासुराला आवाहन करून युध्दांकरिता सिध्द करू लागली. श्रीहरी त्यास पायाने दाबून हात धरून ओढू लागले. तसतसा शंखासुर संतप्त होऊन विरोध करू लागला. श्रीहरीने अखेरीस आपले स्वरूप बदलवून दोनही हातांनी शंखासुरास घट्ट आवळून धरले व एक जोराचा धक्का देऊन त्यास जमिनीवर उताणे पाडून त्याच्या पोटावर प्रहार केला. त्याचे पोट चिरून त्यातून त्याने दडवून ठेवलेले चारही वेद काढून घेतले.

अशा रितीने श्रीहरीने दैत्याचे पोट चिरून चारही वेद काढले तेव्हा सर्वत्र श्रीहरीचा जयजयकार होऊ लागला. अदृश्य रूपाने आलेले सर्व देव श्रीहरीने धारण केलेल्या मत्स्यरूप अवतारावर पुष्पवृष्टी करून मंगलावाद्ये वाजवू लागले.

समुद्रामध्ये शंखरूप धारण करून व चारही वेद पोटात गिळून घेतलेल्या शंखासुराचा श्रीहरीने मत्स्यरूप धारण करून अंत केला. त्याचा दैत्यभाव शंखामधून पूर्णपणे दूर निघून गेला व तो केवळ ज्ञानवान शंख तेथे शिल्लक राहिला. मोठ्या प्रेमाने श्रीहरीने त्याचे कलेवर हातात धारण केले व त्याच्या हृदयात दडलेले वैदिक ज्ञान मोठ्या युक्तीने बाहेर काढून त्या ब्रह्मज्ञानाचा उपदेश इतरेजनांना करवून त्यांचा अज्ञानरूपी अंध:कार नाहीसा केला. ही आनंददायक हकिकत ब्रह्मदेवास कळविण्याकरिता व त्यांचे वेद परत मिळाल्याचा संदेश देण्याकरिता श्रीहरीने ब्रह्मदेवाकडे एक दूत पाठविला.

दूत ब्रह्मदेवाकडे जाऊन विकल झालेल्या ब्रह्मदेवास सांगू लागलाकी,' हे सृष्टीकर्त्या चतुरानना, वेद आधाराशिवाय पृथ्वीची विकल अवस्था झाली होती. ती निवारण करण्यासाठी श्रीहरी शंखासुराकडून वेद परत आणण्याकरिता त्याच्या पाठोपाठ धावले तो जेथे जेथे दडण्याचा प्रयत्न करू लागला तेथे तेथे जाऊन श्रीहरीने त्याचा पाठलाग

केला व शेवटी पाताळात जाऊन मत्स्यरूप धारण करून शंखासुराचा अंत करून चारही वेद त्याच्याजवळून काढून घेऊन श्रीहरी आता आपल्या भेटीस येत आहे.' असा दूताचा संदेश ऐकून ब्रह्मदेवास अपरिमित आनंद झाला व ते अतिशय उत्कंठेने श्रीहरीची वाट पाहू लागले. (श्लोक ८११-८३१)

दूताने ही वार्ता ब्रह्मदेवास सांगितली तेव्हा ब्रह्मदेवास फार आनंद झाला. अतिशय आतुरतेने तो श्रीहरीची वाट पाहू लागला. एवढ्यात श्रीहरी तेथे लगबगीने आले. ब्रह्मदेव आसनावरून उठून श्रीहरीस सामोरे गेले. अतिशय प्रेमाने आदरसत्कार करून श्रीहरीस आसनावर बसवून स्वत: स्थानापन्न झाले व अतिशय सौम्य शब्दात त्यांचा गौरव करून आभार मानले. श्रीहरीने आपण आणलेले चारही वेद मोठ्या आपुलकीने ब्रह्मदेवास अर्पण केले. ब्रह्मदेवाने क्षेमकुशल विचारून मृदूल भाषेने श्रीहरीस प्रसन्न करून म्हटले की, 'हे श्रीहरी नारायणा माझ्याकरितां आपण एवढे परिश्रम घेऊन अपरिमित कष्ट सहन करून सप्तपाताळात जाऊन व शंखासुराला युध्दात जिंकून हे वेद परत आणलेले आहेत व त्याकरिता आपणास मत्स्य अवतार धारण करावा लागला. या सर्व घटनेमुळे आपण मला कायमचे ऋणी केलेले आहे. अंशत:ही या ऋणातून मुक्त होता येणार नाही.

श्रीहरी म्हणाले, 'हे ब्रह्मदेवा, यात ऋण ते कसले व मी असा कोणता पराक्रम गाजविला की तू मला एवढा गौरवितोस. अरे, खरोखर तुझ्या आज्ञेचे पालन करणे हे आमचे कर्तव्य आहे. नारायणाने अगदी योग्य पात्र पाहून तुजजवळ हे अखंड ज्ञान गुणभांडार वेद दिले. त्या वैदिक वचनांचे पालन करणे व रक्षण करणे आमचे कर्तव्य आहे. हे ब्रह्मदेवा, तुझ्या कृपाप्रसादाने मी थोडच्या फार अंशाने का होईना पण तुझ्या उपयोगी येऊ शकलो, यातच मी धन्यता मानतो. तुझे वचन ही नारायणाची आज्ञा समजून शिरसावंद्य मानून कर्तव्याच्या जबाबदारीत मी यशस्वी झालेलो आहे. ही आपली केवळ कृपाच होय.'

ब्रह्मदेवाने विचारल्यावरून श्रीहरीने आपला वृत्तान्त थोडक्यात त्यास निवेदन केला. श्रीहरी म्हणाले, मी प्रथम त्या शंखासुरास पकडण्याकरिता धावलो. तो शंखासुर पुढे पळून शंखनाळेतून पृथ्वीवर गेला. मत्स्यपाताळात जाऊन त्याने तेथील राजास आश्रय मागितला. पण त्याने नाकारल्यावरून त्यास पुढे निघून जावे लागले. या पाताळलोकातं एकापेक्षा एक असे परमभक्त प्रजाहितदक्ष व आत्मज्ञानी राजे वसलेले

आहेत. शंखासुराने ज्या ज्या राजाकडे आश्रयार्थ धाव घेतली त्या त्या सर्वांनी त्यास नारायणाचा चोर जाणून धुडकावून लावले व त्यांनी सत्याची बूज राखून भगवंताची ओळख करून घेतल्यामुळे मी त्या सद्भक्तांना वरदान देऊन कृतार्थ केलेले आहे. प्रत्येक अवतारात एकेका सद्भक्ताचा उध्दार करून त्याना वैकुंठपदाची प्राप्ति करून देण्याचे वचन मी त्यांना दिलेले आहे. (श्लोक ८३२-८५४)

श्रीहरी ब्रह्मदेवास आपली हकीकत पुढे सांगू लागले की, हा शंखासुर चौथ्या पाताळात गेला. तेथे गुप्तपणे राज दरबारात जाऊन बसला. तेथे हस्तीराज राज्य करीत आहे असे ज्ञानदृष्टीने सर्व परिस्थिती जाणून घेऊन तो अनन्य भक्तिभावाने मला सहकार्य करण्याकरिता धावून आला व अनेकरीतीने स्तुती करून अत्यंत नम्र भावाने शंखासुराला पकडून आणण्याकरिता आज्ञा मागू लागला. त्याला अनुरुप असे वरदान देऊन मी संतुष्ट केले व शंखासुराला मारण्याकरितां मीच पुढे गेलो. पाचव्या पाताळाचा मार्ग धरून शंखासुराने तेथील राजाचा आश्रय घेतला. पण मी तेथे जाताच तो परमसद्भक्त राजा आपल्या भाग्याची वाखाणणी करीत मला येऊन मिळाला. मी त्याला सुध्दा योग्य वर देऊन संतुष्ट केले. अशारीतीने पुढे निरनिराळ्या भागात जाऊन आश्रय मागितला पण कोणीही त्यास आश्रय देण्यास तयार होत नव्हते. मी जाताच ईश्वररूप समजून ते सद्भक्त मला शरण येत म्हणून मी त्यांच्या मननोकामना पूर्तिकरता योग्य असे वरदान दिले. फक्त एक राजा सुरजमल याने मात्र दैत्य कुळाचाअभिमान धरून शंखासुराला आश्रय देऊन माझ्याशी प्रतिकार करण्यास सज्ज झाला. त्यास शाप देऊन मी माझा मार्ग मोकळा केला. शंखासुर पुढे सप्तपाताळाच्या तलाशी असलेल्या शंखोदर बेटात जाऊन राहिला. तेथे जाऊन मत्स्यरूप धारण करून मी त्याचे पोट चिरून हे वेद परत आणून आपल्या स्वाधीन करीत आहे. श्रीहरीचे भाषण ऐकून ब्रह्मदेवास अपरिमित आनंद झाला. त्याने अपार प्रेमभराने श्रीहरीस मिठी मारली व अत्यंत नम्र भावाने सहकार्य केल्याबद्दल आभार मानले. (श्लोक ८५५-८७२)

श्रीहरीने ब्रह्मदेवास सांगितले की, 'हे ब्रह्मदेवा, तू आता मृत्युलोकात जाऊन या वैदिक ज्ञानाचा इतर लोकांना उपदेश कर. गुरुरूपाने प्रगट होऊन या सतपंथ सन्मार्गाचे इतरेजनांना मार्गदर्शन कर हा अनादि सनातन वैदिक सन्मार्ग असून याची तू प्रथम युगाचे ठायी स्थापना कर. तू दिग्दर्शित केलेल्या 'सत्' मार्गाला जे कोणी विरोध करतील, सत्यमार्ग सोडून देऊन असत्य मार्गाचे आचरण करतील अशा दुष्टांचे निर्दालन करण्याकरिता मी अवतार धारण करीन. जे सद्भक्त परमविशुध्द अंत:करणाने

सन्मार्गानुसरण करून तळमळीने ईश्वरभक्ति करून जगतातील मिथ्या माया मोहरूप कसोटीतून पार उतरतील अशांचा उध्दार करण्याकरिता व तू दिग्दर्शित केलेल्या सन्मार्गाची विस्कटलेली घडी नीट बसविण्याकरिता मी प्रगट होऊन ते सर्व कार्य करून तुला सहाय्य करेन.

श्रीहरीचे वचन ऐकून ब्रह्मदेवाने पूर्ण अनुमोदन दर्शवून म्हटले की, आपले वचन मी शिरसावंद्य मानतो. श्रीनारायणाने सुध्दां मला तशी आज्ञा केलेली असल्याने ह्या वैदिक ज्ञानाचा प्रसार करण्याकरितां मला मृत्युलोकांत जायचे आहे पण हे श्रीहरी हे काम माझ्या एकट्याकडून पार पडेल असे दिसत नाही. म्हणून आपण मजवर कृपा करून मला सहाय्य करावे. तुमच्या सहाय्यावाचून हे काम तडीस जाणारे नाही.' श्रीहरीने त्यांचे वचन मान्य केले.

एवढ्यात महादेव आणि शक्ति त्याठिकाणी येऊन दाखल झाले. सर्वांनी परम संतोषित होऊन एकमेकांना प्रेमभराने क्षेमकुशल विचारून आभार मानले. महादेवाने व शक्तिने श्रीहरीस त्यांच्या अवतार विषयक कार्याची सविस्तर चर्चा केली व श्रीहरीनेही इत्थंभूत सर्व हकिकत निवेदन केली. तेव्हा शक्तीने श्रीहरीस विनविले की,' हे श्रीहरी, आपण शंखासुराला मारून वेद परत आणले पण माझे अलंकार शृंगार का आणले नाहीत? नेमके आभूषणच का आणायचे विसरलात? माझे महत्व व योग्यता आपण जाणत नाही. तुम्ही तिघेही जण माझी योग्यता जाणत नाही. मी आद्यशक्ति असून माझ्या मनात जर आले तर मी तिघांना स्थानभ्रष्ट करू शकेल. नारायणाने आपल्या एकमात्र संकल्पाने केवळ आपली प्रतिकृति म्हणून मला निर्माण केलेले आहे. मी अनंत गुणवान, कलावान आहे. एकाच क्षणात मी अनंत रूपाने प्रगट होऊन अनंत कार्य करू शकते. अशी माझी अपरिमित शक्ति आहे. मी क्षणात मातेचे स्वरूप धारण करते व मनाला वाटल्यास कोणत्याही प्रकारचे सोयरसुतक न मानता वाटेल ते कार्य करू शकते. सर्व जगताला मी माझ्या या अवर्णनीय गुणांनी आवृत्त केलेले आहे. मी प्रत्येकाच्या घरी स्त्री रूपाने प्रगट होऊन सर्व जगताची सेवा सुध्दा करते. अशाप्रकारचे अनंतगुण माझे ठायी आहेत. पण तुम्ही तिघंही माझी शक्ति ओळखत नाहीत. ज्या अजामिढाला तुम्ही पूज्य व वंदनीय मानीत होते त्याला मी त्रिशुळाने एका क्षणात मारून बारा तुकडे केलेले आहेत. परंतु तुमच्यासमोर मी धीर धरून तुमचे अनिष्ट करू इच्छित नाही. पण लक्षांत असू द्या की तुम्ही तिघं देव आणि मी शक्ति एकटी असूनही तुम्हां तिघांनाही फिरवून जेरीस आणू शकेल अशी दिव्य शक्ति माझे ठाई आहे व इच्छा असल्यास त्याचा परिणाम मी आताच दाखवून देते.' (श्लोक ८७३-८९४)

भगवान विष्णू म्हणाले, 'हे शक्तिदेवी, तुझी अपरिमित गति आम्ही जाणतो. तू मनात कोणताही कमीपणा न आणता क्रोध करू नकोस. तुझे अलंकार, आभूषणे, शृंगार मी घेऊन येईन, कारण सृष्टीचे कार्य करण्याकरिता मला मृत्युलोकात आणखी पाताळातही जायचे आहे. तुझे शृंगार पाताळातून शेषनागाच्या दरबारातून काढून आणून मृत्युलोकात भूमीच्या द्वारी ठेवलेले आहेत. तेथे ते सुरक्षित आहेत पण तुझी इच्छा असल्यास मी कूर्मरूप धारण करून समुद्रमंथन घडवून तुझे हे अलंकार तुझ्या स्वाधीन करीन असे तू निश्चयाने समज. हे प्रिय शक्ति, तुझ्या प्रितीकरितां व सौख्याकरितां आणि मनोकामना तृप्त करण्याकरिता मला आणखी तिसऱ्यांदाही जरी पाताळात जावे लागले तरी ते कार्य मी अत्यंत आनंदाने शिरावर घेऊन तडीस नेईन कारण तू मला अत्यंत प्रिय आहेस व मी तुला तसे वचन दिलेले आहे.' हे ऐकून शक्तिला फारच आनंद झाला व तिने प्रेमभराने श्रीहरीस आलिंगन दिले. श्रीहरीच्या व शक्तीच्या या गाढ प्रेमलिंगनातून पुढे मायेचा अनंत विस्तार होऊन निरनिराळ्या असंख्य जीव प्राणिमात्रांची उत्पत्ति झाली. अशारीतीने हे जग विस्तार पावले. शक्तीदेवी अत्यंत हर्षित होऊन श्रीहरीची स्तुति करून गुणगान गाऊ लागली की, हे स्वामी तुम्ही चौदा भुवनांचे निर्माते असून संकल्पमात्राने या जगताचा अनंत रूपाने विस्तार करण्यास समर्थ आहांत!

सद्गुरु महाराज सांगतात की वेदवचनांच्या अनुसंधानाने व ज्ञानदृष्टीने जे जीवात्मे शिव आणि शक्ती यांचे एकरूपता मिलन घडवून आणून ब्रह्मत्व प्राप्त करवूनघेतात तेच जीवात्मे हरिवंशी सद्भक्तसंत महात्मे गणले जातात. अशा सद्भक्त महात्माच्या चरणी जे कोणी लीन होतात त्यांना अमरपदाची प्राप्ति होते. अशा ईश्वरप्रेरीत दिव्यविभूति मधूनच एखादा अवतार प्रगट होऊन या जगतातील अज्ञ जीवात्म्यांना मार्गदर्शकरूप होतो व दुष्टबुध्दीच्या दानवांचा संहार करून सुष्टांचे पालन व संरक्षण करतो आणि सृष्टीतील धर्माची विस्कटलेली घडी नीट बसवितो असे अवतारी पुरुष युगायुगाचे ठायी क्वचितच होत असतात. पण आधिकारिक जीवन्मुक्त महात्मेमात्र मधूनमधून या अवनीतलावर प्रगट होऊन गुप्त वा प्रगटरूपाने सद्भक्तांस मुक्त ज्ञानाचा उपदेश करतात, ते सुध्दां हरिवंशी महात्मेच समजावेत. त्यांची पात्रता, योग्यता जाणून त्यांची सेवा करा व त्यांच्या ज्ञानाशी एकरूप होऊन अमरपदाची प्राप्ति करवून घ्या. (श्लोक ८९५-९१५)

भगवान विष्णुच्या पहिल्या मत्स्य अवतारात हे सर्व संबंध बांधले गेलेले आहेत. अवतारपात्रांचे, सद्भक्तांचे, मार्गदर्शक युगगुरूंचे आणि अपरिमित तपस्वी पण विकारांच्या आहारी गेलेल्या अशा दानवांचे संबंध जोडले गेलेले आहेत. नियुक्त झालेले आहेत. सृष्टिचक्र चालविण्याकरितां अंतरदृष्टीने ब्रह्मशक्ति, विष्णुशक्ति आणि रूद्रशक्ति म्हणजे रज, सत्त्व, तम ही मूळ प्रकृति एकच आहे; पण बाह्यरूपाने अलग अलग अशी मुख्य तीन रूपाने विभागली जाऊन तीमधून सुध्दा अनेकानेक स्पंदने होऊन सांप्रतचे जगत् आस्तित्वात आले.

शबल ब्रह्मशक्तीपासून म्हणजे रजोगुणात्मक प्रकृतिपासून जो मनुवंश म्हणजे मानववंश निर्माण झाला. त्यात विष्णुशक्तिच्या म्हणजे सत्वप्रधान प्रकृतीसंयोगाने मानववंशात अनेकानेक सद्भक्त म्हणजे देव अवतारी पुरुष निर्माण झाले. त्यांनी वेदोपनिषदांच्या अनेकानेकशाखा उपशाखांनी पसरलेल्या ज्ञानरूपी वृक्षाचा त्रिभुवनात विस्तार केला, त्या ज्ञानाची जोपासना करून त्यांच्या बोधामृत फळांचा आस्वाद घेऊन परमतत्वांशी एकरूप झाले. तसेच त्या ब्रह्मशक्तिशी रूद्रशक्तीचा संयोग होऊन त्यापासून अनेकानेक ऋषिमुनी-महातपस्वी जीवात्मे झाले. ज्यांनी सत्वशक्तीचा म्हणजे विष्णुशक्तीचा आश्रय घेतला ते युगप्रवर्तक महान सत्पुरुष झाले. पण जे तमोगुणाच्या आश्रयाला जाऊन विकारांच्या आहारी गेले ते मानवातून दानव होऊन तपश्चर्येच्या योगाने त्रिभुवन विजयी दैत्य झाले.

पण शेवटी विष्णुशक्तीच्या दुसऱ्या अंगाने-संरक्षक अंगाने-त्या दुष्टांचा संहार करून सृष्टी निष्कंटक राखण्याचे कार्य केलेले आहे करीत आहे व करणार आहे. अशारितीने अगम्य अशी निगम आणि आगम भविष्यवाणी कथन करून तसेच खगोल आणि संपूर्ण भूमंडळाची उत्पत्ति, रचना, स्थिती आणि लय त्यांचे कार्यप्रयोजन वगैरे संपूर्ण रितीने कथन करून सद्गुरु महाराजांनी भुललेल्या लोकांना - आत्मस्थिती विसरलेल्या अज्ञ मानवजातीला ज्ञानरूप दिवा प्रगट करवून, त्यांचे अज्ञान, अंध:कार समूळ नाश केलेले आहे. आत्मज्ञानरूपी दिव्य खड्गाने जे अज्ञ जनांच्या मायेचे प्रकृतिचे बंध तोडून त्यांना आत्मचैतन्य-रूप नारायणाची प्राप्ती करवून देतात तेच खरोखर युगप्रवर्तक सत्पुरुष ब्रह्म अवतारी जाणावेत. परमेश्वराच्या निर्गुण निराकार स्वरूपाची ज्यांना जाणीव होऊ शकत नाही, अशा पामर जीवात्म्यांना सुध्दां त्याच्या सगुण साकार अवतार पात्रांची जे जाणीव देऊन भक्ति करायला लावतात ते सुध्दां युगप्रवर्तक ब्रह्म अवतारी सत्पुरुष जाणावेत. हे अज्ञ जीवात्म्यांनो, तुम्ही त्यांची सेवा

करा. नित्य त्यांच्या सहवासात राहा. त्यांच्या मुखारविंदातून अथवा शास्त्रग्रंथद्वारा संकलित केलेले ज्ञान श्रवण करा. मनन व निदिध्यास करून आत्मप्रचितीच्या योगाने जाणीव करून घ्या, व आपल्या नरजन्माचे सार्थक करून घ्या. मानवजन्म वारंवार मिळू शकणार नाही. सांप्रत प्राप्त झालेला आहे तर सर्वप्रकारचा आळस व अकर्तेपणा टाकून सन्मार्गाची कास धरा. तुम्ही आत्मज्ञानरूपी सूर्याची मूलं आहात. आपल्या हृदयात ते आत्मचैतन्य तळपत आहे, त्याची प्रकृतीच्या बंधामुळे आपणास जाणीव नाही. संतपुरुषांच्या संगाने ज्ञानचर्चेने ती जाणीव करून घ्या व आपणच आपणास ओळखा म्हणजे आपण ब्रह्म अवतारी ब्रह्मपुत्र आहोत हे आपणास समजून येईल.( श्लोक ९१६-९३५ )

ब्रह्मदेवाच्या चारही मुखातून वेद वचनांची वाणी प्रसृत झाली आणि त्याच ब्रह्मशक्तिपासून स्वेदज, ईंडज, उद्‌भीज व जारज अशा चार खाणी बांधल्या गेल्या. त्या चार खाणीमध्ये चौऱ्यायशी लाख अशी अनेकानेक जीवप्राणिमात्रांची शरीरे निर्माण झाली आणि त्यांच्या देहात तेच ब्रह्मतत्व आत्मचैतन्यरूपाने वास्तव्य करूं लागले असे जरी असले तरी अन्य कोणत्याही प्राणिमात्राला या आत्मचैतन्याची जाणीव नाही. केवळ मानव योनीतही महात्मा पुरुषांच्या सान्निध्यांत राहून आत्मज्ञान ग्रहण करून त्याप्रमाणे आचरण केले त्यांनाच केवळ आत्मचैतन्याची जाणीव होऊ शकते. शास्त्रानुभव गुरुद्वारा मार्गदर्शन व स्वानूभूतीच्या योगाने ज्याने नाभीचक्राचे ज्ञान जाणले, योगमार्गाच्या आवरणातून ज्याने त्या ब्रह्माचा ध्यानयोग साध्य केला त्यालाच त्या पिंड ब्रह्मांडांची संपूर्ण जाणीव होते. त्यासच मुक्तिमार्ग लाभतो, त्यासच चारही वेदांचे रहस्य उमजू शकते. वेदवेदांगे उपनिषदे वगैरे धर्मग्रंथातील विशेष गुहचज्ञान समजणारा योगी स्वत: योगाभ्यासाने परमेश्वराशी जरी तादात्म्य पावला तरी लोकसंग्रहाकरिता त्यांना योग्य मार्गदर्शन करून त्यांना सुध्दां ब्रह्मदर्शनाकरिता सिध्द करून देतो तोच खरा ब्रह्मावतारी संतमहात्मा योग गुरु होय. अशा महात्म्यांची सुयोग्य-सुपात्र योगीश्वरांची तन, मन, धनाने सेवा करून त्यांची कृपादृष्टी संपादन करावी. असे संत महात्म्ये या अवनीतलावर दीपस्तंभरूप असतात. लक्ष्य चुकलेल्या प्रवाशाला आडमार्गातून सोडवून सन्मार्गाचा, मुक्तिमार्गाचा रस्ता दाखविणे व त्या मार्गाचे अनुसरण त्याच्याकडून करवून घेणे एवढी सारी जबाबदारी त्या महात्म्यांना शिरावर घ्यावी लागते. अशा ब्रह्मावतारी संत महात्म्यांची तुम्ही सेवा करा. हे मुनिवरा, आपले तन मन धनच काय पण प्राणसुध्दां त्यांच्या स्वाधीन करून केवळ त्याचा एकसेवक, नोकर या नात्याने संसारात वाग म्हणजे त्याची कृपादृष्टी तुझ्यावर होईलच यात तिळमात्र शंका नाही हाच सत्‌पंथ आहे. हाच देवयानमार्ग आहे. हाच मुक्तिमार्ग आहे.( श्लोक ९३६-९४७ )

सद्गुरुंच्या साऱ्या कळांनी युक्त व साऱ्या लक्षणांनी युक्त असे जे महात्मा पुरुष अवतरतात ते केवळ या जगतातील अज्ञान मोहान्धकारात गोते खात असलेल्या जीवात्म्यांना योग्य मार्गदर्शन करून भवसागराच्या पैलतीराला मोक्षपदाला घेऊन जातात. चौदा भुवनात त्यांची ख्याती होते. कारण चौदा भुवनातील स्थितीचे संपूर्ण ज्ञान त्यांना प्राप्त होते म्हणून त्याची जाण ते सद्भक्तांना करून देतात. अवतारपात्रांची कळा त्यांची स्थानक व स्थिती वगैरे संपूर्ण अगम्य आगमनिगम ज्ञानाची जाणीव सद्भक्तांना करवून देतात. अजर, अमर, अक्षय, अशा ब्रह्म आसनावर आरूढ होऊन मनाच्या साऱ्या वृत्ति शुन्याकार करून, प्राणशक्ति निरोध करून, नारायण तत्वाशी म्हणजे निर्गुण निरव्यय सतत्वाशी तादात्म्य पावलेले असे महात्मापुरुष ईश्वर अवतारीच समजावेत अशा सत्पुरूषांची अंशात्मक कृपा जरी संपादन करता आली तरी त्या जीवात्म्यांचे सारे जीवीत सफल होते. त्याच्या ऐहिक भोगवासना संपूर्ण लय पावून केवळ एकमेवसत् अविनाशी तत्वाशी ते तद्रूप होतात. याकरिता सदैव त्यांच्या सत्संगतीत राहून त्यांची तममनधनाने यशाशक्ति सेवा करावी. एका बीजापोटी फळे कोटीकोटी या न्यायाने महात्मा सत्पुरुषांच्या कृपेचा वर्षाव असतो. एका क्षणाचा अथवा अंशाचा जरी त्यांचा कृपाकटाक्ष झाला तरी जीवात्म्यांचे साऱ्या जन्माचे संचित प्रारब्धकर्माचे भोग जळून भस्म होतात. याकरिता सद्भक्तांनो जागृत व्हा. चौर्यायशीच्या फेऱ्यातून सुटण्याकरिता कमर कसून सिध्द व्हा. महात्मा पुरुषांना - संत - सत्पुरुषांना ताबडतोब शरण जा. महत्प्रयासाने त्यांच्याकडून प्रत्यक्ष व ग्रंथरूपाने अप्रत्यक्षरितीने ज्ञान संपादन करा व तन मन धनाने सेवा करून त्यांच्या प्रेमाचे पाईक व्हा. (श्लोक १४८-१५९)

ब्रह्मा, विष्णु आणि शक्ति यांनी एकविचाराने आपला अंशभूत अवतार धारण केला. दुष्ट दैत्यांचा संहार करून वेदांचा उध्दार केला. जगतात सर्वत्र पसरलेला अज्ञानरूपी अंध:कार निवारण करून वेदोक्त अशा सूर्योपासनेचा धर्म सुरु केला. अत्यंत तेजस्वी प्रभावी व प्रतिभा-संपन्न अशा गायत्री मंत्राचा उपदेश करून लोकांना प्रत्यक्ष प्रगट अशा भगवंताच्या स्वरूपाचे साक्षात् दर्शन करवून दिले. जगतातील सद्भक्तांच्या ठायी सध्दर्माच्या तत्वांचे बीजारोपण करून सूर्यवंश किंवा हरिवंश व ब्रह्मवंशाची स्थापना केली. वंशपरंपरागत सद्भक्तांची योजना घडवून भगवंतानी जगतात सत्धर्माचा पाया रचला. मधून मधून अंशभूत अवतार धारण करून त्याच सनातन सत्पंथधर्माची ध्वजा त्यांनी कायम फडकाविली. त्याच धर्मतत्वांच्या आचरणाने युक्त झालेल्या भक्त रूख्मांगदाचा उध्दार केला. वृक्षाचे बीजारोपण केल्यानंतर ज्याप्रमाणे

प्रथम अंकुर फुटून नंतर त्यास डीर प्रगट होतात, कालांतराने त्यांची वाढ होऊन फांद्या होतात, मोठमोठ्या शाखा तयार होऊन त्यास आणखी कित्येक फांद्या उपफांद्या फुटून शेवटी त्यास वृक्षत्व प्राप्त होऊन फुलेफळे वगैरे येऊन बीजे तयार होतात व नंतर अनेक वृक्षांची निर्मिती होऊन वृक्षे फोफावतात तद्वत श्रीभगवंतांनी मत्स्यअवतार धारण करून वेदबीजे घेऊन तपश्चर्या, यम, नियम तत्वाचरण ईश्वरानुसंधान वगैरे मार्गांनी त्या वेदबीजापासून सनातन सत्पंथ धर्माचा हा प्रचंड वृक्ष प्रगट केला व त्याच्या निरनिराळ्या शाखा उपशाखामधून वेळोवेळी तत्त्वज्ञानाचा जीवनरस पुरवून अनेकानेक सद्भक्त, सत्पुरुष संत महात्मेरूपी फळे पुष्पे प्रगट केली व तदनुसार हा सत्पंथ सनातन धर्म जगात प्रसिध्दीस आणला. चार लाख बत्तीस हजार वर्षे या अवताराचे कार्य असून त्याने सूर्यमंत्राच्या जपाच्या साहाय्याने युगधर्मानुसार आचरण केलेल्या सध्दर्माच्या योगाने कित्त्येक भक्तांचा उध्दार केला. जे अपरिपक्व जीवात्मे त्यांच्या त्या युगधर्माप्रमाणे न वागता असूर मंत्राच्या साधनेनेकेवळ आपले लौकिक जीवन अधिक सुखी समृध्द होण्याकरिता झटले, त्यांना सौख्य तर लाभले नाहीच पण त्यांचे कर्मफल त्यांना लक्षचौर्यायशीच्या बंधनास कारणीभूत झाले. असूर मंत्राने अथवा अघोरी अशाआसूरी साधनेने कोणत्याही काळी जीवात्म्यांचे आत्मकल्याण होत नाही. केवळ दैवी साधनेने सूरसाधनेनेच आत्मलाभ होतो. सूरसाधनेचा मार्ग तोच सत्पंथ फार अलौकिक दिव्य तेजस्वी आहे. ( श्लोक ९६०-९७६ )

सद्गुरु महाराजांनी अगम्य असे मुक्तीमार्गाचे ज्ञान कथन केलेले आहे, पण ते जाणण्यास पात्र योग्य अशी व्यक्ति विरळच असते. ज्यांचे पूर्व सुकृत उत्तम व त्यायोगे तपश्चर्येचे बळ ज्यांना लाभले असेच जीवात्म्येकेवळ हे आत्मोन्नतीचे ज्ञान मिळवून त्याची जोपासना करून अंगीकृत करून आत्मोन्नती साधतात. बाकी तर बहुतांश जीवात्म्ये कर्मगतीच्याच फेऱ्यात पडतात. असो, भगवंतांनी शुध्द बीजेच्या दिवशी गुरुवारी हा अगम्य असा मत्स्य अवतार धारण करून, भक्तांचा उध्दार करून दैत्याचा सहार केला. पाताळाचा भेद जाणून घेऊन तेथे दडलेला वेदरूपी अमृताचा ठेवा हस्तगत करून मृत्युलोकांत आणून मानवांना त्याचा लाभ घडवून दिला. त्या अमुल्य ठेव्याने मानव आपला जीवनक्रम उत्तमरितीने चालवून अमृतत्व प्राप्त करू शकतो. त्याच वैदिक सनातन धर्माचे मानववंशात त्यांनी बीजारोपण केले व मानवसमाज प्रगत केला. हा वैदिक सनातन धर्ममार्ग ज्याने अवरूध्द केला होता अशा शंखासुराचे ते कलेवर आणून भगवंतानी श्री शंकरास दिले. त्यांनी आपल्या भक्ताचा तो अवशेष भाग मोठ्या प्रेमाने धारण केला व त्याचाच एक अंशभाग

म्हणून शंकरांनी विष्णुला दिला. विष्णुने सुध्दा त्यास आपले हातावर धारण केले. नंतर विष्णुंनी पाताळातून आणलेली बारा ज्योतिर्लिंगे भगवान शंकरास दिली. त्यायोगे भगवान शंकर अत्यंत संतुष्ट होऊन त्यांनी विष्णुची अनेकपरीने स्तुति करून हरि आणि हर यांच्यात अभेदत्व आहे हे जगतास दाखवून दिले. तद्नंतर शक्तिदेवीने भगवान विष्णुवर क्रुध्द होऊन आपली आभूषणे मागितली. ती म्हणाली, 'भगवान श्रीहरी, आपण आपल्या पराक्रमाचे एवढे गोडवे गाऊन सांगतात; ब्रह्मदेवाचे वेद आणून दिले, शंकराचे द्वादश लिंगे आणून दिलीत. पण माझी आभूषणे मात्र तुम्हाला आणता आली नाहीत. खरोखर माझ्यावर तुमचे प्रेमच नाही.' अशाप्रकारे लटक्या रागाने शक्तिने सांगताच भगवान श्रीहरी म्हणाले, 'हे सती शक्तिदेवी, मी आता पाताळाचा भेद जाणून आलेलो आहे. तिथे तुझ्या आभूषणांचे रक्षण नागदेव करीत आहे. मी जेव्हां दुसरा अवतार धारण करीन तेव्हा तुझी भूषणे घेऊन येईन. तू निश्चिंत राहा. मी तुला वचन देतो की तुझी आभूषणे आणण्याकरीता मी स्वत: दुसराच काय पण तिसराही अवतार घेऊन तुझी इच्छा पूर्ण करीन.' हे ऐकून सति शक्तिदेवी प्रसन्न झाली. (श्लोक १७७-१९१)

## ★ द्वादश ज्योतिर्लिंगाची उत्पत्ति ★

एकदा महादेव पार्वतीसह विंध्यांद्री पर्वतावर आले असता पार्वती म्हणाली देवा, मला फार तहान लागली आहे, तर उत्तम पाणी शोधून आणा. महादेवांनी आपला त्रिशुळ भूमीत रोवून पाताळातले अमृतजल वर आणले. त्या पाण्याचे वंदन करून पार्वतीला पिण्यासाठी दिले. पार्वतीची तृषा शांत झाल्यावर महादेव तिला म्हणाले, 'पार्वती, हे स्थळ आतापासून तीर्थस्थळ झाले असून या तिर्थाचे ठिकाणी जो कोणी स्नान करील तो सर्व पातकापासून मुक्त होऊन कैलासी जाईल.' त्या तीर्थाचे पूजन करून पार्वतीने हातावर कुंकू घेतले व शंकराचे मस्तकास लावण्यासाठी चोळू लागली तो त्या कुंकूमाची गोळी झाली. ती गोळी पार्वतीने हातावर घेताच त्या गोळीचे ज्योतिर्लिंग झाले. तेव्हा महादेव पार्वतीस म्हणाले, 'माझ्या अंत:करणात जो ईश्वर आहे त्याचा दृश्य आकार हे लिंग आहे.' मग महादेवांनी ते लिंग आपल्या हातावर घेऊन त्यास वंदन केले व ते भूमीवर ठेवले. त्यांनी त्या लिंगाला प्रदक्षिणा घातल्या व नमस्कार केला. इतक्यात सर्व देवही तेथे आले. त्यांनी ते रक्तलिंग पाहून शिवाचेच अनुकरण करून त्या लिंगाला वंदन केले. श्रीविष्णु आदि सर्व देवांनी त्या तीर्थात स्नान करून भक्तिने त्या लिंगाची पूजा केली व त्यास नमस्कार केला. जगत्पित्या

शंकराने स्थापन केलेले ते लिंग म्हणून सर्वांनी अनन्यभावाने त्या लिंगावर अक्षता टाकल्या. पार्वतीने कुंकू हातावर घासून त्याचे लिंग केले म्हणून शंकरांनी त्याचे नांव घृष्णेश्वर असे ठेवले. या ज्योतिर्लिंगाचे दर्शन ज्याला होईल त्याला स्वर्गाचे अमृत प्राशन करण्यास मिळेल. व तो कितीही पातकी असला तरी पुनीत होईल असा वर शंकरांनी त्या स्थानास दिला. अशाचप्रकारे निरनिराळ्या देशात निरनिराळ्या ठिकाणी ज्योतिर्लिंगांची स्थापना व उत्पत्ति झालेली आहे ती अशी :

१) सौराष्ट्रात सोमनाथ
२) कर्नाटकात मल्लिकार्जुन
३) महाराष्ट्रात गौतमीच्या उगमस्थानी त्र्यंबकेश्वर (नासिक)
४) हिमालयात केदारेश्वर
५) सेतुबंध येथे रामेश्वर
६) काशीस विश्वेश्वर
७) उज्जयनीस महाकालेश्वर
८) वेरूळास घृष्णेश्वर
९) द्वारकेस नागेश्वर
१०) भीमेच्या उगमस्थानी भीमेश्वर
११) देवपरळी येथे वैजनाथ
१२) मध्यप्रदेशात ॐ कारेश्वर

अशी ही बारा ज्योतिर्लिंगे आहेत.

## ★ शंखाची उत्पत्ति ★

पूर्वी एकदा सर्व राक्षस एका ठिकाणी मिळून पाताळात हयग्रीवासुराकडे गेले व त्याला म्हणाले, 'हे असुराधिपते, ब्राह्मणांच्या होमहवानांचा बीमोड केल्यावाचून राक्षसांच्या उन्नतीचे दिवस कधीही येणार नाहीत. या होम हवनामुळे इंद्रादिदेव प्रबल होतात व राक्षसांना बिलकुल वर डोके काढू देत नाहीत. ही होमहवनादि कृत्ये बंद करण्यासाठी वेदांचा नाश केला पाहिजे.' राक्षसांनी दिलेला सल्ला हयग्रीवाला पसंत पडला व तो शंखाचे रूप धारण करून ब्रह्मलोकी गेला. तो प्रचंड शंख आपल्याकडे गडगडत येतआहे असे पाहून ब्रह्मदेव घाबरून गेला. इतक्यात त्या प्रचंड शंखाचा असा ध्वनी झाला की त्याच्या नादाने ब्रह्मदेव मूर्छित होऊन क्षणभर निश्चेष्ट पडला. ती संधी साधून हयग्रीव ब्रह्मदेवाजवळचे वेद घेऊन समुद्रात लपून बसला. इकडे ब्रह्मदेव सावध होऊन पाहतो तो वेद नाहीत. वेद नाहीसे झाल्यामुळे होमहवनादि कृत्ये बंद पडली. व देव हविर्भागावाचून तळमळू लागले. वेदांच्या अभावामुळे थोड्याच दिवसात जिकडे तिकडे मोठा हाहा:कार उडाला, देव दिवसेंदिवस नि:सत्व होत चालले व राक्षस प्रबल होत चालले. ते देवांना, लोकाना वाटेल तसा त्रास देऊ लागले. तेव्हा सर्व देव क्षीरसागरी श्रीविष्णुकडे गेले व त्यांनी त्यांची प्रार्थना केली. विष्णुने देवांना आश्वासन देऊन आपापल्या स्थानी जाण्यास सांगितले.

त्यावेळी द्रविड देशामध्ये सत्यव्रत या नावाचा एक मोठा राजा होता. तो राजर्षि असून अत्यंत पवित्र व सदाचरणी होता, एके दिवशी भागिरथीचे काठी तो स्नान संध्या करीत असता सूर्याला अर्ध्य देण्यासाठी हातात पाणी घेऊन उभा राहिला. तो आकाशातून एक लहान मत्स्य त्याच्या हातात पडला. त्याने तो मत्स्य भागीरथीच्या ओघात सोडून दिला. तेव्हा तो मासा त्या राजर्षिला म्हणाला,' हे सत्यव्रता या भागिरथीमध्ये मोठमोठाले मासे आहेत ते मला खाऊन टाकतील. त्याकरिता ज्या पाण्यात मासे नसतील अशा पाण्यात मला सोड.' मत्स्याचे बोलणे ऐकून सत्यव्रतास त्याची दया आली व त्याने तो मासा आपल्या कमंडलूत ठेवून तो पुन्हा संध्या तर्पण करू लागला. थोडा वेळ गेला नाही तोच तो मासा सत्यव्रताला त्या कमंडलूतून म्हणाला, हे सत्यव्रता, मला हा कमंडलू पुरेनासा झाला आहे तर लवकर मला मोठ्या पाण्यात सोड. सत्यव्रत कमंडलूत पाहू लागला. तो खरोखरच मासा थोडा मोठा झाला असून कदाचित कमंडलूही फुटेल असे त्याला वाटू लागले. तेव्हा सत्यव्रताने तो मासा त्यातून काढून एका लहानशा कुंडात सोडला पण तेथेही तो इतका मोठा झाला की ते कुंड त्याला पुरेनासे झाले. तो पुन्हा सत्यव्रताला म्हणाला, मला येथून काढून एखाद्या सरोवरात टाक. त्याप्रमाणे सत्यव्रताने तो मासा त्या कुंडातून काढून एका सरोवरात सोडून दिला. पण तेथेही तो पूर्वीप्रमाणे मोठा झाला वते सरोवरही त्यास पुरेनासे झाले. त्याने मोठ्या सागरात सोडण्याविषयी त्यास विनंती केली. तेव्हा सत्यव्रत म्हणाला, 'बा मत्स्या, तुझा एवढा प्रचंड देह उचलण्याला मी अगदी असमर्थ आहे.' हे ऐकून मासा म्हणाला,' हे राजा सत्यव्रता, मला उचलले असता मी एका कणाप्रमाणे हलका लागेन. मला उचल व समुद्रात नेऊन टाक. त्या माशाचे मनुष्याप्रमाणे ते अस्खलीत बोलणे ऐकून व क्षणात त्याचा विस्तीर्ण झालेला देह पाहून हा मासा काही विलक्षण शक्तिसंपन्न प्राणी आहे असे सत्यव्रतास वाटले व माशाच्या विनंतीवरून त्याने त्याला सागरात नेऊन सोडले. तेव्हा तो मासा सत्यव्रताला म्हणाला,' सत्यव्रता, आता प्रलयकाळ अगदी जवळ आलेला आहे. ही सर्व पृथ्वी सर्व प्राणिमात्रासह पाण्यात बुडून जाईल. परंतु मजकरिता तू फार श्रम घेतले आहेस म्हणून प्रलयकाळी तू माझे स्मरण कर म्हणजे मी तुझे रक्षण करीन!' इतके सांगून तो मासा त्या सागरात गुप्त झाला. मासा समुद्रात गुप्त होताच समुद्राचे पाणी मर्यादा सोडून वाढू लागले व अमर्याद तुफान सुरु झाले. इकडे तो मासापाण्यात गेल्यावर हयग्रीव शंखरूपाने देह घेऊन लपून बसला होता त्याचा शोध करू लागला. मत्स्याने सर्व समुद्र धुंडाळून शंखासुराला पकडले व आपल्या तीक्ष्ण दातांनी त्याचे

शरीर क्षतांकित केले. हयग्रीवही अत्यंत प्रबळ व युध्दविद्येत निपूण होता. त्या प्रचंड माशाच्या तडाक्यातून सुटून तो उलट त्याच्यावर प्रहार करू लागला. दोघांचे तुंबळ युध्द झाले. शंखासुर आटोपत नाही असे पाहून युक्तीने कार्यभाग साधण्याचा प्रभुने विचार केला. तो त्या शंखाला म्हणाला, 'हे हयग्रीवा तुझे शक्ति सामर्थ्य पाहून मी तुजवर प्रसन्न झालो आहे, तर तुझी जी इच्छा असेल ते माग.' तेव्हा राक्षस म्हणाला, 'अरे दरिद्र्या तू मला काय देणार? मीच तुला जे मागशिल तेदेण्यास तयार आहे. तुझी इच्छा असेल ते माग.' मत्स्याला तेच पाहिजे होते त्याने त्याचे भाष्यदान घेऊन त्याचे मरण कशात आहे ते विचारले, तेव्हा अभिमानाने अंध बनलेला हयग्रीव म्हणाला माझ्या उदरात दात टोचला म्हणजे माझा मृत्यु होईल. ते ऐकताच माशाने आपला तीक्ष्ण दात त्याच्या पोटात टोचला त्याबरोबर त्याचे पोट फाटले व त्यातून वेद बाहेर पडले. वेद बाहेर पडताच ते त्या माशाला म्हणाले, 'हे मीना, तू तर साक्षात नारायण आहेस. मत्स्यरूप धारण करून तू आमची सुटका केलीस याबद्दल आम्ही तुझे अत्यंत ऋणी आहोत.' मग विष्णु त्या शंखाला म्हणाले, शंखा, ह्या वेदाच्या सहवासामुळे तुझे तमोगुण जाऊन तू ब्राह्मण झाला आहेस. परीस लोखंडाला लागताच लोखंडाचे जसे सुवर्ण होते, काष्टे वेदमंत्रांनी अभिमंत्रीत केली म्हणजे समिधा होतात, त्याप्रमाणे तू वेदांच्या सहवासामुळे पवित्र झाला आहेस. याकरिता तुला तुझ्या या अंतसमयी काही मागायचे असल्यास माग.' आपणास मारणारा मासा प्रत्यक्ष प्रभु लक्ष्मीपति आहे असे पाहून हयग्रीव म्हणाला, 'हे देवाधिदेवा श्रीहरी तू प्रसन्न झाला आहेस तर मजकडून प्रत्यही सेवा घेत जा. तुला स्नान घालण्याचा अधिकार मलाअसावा एवढेच माझे मागणे आहे.' शंखासुराचे मागणे श्रीविष्णूने संतोषाने कबूल केले व असा वर दिला की, 'विष्णुची पूज़ा करण्यापूर्वी शंखाची पूजा करावी. नंतर शंखपात्राने देवाला स्नान घालावे, असे जे करणार नाहीत त्याची पूजा मला पावणार नाही. तसेच मी तुला भूषण म्हणून नेहमी आपल्या हातात वागवीन.' नंतर विष्णुने त्याच्या कंठाजवळची अस्थि काढून हातात धारण केली.

विष्णुने तो शंख वाजविला तेव्हा पृथ्वीवर मोठा प्रलय झाला. नद्या उलटच्या वाहू लागल्या. पर्वत डळमळू लागले व समुद्र खवळून भयंकर तुफान सुरु झाले तेव्हा सत्यव्रत राजर्षिने माशाचे स्मरण केले. त्याबरोबर विष्णूने एक मोठी प्रचंड नाव त्याच्याकडे पाठवून दिली. ती नौका पाहून त्याला आनंद झाला व तो त्या नौकेत जाऊन बसला. नौकेत बसल्यावर पाहतो तो नौकेमध्ये पृथ्वीवरील प्राण्यांपैकी

एकेक प्राणी आहे असे त्यास दिसले. त्या सर्व प्राण्यांना पाहून हे पुढील सृष्टीच्या उत्पत्तिसाठी भगवंताने राखून ठेविलेले आहेत असे जाणून त्या सत्यव्रताला समाधान वाटले. इतक्यात समुद्रात पुन्हा भयंकर तुफान सुरु झाले व ती नाव डोलू लागली. तेव्हा सत्यव्रताने पुन्हा माशाचा धावा केला. त्यावेळी मत्स्याने आपल्या दाताने ती नाव धरून स्थिर केली व भगवान विष्णु चतुर्भुजस्वरूप धारण करून सत्यव्रतापुढे उभे राहिले. भगवंताची ती परम दैदिप्यमान मूर्ति पाहून सत्यव्रताला फार आनंद झाला व त्याने विष्णुच्या चरणावर अनन्यभावाने लोटांगण घातले. नंतर विष्णुने त्यास मत्स्यस्वरूप धारण करण्याचे कारण सांगून त्याचे समाधान केले व त्यास वैकुंठलोकी नेले.

भगवान विष्णुने अतिशय अल्पकाळात हा अवतार धारण केलेला आहे. अगदी अल्पकाळात ''क्रुंभनाड'' मार्गाने पाताळात प्रवेश करून सातही पाताळांचा घाट उतरून भगवंतांनी या ब्रह्मांडाच्या तळाशी संचार केला. ज्याठिकाणी सप्तसमुद्राचे मूळ असून भगवान शंकराच्या त्रिशुलाचे जेथे रोपण केलेले आहे आणि संपूर्ण पृथ्वीला आधारभूत असलेल्या मेरू पर्वताचे मूळ जेथे विस्तारलेले आहे अशा त्या संपूर्ण प्रदेशाचा भेद त्यांनी समजून घेतला. अष्टकुल पर्वताचा भक्कम पाया घालून नारायणाने त्यावर मेरूचे आरोपण केलेले आहे आणि पृथ्वीला त्याचा मुख्य आधार देऊन प्रकृतिबंधाने या अखिल विश्वास स्थिर केलेले आहे. तीनही कल्पामध्ये भगवंताने याच मार्गाने जाऊन मत्स्य अवतार धारण करून ब्रह्मदेवाचे वेद शंखासुरापासून काढून आणलेले आहेत. त्या वेदांच्या साहाय्याने तीनही कल्पातील जीवात्म्यांचा उध्दार केलेला आहे. भगवंतांनी ज्या ज्या सद्भक्तांना वचन दिलेले आहे, त्या सर्वांचे वचन पूर्ण करून उध्दार केला म्हणून सद्गुरु महाराज सांगतात की, हे जीवात्म्यांनो तुम्ही सुध्दा भगवंताला दिलेले वचन सांभाळून त्याप्रमाणे त्याची भक्ती करून मुक्त व्हा. ब्रह्मदेवाचे वेद परत आणून देताच सर्वत्र ज्ञानरूपी प्रकाश पसरला. सूर्योदय होऊन अंधार नाहीसा व्हावा व जगतात सर्वत्र नवचैतन्य यावे त्याप्रमाणे संपूर्ण जगातील प्राणिमात्रांचे ठायी असलेला अज्ञानरूपी अंध:कार नाहीसा होऊन सर्वत्र ज्ञानसाधना, ध्यान, तपाचरण, यज्ञानुष्ठान वगैरे अनेकानेक मार्गांनी मानव जीवन समृध्द होत गेले. मानव समाज उन्नत झाला. सर्वत्र ब्रह्माची उपासना, विष्णुची भक्ति आणि महेश व शक्ति वगैरे सर्व देवदेवतांचा जयजयकार झाला. संपूर्ण सुरशक्ति बलसंपन्न-ज्ञानसंपन्न होऊन असुरशक्ति क्षीण झाली. ब्रह्मदेवांनी भगवान विष्णुचा मानसन्मान षोडशोपचारे पूजा अर्चा करून

केला व मत्स्य अवताराबद्दल कुतुहलवश विचारणा केली की आपण जो मत्स्याचा अवतार धारण केला त्याचे स्वरूप कशाप्रकारचे होते ते मला कथन करावे. (श्लोक ९९२-१००७)

श्रीहरीने ब्रह्मदेवास व इतर सर्व देवगणास उद्देशून म्हटले,' मी शंखासुराचे पाठोपाठ त्याजजवळून वेद आणण्याकरितां धावत गेलो तेव्हा अनेकानेक स्वरूपे धारण केली.' मनधर' असे माझे नाव असल्याने मनात ज्या प्रकारची धारणा करावी तशाप्रकारचे माझे स्वरूप होत होते. जेव्हां शंखासुर शंखोदर बेटात जाऊन शंखावतीच्या उराशी दडून बसला तेव्हा नाईलाजाने मला तीक्ष्ण दंत असलेल्या मत्स्याचे रूप घ्यावे लागले. तेव्हा माझे असे विलक्षण स्वरूप होते की, प्रथम सवा हाथ लांबीचा माझा देह होता. रक्तवर्ण डोळे व शुक्लवर्ण पंख होते आणि निलमण्याप्रमाणे अत्यंत चकचकीत असे मला दोन दात होते. जेव्हा मी त्या शंखासुराला प्रत्यक्ष पकडण्याकरिता धावलो तेव्हा अत्यंत विशाल असे स्वरूप धारण केले ते पाहून तो शंखाचे कवच धारण केलेला असूर थरथर कापू लागला व दोन्ही हात जोडून तो मला शरण आला म्हणून मी कृपाळू होऊन त्याला अभय दिले व सांगितले,' हे शंखवा, तुझ्याजवळ जी निगम वेदवाणी आहे ती फक्त मला काढून दे.' तेव्हा त्याने सांगितले की ती माझ्या पोटात असल्याने तुझ्या दातांनी पोट चिरून काढून घे. त्याप्रमाणे करून मी ही वेदवाणी परत आणलेली आहे. दैत्य त्या वाणीच्या संगाने सत्वबुध्दिशाली झालेला असल्याने तो वारंवार माझी स्तुति करूं लागला. म्हणून त्याला मी मुक्त करून त्याचा कंठनाळ हा आणलेला आहे. तो भगवान शंकराने प्रेमाने आपल्या हातात धारण केलेला आहे. संपूर्ण इंद्रियांचा स्वामी जो आत्माराम तोच अजामिढ (अज म्हणजे इंद्रिये व मिढ म्हणजे स्वामी) होय. त्याचा जप म्हणजे अजंपाजाप करून तो शंखासुर मुक्त झाला. त्याची आत्मज्योत माझ्या स्वरूपात येऊन मिळाली. असा माझा हा अवतार येथे पूर्ण झाला व माझे अवतार कार्य संपले. (श्लोक १००८-१०३२)

अशी दिव्य अगम्य वाणी उच्चारून भगवान विष्णू अंतर्धान पावले व त्यांनी धारण केलेल्या देहाचे विसर्जन झाले. त्याची लौकिक माता शंखावती, पिता प्रेमऋषि, शक्ति म्हणजे स्त्री चंद्रिकादेवी असून गुरु मानधाता, प्रगट होण्याचे स्थान हंसपूर असून क्षेत्र द्वारामती होय. शंखासुर दैत्याचा संहार करून सव्वाकोटी सद्भक्तांबरोबर रूख्मांगदाचा उध्दार केला. सप्तपाताळातील राजांना वरदान देऊन वेद परत आणून

सर्वत्र सत्‌धर्माची स्थापना करून ऋग्वेदानुसार प्रचलित युगधर्माची रचना केली. ऋग्वेदाचे प्रधान तत्व 'प्रज्ञानमानन्दं ब्रह्म' असे असून सत्‌धर्म तत्वानुसार सुवर्णकलश पाटाची उपासना, कुंजरदानाचे प्राधान्य, वनदागाचे प्राबल्य व एकादशी व्रतपालनाचे माहात्म्य वर्णिलेले आहे. एकादशी व्रताचरणाकरिता ज्या सद्भक्ताने आपले जीवन सर्वस्व पणास लावले अशा राजा रूख्मांगदाचे चरित्र आता श्रवण करावे. (श्लोक १०३३-१०३९)

## ★ सद्भक्त राजा रूख्मांगदाचे आख्यान ★

अतीप्राचीन काळी कांतिनगरात सूर्ववंशी रूख्मांगद नावाचा एक उदारचरित पुण्यश्लोक व धर्मज्ञ राजा राज्य करीत होता. त्याची श्रीहरीवर एकनिष्ठ भक्ति असून तो नेहमी श्रीहरीच्या भजनपूजनात मग्न असे. त्याच्याप्रमाणे त्याची स्त्री संध्यावली ही सुध्दां अत्यंत पुण्यशील असून श्रीहरीची व्रते भक्तिभावाने करीत असे. त्या रूख्मांगद राजाला धर्मांगद नावाचा एक पुत्र होता. तोही बापाप्रमाणे धर्मरत असून कल्पवृक्षालाही लाजवील असा उदार होता. यथा राजा तथा प्रजा या न्यायाप्रमाणे त्या राजाची प्रजाही भगवद्भक्त होती व सर्वत्र हरीनामाने ते शहर दुमदुमलेले असे.

त्या राजाचे उपवन अत्यंत भव्य व सुंदर असून मधुर फलपुष्पांनी बहरलेले असे. तो रूख्मांगद राजा रोज प्रभातकाळी उठून स्नानसंध्या करून एकलक्ष पुष्पे श्रीहरीला अर्पण करीत असे. हे वर्तमान नारदाकडून इंद्रास कळले. तेव्हा इंद्रास आश्चर्य वाटून त्याने आपले दूत विमानात बसवून कांतिनगराच्या उपवनातील फुले तोडण्यासाठी पाठवून दिले. आज्ञेप्रमाणे दूतांनी कांतिनगराच्या उपवनातील पुष्कळ फुले तोडून आणून इंद्रापुढे ठेविली. ती अप्रतीम फुले पाहून इंद्राला फार आनंद झाला व त्याने आपल्या दूतांना प्रत्यही प्रभातकाली कांतिनगरास जाऊन तेथील सर्व फुले तोडून आणण्याची आज्ञा केली.

कांतिनगरातील फुले याप्रमाणे स्वर्गात जाऊ लागल्याने लोकांना देवाच्या पूजेसाठी फुले मिळेनासी झाली. राजाने आपल्या माळ्यांना बोलावून विचारले तेव्हा माळ्यांनी कोणीतरी अज्ञात चोर विमानात बसून बागेत येतात व फुले तोडून पुन्हा विमानात बसून पळून जातात असा प्रकार कळविला. हे ऐकून राजाला फार आश्चर्य वाटले. त्यांना पकडण्यासाठी राजाने दूतांना आज्ञा केली. कांहीतरी युक्तिप्रयुक्तीने ते चोर पकडण्याचे त्यांनी ठरविले. विमानाचे खाली वांग्यांच्या लाकडांचा धूर केला असता

विमान खाली पडते असा शोध राजाच्या माळ्यांना लागताच त्यांनी वांग्यांच्या वेलींची लाकडे पेटवून त्याचा धूर विमानाचे खाली केला. त्याबरोबर ते इंद्राचे विमान पृथ्वीवर पडले व राजाच्या माळ्यांनी त्या देवदूतांना धरून राजापुढे नेऊन उभे केले.

दूतांच्या त्या दिव्य व सुंदर आकृती पाहून राजाला फार आश्चर्य वाटले. त्याने त्या दूतांना बसावयास आसने देऊन तुम्ही कोण कोठले वगैरे प्रश्न केले. तेव्हा इंद्राचा दूत म्हणाला,'राजा आम्ही इंद्राचे सेवक असून ही फुले देवेन्द्राच्या आज्ञेप्रमाणे स्वर्गात नेत होतो.' हे ऐकून रूख्मांगद राजाला आपली फुले स्वर्गात देवाच्या मस्तकावर जाऊन पडतात याबद्दल फार धन्यता वाटली. मग त्याने त्या दूतांना अलंकार वस्त्रे वगैरे देवून त्यांचा योग्य तो सत्कार केला व कांही फुले आम्हास देवपूजेसाठी ठेवित जा आणि काही घेऊन जात जा असे सांगून रूख्मांगदाने इंन्द्रदूतांना निरोप दिला.

ते दूत राजाला म्हणाले, 'राजा रूख्मांगदा खरोखर तू धन्य आहेस. आम्ही जातो पण आता आमचे विमान चालणे अशक्य झाले आहे. ते पृथ्वीस लागल्याने पृथ्वीवरील पापपरिमळाने दूषित झाले आहे. कोणी एकादशी व्रताच्या उपवासाचे पुण्य देईल तर हे भूमिवरून वर जाईन.' दूतांचे भाषण ऐकून रूख्मांगदास फार आश्चर्य वाटले. त्याला एकादशीचे व्रत काय असते व ते कसे केले जाते हे त्यावेळेपर्यंत माहित नव्हते. म्हणून राजाने त्या दूताला व्रताविषयी विचारपूस केली कीं,' एकादशीचे व्रत म्हणजे काय व त्याची उत्पत्ति कशी ते आपण मला सांगावे.'

इंन्द्राचा दूत म्हणाला, ''राजा कुश राक्षसाचा मुरु या नावाचा एक बंधू होता. कुशाला श्रीहरीने मारल्यामुळे मुरुला त्याबद्दल फार कोप आला व तो विष्णुचा नाश करण्याचा प्रयत्न करू लागला. मुरु राक्षसाने कैलासपतीची कित्त्येक वर्षे तपश्चर्या करून त्याला प्रसन्न केले व त्याच्याकडून असा वर मिळविला कीं, मला पुरुषाच्या हाताने मरण येऊ नये. महादेवाकडून असा वर मिळाल्यावर तो मुरु राक्षस अत्यंत उन्मत्त होऊन विष्णुला त्रास देऊ लागला. त्याचा नाश करण्याकरिता विष्णुने त्याबरोबर दहा सहस्त्र वर्षे युध्द केले. शेवटी युध्दामुळे झालेला शीण प्रभूनी श्वास मार्गाने बाहेर टाकून अरण्यात निद्रीस्त झाले. प्रभुने टाकलेल्या त्या श्वासापासून एक सुंदर कन्या उत्पन्न झाली. तिने पांढरे शुभ्र वस्त्रे परिधान केली असून तिला चार हात होते. एका हातात तलवार, एका हाती ढाल व दोन हातात धनुष्य बाण अशी

तिची आयुधे होती. विष्णु तेथे निद्रीस्त झाल्यावर त्यांच्या मागोमाग तो मुरुदैत्य त्यांना त्रास देण्यासाठी आला पण इतक्यात ती स्त्री त्या दैत्याला आडवी झाली व तिने त्या राक्षसाबरोबर युध्द करून त्याचा नाश केला. त्यावेळी सर्व देवांना आनंद होऊन त्यांनी त्या स्त्रीवर पुष्पवृष्टी केली. त्यादिवशी एकादशी असल्यामुळे त्या स्त्रीला एकादशी असे म्हणू लागले. भगवंतही तिला पाहून प्रसन्न झाले. ती प्रभुला म्हणाली,'हे अनंता, तुझी भक्ति वाढावी आणि माझी किर्ती व्हावी असा मलाकाही वर दे.' तेव्हा भगवंताने 'जो एकादशीचे व्रत करील त्याला वैकुंठलोकाची प्राप्ति होईल.' असा वर दिला. तेव्हापासून हे एकादशीचे व्रत चालले आहे. शिवाय गुरुवारच्या दिवशी एकादशी असतांना क्रतायुगाला सुरुवात झालेली असल्यामुळे ती या युगाची युगतिथी म्हणून प्रसिध्द असे महान व्रत आहे. हे व्रत करण्याची रीत अशी आहे की, दशमीचे दिवशी एकभूक्त राहून एकादशीचे दिवशी पूर्ण निरशन करावे व द्वादशीचे दिवशी प्रभातकाळी पाच घटिका दिवसास भोजन करावे.'' अशी कथा सांगून इंद्रदूत म्हणाला, 'राजा, असा कोणी एकादशी करणारा असेल तर त्याच्या स्पर्शाने हे विमान चालू होईल.

रूख्मांगदाचे राज्यातच काय पण संपूर्ण पृथ्वीवर त्यावेळी हे व्रत कोणीही करणारा नसल्यामुळे राजाने असा कोणी मनुष्य येथे मिळणार नाही असे सांगितले. तेव्हा इंद्रदूत म्हणाला, 'राजा आजची द्वादशी कालची एकादशी होती. जर कोणी काल कांही कारणाने उपवासी राहिला असेल व त्याने अद्यापपर्यंत भोजन केले नसेल तर त्याच्या हाताच्या स्पर्शाने देखिल विमान चालू होईल. राजाने त्याप्रमाणे नगरात शोध करण्यास आपले अनेक सेवक पाठविले. तेव्हा एक स्त्री पति रागावल्यामुळे दशमीचे सायंकाळपासून द्वादशीचे सकाळपर्यंत सुध्दा उपवासी होती, तिला घेऊन एक सेवक राजाकडे आला. राजाने तिला समज देऊन ते पुण्य खर्ची घालावयाला सांगून विमानास हात लावण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्या स्त्रीने विमानाला हात लावताच विमान एकाएकी वर उडाले व आकाशमार्गाने स्वर्गी निघून गेले. हा चमत्कार पाहून राजाचे हृदयात एकादशी व्रताविषयी श्रध्दा उत्पन्न झाली व ते व्रत आपले राज्यात सर्वांनी करावे असा त्याने नियम केला.

रूख्मांगदाचे राज्यात एकादशीचे व्रत सुरु होऊन काही वर्षे झाल्यावर यमाचा कुंभीपाक रिकामा पडला. जो कोणी रूख्मांगदाच्या राज्यात मृत्यूवश होई, त्याला विष्णुचे दूत उचलून वैकुंठी नेऊ लागले. हा प्रकार बघून देवांना मत्सर उत्पन्न झाला व त्या व्रताचा भंग

करण्याकरिता इंद्राने ब्रह्मदेवाची मानसकन्या मोहिनी हिला रूख्मांगद राजाकडे पाठविले. ती अनुपमेय सुंदर स्त्री पाहून राजाला मोह उत्पन्न झाला व ती कुमारिका आहे असे समजताच तिजबरोबर लग्न करण्याची इच्छा राजाने दर्शविली. राजा विकारवश झाला आहे असे पाहून मोहिनी म्हणाली - 'राजा मला जो भाष्यदान देईल त्याबरोबर मी लग्न करीन असा माझा निश्चय आहे. तेव्हा तू माझे सांगितल्याप्रमाणे वागण्याचे कबूल करीत असल्यास मी तुजबरोबर विवाह करते.' राजाने तिला तिच्या म्हणण्याप्रमाणे वागेन असे भाष्यदान दिले व तिजबरोबर विवाह केला. त्या तारूण्यलतिकेच्या सहवासात मग्न झाल्यामुळे राजाला एकादशी व्रताचा विसर पडला. तो अक्षय्य मोहिनीचे महालात बसून ऐषआराम करू लागला. मात्र त्या राजाचा मुलगा धर्मांगद एकादशीचे व्रत नियमाने करून आपल्या सर्व प्रजाजनाकडूनही करवीत असे.

अशारितीने शत संवत्सर गेल्यावर एका दशमीचे दिवशी दुपारी मोहिनी उत्तम प्रकारचा तांबूल तयार करून तो राजाच्या हाती देत असता दवंडी देणारा रस्त्यातून ओरडला, 'ऐका लोकहो, ऐका आज दशमी आहे. तेव्हा सर्वांनी एकभूक्त राहावे. उदईक एकादशी आहे तर उद्या कोणीही अन्न ग्रहण करू नये. सर्वांनी निरशन करावे. गुरांना गवत, पक्षांना दाणे, आणि लहान मुलांना मातेने स्तनपान देखील करू नये.' राजाने ते शब्द ऐकताच त्यास व्रताची आठवण झाली व आपण आजवर जे व्रत केले नाही याबद्दल त्याला फार पश्चाताप वाटू लागला. त्याने हातातील विडा फेकून दिला आणि तो पलंगावरून उठून खाली बसला तेहा मोहिनी म्हणाली, 'हे राजेन्द्रा एकाएकी माझ्याजवळून उठून खाली भूमीवर कां बसलात? राजा म्हणाला, 'उदईक एकादशी आहे. ते महाव्रत मला करावयाचे आहे. तेव्हा आता मी एकभुक्त राहून द्वादशीपर्यंत भोगविलास कांही एक करणार नाही.'

हे ऐकून मोहिनी राजाला म्हणाली, 'राजा तू मला भाष्यदान दिले आहेस. तेव्हा माझ्या आज्ञे वाचून तू जर हे व्रत करशील तर मीही उपाशी राहीन.' राजाने मोहिनीच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष न देता श्रीहरीचे भजनपूजन जागरण किर्तन वगैरे करून एकादशीचे व्रत केले. दुसरे दिवशी द्वादशीचे पारणे करण्यासाठी राजाने उत्तम प्रकारच्या भोजनाची तयारी केली. त्यावेळी राजाने सहस्त्र ब्राह्मणांना भोजनाला बोलावून त्यांना सहस्त्र गाई दिल्या व दक्षिणा वगैरे देऊन त्यांचा योग्य सत्कार केला आणि नंतर आपण भोजनास बसला. स्त्रियांची जेवणाची तयारी झाली, पण

मोहिनी रागवलेली होती ती जेवणासाठी मुळीच उठेना. राणी संध्यावलीने व कुमार धर्मांगदाने तिची पुष्कळ समजूत घातली ती मुळीच ऐकेना. तिला संध्यावली म्हणाली,- 'बाई मोहिनी, पतीवर स्त्रीने रागावणे हा स्त्रीचा धर्म नसून ती नरकाची सामग्री होय. पति हेच स्त्रीचे दैवत होय. मुलाला आई-बाप, सेवकाला स्वामी, त्याचप्रमाणे स्त्रीला पति हाच देव आहे. तू व्यर्थ प्रतिद्रोह करून अळीप्रमाणे दंड भोगू नकोस.' असे म्हणून तिने तिला अळीची कथा सांगितली --

एका झाडामध्ये एक अळी पाचशे वर्षापर्यंत होती. पुढे सुताराने करवत घालून ते झाड कापले तेव्हा ती अळी त्या झाडाच्या गर्भातून बाहेर पडली. ती अळी बाहेर पडल्याबरोबर एक कावळा आला व त्याने तिला चोचीत धरून आकाशात उड्डाण केले. त्या कावळयाची नखे व चोच लागून त्या अळीला फार त्रास होऊ लागला.तेव्हा ती त्या कावळ्याला म्हणाली, 'बा, कावळ्या, तू कां माझा छळ करतोस? त्यावेळी कावळा म्हणाला, - 'बाई अळी, मी यमाचा किंकर असून त्याच्या आज्ञेप्रमाणे तुला त्रास देत आहे. हे एवढे कष्ट तू पतिद्रोहामुळे भोगीत आहेस. तू पूर्वी ब्राह्मणाची स्त्री होतीस. तुझा पति काशी देशाचा राहणारा होता. तो जुगारी असल्यामुळें त्याने एकदा द्यूतात सर्व द्रव्य गमावले. तेव्हा द्युतातील इतर लोक त्याच्याजवळ पैसे मागू लागले, पण पैसा नसल्याने तो आपल्या देणेकऱ्यांना तुझ्याकडे घेऊन आला व तुझ्या अंगावरील दागिने दे असे म्हणू लागला. पण तू त्याला दागिने न देता म्हणालीस, हे सर्व दागिने माझ्या माहेराचे आहेत. पतीची अशी फक्त गळसरी आहे. ती घ्या असे म्हणून तू ती गळसरी रागाने तोडून टाकलीस. तेव्हा त्या देणेकऱ्यांनी तुझ्या पतीला फार मारले. तरी तुला त्याची दया आली नाही. पुढे तुझा पति त्या सावकाराच्या भयाने अरण्यात पळून गेला. तेथे त्याची व एका राजकन्येची गाठ पडली. ती राजकन्या काशी राजाची असून ती झोपेत असता एका राक्षसाने तिला दुष्टबुध्दिने अरण्यात पळवून आणले होते. तो राक्षस निद्रिस्त असता ती राजकन्या सुटकेचा मार्ग शोधत होती, इतक्यात तुझा पति तिच्या दृष्टीस पडला. तेव्हा ती त्याला म्हणाला, हे ब्राह्मणा,या राक्षसाचा नाशकरून तू माझा स्विकार कर. राजकन्येच्या त्या विनंतीप्रमाणे तुझ्या पतीने त्या राक्षसाचा त्रिशुळ घेऊन नाश केला व राजकन्येचा स्विकार केला. पुढे ती राजकन्या तुझ्या पतीला आपल्या बापाकडे घेऊन आली व त्याला तिने झालेली सर्व हकीकत सांगितली.

राजाने तुझ्या पतीचा सत्कार करून राजकन्येबरोबर त्याचे लग्न लावून दिले व आपले सर्व राज्य जावयास दिले. पुढे तुझ्या पतीने तुला आपल्याजवळ आणून तुझी बरदास्तही राणीप्रमाणेच ठेवली. काही दिवसांनी तुला मरण प्राप्त झाल्यावर यमदूतांनी तुला नरकात नेऊन टाकले. तेथे तुझा अत्यंत हालअपेष्टा झाल्यावर मग तुला बेडकुळीचा जन्म प्राप्त झाला. ह्या स्थितीत तू शंभर वर्षे हालअपेष्टा भोगल्यावर तुला एका कावळ्याने मारले. नंतर तू ह्या अळीच्या जन्मास आलीस. आता यापुढे तुला कोणती शिक्षा होणार व कोणता जन्म प्राप्त होणार हे माहिती नाही.' असे सांगून तो तिला यमलोकी घेऊन गेला.

राणी संध्यावलीने मोहिनीला अळीचे उदाहरण देऊन पुष्कळ उपदेश केला. परंतु मोहिनीने तिकडे मुळीच लक्ष दिले नाही. ती राजावर क्रुध्द होऊन म्हणाली,'राजा तू मला भाष्यदान दिले आहेस. त्याप्रमाणे या एकादशीच्या व्रताचा त्याग कर किंवा ते व्रत तुला सोडायचे नसल्यास तुझा मुलगा जो धर्मांगद त्याचे शिर मला दे, आणि त्या दोन्हीही गोष्टी तुला पसंत नसतील तर मी तुझ्या घरी अन्नग्रहण करणार नाही.' मोहिनीचे ते निर्वाणीचे उद्‌गार ऐकून राजा मोठ्या संकटात पडला. त्याला त्यावेळी काय करावे ते सुचेना. मुलाचा वध करावा तरी ते अनिष्टच आहे. बरे, व्रत सोडावे तर नरकाची प्राप्ति होणार, अशा अडचणीत राजा सापडला असता त्याचा मुलगा धर्मांगद राजा पुढे आला राजाला म्हणाला, 'बाबा, माझे शिर मी मोहिनीमातेला देण्याला आनंदाने तयार आहे, पण आपण एकादशीचे व्रत कदापि सोडू नये. बापासाठी मुलाने आपले प्राण खर्ची घालणे यात विशेष असे कांहींच नाही, पित्याच्या कार्याकरितां माझ्या या शरीराचा उपयोग झाल्यास त्यात माझे कल्याणच आहे.' पुत्राचे हे बोलणे ऐकून राजाने व्रताचे रक्षण करण्याचा निश्चय केला व पुत्र वधास तयार झाला.

राजा मोहिनीला म्हणाला, 'मोहिनी, हा माझा धर्मांगद पुत्र मी माझ्या व्रताचे संरक्षण करण्यासाठी तुझ्या स्वाधीन केला आहे. तू याचे शिर तोड अथवा काहीही कर.' तेव्हा मोहिनी म्हणाली, 'राजा, ज्याला भोजनाला बोलावतात त्याला कोणी शिधा घेऊन जा असे सांगत नाही, किंवा देवाच्या पूजेसाठी देवालाच कोणी फुले घेऊन या असे सांगत नाही. तुला जर आपले व्रत राखावयाचे असेल तर स्वत:च्या हाताने मुलाचे शिर कापून ते मला दे.' मोहिनीच्या इच्छेप्रमाणे राणी संध्यावलीने राजाला व्रतासाठी पुत्रवधास अनुमति दिली. तिने मुलाला अभ्यंग स्नान घालून गळ्यात तुळशीच्या माळा घातल्या व त्याला राजासमोर आणून उभा केला.

धर्मांगदाने आईबापाच्या चरणावर मस्तक ठेवून जन्मोजन्मी संध्यावली सारखी आई व रूख्मांगदासारखा बाप मिळावा अशी श्रीहरीची विनंती केली व तो बापापुढे मान नमवून उभा राहिला. राजाने म्यानातून तलवार काढून ती स्वच्छ पुसली व धर्मांगदाचे मानेवर घालणार तोच रूख्मांगदाचे हात मागून कोणी धरले. सर्व लोक पाहतात तो शंखचक्र, गदा, पद्मधारी भगवान विष्णु साक्षात आहेत. त्या एकादशीच्या व्रतामुळे त्यावेळी नगरातील सर्व आबालवृध्दांना श्रीहरीचे दर्शन झाले. इतक्यात वैकुंठातून हजारो विमाने आली व त्या विमानात श्रीहरीनी सर्वांना बसवून वैकुठास नेले. मागेफक्त मोहिनी तेवढी राहिली.

या एकादशीच्या व्रतामुळे सर्व कांतिनगराचे लोक सदेह वैकुंठास गेले. तो प्रकार पाहून इंद्रादि देवांची मोठी फजिती झाल्यासारखे झाले. त्यांनी मोहिनीला स्वर्गात नेण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण पतिद्रोहाच्या पातकामुळे ती देवलोकी जाण्यास असमर्थ झाली. पुढे त्या मोहिनीला नरक यातना प्राप्त झाल्या व ती त्या भयंकर नरकात कीटक होऊन पडली. स्वत: यमाने व इंद्राने तिला देवलोकाहून पाठवून तिची अशी दशा केली होती पण त्यांना तिची सुटका करता येईना. तेव्हा ते विष्णूकडे गेले व तीची सुटका करा म्हणून म्हणू लागले. पण विष्णुनेही ती गोष्ट अशक्य आहे असे सांगून त्यास रूख्मांगदाकडे जाण्यास सांगितले. त्याप्रमाणे यम, इंद्र वगैरे देव रूख्मांगदाकडे गेले व मोहिनीच्या सुटकेविषयी विनविले. रूख्मांगदाने एका एकादशीचे पुण्य देऊन त्या मोहिनीची नरकातून सोडवणूक केली असे या एकादशी व्रताचे माहात्म्य आहे व भक्त रूख्मांगदाचे चरित्र आहे.

सनातन सतपंथ संप्रदायाचे प्रवर्तक सद्गुरु इमामशाह महाराजांनी दिग्दर्शित केलेल्या युगधर्म प्रणालीनुसार पहिल्या क्रतायुगातील युगतिथी एकादशीच्या व्रत पालनाचे सामर्थ्य व महात्म्य सांगून सद्गुरु इमामशाहांनी पहिल्या मत्स्य अवताराच्या अवतारी लीलेचे वर्णन पूर्ण केले आहे. मत्स्य अवतारात वितळ पाताळातील अन्नपाल राजास दिलेले वचन पूर्ण करून भगवंताने रूख्मांगदाचा उध्दार केला. हा या करण कल्पातील क्रतायुगातला पहिला सद्भक्त होय. अशी सद्गुरु इमामशाहांनी अगम्यवाणी वर्णिलेली आहे.

॥ इति श्री मत्स्यावतार समाप्त ॥

॥ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु ॥

॥ ॐ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नमः ॥

# द्वितीय श्री कूर्म अवतार प्रारंभ

भगवान श्रीहरीची लीला अवर्णनीय आहे. सामान्यबुध्दी जीवात्म्यांना त्याचे लीलाचरित्र अनाकलनीय आहे. मत्स्यावताराचा कालावधी संपल्यानंतर कूर्म अवताराचे अवतारकार्य सुरु झाले. त्या काळात मधुकैटभ वगैरे अनेक प्रबल दैत्यांनी मेरू पर्वताच्या आश्रयाला राहून सर्व देवांना त्राही त्राही करून सोडले. त्या सुमारास देव व असूर यांच्या युध्दामध्ये असुरांनी सोडलेल्या तीक्ष्ण आयुधांचे प्रहार लागून पुष्कल देव गतप्राण होऊन पडले व ते पुन्हा उठू शकले नाहीत. तसेच एकदा दुर्वासऋषि ब्रह्मलोकात गेले असता ब्रह्मदेव व त्यांच्या गणांनी त्याची षोडशोपचारे पूजा करून त्यांचा मानसन्मान केला. ब्रह्मलोकांतून मृत्युलोकांत संचार करीत असता, स्वर्गमंडलात इंद्र ऐरावतावर बसून कोठे प्रयाण करीत आहे असे पाहून दुर्वासांनी तो देवेन्द्र म्हणून त्याच्या सन्मानार्थ गळ्यातील पुष्पमाला काढून इंद्राच्या अंगावर टाकली पण उन्मत्तपणाने इंद्राने तिचा स्वीकार न करता हत्तीच्या पायाने चिरडून टाकली. ते पाहून क्रुध्द झालेल्या दुर्वासांनी इंद्राला शाप दिला. दुर्वास मुनीच्या शापामुळे इंद्रासह तिन्ही लोक निस्तेज झाले आणि त्यायोगे यज्ञयागादि कर्मे नष्ट झाली. इंद्र, वायु, वरूण वगैरे देवांनी त्याच्या प्रतिकारार्थ निरनिराळ्या युक्त्या प्रयुक्त्या योजल्या पण गतवैभव प्राप्त होण्याच्या निश्चित असा कांहीच उपाय त्यांना सुचेना. तेव्हा ते सर्व देवगण ब्रह्मदेवाजवळ जाऊन त्यांनी सर्व वृत्तांत कथन केला. सर्व देव निर्माल्य व निस्तेज झालेले असून लोक अमंगल स्थितीस पोहोचले आहेत आणि त्यांच्या उलट असूर तेजोबलादिकांनी युक्त झाले आहेत असे पाहून ब्रह्मदेवाने एकाग्र मनाने भगवान पुरुषोत्तमाचे स्मरण केले आणि त्या श्रीहरीलाच शरण जाण्याबद्दल सर्वांना सांगितले त्याप्रमाणे त्या सर्व देवांनी भगवंताची मनोभावे स्तुति करून संकट निवारणार्थ प्रार्थना केली.( श्लोक १-१० )

भगवंतांनी संतुष्ट होऊन देवांना आश्वासन देऊन सांगितले की हे देवगणहो, आपला उत्कर्ष व उन्नति होण्याकरिता प्रथम तुम्ही दैत्य दानवांशी सख्य करा. नंतर दैत्य देवांनी मिळून अमृतप्राप्तिकरितां प्रयत्न करा. त्यासाठी आधी क्षीरसागरात वेली, गवत, औषधी, वनस्पती टाकून मंदार पर्वताची रवि करून व वासुकीचा दोर म्हणून उपयोग करून समुद्राचे मंथन करा. या कामी दैत्यांना फक्त क्लेश प्राप्त होतील

आणि माझ्या कृपेने तुम्हाला मात्र अमृत फळ मिळेल. मी सुध्दां तुमच्या साहाय्यासाठी व जगतकार्य करण्याकरितां येतोच. असे आश्वासन देऊन भगवान अंतर्धान पावले.

योग्य काळ व संधी येताच देवांनी असुरांना समुद्रमंथन करून अमृतप्राप्तीचा बेत सांगताच व शिवाय त्यामधून निघणाऱ्या इतर संपत्तीच्या लोभाने असूरगण समुद्रमंथनास आनंदाने तयार झाले. सूर व असूर दोघांनी मिळून मंदारपर्वताला बलात्काराने उपटून व मोठमोठ्याने गर्जना करीत करीत समुद्राच्या काठी नेऊ लागले. पण सर्वजण अत्यंत परिश्रमाने श्रांत झाल्याने पर्वत घेऊन जाण्यास असमर्थ झाले व त्यांनी वाटेतच टाकून दिला. पडता पडता त्या सुवर्णाच्या पर्वताने आपल्या अंगाखाली बऱ्याचशा देव दैत्यांचे चूर्ण करून टाकले. तेव्हा भगवंतांनी स्वत: प्रगट होऊन सर्वांना सजीव करून बलसंपन्न केले व गरूडाकरवी त्या मंदार पर्वताला समुद्रात टाकले. भगवान विष्णुंनी स्वत: वासुकी सर्पाला आणून त्याचे पर्वताला साडेतीन वेढेघातले व मोठ्या आनंदाने समुद्रमंथन करून अमृतप्राप्तीचा उद्योग सुरु केला. त्याप्रसंगी विष्णुने वासुकीला प्रथम मुखाकडून धरिले म्हणून देवांनीही तसेच केले. पण देवांचे हे करणे दैत्याधिपतींना आवडले नाही. ते म्हणाले, आम्ही वेदशास्त्र संपन्न असून जन्मकर्मांनी श्रेष्ठतम आहोत. आम्ही सर्पाचे पुच्छरूप हेअमंगळ अंग धरणार नाही. श्रीहरीला तेच हवे होते. त्यांनी हसत हसत वासुकीच्या तोंडाचा भाग सोडला व देवासह त्यांनी शेपटीचा भाग धरला. सर्व दैत्य सर्पमुखाकडे होऊन त्या सर्वांनी समुद्रमंथनास उत्साहाने सुरुवात केली. पण तळाशी कांही आधार नसल्याने पर्वत पाण्यात बुडू लागला. त्यावेळी अनंत पराक्रमी व सत्यसंकल्प अशा त्या श्रीहरीने मोठे अद्‌भुत असे कूर्मरूप धारण केले व पाण्यात बुडत असलेल्या पर्वताला आपल्या पाठीचा आधार दिला. तेव्हा दुसरे द्विपच की काय असे कासवाचे मोठे शरीर भगवंताने धारण करून लक्षयोजने विस्तीर्ण अशा आपल्या पृष्ठभागावर मेरू पर्वतास सावरून धरले. ह्याप्रमाणे भगवान विष्णू मंथन चालले असता देव-दैत्यामध्ये देवरूपाने आणि नागराजामध्ये निद्रारूपाने प्रविष्ट झाला. नंतर भगवान विष्णुने जणू दुसरा महापर्वतच अशा आपल्या हजार हातांनी त्या पर्वतराजाचा माथा धरून ठेविला. तो प्रकार पाहून ब्रह्मदेव, शंकर, इंद्र, इ. देवांनी त्यांची स्तुति केली व स्वर्गातून पुष्पवृष्टी केली.

अशारीतीने मोठ्या वेगाने मंथन सुरु असता वासुकीच्या मुखातून, नेत्रातून व श्वासाद्वारे निघालेल्या अग्नीच्या व धुराच्या योगाने अनेकानेक असूर जळून जाऊ लागले. तेव्हा भगवंतांनी त्यांच्यावर मेघवृष्टी केली व गार वारे वाहू लागले. ह्याप्रमाणे

देव दैत्यांच्या अधिपतींनी मंथन केलेल्या त्या समुद्रापासून जेव्हा अमृत निघेना तेव्हा भगवान विष्णु स्वत:च त्याचे मंथन करू लागले. तेव्हा सागरातून प्रथमत: अत्यंत दु:सह्य असे हलाहल विष उत्पन्न झाले.

भयंकर तीव्र आणि ज्याच्यापुढे कांहीच उपाय चालण्यासारखा नाही असे ते असह्य विष सर्व दिशांनी वरखाली उसळू लागले असता सर्व लोक व लोकपाल भयभीत झाले आणि दुसऱ्या कोणाच्यानेही आपले रक्षण होत नाही असे पाहून सर्व देव सदाशिवाला शरण गेले तेव्हा सर्व लोकांवर आलेले ते संकट पाहून महादेवाला त्याचा अत्यंत कळवळा आला. त्यांनी सर्व जगाला व्यापणारे ते हलाहल विष आपल्या ओंजळीत घेऊन पिऊन टाकले. त्या विषाने भगवान शंकराला सुध्दा आपले चांगलेच सामर्थ्य दाखविले. भगवान शंकराच्या गळ्याचा दाह होऊन तो निळा झाला पण शंकराने आत्मसामर्थ्याने ते विष पचवून टाकले, त्यायोगे सर्व देव दानव व मानव संकटमुक्त होऊन सुखी झाले.

याप्रमाणे महापुरुष बहुतकरून लोकांच्या दु:खानेच दु:खी होतात आणि त्याच्या निवृत्तिकरिता स्वत: दु:ख भोगतात कारण दुसऱ्याकरितां दु:ख सहन करणे हेच सर्वातल्या पुरुषोत्तमांचे सर्वोत्तम आराधना होय. असो. भक्तांचे मनोरथ पुरविणाऱ्या देवाधिदेव शंकराचे ते कर्म अवलोकन करून सर्व लोक पार्वती, ब्रह्मदेव आणि विष्णु ह्या सर्वांनी त्याची प्रशंसा केली. तो महादेव विषप्राशन करीत असता त्याच्या हातातून जे थोडेसे विष खाली पडले ते विंचू, सर्प, विषारी औषधी वनस्पती व इतर दंश करणारे विषारी प्राणी यांनी ग्रहण केले. शंकराने विष प्राशन केल्यानंतर संतुष्ट झालेले ते देवदानव पुन: मोठ्या वेगाने समुद्राचे मंथन करू लागले. ( श्लोक ११-२५ )

समुद्रमंथनापासून कामधेनु उत्पन्न झाली. ती अग्निहोत्राला साधनभूत असे घृतादि पदार्थ उत्पन्न करणारी असल्यामुळे ब्रह्मलोकाला पोहोचविणाऱ्या यज्ञाच्या होमद्रव्याकरितां वेदवेत्त्या वसिष्ठादि ब्रह्मर्षिंनी तिचा स्वीकार केला. उच्चैश्रवा नामक घोडा उत्पन्न झाला तो सूर्याला दिला. त्यांनतर चार दातांचा पांढराशुभ्र हत्ती ऐरावत, वृक्ष पारिजात व रंभादि अप्सरा इंद्राला देऊन त्या देवसभेला वैभवसंपन्न केले. देवलोकांचे भूषणच असा पारिजातक वृक्ष म्हणजे स्वर्गस्थ याचकांचे इच्छित मनोरथ पूर्ण करणारा कल्पतरूच होय. त्यानंतर उत्तम वस्त्रे परिधान करणाऱ्या, कंठामध्ये पदकादिक भूषणेधारण करणाऱ्या आणि सुंदर मनमोहक क्रिडा व मधुर कटाक्ष यांच्या योगाने स्वर्गात राहणाऱ्या देवांना

रमविणाऱ्या अप्सरा म्हणजे स्वर्गाचे मूर्तिमंत वैभवच होय. त्यानंतर त्या महासागरातून पद्मराग जातीचे ''कौस्तुभ'' नामक एक रत्न उपलब्ध झाले. तो मणी, सारंगधनुष्य व शंख हे भगवान विष्णुने धारण केले. नंतर विद्युल्लतेप्रमाणे आपल्याकांतीने सर्व दिशा प्रकाशित करणारी साक्षात संपत्तीच अशी भगवंतावर निष्ठा ठेवणारी लक्ष्मी उत्पन्न झाली. तिचे सुंदर रूप, औदार्य, वय आणि कांति ह्यांच्या महिम्याने मोहित चित्त झालेले सर्व देव, असूर व मानव ती आपल्याला मिळावी अशी इच्छा करू लागले. पण सर्व देव दानवांना झिडकारून लक्ष्मीने त्रिभुवनजनक अशा त्या भगवंतालाच पुष्पमाला घालून वरले. तेव्हा सर्वांनी त्या लक्ष्मीनारायणावर पुष्पवृष्टी केली. त्यावेळी लक्ष्मीने प्रजाधिपतीसह सर्व प्रजेकडे अवलोकन केले असता ते सुस्वभावादिगुणांनी संपन्न होऊन अतिशय आनंद पावले.

नंतर त्या क्षीरसमुद्रापासून जिचे नेत्र कमलाप्रमाणे आहेत अशी सुरादेवी कन्यारूपाने उत्पन्न झाली. तिचा श्रीहरीच्या अनुमतीने असुरांनी स्वीकार केला. शेवटी ज्याच्यासाठी त्यांनी अगणित मेहनत घेऊन हा समुद्रमंथनांचा खटाटोप केला होता तो अमृतकलश घेऊन धन्वंतरी प्रगट झाला, तेव्हा यथेच्छ सुरापान केलेल्या व त्यायोगे उन्मत्त झालेल्या असूरांनी त्याच्यापासून अमृतकलश हिसकावून घेतला. भगवंतांनी ते पाहून त्यांच्यात आपापसात कलह उत्पन्न होण्याची माया निर्माण केली. अमृताकरिता असूरांची मने अगदी अधीर झालेली असल्याने मी आधी पिणार तू पिऊ नको, तू हलकट आहे, तूला पिण्याचा अधिकार नाही वगैरे बडबडत परस्परांशी ते कलह करू लागले. ह्याप्रमाणे त्यांच्यामध्ये कलह सुरु झाला असतांना उपाय जाणणाऱ्या सर्वसमर्थ विष्णुने अत्यंत अद्भुत व अवर्णनीय सुंदर असे स्त्रीरूप धारण केले व चोराप्रमाणे एकमेकापासून ते अमृतपात्र हिसकावून घेत असलेल्या त्या दैत्याजवळ येऊन त्या स्त्रीने मधुर, मोहक भाषणाने त्यांचे चित्त हरण केले. व देव आणि दानव यांचा या अमृतावर सारखा अधिकार आहे. मी तुम्हाला या अमृताची सारखी वाटणी करून देते. तुम्ही देवांची व दैत्यांची वेगवेगळी रांग लावून बसा. असे सांगून देवांना अमृत देऊ लागली. त्याच झारीत दुसऱ्या बाजूने असलेल्या मुखातून दैत्यांना सूरा पाजू लागली. त्या मोहिनीचे ते अलौकिक दिव्य सौंदर्ययुक्त स्वरूप पाहून व मद्याच्या धुंदीने धुंद झालेले ते सर्व दानव उन्मत्त झाले. त्यांना त्या स्त्री सौंदर्याने वेड लावले. त्यामुळे त्यांचा विवेक सुटला पण त्या स्त्रीने आपल्या नेत्रकटाक्षाने थोपवून धरून साऱ्या देवगणांना अमृत पाजले. हे जाणून राहू नावाच्या दैत्याने गुप्त रूपाने चन्द्र-सूर्याच्या

मध्ये लपून अमृत प्राशन करू लागला. त्याचे हे कपटीपणाचे वागणे चन्द्रसूर्याच्या लक्षात आल्याने त्यांनी भगवंताला तसे सुचविले. भगवंतांनी सुदर्शनाने त्या राहूचे शिर उडविले. त्याचे धड मृत झाले. पण मुखात अमृत राहिल्याने ते मुख अमर झाले. पण त्याने आपले वैर कायम ठेवल्याने चंद्र सूर्याला गिळण्यासाठी पर्वकाळात तो त्यांच्या अंगावर धावून जातो असा समज आहे. (श्लोक २६-३८)

शेवटी साऱ्या दैत्यांनी आपणास भगवान विष्णूने मायावी रूप धारण करून फसविल्याचे जाणून ते सर्व युध्दाकरिता सिध्द झाले. मग देव दैत्यांचे मोठे युध्द झाले. त्यात देवांना नुकतेच अमृत मिळाल्याने त्यांचा सर्वत्र जय झाला. सर्व दैत्य हतबल झाले व पराभव पावले. अशा रितीने भगवंताने कूर्म अवतार धारण करून हे समुद्रमंथनाचे अद्भुत कार्य घडवून आणले आणि मधुकैटभादि दैत्यांचा संहार केला. क्रतायुगातील हा दुसरा प्रगट अवतार असून त्याचे अवतारकार्याचे प्रमाण ४,३२,००० वर्षे होय. त्याचीमाता कमळावती, पिता प्रिकमऋषि, शक्तिदेवी बेचरा, गुरु अेकाऋषि, स्थान महापूर, क्षेत्र मानससरोवर होय. परम भागवतभक्त अंबरीष राजाचा उध्दार करून भगवंताने अनेक अवतारलीला करून आपले अवतारकार्य संपविले.

क्रतायुगात कूर्म अवताराच्या अवतारक्षेत्रात सद्भक्तराजा अंबरीष झालेला असून युगतिथी एकादशीच्या व्रत पालनाकरिता त्यास अपरिमित जीवन कसोटी सहन करावी लागली त्याचा वृत्तांत संक्षिप्त रूपाने पुढे वर्णन केलेला आहे. (श्लोक ३९-४८)

## ★ सद्भक्त राजा अंबरीषाचे आख्यान ★

सत्ययुगाचे ठायी भगवंतांनी कूर्म अवतार धारण करून समुद्रमंथन घडवून चौदा रत्नांची प्राप्ति देव-दानव व मानवास करून दिली. त्यासुमारास युगतिथी एकादशीचे निर्धाराने पालन करणारा भगवद्भक्त राजा अंबरीष झालेला आहे. अंबरीष हा नाभाग राजाचा पुत्र. तो अत्यंत सुशील, दानशूर, धर्मशील व विष्णुभक्त होता. तो प्रत्येक एकादशीचे दिवशी उपवास करून व रात्री जागरण व श्रीहरीचे भजनकीर्तन करी आणि द्वादशीचे दिवशी पाच घटका दिवस आल्यावर पारणे करीत असे. याप्रमाणे त्या राजाचा एकादशी व्रताचा पुष्कळ दिवस नियम चालला होता. एकदा एका द्वादशीचे दिवशी राजाने स्नान करून पारण्याची सिध्दता केली व कोणी अतिथी अभ्यागत येईल याची वाट पाहू लागला. इतक्यात दुर्वासऋषि दृष्टीस पडले. त्यांना राजाने आज द्वादशी आहे, भोजनाची तयारी झाली आहे, तरी पारणे सोडण्यासाठी इकडेच यावे म्हणून विनंती केली. राजाची विनंती ऋषींनी मान्य केली व ते यमुनानदीवर स्नानास गेले.

इकडे दुर्वासांना यमुनेवर तर्पण देवतार्चन यास बराच वेळ लागल्यामुळे राजाची द्वादशीची वेळ होऊन गेली. आमंत्रित केलेल्या अतिथीवाचून भोजन केल्यास ते अत्यंत अनुचित होय, बरे नैवेद्य समर्पण न करावा तर व्रतभंग होतो; राजा अशा विवंचेनत पडला असता त्याच्या पुरोहिताने राजाला शालिग्रामशिलेचे तीर्थ घेवून पारणा करण्यास सांगितले. राजाने त्याप्रमाणे व्रताची सांगता केली. इतक्यात दुर्वासऋषि स्नानसंध्या आटोपून आले. आपली वाट न पाहता द्वादशी साधून घेतली असे पाहताच ऋषि संतप्त झाले वराजाला म्हणाले, राजा, तू माझी वाट न पहाता पारणा केलीस हे अत्यंत अनुचित केलेस. मुक्तीच्या आशेने तू विष्णुची भक्तिकरून हे व्रत करतोस पण या माझ्या अपमानामुळे तुला दहा वेळा गर्भवास भोगावा लागेल असा आता तुला शाप देतो.

दुर्वासऋषींचा तो शाप ऐकून राजाचे हृदय भडभडून आले. तोसद्‌गदीत स्वराने भगवंताचा धावा करू लागला. 'हे सारंगधरा, करूणाकरा, हे ऋषिकेशा, केशवा श्रीपति या ऋषिशापापासून मला मुक्त कर. तुझ्या व्रताची योग्य सांगता करीत असतांना मला ऋषीने शाप दिला आहे तर हे प्रभो, हे माझे दहा गर्भवास चुकीव.' याप्रमाणे अंबरीष राजाची भक्ति व करूणावाणी ऐकून भगवान लक्ष्मीनारायण स्वत: अंबरीष राजापुढे प्रगट झाले. ती शंख चक्र गदा पद्मधारी वैकुंठवासी श्रीपतीची सुंदर शामल मूर्ति पाहिल्यावर अंबरीषराजाच्या हृदयात प्रेमाचें भरते आले.

भगवान म्हणाले, 'हे भक्त शिरोमणी अंबरीष! तुझ्या एकादशी व्रतामुळे मी तुझा ऋणी झालो आहे. तुला या ऋषींनी दिलेला शाप चुकणे नाही, पण तुझ्या भक्तिमुळे मी प्रसन्न होऊन ते दहा गर्भवासाचे दु:ख मी स्वत: सोशीन. तू त्याबद्दल मुळीच काळजी करू नकोस. मी तुझे याच जन्मी सर्व भवपाश तोडून टाकीन.'

याप्रमाणे भगवंताने अंबरीष राजाला आश्वासन दिल्यावर दुर्वासऋषीला अधिक क्रोध आला. तो आपली जटा उपटून अंबरीष राजाचा नाश व्हावा म्हणून त्याच्या अंगावर टाकू लागला. तेव्हा भगवंतांनी सुदर्शन चक्राचे ठायी अग्नीची योजना करून ते चक्र दुर्वासऋषीच्या जटेवर सोडले. ती विलक्षण ज्वाला जटेवर आपटताच दुर्वासऋषि अत्यंत घाबरून गेला व त्या चक्राच्या भितीने पळू लागला. परंतु चक्र त्याचा पिच्छा सोडीना. तो पुढे व चक्र मागे असे एकसारखे चालले होते. शेवटी दुर्वासऋषि ब्रह्मदेवाकडे गेला व त्याला त्या चक्राचे निवारण करण्याविषयी सांगू लागला. तेव्हा

ब्रह्मदेव म्हणाला, 'हे ऋषि, श्रीपतीची शक्ति विलक्षण आहे. मी केवळ त्याचा दासानुदास असून त्याच्या आज्ञेप्रमाणे वागतो. मी या चक्राचे निवारण करण्यास अगदी असमर्थ आहे.'

ब्रह्मदेवाने असे सांगितल्यावर दुर्वास तेथून महादेवाकडे गेले. पण महादेवानेही त्यांची ब्रह्मदेवाप्रमाणेच निराशा केली. महादेवांनी असे सांगितल्यावर दुर्वासऋषि तेथून पळत निघाला ते भक्तवत्सल प्रभुकडे आला. याप्रमाणे एक वर्षभर दुर्वासऋषि त्या चक्राच्या भितीने उपवासी पळत फिरत होता. क्षुधेमुळे त्याची सर्वगात्रे शिथील झाली होती. हातातला कमंडलु गळून पडला होता. आणि हातपाय लटपट कापत होते. अशा स्थितीत लगबगीने येऊन दुर्वासाने प्रभुच्या पायाला घट्ट मिठी घातली व झालेल्या अपराधाबद्धल प्रभूची क्षमा मागितली.

दुर्वाऋषींनीं श्रीहरीचरणी मस्तक ठेऊन प्रार्थना केल्यावर भगवान म्हणाले, 'दुर्वासा, माझ्याहून माझे भक्त थोर आहेत. त्याच्या भक्तीमुळे मी त्यांचा दासानुदास होऊन त्यांची सेवा सुश्रुषा करतो. मी एवढा विराट पुरुष पण माझ्या भक्तांनी भक्तीमुळे हृदय कपाटात कोंडून ठेविले आहे. यावरून ते माझ्याहून थोर असून शक्तिशाली आहेत. भक्तीमुळे त्यांनी मला बांधून टाकले आहे, तर तू माझा भक्त जो अंबरीष त्याच्याकडे जाऊन त्याची क्षमा माग म्हणजे तो तुझी या संकटातून सुटका करील.' भगवंताने असे सांगितल्यावर दुर्वास तेथून निघाला व अंबरीष राजाकडे गेला. इकडे अंबरीष राजाही ऋषि न जेवता निघून गेला म्हणून एक संवत्सरपर्यंत उपवाशी होता. ब्राह्मणआपल्या घरातून उपवासी गेला तेव्हा तो जेवायला येईपर्यंत अन्नग्रहण करायचे नाही असा निग्रह करून अंबरीष राजा दुर्वासऋषीची मार्गप्रतिक्षा करीत बसला होता. अशास्थितीत राजा असतांना दुर्वासऋषि एकाएकी आला व राजाच्या पायावर लोटांगण घालून म्हणाला, 'हे राजा, तुला शाप दिल्यामुळे हे चक्र माझ्यामागे लागले आहे. त्याचे निवारण करण्यास तुझ्यावाचून कोणी समर्थ नाही असे भगवंताने सांगितले आहे तर या चक्राचे निवारण कर.' हे ऋषींचे शब्द ऐकून त्या राजाने त्यांना उठवून योग्य आसनावर बसविले व त्यांच्या चरणावर मस्तक ठेवून त्यांची विधीयुक्त पूजा केली. मग चक्राचे निवारण करण्यासाठी एकभूक्त सोमवारचे व एका एकादशीचे पुण्य खर्ची घालून त्या चक्राला हात जोडून राजा म्हणाला, 'हे चक्रा, तू सर्व व्यापक असून दुष्टांचा संहार व साधुंचा सांभाळ करण्याची शक्ति तुझ्या अंगी आहे. तुझ्या ठायी सर्वशक्ति एकवटलेल्या असून तू श्रीपतीचा अलंकार आहेस. आता

या दुर्वासाला सोड. त्याच्या अपराधाबद्दल मी तुजजवळ क्षमा मागतो.' याप्रमाणे चक्राची प्रार्थना करताच ते चक्र नाहिसे झाले. मगअंबरीष राजाने दुर्वासाला भोजनाला बसवून त्याचा योग्य तो सत्कार केला. ऋषि त्या राजाचा निरोप घेते वेळी म्हणाला, 'राजा, तुझा मी निष्कारण छळ केला याबद्दल मला क्षमा कर. ऊस पिळला तरी त्यातून जसा गोड रस निघतो किंवा उत्तम सोने अग्नित घातले असता ते अधिक कसदार होते किंवा चंदन घासले असता त्याचा जसा परिमल सुटतो त्याप्रमाणे तुझी किर्ती चन्द्रसूर्य आहेत तोपर्यंत जगात कायम राहील.'

अशाप्रकारे मत्स्य अवतारात अतल पाताळातील 'जयवंत' राजाच्या भोममंडलिक राजपुरोहितास भगवंताने दिलेले वचन पूर्ण केले. अंबरीष राजा हा तो भोममंडलिक होय. युगतीथीचे पालन व व्रताचे आचरण करून युगधर्माप्रमाणे वागून त्याने स्वत:ची व स्वत:बरोबर अनेक सद्भक्तांची उन्नति उध्दरागती करून सद्भक्त मालिकेत आपले नांव अजरामर केले. भगवंतांनी आपल्यापेक्षा भक्तांचा विशेषगौरव करून "भक्ताधीन भगवान" ही उक्ति सार्थ केली.

॥ इति श्री कूर्मावतार समाप्त॥

॥ ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु॥

॥ ॐ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नमः ॥

# तृतीय श्री वराह अवतार प्रारंभ

समुद्रमंथन झाल्यानंतर सर्वस्वी लाभ देवांचाच झाला. दैत्यांना फक्त मदिरेचाच लाभ झाला असे पाहून दैत्याधिपती हिरण्याक्ष अथवा मोरध्वज व त्याचे सर्व सेनानी संतप्त झाले. भगवान विष्णुने मोहिनीरूप धारण करून देवांना अमृत दिले व पक्षपात केला म्हणून साऱ्या दैत्यांनी देवांशी युध्द सुरु केले. त्या युध्दात अर्थातच दैत्यांना अपयश येऊ लागले म्हणून त्यांनी युध्द थांबवून तपश्चर्या करून भगवान शंकराची आराधना सुरु केली. दैत्य गुरु शुक्राचार्यांनी अमोघ तपश्चर्या करून संजीवनी नावाची विद्या संपादन केली. त्याच्या योगाने कोणीही मृत व्यक्ति सजीव व धष्टपुष्ट बलसंपन्न होत असे. त्या बळाचा वापर करून दैत्यांनी देवावर स्वारी केली. आता देवांनी अमृत प्राशन करून बराच काळ लोटला आणि मध्यंतरी कोणताही उद्योग वगैरे नसल्यामुळे ते निश्चिंत झाले होते व त्यामुळे ते सर्व आळसावलेले होते. दैत्य गुरुंनी नवीन संपादन केलेल्या विद्येच्या प्रभावाने दैत्य सेना ताजीतवानी व बलसंपन्न झालेली होती. त्याचा परिणाम असा झाला कीं युध्दांत देवांचा पराजय होऊन दैत्यांना जय मिळू लागला. त्यामुळे हुरळून जाऊन दैत्यांनी भूलोक, स्वर्गलोक वगैरे सर्व ठिकाणी धुमाकूळ सुरु केला. ऋषिमुनींचा छळ करून त्यांचे यज्ञयाग बंद पाडले. म्हणून देव यज्ञाचा हविर्भाग बंद पडल्याने अगदीच निस्तेज झाले. हिरण्याक्ष मोरध्वज, नमुची, शंबर, कालनाभ शुंभ-निशुंभ, मथ, अरिष्टनेमी वगैरे अनेकानेक दैत्यांनी पृथ्वीवर सर्वत्र हाहा:कार घडवून आणला. त्यांच्या अनन्वित छळाने व क्रुरतेने सर्व प्रजाजन त्राही त्राही होऊन गेले. ते त्या दैत्यांच्या छळापासून सोडविण्याकरितां भगवंताची प्रार्थना करू लागले. पृथ्वीवर दैत्याद्वारे वाढलेला पापाचामल धुवून काढण्याकरिता व सद्भक्तांचा उध्दार करण्याकरितां म्हणजे पृथ्वीचा उध्दार करण्याकरितां भगवंतांनी त्याकाळाला अनुरुप असे वराहाचे स्वरूप धारण करून प्रगट होण्याचे ठरविले. त्याप्रमाणे प्रगट होवून भगवंतानी दैत्यांशी युध्द करून त्यांचा संहार केला. संपूर्ण पृथ्वीवरील पापाचा भार उतरवून महासागरातून धुवून काढल्याप्रमाणे संपूर्ण पृथ्वी शुध्द निर्मल पवित्र केली. लोकांच्या मनात असलेली दैत्याविषयीची भीति निवारण केली आणि सृष्टीचक्र सुरळीत चालू शकेल अशी योजना घडवून आणली. त्यासुमारास अवनीतलावर मानववंशात प्रगट झालेल्या भक्तवर धृवाचा उध्दार केला. भगवान महावराह रूपाने

प्रगट होऊन एका दाढेने रसातळाला जात असलेल्या पृथ्वीला वर उचलून आधार दिला व दुसऱ्या दाढेने मोरध्वज हिरण्याक्ष आदि महाभयंकर मायावी पापी दुष्ट दैत्यांचा संहार केला आणि मृत्यूलोकात त्याने ही खूण कायम ठेवली की कोणत्याही जीव प्राणीमात्रांची अन्नचर्वण करतांना कोणत्याही एका बाजूची दाढ कार्य करू शकते. व दुसरी बंद असते. एकाच वेळी दोन्ही दाढी कार्य करू शकत नाही. (श्लोक १-१४)

क्रतायुगात प्राप्त प्रसंगानुरुप भगवंताचा हा तिसरा महावराहाचा अवतार झालेला आहे. त्याचे अवतार कार्य ४,३२,००० वर्षे आहे. त्याकाळात पृथ्वीवर सर्वत्र वाढलेल्या असूर संस्कृतीचा पूर्णपणे बीमोड करण्याकरितां व दुसऱ्या बाजूने संपूर्ण पृथ्वीतलावर सुसंस्कृतीचा प्रभाव टाकून मानव प्राणीमात्रांना सुस्थिर करण्याकरितां म्हणजेच रसातळाला जाऊ पाहणाऱ्या मानव संस्कृतीचा पुनरूध्दार करण्याकरिता अतिशय सुंदर, तेजस्वी व अतुलबल संपन्न असे सगुणसाकार स्वरूप भगवंताला घ्यावे लागले. असूराशी सामना करून त्यांना जेरीस आणून शेवटी भगवंतांनी सनातन आर्यसंस्कृतीची पुनर्स्थापना केली. सद्भक्त राजा धृवाला मुख्य नेमून त्याच्या कडून अढळ अमरपद प्राप्त करवून देणाऱ्या सत् पथाची सन्मार्गाची शिकवण देऊन सनातन सत् मार्गाला उजाळा दिला.

वराह अवताराची माता पद्मावती, पिता दाढमऋषि शक्ति सोमैया देवी, गुरु सहेजानंद, स्थान बगपूर व क्षेत्र म्हैसूर पाटण होय. मोरध्वज हिरण्याक्षाचा वध करून सद्भक्त ध्रुवाचा उध्दार केला. प्राधान्यभूत वेद ऋग्वेद सूर्य-गायत्री मंत्राचा अजपाजाप. युगधर्मानुसार एकादशीचे व्रत पालन, वनदाग प्राधान्यभूत उत्तराभिमुख ध्यान योग साधना करून आत्मोन्नति केली जात असे.

एकदा सनत्कुमार, सनक, सनंदन व सनातन हे ब्रह्मदेवाचे चार पुत्र त्रैलोक्यामध्ये संचार करीत असता भगवदिच्छेने वैकुंठास गेले. मरिची प्रभूति प्रजापतींच्याही आधी उत्पन्न झालेले ते मुनि पाचसहा वर्षाच्या मुलांप्रमाणे दिसत असून नग्न होते. म्हणून जय-विजय या दोघा द्वारपालांनी त्यांना मुले समजून आत जाण्याविषयी प्रतिबंध केला. तेव्हा ते क्रुध्द झाले व त्यांनी द्वारपालास शाप दिला की तुम्ही रजतमगुणरहित अशा मधुसुदनाच्या चरणापाशी सुध्दां राहाण्यास योग्य नाही. ह्याकरिता हे मूढ हो अत्यंत पापी अशा असूर योनीत सत्वर जा. त्यांना असा शाप देताच ते स्वस्थानापासून भ्रष्ट होऊ लागले. तेव्हा त्या दयाळू मुनींनी पुन्हा त्यांना सांगितले की तुमचे तीन जन्म झाले म्हणजे हा शाप समाप्त होऊन तुम्हाला पुन्हां स्वस्थानाची प्राप्ति होईल.

नंतर ते दोघे द्वारपाल दैत्य आणि दानव ह्यांना पूज्य असे दितीचे पुत्र झाले. त्यात हिरण्यकश्यपु हा ज्येष्ठ असून हिरण्याक्ष हा त्यापेक्षा लहान होता. श्रीहरीने नरसिंहावतार घेऊन हिरण्यकश्यपुचा वध केला आणि पृथ्वीचा उध्दार करण्याकरितां वराहावतार घेणाऱ्या त्याच श्रीहरीने हिरण्याक्षाचाही वध केला. हिरण्यकश्यपुने श्रीहरीची आवडीने भक्ति करणाऱ्या आपल्या प्रल्हाद नामक पुत्राचा वध करण्याची इच्छा धरून त्याला मृत्यु प्राप्त होण्याकरिता नाना प्रकारच्या यातना दिल्या. परंतु सर्वत्र सबाहयाभ्यन्तरी व्यापक ब्रह्मच आहे असे पाहणारा प्रल्हाद सर्वभूतांचा आत्माच व द्वेषादिशून्य आणि ईश्वराच्या तेजाने व्याप्त असल्यामुळे त्या अनेक उपायांनी त्याचा वध करण्यास हिरण्यकश्यपु समर्थ झाला नाही. नंतर दुसऱ्या जन्मी ते उभयता विश्रवानामक ऋषींच्या केशिनीनामक स्त्रीच्या पोटी जन्मास आले व रावण आणि कुंभकर्ण या नावांनी प्रसिध्द होऊन सर्व लोकांना पीडा देते झाले. तेव्हाही भगवंताने ब्राह्मण शापापासून त्यांना मुक्त करण्याकरिता रघुवंशामध्ये रामावतार धारण करून त्यांचा वध केला. पुढे तेच रावण कुंभकर्ण तिसऱ्या जन्मी क्षत्रीय होऊन शिशुपाल दंतवक्त्र झाले आणि श्रीकृष्णाच्या सुदर्शन चक्राने निष्पाप होऊन ब्रह्मशापापासून मुक्त झाले. ह्याप्रमाणे विष्णुपार्षद नित्यवैरामुळे घडलेल्या तिव्र ध्यानाने अच्युतस्वरूपीहोऊन पुनरपि श्रीहरीजवळ गेले. ( श्लोक १५-२८ )

## ★ सद्भक्त बालक धृवाख्यान ★

पूर्वी बृहस्पती नावांच्या नगरामध्ये उत्तानचरण नावाचा राजा राज्य करीत होता. त्या राजाला दोन स्त्रिया होत्या. एकीचे नांव होते सुनीति व दुसरीचे नाव सुरुचि. धृव हा सुनीतीचा पुत्र होय. तो लहानपणापासून निश्चयी भक्तिनिष्ठ व वैराग्यशील असा होता. सुनीति व सुरुचि या दोघी सवती असल्यामुळे त्या दोघीमध्ये सवतीमत्सर जागृत होता. त्यातून सुनीतीला पुत्र झाल्यापासून तर ती तिचा अधिकच मत्सर करू लागली. सुनीती ही राजाची वडिल स्त्री होती पण सुरुचि विशेष सुस्वरूप असल्याने मागाहून केली होती. सुनीतीवर जरी राजाचे प्रेम होते तरी सुरुचीवर विशेष असून राजाने तिलाच पट्टराणी म्हणून ठरविले होते. शिवाय राज्यावर तुझाच पुत्र बसवीन असेही त्याने तिला वचन दिले होते. त्यामुळे सुरुचि अहंकारमत्त होऊन सुनीतीचा व धृवाचा द्वेष करीत होती.

एके दिवशी उत्तानचरण राजाकडे कांही उत्सव होता. त्या उत्सवाच्या नाच रंगात राजा मग्न असता तेथे त्याचा धृव बालक मजा पाहण्यासाठी आला. धृवाची

ती मनोहर बालमूर्ति पाहून राजाच्या हृदयात पुत्रप्रेम उचंबळून आले व त्याने धृवास चटकन उचलून आपल्या मांडीवर घेतले. त्यावेळी सुरुचि राजाच्या जवळच बसलेली होती. राजाच्या बाजूला एक लहानसा रत्नखचित आरसा होता. त्या आरश्याकडे धृव कौतुकाने पाहू लागला तेव्हा राजाने तो आरसा उचलून धृवाच्या हाती दिला. तो रत्नखचित आरसा सुरूचिचा होता. आधीच मत्सराने तिचा द्वेषाग्नी भडकलेला होता. तशात आपला आरसा राजाने सवतीच्या मुलाच्या हातात दिलेला पाहताच ती क्रोधाने लाल झाली. तिने धृवाच्या हातातील आरसा हिसकून घेऊन त्याला राजाच्या मांडीवरून जोराने ढकलून दिले. त्याबरोबर धृव कोलमडून पडला व त्यास लागलीच मूर्च्छा आली. सुरुचिची ती दुष्ट कृति पाहून सर्व लोक हळहळले व त्यांना तिचा फार रागही आला. कित्येकांनी तर तिला स्पष्टपणे कटू शब्दांनी संबोधिले व ते राजसभेतून उठून गेले. कित्येकांनी धृवाला वारा वगैरे घालून सावध केले व त्याला आईकडे नेऊन पोहोचविले. उत्तानचरण राजालाही अत्यंत वाईट वाटले. परंतु बायको संतापेल म्हणून तो स्वस्थ बसला. मातेजवळ आल्यानंतर धृवाने सभेत घडलेली सर्व हकीकत आईला सांगितली. ती हकीकत ऐकून सुनीतीला फार दुःख झाले. पण निरूपाय म्हणून ती स्वस्थ बसली. धृवाला मात्र या प्रकाराने फार अनुताप झाला. ज्या जगात इतकी मनुष्यद्वेषी माणसे आहेत त्या जगाचा संपर्क नसलेला बरा, अशी भावना झाली व तो आपल्या आईला म्हणाला, 'हे माते, ज्याच्या लीलेने एवढे जग निर्माण झाले आहे, ज्याच्या मायेच्या चेष्टेने हे चराचर उत्पन्न झाले आहे तो कोण आहे व कोठे आहे हे कृपा करून मला सांग!'

धृवाचे बोलणे ऐकून सुनीती म्हणाली, 'बाळा धृवा, ज्याचा थांग देवालाही लागला नाही, त्रैलोक्य व ब्रह्मादिही ज्याला जाणावयास समर्थ नाहीत तो परमात्मा तुला तुझ्या बालमतीने कसा बरे सापडेल? जो आपल्या इच्छाशक्तीने विलक्षण घटना घडवून आणतो तो तुझ्यासारख्या बालकाला कसा बरे ओळखून येणार?' सुनीतीचे शब्द ऐकून धृव म्हणाला, 'आई, मी जरी लहान आहे तरी भगवंताची भेट घेण्याचा मी निश्चय केलेला आहे. मला जर देवाची भेट झाली नाही तर मी आपला प्राण ठेवणार नाही. त्याकरीता मला तू परमेश्वरप्राप्तीचा मार्ग समजावून सांग. मदालसेने ज्याप्रमाणे आपल्या मुलांना वैराग्याचा उपदेश करून त्यांना आत्मज्ञानसिध्दीकरिता घरातून घालवून दिले त्याप्रमाणे तू मला उपदेश करून परमात्म्याची व माझी प्राप्ति करवून दे.'

सुनीती म्हणाली,' बाळा, जे ज्ञान मदालसेने आपल्या मुलांना करवून दिले ते फार कठीण आहे. ते तुला कोठून कळणार? मोठमोठे ऋषि कित्येक वर्ष तपश्चर्या करतात तेव्हा ते ज्ञान प्राप्त होते. तथापि तुला ते गूढ तत्व मी थोडक्यात सांगते'---

"बाळा धृवा, प्राण, अपान, उदान, व्यान, समान, असे पाच वायु असून रेचक, पुरक व कुंभक यांनी त्यांचे नियमन करता येऊ लागल्यावर एकवीस हजार जप करावा म्हणजे मुक्ति, मनु, ब्रह्मदेव, विष्णु, शंकर यांचे ज्ञान होते. मूळ जे आधारचक्र तेथे ऋध्दिसिध्दींचा नायक जो गणपती तो आहे. रक्तवर्ण ही त्याची खूण आहे. सहाशे जप केला असता गणनाथाचे दर्शन होते. यास्थितीत असतांना पंचद्वाराचा पर्वत होऊन तो गुदद्वारी दाटतो. दुसरे चक्र स्वाधिष्ठान होय. तेथे ब्रह्मदेव असतो त्याठिकाणी सावित्री त्याची सेवा करीत असते. तेथे वाचा वैखरी असून जागृत अवस्था असते. तेथील मुक्ति सलोकता असून मुद्रालक्षण खेचरी असते. ओंकार म्हणजे ऋग्वेद होय. आदिभौतिकादि तीन ताप आहे. उरूस्थल व पृष्ठभाग या दोहोतील सहस्त्रमात्रा मायलेकाच्या संबंधाप्रमाणे अनुकुल पाहिजे ते तेथे उर्ध्वमार्गाने वीस हजार जप केला पाहिजे. त्यावर लिंगदेहस्थानी मणिपूरचक्र आहे. त्याठिकाणी विष्णुचा लक्ष्मीसह वास आहे. तेथील वाचा मध्यमाही असून वर्ण ब्रह्माचा आहे. त्या स्थानी स्वप्नावस्था असून मुद्रा भूचरी आहे व मुक्ती समिपता आहे. तेथील प्राण हा समान असून गुणतत्व आहे. तेथे चतुर्थ गुरुलिंग असून पवनकुंभक आहे. यज्ञ अनुहात असून ध्वनीश्रीहाट आहे. मातृका द्विदल असून प्राणही द्विदल आहे. येथील जपांची संख्या सहा हजार आहे. अनुहात चक्री शंकर पार्वतीसह आहेत. तेथील वर्ण तांबडा असून वाचापश्यंती आहे. अवस्था सुषुप्ती असून सरूपता ही मुक्ति आहे. ज्याला ज्ञानी ज्योतिकळेचा आश्रम म्हणतात तो तेथेच आहे. तेथील मुद्रा चांचरी असून तमोगुण आहे व अक्षर मकार आहे. मकार म्हणजे सामवेद होय. कर्मज्ञान आध्यत्मिक असून त्राहाटक पवन आहे. गोल्हाटपीठ चतुष्ठाकार असून मध्यप्राण मध्ये आहे. या पुलस्तीचा जप सहा हजार असून अनुहताचा जप बारा हजार आहे. विशुध्दचक्राचे ठिकाणी कारण देह आहे. तेथील शक्ति अविद्या असून आत्मा हा देह आहे. वाचा परा असून अवस्था तूर्या आहे. वेद अथर्वण असून वर्ण ज्वाळेच्या रंगाप्रमाणे आहे. मुक्ति सायुज्वता असून पवन साधण्याचा मार्ग रेचक आहे. मुद्रा अगोचरी असून प्राण उदान आहे. पुण्यगिरी पीठाश्रम हा मार्ग असून अर्धमात्रा ही तेथील खूण आहे. हे कमल षोडशदलाचे असून तेथील जप एक

हजार आहे. अग्निचक्राचे ठिकाणी लिंग देह आहे. तो परमात्मा केवळ मायाशक्तीच्याच पूजनाने प्रसन्न होतो. त्याच्या प्राप्तीसाठी उन्मनी अवस्था पाहिजे. तेथील प्रभा माणिका प्रमाणे आहे अंत:करणात प्रसादलिंग आणून व त्रिवेणी संगम करून त्या त्रिकुटास्थानी निश्चल माणसाने एक हजार जप केला पाहिजे.

यापुढे विराट देह आहे. तो ज्या चक्रात आहे त्या चक्राला उन्मनीचक्र असे म्हणतात. ते कमळ सहस्त्र पाकळ्यांचे आहे. तेथे महालिंग असून तेथे ब्रह्मरंध्र व पुरुषदेवता आहे. तेथे जीव व शिव यांची सगुण मिथुनी भेट होते. त्या द्विदल भुवनाचा जप एक हजार आहे. प्रलय अवस्थेचा भाव दाखविणारा शक्तिदेहधारी महादेव हा त्या अर्धशून्य ब्रह्मांडात असून त्याचा चतुर्थ चरण बीजरूप होय. तेथे कर्तृत्व हेच स्वयंसिध्द बीज आहे. त्याठिकाणी धृवा तू वास कर. म्हणजे स्वानंदसुखाचे सौख्य सहजच प्राप्त होईल. जे शून्य ज्याला मूळप्रकृति देह असे म्हणतात तेथे निरालंबपणे राहावे. त्या निर्गुण जीवात शीवदेवता ही अधिष्ठित झालेली आहे. तेथे महत्तत्व हेच मूळ असून माया प्रकृतिचा संबंध मुळीच नाही. त्याठिकाणी म्हणजे जीवाच्या जन्मस्थानी केवळ आत्मा हाच असतो. ती अवस्था अक्षय व निश्चळ अशी असते. त्या निर्गुण परब्रह्मस्थानी पवनादिकांची गति सहज कुंठित होते. ती ब्रह्मदेवता नि:शब्द व निरंजनदेही आहे. निर्गुण अक्षर हीच तेथील साक्ष होय. असे पिंड ब्रह्मांड आहे. तसेच ते चराचर आहे. या दोहोंचे पूर्णज्ञान प्राप्त झाल्यानंतर शून्य देहात जी आत्मातीत अवस्था प्राप्त होते, तीच मुक्ति होय. बाळा धृवा देह अहंकार मूळ सोडून व हे मायाजाळ तोडून तू आपले चित्त भगवद्पदी अर्पण कर. मनात अक्षय श्रीहरीची मूर्ति असू दे म्हणजे तुझा प्रवेश निरंजनाचे राऊळात सहज होईल.''

याप्रमाणे सुनीतीने धृव बाळाला उपदेश करताच तो त्याच्या मनावर पूर्णपणे बिंबला. त्याने लगेच तपश्चर्येस जाण्याचा विचार ठरवून आपल्या मातेची सम्मति घेतली. तो पाच वर्षाचा धृव बाळ एकाग्र चित्ताने प्रवास करीत मधुवन नावाच्या अरण्यात येऊन पोहोचला. ते मधुवन फलपुष्पतडागांनी गजबजून गेले होते. तेथे चांगली रम्य जागा पाहून धृवाने आपले आसन घातले व मातोश्रीच्या सुचनेप्रमाणे बीजमंत्राचा जप सुरु केला. जपाला आरंभ केल्यानंतर तिसरे दिवशी आसनावरच कर्दळीची थोडी फळे खाऊन त्याने पारणे सोडले. याप्रमाणे महिना गेल्यावर दुसरे महिन्यात. फक्त वायु सेवन करून पारणे केले. याप्रमाणे तयारी झाल्यावर त्याने प्राणायाम साधून

दोन महिनेपर्यंत प्राणवायु रोखून अभ्यास सुरु केला. पूरक-कुंभक व रेचक असे तिन्ही प्रकार त्याने साधले. अशारितीने तो शेवटी परमेश्वर स्वरूपात लीन होऊन ब्रह्मानंदात निमग्न झाला.

इकडे नारद भ्रमण करीत असतांना त्यांचे दृष्टीस धृवाची ब्रह्मानंदात निमग्न झालेली मूर्ति पडली. ती धृवाची विलक्षण तपश्चर्या पाहून नारदाला फार आश्चर्य वाटले व त्याने ती हकीकत स्वर्गी इंद्रास कळविली. ते वर्तमान इन्द्राने ब्रह्मा, विष्णु व महेश यांना विदित केले. तेव्हा विष्णु लक्ष्मीसह सर्व देवास बरोबर घेऊन त्या मधुवनात आले आणि स्वस्वरूपी लीन झालेली धृवाची बालमूर्ति पाहून सर्व देवांची हृदये प्रेमाने भरून आली. नंतर विष्णूंनी आपला शंख त्याच्या मस्तकाला लावून त्याला समाधीतून जागे केले. समाधी उतरताच तो सर्व देवाकडे पाहू लागला. इतक्यात लक्ष्मीने त्यास प्रेमाने कडेवर घेऊन कुरवाळले. ब्रह्मदेवाने आपल्या जवळचा पितांबर त्याला नेसविला. कनकारतीने त्याला ओवाळीले. शंकरांनी विभूतीतिलक लावला व पार्वतीने त्यास पुत्राप्रमाणे आपल्या हृदयाशी धरले, धृवाने सर्व देवांना साष्टांग नमस्कार केला. भगवान धृवाच्या मस्तकावर हात ठेवून म्हणाले, 'बाळा धृवा तू हा सर्व प्रयत्न मोक्षप्राप्तीसाठी केला आहेस. त्याप्रमाणे तुला मोक्षपद तर मी दिलेच आहे. पण प्रथम तू घरी जाऊन आपल्या पित्याच्या राज्याचा स्वीकार कर. म्हणजे तुझ्या मातापित्याला व तुझ्या राज्यातील प्रजेला मोठा आनंद होईल. त्या राज्याचा तू छत्तीस हजार वर्षेपर्यंत उपभोग घेशील व नंतर अढळस्थानी जाशील. तू जेव्हा इच्छा दर्शवशील तेव्हा तुला मोक्षपद प्राप्ती होईल. असे सांगून विष्णुसह सर्व देव आपापले स्थानी निघून गेले.

इकडे बृहस्पती नगरातून ज्यादिवशी धृव निघून गेला त्या दिवसापासून संपूर्ण नगराला औदासिन्य प्राप्त झाले होते. सुनीतीला आपला पुत्र कशासाठी घर सोडून गेला हे जरी माहित होते तरी ज्या कार्यासाठी तो गेला आहे ते कार्य तो कसे सिध्दीस नेईल याची तिला चिंता वाटत होती. राजाची स्थिती तर फारच चमत्कारिक झाली होती. त्याच्या मांडीवरून धृव पडल्यावर तो जो नाहीसा झाला तो झालाच. असा प्रकार झाल्यामुळे तो अत्यंत उद्विग्न व दुःखी झाला होता. तसेच सवती मत्सराचे भरात सुरुचिने धृवाला जरी ढकलून दिले होते तरी तिला आपणही मोठी चूक केली असे वाटू लागले होते. राजपुत्राच्या जाण्यामुळे प्रजेची स्थिती अशीच अनुकंपनीय झाली होती. सारांश धृवाविषयी सर्व जग चिंताग्रस्त झालेले होते. इतक्यात

काही सेवक राजाकडे धावत आले व त्यांनी राजाला आपला पुत्र धृव येत आहे असे आनंददायक वर्तमान कळविले. बातमी ऐकून राजाला महदानंद झाला. त्याने त्याबरोबर रथ सैन्य, मंगलवाद्य घेतली व तो धृवाला सामोरा गेला. तपसामर्थ्यामुळे धृवाची ती सतेज मनोरम बालमूर्ति पाहून सर्वांची हृदये गहिंवरून आली. राजाने पुत्राला आपल्या हृदयाशी घट्ट धरून प्रेमाने त्याचे चुंबन घेतले व मंगल वाद्यांच्या गजरात मिरवीत मिरवीत त्यास नगरात आणले तेव्हा नगरवासीजनांनी पुष्पवृष्टि करून त्याचा जयजयकार केला. सुवासिनींनी पंचारती ओवाळीली व वृध्दांनी आशिर्वाद दिला. सुनीतीने मोठ्याप्रेमाने लिंबलोण उतरून त्यास हृदयांशी धरले. नंतर राजाने शुभ मूहूर्त पाहून वायुकन्या विडा व कोंडा याजबरोबर त्याचा विवाह केला. त्या समारंभास अनेक राजे महाराजे व अनेक ऋषीही आपापल्या स्त्रियासह आले होते. ऋचिक व त्याची स्त्री आकृति, दक्ष व त्याची स्त्री प्रसूति, पुलस्त्यऋषि व त्याची स्त्री गति, अत्रि-अनुसया, मरिची-कळा, अंगिरा-सिध्दा, वसिष्ठ-अरूंधती याप्रमाणे भृगू, पुलस्ती वगैरे अनेक ऋषि आपापल्या पत्न्यासह वर्तमान आले होते. लग्नानंतर राजाने मोठ्या समारंभाने आपले सर्व राज्य धृवाचे स्वाधीन केले व आपण तपश्चर्येसाठी अरण्यात निघून गेला.

राजाची दुसरी स्त्री जी सुरुचि तिला उत्तम नावाचा पुत्र होता तोही आता बराच मोठा झाला होता. धृव त्याला चांगल्या रीतीने वागवी व त्याचा मानमरातब आपल्या प्रमाणेच ठेवीत असे. एके दिवशी उत्तम अरण्यात शिकारीस गेला ते अरण्य यक्षपतीचे होते. यक्षपतीस हे वृत दूताकडून समजताच तो आपले सैन्य घेऊन उत्तमावर चालून आला. उभयतामध्ये युध्द झाले. त्यात उत्तम मारला गेला. ते वृत्त सुरुचीला समजले तेव्हा ती फार शोक करू लागली. पुत्रनिधनाने तिला कांही सुचेनासे झाले. पुत्राविषयी प्रेम कसे असते हे तिला यावेळी चांगले कळून आले व तिला त्या स्थितीत धृवाला राजाच्या मांडीवरून ढकलून दिल्याची आठवण झाली. ती स्वत:ला अनेक प्रकारे दोष लावून घेऊ लागली. तिचा शोक इतका वाढला की त्या शोकभाराने ती मूर्च्छित होऊन पडली. तेव्हा धृवाने तिची पुष्कळ समजूत घालून यक्षाला चांगली शिक्षा लावितो असे अभिवचन दिले व अफाट सैन्य घेऊन यक्षावर स्वारी केली.

उत्तर दिशेला हिमाचल प्रदेशात त्या यक्ष राजाचे स्थान होते. तेथे जाऊन धृवाने त्यास युध्दांसाठी आवाहन केले. तेव्हा यक्षाचे सैन्यही युध्दाची मोठी तयारी करून धृवाबरोबर युध्द करूं लागले. उभय पक्षाकडील सैन्य रणकुशल असल्यामुळे

त्या युध्दाला लवकरच भयंकर स्वरूप आले. धृवाच्या रथावर चौदा पद्मवीरासह यक्षाने एकदम हल्ला केला. परंतु एकट्या धृवाने त्या सर्व वीरांना पळवून लावले. धृवाची युध्द नैपुण्यता पाहून यक्षराजाने माया युध्दाला आरंभ केला. तेव्हा धृवाच्या सैन्यात तांबडया, हिरव्या, पिवळया, निळ्या अशा अनेक रंगाच्या ज्वाला फिरू लागल्या. काळ्या रंगाचे व पांढऱ्या शेपटीचे विंचू मस्तकावर पडू लागले. अनेक जातीचे भयंकर सर्प सैन्यात संचार करू लागले. हा चमत्कार पाहून धृवाचे सर्व सैन्य भिऊन गेले व तोही स्वत: काय करावे या काळजीत पडला. इतक्यात तेथे वसिष्ठ ऋषि आले ते म्हणाले, 'धृवा, तू व्यर्थ काळजी करू नकोस. ज्या श्रीहरीने तुला पूर्वी दर्शन दिले होते त्याचे तूं स्मरण कर म्हणजे सर्व संकटातून मुक्त होशील.' वसिष्ठांच्या सुचनेप्रमाणे धृवाने विष्णुचे स्मरण केले. त्याबरोबर तेथे विष्णु प्रगट झाले व त्यांनी धृवाला आत्मिक उपदेश केला. तो ऐकून धृवाला आत्मज्ञान झाले. त्यास यक्षराजा शत्रुऐवजी मित्र दिसू लागला. त्याने युध्द बंद केले व आपल्या नगरात परत येऊन सुरुचीची समजूत केली. त्याने केलेल्या आत्मज्ञानाचा बोध सुरुचीलाही मानवला. नतर धृवाने छत्तीसहजार वर्षेपर्यंत राज्य करून आपला पुत्र उत्कल याच्या स्वाधीन केले व तो अढळपदाकडे निघून गेला.

धृव बृहस्पति नगरातून निघाला तो छपन्नकोटि देशांची यात्रा करीत करीत अढळपदावर जाऊन पोहोचला. त्याने एकंदर ४२ कोटी योजनांचा प्रवास केला, पैकी ३३ कोटीचा प्रवास सूर्यप्रकाशातून व ९ कोटी योजनांचा मार्ग अंतराळातून आक्रमण केला. या अंधःकारात प्रसिध्द असे अकरारूद्र आहेत. अभेदरूद्र पूर्व दिशेला, अमर रूद्र आग्नेयला, अंतरोभ्दवरूद्र दक्षिणेला, आकलरूद्र नैऋत्येला, अविकारूद्र पश्चिमेला, तप्तरूद्र वायव्यदिशेला, सिध्दरूद्र उत्तरेला, महादेव रूद्र ईशान्येला, आद्यपुरु, सप्तश्र व हनुमंत हे तीन रूद्र मध्यभागी आहेत. या अकरा रुद्रांना नमस्कार करून धृव पुढे निघाला. तेव्हा त्यास अणिमा, महिमा, लघीमा, गरीमा, प्राप्ती, प्राकाम्य, ईशत्व, वशित्व अशा अष्ट सिध्दींची भेट झाली. त्या अष्टसिध्दींना त्याने वंदन केले व तो पुढे मार्ग क्रमू लागला. कांही भूभाग चालून गेल्यावर त्यास क्षार समुद्र लागला. तो दोन कोटी योजने विस्तीर्ण आहे. तो ओलांडून गेल्यावर इक्षुरस समुद्रलागला तोही दोन कोटी योजने विस्तीर्ण आहे. यानंतर एक कोटी योजने विस्तीर्ण असा घृतसमुद्र लागला. त्यापुढे तितकाच लांब सुरोदसमुद्र त्याने ओलांडला पुढे एकेक कोटी योजनांचे दधि, दुग्ध, शुध्दोदक समुद लागले. त्या सर्व समुद्रात स्नान करीत

करीत धृव पुढे निघून गेला. या एकंदर सप्त समुद्रांनी पार पडल्यावर त्यास अनेक देश लागले. प्रथम शहाण्णव कोटी योजनांचा वालुकामय प्रदेश लागला. त्यानंतर तो अठरा कोटी योजने विस्तीर्ण अशा खुरासन नावाच्या देशात गेला. तेथून मगध देशात गेला. त्या देशाचा विस्तार दोन कोटी योजने आहे. तेथून तो पुढे एक कोटी योजने विस्तीर्ण अशा पंचदेशात जाऊन कनोज देशात गेला. तो कनोज देश बत्तीस हजार योजने विस्तीर्ण आहे. तेथून तो तीन सहस्त्र योजने विस्तीर्ण असलेल्या जालंधर देशात जाऊन अयोध्येस गेला. अयोध्या नऊ लक्ष योजने विस्तीर्ण आहे. अयोध्येहून तो उज्जैनीला गेला नंतर तसाच कन्याकुमारीपर्यंत जाऊन कोकण,माळवा, कर्नाटक, सोरट, वत्सहर, आरूष, मालसेंडा, विराध, गुजरात, सुरथ, कलंधर, बेटर, काशी, कांची, कोनब्रह्म, वडनगर, मगध,जयंती, लंका, सिंहल, काडर, नेपाळ वगैरे देशातून मार्ग क्रमीत उत्तरेकडे गेला. तिकडे जात असतांना त्यास दंडकारण्य, चंपकारण्य, नैमिषारण्य, धर्मारण्य, अशी चार विस्तीर्ण अरण्ये लागली. या चार अरण्यातून प्रवास केल्यावर बोढिया, नाग, ज्वाळाधर व पूर्णगिरी अशी चार पीठे पाहिली. त्यानंतर अग्नि, संचार, चक्रवती व सागर अशी चार तीर्थे पाहिली या चार तीर्थात स्नान करून धृव पुढे गेल्यावर त्यास तीन नद्या लागल्या. त्या नद्यांचा उगम विष्णुचरणापासून झालेला आहे व मूळ ओढ्यास तीन फाटे फुटलेले आहेत. एक फाटा पश्चिम दिशेला, दुसरा उत्तरेला व तिसरा पूर्व दिशेला गेला आहे. त्या तिनही ओढ्यात धृवाने स्नान करून तो पल्पद्विपात गेला. जंबुद्विपात मनुष्यवस्ती असून पल्पद्विप हे निर्जन आहे. तेथून तो शाल्मली द्विपात गेला. या द्विपात ऋषि व योगीयांचा वास आहे. तेथून तो कुशद्विपात गेला.या द्विपात सर्व राक्षसांचीच वस्ती आहे. तेथून क्रौंच द्विपात तो जेव्हा गेला तेव्हा त्याला जिकडे तिकडे माधवांचीच वस्ती दिसून आली. पुढे त्यास शाकद्विप लागले. त्या शाकद्विपात नंदी वृषभांचीच वस्ती आहे. नंतर तो गोमेद अथवा पुष्कर द्विपात आला.त्या द्विपात अप्सरा राहतात, त्या द्विपात जेव्हा धृव गेला तेव्हा मेनका, रंभा, घृताची, तिलोत्तमा, उर्वशी, मंजुघोषा व सुकेशी अशा सप्त अप्सरा त्यास आडव्या झाल्या. व मनोहर चेष्टांनी त्या धृवास मोहित करण्याची पराकाष्ठा करू लागल्या. परंतु धृव न भुलता पुढे निघून गेला.

जंबुद्विपाचे नऊ भाग केलेले आहेत. त्या भागाला खंड असे म्हणतात, हरिवर्षखंड, इलावर्तखंड, रमणकखंड, हिरण्यखंड, कुरुखंड, किंपुरुष खंड, भरतखंड, भद्राश्वखंड, व केतुमालखंड असे हे नऊ खंड आहेत. चौदा भुवने अशी - वायुभुवन, मेघभुवन,

सूर्यभुवन, चंद्रभुवन, ताराभुवन, गगनभुवन, इंद्रभुवन, ब्रह्मभुवन, विष्णुभुवन, शिवभुवन, शुन्यभुवन, काळभुवन, पक्षीभुवन व निरंजनभुवन ही होत. ही चौदा भुवने पाहून धृव पुढे निघाला. ज्या पर्वताला कृष्णवर्ण व रक्तवर्ण रेषा आहेत व ज्याच्याभोवती चंद्रसूर्यादि फिरत आहेत तो मेरूपर्वत इलावर्त खंडात आहे. त्यापुढे नीलपर्वत आहेत. त्या पर्वतावरून धृव रमणक व हिरण्यक खंडात जाऊन प्रचंड अशा भगवान पर्वतावर गेला. तो पर्वत उतरून गेल्यावर त्यास उत्तर दिशेला असलेले कुरुखंड लागले, त्यापुढे त्याला इलापर्वताचे दक्षिण दिशेला असलेला निषधपर्वत लागला. त्या पर्वतावरून तो हरिवर्षखंडात गेला व तेथून हेमकूट पर्वतावर गेला. त्या पर्वतावरून उतरून पलिकडे गेल्यावर त्याला किंपुरुषखंड लागले. त्या खंडातून तो प्रवास करीत दक्षिण दिशेने हिमाचल पर्वतावर गेला. त्या पर्वतावरून पुढे गेल्यावर त्यास भरतखंड लागले. त्यापुढे माल्यवंत पर्वत लागला. तो पर्वत चढून तो केतुमाल खंडात गेला. तर त्यास गंधमादन पर्वत लागला. त्या पर्वतावरून पलिकडे गेल्यावर तो भद्राश्वखंडात आला. त्या खंडातून मार्ग आक्रमण करून गेल्यावर त्यास अत्यंत विशाल असा मेरू पर्वत दिसला.

मेरू पर्वताची चारही टोके पाहिल्यावर तो मंदारगिरीच्या पूर्व दिशेला गेला. तेथे त्यास एकनगर लागले. ते नगर सत्यलोक असून तेथे ब्रह्मदेव राहात आहे. तेथे ब्रह्मदेवाची भेट घेवून विष्णुलोकी जाण्याची इच्छा धृवाने त्यास कळविली तेव्हा ब्रह्मदेव त्यास बरोबर घेऊन निघाले. ते दोघे दक्षिण दिशेच्या बाजूने मेरू पर्वतावर चढून वर चालले असता त्यांना कैलासभुवन दिसले. ते कैलासनाथाचे अत्यंत मनोरम असे नगर पाहून धृवाला शंकराचे दर्शन घेण्याची इच्छा झाली. तेव्हा शंकराच्या प्रासादात ब्रह्मदेव धृवाला घेऊन गेला. तेथे गेल्यावर धृवाने महादेवाला साष्टांग प्रणाम करून आपली इच्छा कळविली तेव्हा शंकरही धृवाबरोबर विष्णुलोकी जाण्यास निघाले. ते तिघेही तेथून उत्तर दिशेला असलेल्या कुसुम पर्वतावर चढू लागले. वैकुंठभुवन ज्याला विष्णुलोक असे म्हणतात ते वैकुंठ कुसुम पर्वतावर आहे. त्या विष्णुलोका सभोवती वरूण, मदन वगैरे तेहतीस कोटी देवांची वस्ती आहे. तेथे पारिजातक कल्पवृक्षाची अरण्ये असून कामधेनूंची खिल्लारे आहेत. जवळच इंद्राची अमरावती आहे. अमरावती पाहणे झाल्यावर इंद्राचा सत्कार घेऊन ते तिघेही विष्णुच्या मंदिरात आले. यावेळी विष्णु आपल्या शयनावर निद्रीस्त होते, म्हणून ब्रह्मदेव हात जोडून त्यांच्या समोर उभा राहिला व त्यांची करूणा भाकू लागला. ब्रह्मदेवाची प्रार्थना

ऐकून लक्ष्मीनारायण श्रीहरी योगनिद्रेतून जागे झाले व प्रसन्न दृष्टीने म्हणाले, 'ब्रह्मदेवा, धृवाला इकडे आणले हे फार चांगले केले. याला अभिवचन दिल्याप्रमाणे याची अढळपदावर स्थापना केली पाहिजे. हा माझा धृव भक्त सर्व भक्तात सर्व श्रेष्ठ आहे. तो आपल्या अढळपदावरून कधीही ढळणार नाही.' असे म्हणून विष्णु सर्वांस बरोबर घेऊन अढळपदावर गेले व तेथे त्यांनी धृवाची स्थापना केली. तेव्हापासून धृव त्या पदावर अद्यापपर्यंत कायम आहे. धृवाचे स्थापनेपासून सप्तऋषीचे स्थान चौदा योजने उंच आहे. एकंदर धृवमंडळ पंधराकोटी योजने विस्तिर्ण असून धृवाचे स्वत:चे स्थान तीन योजने विस्तृत आहे. हे धृवाचे स्थान मेरूहूनही उंच आहे आता ग्रहांचे वर्णन आकार याविषयी तुला सांगतो. पृथ्वीपुत्र जो मंगळ त्याचा आकार त्रिकोणी आहे. सूर्य बारा कोनी आहे. चंद्राची आकृति चोवीसकोनी आहे. बुध बाणासारखा आहे. गुरु स्फटिकाप्रमाणे असून तो सहाकोनी आहे. शुक्र पंचकोनी आहे. शनी धनुष्याप्रमाणे व केतु ध्वजेप्रमाणे आहे. दशदिशांच्या मध्यभागी सूर्याचे स्थान असून त्याच्याच जवळ चंद्राचे स्थान आहे. मंगळ दक्षिण दिशेस, बुध उत्तरेस, बृहस्पति पश्चिमेला, शुक्र नैऋत्येस, शनि आग्नेय दिशेस, राहु ईशान्य दिशेला, व केतु वायव्य दिशेला आहे. अशाप्रकारे भगवंताने भक्तवर धृवाला अविचल अढळपदावर बसविले व आपले वचन वरदान पूर्ण केले. भगवंताने पहिल्या मत्स्यअवतारात रसातळ पाताळातील सद्भक्त राजा दत्तदमनाचा प्रतिहार असलेल्या भक्ताला हे वरदान दिलेले होते. त्याने भगवंताला आपल्या भक्तिबळाने वश केलेले होते. त्याच्यावर कृपा करून भगवान श्रीहरीने तिसऱ्या अवतारात तू धृव भक्त होऊन भक्तिबळाने अढळपद प्राप्त करवून घेशील असे वरदान मिळवून पूर्ण केले.

॥ इति श्री वराह अवतार समाप्त॥

॥ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु॥

ॐ श्री नृसिंह अवतार



लीधु नरसिंह नाम शेकाया होळीमा सत्यने काज ।
दैत्य हिरण्यकश्यपुने मारी प्रभु आव्या प्रल्हादने उगारवा ।।

॥ ॐ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नम: ॥

# चतुर्थ श्री नृसिंह अवतार प्रारंभ

भगवान श्रीहरीने पृथ्वीचा रसातळातून उध्दार करतांना हिरण्याक्ष अथवा मोरध्वज दैत्याचा संहार केला. त्यानंतर त्याचे राज्य हिरण्यकश्यपुला प्राप्त झाले होते. हा हिरण्यकश्यपु आपल्या बंधुप्रमाणेच उन्मत्त, क्रूर व जुलमी असून देवांचा द्वेष करणारा होता. विष्णुने वराहावतार घेऊन त्याच्या बंधुचा वध केला असल्यामुळे तो विष्णुचा फार द्वेष करीत असे. दैत्य माता दितीचे परम पराक्रमी असे हे हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपु ही दोन मुले होती. दोन्हीही त्रिभुवनविजयी, सुरासुरामध्ये दुर्धर्ष व अजेय होते. दोघामध्ये परम स्नेह होता. सृष्टीच्या प्रारंभीच भगवान नारायणाने पाण्यात बुडालेल्या पृथ्वीचा उध्दार करतांना महावराह स्वरूप धारण करून हिरण्याक्षाचा वध केला होता. हिरण्यकश्यपुला फार दु:ख झाले. त्याने स्वत:स अमर बनविण्याकरिता तपश्चर्या करण्याचा निश्चय केला. माता दिती, बंधु, पत्नि आणि भावांच्या मुलांना सांत्वनपर उपदेश करून आश्वासन दिले व राज्याचा भार नमुची, शंभर व पुलोमा आदि मंत्र्यावर सोडून तो आपल्या प्रिय पत्नि कयाधुचा निरोप घेऊन निघाला. (श्लोक १-१०)

घरून निघाल्यानंतर हिरण्यकश्यपुच्या मनात सतत हेच विचार येत होते कीं त्या श्रीहरी नारायणाने माझ्या भावाचा वध केला. त्याचा मोबदला कसा घ्यावा याच गोष्टीचे चिंतन करीत चालल्याने अजाणता त्याच्या चित्तात वैराने का होईना पण सतत लक्ष्य-ध्यान नारायणाचे होऊ लागले. एके ठिकाणी विश्रांतीसाठी एका घनदाट वृक्षाच्या छायेत बसल्यानंतर नेमके त्याच झाडावर पोपटांचा थवा उडत येऊन बसला व आपल्या मधूर कंठाने ते सर्व 'नारायण, नारायण' असे कूजन करू लागले. ते ऐकताच हिरण्यकश्यपुची तळपायाची आग मस्तकात गेली आणि माझ्या शत्रुचे नामस्मरण करणारे हे कोण भिकार पक्षी असे म्हणून तो त्यांना उडवू लागला. पण तरीसुध्दा त्या पक्षांचे नारायणाचे स्मरण सतत चालूच राहिले. शेवटी कंटाळून हिरण्यकश्यपु म्हणाला, आपल्या तपश्चर्येस हा अपशकुन आहे. सतत नारायणाचे स्मरण करणारे हे पक्षी आजच कसे आणि कोठून माझ्या क्रोधाचा भडका उडवण्यासाठी आले असे म्हणून तो आपल्या नगराकडे परत फिरला व संध्याकाळी आपल्या प्रीय पत्नीच्या महालात येऊन राहिला. त्यास अचानक परत आलेला पाहून कयाधुने त्याबद्दल विचारले तेव्हा त्याने झालेली सारी हकिकत तिला सांगून ते पक्षी सारखे 'नारायण,

नारायण,' असे मोठ्याने ओरडत होते असे सांगितले. कयाधु सद्विचारी, सदाचारसंपन्न, कर्तव्यदक्ष व धर्मप्रवृत्तीची आणि फार दूरवर विचार करणारी असल्याने हीच योग्य संधी आहे असे जाणून आलटून पालटून जाणता अजाणता हिरण्यकश्यपुकडून नारायण नारायण नामाचा १०८ वेळा जाप वदवून घेतला आणि रात्री शयन मंदिरात मुद्दाम तीच गोष्ट उकरून काढून व त्या नारायणाचे अजाणता त्याच्याकडून स्मरण व ध्यान करवून कामक्रिडा करविली व आपल्या पतीस संतुष्ट केले. युक्ति प्रयुक्तीने संभोग कालात तिने स्वत:ही व आपल्या पतीसही नारायणाच्या स्मरणात मग्न ठेवल्याने तिच्या गर्भात त्यायोगे अनायासेच भगवद्भक्ताचा संचार झाला. उजाडल्यानंतर हिरण्यकश्यपु कयाधुचा निरोप घेऊन मंदराचलावर तपश्चर्या करण्याकरिता निघून गेला. त्याने हजारो वर्षे उग्र तपश्चर्या करून ब्रह्मदेवास संतुष्ट केले. ब्रह्माजीने त्यास वरदान दिले की, तुझा कोणत्याही शस्त्राअस्त्राने ब्रह्माजीद्वारा निर्मित कोण्याही प्राण्याने, रात्री-दिवसा, जमिनीवर-आकाशात वगैरे कशानेही व कोठेही नाश होणार नाही.

जेव्हा हिरण्यकश्यपु तपश्चर्येस गेला होता. तेव्हा इंद्राने पाहिले की दैत्यराज्य नरेशहीन झालेले आहे. त्यांनी सर्व सैन्य मिळवून त्या राज्यावर आक्रमण केले. देवताकडून पराजित झालेले दैत्य सैरावैरा वनातपर्वतात पळून गेले. कित्त्येक प्राणरक्षणार्थ शरण आले. देवतांनी दैत्यपुरास लुटले व जाळून टाकले. दैत्यराज हिरण्यकश्यपुच्या प्रबल पराम्रकाला देवराज महेंद्र अत्यंत भीत होता. त्यास भय होते की पराक्रमी पित्यांचे मुलसुध्दां पराक्रमीच असतात. कदाचित पुढे त्यांनी बळ संगठीत करून युध्द केले तर आपल्यावर घोर आपत्तीच ओढवेल म्हणून त्याने हिरण्यकश्यपुचे तीनही बालक ह्रद, अनुह्रद व संह्रद यांचा संहार केला.

हिरण्यकश्यपुची पत्नी दैत्येश्वरी कयाधु या समयास गर्भवती होती. तिचे सारे सेवक व रक्षक इंद्राच्या भीतीने पळून गेलेले होते. अशा असहाय समयी इंद्राने तिला बळपूर्वक रथावर बसविले व अमरावतीच्या मार्गाने घेऊन चालला. ती साध्वी अत्यंत करूण स्वराने विलाप करीत होती व कोणासही साहाय्याविषयी, सोडवण्याविषयी प्रार्थना करीत होती. इंद्राला तिने खूप धि:कारले. त्याची निर्भत्सना केली पण कांहीही उपयोग झाला नाही. स्वार्थी मनुष्य दोष पाहात नाही.

हा करूण विलाप कानी पडताच कोमल ह्रदयाचे नारदमुनि द्रवीत होऊन पुढे झाले. त्यांनी देवेंद्रास अडविले व हटकले, 'महेंद्रा, तू देवराज आहेस, परस्त्रीचे

हरण करणे तुला शोभत नाही. या पतिव्रतेला ताबडतोब सोडून दे.' देवर्षिंस प्रणाम करून इंद्र नम्रतेने म्हणाला, 'देवर्षि हिच्या गर्भात दैत्येन्द्राचे अतुलनीय तेज आहे. आम्हाला त्याचे भय आहे. आम्ही त्यास मारू इच्छित आहे. भ्रूण हत्येपासून बचावण्यासाठी आम्ही तिला अमरावतीला घेऊन जात आहोत. पुत्र झाल्यावर मी तिला सोडून देईन. तिथे तिला कोणतेही कष्ट होणार नाही आणि कोणीही तिचा अपमान करू शकणार नाही.'

नारद म्हणाले, 'तुम्ही जाणत नाही, पण हिचा गर्भस्थ बालक चिरंजीवी आहे. त्याचा वध तुमच्या शक्तीच्या बाहेरची गोष्ट आहे. त्यापासून देवतांना कोणत्याही प्रकारचे भय नाही. तो तर तुमच्या कल्याणास कारण होईल. दैत्यराज्ञीच्या गर्भात भगवंताचा परमभक्त आहे.

महेन्द्राने आदरभावाने कयाधुस प्रदक्षिणा घातली व त्रास दिल्याबद्दल क्षमा मागून तो तिला रथाखाली उतरवून निघून गेला. तेव्हा नारद कयाधुस म्हणाले - 'बाळे, तुझे दैत्यपूर तर नष्ट झाले आहे. आता जोपर्यंत दैत्येन्द्र तपश्चर्या पूर्ण करून परतत नाही तोपर्यंत तू माझ्या आश्रमात सुखपूर्वक राहा. कयाधुने देवर्षिंची आज्ञा स्विकारून त्यांच्याबरोबर आश्रमात गेली. अत्यंत श्रध्देने कयाधु देवर्षिंची सेवा करीत असे. ती सम्राज्ञी असूनसुध्दां तपस्विनी झाली. आपल्या हाताने आश्रमात झाडून लिपून स्वच्छ करी. नदीवरून पाणी आणीत असे. देवर्षिंच्या आदेशानुसार भक्तिभावाने भगवंताचे पूजन करी, नाम जप करीत असे. आपल्या पुत्राच्या मंगल कामनेकरिता ती सर्वप्रकारे देवर्षिंना प्रसन्न करण्याचा प्रयत्न करी. वेदीवर कुशासन टाकून शयन करी, वल्कल वस्त्र धारण करी, कठिण व्रतांचे पालन करी आणि कंदमुळे वगैरेवर उदरनिर्वाह करी. अनुकुल वेळ मिळताच देवर्षि तिला भगवंताचे दिव्य स्वरूप, अनंत गुण तसेच अद्भूत महात्म्याचे वर्णन करून सांगीत. गर्भस्थ बालकाला उद्देशून देवर्षि योग सांख्य, भक्ति व तत्वज्ञानाच्या गूढ तत्वाचा उपदेश करीत. संसाराची असारता दाखवून वैराग्याचे प्रतिपादन करीत. दैत्यपत्न्या स्वेच्छा प्रसवास समर्थ असल्याने देवतांच्या भयाने कयाधुने प्रसव केले नाही. सहस्त्र वर्षानी जेव्हा दैत्यराज वरदान प्राप्त करून परत आला तेव्हा नारदांनी तिला तिच्या पतीजवळ पाहोचविले. साध्वी कयाधुच्या याच गर्भातून समस्तसुरासुर वंदित परम भागवत प्रल्हादाचा जन्म झाला.

माता हीच पुत्राची खरी गुरु असते. गर्भस्थ बालकावर मातेचा स्वभाव, आचरण आणि विचारांचा प्रभाव पडतो. तो बालकाच्या संपूर्ण जीवन निर्माणाचा आधार असतो.

जर माता गर्भकालात सात्विक आहार, धार्मिक जीवनचर्या, यमनियमांचे पालन आणि भगवद् गुणानुवाद श्रवण करीत असेल तर तो बालक अवश्य धार्मिक संस्कारी आणि भगवद्भक्त होतो व आपल्या कुळास पवित्र करून उध्दार करतो. सतिश्रेष्ठ मदालसेने आपल्या लहानलहान बालकांना स्तनपानकरीत असतांना, झोपवतांना, हिंदोळा देत असतांना, निजता, बसता, उठता, चालता, बोलता, फिरता वगैरे सर्व क्रिया करतांना आत्मज्ञान वैराग्याचे बाळकडू पाजून उत्तम संस्कार केले, ते पुढे मोठे योगी, तत्वज्ञ, वैराग्य व आत्मज्ञान संपन्न झाले. म्हणूनच मातेला पहिला सर्वश्रेष्ठ गुरु मानलेले आहे. मातेने आपले कर्तव्य जाणून मुलांच्या संगोपनाच्या बाबतीत दक्षता बाळगून धार्मिकपणाचे व कर्तव्यदक्षपणाचे ज्ञान शिकवावे आणि त्यासाठी मातेने ते ज्ञान आधीच संपादन करावे. शास्त्र व गुरु यांच्याकडून वाचन व श्रवण करून मनन चिंतन करावे व आपल्या चित्तात ते ज्ञान पूर्णपणे ठसवावे, जगतात एक जरी माता अशी असली तरी संपूर्ण राष्ट्राचे, जगताचे कल्याण करण्याचे सामर्थ्य तिच्या ठायी असते. ( श्लोक ११-१६ )

सती कयाधु ही देवकन्या होती. देवांनी हिरण्यकश्यपुच्या पश्चात दैत्य नगरीवर स्वारी करून उध्वस्त करून टाकलेली होती. सर्व दैत्यांची दाणादाण करून टाकलेली होती. म्हणून हिरण्यकश्यपुला देवांचा खूप राग आला होता. क्रोधाच्या भराने त्याने आपल्या साऱ्या योद्ध्यांना जमविले व देवावर स्वारी केली. यज्ञयागादि कृत्ये उध्वस्त करू लागले. ऋषिमुनी सद्भक्तांना त्रास होऊ लागला. कयाधु गर्भवती असल्याने तिला सुध्दा हिरण्यकश्यपुची भीति वाटत होती. कदाचित आपल्या उदरी भगवद्भक्त बालक जन्माला आल्यास त्याला सुध्दां मारण्यास हिरण्यकश्यपु मागेपुढे पाहणार नाही. व ती बालहत्या आपल्याने पाहवणार नाही म्हणून मुलाचा जन्म होताच विश्वासु दासीबरोबर अरण्यात घेऊन जाण्यास सांगितले व थोडे दिवस तरी अज्ञातवासात त्याचे संगोपन करण्याचे सांगितले. हे सारे करतांना तिचे अंत:करण जड झाले दु:खातिरेकाने शोकाकुल होऊन ती रडू लागली.

अरण्यात दासींनी बालकास खाली ठेवताच एक दैवी चमत्कार घडून आला. वनदेवतेने रत्नखचित सुवर्णाचा पाळणा अशोकवृक्षाला बांधून त्यातील मृदु मुलायम रेशमी शय्येवर बालकास झोपवून हिंदोळा देऊ लागली. थोड्यावेळाने कामधेनु येऊन तिने बालकास दुग्धपान करविले व सर्व निरनिराळ्या रूपाने येऊन त्या भक्त बालकाचे लालनपालन व भरण पोषण करूं लागले. अशा रीतीने भक्त बालक अरण्यात

सर्व देवदेवतांच्या सान्निध्यात चन्द्रकलेप्रमाणे वाढू लागला. कित्येक दिवस गेल्यानंतर तिथे एकदां काही गवळ्यांची मुले गुरे चारण्यासाठी आली. तो त्यांना वरील चमत्कार दृष्टीस पडला व कुतुहलाने त्यांनी ते सारे दृश्य अवलोकन केले. त्यांना वाटले हा कोणी राजवंशी अथवा देवअंशी बालक असावा. त्यांनी आपापसात ठरविले कीं, आपला राजा हिरण्यकश्यपु हा निपुत्रिक आहे. त्याला आपण हे वर्तमान कळविल्यास तो या बालकाला येथून राजवाड्यात घेऊन जाईल व तेथे त्याचे चांगले संगोपन होईल. असा विचार करून त्यांनी हिरण्यकश्यपुला ही हकीकत कळविली. त्याने राजप्रतिनिधीस बोलावून ताबडतोब या गोष्टीचा तपास केलापण कोणीही तिथे नसल्याने त्या बालकास घेऊन आला व राजाच्या स्वाधिन केले. हिरण्यकश्यपुने कयाधुस या बालकाच्या संगोपनाविषयी काळजी घेण्याबद्दल बजाविले. कयाधुस खूप आनंद झाला व ज्याच्या भयाने आपणास हे पुत्र त्यागाचे अमानवी घोर कृत्य करावे लागले होते, त्याच मूर्तिमंत काल पुरुषाने आपल्या प्रिय बालकाचा व आपला असा पुनर्मिलाप घडविला म्हणून ती नियतीला वारंवार नमन करून धन्यवाद देत होती.

प्रल्हाद बालक थोडा मोठा झाला. तो आपल्या बोबड्या बोबड्या कोवळ्या शब्दांनी सर्वांची मने प्रसन्न करू लागला. तो आपल्या मातोश्रीस अतिशय गूढ अशा ज्ञानाच्या शंकाकुशंका विचारून गुंगवून सोडीत असे. त्याला काय उत्तर देऊन त्याच्या मनाचे कसे समाधान करावे हेच तिला कळत नसे. परमेश्वराच्या अवताराविषयक लिलाचरित्राबद्दल तर तिला अतिशय कोडे पडे. व नेमके त्याच बाबतीत प्रल्हाद तिला प्रश्न विचारून त्रासून सोडी. अशी कालक्रमणा करता करता प्रल्हाद पाच वर्षाचा झाला. एकदा मातापुत्र काही कारणाने नगरचर्या करण्याकरिता गावातून बाहेरच्या पुष्पवाटीकेत जात असता त्यांना रस्त्यात एका कुंभाराची गाठ पडली. कुंभाराचा व्यवसाय मडके घडवण्याचा जोरात चालू होता. त्याने त्यावेळी त्या कच्च्या मडक्यांचा आवा लावून त्यास अग्नि देत होता. अग्नीने त्या आव्यास चौफेर घेरून जिकडून तिकडून अग्नीच्या ज्वाळा निघत होत्या. इतक्यात तेथे एक आकुळव्याकुळ झालेली मांजर आली व तिने मोठमोठ्याने आक्रोश करून रडण्यास सुरुवात केली व अग्नीत उडी टाकण्याचा प्रयत्न करू लागली. तेव्हा कुंभाराने ताबडतोब त्या मांजरीस पकडून तू का रडतेस एवढा आक्रोश शोक करण्याचे कारण काय असे विचारू लागला. मांजरीने मोठमोठ्याने विलाप करून मानवीवाणीने कुंभारास सांगितलें की, -

'हे कुभांरदादा, या मडक्यातील एका कच्च्या मडक्यात माझी चार पिले ठेविली होती. अन्य प्राण्यापासून त्यांचे संरक्षण व्हावे म्हणून मी ही युक्ती केली होती पण ते न पाहता तू ते मडके सुध्दा आव्यात रचलेस व माझा सर्वस्वी घात झाला. आता मी सुध्दां या आव्यात प्राणत्याग करून माझ्या जिवीताचा त्याग करून माझ्या बाळाबरोबर परलोकात निघून जाते.

ही दु:खद हकीकत ऐकून कुंभारास तर फारच वाईट वाटले व या सर्व घटनेस आपणच कारण आहोत असे त्यास वाटून तो आर्ततेने भगवंताची करूणा भाकू लागला. त्याने त्या मांजरीस दिलासा देऊन सांगितले की या सर्व अनर्थास मीच कारणीभूत आहे. कारण मूर्खपणाने न पाहताच मी सारी मडकी आव्यात रचली. पण मी तुला भाष्यदान देतो की, जोपर्यंत हा आवा पूर्ण जळून जात नाही तोपर्यंत धीर धर. होणाऱ्या गोष्टीस कांही इलाज नसतो. केवळ ईश्वरावर आपला सर्वभार ठेवून त्याची आराधना करणे हेच आपले कर्तव्य असते. जर काळाने खरोखरच तुझ्या बाळांना ओढून नेले असेल तर त्याचे प्रायश्चित म्हणून मी सुध्दा या अग्नीदेवतेला साक्षी ठेवून प्रतिज्ञा करतो की मी सुध्दां प्राणत्याग करीन. असे म्हणून कुंभाराने मांजरीस थोडे शांत केले व त्याने डोळे मिटून तेथेच बसून भगवंताचे मनोमन भजन करू लागला. आर्ततेने त्याच्या डोळ्यातून एकसारखे अश्रू वाहू लागले. कांही क्षणानंतर आवा पूर्ण विझल्यावर थंड झाला तेव्हा कुंभाराने डोळे उघडून भगवंताचे स्मरण करून एकेक मडके काढून पाहू लागला. मांजरसुध्दां जीवाचा आटापिटा करीत मोठ्या उत्सुकतेने पाहात होती. तो काय आचर्य! एवढ्या ढिगातून कुंभाराने एक कच्चे मडके बाहेर काढले व पाहतो तो त्यात त्या मांजरीची चारही पिले आनंदाने उड्या मारीत आहेत. त्याला ते आश्चर्य पाहून हर्षातिरेकाने परमेश्वराचे गुणगान करीत तो नाचू लागला. मांजरीला सुध्दां आपली पिले सुखरूप परत मिळाल्याचे पाहून स्वर्गीय आनंद झाला. ही घटना कयाधु आणि प्रल्हाद यांनी साद्यंत पाहिली. लहानग्या बालक प्रल्हादाने मातेस विचारले, 'आई, अग्नि एवढ्या होळीमध्ये मांजरीची ही पिल्ले कशी ग जिवंत राहिली.'तेव्हा मातेने प्रल्हादास जवळ ओढून घेऊन प्रेमाने त्याच्या पाठीवर हात फिरवून मस्तकाचे अवघ्राण करून सांगितले, 'बाळा, हा सारा त्या भगवान नारायणाच्या नामाचा व भक्तीचा महिमा आहे. भगवंत हा आपल्या भक्तास कधीच विसरत नाही. जो भक्त त्याचे जेथे जशा आर्ततेने स्मरण करील, तेथे धावत जाऊन भक्तावर आलेल्या संकटाचे निवारण करतो. तो नारायण सर्वव्यापी

सचराचर जगतात पूर्ण चैतन्यरूपाने भरलेला आहे. बाळा, तू सुध्दां हीच बुध्दि कायम ठेऊन त्या नारायणाचे सर्वभूत प्राणिमात्रात दर्शन कर. म्हणजे तो नारायणच तुझे रक्षण करील.' मातेचा उपदेश चित्तात धारण करून व गर्भवासात असतांना नारदमुनीच्या उपदेशाचे स्मरण होऊन भक्त बालक प्रल्हाद नारायणाच्या स्मरण संकीर्तनात मग्न होऊन गेला व सदैव याच भावतंद्रीत राहून तो भगवंताची भक्ति करूं लागला.

हिरण्यकश्यपुने सर्व देवांना जिंकले सर्व लोकपालांना जिंकून तो स्वत: त्यांच्या पदाचा उपभोग घेऊ लागला. भगवंताशी त्याचे अतिशय शत्रुत्व होते म्हणून ऋषिमुनींना तो कष्ट देऊ लागला. यज्ञयाग बंद पाडले. धर्माचा अत्यंत विरोधी झाला. त्याचे गुरु शुक्राचार्य त्यावेळी तपश्चर्या करण्यास निघून गेले होते. आपला मुलगा प्रल्हाद याला त्याने गुरुपुत्र षण्ड व अमर्क यांच्याजवळ शिक्षणाकरिता ठेवले होते. प्रल्हाद तेव्हा अवघा पाच वर्षाचा बालक होता. एकदा प्रल्हाद घरी आला. माता कयाधुने त्याला वस्त्राभरणांनी भुषविले. पित्याजवळ जाऊन प्रल्हादाने त्याला प्रणाम केला. हिरण्यकश्यपुने प्रल्हादाला मांडीवर बसविले व त्याला स्नेहपूर्वक विचारले, 'बाळा, तू जे कांही शिकलास त्यातील एखादी चांगली गोष्ट मला सांग बरे.' प्रल्हाद म्हणाला, 'पिताजी, जगतातील सारे प्राणी संसारात आसक्त राहून सदैव उद्विग्न राहातात. मी तर सर्वांकरितां हेच श्रेष्ठ मानतो कीं, पतन करविणाऱ्या जलहीन अन्धकूपाप्रमाणे असलेल्या घरांचा त्याग करून अरण्यात राहून मनुष्याने परमेश्वराचे नारायणाचे स्मरण भजन चिंतन करावे.' हिरण्यकश्यपु जोराने हसला. त्याला वाटले कोण्यातरी शत्रुने या बालकाच्या मनात बहकवून दिलेले आहे. त्याने गुरुपुत्रांना सावध केले की, तुम्ही या बालकाला सुधारा. त्यास दैत्यकुलास उपयुक्त असे धर्म, अर्थ, काम वगैरे विषयांचे शिक्षण द्या. गुरुपुत्रांनी प्रल्हादास आपल्या आश्रमात परत आणले. त्यांनी प्रल्हादास विचारले की तुला असे विपरीत ज्ञान कोणी सांगितले? प्रल्हादाने सांगितले, 'गुरुदेव, हा मी आहे आणि तो दुसरा आहे हे तर अज्ञान आहे. भगवंताच्या या मायेनेच जीव मोहित होतो. तो दयामय ज्याच्यावर दया करतो त्याचेच चित्त त्या भगवंतात लागते. माझे चित्त तर त्याच्या अनंत कृपेनेच त्या परमपुरुष नारायणाकडे सहज खेचले गेले आहे.' (श्लोक १७-३५)

गुरुपुत्रांनी प्रल्हादास खूप धमकाविले व धाकदडपश्या दाखवून त्यास अर्थशास्त्र, दण्डनीती, राजनीती वगैरेचे शिक्षण देऊ लागले. गुरुंनी शिकविलेली विद्या प्रल्हाद लक्ष्यपूर्वक ग्रहण करीत असे. तो गुरूंचा कधीच अपमान करीत नसे आणि त्यांनी शिकविलेल्या विद्येचा सुध्दा कधीच तिरस्कार करीत नसे, पण त्या विद्येने त्याच्या मनात कोणतीही आस्था उत्पन्न केली नाही. गुरुपुत्रांनी आपल्या मनाशी कयास केला की, प्रल्हाद आता कांही तरी सुशिक्षित झालेला आहे म्हणून दैत्य राजाजवळ घेऊन जाण्यास हरकत नाही असा विचार करून त्यांनी प्रल्हादास हिरण्यकश्यपुजवळ नेताच त्याचा विनयशील स्वभाव पाहून त्याने त्यास मांडीवर बसवून विचारले - 'सांग बरे बाळ तू आपल्या समजाप्रमाणे उत्तम ज्ञान कोणते मानतो?' प्रल्हादाने सांगितले, 'भगवंताचे गुणगान व चरित्रश्रवण, त्याच्या लीलांचे व नामाचे कीर्तन करणे, त्या मंगलमय प्रभुचे स्मरण, त्याच्या चरणांची सेवा, त्या परमप्रभूची पूजा, त्याची वंदना, त्याच्याप्रति आस्था - दास्यभाव, त्याच्याशी सख्य आणि त्यासच आत्मनिवेदन ही नवधाभक्ति आहे. या भक्तीच्या आश्रयाने भगवंतात चित्त लावणे हेच समस्त अध्ययनाचे सर्वोत्तम फल मी मानत असतो.'

हिरण्यकश्यपु तर रागाने लालपिवळा झाला. त्याने मांडीवरून जोराने धक्का देऊन प्रल्हादाला जमिनीवर आदळले. गुरुपुत्रांना त्याने दटावून म्हटले की, 'तुम्ही लोकांनी माझ्या मुलाला उलटी शिकवण देऊन माझ्या शत्रुला पोषक असे व्यवहारज्ञान त्याला शिकविले आहे.' गुरुपुत्रांनी सांगितले, 'यांत आमचा कांही दोष नाही.' पित्याकडून तिरस्कृत होऊन सुध्दां प्रल्हाद शांत उभा होता. त्याच्या मनात कोणताही क्षोभ उद्भवला नाही. त्याने शांत चित्ताने पित्यास म्हटले, 'पिताजी, आपण रूष्ट होऊ नका. गुरुपुत्रांचा कोणताही दोष नाही. जे लोक विषयासक्त आहेत, घराच्या, परिवाराच्या मोहात ज्याची बुध्दि बांधली गेली आहे ते तर उगवलेल्याला खाणाऱ्याप्रमाणे नरकात घेऊन जाणाऱ्या विषयांचे वारंवार सेवन करणाऱ्याप्रमाणे होत. त्यांची बुध्दी तर स्वत:च्या प्रयत्नांनीच काय पण दुसऱ्यांच्या प्रेरणेनेसुध्दां भगवंताकडे लागत नाही. जसा एखादा आंधळा दुसऱ्या आंधळ्यास मार्ग दाखवू शकत नाही, तव्दत ज्यांनी सांसारिक सुखांनाच परमपुरुषार्थ मानलेले आहे ते भगवंताच्या परम स्वरूपाला जाणू शकत नाहीत. ते दुसऱ्यांना काय बरे कल्याणकारक मार्ग दाखवू शकतील? संपूर्ण क्लेश आणि सर्व अनर्थाचा नाश तर तेव्हाच होतो जेव्हा बुध्दि भगवंताच्या श्रीचरणी लीन होते. परंतु जोपर्यंत महापुरुषांची चरणरज मस्तकी धारण केली जात नाही तोपर्यंत बुध्दि निर्मल होऊन भगवंताकडे लागत नाही.

लहानसा बालक त्रिभुवन विजयी दैत्य राजासमोर निर्भय होऊन वरीलप्रमाणे त्याच्या शत्रुचा पक्ष घेऊन समर्थन करतो हे दैत्यराजाला असह्य झाले. मोठ्याने ओरडून त्याने आपल्या क्रूर सभासद दैत्यांना आज्ञा केली की, 'ताबडतोब या दुष्टाला मारून टाका. आत्ताच याचा नाश केलेला बरा. पुढे तर हा आपल्याला डोईजड होईल. कोणत्याही प्रकारचा विचार न करता याचा नाश केलाच पाहिजे सोने कितीही मौल्यवान असले तरी ज्यामुळे कान तुटण्याची वेळ येते ते सोने कानात ठेऊन काय लाभ? आत्ताच्या आत्ता या दुष्टाचा वध करा. (श्लोक ३६-५१)

हिरण्यकश्यपुने अत्यंत क्रोधावेषाने आपल्या अनुचरांना अक्राल विक्राल हिंस्त्र पशुसारख्या दूतांना हुकूम केला की हा माझा मुलगा नसून प्रत्यक्ष शत्रु आहे. याला पकडून तुम्ही आपल्या भूत बंगल्यात एकटाच टाकून द्या. अघोरी राक्षसी तामसी अशी पूजा ज्या देवळात होत होती, नित्य पशु बली दिले जात होते अशा भूत पिशाच्च लिलांनी भरलेल्या त्या बंदिगृहात प्रल्हादाला ते दूत घेऊन गेले. तरीही प्रल्हाद शांत व स्थिर होता. तो मनात एकसारखे ईश्वरचिंतन व नृसिंह भगवंताचे स्मरण करीत होता. त्याला खात्री होती की, माझा भगवान सर्वत्र आहे व तो माझेच काय पण संपूर्ण प्राणिमात्रांचेपालन पोषण व संरक्षण करणारा आहे. यमदूतासारख्या त्या राक्षसांनी त्या भक्त बालकाला रात्रीच्या समयी त्या भूतप्रेतांच्या देवळात ढकलून दिले आणि ते मात्र भितीने जीव मुठीत घेऊन तेथून पळून गेले, कारण त्यांना त्या भूतपिशाच्यांची फारच भीती वाटे. रात्रीच्या भयाण अंधारात भक्त बालक निश्चिंत व निर्भय मनाने आत जाऊन एका ठिकाणी बसून भगवंताचे भजन, गुणसंकीर्तन व नामस्मरण करीत बसला तोच एक दिव्य ज्योति त्याठिकाणी अंतरिक्षातून प्रगट झाली व भक्त प्रल्हादाला अभय देऊन म्हणाली, 'बाळा, तू मुळीच भिऊ नकोस. या तुझ्या पित्याने व त्याच्या अनुयायांनी जगतात सर्वत्र अनर्थांचा, अन्यायाचा व हिंसाचाराचा धुमाकुळ घातला आहे. त्याच्या समाचारासाठी मला यायचेच आहे, पण अद्याप थोडा अवधी बाकी आहे. तोपर्यंत या उन्मत्त राक्षसाला अधिकच उन्मत्त बनवून त्याच्याच हाताने त्याच्या पापाचा घडा भरावयाचा आहे, तरी बाळा, त्याने तुला दुष्टबुध्दीने कितीही छळले, तरी पण तुझा त्राता मी सर्व समर्थ आहे. तू मुळीच चिंता करू नकोस. सदैव आत्मचिंतनात मग्न रहा.' अशाप्रकारे निर्भयतेचे आश्वासन देऊन ती निर्मल ज्योति अंतरिक्षात विलीन होते न होते तोच मोठा भयानक आवाज होऊन त्या देवळाच्या भिंती छत वगैरे तुटुन फुटून तुकडे तुकडे सर्वत्र पसरले गेले. सकाळी लोक पाहतात तो भक्त बालक प्रल्हाद निश्चल शांत

चित्ताने ध्यानमग्न होऊन नारायणाचे स्मरण भजन करीत आहे व त्याच्या चौफेर विटाचुन्याचे ढिगचे ढिग पसरलेले आहेत. सर्व लोक आश्चर्य करू लागले व भक्त प्रल्हादाची धन्यता मानू लागले. ही हकीकत हिरण्यकश्यपुला समजताच त्याच्या तळपायाची आग मस्तकात गेली. क्रोधावेषाने तो त्याठिकाणी आला व समोरील दृश्य पाहून स्तंभित झाला. सर्व लोकासमोर आपला कमीपणा होऊ नये आणि सर्वांवर आपली दहशत बसावी यासाठी त्याने तेथे आकंड तांडव केले. प्रल्हादाची अत्यंत निर्भत्सना करून त्याने आपल्या दूतांना सांगितले की या कुलघातक्याला आत्ताच्या आत्ता समुद्रात फेकून द्या. दोराने चांगला करकचून बांधून त्या निरपराध बालकाला त्या सर्व दुष्ट दैत्य दूतांनी समुद्रात दूरवर फेकून दिला आणि आता तर तो जिवंत राहणे शक्य नाही, पण त्याचे पुढे काय होते हे पाहण्याकरितां ते एका उंच टेकडीवर जाऊन पाहू लागले. इकडे भक्त बालकाला बांधले त्यावेळीच ब्रह्मांड आठवले, पण एकाच काय पण अशा अनंतकोटी ब्रम्हांड नायकाशी तो भक्तीभावाने तादात्म्य पावला होता, त्याला कसली असल्या कावळ्यांची भीती वाटणार! त्याचे चित्तात शेषशायी नारायणाचे सतत स्मरण चालूच असल्याने ते समुद्रात टाकताच भगवंताने हंसाचे रूप धारण केले व त्या बालकाला अलगद आपल्या पाठीवर उचलून बसविले व सुखरूपतेने तिरावर आणले. त्याचे सारे बंध तोडून टाकले आणि आपल्या प्रियभक्त बालकाला प्रेमाने गोंजारून तो हंस दूरवर निघून गेला. बालक प्रल्हाद स्वस्थ चित्ताने सागरतीरावर बसून नारायणाचे भजन करू लागला व यमदूताप्रमाणे असलेल्या दैत्यदूतांनी ती सारी हकीकत राजा हिरण्यकश्यपुला सांगितली. (श्लोक ५२-६४)

हिरण्यकश्यपुने चिडून मोठ्याने ओरडून आपल्या क्रूर सभासद दैत्यांना आज्ञा केली कीं जा, ताबडतोब या दुष्टाला मारून टाका. असूर भाले, त्रिशुळ, तलवार, गदा वगैरे घेऊन एकदम मारा, काटा, तोडा, चेंदामेंदा करा याचा असे मोठमोठ्याने ओरडून पाच वर्षाच्या बालकावर तुटून पडले. पण प्रल्हाद निर्भयतेने उभा होता. त्याला तर सर्वत्र आपला दयामय प्रभुच दिसत होता. भिण्याचे काही कारणच वाटत नव्हते. असूरांनी पूर्ण बलानिशी आपापली अस्त्रे, शस्त्रे वारंवार त्याच्यावर चालविली. परंतु प्रल्हादाला कोणतेही कष्ट झाले नाही. त्याला तिळभरसुध्दां घाव लागला नाही. त्याच्या शरीराचा स्पर्श होताच त्यांच्या शस्त्रांचे तुकडे तुकडे होत होते. हिरण्यकश्यपुला आश्चर्य वाटले. त्याने तर कोणत्याही उपायाने प्रल्हादाला ठार

मारण्याचा निश्चय केला. अनेक उपाय त्याने करून पाहिले. उन्मत्त हत्तींच्या कळपात प्रल्हादाचे हातपाय बांधून टाकून दिले. पण एका हत्तीने त्याला आपल्या सोंडेने उचलून आपल्या मस्तकावर बसविले. जे हत्ती उन्मत्त होऊन त्याच्यावर धावून गेले त्यांचे दात पडले व जमिनीवर मोठा आघात करीत करीत चीं चीं करून ते पळून गेले.

नंतर प्रल्हादाला एका बंद कोठडीत ठेऊन त्यात भयंकर विषारी सर्प सोडण्यात आले. मोठा फुत्कार करून कांही सर्पांनी विषाच्या ज्वाला त्याच्या अंगावर सोडल्या पण त्या विषाचा त्याच्यावर कांही परिणाम झाला नाही. उलट सर्पच हतबल होवून मृतवत तेथे पडून राहिले. जंगली सिंहाला जेव्हा प्रल्हादाच्या अंगावर सोडले तेव्हा मोठ्याने गर्जना करून व शेपटी जमिनीवर जोरजोराने आपटीत जाणारा तो सिंह प्रल्हादाजवळ जाताच पाळलेल्या कुत्र्याप्रमाणे शेपटी हलवून प्रल्हादाजवळ जाऊन बसला. प्रल्हादाला अन्नातून उग्र विष देण्यात आले. तरी त्याचा सुध्दा त्याच्यावर कोणताही प्रभाव पडला नाही. उलट त्याच्या पोटात गेल्यावर त्या विषाचे अमृत झाले. त्यानंतर प्रल्हादाला कित्येक दिवसपर्यंत अन्नच काय पण पाण्याचा एक बुंद सुध्दा दिला नाही. तरी सुध्दां प्रल्हाद शिथील न होता पूर्वी सारखाच उल्हासित मनाने भगवंताचे भजन करीत मजेत होता.

एकदा एका मोठ्या उंच पर्वतावर त्यास घेऊन जाऊन हात पाय बांधून व मोठी दगडीशीला त्याच्या कमरेस बांधून टेकडीवरून समुद्रात गडबडून दिले. तरीसुदां त्या सर्व प्रसंगातून तो भक्त बालक सकुशल बाहेर येऊन आनंदाने भगवंताचे गुणकिर्तन गात गात उड्या मारीत घरी आला. एकदा त्याला कांही दैत्यांनी पकडून तेल काढण्याच्या प्रचंड घाण्यात टाकून दिले व जोरजोराने लाट फिरवू लागले, तो काय आश्चर्य! घाण्याची ती प्रचंड लाट मोठ्याने कडाडकट् आवाज करून फुटली व जिकडे तिकडे तिचे तुकडे फेकले गेले. सर्व दैत्यांना व स्वतः हिरण्यकश्यपुलासुध्दां वाटले कीं त्याच्याजवळ कांहींतरी मायावी सिध्दी असावी व त्याचा प्रयोग करून तो आपले संरक्षणकरीत असावा. पण त्या मूर्खांना हे कोठून माहिती की सर्व सिध्दिंचा दाता व नियामक अशा भगवंताशी जो भक्त एकरूप झाला आहे त्याला या त्रिभुवनात कोणत्या गोष्टीवाचून भय असणार?

शेवटी दैत्यराज हिरण्यकश्यपु. आणि त्याचे साथीदार अनेक दैत्यांनी मायावी प्रयोग करून प्रल्हादाचा नाश करावा असे ठरविले. परंतु कोणतीच माया प्रल्हादासमोर टिकत नव्हती. त्याने केवळ आपले नेत्र उघडून मायेकडे पाहिल्यास ती आपोआप नष्ट होई. गुरुपुत्र षण्ड व अमर्क यांनी अभिचाराने प्रल्हादाला मारण्यासाठी एक कृत्या उत्पन्न केली. परंतु त्या कृत्येने गुरुपुत्रांनाच उलट मारून टाकले. प्रल्हादाने भगवंताची प्रार्थना करून गुरुपुत्रांना फिरून जिवंत केले. अशा रीतीने त्याला मारण्याचा प्रयत्न करणाऱ्यानाच त्याने मृत्युमुखातून सोडविले. धन्य तो भक्त ज्याचे चित्त भगवंताकडे लागले आहे! जो सर्वत्र आपल्या दयामय प्रभुला प्रत्यक्ष पाहतो त्याची किंचीतही हानी तो भगवंत कशी बरें होऊ देईल! (श्लोक ६५-८४)

शेवटी हिरण्यकश्यपुने कंटाळून एक शेवटचा प्रयोग अवलंबिण्याचे ठरविले. त्याने लाकडांचा पर्वताएवढा ढिग रचण्यास सांगितले. असुरांनी ही भली मोठी चिता प्रल्हादाला जाळून टाकण्याकरितां रचली. लोकांना ज्यावेळेस समजले कीं, प्रल्हादास जाळण्याकरितां ही चिता रचली आहे तेव्हा कोमल अंत:करणाच्या नागरिकांना प्रल्हादाविषयी अनुकंपा वाटू लागली. त्यांचे हृदय हळहळले पण उघड बोलण्याची सोय नाही कारण हिरण्यकश्यपुच्या क्रोधास नाहक बळी पडू म्हणून अंत:करणातच त्यांनी प्रल्हादाचे रक्षण करण्यास साहाय्य करण्याबद्दल ईश्वराची मनोमन प्रार्थना केली. राजाज्ञेप्रमाणे ठरलेल्या वेळी प्रत्येक नागरिकास आपापल्या परी इंधन घेऊन तेथे हजर व्हावे लागले. प्रल्हादाची माता कयाधुला सुध्दा आपल्या बाळाचा हा छळ उघड्या डोळ्यांनी नुसता पाहावा लागत होता. पण यावेळेस विशेष धैर्य करून तिने त्या चितेची व अग्नीची मनोमन प्रार्थना केली कि, 'हे अग्निनारायणा, कुंभाराच्या धगधगत्या आव्यात तू ज्याप्रमाणे मांजरीची पिले सुरक्षित ठेवलीस त्याचप्रमाणे माझ्या बालकाचेही तू रक्षण करावे. माझ्या बालकाचीही अनामत तुला सुपूर्द करीत आहे. मातेचे अंत:करण तू जाणतोसच पण राजसत्तेपुढे माझे कांही बळ चालू शकत नाही, म्हणून तूच या बालकास सांभाळ.' अशा प्रकारे प्रार्थना करून तिने होळीची पूजा केली. तेवढ्यात ब्राह्मण वेष धारण करून अग्निनारायणाने कयाधुस दर्शन देऊन आश्वासन दिले- 'बाळे, तू चिंता करू नकोस. हे बघ हे सूत्र मी या होळीला गुंडाळतो. श्रीहरीनारायणाच्या एका अप्रतिम श्रेष्ठ एकनिष्ठ भक्तास भस्म करू शकेल असा या त्रिभुवनात कोण बरे समर्थ असेल? असे आश्वासन देऊन ब्राह्मण देवता गुप्त झाली. इकडे हिरण्यकश्यपुने विचार केला की ह्या प्रल्हादाला कांहीतरी सिध्दी प्राप्त असतील आणि त्याचा उपयोग करून हा या अग्नीत पडताच त्यातून चतुरतेने बाहेर पळून जाईल, म्हणून

त्याची स्वत:ची बहिण जी होलिका तिला सांगितले- तुला तपसामर्थ्याने अग्निनिवारक असे जे वस्त्र मिळालेले आहे ते नेसून सर्वांग त्याने झाकून घेऊन या आपल्या शत्रुस प्रल्हादास मांडीवर बसवून घट्ट पकडून ठेव म्हणजे तो कोठेही पळून न जाता अग्नीत जळून भस्म होईल. हिरण्यकश्यपुने मनाचे मोठ मोठे मनोरे रचले होते. पण सर्व नियामक सर्वतंत्र स्वतंत्र सत्ताधीश भगवंताच्या इच्छेवाचून एक पानही हलू शकत नाही. होलिका प्रल्हादास मांडीवर घेऊन त्या प्रचंड ढिगावर बसली व अग्नि लावण्यात आला. हळूहळू अग्निज्वाळा गगनात पोहोचली. दैववशात जोराच्या हवेने होलिकेचे अग्निनिवारक वस्त्र कोठे उडून गेले ते कोणासही समजले नाही. मोठमोठ्याने आरोळ्या पीटीत आक्रोश करीत होलिका त्या अग्नीत भस्म होऊन गेली. प्रल्हाद मात्र त्या प्रचंड अग्नीत निंश्चल शांतचित्ताने बसून आपल्या धीर गंभीर वाणीने पित्यास म्हणाला, - 'पिताजी, तुम्ही भगवंताचा द्वेष करणे सोडून द्या. नारायणाच्या नामाचा हा प्रभाव तर पहा कीं हा अग्निसुध्दां मला अत्यंत शीतल लागत आहे. आपणसुध्दां सर्वसत्ताधीश अशा त्या भगवान श्रीहरीनारायणाचे स्मरण करून सांसरिक तापातून निर्भयपणे मुक्त व्हा.'

मुलाचे हे धैर्य व त्याची तशी निर्भय, निश्चल, शांत अशी स्थिति पाहून दैत्यराज हिरण्यकश्यपु भयाने विव्हळ झाला तो विचार करू लागला. हा छोटासा बालक 'माझ्या मृत्यूस तर कारणीभूत होत नसेल ना!' क्षणभराने तो पूर्ववत आपल्या भूमिकेवर आला. गुरुपुत्रांनी सांगितल्याप्रमाणे वरूण पाशाने प्रल्हादास बांधून परत गुरुगृही पाठविले. शिक्षण आणि संगाच्या प्रभावाने मुलगा सुधरून जाईन अशी त्याची इच्छा होती. गुरुगृही गुरूंनी शिकविलेली विद्या तर ग्रहण करीत होता. पण त्याचे चित्त त्यात रमत नव्हते. जेव्हा दोन्ही गुरु आश्रमाच्या कामकाजात लागत तेव्हा प्रल्हाद आपल्या साऱ्या सहपाठी विद्यार्थी मित्रांना बोलावून घेई. एकतर तो राजकुमार आणि दुसरे म्हणजे तो स्वत: अत्यंत नम्र आणि सर्वांवर प्रेम करणारा होता म्हणून त्याने बोलावताच सारी मुले आपले खेळ वगैरे सोडून त्याचेजवळ एकत्र जमून बसत. प्रल्हाद अत्यंत प्रेमाने त्या बालकांना समजावून सांगत असे की, 'बंधुनो, आपला हा नर जन्म व्यर्थ नष्ट करण्यायोग्य नाही. जर या नरदेहात येऊन भगवंताची प्राप्ती नाही झाली तर आपली फार मोठी हानी झाली असे समजा. घरदार, स्त्रीपुत्र, राज्यधन वगैरे तर दु:खच दु:ख देणारे आहेत. त्यात मोह केल्यास नरकगती प्राप्त होते. इंद्रियांना विषयापासून हटविणे हेच खरे सुखशांतीचे मुळ होय. भगवत् प्राप्तीचे

साधन तर मुख्यत: या बाल्यावस्थेत साध्य करता येते. मोठे झाल्यावर तर स्त्री, पुत्र, धन यांचा मोह मनास बध्द करतो आणि वृध्दावस्थेत कितीही इच्छा झाली तरी कोणीही काहीही करू शकत नाही. भगवद् प्राप्तीकरीता फार मोठे परिश्रम करावे लागतात असे सुध्दां नाही. तो तर आपणा सर्वांच्या हृदयातच राहातो. सर्व प्राणिमात्रात तोच एक भगवान आहे म्हणून कोणत्याही प्राण्याला दु:खी कष्टी करू नये. मनाला सदैव भगवंतातच लावायला हवे.'

साध्या सरळ हृदयी दैत्य बालकांच्या मनावर प्रल्हादाच्या या उपदेशाचा प्रभाव पडत असे. वारंवार ऐकल्यावर त्या उपदेशानुसार वागण्याचा ते प्रयत्न करू लागले. शुक्राचार्यांच्या मुलांनी षण्ड-अमर्कांनी हे सर्व पाहिल्यावर त्यांना खूपच भीति वाटू लागली. त्यांनी प्रल्हादाला दैत्यराज हिरण्यकश्यपु जवळ घेऊन जाऊन साऱ्या गोष्टी निवेदन केल्या. आता हिरण्यकश्यपुने आपल्याच हातून प्रल्हादाला मारण्याचा निश्चय केला. मनात बरेच उपाय शोधून पाहिले पण एकही उपाय त्यास सुचेना, कारण प्रल्हादास मारण्याचा एकही उपाय त्याने बाकी ठेवलेला नव्हता. शेवटी त्याला एक युक्ति सुचली. 'विनाशकाले विपरीत बुध्दि' या न्यायाप्रमाणे शेवटी त्यास उपाय सुचला. (श्लोक ८५-८६)

दैत्यराज हिरण्यकश्यपुच्या मनात काळ संचरला. त्याने संतप्त होऊन जाहीर घोषणा केली कीं प्रल्हाद हा माझाच मुलगा असल्यावर माझी आज्ञा पाळत नाही. याचा जनमानसावर विपरीत परिणाम होऊ नये व सर्व लोकांना माझ्या शासनाची दहशत बसावी म्हणून सर्वनागरिकासमक्ष व माझ्या साऱ्या सहकारी मंत्रीगणासमक्ष मी त्यास जाहीर रीतीने प्राणान्ताची शिक्षा करेन. अग्नीने तापविलेल्या धगधगत्या लोहस्तंभाशी वज्रप्राय अशा लोखंडी साखळदंडाने प्रल्हादास बांधून त्याचे हालाहाल करून त्याला देहान्ताची शिक्षा केली जाईल असे त्याचे जाहीर केले व सक्तीने सर्व नागरिकास त्या शिक्षेच्या वेळी हजर राहाण्यास बजाविले. ठरल्याप्रमाणे सर्व दरबार लोकांनी गच्च भरला. कोणी उत्सुकतेने, कोणी हळहळत तर कोणी नाईलाजाने हजर झाले. लोहस्तंभातून अग्निज्वाला निघेपर्यंत तापविला गेला व बालक प्रल्हादास यमदूताप्रमाणे भासणाऱ्या त्या क्रूर सैनिकांनी लोहशृंखालांनी करकचून बांधून त्याठिकाणी हजर केले. अत्यंत नम्र व निश्चल मनाने आणि निर्भयपणे भगवंताचे स्मरण करीत करीत बाळ प्रल्हाद तेथे हिरण्यकश्यपुसमोर उभा राहिला. पित्याला त्याने अभिवादन केले. सर्व नागरिकांची मने कळवळली. प्रल्हादाविषयी साऱ्यांच्या मनात प्रेमभाव व आदरभाव

जागृत झाला पण हिरण्यकश्यपुच्या करड्या नजरेने व शासनाने उघड बोलण्याची कोणाची सोय नव्हती. माता कयाधुला पण त्याठिकाणी उपस्थित राहाण्यास संदेश पाठविला. राजाज्ञेनुसार तिलासुध्दा आपल्या उघड्या नयनांनी आपल्या प्रिय पुत्राची हत्या पाहाण्याचे दुर्भाग्य प्राप्त झाले.

एवढ्यात रानटी जनावरासारखी मोठ्याने कर्कश आरोळी मारून हिरण्यकश्यपुने प्रल्हादास म्हटले, 'अरे दुष्टा, कुलघातक्या, जेथून तेथून निसटून जाऊन प्राणरक्षा करीत होतास कां? आता हा बघ धगधगता लोहस्तंभ आणि त्याच्याशी तुला या वज्रप्राय साखळदंडानी बांधून ही बघ विद्युल्लतेप्रमाणे झळकणाऱ्या या दिव्य तलवारीने तुझी कशी खांडोळी करतो ते. तू आता निश्चित समज की येथून तू आता कोठे पळून जाऊ शकणार नाही व तो कोण नारायण तुझा सहाय्यक कोठे दडलेला आहे व तो आता तुझे कसे रक्षण करतो हे मला पाहू दे.' असे म्हणून सेवकांस त्याने प्रल्हादास खांबाशी बांधण्यास आज्ञा केली. तेव्हा निर्भयतेने व नम्रतेने प्रल्हाद म्हणाला, 'तात, तुम्ही क्रोध करू नका. सर्वांचे बळ त्या एकमेव निखिल शक्तिशाली भगवंताच्या साहाय्याने असते. मी तुमचा तिरस्कार केलेला नाही. करीत नाही व करणारही नाही. जगतात जीवाचा कोणी महान शत्रु असेल तर तो म्हणजे त्याचेच अनियंत्रीत मन उत्पथगामी मनास सोडून दुसरा कोणीही कोणाचा शत्रू नाही. भगवान नारायण सर्वव्यापी आहे. आणि तोच एकमेव माझा तुमचा या समस्त नागरीकांचाच काय पण निखिल जगताचा अनंत कोटी ब्रह्मांडांचा शास्ता आहे. फुलात ज्याप्रमाणे सुंगध वास करतो, नयनात पुतळी ज्याप्रमाणे बसलेली आहे त्याप्रमाणे तो नारायण सर्वव्यापी आहे. माझ्यात आहे, तुमच्यात आहे, तुमच्या तलवारीत आहे. या धगधगत्या अग्नीमय लोहस्तंभात सुध्दां आहे,' 'काय, या खांबातसुध्दा आहे?' हिरण्यकश्यपुने प्रल्हादाचे वाक्यसुध्दा पूरे होऊ दिले नाही. त्याने क्रोधातिशयाने सिंहासनावरून उडी मारून पूर्णपणे शक्ति एकवटून जोराने त्या लोहस्तंभास लाथ मारली आणि त्याबरोबर महाभयंकर आवाज होऊन सारे ब्रह्मांडच फाटले आहे की काय असा दिव्यनाद गर्जना त्याठिकाणी निनादली. सर्व लोक भयभीत झाले. हिरण्यकश्यपुसुध्दां स्तंभीत होऊन इकडेतिकडे पाहू लागला तो त्यास दिसले कीं तो स्तंभ मधोमध फाटला गेला. दुभंगला व त्यातून मनुष्याचे शरीर व सिंहाचे मुख असलेली एक अद्भुत भयंकर दिव्य तेजस्वी आकृती प्रकट झाली. भगवान नृसिंहाच्या त्या प्रचंड उग्र तेजाने दिशाच जळत आहे की काय असे भासत होते. ते वारंवार मेघाप्रमाणे गर्जना करू लागले. दैत्य हिरण्यकश्यपुने इकडे तिकडे उड्या मारल्या. भयाने व्याकुळ होऊन

स्वसंरक्षणार्थ तो पळून जाऊ लागला. त्याने बरेचसे पवित्रे बदलवून पळून जाण्याचा प्रयत्न केला. पण शेवटी भगवान नृसिंहाने त्याला पकडून राजसभेच्या दरवाज्यात बसून मांडीवर उताणे पाडले आणि तलवारीच्या धारेप्रमाणे दिव्य तेजस्वी नखांनी तो त्याचे पोट फाडू लागला. (श्लोक९७-११७)

लोहस्तंभ दुभंगून त्यातून अतिशय विक्राळ असे नरसिंहाचे स्वरूप धारण करून परमेश्वर प्रगट झाले. अत्यंत तेजस्वी सहस्त्रावधी सूर्य एकत्र तळपावेत त्याप्रमाणे ते दिव्यस्वरूप होते. त्याचे दात जणू पौर्णिमेचाच चंद्र आहे की काय असे भासत होते आणि शेपटी तर जणू प्रत्यक्ष हजार फणा धारण करणारा वासुकी नागच आहे की काय आणि जीभ तर जणू विद्युल्लता झळकत आहे असे वाटत होते. अशाप्रकारे भक्ताचे रक्षण करण्यांकरितां व त्यावर आलेले संकट निवारण करण्यासाठी भगवंताला हे विक्राळ स्वरूप धारण करून यावे लागले. भक्त प्रल्हादाने ताबडतोब धावत जाऊन त्याचे पाय धरले. त्याला ज्या साखळदंडाने बांधून ठेवले होते तो तर केव्हाच तुटून फेकला गेला होता व त्याचे आजूबाजूचे सैनिक तर भीतीने गांगरून जाऊन मूर्च्छित पडले. ते उठूच शकले नाही. संध्यासमयी भगवंताने दिव्य रूप धारण करून हिरण्यकश्यपुला आपल्या शेपटीने पकडून आवळून धरले व मग त्याचे दोन्ही बाहु करकचून दरवाजात ओढीत आणले. त्या भयंकर अक्राळ विक्राळ तेजस्वी व संतापाने लालबुंद झालेल्या त्या भगवंताच्या मुखाकडे कोणाच्यानेही पाहवले जात नव्हते. त्याने एकदा भयंकर गर्जना करून विद्युल्लतेप्रमाणे झळाळणारी जीभ एकदा चौफेर फिरविली. व हिरण्यकश्यपुला मातीच्या बाहुल्याप्रमाणे जोराने आपल्या मांडीवर आदळले. तो तर भीतीने थरथर कापत होता. भगवंताने मुख उघडून क्रोधाने हिरण्यकश्यपुला म्हटले, 'अरे दुष्टा, मुर्खा पापी तू केवढा मोठा अन्याय करून माझ्या भक्ताला छळलेस. तू या गरीब जनतेवर अन्यायाने जुलूम करून त्राही त्राही करून सोडलेस याचे फळ तू आता भोग. तुझा पापाचा घडा निश्चित भरला असे समज.'

थोडेसे धैर्य धारण करून पण भीत भीतच व थरथर कापत हिरण्यकश्यपुने नृसिंहाला म्हटले, 'हे नृसिंहा, तू त्रिभुवनाचा स्वामी म्हणवतोस मग मला का मारीत आहेस? तू अखिल जगताचा नाथ असलास तरी मला मारण्याचा तुला कोणताही अधिकार नाही कारण मी तपश्चर्या करून माझ्या आराध्य दैवताला भगवान शंकराला प्रसन्न करून घेतले आहे. व त्याच्याकडून वरदान आणि आशिर्वाद घेऊन मी अमर झालेलो आहे. शंकराचे वचन असत्य मानून तू मला मारतोस पण तुला ते शोभून

दिसत नाही. मांडीवर घेऊन एकप्रकारे साहाय्य करण्याऐवजी उलट तू मला मारतोस हे विपरीत आहे. दिलेले वचन अथवा वरदानाप्रमाणे मी अमर झालेलो आहे. मी भगवान शंकराकडून वरदान मिळविले आहे की मी जमिनीवर किंवा आकाशात मरणार नाही. स्त्री अथवा पुरुष अथवा पशु यांच्याकडून घरात किंवा बाहेर, लोखंडी अथवा लाकडी शस्त्रास्त्राने, सजीव किंवा निजीव जीवाने दिवसा किंवा रात्री मरू शकणार नाही. हे एवढे वरदान व आशिर्वाद मिळवून मी अमर झालेलो आहे. मग तू मला मारणारा कोण आणि कशाने मारणार आहे याचा तूच निट विचार कर. त्रिभुवनपति, जगताचा स्वामी म्हणविणारा तू आणि एवढासुध्दां विचार तुझ्याजवळ असू नये याचेच मला आश्चर्य वाटते.'

भगवान नरसिंह म्हणाले, - 'हे दुष्ट राजा, राजा म्हणून तुझ्या प्रजेचे पालन हे कर्तव्य तू चोख बजावतोस काय? प्रजेला त्रासून, पीडून आणि सन्मार्गापासून परावृत्त करून कूकर्माला लावणारा तू दुष्ट, निच, पापी आहेस. महान तपस्वी, पूजनीय ऋषिमुनींचे यज्ञ, तपकार्य वगैरे सर्व उध्वस्त करून अन्यायाचे साम्राज्य चालविले आहेस. पूज्य आदरणीय आणि आज्ञाधारक अशा स्वत:च्या मुलास दुष्टपणाने पशुवत् मारण्याकरिता तू काय काय घाट घातलेस त्याची एकेकाची आठवण कर. त्यापैकी एकही शिक्षा जर तुला केली गेली असती तर तू काय केले असतेस याची आठवण कर. दुष्टपणाने माझ्या भक्ताला छळून तू अनंत जन्मोजन्मींचे नरकवासाचे दुर्भाग्य मात्र जोडले आहेस. भगवान शंकराने जे निरनिराळे वरदान देऊन तुला अमर केले आहे असे तू म्हणतोस त्यामधूनच मार्ग काढून मी तुला तुझ्या दुष्कृत्याचे फळ देणार आहे. ते सारे वर आठवून तू मला सांग की तशा प्रकारची परिस्थिती असली तरच मी दोषी होऊ शकेल. पण नीट विचार कर की, तू सध्या जमिनीवर आहेस की आकाशात? दोन्हीपैकी एकही नसून माझ्या मांडीवर आहेस. मी तुला मारणारा स्त्री आहे अथवा पुरुष आहे किंवा पशु आहे याचा नीट विचार कर. आपण बसलो ते ठिकाण घरही नाही व अंगणही नाही. दरवाज्याचा उंबरठा आहे. वेळ रात्रीची नाही अथवा दिवसाचीही नाही. सूर्य अर्धबिंब अस्त झाला असून अर्धबिंब वर आहे अशाप्रकारची ही सायंसंध्येची वेळ आहे आणि ही बघ माझी नखे, ही लोखंडी नाही, लाकडी नाही, शस्त्र नाही अस्त्रही नाही, सजीव नाहीत. (कारण कापतांना त्रास होत नाही) व निर्जिव पण नाही. (नखे कापली तरी नित्य वाढतातच. निर्जिवाची वाढ होत नाही. सजीवाचीच वाढ होते.) तर मग सांग आणखी कोणते

वर बाकी आहेत की त्यायोगे तू अमर झालेला आहेस. हे दुष्टा, निचा हऱ्या नखांनी तुझे पोट चिरून मी तुला तुझ्या पातकांचे प्रायश्चित देतो.' असे म्हणून भगवान नृसिंहांनी आपल्या वज्रप्राय नखांनी हिरण्यकश्यपुचे पोट चिरून त्याचा अंत केला.

सर्व देव त्याठिकाणी प्रगट झाले. दैत्यराज हिरण्यकश्यपु मारला गेला पण भगवान नृसिंहाचा क्रोध शांत झाला नाही. ते वारंवार गर्जना करून डरकाळ्या फोडू लागले. ब्रह्मदेव शंकर तसेच दुसऱ्या सर्व देवतांनी दुरुनच त्यांची स्तुति केली. त्याच्याजवळ जाण्याचे साहस तर भगवती लक्ष्मीसुध्दां करू शकली नाही. ती सुध्दा भगवंताच्या या विकराल क्रुध्द स्वरूपाला भिऊ लागली. शेवटी ब्रह्मदेवांनी प्रल्हादाला नृसिंह भगवंताजवळ त्यांना शांत करण्याकरिता पाठविले. प्रल्हादाने निर्भयपणे भगवंताजवळ जाऊन त्यांच्या चरणावर साष्टांग दण्डवत प्रणाम केला. भगवंतांनी अत्यंत प्रेमाने त्याला उठवून आपल्या मांडीवर बसविले. वारंवार आपल्या जिभेने प्रल्हादाला चाटून त्याला म्हणाले, 'बाळा प्रल्हादा, मला येण्याकरिता फार उशीर झाला तुला फारच कष्ट सोसावे लागले, मला तू क्षमा कर!' प्रल्हादाचा कंठ भरून आला. आज त्रिभुवनाचा स्वामी त्याच्या मस्तकावर आपला अभय कर ठेवून स्नेहाने प्रेमाने चाटत आहे. प्रल्हाद हळूच उठला. त्याने दोनही हात जोडून भगवंताची स्तुति केली. अत्यंत भक्तिभावाने त्याने भगवंताचे गुणगान गाईले. शेवटी भगवंतांनी त्यास वरदान मागण्यास सांगितले. प्रल्हाद म्हणाला, 'प्रभो, आपण वरदान देण्याचे आमीष दाखवून माझी परीक्षा कां घेत आहांत! जो सेवक आपल्या स्वामीजवळ सेवेचा पुरस्कार - मोबदला मागतो तो सेवक नसून व्यापारी गणला जातो. आपण तर माझे उदार स्वामी आहात आपणास सेवेची अपेक्षा नाही व मला सुध्दां सेवेचा मोबदला नको. हे नाथ जर आपण वरदानच देतअसाल तर माझ्या हृदयात केव्हाही कोणतीही कामना उद्भवू नये.'

प्रल्हादाने नंतर परमेश्वराची प्रार्थना करून म्हटले, 'माझे वडील आपली आणि आपल्या भक्तांची निंदा करीत होते. ते त्या दोषातून मुक्त होवोत.' भगवंतांनी सांगितले, 'प्रल्हादा, ज्या कुळात माझा भक्त जन्मतो ते संपूर्ण कुळ पवित्र होते. तू ज्याचा मुलगा आहेस तो तर केव्हाच पवित्र झाला. तुझा पिता एकटा नव्हे तर एकवीस पिढ्याबरोबर पवित्र झाला. माझा भक्त ज्या स्थळावर राहतो ते स्थान धन्य होते. ती जागा तीर्थरूप होते. जेथे जेथे माझा भक्त पाऊल ठेवतो ती सारी तीर्थस्थाने होतात.

अशा रीतीने भगवान नृसिंहाने हिरण्यकश्यपुचा अंत करून अधर्माचा उच्छेद करून व त्यास सायुज्जता मुक्ति दिली. कारण, तो भगवंताचा अनन्य विरोधी भक्त होता. त्यांनी भक्त प्रल्हादाचा उध्दार केला व नंतर आपले अवतार कार्य पूर्ण केले. (श्लोक ११८-१५३)

दैत्यराज हिरंण्यकश्यपु आणि त्याचे सहकारी यांनी पृथ्वीतलावर जो अन्यायाचा पापाचार, दुराचाराचा धुमाकूळ माजविला होता त्याला आळा घालण्यासाठी दुसरा कोणताच उपाय उरला नव्हता आणि त्याकाळात प्रस्थापित झालेल्या युगधर्मानुसार वर्तन करणारा, सत्यधर्माप्रमाणे जीवन जगणारा फारच विरळा झालेला होता. प्रल्हादासारख्या एकनिष्ठ भक्तालासुध्दा कसोटीच्या भट्टीत तापून सुलाखून शुध्द व पवित्र केले गेले होते, तर मग अन्य सद्भक्ताला केवढा मोठा जाच सहन करावा लागला असेल ह्याची कल्पनाच केलेली बरी, या सर्व भक्तांना दिलासा देण्यासाठी आणि भक्तवर प्रल्हादावर येऊ पाहणाऱ्या प्राणांतिक प्रसंगातून त्याची मुक्ति करण्याकरिता हिरण्यकश्यपुच्या साऱ्या वरदाना मधून मार्ग काढून परिस्थिनीनुसार अवतार धारण केला. हिरण्यकश्यपुचा वध करून सद्भक्त प्रल्हादाला अविंचल राज्य दिले. मत्स्यावतारात भगवंतांनी रसातल पाताळातील सद्भक्त राजा दत्तदमनाला दिलेले वचन पूर्ण करण्यासाठीच त्या सद्भक्ताने प्रल्हादरूपाने जन्म धारण केला. भगवंताला मागितलेल्या वरदानाप्रमाणे अपार कसोटी सहन करून आत्मोन्नतीबरोबर पाच कोटी सद्भक्तांचा उध्दार केला. भक्त प्रल्हादाने मग सत्यधर्माची आणि परमेश्वरनामाची द्वाही सर्वदूर फिरवून साऱ्याना सत्धर्माचे शिक्षण दिले. ठिकठिकाणी ऋषीमुनींचे आश्रम विद्यापीठे रचून त्यांच्या साऱ्यांची योगक्षेमाची स्वत: देखभाल करून ज्ञानसाधना व भक्तिसाधना सुरु केल्या. साऱ्या प्रजजाजनांना सर्व प्रकारच्या सुखसोयी निर्माण करून साधन संपन्न बनवून सुखी केले. जिकडे तिकडे आनंद सुख शांतीचे साम्राज्य पसरले. नित्यपाठ, पूजापाठ वगैरे सुरु होवून लोक सदाचाराने वागू लागले. हजारो वर्ष राज्य करून प्रल्हादाने आपले उर्वरीत आयुष्य ईशचिंतनात व ज्ञानाचे अध्ययन अध्यापनात घालविले.

ज्या सद्भक्तांनी प्रल्हादाचे हे वेदवचन सत्य मानून त्याप्रमाणे आचरण केले अशा पाच कोटी सद्भक्तांचा उध्दार होऊन प्रल्हादाबरोबर अमरापूर धामात जाण्याचे सद्भाग्य त्यांना लाभले. दुसऱ्या पाच कोटी जीवात्म्यांनी सत्धर्माची दिक्षा स्विकारली पण त्याप्रमाणे पूर्णपणे वागू शकले नाही, इंद्रियधर्म आणि विकारास बळी पडून डळमळीत होऊन गाफलपणात राहिले ते लक्षचौर्यायशीच्या फेऱ्यात पडले. बाकीचे

पाच कोटी तर बेईमान, अज्ञानांध, चोरी, हिंसा, अन्याय दुराचार करणारे होते. पशुवत जीवन जगणाऱ्या त्या नरपशुंना सद्‌गतीच काय पण जन्ममरणाची सुध्दा गति लाभली नाही ते कायमचे प्रलयकाळपर्यंत नरकागारात व घोर अंध:कारात पडले. अशा रीतीने ह्या तीन गतीनुसार पहिल्या सत्ययुगात फक्त पाच कोटी सद्‌भक्तांचा मानबिंदू होऊन भक्त प्रल्हाद अमरपदास पोहोचला. येथून सत्ययुगाचा काळ संपला व त्रेतायुगास सुरूवात झाली. रविवारची एकादशी अखेर सत्ययुग संपले आणि मंगळवारी चर्तुदशीला त्रेतायुगास सुरुवात झाली. म्हणून अनंत चर्तुदशीही त्रेतायुगाची युगतिथी गणली गेली. प्रत्येक अवताराचे अवतार कार्य ४,३२,००० वर्षे याप्रमाणे चार अवतार मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह क्रतायुगात प्रगटले म्हणून क्रतायुगाचे प्रमाण १७,२८,००० वर्षे होय. चार दैत्य शंखासुर, मधुकैटभ, मोरध्वज अथवा हिरण्याक्ष आणि हिरण्यकश्यपु हे दानवसंहारले गेले. भक्त रूख्मांगद, अंबरीष, धृव व प्रल्हाद या सद्भक्तांबरोबर कोटच्यावधी जीवात्मे उध्दरले गेले. त्यांनी आचरण केलेला युगधर्म हा ज्वलंत चैतन्यमय आणि ज्ञानभक्तीमय असल्याने चिरकाल अक्षय आहे. ऋग्वेदानुसार सूर्य गायत्री जाप मंत्र जपून नृसिंह भगवंताचा महामृत्यूंजय मंत्राचा सतत उच्चार केला जाई. युगधर्मानुसार वनदाग, कुंजरदान, युगगुरु ब्रह्माची निरनिराळी स्वरूपे झाली. मानधाता, अेकाऋषि, सहेजानंद, अमरतेज ही त्या त्या अवतार कार्यातील युगगुरूंची नांवे होती. पूजनीय दिशा उत्तर, स्थळ हंसपूर, परमेश्वराच्या अवतार लिलाचरित्रातील प्रमुख तत्व सुष्टांचे पालन, दुष्टांचे निर्दालन, अधर्माचा उच्छेद, धर्माची स्थापना, हे चारही युगात अनादिकाळापासून चालू ठेवून आपल्या कथानकाने आता त्रेतायुगात प्रवेश केला आहे. (श्लोक १५४-२००)

॥ इति श्री नृसिंह अवतार समाप्त॥

॥ ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु॥

# ॐ श्री वामन अवतार



श्रीहरी बटुरुपथी थया विराट राजा बळीना गर्व उतारवा ।
त्रेतायुगमा स्वामीजी आवीया वामनरुपे भक्तोने उगारवा ।।

॥ ॐ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नम: ॥

# पंचम श्री वामन अवतार प्रारंभ

भक्तवर प्रल्हादाचा पुत्र दैत्यराज विरोचन परम ब्राह्मण भक्त होता. त्याने इंद्राबरोबर ब्रह्मलोकात ब्रह्मदेवाच्या संगतीत पूर्ण ब्रह्मचर्य पाळून बराच काळ वास्तव्य केले. ब्रह्माजीद्वारा दिला गेलेला उपदेश आणि तत्वज्ञान जरी तो यथार्थ रूपाने ग्रहण करू शकला नाही तथापि धर्मावर त्याची श्रध्दा होती आणि त्याची गुरुभक्ति पाहून महर्षि शुक्राचार्य त्याच्यावर प्रसन्न होते. विरोचन दैत्याधिपति झाल्यावर दैत्य दानवअसुरांचे बळ फारच वाढू लागले. इंद्राला दैत्यांची ही वाढत असलेली शक्ति पाहून चिंता वाटू लागली. विरोचनाने स्वर्गावर अधिकार करण्याची मुळीच इच्छा केली नव्हती पण इंद्राचे भय मात्र दिवसेंदिवस वाढत होते. इंद्र विचार करीत होता कीं, जर दैत्यांनी कधी स्वर्गावर आक्रमण केले तर धर्मात्मा विरोचनाचा पराभव करणे शक्य नाही. शेवटी देवगुरु बृहस्पतीची अनुमति सल्ला घेऊन इंद्र एका वृध्द ब्राह्मणाचे रूप घेऊन विरोचनाचे घरी गेला. ब्राह्मणांचा परमभक्त व उदार शिरोमणि दैत्यराजाने त्याचे स्वागत केले. त्याचे चरण धुऊन पूजन केले. ब्राह्मणवेषधारी इंद्राने विरोचनाच्या दानीपणाची व उदारतेची खूप स्तुति केली. विरोचनाने नम्रतापूर्वक ब्राह्मणाला म्हटले, 'तुला जे काय मागायचे आहे तू संकोच न करता माग.' इन्द्राने अनेक प्रकारे ही गोष्ट पक्की केली आणि म्हणाला, - 'दैत्यराज, मला तुझे आयुष्य हवे आहे.' इंद्राला वाटत होते कीं या विरोचनाला कोणत्याही उपायाने मारल्यास त्याचे गुरु शुक्राचार्य संजिवनी विद्येने जिवंत करतील. विरोचनास खूप आनंद झाला तो म्हणाला, - 'मी धन्य आहे, जन्माला येऊन माझे जीवन सफल झाले. आज माझे जीवन एका विप्राने स्विकारले. याहून मोठे सौभाग्य आणखी काय असू शकेल.' असे म्हणून आपल्या हातात तलवार घेऊन स्वत:च त्याने स्वत:चे शिर कापून ब्राह्मण रूपधारी इंद्राजवळ दिले. इंद्र ते मस्तक घेवून भीतीने स्वर्गधामास निघून गेला. आणि अपूर्व दान करून दानवी विरोचनाने भगवंताच्या अमरधामात प्रवेश केला. भगवंतांनी त्यास आपल्यामध्ये सामावून घेतले. दानवीर बली राजा याच विरोचनाचा पुत्र व भक्तवर प्रल्हादाचा पौत्र होय.

बली राजाच्या उत्पत्तिविषयी पुराणात आख्यायीका आहे की प्रल्हादाने आपल्या प्रजेचे पुत्रवत पालन करून अनंत वर्षे राज्य केल्यानंतर आपल्या विरोचन पुत्राच्या

स्वाधीन सर्व राज्य कारभार करून त्याने वानप्रस्थाश्रम स्विकारला. विरोचन सूर्यभक्त असून त्याने आपल्या भक्तीबळाने सूर्यास प्रसन्न करून अभेद्य कवच मिळविले होते. सूर्याने प्रसन्न होऊन विरोचनाला आपल्या मस्तकावरचा मुकुट सुध्दा दिला. तो मुकुट मस्तकावर असला म्हणजे कोणापासूनही भीती व्हावयाची नाही असा त्या मुकुटाचा प्रभाव होता. विरोचनास तो मुकुट मिळाल्यावर त्याला साहजिक अभिमान झाला व त्याने सर्व भूमंडळास आपल्या पराक्रमाने त्राही भगवान करून सोडले. तेव्हा भगवान विष्णु मोहिनीरूप धारण करून पृथ्वीवर आला. विष्णुचे ते मायावी मोहिनी रूप पाहून विरोचन भुलला तो त्या मोहिनीजवळ गेला व तिला कुशल विचारू लागला. आपले लग्न झालेले नसून आपण कुमारिका आहोत असे मोहिनीने सांगितले ते ऐकून विरोचन म्हणाला, - 'सुंदरी तू मजबरोबर विवाह करशील तर मी तुला पट्टराणी करीन व तुझ्या वचनात वागेन.' मोहिनीने राजाकडून भाष्यदान घेऊन ती त्याबराबेर नगरात आली. उभयतांचे सहवासात कांही दिवस गेल्यावर मोहिनीला गरोदरावस्था जाणवू लागली. तेव्हा ती राजाला म्हणाली, 'मला पुत्र व्हावा म्हणून मी एक व्रत आरंभिले आहे. त्या व्रताची सांगता करण्यासाठी आज आपण अभ्यंगस्नान केले पाहिजे. आपल्या अंगाला तेल वगैरे लावून मीच आज आपणास स्नान घालीन. विरोचन राजाला ती गोष्ट खरी वाटली व तिने सांगितल्याप्रमाणे तो स्नानाला बसला पण मस्तकावरचा मुकूट काढीना. तेव्हा मोहिनीने भाष्यदानाची आठवण देऊन मुकुट काढायला लाविले. विरोचनाने मुकुट काढताच मोहिनीने राजाच्या मस्तकावर अंगठा ठेऊन त्यावर सर्व त्रिभुवनाचा भार घातला. त्याबरोबर त्याच्या शरीराचा चूरा होऊन मेदमांसाचा मेदिनीवर पर्वत झाला. याप्रमाणे विरोचनाचा अंत होताच सर्व देवांना मोठा आनंद झाला व मोहिनीजवळ येऊन त्यांनी विष्णुची फार स्तुति केली. त्यावेळी नारद देवाला म्हणाला, 'देवा,आपण हल्ली गरोदरावस्थेत आहात तेव्हा प्रसूतकाळी तुमचे कसे होईल. याची मला मोठी काळजी वाटते.' नारदाचे विनोदाचे भाषण ऐकून मोहिनीने आपला डावा पाय झटकला त्याबरोबर डाव्या पायाच्या अंगठ्यातून पुत्र बाहेर पडला. त्याचे नाव बली असे ठेवून त्याला विरोचनाचे राज्यावर बसविले व सर्व देव आपापल्या स्थानी गेले.

बळीची उत्पत्ति विष्णुचे अंगुष्ठापासून झालेली असल्यामुळे त्यास विष्णुची अर्धकला असे म्हटले आहे. तो बळी राजा मोठा पराक्रमी असून वैष्णव होता. राज्यावर बसल्यावर त्याने कित्येक दिवस कडकडीत तप करून महादेवास प्रसन्न करून घेतले व त्याच्याकडून मला यमपूरीचे दर्शन होऊ नये आणि मी रणात सर्वांना जिंकावे

असा वर मिळविला. पुढे बळीने दशदिशा जिंकून विपुल संपत्ति मिळविली व शुक्राचार्यादि मोठमोठे ब्राह्मण बोलावून त्यांच्याकडून विश्वजित यज्ञ केला. यज्ञाची पूर्णाहूति होताच यज्ञकुंडातून धनुष्यबाण, अक्षयभाते, अभेद्य कवच व सुवासिक कमलमाला यासहित दिव्य रथ निघाला. त्यायोगे त्याने त्रिभुवन विजय मिळविला.

तो बळीराजा राज्य करीत असता त्याच्या प्रजेला कोणत्याही प्रकारची दुःखे माहीत नव्हती. बळीने पुष्कळ दिवस राज्य केल्यावर त्याचे इतर सहकारी राक्षस त्याच्या वैष्णवी बाण्याला नावे ठेवू लागले. राक्षस कुळाला तू कलंक लावलास असे ते म्हणू लागले. तुझ्या वाडवडिलांची विष्णुने अत्यंत विटंबना केली असे असून तू त्याची भक्ति करतोस हे अत्यंत निंद्य आहे. अशाप्रकारे बोलून त्यांनी बळीच्या मनात द्वेष उत्पन्न केला. मत्सराचा पडदा मनावर बसताच बळीने देवांशी युध्द करून त्यांना जिंकण्याचा विचार ठरविला व आपले दूत पाठवून देशोदेशीचे दैत्यवीर आणले. हे वर्तमान इंद्राला कळल्यावर त्याने सर्व देवांना विनंती करून बळीबरोबर युध्द करण्यासाठी बोलाविले. सर्व देववीर आपापले सैन्य घेऊन इंद्राला सहाय्य करण्यासाठी आले. दोहोकडची तयारी झाल्यावर भयंकर लढाई झाली. दोहोकडच्या सैन्याचा नाश होऊन मुख्यमुख्य वीर तेवढेच युध्द करण्यासाठी राहिले. दैत्यापुढे देवांचा निभाव लागेना तेव्हा राहिलेले सर्व देव आमचे रक्षण कर असे इंद्राला म्हणू लागले. तेव्हा इंद्र सर्व देवांना आपल्यामागे घालून बळीबरोबर युध्द करण्यासाठी रणांगणावर आला. इतक्यात आकाशवाणी झाली की, 'हे इंद्रा या बळिबरोबर तू युध्द करू नकोस. तुला जय मिळणार नाही.' आकाशवाणी ऐकून सर्व देव विस्मित झाले. गुरुनेही आकाशवाणीप्रमाणेच सर्वांना उपदेश केला तेव्हा सर्व देव अमरावती सोडून देऊन जीवाच्या भीतीने पळाले व कश्यप आदिती यांच्या आश्रयाला जाऊन राहिले. तेथून ते म्हणजे इंद्र, कश्यप-अदिती ब्रह्मदेवासह भगवान शेषशायी नारायणाजवळ जाऊन स्तुति करू लागले.

इंद्राला घालवून बळी अमरावतीचे राज्य करीत असता त्यास फार समाधान प्राप्त झाले. व अमरावतीचा लाभ अक्षय्य व्हावा अशी त्यास इच्छा उत्पन्न झाली व त्याने आपला गुरु शुक्राचार्य यांस उपाय विचारला. तेव्हा शुक्राचार्य म्हणाले - 'राजा शंभर याग केले असता अमरावतीची अक्षय प्राप्ति होऊन इंद्र निःसत्व होतो.' हे ऐकून राजाला शंभर यज्ञ करण्याची इच्छा झाली. नर्मदेच्या काठी यज्ञासाठी सुंदरभूमी तयार करून व देशोदेशीचे विद्वान सत्पात्र व पवित्र ब्राह्मण बोलावून त्याने शंभर यागांना आरंभ केला. त्या यागाची समाप्ति सहस्त्र वर्षांनी होणार होती.

इकडे, इंद्र, कश्यप, अदिती क्षीरसागरी येऊन भगवंताच्या दर्शनासाठी तप करीत होते. सहस्त्र वर्षे तप केल्यानंतर कश्यपाने अदितीला पयोव्रत करण्यास सांगितले व दररोज चार लक्ष जप महामंत्राचा करण्यास सांगितले. त्याप्रमाणे अदितीने तेरा दिवस व्रत केल्यावर कश्यपाने त्या व्रताची सांगता योग्यप्रकारे केली. अदितीच्या व्रताने भगवान विष्णु प्रसन्न झाले आणि कश्यप व इंद्र यास धीर देऊन अदितीच्या उदरी जन्म घेऊन बळीचा नाश करण्याचे अभिवचन दिले. त्यांना वचन दिल्याप्रमाणे प्रभुने अदितीच्या उदरी भाद्रपद शुध्द द्वादशीचे दिवशी जन्म घेतला. त्या मंगलमय प्रसंगी स्वर्गात देवांनी जयजयकार करूनप्रभूच्या बालमूर्तिवर पुष्पवृष्टी केली. कश्यपाने त्याचे नाव वामन असे ठेवले व सातवे वर्ष लागल्यावर अनेक ऋषींना बोलावून वामनाचे मौजीबंधन केले. त्यावेळी ब्रह्मदेवाने वामनाला कंमडलू, काश्यपाने मेखला, उमा सावित्रींनी भिक्षेचे वेळी लाडू, पृथ्वीचे आसन, ऋषिंनी तृणासन, चंद्राने दंड, कुबेराने पात्र इंद्राने छत्र आणि बृहस्पतीने यज्ञोपवित दिले. याप्रमाणे मौजींबंधन होऊन देव आपापले स्थानी गेले तेथून ऋषिजन बळीच्या शंभराव्या यागाची समाप्ति असल्यामुळे तिकडे जाण्यास निघाले. बरोबर कश्यपही होता. सर्व ऋषि निघाल्यावर मलाही बरोबर घेऊन चला असे वामन म्हणाला, तेव्हा कश्यपाने वामनासही बरोबर घेऊन ते बळिराजाच्या यज्ञमंडपी दाखल झाले. (श्लोक १-१७)

गुरु शुक्रचार्याच्या सुचनेनुसार बलीराजाने विश्वजित यज्ञास सुरुवात केली. नव्याण्णवावा यज्ञ चालू असतांना भमेरी देशाचा राजपुरोहित तेथे आला व त्याने बलिराजास सांगितले कीं,- 'हे बलीराजा, भमेरी देशाच्या आमच्या ब्रह्मसेन राजाने मजजवळ एक संदेश दिला आहे की, त्या राजाची कन्या अतिशय सुंदर व रूपगुण यौवन संपन्न आहे आणि उगवत्या सूर्याप्रमाणे अत्यंत तेजस्वी असे तिचे लावण्य असून तिचे चारित्र्य अत्यंत निष्कलंक आहे. त्या कन्येचे लग्न तुझ्याशी करावे असे त्याचे मंतव्य असून तसा संदेश त्याने मजजवळ दिला आहे.'

ब्रम्हसेन राजाचे व्यक्तिमत्व बलीराजास माहितच होते. तो लगबगीने यज्ञमंडपातून उठून लागलीच भमेरी देशात जाण्यास निघाला. तेथे जाऊन त्याने राजकन्येशी विवाह केला. इकडे सर्व देवांना चिंता पडली कीं दैत्य बलीराजा आता महाभाग्यवंत पराक्रमी आणि बलशाली होईल. कारण आता त्याचे शंभर यज्ञ सुध्दां पूर्ण होतील. मग तो सर्वलोक पादाक्रांत करून देवराजाचे सिंहासन बळकावील. असे चिंतातूर होऊन ते सारे भंगवंताला शरण गेले व या संकटातून मुक्त होण्याचा कांही तरी मार्ग

काढा असे विनविले. भगवंताने बळिराजाचे धैर्य आणि औदार्य अजमाविण्याकरितां एक प्रसंग निर्माण केला. स्वत: एका वृध्द ब्राह्मणाचे रूप घेऊन काठी टेकीत टेकीत हळू हळू थर थर कापत व इकडे तिकडे झोकांड्या खात खात भगवान नारायण बलिराजा व त्याची नवपरिणित वधु लग्नमंडपातच अजून बसलेली आहे त्याठिकाणी जाऊन दोनही हात टेकवून खाली बसला व थरथरत्या शब्दात दानशूर राजाबलीचा जयजयकार केला. त्याने मोठ्याने आशिर्वाद देऊन दानाची अपेक्षा केली. बळीराजा नम्रतेने म्हणाला, 'अहो ब्राह्मण महाराज, तुम्ही विनाकारण या लग्नमंडपात धक्काबुक्की खात कशाला येण्याचे श्रम घेतले. माझा पुरोहित तर मंडपाच्या दारातच उभा राहून याचकांना दान देत आहे. तुम्हाला काय हत्ती, घोडा, गाय, सुवर्ण, अन्न, वस्त्र वगैरे काय हवे असेल ते त्याजवळून मागून घ्या. तो तुमची सारी कामना तृप्त करीन.' ब्राह्मण म्हणाला, 'राजा, मला दुसरे तिसरे कांही नको. माझ्या घरात सेवा करणारी कोणीही कन्या अथवा सत्यवती स्त्री नाही. एका सत्यवती स्त्रीची मला फार इच्छा आहे. जर तू तूझी नवपरिणीत वधुच मला देशील तर फारच चांगले होईल.' राजा बली म्हणाला, 'विप्र महाराज, अहो! या राज्यात ब्राह्मणांची संख्या बरीच आहे. शिवाय माझ्या राज्यात सुध्दा बरेचसे ब्राह्मण आहेत त्यांना बऱ्याच कन्या कुमारिका आहेत. तुमची इच्छा असली तर त्यांना बोलावून तुम्हाला एकच काय पण चार कुमारी कन्या द्यायला लावतो.' वृध्द ब्राह्मण म्हणाला, 'राजा, नको नको अरे अशा वयात वरघोडा लग्नविधी वगैरे पाहून लोक मला हसतील व नावे ठेवतील आणि माझी थट्टा मस्करी करतील. या सर्वापेक्षा तुझी ही नवपरिणीत वधुच मला देऊन टाक. मला दुसरी कन्या नको, तुला वाटल्यास तू दुसऱ्या कन्येशी विवाह कर. तू राजा असल्याने तुला कोणी काहीही बोलणार नाही. एवढी माझी याचना आहे. तू दानवीर आहेस. माझी याचना पूर्ण कर. नाही तर हा बघ मी परत जातो. तुझ्या मनाला पेच नको. एक मनान दान देशील तर ठीक नाही तर हा मी निघतो. असे म्हणून हात टेकून तो उठू लागला. लागलीच बळीराजा उठला व म्हणाला, 'विप्र महाराज, नाराज होऊन विन्मुख जाऊ नका. हे बघा मी संकल्प सोडतो की ही माझी नवपरिणीत वधू तुम्हाला' म्हाताऱ्या विप्राने पुढचे वाक्य पूर्ण होऊ दिले नाही. परिक्षा पूर्ण झाली. राजा बली त्यात पूर्णपणे पारखला गेला. भगवंतांनी सांगितले, राजा, खरोखर तू धन्य आहेस. तुझ्या दानशूरपणाची किर्ती यावच्चन्द्रदिवाकरापर्यंत चिरंजीव राहील. मला तुझी वधू नको. धर्मनियमाने ती तुझ्याशीच बांधली गेली आहे. त्या नियमात माझ्या सारखा विप्र ढवळाढवळ

करणार नाही. फक्त तुझे धैर्य आणि औदार्यच मला पाहायचे होते. तू या वधुबरोबर सुखाने राहा. उत्तमरीतीने राज्यकारभार चालवून तुझ्या शंभराव्या यज्ञाची पूर्णता कर. तुला प्रत्यक्ष प्रगट भगवंताचे दर्शन होऊन तुझी मनोकामना पूर्ण होईल. पण मनात तू कोणत्याही प्रकारचा गर्व करू नकोस. अशी बलीराजाची सत्वपरीक्षा घेऊन भगवान नारायण बटु वेषाने कश्यपाबरोबर बलीराजाच्या यज्ञमंडपी आले. ( श्लोक १८-४६ )

बलीराजाने ९९ यज्ञाची सांगता पूर्ण करून ब्रह्मसेन राजाच्या मुलीबरोबर लग्न करून यज्ञमंडपात आला. शंभराव्या यागाची मांडणी त्याने सुरु केली. हा शेवटचा याग सर्वतोपरी श्रेष्ठ व्हावा व त्यापासून अत्युत्कुष्ट फल लाभावे म्हणून राजाने दक्षतेने तयारी चालविली. ठिकठिकाणच्या ब्रह्मनिष्ठ, तपोनिष्ठ, ऋषिमुनि ब्रह्मवृंदांना सुचना व आमंत्रण देऊन त्यांना यज्ञमंडपात उपस्थित राहण्यास आग्रहाची विनंती केली होती. त्यानुसार ठिकठिकाणचे सुप्रसिध्द ऋषिमुनि त्याठिकाणी हजर झाले. राजाने सर्वांना अत्यंत आग्रह करून करून मनइच्छित अन्नवस्त्र सुवर्णदान केले. ज्याला जे हवे असेल ते दान करून सर्वांना सतुंष्ट केले. सर्वत्र आनंदी आनंद उत्सव मंलगमय वातावरण पसरले होते. एवढ्यात कश्यपाबरोबर निघालेले ऋषिमुनि व त्यांच्याबरोबर आलेला बटु वामन हे सर्व राजद्वारावर येऊन पोहोचले. राजद्वारावर त्यांचे यथोचित स्वागत केले. त्यात बटु वामनाने केलेले राजाचे पुण्याहवाचन आणि शुभेच्छा सुचक समाचार ऐकून द्वाररक्षक चकित झाले. ती अस्खलित वेदोक्तवाणी आजपर्यंत त्यांनी ऐकलीही नव्हती. ताबडतोब धावत जाऊन एका दूताने बलीराजास ही घटना निवेदन केली की आपल्या राजद्वारावर कांही महात्मे ऋषिमुनि आलेले आहेत. पण त्यांच्याबरोबर एक बटू सुध्दां आहे. तो अत्यंत सुंदर व तेज:पुंज आहे, जसा प्रतिसूर्यच. त्याची वाणी अगदी अस्खलीत व मधूर अशी असून चारही वेद मुखपाठ म्हणत आहे. महाराज, ही सुचना देण्याकरितां आम्ही आलेलो आहोत की, आपण ताबडतोब येऊन तशा महात्म्यांचे दर्शन घ्यावे, पूजन करावे. साक्षात नारायणच आपल्या द्वारावर आलेला आहे की काय अशी आम्हाला शंका वाटते. बली राजा तत्काळ उठून राजद्वारावर आला व अत्यंत नम्रभावाने त्याने ऋषिमुनि ब्रह्मवृंदाला नमस्कार केला. सर्वांचे यथोचित पूजन करून कुशलक्षेम विचारून स्वागत केले व यज्ञमंडपात सर्वांना घेऊन गेला.

बळीच्या यज्ञमंडपात सर्व ऋषिजन आल्यावर बळीने सर्वांचा वस्त्राभरणे दानदक्षिणा देऊन सत्कार केला. सर्वांना बसण्यासाठी आसने दिली. सर्व ऋषि मंत्र घोष करू

लागले. त्यात बटू वामनाचे मनोहर मंत्रोच्चारण पाहून बलीराजा अगदी मुग्ध होऊन गेला. तो आपले गुरु शुक्राचार्यांना कौतुकाने म्हणाला, -'हे गुरो, आजपर्यंत आपणाकडे पुष्कळ ब्राह्मण आले परंतु यासारखा विद्वान मी पाहिला नाही.' याप्रमाणे बळीने शुक्राचार्याजवळ वामनाची स्तुती करून त्यास आपणाजवळ बोलवून घेतले व त्याला आपल्या शंभर यागाविषयी सांगू लागला. तेव्हा वामन म्हणाला, - 'राजा, हे शंभर यज्ञ तू केलेस खरे पण ज्या पध्दतीने करावयास पाहिजे होते तसे मुळीच झाले नाहीत. तुझ्याजवळ कोणी विद्वान ब्राह्मण नसल्यामुळे ही अशी चूक झाली असे मला वाटते. या तुझ्या शुक्राचार्य गुरुने तिन्ही अग्नीची स्थापना उलटी केली आहे. तसेच ग्रहांची पूजाही उलटी झालेली आहे. त्यामुळे मंत्रभ्रष्टतेचा दोष राजाला लागला आहे.' याप्रमाणे बळीला वामनाने शुक्राचार्याजवळ असतांना अनेक श्रुति वगैरे वरून स्पष्ट करून दाखविले. वामनाची ती प्रखर विद्वता पाहून बळीला फार आश्चर्य वाटले. आणि तो वामनाला म्हणाला, 'हे बटू आपण कोठे राहता? आपले आईबाप कोण? आपण हा एवढा शास्त्रांचा अभ्यास इतक्या लहानपणी कोठे व कोणाकडून केला? हे मला कृपा करून सांगावे.' हा बळीचा प्रश्न ऐकून वामनाला हसू आले. तो म्हणाला, 'बळीराजा, माझा वास कोणत्याही एका स्थळी असा नाही, त्यामुळे मी अमूक ठिकाणचा राहणारा आहे असे मला सांगता येत नाही. तसेच आई-बाप कोण तेही मला आठवत नाही. मग त्यांची नावे तरी मला कोठली माहित? विद्याभ्यास असाच स्वत: ऐकून ऐकून केला. जात कोणती कुळ कोणते तेही मला माहित नाही. मी आपला असा भटकणारा परदेशी असून एकटा आहे. तू महादानशील राजा असून शंभर याग करीत आहेस असे ऐकून या ब्राह्मणांबरोबर तुझ्याकडे आलो आहे. बटूचे हे भाषण ऐकून बलिराजा प्रसन्न झाला. त्याला खूप आनंद झाला व तो विनवणी करू लागला की - 'हे विद्यासंपन्न बटो! आपणास काय दान करूं बरे! आपली इच्छा काय आहे ती मला निवेदन करा. मी ती निश्चित पूर्ण करतो. आपणास अन्न वस्त्र हवे काय? वामन म्हणाला, 'नको, अन्नवस्त्राची मला इच्छा नाही.' 'मग सुवर्णदान' 'नको, तेसुध्दां नको.' 'हत्ती, घोडा, नोकर, चाकर,' 'नकोऽ नकोऽ , ते घेऊन मी काय करू?' 'पृथ्वीवरील एखाद्या भागाचे अथवा संपूर्ण पृथ्वीचे राज्य.' 'ते सुध्दां नको.' 'माझा संपूर्ण अर्थभांडार, स्थावर जंगम मालमत्ता देऊ?' 'नको राजा, मला ते सुध्दा नको.' 'मग एखादे वैकुंठ कैलासासारखे मंदीर बाधून देऊ काय?' 'राजा, मला ते घेऊन काय करायचे? त्याचा उपभोग घेणारा माझ्याजवळ दुसरा कोणीही नाही.' मग ही

उपाधी जवळ बाळगून मी काय करू? मला त्याची गरज नाही.' शेवटी बळीराजा म्हणाला, 'हे बटो, आपणास जर कांहीच नको आहे तर मग माझ्याजवळच राहा. पण स्वामी कांही तरी दान घेतल्याशिवाय माझ्या मनाची शांति व्हावयाची नाही. (श्लोक ४७-८६)

बळीराजा वामनाला म्हणाला, 'वामना, तू माझ्या या यागसमयी याचनेसाठी आलास याबद्दल मला फार आनंद होतो. तुझी जी इच्छा असेल ती मला सांग मी ते देण्यास तयार आहे.' तेव्हा वामन म्हणाला, 'राजा, मला फक्त तीन पाऊले जागा पाहिजे.' हे वामनाचे मागणे ऐकून बळीला हसू आले व तो म्हणाला, 'बटो, हे आपण अगदीच थोडे मागितले. काही देश, दुर्ग, सोने, रत्ने वगैरे मागावे अशी माझी इच्छा आहे. आपणासारख्या विद्वान ब्राह्मणाला अवघी तीन पावले जमीन देणे यात माझी दानशिलता मुळीच दिसून येणार नाही. माझी एवढी पृथ्वी असून फक्त तीनच पावले जमीन दान करायची मला लांछनास्पद वाटते. तरी याहून अधिक मागायचे असेल तर मी ते देतो. वामन म्हणाला,- 'बळीराजा, तू त्यागी वृत्तीचा आहेस गोष्ट खरी आहे. पण आम्हां ब्राह्मणांना देश आणि पैसा घेऊन काय करायचे आहे? संपत्ति बोलून चालून चंचल आहे. ती कोणाजवळ एकसारखी राहात नाही. मला फक्त माझ्या पावलांनी मापून तीन पावले भूमी दे म्हणजे मला संतोष होईल. शुक्राचार्याने सर्व प्रकार आंतरदृष्टीने जाणून तो राजाला म्हणाला - 'राजा हा बटू कपटवेषधारी विष्णु आहे. वामन अवतार धारण करून तो तुझा नाश करण्यासाठी आला आहे. करिता त्याचे ऐकू नको?' ते शुक्राचार्याचे भाषण ऐकून बळी म्हणाला, - 'गुरूवर्य जर प्रत्यक्ष भगवान माझा नाश करण्यासाठी आले असतील तर मी खरोखरच मोठा भाग्यवान आहे असे समजेन. मी त्याला वचन दिले आहे. त्या वचनापासून कधीही ढळावयाचा नाही. एकवेळ समुद्र आपली मर्यादा सोडील, शेष आपल्या मस्तकावरील पृथ्वी टाकील पण मी आपले वचन कधीही परत घेणार नाही.' बळी आपले ऐकत नाही असे पाहून शुक्रचार्याला फार राग आला व त्याने बळीला तू श्रीहीन होशील असा शाप दिला.

शुक्राचार्याच्या रागास व शापासही न जुमानता बळीने निश्चयाने वामनास आसनावर बसवून षोडशोपचारे पूजा केली आणि पाण्याची झारी आणून संकल्पजल सोडण्यास सुरुवात केली. पण झारीतून पाणी पडत नव्हते. राजाने बराच प्रयत्न केला पण पाणी बाहेर येईना. कारण शुक्राचार्याने हा संकल्प पूरा होऊ नये म्हणून स्वत:

सूक्ष्मरूपाने पाण्याचा मार्ग अडविला होता. हे वामनाने अंतर्ज्ञानाने जाणून एक सळई झारीच्या तोटीत घातली. त्यायोगे शुक्राचार्याच्या डोळ्यास दुखापत झाली व शुक्राचार्य कायमचा एकाक्ष बनला. शुक्राचार्य पाण्याच्या मार्गातून दूर होताच झारीतील पाणी बाहेर पडले व राजाने तीन पावले जमीन व अर्धा पाऊल दक्षिणा असा साडेतीन पावलांचा संकल्प सोडला. संकल्पाचे उदक वामनाचे हातावर पडताच त्याने विराट रूप धारण केले.

भगवान वामनाच्या हातावर संकल्पजल सोडताच त्याने विराट देह धारण केला. त्या विराट पुरुषाचे पाय पाताळात व मस्तक एकवीस स्वर्गमंडळे व्यापून वर गेले. वक्षस्थळावर सूर्य, कंठप्रदेशी तारका व बाहूंनी दिग्मंडले व्यापली होती. असे ते विराट स्वरूप पाहून सर्व भयभीत झाले. परंतु बळीला ते रूप पाहून फार आनंद झाला. प्रभुने आपणास आज आपल्या मूळ स्वरूपाने दर्शन दिले याबद्दल फार धन्यता वाटली. नंतर विष्णूने आपल्या एका चरणाने संपूर्ण भूमंडळ व्याप्त केले. दुसरा चरण स्वर्गात तर तिसरा चरण पाताळात ठेवला. तीनही चरण पूर्ण झाल्यावर भगवंतांनी बलीस सांगितले, 'हे दानशूर बलीराजा अर्धा पाऊल दक्षिणेचा अजून राहिला आहे आता तो अर्धा चरण कोठे ठेवू? जर ही अर्धा चरण जागा तू देऊ शकला नाही तर तुझे केलेले सर्व दानकर्म व्यर्थ जाईल. तुझे ब्रीद तुझे वचन व्यर्थ होईल. याकरिता हे राजा ताबडतोब तू मला अर्ध्याचरणाची जागा दाखीव व वचन पूर्ण कर. बलीराजाने सुक्ष्मरूपाने सारे त्रिभुवन धुंडाळले पण जिकडे पाही तिकडे विष्णुचे चरण त्यास दिसत. एकही जागा विष्णु चरणाशिवाय खाली पडलेली त्यास आढळली नाही. शेवटी त्याने भगवतांची विनंती केली की, देवा आता हा अर्धा चरण माझ्या मस्तकावर ठेवून मला ब्रह्म ऋणातून मुक्त कर.' बळीची विनंती मान्य करून देवाने त्याच्या मस्तकावर उजवा पाय ठेवून त्याचा उध्दार केला. सप्त पाताळाच्या तळावर त्यास आणले तो त्या विष्णुचरणाशी लीन झाला. त्याच्या विद्या आणि जलपद्मिणी या दोनही स्त्रीयांनी प्रभुच्या चरणाची षोडशोपचारे पूजा करून त्यासुध्दां भगवंताच्या गुणाचे व चरित्राचे गुणगान करू लागल्या. ( श्लोक १२२-१४३ )

बळीराजाचे वर्तमान समजताच त्याचा आजा प्रल्हाद ब्रह्मदेवाला बरोबर घेऊन आला व त्यांनी विष्णुची विनंती केली. भगवान म्हणाले, 'मला निष्कांचन भक्त विशेष आवडतात. राज्यसंपत्तीच्या मदाने उन्मत्त झालेल्यांना माझ्या पदाची प्राप्ति केव्हाही होत नाही यासाठी बळीला निष्कांचन करावे लागले. बळी माझा खरा भक्त आहे.

तो खरा दानशील असल्यामुळे मी त्याच्यापुढे हात पसरला व त्याने माझी इच्छा तृप्त केली. त्याला मी सप्त पाताळाचे राज्य देतो, त्याचा त्याने आनंदाने उपभोग घ्यावा.' असे सांगून भगवंताने बळीला पाताळात राज्यावर नेऊन बसविले. तेव्हा बळी म्हणाला, 'प्रभो, पृथ्वीवरून मला पाताळात आणले, पण माझी आठवण पृथ्वीवरील लोकांना राहील अशी काहीच तजवीज केली नाही. दानधर्म करणारा माझ्यासारखा नाश पावला असे जर झाले तर मृत्युलोकात दानधर्मच चालणार नाही व धर्ममार्ग बंद पडेल.' हे ऐकून भगवान म्हणाले, तुझी आठवण पृथ्वीवरील लोकांना अक्षय राहाण्याकरिता प्रत्येक वर्षी कार्तिक शुध्द प्रतिपदेच्या दिवशी लोक तुझी प्रतिमा करून तिचे पूजन करतील व तो दिवस मोठ्या आनंदाने घालवतील. याशिवाय प्रत्येक वर्षी चातुर्मासात शयनी एकादशी पासून प्रबोधिनी एकादशी पर्यंत (आषाढ शु. ११ ते कार्तिक शु. ११ पर्यंत) लग्नकार्य मंगलविधी बंद राहतील. कारण मी तुझ्या द्वारी द्वारपाल म्हणून राहील. हे बलीराजा, याप्रमाणे तुझी व तू केलेल्या अपूर्व दानकर्माची आठवण मी मृत्युलोकात ठेवलेली आहे. याप्रमाणे बळीला सांगून भगवान क्षीरसागरी निघून गेले.

बळी पाताळात राज्य करीत असता कांही दिवसांनी त्यास पुन्हा इन्द्राची अमरावती घेण्याची इच्छा झाली. तेव्हा तत्काल विष्णुचे वरूण पाशांनी तो बध्द झाला. तेव्हा प्रल्हादाने विष्णुची प्रार्थना करून बळीची बंधने दूर केली. मग बळीने प्रभूची अनन्यभावाने क्षमा मागितली व भगवंताने सदोदित आपल्या सन्निध राहावे अशी विनंती केली. भक्तवत्सल प्रभुने बळीची विनंती मान्य केली व तो बळीचे द्वारी द्वारपाल होऊन राहिला. अशाप्रकारे भगवंताच्या पाचव्या वामन अवताराच्या लीला येथे पूर्ण झाल्या. या अवताराच्या काळात भक्त कमळाधेन झालेला असून भगवान अनंताच्या भजनात भक्तिप्रेमात निरंतर राहून त्याने परमेश्वराची सायुज्य मुक्ति मिळविली.

बळीच्याच वंशात पुढे सहस्त्रार्जुन नावाचा दैत्य जन्माला आला. भगवान विष्णुने आपल्या पूर्वजांचा संहार केलेला आहे म्हणून त्याचा संहार करण्यासाठी तपश्चर्या करून त्याने हजार बाहु मिळविले व अत्यंत बलिष्ठ व गर्विष्ठ होऊन त्याने जगताला त्राही त्राही करून सोडले. त्यासाठी भगवंताला सहावा परशुराम अवतार घ्यावा लागला. (श्लोक १४४-१८७)

# ★ परम सद्भक्त कमलाधेनचे आख्यान ★

त्रेता युगातील परम भगवद्भक्त कमळाधेन हा भगवान अनंताचा अत्यंत प्रेमी व ज्ञानी भक्त झालेला आहे. चक्र पुष्करिणी तीर्थाच्या काठावर श्रीवत्स गोत्रातील कमळाधेन नावाचा ब्राह्मण राहात होता. त्याच्याजवळ संपत्ति, वैभव वगैरे काहीही नव्हते. तो कोणाकडून दान सुध्दा घेत नव्हता. भगवंताचे नामस्मरण किर्तन चिंतन हे त्याच्या जीवनाचे व्रत होते. सर्व इंद्रिये त्याच्या ताब्यात होती तसेच हृदयात दीन दुखीयांच्या विषयी दया होती. सत्याविषयी प्रेम, विषयाविषयी उपेक्षा व सर्व प्राणिमात्रांचे ठायी आत्मभाव हेच त्याचे जीवन. आपल्या सुखदु:खाची त्याने कधी पर्वाच केली नाही. परंतु दुसऱ्याचे दु:ख पाहूनच त्याचे हृदय द्रवत होते. केव्हा तो कोरडी पाने खाऊन तर कधी पाणी पिऊनच निर्वाह करी. तर कधी कधी भगवंताच्या स्मरणात एवढा तल्लीन होत असे की देहाचे भानसुध्दा हरपून जाई. तर मग खाण्यापिण्याचे भान कोठून राहणार? परंतु या तर सर्व बाहेरच्या गोष्टी होत. त्याचे हृदय भगवंताच्या प्राप्तीकरीता तळपत होते. त्याच्या दृष्टीने आपल्या जीवनास कांहीच महत्व नव्हते. असे एकच जीवन काय शंभर शंभर जीवने तो भगवंताच्या प्राप्तिकरीता अर्पण करणारा होता. त्याच्या हृदयात आशानिराशेचे भयंकर वादळ निर्माण होत होते.

केव्हा केव्हा तो विचार करीत असे की, 'भगवान अंनतविभु फार दयाळू आहेत. ते मला अवश्य प्राप्त होतील. मी त्यांच्या चरणकमलावर स्वात्मसमर्पण करीन. त्याचे चरण माझ्या प्रेमाश्रुंनी भिजवून धुवून काढीन.ते आपल्या कर-कमलांनी मला उठवून हृदयाशी लावतील. माझ्या शिरावर हात ठेवतील. मला आपला म्हणून स्विकारतील आणि मग मी आनंद सागरात विहार करीन. किती सौभाग्यदायक असेल तो क्षण. किती मधूर असेल त्या क्षणाचे जीवन. ते मला म्हणतील वरदान माग आणि मग मी म्हणेन मला कांहीही नको. मी तर फक्त तुमची सेवा करीन. तुम्हालाच सर्वत्र पाहीन. तुम्ही मला विसरून जा अथवा स्मरणात ठेवा पण मी तर तुम्हाला कधीही केव्हाही विसरणार नाही.' अशी भावना करीत करीत कमळाधेन आनंदमग्न होऊन जाई. त्याच्या शरीरात रोमांच उभे राही. डोळ्यातून प्रेमाश्रुंचा पूर वाही. त्याची ही प्रेममुग्ध अवस्था बराच वेळपर्यंत राही. तो सर्व जगतास विसरून परमेश्वराच्या सेवेत मग्न राहात असे.

कधी कधी त्याच्या चित्तात याच्या उलट भावना जागृत होत 'कोठे मी एक क्षुद्र प्राणी हीन दीन मलीन हृदय आणि कोठे अखिल ब्रह्मांडनायक भगवान! माझ्या या पापपूर्ण हृदयात का तो येईल. मी कोणती अशी साधना केलेली आहे की त्यावर मुग्ध होऊन तो परमेश्वर मला दर्शन देईल! ना जपना तप ना व्रत ना समाधी! ज्या हृदयाने त्याचे चिंतन करावयास हवे त्याने संसाराचे चिंतन घडते. हाच तर मोठा अपराध आहे. त्याचा दंड अवश्य मिळायलाच हवा. मी दु:खाच्या ज्वाळेत होरपळत आहे. विषयाकरिता जगतात भटकत आहे. तरीही भगवत्प्राप्तीची आशा करीत आहे. माझी ही आशा कधीतरी सफल होईल कां? ही दुराशा नव्हे का? शरीराकरिता किती चिंतामग्न होतो. विषयाकरितां किती उत्सुकता व्यापते हृदयात, संसाराकरितां किती वेळा मी रडलेलो आहे पण भगवंताकरितां दोन अश्रुबिंदू तरी आलेले आहेत का मला! कशी विडंबना आहे ही. किती पराङ्मुख जीवन आहे माझे. काय हेच जीवन भगवत्प्राप्तीकरीता आहे. अशा जीवनाचा तर विनाशच उचित आणि श्रेयस्कर आहे. अशाप्रकारे विचार करताकरता त्याच्या हृदयात इतकी वेदना होत होती की जणू हे हृदय फाटून विदीर्णच होत आहे. कित्येक वेळा मूर्च्छित होऊन बेहोशित तो म्हणत होता - हे प्रभो, हे स्वामी, हे पुरुषोत्तम हे भगवंता काय तू मला दर्शन देणार नाहीस? रडत रडत आणि विरहत विरहतच मरून जाणे माझ्या नशिबात आहे की काय? मी मृत्युला भीत नाही. या नीचजीवनाचा अंतच व्हायला हवा आहे. परंतु मी तुला पाहू शकणार नाही. कितीक जन्मांतरी तुझे दर्शन घडू शकेल हे सुध्दां समजत नाही माझी ही करूणार्द्र वाणी का तुझ्या विश्वव्यापी कानापर्यंत येत नसेल. स्विकारा प्रभु माझ्या दुर्बलाकडे न बघता त्याच्यात रमणाऱ्या अशा आत्मतत्वालाच आपण अवलोकन करा.' अशा प्रकारे प्रार्थना करीत करीत तो चेतनाशून्य होई आणि कित्येक घटिका तो तसाच बेहोश पडून राही.

लोक म्हणतात भगवंताच्या प्राप्तीकरीता तप करावे. पण तपाचा अर्थ काय आहे, यावर विचार करीत नाही ज्येष्टातील दुपारच्या प्रहरी जेव्हा सूर्य बारा कळांनी तळपतो पाच अथवा चौर्याशी अग्नीच्यामध्ये बसणे अथवा कडाक्याच्या थंडीत पाण्यात उभे राहणे यासच केवल तप म्हणत नाहीत. तपाचा अर्थ आहे आपण केलेल्या अपराधाचा पश्चाताप. आपल्या नष्ट भ्रष्ट जीवनस्थितीचा असंतोष आणि भगवंताच्या विरहाची ती ज्वाला जीवनातील साऱ्या कलुषतेला जाळून तप्त सुवर्णाप्रमाणे जीवनाला उजळून काढते हाच तपाचा खरा अर्थ आहे. हाच ताप देवदुर्लभ तप आहे. कमळाधेनचे जीवन याच तपश्चर्येने परिपूर्ण होते आणि तो खऱ्या अर्थाने तपस्वी होता.

एके दिवशी त्याची ही तपश्चर्या परिसिमेला गेली. त्याने खऱ्या हृदयाने संपूर्ण शक्तिनिशी भगवंताची प्रार्थना केली. हे प्रभो, आता मला अधिक त्रास देऊ नकोस. तुझ्या दर्शनाच्या आशेत आता मी आणखी किती दिवस जिवंत राहू ?

एकेक पळ कल्पासमान जात आहे. जगत् शून्यवत दिसत आहे आणि हे माझे दग्धजीवन हे प्रभुहीन जीवन विषाहूनही कटू वाटत आहे. हे डोळे काय उपयोगाचे, ज्यांनी आजपर्यंत तुझे दर्शन केले नाही. आता यांचे नष्ट होणेच हिताचे आहे. जर या जीवनात आपण मिळत नसाल तर त्यास नष्ट करून टाका. मला स्त्री-पुत्र-धन-जन-लोक-परलोक वगैरे काहीही नको. मला तर तुझे दर्शन, तुझी सेवाच हवी आहे. एकदा तू माझा स्विकार कर. बस! एवढीच आशा. हत्ती, मगर, गणिका गृध्द यांच्यावर तू कृपा केलीस. का तेवढी पात्रता माझे ठायी नाही? तू तर कृपाळू, कृपापरवश आहेस. कृपाळूत्व हेच तुझे ब्रीद आहे. माझ्यावरही आपल्या कृपेचा एक किरण टाका अशी प्रार्थना करीत करीत भक्त कमळाधेन भगवंताच्या अहैतुकी कृपेच्या स्मरणात तन्मय होऊन गेला.

भगवंताच्या धैर्याची सुध्दा सीमा असते. तो आपल्या प्रेमीयापासून कोठपर्यंत लपून बसणार. तो तर सर्वदा सर्वत्र सर्वांच्या जवळच राहतो. फक्त प्रगट होण्याचा योग्य वेळ पाहात असतो. तो तर कमळाधेनच्या हृदयात प्रथमपासूनच होता. त्याचे तप उत्कंठा आणि आर्त प्रार्थना पाहूनच तो मुग्ध झालेला होता. जेव्हा त्याचा अवधी पुरा झाला तेव्हा तो कमळाधेनच्या समोर प्रगट होऊन उभा राहिला ते सर्व स्थान भगवंताच्या दिव्य अंगज्योतीने झगमगून गेले, कमळाधेनचे डोळे त्या प्रकाशाला रोखू शकत नाही. त्याचे नेत्रकमल आपोआप खुलले. हजारो सूर्यांच्या दिव्य झगमगाटात त्याला भगवंताची शंख चक्र गदा पद्मधारी मूर्ति दिसू लागली. त्याचे हृदय शीतल झाले. डोळे निर्निमेष होऊन भगवंताच्या रूपरसाचे अमृतपान करू लागले. भक्ताचे संपूर्ण हृदय भगवंताच्या कृपापूर्ण नेत्रातून स्त्रवणाऱ्या प्रेमधारेत न्हाऊन निघाले. त्या करूणासागरात तो पूर्ण निमग्न झाला. जन्मोजन्मांची अभिप्सा पूर्ण झाली.

काही क्षण नि:स्तब्ध राहून गद्‌गद वाणीने कमळाधेन स्तुति करू लागला. प्रभु तूच खरोखर माझा अखिल जगताचा आणि हे जगत्चक्र चालविणाऱ्या साऱ्या देवांचा स्वामी आहेस. संपूर्ण ऐश्वर्य आणि माधुर्य तुझ्याच आश्रयाने आहे. तू पतितपावन आहेस. आपल्या स्मरणमात्रानेच साऱ्या पातकांचा नाश होतो. तू घट घट व्यापी

असून जगताच्या आत व बाहेर तूच व्यापलेला आहेस. तू विश्वातील विश्वेश्वर आणि विश्वरूप असूनही भक्तावर कृपा करून त्याच्यासमोर प्रगट होतोस. ब्रह्मा आदि देवता आपले रहस्य जाणू शकत नाही. केवळ आपल्या चरणकमळी भक्तिभावाने नम्र होऊन प्रणाम करतात. तुझी सुंदरता कोमलता आणि प्रेमपरवशता कोणाला आकृष्ट करू शकत नाही. तू क्षीरसागरी शयन करतोस पण भक्तांच्या विपत्तींचा नाश करण्याकरिता सर्वत्र चक्रधारी रूपाने विद्यमान असतो. भक्त तुझे आहेत आणि तू भक्तांचा. ज्याने तुझ्या चरणरावर आपले शीर झुकविले त्याला तू साऱ्या विपत्तिमधून सोडवून परमानन्दमय असे आपले दिव्य धाम दिलेस. तू योगियाकरिता समाधिगम्य आहेस. वेदान्तीयांना ज्ञानस्वरूप आत्मा आहेस आणि भक्तांचे सर्वस्व आहेस मी आपला आहे. आपल्या चरणी समर्पित आहे. लीन आहे असे म्हणून कमळाधेन विराम पावला. स्तब्ध झाला.

भगवान जाणत होते की कमळाधेन हा निष्काम निरिच्छ भक्त आहे. त्याच्या चित्तात सांसारिक भोगांचीच काय पण मुक्तीची सुध्दा कामना नाही म्हणून त्यांनी कमळाधेनास वर माग असे देखील म्हटले नाही. त्याच्या चित्ताची स्थिती जाणून अमृतोपम वाणीचे त्याच्यावर सिंचन करून भगवान म्हणाले, 'हे महाभाग ब्राह्मण देव मी जाणतो कीं, तुझ्या हृदयात केवळ माझ्याच सेवेची कामना आहे. तू लोक-परलोक, मुक्ति आणि वैकुंठधामाचा सुध्दा परित्याग करून माझी पूजा व सेवा करण्याचेच मनात धरत आहे. ती तुझी इच्छा पूर्ण होईल. कल्पपर्यंत माझ्या सान्निध्यात सेवारत होऊन तू येथेच रहा. अंती तर माझ्याच स्वरूपात तुझा लय होईल.' असे म्हणून भगवान अंतर्धान पावले आणि भक्त कमळाधेन भगवंताची शारीरिक व मानसिक सेवा करीत करीत आपले सर्वश्रेष्ठ आनंदमय जीवन व्यतीत करू लागला. कमळाधेनची प्रत्येक क्रिया त्याची प्रत्येक भावना केवळ भगवंताकरिताच होत होती आणि स्वभावत:च त्याच्या द्वारा जगताचे कल्याणच संपन्न होत होते. असे भक्त एकांतात राहून भगवंताच्या सेवेत रत असूनही आपल्या शुध्द संकल्पाने जगताची जेवढी सेवा करतात तेवढी मोठ मोठे कर्मनिष्ठ सुध्दा करीत नाही.

अशा प्रकारे सेवा पूजा करीत असतांना कमळाधेनचा बराच काळ निघून गेला. तो एके दिवशी पूजा साहित्य जमवीत असता एका भयंकर राक्षसाने त्याच्यावर आक्रमण केले. त्यास आपल्या शरीराचा मोह नव्हता. मेल्यानंतर मला कोणत्याही दु:खमय स्थानी जावे लागेल अशी सुध्दां शंका त्याच्या चित्तात उद्भवली नाही.

पण राक्षस खाऊन टाकेन या कल्पनेने त्याच्या चित्ताव असा प्रश्न उद्‌भवला कीं भगवंताने आपल्या सेवेची मला जी संधी दिली होती तिची आजच समाप्ति होते की काय? भगवंताने एक कल्पपर्यंत सेवा पूजेचा लाभ करवून दिला होता ते वचन असत्य होईल काय? ही तर फारच दु:खद घटना होईल असे चिंतन करून तो भगवंताची अनन्यभावाने प्रार्थना करू लागला. भगवंतानी आपल्या प्रिय भक्ताच्या रक्षणाकरितां आपले सुदर्शन चक्र सोडले. चक्राच्या त्या गोलाकार दिव्य तेजोवलयाचे विलक्षण तेजस्वी स्वरूप पाहूनच राक्षस भीतीने पळू लागला. पण शेवटी त्या दिव्य चक्राने त्याला मारून त्याचा उध्दार केला.

तो राक्षस सोळा वर्षापूर्वी एक सुंदर नावाचा गंधर्व होता. कांही प्रमादावरून वसिष्ठ ऋषीने त्यास राक्षस होण्याचा शाप दिला होता पण त्याच्या स्त्रियांच्या विनंतीवरून वसिष्ठांनी सोळा वर्षानंतर हा जेव्हा कमळाधेनला मारण्याकरिता त्याच्या अंगावर धावून जाईल तेव्हा भगवान नारायणाच्या सुदर्शनापासून त्याला मुक्ति मिळेल असा उ:शाप दिला होता. अशा रितीने दिव्य शरीर धारण करून दिव्य आभुषणांनी युक्त त्या सुंदर गंधर्वाने सुदर्शनचक्राचे दर्शन घेऊन व कमळाधेनला प्रणाम करून दिव्य विमानात बसून देवलोकात निघून गेला.

कमळाधेनने सुदर्शन चक्राची स्तुती करीत म्हटले - 'हे सुदर्शना, मी तुला वारंवार नमस्कार करतो. जगतातील भक्तांचे रक्षण करणे हे तुझ्या जीवनाचे व्रत आहे म्हणून भगवंतांनी तुला आपल्या करकमलातील दिव्य आभूषण बनविले. तू वेळोवेळी अनेक भक्तांना संकटमुक्त केलेले आहे. मी तुझ्या या कृपेचा अत्यंत ऋणी आहे. माझी तुला प्रार्थना आहे की तू या जगताचे रक्षण करण्याकरिता इथेच राहा.'

सुदर्शन चक्राने भक्त कमळाधेनची प्रार्थना स्विकारून म्हटले की, हे भक्तवर तुझी प्रार्थना कधीच व्यर्थ होणार नाही. कारण तू भगवंताचा परमप्रेमी व कृपापात्र आहेस. मी तुझ्या सन्निधच नित्य निवास करीन. तू निर्भय होऊन भगवंताची सेवा पूजा कर. आता तुझ्या सन्निधच राहिल्यामुळे तुझ्या उपासनेत कोणतेही विघ्न येणार नाही.' अशाप्रकारे भक्त कमळाधेनला वरदान देऊन सुदर्शन चक्राने जवळच्याच पुष्करिणीत प्रवेश केला. तेच चक्रतीर्थ होय. भगवंताच्या कृपेचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन भक्त

कमळाधेनचे हृदय प्रेमाने व आनंदाने भरून आले. तो आणखीच तन्मयतेने व तत्परतेने भगवंताची सेवा पूजा करू लागला. अशा प्रेमी भक्ताचेच जीवन धन्य होय. कारण कीं, पळापळाने आणि पावलोपावली भगवंताच्या परम अनंत कृपेचा अनुभव घेऊन त्यातच ते तन्मय होत असतात.

तलातल पाताळातील सद्भक्त राजा गंधर्वसेनचा प्रधान पुष्पसेन हा अत्यंत सुशील, गुणवान व प्रेमीभक्त होता. त्याला भगवान मत्स्य अवताराने तू त्रेतायुगात वामनअवताराच्या वेळेस सद्भक्त कमळाधेन होऊन माझी सायुज्ज मुक्ति मिळवशील अशाप्रकारचे वरदान दिलेले होते ते येथे पूर्ण झाले.

॥ इति श्री वामन अवतार समाप्त ॥

॥ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु ॥

॥ ॐ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नमः ॥

# षष्ठ श्री परशुराम अवतार प्रारंभ

वामन अवताराचा कालखंड लोटल्यानंतर बळीराजाने ज्याठिकाणी शंभर याग पूर्ण केले होते त्याठिकाणी महिकावती नगरीत कृतवीर्य नावाचा राजा राज्य करीत होता. त्याची स्त्री रंकावती होती. एकदा सायंकाळच्या सुमारास रंकावती कृतवीर्याजवळ भोग मागू लागली. तेव्हा कृतवीर्याने ही वेळ चांगली नसून यावेळी संभोग केल्यास असुर प्रकृतीचा पुत्र होतो. म्हणून रंकावतीला सांगितले. परंतु रंकावती ऐकेना म्हणून त्याने तिला रतिदान दिले. ती संधी साधून शिखी राक्षसाच्या मधु नावाच्या शाप पावलेल्या पुत्राने तिच्या गर्भात प्रवेश केला. या मधु राक्षसाने एकदा शंकरास पूजेच्या वेळी त्रास दिला होता. तसेच पार्वती अनेक प्रकारची फुले आणून महादेवाची प्रत्यही पूजा करीत असे. त्या पार्वतीच्या त्याने एक हजार पुजा मोडल्या होत्या. म्हणून महादेवाने त्याला शाप दिला होता की तू पुढील जन्मी हातावाचून जन्म पावशील व पुढे फार दुःख भोगशील. त्याप्रमाणे तो मधु दैत्य नारायणाचे हातून मृत झाल्यावर रंकावतीचे गर्भात प्रवेश करून त्याने सहस्त्रार्जुन या नावाने पृथ्वीवर जन्म घेतला. तो जन्मला तेव्हा त्याला शापामुळे हात मुळीच नव्हते. पण त्याने दत्तात्रेयाची पुष्कळ दिवस सेवा करून त्यांना प्रसन्न केले आणि 'मला सर्व शरीरभर हात दे व सर्व भूमंडळात मला अजिंक्य कर.' असा वर मागून घेतला. नंतर सहस्त्रार्जुनाने शंकराची कित्येक वर्षे तपश्चर्या करून घेतल्यावर सहस्त्रार्जुन महिकावतीस आला. पुढे त्याने संपूर्ण पृथ्वी जिंकून सर्वांना त्रस्थ करून सोडले.

एकदा लंकेचा राजा रावण दिग्विजयासाठी गेला होता तो तिकडून जंय मिळवून लंकेस परत जात असता पूजेची वेळ झाली म्हणून नर्मदेच्या काठी स्नान वगैरे करून शिवपूजा करीत बसला. त्याचवेळी सहस्त्रार्जुन स्नानासाठी नर्मदेवर आला होता. त्याने सहज लिलेने आपल्या सहस्त्रभुजा पाण्यावर पसरवून पाण्याला बंधारा घातला. त्यामुळे नर्मदेचे पाणी वरच्या बाजूला वाढू लागले. त्यायोगाने रावणाने स्थापन केलेले शिवलिंग पूजा वगैरे सर्व वाहून गेले. तेव्हा रावणास अत्यंत राग आला व त्याने आपल्या प्रधानाला असे होण्याचे कारण काय याचा शोध करण्यास सांगितले. त्याचा प्रधान पुढे जाऊन पाहू लागला तो सहस्त्रार्जुन नर्मदेत स्नान करीत असून त्याने आपल्या बाहुंनी पाण्याला बंधारा घातला आहे असे त्यास दिसले. तो पाहिलेला सर्व प्रकार प्रधानाने येऊन रावणास सांगितला त्याबरोबर रावणास अत्यंत क्रोध आला.

तो सर्व सैन्यासह सहस्त्रार्जुनाचे अंगावर धावून गेला. पण सहस्त्रार्जुनाने क्षणार्धात रावणाच्या सैन्याचा नाश केला व रावणास पकडून बंदीशाळेत ठेवले. ते वर्तमान प्रधानाने लंकेत जाऊन रावणाचा बाप विश्रवा व आजा पौलस्ती यांना सांगितले. ते दोघे ब्रह्मदेवाकडे गेले व त्यांनी ब्रह्मदेवाला झालेली सर्व हकिकत सांगून रावणाची सुटका करण्याविषयी विनंती केली. मग ब्रह्मदेव त्या दोघांना घेऊन महिकावती सहस्त्रार्जुनाकडे आला व त्याने रावणास सोडून देण्याविषयी सहस्त्रार्जुनाला सांगितले. सहस्त्रार्जुन म्हणाला हे चतुरानना तू माझ्या घरी याचक होऊन आलास हीच त्या रावणाला पुष्कळ शिक्षा झाली असे म्हणून सहस्त्रार्जुनाने रावणास ब्रह्मदेवाचे स्वाधीन केले. अशाप्रकारच्या अतुल बल संपन्न सहस्त्रार्जुनाने एकदा सहज आपल्या गुरुला विचारले, 'गुरुजी, माझे मरण कोणाच्या हातून आहे.' गुरुने अंतर्ज्ञानाने जाणून सांगितले - 'जन्मदग्निऋषि व रेणुका यांचा मुलगा अतुल पराक्रमी परशुराम याच्या हातून तुझे मरण आहे, असे माझे भविष्य सांगते.' असे जर आहे तर मग आधीच त्या परशुरामाला मारून टाकायला पाहिजे असे सहस्त्रार्जुनाने ठरवून तो परशुरामास मारण्यासाठी युक्त्या योजू लागला. पण काही केल्या त्याला योग्य साधन सापडेना म्हणून बुध्दिबळाचा उपयोग करून त्याने असे एक यंत्र तयार करण्याचे ठरविले की त्यामध्ये परशुरामाला घालून व कळ दाबून यंत्र फिरताच हजारो तलवारींनी त्याचे शरीर अनायासेच छीन्नभिन्न व्हायचे, असा विचार करून तो ते यंत्र पिंजरा तयार करण्याच्या उद्योगाला लागला. (श्लोक १-१७)

परशुरामाने सहस्त्रार्जुनाचा खटाटोप जाणला व स्वत: एका वृध्द ब्राह्मणाचे रूप घेऊन हातात काठी, खांद्यावर उपवस्त्र, गंध वगैरे लावून परशुराम सहस्त्रार्जुनाकडे आला. सहस्त्रार्जुनाने नुकताच पिंजरा तयार करून किरकोळ कामकाज करीत होता. त्याच ठिकाणी जाऊन उभा राहिला. परमतेजस्वी व वृध्द ब्राह्मणास पाहून राजाने त्यास नमस्कार करून आदरातिथ्य केले, त्याचा मानसन्मान करून बसविले. ब्राह्मण म्हणाला, हे राजा सहस्त्रार्जुना तु माझा यजमान असून मी तुझा पुरोहित गोर आहे. राजाला आश्चर्य वाटले. हा ब्राह्मण आजपर्यंत आपल्या पाहण्यात आला नाही आणि माझा पुरोहित गोर म्हणवितो म्हणून राजाने त्यास विचारले, 'गोर महाराज आपण कोणत्या देशातून आलात, आजपर्यंत आपले दर्शन मला घडले नाही. वृध्द ब्राह्मण म्हणाला, 'हे राजा मी बऱ्याच लांबच्या देशाचा रहिवाशी आहे. मुंजपूरनगर हे माझे गाव आहे, सध्या त्या देशात परशुराम राज्य करीत आहे.' परशुरामाचे

नाव काढताच राजा रागाने लालबुंद झाला व म्हणाला, 'हे गोर महाराज माझे कार्यभाग अनायासेच झाले. आपण आता आलेलाच आहात व तेही परशुरामाच्याच राजधानीचे रहिवाशी आहात तर मला एक गोष्ट सांगा तो परशुराम साधारणत: दिसायला लांबी-रुंदीला केवढा आहे. ठेंगु आहे का उंच, जाड आहे की दुबला-पतला वगैरे सर्व वर्णन त्याचे सांगा तेव्हा ब्राह्मण म्हणाला, बाबारे याचे कारण काय? तुला त्याच्याशी काय करायचे आहे. सहस्त्रार्जुनाने सांगितले तुम्ही माझे पुरोहितच आहात तेव्हा तुम्हास सांगण्यास हरकत नाही. आमचे राजगुरु सांगतात की त्या परशुरामाचे हातून माझे मरण आहे. मी तर शंकराला प्रसन्न करून हे एक हजार हात मागून शिवाय अमृतही मिळविलेले आहे. पण तो कपटी कसा घात करील याचा नेम नाही. म्हणून त्याला आधीच नकळत पकडून आणून या पिंजऱ्यात कोंबून त्याचा नाश करायचा मी ठरविले आहे. पण त्याचे प्रमाण माहित नसल्यामुळे व त्याला मी पाहिलेले नसल्याने हे यंत्रपूर्ण करता येत नाही. म्हणून तुम्ही त्याचे प्रमाण सांगा म्हणजे मी हे यंत्र पूर्ण करून पुढच्या कामाला लागतो.' ब्राह्मण म्हणाला अरे त्यात काय विशेष जेवढा तू तेवढाच तो परशुराम आहे. बघ अगदी तुझ्या प्रमाणाचा आहे. पण मी म्हणतो तू एवढा पराक्रमी शूर वीर असून त्याला असा भिऊन कपटाने मारशील यात तुझा पराक्रम तो काय दिसेल. त्यापेक्षा प्रत्यक्ष युध्द करून त्याला का मारीत नाहीस. राजा म्हणाला तुम्ही म्हणता ते ठिक आहे. पण तो मायावी कपटी आहे. माझ्या पूर्वजांचा त्याने असाच कपटाने घात केला होता. त्याला जशास तसे या न्यायाने असेच मारायचे आहे. ब्राह्मण म्हणाला, अगदी बरोबर आहे बघ तुझे म्हणणे! अरे तुझ्या पाच पिढीचा त्याने असाच संहार केला आहे. हिरण्यकश्यपु, बलीराजा वगैरे एवढे महाबलाढ्य पण त्याने कपटाने त्याचा संहार केला त्याचा मोबदला तू घेच पण मला समजत नाही या पिंजऱ्याने तू त्याला कसा मारशील? राजा मोठा आढ्यतेने म्हणाला, तीच तर खरी हुशारी आहे. हे बघा तुम्हाला माझे चातुर्य आताच समजून येईल असे म्हणून सहस्त्रार्जुनाने मोठ्या आढ्यतेने आपण तयार केलेले यंत्र दाखवून माहिती दिली. पण ब्राह्मणाच्या लक्षात ते येईना म्हणून त्याने प्रत्यक्ष त्या यंत्रात शिरून दरवाजा बंद करण्यास सांगितले व मग ब्राह्मणाने त्या यंत्राची कळ दाबून यंत्र सुरु केले व मग आपले मुळ रूप प्रगट केले. कळ दाबताच पिंजरा एकदम आकाशत उडाला व गरगर फिरून जमिनीवर आदळून पुन्हा वर गेला. अशा दोन तीन झोकांड्या घेतल्यावर गरगरत्या तलवारीच्या पात्यांनी सहस्त्रार्जुनाचे सर्व बाहू कापले गेले. तसेच सहस्त्रार्जुनाने बाहेर

उभ्या असलेल्या परशुरामाला म्हटले, अरे कपटच्या, घातक्या असा माझा विश्वासघात केलास काय. थांब!मला बाहेर काढ मी तुला माझ्या पराक्रमाचा तमाशा दाखवितो. पण शेवटी त्यात तो मरण पावला व परशुराम अवतार प्रगट होऊन त्याला दर्शन देऊन त्याची प्राण्यज्योत आपल्या प्राणात सामावून घेतली. अशाप्रकारे परमेश्वराच्या सहाव्या अवताराची अवतार लीला झालेली आहे.

श्री परशुराम अवताराबद्दल पुराणांतरी कथा येते ती अशी. पूर्वी इक्ष्वाकु घराण्यात रेणु या नावाचा एक महान पराक्रमी राजा होऊन गेला. भागिरथीचे काठी कान्यकुब्ज नावाच्या प्रसिध्द शहरी राहून तो आपल्या राज्याचा बंदोबस्त करीत असे. त्या राजाला संतति नसल्यामुळे त्याने पुत्र प्राप्तिसाठी शंकराची सेवा केली. महादेव प्रसन्न होऊन म्हणाले, हे रेणुराजा तुला एक उत्तम सर्वगुणसंपन्न अशी मुलगी होईल. तिची किर्ती दिगंतरी होईल तसेच तुला त्या कन्ये नंतर एक पुत्रही होईल. याप्रमाणे रेणु राजाला सांगून महादेव निघून गेले. पुढे रेणु राजाने अत्री, वसिष्ठ, भार्गव, गालव, गौतम, कौंडिण्य, जैमिनी ब्रह्मनंदन, मांडव्य, गर्ग्य, जाबालिक, शौनक, भारद्वाज, सम्यक, दाल्भ्य, विभांडक वगैरे ऋषींना बोलावून पुत्र प्राप्तीसाठी यागाला आरंभ केला. यागाचे वेळी पूर्णाहूति झाल्या. यज्ञकुंडातून एक तेज:पुंज व सर्वांग सुंदर कन्या निघाली. ऋषींनी त्या कन्येला उचलून घेऊन राजाच्या माडीवर बसविले. रेणु राजाने त्या कन्येचे नाव रेणुका ठेविले व आरंभिलेला याग यथासांग पूर्ण केल्यावर त्याला काही दिवसांनी एक पुत्र झाला. त्याचे नाव शूरसेन असे ठेविले.

ही अग्निकुंडातून निघालेली रेणुका जगन्माता पार्वती व कश्यपाची स्त्री जी अदिती या दोघींचा अवतार होय. एकदा पृथ्वीवर फार पाप झाले व लोकांना दुष्टापासून अत्यंत त्रास होऊ लागला. तेव्हा सर्व देव क्षीरसागरी येऊन नारायणाची प्रार्थना करून म्हणाले, 'हे देवाधिदेवा! पृथ्वीवर दुष्टांनी अत्यंत प्रलय मांडला आहे. त्यामुळे सर्व प्राणी त्रस्त झाले आहेत. यावेळी तू दुष्टांचा संहार न केल्यास सर्वपृथ्वीवर हाहा:कार होईल. हे प्रभो, हिरण्याक्षाचे वेळी वराह अवतार, हिरण्यकश्यपुचे वेळी नृसिंह अवतार व बळीचे वेळी वामन अवतार घेऊन त्यांचे हनन केलेस. त्याचप्रमाणे प्रभो! यावेळी अवतार धारण करून पृथ्वीवर उन्मत्त झालेल्या राक्षसांचा तू संहार कर.' देवांची ती करूणवाणी ऐकून भगवान श्रीविष्णु प्रसन्न झाले व म्हणाले, मी लवकरच अवतार धारण करून पृथ्वीवर उन्मत्त झालेल्या राक्षसांचा

संहार करीन परंतु यावेळेस मी अदितीचे उदरी संपूर्ण अंशाने येणार आहे. तेव्हा मी तिचे गर्भी असता ती माझे तेज सहन करील अशी कांही व्यवस्था करा. लक्ष्मीरमण श्रीपतींनी याप्रमाणे देवांना आश्वासन दिल्यावर देव आनंदीत झाले. ते अदितीकडे आले. तिला त्यांनी झालेले सर्व वर्तमान सांगून प्रभु गर्भात आल्यावर त्याचे तेज सहन व्हावे म्हणून तिला आपापली तेजशक्ति दिली. परंतु देवांच्या या तेजशक्तीने काही कार्यभाग होणार नाही असे अदितीला वाटल्यावरून तिने कैलास पर्वतावर जावून जगन्माता जी पार्वती तिची तपश्चर्या केली. तेव्हा कित्येक वर्षाच्या तपामुळे तिला पार्वती प्रसन्न झाली. त्यावेळी अदिति पार्वतीला म्हणाली, 'हे आदिमाये जगज्जननी! भगवान विष्णु माझ्या उदरी सर्व अंशाने अवतार धारण करणार आहे. भगवंताचे तेज मला सहन होणार नाही. हे माते पार्वती तू माझ्या शरीरात वास्तव्य कर म्हणजे मी भगवंताचा गर्भ सहन करीन.' आदितीची विनंती मान्य करून पार्वती तिला म्हणाली, 'मी तुझे ठिकाणी वास करीन पण तू आपले पतीचे शरीरात महादेव वास करतील अशी तजवीज कर.' पार्वतीने असे सांगितल्यावर अदिति शंकराचे तपश्चर्येस बसली व तिने शंकरास आपल्या भक्तिबळाने प्रसन्न करून घेतले. तेव्हा अदिति म्हणाली, 'हे कैलासपते, भगवान श्रीपति माझे उदरी अवतार घेणार आहे तर त्याचे तेज सहन व्हावे म्हणून माता पार्वती माझे शरीरात वास करील म्हणून तुम्ही व माझे पति कश्यप एक होऊन माझा स्वीकार करावा.' अदितीची ही विनंती ऐकून महादेव तथास्तु म्हणाले, याप्रमाणे महादेवाचा वर मिळाल्यानंतर अदिति आणि पार्वती एकरूप झाल्या. व कश्यप आणि शंकर एकरूप झाले. त्यांनी कन्यारूप धारण करून रेणु राजाचे घरी यज्ञकुंडातून प्रवेश केला तीच ही रेणुका होय.

भृगुऋषि व त्याची स्त्री पुलोमा यांच्यापासून च्यवनऋषि होऊन त्याचा मुलगा ऋचिक या नावाचा होता. तो महातापसी व पुण्यशील होता. ऋचिक ऋषि गोदावरीच्या काठी आश्रम बांधून राहिला होता. त्याची तपश्चर्या फार कडक असे. सोमवंशी गाधी राजाने असा पण केला होता की जो सहस्त्रश्यामकर्ण अश्व आणून देईल त्याला मी आपली मुलगी देईन. त्याप्रमाणे ऋचिक ऋषीने त्या गाधी राजाला सहस्त्र श्यामकर्ण घोडे देऊन सत्यवती मिळविली होती. एकदा एका सिंहस्थ पर्वणीचे वेळी गाधी राजा आपली स्त्री जी पौलकुळी तिच्यासह गोदावरीचे काठी आला त्यावेळी पौलकुळी सत्यवतीला म्हणाली, 'सत्यवती तु तुझ्या पतीला माझ्यासाठी विनंती करून मला पुत्र होईल. असा वर माग.' तेव्हा सत्यवती आपल्या पतीला म्हणाली की,

'माझ्या आईला पुत्र व्हावा अशी तिची इच्छा आहे. तसेच मला ही पुत्र व्हावा अशी माझी इच्छा आहे.' मग ऋचिक ऋषीने भाताचे दोन पिंड तयार करून ते मंत्रून सत्यवतीजवळ दिले. तिला सांगितले की यातील क्षत्रीय पिंड तुझ्या आईला दे व सात्विक पिंड तू भक्षण कर. त्याप्रमाणे सत्यवतीने पात्रावार पिंड ठेवले व आईला खाण्यासाठी बोलाविले. पौलकुशीने ते दोन पिंड पाहून तिला साहजिकच असा संशय आला की सत्यवतीला पिंड चांगल्या पुत्रप्राप्तीचा असावा व आपला साधारण पुत्रप्राप्तीचा असावा. म्हणून तिने आपल्या मुलीला पाणी आणण्यासाठी पाठविले. ती गेल्यावर इकडे तिने पींडाची अदलाबदल करून ठेविली. पुढे ते पिंड दोर्घीनी खाल्यानंतर दोघीही गरोदर झाल्या. परंतु दोर्घींना डोहाळे निरनिराळे होऊ लागले. सत्यवतीला युध्दविषयक तर पौलकुशीला स्नानसंध्येचे डोहाळे होऊ लागले. तो प्रकार पाहून सत्यवतीने दुसराच पिड भक्षण केला असे ऋचिक ऋर्षीच्या लक्षात आले तेव्हा सत्यवती आपल्या पतीला म्हणाली, 'माझी इच्छा मला सात्विक वृत्तीचा पुत्र व्हावा अशी आहे.' मग ऋषीने तशी व्यवस्था केली पण तुझे पुत्राचे पोटी जो पुत्र होईल तो महातेजस्वी व सात्विक होईल असे तिला सांगितले. पुढे सत्यवतीचे पोटी त्रिपुरारी व कश्यप एकरूप होऊन आले ऋचिक ऋषीने त्या मुलाचे नाव जमदग्नि असे ठेवले. पौलकुशीला जो पुत्र झाला तोच विश्वामित्र होय. जातीने क्षत्रीय असून तपश्चयेच्या बळाने तो ब्रह्मर्षि झाला.

पुढे कांही वर्षे गेल्यानंतर ऋचिक ऋषीच्या आश्रमात अनेक ऋषि आले व त्या सर्वांनी काशियात्रेला जाण्याचा विचार केला. त्याप्रमाणे सुमहुर्त पाहून सर्वऋषि जमदग्नीला बरोबर घेवून काशियात्रेला निघाले. कांही दिवस मार्ग क्रमिल्यावर ऋषींना कान्यकुब्ज नगरच्या राजाने आपल्या मुलीचे स्वयंवर मांडले आहे असे कळल्यावरून ते ऋषि तो समारंभ पाहाण्यासाठी स्वयंवराचे मंडपात आले होते. तो अपूर्व समारंभ पाहून त्यांना खूप आनंद झाला. राजानेही त्यांचा योग्य सत्कार करून ऋषि समारंभास आले याबद्दल मोठा संतोष दर्शविला व त्यांच्या योग्यतेप्रमाणे त्यांना आसने बसण्यासाठी दिली. राजेही बहुमुल्य अशा रत्नखचित आसनावर रांगेने बसले. स्वयंवराची वेळ झाल्यावर त्या रेणु राजाची मुलगी रेणुका अंगावर अनेक उंची अलंकार घालून हातात रत्नकुसुमांची माळ घेऊन स्वयंवर मंडपात आली. स्वयंवरासाठी आलेले राजे महाराजे या सर्वांचे ती निरीक्षण करून केवळ स्वयंवर समारंभ पाहाण्यासाठी आलेल्या ऋषिमंडळीसमोर गेली व तिने ऋचिक ऋषीचा मुलगा जमदग्नी याचे गळ्यात माळ

घातली. रेणुका व जगदग्नी याची गाठ याप्रमाणे पडल्यावर स्वर्गात देवांनी दुंदुभी वाजवून व पुष्पवृष्टी करून आनंद प्रदर्शित केला. रेणुकेने आपणापैकी कोणास न वरिता एका ब्राह्मणाला वरिले हे पाहून स्वयंवरासाठी आलेल्या राजांना फार वाईट वाटले. त्या सर्वांनी असा विचार केला की रेणु राजाबरोबर युध्द करून रेणुकेला पळवून न्यावी. याप्रमाणे सर्व राजे आपापले सैन्य घेऊन रेणु राजाबरोबर युध्द करू लागले. ते राजे असंख्य असून त्यांचे सैन्यही फार मोठे होते. त्यामुळे रेणु राजाला जय येण्याची चिन्हे दिसेनात. तेव्हा जमदग्नी रेणु राजाच्या साहाय्याला गेला व त्याने हातात धनुष्यबाण घेऊन विलक्षण युध्दकौशल्याने सर्व राजांना पळवून लावले. मग रेणु राजाने जगदग्नीला व सर्व ऋषिंना चार दिवस आपल्या घरी ठेवून घेतले व मोठ्या थाटाने लग्न सोहळा करून जमदग्नीला घोडे, हत्ती, रथ, गायी, दासदासी, पुरे, नगरे, देश व रत्नभांडार देऊन कन्यादान केले. भागीरथीच्या तीरावर वास्तव्य करावे म्हणून त्यास त्याने विनंती केली. त्या उत्सवसमयी इंद्राने जमदग्नीला कामधेनू व कल्पतरू दिला. जमदग्नी रेणु राजाचे विनंतीप्रमाणे आपले स्त्रीसह भागीरथीचे काठी राहिला. काही दिवस पतिसहवासात गेल्यावर तिला अग्नि, वायु, सूर्य व इंद्र यांच्या रूपाने वसु, विश्वावसु, वृध्दभानू व बृहत्कर्ण असे चार पुत्र झाले. नंतर कांही दिवसांनी रेणुकेकडे नारद आला व तिला म्हणाला, हे आदिमाये अंबीके! मला चक्रपाणींनी तुझ्याकडे पाठविले आहे. तो तुझ्या उदरी आल्यास तू त्याचे तेज सहन करशील किंवा नाही असे त्यांनी विचारले आहे.' हे ऐकून रेणुका हसून म्हणाली,'नारदा, भगवान माझ्या हृदयात केव्हा सामावतील असे मला झाले आहे. तर त्यांना गर्भवासात लवकर येण्यास सांग. मी प्रभूचे तेज सहज सहन करीन.' रेणुकेचे हे बोलणे ऐकून नारद तेथून भगवंताकडे निघून गेला.

रेणुकेचा निरोप ऐकताच भगवान विष्णुंनी रेणुकेच्या उदरी प्रवेश करून केवळ भक्तांसाठी ते गर्भवासाचे दुःख भोगू लागले. रेणुकेला पूर्ण दिवस झाल्यावर वैशाख शु॥३ च्या दिवशी पुनर्वसु नक्षत्रावर ती प्रसूत होऊन पुत्र झाला. त्या आनंददायक वार्तेमुळे संपूर्ण त्रिभुवनात आनंदोत्सव सुरु झाला. जमदग्नीने त्या आनंददायक प्रसंगी अनेक ब्राह्मण बोलावून त्यांना संतोषित केले व मुलाचे नाव परशुराम असे ठेवले. परशुरामाचे वय व्रतबंधाला योग्य झाल्यावर जमदग्नीने सर्व ऋषि राजे वगैरेना बोलावून मुलाचे मौजीबंधन मोठ्या थाटाने केले. परशुराम म्हणजे प्रत्यक्ष भगवान. ज्याच्या जिव्हाग्रावर सरस्वती खेळत होती. त्यास वेदांचे अध्ययन करण्यास कीतीसा वेळ लागणार! संपूर्ण शास्त्रांचा अभ्यास झाल्यावर परशुरामने कैलास पर्वतावर जाण्याची

परवानगी मागितली व तेथे तप करून महादेवास प्रसन्न केले. शंकर वर माग म्हणून म्हणाले तेव्हा परशुराम म्हणाले, 'हे कैलासपते निलकंठा मला आपण धनुर्विद्या शिकवावी अशी माझी आपणास विनंती आहे.' महादेव म्हणाले, 'मी तुला धर्नुविद्या शिकवितो पण तू कोणाचा कोण वगैरे सांग.' परशुराम म्हणाले, 'माझे नाव परशुराम आहे मी जमदग्नीचा पुत्र असून रेणुका ही माझी माता होय.' परशुरामाचे बोलणे ऐकून महादेव हसले व म्हणाले, 'हे वैकुंठपते नारायणा! माझ्यापुढे हा लपंडाव का करतोस तुझी कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम शक्ति असून तुला माझ्या धर्नुविद्येची काय आवश्यकता आहे? मी आपली धनुर्विद्या तुला संतोषाने देऊन दुष्टांच्या संहारासाठी आपले पाशुपतास्त्रही देतो.' असे सांगून शंकरांनी धर्नुविद्या व पाशुपतास्त्रही परशुरामाला दिले व ते अदृश्य झाले.

परशुराम तपश्चर्येला गेल्यावर इकडे रेणुकेला अगदी करमेना म्हणून जमदग्नीने तिला खेळण्यासाठी एक मुलगी दिली. तिचे नाव त्रिकुला असे ठेविले. तिच्यासह वर्तमान रेणुका आनंदाने रहात असता लवकरच परशुराम परत आले व त्याने आईबापास वंदन करून पाशुपतास्त्र व धर्नुविद्या मिळविल्याचे सांगितले. नंतर परशुरामाने पुन्हा मातापितरांची आज्ञा घेऊन कैलास पर्वतावर जाऊन गणपतीच्या तपश्चर्येला आरंभ केला. काही वर्षे गणपतीची आराधना करून त्याजपासून परशुविद्या संपादन केली. गणपतीने परशुरामाला परशुविद्या दिली. त्यावेळी तेथे महादेवही होते. ते परशुरामाला म्हणाले, 'भार्गवराम तुला थोडे पूर्ववृत्त सांगतो. एकदा एक स्त्री एका अरण्यात माझ्या प्राप्तीसाठी सभोवती अग्नी पेटवून त्यामध्ये उभी राहून तपश्चर्या करीत होती. तो चमत्कार पाहून मला आश्चर्य वाटले व मी तो अग्नी आपल्या मुखाने भक्षण करून त्या स्त्रीला प्रसन्न झालो. तेव्हा ती म्हणाली 'तू हा अग्नी खाऊन टाकलास म्हणून तुला जमदग्नी असे म्हणतील. तसेच हे महादेवा मी आदिमाया असून तुझ्या प्राप्तीसाठी आजवर तपश्चर्या केली आहे तर तू माझा स्वीकार कर.' मी तिला म्हणालो, 'हे आदिमाये मी तुझी इच्छा पूर्ण करीन. ऋचिक ऋषीचे उदरी जमदग्नी म्हणून मी जन्म घेईन आणि हिमालय पर्वत रेणु राजा होईल त्याचे उदरी तू रेणुका म्हणून जन्म घे आणि नंतर माझा स्वीकार कर. याप्रमाणे तुझ्या आईबापाची कथा आहे. तू साक्षात जगज्जीवनप्रभु असून अशा रीतीने मला पित्याचा अधिकार दिलास याबद्दल मला मोठा संतोष वाटतो.' महादेवाचे याप्रमाणे परशुरामाशी बोलणे होत आहे. इतक्यात तेथे नारदमुनि आले. वैकुंठपतीचे व कैलासपतीचे एकाच वेळी त्यास दर्शन झाले. मग नारदाला दोघांनी आशिर्वाद देऊन भूतलावर काही चमत्कार पाहाण्यात

आला असल्यास श्रुत करावा म्हणून विनंती केली. तेव्हा नारद म्हणाला, 'सांप्रत पृथ्वीवर जर कांही अपूर्व असेल तर तो एक जमदग्नीचा आश्रम होय. तेथे कल्पतरू व कामधेन असल्यामुळे रेणुकामाता हजारो ऋषींना प्रत्यही इच्छा भोजन देत आहे.'

एके दिवशी रेणुका भागीरथीवर स्नानाला गेली असता तेथे कुबेर विमानात बसून आपल्या स्त्रियासह वर्तमान स्नानासाठी आला.त्या भागीरथीच्या पवित्र जलात कुबेर व त्याच्या स्त्रिया जलक्रीडा करीत असता रेणुकेलाही त्याप्रमाणे जलक्रीडा करण्याची इच्छा उत्पन्न झाली. ती आपले मनात म्हणाली, 'माझा पति जर यावेळी मजबरोबर असता तर मीही अशी जलक्रिडा केली असती. याप्रमाणे मनात खट्टू होऊन रेणुका बराच वेळ तेथे कुबेराची व त्याच्या स्त्रियांची क्रिडा पाहात उभी राहिली. इतक्यात तिला आश्रमात सडासंमार्जन करण्याची आठवण झाली. ती घाईघाईने आश्रमात आली. इकडे जमदग्नी रेणुकेने आश्रमात अद्यापि सडासंमार्जन केले नाही म्हणून तिजवर अत्यंत रागावले होते. रेणुका आश्रमात आल्याबरोबर जमदग्नि तिजवर क्रुध्द होऊन म्हणाले, 'माझी होमाची वेळ होऊन गेली तरी तू इकडे सडासंमार्जन वगैरे काही एक न करिता तिकडे कुबेराची जलक्रीडा पाहात उभी राहीलीस व त्याविषयी पापवासनाही मनात आणलीस यावरून तू व्यभिचारिणी आहेस तू माझ्या आश्रमातून आताच्या आता चालती हो. मला आपले तोंड देखील दाखवू नकोस.' जमदग्नीचा राग पाहून रेणुका भयाकुल झाली व आपल्या पतीला म्हणाली, 'माझ्या पोटी प्रत्यक्ष नारायण अवतरले आहेत. तो प्रभु यावज्जीवमात्रांचा पिता असल्यामुळे सर्वप्राणिमात्र मला पौत्राप्रमाणे आहेत. आपणावाचून मी सर्व पुरुषाकडे पौत्रदृष्टीने पाहते. मी आणपासच माझे दैवत समजते. असे असून मला आपण व्यर्थ दोष देत आहा.' हे ऐकून जमदग्नी अधिक क्रुध्द झाले व थोरला मुलगा जो वसु त्याला बोलावून रेणुकेला ठार मारण्यास सांगितले. तेव्हा वसु म्हणाला, 'बाबा, ही केवळ माझीच नव्हे संपूर्ण विश्वाची माता आहे. हिचा वध केला असता मी खात्रीने अध:पाताला कारण होईल.' हे वसुचे बोलणे ऐकून जमदग्नीने पितृआज्ञा उल्लंघिली म्हणून त्याला शाप देऊन गतप्राण केला. नंतर त्यांनी विश्वावसुला बोलावून रेणुकेला मारण्यास सांगितले. पण त्यानेही वसूप्रमाणे रेणुकेला मारण्याचे नाकारले. जमदग्नीने त्यालाही शाप देवून गतप्राण केले. याप्रमाणे चारही मुलांनी आईला मारण्याचे नाकारल्यामुळे जमदग्नीने चौघांनाही शाप देऊन निश्चेष्ट केले. मग जमदग्नीने परशुरामास बोलावून त्याला रेणुकेचा वध करण्यास सांगितले. त्याबरोबर परशुरामाने हातातला परशु रेणुकेच्या

मस्तकावर मारून तिचा अंत केला. आपल्या आज्ञेप्रमाणे परशुराम वागला हे पाहून जमदग्नीला फार संतोष झाला व ते त्याला काही मागायचे असल्यास माग म्हणून म्हणाला, तेव्हा परशुराम म्हणाला, 'बाबा, जर कांही देणे असेल तर आईला व चौघा भावांना सजीव करा व मी वध केल्याचे त्यांना विस्मरण करा.' परशुरामाच्या इच्छेप्रमाणे जमदग्नीने कमंडलुतले पाणी त्या पाचही जणांवर शिंपून त्यांना जिवंत केले. आदिमाया जगन्मोहिनी याप्रमाणे जिवंत झाल्यावर सर्वांना आनंद झाला. देवांनी दुंदुभी वाजवून तिजवर पुष्पवृष्टी केली. रागाच्या झपाट्यात सापडून आपण भलतेच अविचाराचे कृत्य केले होते असे जमदग्नीला वाटले व त्याने तेव्हापासून सर्व राग सोडून दिला.

सहस्त्रार्जुन महिकावतीला राज्य करीत असता एकदा नारदमुनि फिरत फिरत त्याच्याकडे आले. सहस्त्रार्जुनाने मोठ्या सन्मानाने त्यांची पाद्यपूजा करून कांही नवलविशेष सांगण्याविषयी विनंती केली. तेव्हा नारदमुनि म्हणाले, 'राजा, तुला शिकारीचे व्यसन असल्यामुळे त्या संबंधाने एक सुवार्ता सांगण्यासाठी मी तुजकडे आलो आहे. भागीरथीचे तीरी दिव्यद्रुम या नावाचे सुंदर निबिड अरण्य आहे त्यात अनेक प्रकारचे पशुपक्षी आहेत. त्याच अरण्यात जमदग्नीचा आश्रम असून त्याची स्त्री रेणुका जो कोणी येईल त्याला इच्छाभोजन देत असते. त्या अरण्यात तू शिकारीला जाऊन त्या जमदग्नि ऋषीचे दर्शन घेऊन ये.' ते ऐकताच सहस्त्रार्जुनाने शिकारीची तयारी केली. त्या अरण्यात जाऊन शिकार खेळू लागला. साराच वेळ शिकार खेळल्याने राजा फारच श्रांत झाला. राजा सहस्त्रार्जुन आला आहे असे समजताच जमदग्नी सहस्त्रार्जुनाकडे गेले व त्यांनी राजाला सर्व लोकासह भोजनास बोलाविले. राजाने ते निमंत्रण मोठ्या आनंदाने स्विकारले व तो आपल्या लोकासह भागीरथीवर स्नान करण्यास गेला. स्नान करून आल्यावर राजा पाहातो तो भोजनाची तयारी कांहीच दिसेना. तेव्हा हा ब्राह्मण आपणास व या हजारो लोकांना जेवायला कसे घालणार याबद्दल त्याला मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली.

इकडे ऋषींची नित्य नैमित्तिक कृत्ये आटोपल्यावर जमदग्नी रेणुकेला भोजनाची तयारी करायला सांगितले. रेणुकेने कामधेनुची प्रार्थना करून पंचपक्वान्नांनी वाढलेली सुवर्णाची ताटे मागून घेतली. नंतर एका पंक्तीला ऋषिमंडळी व एका पंक्तिला राजासह त्याची मंडळी ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे बसवून ती पक्वानांची ताटे जमदग्नी व रेणुकेने सर्वापुढे आणून ठेवली. तो भोजनाचा अपूर्व थाट व ती देवातादुर्लभ पक्वाने पाहून सहस्त्रार्जन थक्क होऊन गेला. रेणुका मधून मधून सर्वांना आग्रह

करून करून वाढीत होती. याप्रमाणे सर्वांची आनंदाने जेवणे झाल्यावर सहस्त्रार्जुन जमदग्नीला म्हणाला, 'हे ऋषिवर्या, तुझ्या आश्रमात हे असे अपूर्व भोजन मिळेल अशी कल्पना नव्हती. या अरण्यात ही तयारी आपण कशी करता हे ऐकण्याची माझी इच्छा आहे.' तेव्हा जमदग्नीने सहस्त्रार्जुनाला कामधेनु दाखविली व ही गाय जे जे इच्छावे ते ते देते असे सांगितले. हे ऐकून सहस्त्रार्जुनाला त्या गाईचा लोभ उत्पन्न झाला. त्याने त्या गाईची जनमदग्नीजवळ मागणी केली. मग जमदग्नी म्हणाला, 'राजा ही कामधेनु इंद्राने आमचे आश्रमधर्म सुव्यवस्थित चालावेत म्हणून दिली आहे. तू मोठा राजा आहेस. तुला या कामधेनुची आवश्यकता नाही.' त्यावर सहस्त्रार्जुन म्हणाला, 'ऋषि, मी पाहिजे तर आपणास सहस्त्र गायी देतो पण एवढी गाय मला द्या. आणि ही गाय जर आपण मला संतोषाने दिली नाही तर मी तिला बलात्काराने नेईन.' तेव्हा जमदग्नी म्हणाले, 'राजा ती गाय कोणाला देण्याचा मला मुळीच अधिकार नाही. इंद्राने ती मला केवळ आश्रमधर्मासाठी दिली आहे. ती तुला बलात्काराने नेण्यास फार त्रास होईल. इतकेच नव्हे तर वंशच्छेदन ही होईल. जमदग्नीने इतके सांगितले तरी राजा हट्ट सोडीना तेव्हा अगस्ती, गौतम वगैरे ऋषींनी अनेक उदाहरणे देऊन सहस्त्रार्जुनास समजाविले व सांगितले, 'राजा, ब्राह्मणाच्या शापाचा फार वाईट परिणाम होतो म्हणून ही धेनु तू नेऊ नकोस. आणि बलात्काराने घेऊन गेलास तर त्यात तुझे अकल्याण झाल्यावाचून राहाणार नाही.'ऋषीचे ते बोलणे ऐकून सहस्त्रार्जुन म्हणाला,'तुम्ही सर्व ब्राह्मण जमून मला नुसत्या शब्दानेच घाबरविण्याचा प्रयत्न करीत आहात. परंतु मी तुमच्या सारख्या ब्राह्मणांना भीणारा राजा नाही. ही कामधेनु तुमच्या अशा या भिकार आश्रमात मुळीच शोभत नाही. ती माझ्या राजवाड्यातच पाहिजे. तुम्ही ही गाय मुकाट्याने माझे स्वाधीन करा नाही तर मी सर्वांचा सहार करून गाय घेऊन जाईन.' शाप देऊन सहस्त्रार्जुनाचा नाश करण्याचे सामर्थ्य जमदग्नीच्या अंगी होते, पण त्यांनी रेणुकेच्या वधाच्या वेळी क्रोधाचा त्याग केला असल्यामुळे ते यावेळी मुळीच रागावले नाही. ते त्याला शान्तपणे म्हणाले -'राजा, असे करणे तुला शोभत नाही. पण तुला जर योग्य दिसत असेल तर ती गाय आहे तू खुशाल घेऊन जा' जमदग्नीने असे सांगितल्यावर राजा त्या कामधेनुला बळेच घेऊन जाऊ लागला. तेव्हा ती गाय क्रुध्द होऊन तिने आपल्या नेत्रापासून म्लेंच्छ, कानापासून बर्बर, योनीपासून कंगुवीर, स्तनापासून द्राविड, खुरापासून खुरासान व नाकापासून भिल्ल, या लोकांचे सैन्य उत्पन्न केले. ते सर्व सैन्य सहस्त्रार्जुनाचे सैन्यावर चालून आले व त्याने त्या सैन्याचा नाश केला. तेव्हा सहस्त्रार्जुन रागाने गाईचे अंगावर धावून गेला व त्याने आपली तलवार गाईच्या अंगावर मारली तोच

ती गाय नेम चुकवून स्वर्गात निघून गेली. अशाप्रकारे सहस्त्रार्जुनाचे सैन्यही गेले व गायही गेली. तेव्हा तो अत्यंत क्रुध्द झाला व जमदग्नीचे अंगावर धावून गेला. तो प्रकार पाहातचा रेणुका आडवी झाली. त्या नीच राक्षसाने रेणुकेवर २१ घाव मारून तिला घायाळ केली व जमदग्नीला ठार मारले. पति मृत झालेला पाहाताच रेणुका अत्यंत शोकाकुल झाली व परशुरामाचा धावा करू लागली. ती तिची हाक ऐकून परशुराम कैलास पर्वतावर गणपतीची व महादेवाची तपश्चर्या करीत होता ती सोडुन भागिरथीचे काठी आला. जमदग्नीचे ते मृत शरीर व आईचे घायाळ झालेले शरीर पाहून त्याचे डोळे पाण्याने भरून आले. रेणुकेने त्याला सर्व वर्तमान सांगितले ते ऐकून भार्गवराम म्हणाला, 'आई तुला ज्या नीचाने २१ घाव घातले त्या सहस्त्रार्जुनास मी २१ वेळा मारीन. ही पृथ्वी २१ वेळा निःक्षत्रीय करीन आणि सहस्त्रार्जुनाला मारून सर्वभूतमात्रांना त्याचा बळी देईन. त्याचे सहस्त्र बाहु तोडून ते कोल्हच्या-कुत्र्यापुढे टाकीन. परशुरामाचे तोंडून निघालेले असे प्रतिज्ञेचे शब्द ऐकून रेणुकेला समाधान वाटले. मग रेणुका परशुरामाला म्हणाली, 'बाळा, सह्याद्री पर्वताच्या पठारावर अमलिका गावाजवळ तुझ्या पित्याच्या देहाला अग्नीसंस्कार कर. मी सुध्दां सती जात जाते. पण ह्या सहस्त्रार्जुनाचा नाश करून ही पृथ्वी ब्राह्मणांना दान दे.' असे सांगून तिने पतीच्या मृत शरीराबरोबर अग्नीत प्रवेश केला. मग परशुरामाने पृथ्वीत बाण मारून सर्व तीर्थे वर आणली व त्यांत स्नान करून यथाविधी अंत्येष्टी क्रिया पूर्ण केली.

सहस्त्रार्जुन घरी अल्यानंतर त्याला विचित्र स्वप्ने पडू लागली. एकदा त्याने स्वप्नात पाहिले की त्याची आई रंकावती त्याला नग्न अवस्थेत व धडावर शिर नसतांना दक्षिण दिशेकडे घेऊन चालली आहे व महिकावतीनगरी समुद्रात बुडून जलमय झाली आहे. त्याने आपल्या उपाध्याय गुरुला याबद्दल विचारले असता त्यांनी सांगितले - 'राजा तू ब्रह्महत्या केलीस ती तुला नडते आहे. या ब्रह्महत्येच्या सोडवणुकीला कोणताही उपाय नाही.' गुरुजी असे सांगत आहे तोच आकाशातून भुमीवर उल्कापात होऊन रक्तबिंदू पडू लागले. इतक्यात धनुष्याचे टणत्कार ऐकू येऊ लागले. एवढा कोण वीर आला आहे हे सहस्त्रार्जुन पाहू लागला, तो ब्राह्मणाचा एक मुलगा वारंवार धनुष्याचा टणत्कार करीत आहे असे त्याला दिसले. सहस्त्रार्जुन त्याला म्हणाला, 'बाळा तू कोणाचा कोण आहेस आणि निष्कारण आवाज का करीत आहेस?' त्याचा तो प्रश्न ऐकून परशुराम म्हणाला, 'चांडाळा! ब्रह्मघातक्या! तू ज्या जमदग्नीचा

वध केलास त्याचा मी मुलगा असून तुझा प्राण घेण्यासाठी मी आलो आहे. त्या लहान मुलाचे बोलणे ऐकून सहस्त्रार्जुन म्हणाला, 'मुला, तुला अजून माझा पराक्रम माहित नाही. मोठा पराक्रमी असा जो रावण त्यास मी कालच बांधले तेथे तुझ्या सारख्या मुलाची काय कथा!' असे सहस्त्रार्जुन सांगत आहे तोच परशुरामाने तमास्त्र सोडून सर्वत्र अंध:कार केला व अग्न्यास्त्र सोडून नगर महिकावती जाळण्यास सुरूवात केली. तेव्हा सहस्त्रार्जुनाने पर्जन्यास्त्र सोडून नगर विझविले व सर्व सैन्यासह तो परशुरामाचे अंगावर धावून गेला पण परशुरामाने क्षणार्धात त्याच्या सर्व सैन्याचा नाश केला.

परशुरामाचा तो पराक्रम पाहून सहस्त्रार्जुन अगदी चकित होऊन गेला. त्याने मोठ्या त्वेषाने पाचशे धनुष्ये आकर्ण ओढून पाचशेबाण परशुरामावर टाकले पण परशुरामाने ते सर्व मोडून टाकले. तेव्हा अर्जुनाने सहस्त्रबाण सोडले. परशुरामाने त्यांचाही नाश करून टाकला. परशुरामाची ती विलक्षण शक्ति पाहून त्याने महादेवाची विनंती केली. त्याबरोबर एक कोटी महादेव रणावर आले व ते परशुरामावर शस्त्रप्रहार करू लागले. परंतु परशुरामाने ते सर्व रूद्र क्षणार्धात रणावरून पळून लावले. मग भार्गवरामाने सहस्त्राजुनाचे अंगावर हजारो बाण सोडून त्यास जर्जर केले. सहस्त्रार्जुन विव्हळ होऊन रणातून पळू लागला. परशुराम त्याचे मागे लागला व २१ वेळा थोपवून त्याच्या सहस्त्रभुजा तोडल्या तरी त्या फिरून उत्पन्न झाल्या. हा चमत्कार पाहून परशुरामासही आश्चर्य वाटले. व त्याने गणपतीची स्तुती केली. त्याबरोबर तीन कोटी गणपती, तीन कोटी महावीर वराहरूपाने व तीन कोटी वीर नृसिंह रूपाने प्रगट होऊन परशुरामाचे सहाय्यासाठी आले. परशुरामाचे ते विलक्षण सैन्य पाहून सहस्त्रार्जुन आपल्या रथासह आकाशात उडाला. पण परशुरामाने एकाच बाणाने त्याला रथासह खाली पाडले व परशु हातात घेऊन त्याचे मस्तक तोडले पण तत्काळ पुन्हा त्याच्या धडाला चिकटले. याप्रमाणे २१ वेळा झाले. हा चमत्कार पाहून रामाला अत्यंत आश्चर्य वाटले. तेव्हा परशुरामाचा भाऊ विश्वावसु म्हणाला, 'रामा, ह्या राक्षसाचे हृदयात अमृत आहे. त्याचा नाश केल्यावाचून हा दैत्य मरायचा नाही.' मग परशुरामने आपला परशु त्याचे हृदयावर मारून त्याच्या हृदयातले अमृत बाहेर काढले व त्याच्या छातीवर बसला. सहस्त्रार्जुन पाहू लागला तो आपल्या हृदयावर पितांबर नेसलेली शंख, चक्र, गदापद्मधारी, आदिपुरुष शेषशायी भगवानाची मूर्ति दिसली. भगवंतास आपले छातीवर बसलेले पाहून सहस्त्रार्जुनास संतोष वाटला व त्याने प्राण सोडला. सहस्त्रार्जुनाची मृत्युची वार्ता ऐकून त्याचे आप्त वगैरे अनेक परशुरामाबरोबर युध्द करण्यास आले.

पण त्यांचा परशुरामाने तेव्हाच नाश केला. मग रामाने पाच कुंडे तयार करून त्यात रणात पडलेले शोणीत साठविले व त्या रक्ताने पितृतर्पण केले. त्यावेळी स्वर्गातून देवांनी परशुरामावर पुष्पवृष्टी केली. ( श्लोक १८-४८ )

सहस्त्रार्जुनाचा वध झाल्यानंतर नारद परशुरामाला पाताळातील दुष्टांचा संहार करण्यासाठी घेऊन गेला. तेथे अनेक दैत्यांचा नाश केल्यावर रामाला वासुकी येऊन भेटला. त्याने भार्गवरामाची स्तुती करून पूजा केली व पादप्रक्षालन करून तीर्थ मिळविले. त्यानंतर नारदासह परशुराम कैलास पर्वतावर जाऊन गणपती व शंकर यांना भेटला. तुम्हा दोघांच्या प्रसादामुळेच मला रणात जय मिळाला असे सांगून परशुरामाने त्या दोघांची स्तुति केली. तेव्हा महादेव व गणपती म्हणाले, 'हे परशुरामा, तू साक्षात जगत्पती भगवान आहेस. तू अनेक राक्षसांचा संहार केलास पण दक्षिण दिशेकडील राक्षस तसेच राहिले आहेत तर त्यांचा संहार करून तू आपल्या मातेला भेटायला जा.' महादेवांनी असे सांगितल्यावर परशुराम दक्षिण दिशेकडे गेला व त्या दिशेला जेवढे राक्षस होते त्या सर्वांचा त्याने संहार केला. आणखी पुढे जाऊन रावण व कुंभकर्ण यांचा संहार करणार होता पण इतक्यात नारद व ब्रह्मदेव यांनी त्यास रेणुकेकडे नेले. परशुराम येताच रेणुकेने प्रगट होऊन दर्शन दिले. परशुरामाने रेणुकेच्या चरणावर मस्तक ठेऊन सहस्त्रार्जुनाचा २१ वेळा वध केला असे तिला सांगितले. व त्याच्या रक्ताचा कलश व त्याच्या अंगावरील अलंकार त्याने रेणुकेपुढे ठेविले. ती रक्ताने भरलेली घागर पाहून रेणुकेला फार संतोष झाला. तिने रक्ताने स्नान केले व ते अलंकार परशुरामास यज्ञकार्यात खर्च करण्यास सांगितले. तसेच युध्दात जिंकलेले सर्व द्रव्य व पृथ्वी यज्ञ समाप्तीचे वेळी ब्राह्मणांना दान दे असे तिने परशुरामाला सांगितले. आईने असे सांगितल्यावर परशुरामाने स्वत:स यज्ञासाठी सुवर्णाची पत्नी, तयार करून प्रणिता नदीचे काठी यज्ञाची तयारी केली. त्या यज्ञास ब्रह्मदेव, इंद्र, अग्नि, यम वगैरे देव; यक्ष, गंधर्व, किन्नर वगैरे अनेक देवता व राजे महाराजे अनेक मानवगण आले. यज्ञ पूर्ण झाल्यावर संपूर्ण द्रव त्याने विप्रांना दिले व पृथ्वी कश्यपाला दिली. तेव्हा रेणुकेने पुन्हा प्रगट होऊन साऱ्यांना दर्शन दिले. सर्व देव व वेद रेणुकेच्या दर्शनास आले व सर्व देव आपापल्या स्थानी निघून गेल्यावर रेणुकेने मंत्रशक्तीने सहस्त्रार्जुनाचे कलेवर बोलाविले व ते मातृकाक्षेत्र ज्याला कृष्णमल्लिकानगर म्हणतात तेथे बसावयाला घेऊन त्यावर ती बसली. सर्व भूमंडळ परशुरामाने ब्राह्मणास दान दिले असल्याने त्याला राहण्याला जागा अशी नव्हती. म्हणून त्याने समुद्राजवळ आश्रय मागितला. सागराने थोडे मागे सरकून कांही जमीन परशुरामासाठी मोकळी करून दिली. तेथेच वैतरण नदी समुद्रास येऊन मिळाली होती. तिचे काठी परशुरामांनी

आश्रम बांधला व तेथे राहू लागला. हा अवतार चिरंजीवी असल्याने त्यास मृत्यु नाही. राम व कृष्ण अवतारांच्या काळात बऱ्याच जणांना परशुरामाने धनुर्विद्या शिकविलेले आहे. भगवान कल्किअवतार सुध्दा धनुर्वेद व राजधर्म शिकण्यासाठी परशुरामाकडे जातील असे पुराणांतरी वर्णन आलेले आहे. (श्लोक ४९-६७)

## ★ सद्भक्त राजा कमळापति ★

त्रेतायुगात माळवा राज्यात अवन्तिकापुरीत कमळापति नावाचा एक महान भगवद्भक्त राजा होऊन गेला.त्याचा जन्म सूर्यवंशात झाला. तो राजा महान सत्यवादी, सदाचारी शुध्दात्मा होता, प्रजेला आपल्या सन्तानाप्रमाणे वागवून न्यायपूर्वक त्यांचे पालन करी. तो अध्यात्मवादी, शूरवीर, उद्योगप्रिय ब्राह्मणभक्त विद्वान शीलवान आणि सत्यप्रतिज्ञ होता. भगवान विष्णुच्या चरणी व त्याच्या सगुणस्वरूप अवतारपात्रांच्या ठायी त्याची अनन्यभक्ति होती.

एकदा कमलापति राजा तापसवनात क्रूर श्वापदांची शिकार करण्यासाठी गेला असता तेथील श्वापदे मारू नकोस म्हणून ऋषींनी बजाविले. पण अन्य लोकांना व प्राण्यांना याचा उपद्रव होत असल्याने ऋषिंचे न ऐकतां तो श्वापदे मारू लागला. तेव्हा ऋषि क्रुध्द होऊन त्यांनी त्याला तुझी राजलक्ष्मी नष्ट होईल असा शाप दिला. राजा कमलापति तसाच अरण्यात भटकत असता त्याचा पूर्व सुकृतानुसार त्यास नारदाचा संग घडला. नारदाला प्रणाम करून राजाने घडलेली सारी हकीकत निवेदन केली. तेव्हा नारदाने राजास परशुराममाता रेणुकेच्या दर्शनास जाण्यास सांगितले. त्याप्रमाणे राजाने सर्व तीर्थावर जाऊन स्नान केले व शेवटी रेणुकातीर्थावर जाऊन रेणुकेचे दर्शन घेतले. त्यायोगे राजाला पुन्हा राजलक्ष्मीची प्राप्ति झाली व तो पूर्वीप्रमाणे आपला राज्यकारभार उत्तमरीतीने चालवून नित्यसत्संग करू लागला. आपल्या चर्मचक्षूंनीच भगवान श्रीहरीच्या साक्षात् दर्शनासाठी तो फार उत्कंठीत झाला.

एके दिवशी राजाकडे नारदऋषि आले. राजाने षोडशोपचारे त्यांचे पूजन केले आणि त्यांना उत्तम सिंहासनावर बसवून विनयाने म्हणाला - 'भगवन, आज आपल्या आगमनाने माझे घर व कुल पवित्र झाले. आपले दर्शन घडून हा सेवक कृतकृत्य झाला आहे. योग्य अशा सेवेचा आदेश देऊन या दासाला अनुग्रहीत करा.' राजाची ही विनम्र प्रार्थना ऐकून नारदऋषि स्मितहास्य करून मधूरवाणीने म्हणाले, 'नृपश्रेष्ठ, मी असे ऐकले आहे की श्रीहरीच्या साक्षात् दर्शनाच्या इच्छेने तू निलाचलास जाण्याच्या विचारात आहेस. जर हे खरे असेल तर तू हा फारच चांगला निश्चय केला आहेस

हे निश्चित. हा संसार एक भयंकर अरण्य आहे. यात पावलोपावली दुःख आणि संकटरूपी काटे पसरलेले आहेत इथे भटकणाऱ्या मनुष्याला भगवान विष्णुच एक मात्र आश्रयस्थान आहे. मनुष्याचे मोठ्यातले मोठे पाप भगवान विष्णुच्या अनुग्रहाने जळून भस्म होते.' राजाने विचारले, 'भगवान भक्तीचे स्वरूप काय आहे?' तेव्हा नारदमुनी म्हणाले, 'राजा, गुणभेदानुसार भक्तीचे तीन भेद आहेत. सात्विकी, राजसी व तामसी. यांच्याशिवाय एक चौथी भक्ति निर्गुणभक्ति. हे कमळापतिराजा! जे लोक काम आणि क्रोधाच्या वशिभूत आहेत आणि प्रत्यक्षाशिवाय अन्य कशाकडेही दृष्टी वळवत नाही. (प्रत्यक्ष म्हणजे जगत् व अन्य म्हणजे परलोक) ते आपल्यास लाभ व दुसऱ्यास हानी पोहोचविण्याकरितां जे भजन आदि करतात त्यांची ती भक्ति तामसी असते. अधिक यशप्राप्तिकरिता अथवा दुसऱ्यांचा द्वेष, मत्सर करून स्पर्धेने किंवा परलोकातील सौख्य प्राप्तीच्या आशेने जी भक्ति केली जाते ती राजसी भक्ति समजावी. पारलौकिक लाभास स्थायी समजून आणि इहलोकाचे समस्तपदार्थ नश्वर जाणून आपल्या वर्णाश्रम धर्माचा त्याग न करता आत्मज्ञानासाठी भक्ती केली जाते ती सात्विक भक्ती होय. हे जगत् अनंत भगवान शेषशायी नारायणाचेच स्वरूप आहे. त्याहून अन्य कोणतेही कारण या जगतास नाही. मी सुध्दां भगवंताहून अलग नाही व भगवंतसुध्दां माझ्याहून भिन्न नाही हे समजून भेद उत्पन्न करणाऱ्या बाह्य उपाधींचा त्याग करणे आणि अत्यधिक प्रेमाने भगवतस्वरूपाचे चिंतन करीत राहाणे ही अद्वैत (निर्गुणा) नामक भक्ती होय ती मुक्तीचे साक्षात् पण अतिदुर्लभ साधन आहे. आता मी तुला विष्णुच्या भक्ताचे लक्षण सांगतो. 'ज्याचे चित्त अतिशय शांत असते जो सर्वांशी कोमल भावनेने वागतो, ज्याने स्वेच्छेने साऱ्या इंद्रियावर ताबा मिळविला आहे आणि जो मन, वाणी व क्रियेद्वारा कधीही दुसऱ्यांशी द्रोह करण्याची इच्छा ठेवीत नाही, ज्याचे चित्त दयार्द्र राहून जो चोरी, हिंसापराङ्मुख राहातो, सद्गुणांचा संग्रह व दुसऱ्यांच्या कार्यसाधनात जो प्रसन्नतापूर्वक संलग्न राहातो, सदाचाराने ज्याचे जीवन सदैव निष्कलंक होऊन राहाते. सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात भगवान श्रीहरीच विराजमान आहे असे जाणून तो कोणाचाही द्वेष करीत नाही, ईर्षा, मत्सर करीत नाही, दुसऱ्यांच्या गुणराशींनी प्रसन्न होतो, कोणाचेही वर्म न काढता मर्म झाकण्याचा प्रयत्न करतो म्हणजे सर्वांना सुख देतो, भगवंतात आपले मन सदैव तल्लीन ठेवतो व आपल्या प्रेममधूर वाणीने सर्वांचे ठायी आत्मविश्वास जागृत करतो तोच खरा परम वैष्णव सद्भक्त होय.'

नारदाचा उपदेश ऐकून राजा कमलापति अत्यंत प्रसन्न झाला आणि म्हणाला,' भगवन् आपला संग आणि उपदेशामृत सिंचनाने मी खरोखर पावन झालो व माझ्या अज्ञान अंध:काराचा नाश झाला. माझ्या संपूर्ण पाप राशी जळून भस्म झाल्या आता फक्त एक अभिलाषा आहे की आपल्या संगतीत तीर्थयात्रा करून भगवान निलाचल प्रभूचे दर्शन घ्यावे. व त्यांच्या त्या अद्‌भूत रम्य स्वरूपात विरून जावेही महदिच्छा आपण पूर्ण करावी.'

नारदांनी तथास्तु म्हणून ते त्याच्याबरोबर अन्यान्य तीर्थक्षेत्री गेले. भगवंताच्या अपार लीला चरित्र ऐकत ऐकत व अवलोकन करीत करीत सत्संगतीत सदैव राहून राजा कमलापती नारदासह नीलमाधवाच्या स्थानी जाऊन पोहोचला. भगवान नीलमाधवाचे दर्शन होऊन राजा कमलापतीचे अष्टभाव जागृत झाले. भगवंताच्या स्वरूपात त्याच्या साऱ्या मनोवृत्ति नाश पावल्या. केवळ एकमेव भगवंत. सर्वत्र त्याचेच अवतार विग्रह स्वरूप आहे. जगतातील संपूर्ण प्राणिमात्रात तोच एक नारायण व्यापलेला आहे. त्याचीच अगाध लीला चरित्र पाहात पाहात व आठवीत त्याने इहलोकाचा निरोप घेतला व भगवान अनंतात लीन झाला. अशाप्रकारे ज्ञानी प्रेमी भक्त राजा कमलापती भगवान परशुरामाच्या अवतारकालीन होऊन गेला. धन्य तो भगवान व धन्य त्याचे अनन्य प्रेमी भगवत्‌भक्त.

भगवान विष्णुने आपल्या पहिल्या मत्स्यअवतारात तलातल पाताळातील गंधर्वसेन राजाला दिलेले वचन येथे पूर्ण केले. महान सत्यवादी आणि सद्भक्त सतपंथी राजा गंधर्वसेनाला त्रेतायुगात भगवान परशुराम अवताराच्या वेळेस तू सद्भक्त कमळापती होशील व माझ्या भक्तिप्रभावाने ज्ञानी प्रेमी होऊन माझ्या स्वरूपात येऊन मिळशील असे वरदान दिलेले होते ते येथे पूर्ण झाले.

॥ इति श्री परशुराम अवतार समाप्त॥

॥श्रीमत्परब्रह्मार्पणमस्तु॥

॥ ॐ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नमः॥

# सप्तम श्री राम अवतार प्रारंभ

## सद्भक्त राजा हरिश्चन्द्र आख्यान

सत्ययुगात भगवद्भक्त प्रल्हादाला युगगुरु ब्रह्मपुत्र नारदाकडून ज्याप्रमाणे गुह्यज्ञानाची प्राप्ती मातेच्या गर्भवासात असतांनाच झाली होती. त्यायोगे त्याने आगम होणाऱ्या नृसिंह नारायणाची स्मरणभक्ति करून त्याच नामावर निर्भर राहून हिरण्यकश्यपुने अनन्वित केलेल्या छळाला न जुमानता आपले इच्छित ध्येय-मुक्ति-प्राप्त करून घेतली. त्याप्रमाणे त्रेतायुगात भक्तिमति सती तारामती होऊन तिने सुध्दां आपल्या पतीला, पुत्राला व बरोबर सात कोटी जीवात्म्यांना मुक्तीचा लाभ मिळवून दिला. त्रेतायुगात अधर्मांचा उच्छेद, सद्भक्तांचे पालन-संरक्षण करण्यासाठी आणि जगताला आदर्शभूत धर्माचे ज्ञान देण्यासाठी भगवंताने वामन आणि परशुराम अवतार धारण करून व इच्छित ध्येय पूर्ण करून आपल्या अवतार कार्याची समाप्ती केली होती. नंतरच्या काळात जेव्हा रावण कुंभकर्ण वगैरे दुष्ट दानव-राक्षस डोके वर काढू पाहत होते त्याकाळात वाल्मिकीने कथन केलेल्या आगम अवताराचा - श्रीराम अवताराचा संधीप्रकाश पसरला होता. अवतार प्रगट झाला नव्हता. पण परशुराम अवताराचे कार्य संपुष्टात येऊन श्रीराम अवताराचे कार्य सुरु झालेले होते. त्याकार्याची मांडणी सुरु झालेली होती. अशा त्या समयास अयोध्येस सूर्यवंशी राजा हरिश्चन्द्र राज्य करीत होता. त्याच्याच नगराजवळ गंगातीरावर एक सुंदर वृक्षराजीत एक सुंदर आश्रम स्थापन झालेला होता. आश्रम भव्य, दिव्य, सुंदर, सुगंधी फळाफुलांनी नित्य डंवरलेला, वृक्षलतांनी परिपूर्ण होता. त्या आश्रमाचा मुख्य चालक वीरलोचन नावाचा तपस्वी होता. युगधर्मानुसार त्या आश्रमात पूजा अर्चा, ईश्वराराधना, ज्ञानचर्चा वगैरे चालत असे आणि विशेष म्हणजे त्याठिकाणी मध्यरात्रीच्या सुमारास युगगुरु वशिष्ठमुनि येऊन कलश घटपाट पूजा करून युगधर्मानुसार यज्ञयाग करीत तेव्हा सर्व देव सभा त्याठिकाणी गुप्तरीतीने भरत असे. इंद्र, चंद्र, सूर्य, वरूण, वायु, अग्नी, यमधर्म, कुबेर, अश्विनीकुमार ब्रह्मा, विष्णु, महेश, ब्रह्मर्षि, देवर्षि वगैरे सर्व त्याठिकाणी प्रगट होवून मंत्राहूतीच्या द्वारा दिलेला आपापला हविर्भाग ग्रहण करून सद्भक्तांना कृपाशिर्वाद देऊन निघून जात. अशाप्रकारे प्रत्यक्ष प्रगट भगवंताचे ते साक्षात् वास्तवस्थान बनलेले होते. अशा त्या देवकुल आश्रमात हे सर्व देवतापूजन अर्चन वगैरे सर्व होई पण याची वार्ता वायुससुध्दा माहित नसे. कारण ती सर्वदेवसभा गुप्तरीतीने होत असे. रावणासारख्या दुष्टप्रवृत्तीच्या राक्षसास समजल्यास तो आश्रमासच नष्ट करून उध्वस्त करील म्हणून ही सारी गुप्तता होती.

त्या पुण्यकारक पवित्र आश्रमात त्या युगाची तारकशक्ति सती तारामतीचा जन्म झाला. सद्भक्त वीरलोचन व त्याची परम प्रेमळ सती सत्यकिर्ती यांच्या पुण्योदयाने त्यांना या परमपवित्र निर्मळ व उज्वल चारित्र्यवान कन्येचा लाभ झाला. दोघ पति-पत्नी अतिशय आनंदाने, प्रेमाने त्या बालिकेचे लाड कोड पुरवून पालन संगोपन करीत. बालिकेची जन्मजात धार्मिक प्रवृत्ति पूजा ध्यान स्मरण चिंतन एकांतसेवन वगैरे गुण पाहून सारे धन्यता मानीत व प्राणपणाने तिच्यावर प्रेम करीत. कालांतराने आपल्या अंगच्या गुणांनी तिने सर्वांना आकृष्ट केले होते. हळू हळू तिने सर्व देवसभेचे सेवेचे कार्य आपल्याकडेच घेतले. देवसभेचे सर्व सेवाकार्य ती स्वत: आपल्या हाताने करून सर्वांना संतोषित करी. सद्‌गुरु वशिष्ठांनी तिच्या या सेवाकार्याने संतुष्ट होऊन सत्‌धर्माची दीक्षा देऊन बीजमंत्र "श्रीराम" हा जाप तिला दिला व रामचरित्राचे आगमवर्णन करून तिला संपूर्ण आत्मज्ञानाचा उपदेश केला. त्यायोगे तिला दिव्य गतीचे ज्ञान प्राप्त झालेले होते. ही ज्ञानसाधना करतांना तिने हळू हळू बाल्य, किशोरी, कौमार्य वगैरे अवस्था उल्लंघून तारूण्यांत पदार्पण केले होते. शरीरसौष्ठवाबरोबर तिच्या अंगच्या सेवा, परोपकार, कारूण्य, कर्तव्यदक्षता, शालीनता वगैरे अनेक गुणांचा विकास होऊन दिव्यप्रभेचे तेजोवलय तिच्या सभोवर पसरलेले होते.

एकदा अचानक पुष्पवाटिकेत देवपूजेकरितां फळे व फुले काढीत असता नजिकच्या रस्त्याने जात असलेल्या अयोध्यानरेश हरिश्चन्द्राच्या दृष्टीस ती पडली. राजाने तिचे रूपलावण्य आणि तेजस्विता पाहून क्षणभर तो स्तंभीत झाला. त्याला वाटले ही कोणी स्वर्गाची अप्सरा असावी वनदेवताच प्रगट होऊन वनविहार करीत आहे की काय! सेवकाकरवी त्याने सर्व तपास करून तिच्या बापाला बोलावून त्याने सांगितले - 'हे विरलोचन, तुझ्या मुलीची मागणी करण्याकरिता मी आपणास बोलाविले आहे,' हे ऐकून वीरलोचन आश्चर्यचकित झाला. तो म्हणाला, 'महाराज आपण अयोध्या नरेश क्षत्रीय आहांत, आम्ही तर गरीब ब्राह्मण! आपल्या कुळशीलकीर्तीला कलंक लागू नये हेच या पामराचे म्हणणे.' राजा म्हणाला, 'वीरलोचन, त्याची चिंता तुम्ही करूं नका. आम्ही क्षत्रीय उकिरड्यावरून सुध्दा रत्न शोधून काढतो. तर मग तुमच्यासारख्या धर्मप्रवण महात्म्यांशी संबंध जोडल्यास कुळशीलकीर्तिला कलंक लागणार नाही. उलट वृध्दिंगतच होईल. तुमच्या मुलीशी लग्न करून मी तिला पट्टराणी करीन. तिला कोणत्याही प्रकारचे श्रम पडू नये म्हणून घरातून बाहेरसुध्दां जाऊ देणार नाही.' राजाची इच्छा जाणून वीरलोचनला नकार देता आला नाही. मूकसंमति देऊन वीरलोचन घरी आला व त्याने तारामतीला सारी हकिकत सांगितली.

ते जाणून तिने मनोमन सद्गुरु वशिष्ठांची आराधना करून म्हटले, 'गुरुमहाराज माझ्या हातून देवसभेचे सेवाकार्य जेवढे नियत होते तेवढे घडले, पण आता त्यात खिळ पडेल की काय अशी परिस्थिती उत्पन्न झाली तेव्हा माझी देवसभेची मनोकामना आपण पुरवावी.' गुरुजींनी सांगितले - 'मुली, तू मुळींच चिंता करू नको. तुझी सारी मनोकामना पूर्ण होईल. तुझ्या हातून पतीसेवाही होईल आणि देवसभेची सुध्दां सेवा होईल अशाच प्रकारची तजवीज मी करतो.' असे म्हणून त्यांनी तिला एक शामकर्ण हंसला घोडा दिला व त्याच्या अंगचे दिव्यप्रताप तिला सांगून तिची समजूत घातली. तिचे लग्नकार्य झाल्यानतर गुरु वसिष्ठांशी वंदना करीत असता तिने विनविले - 'गुरुमहाराज माझे सत्व आपण रक्षण करावे.' अत्यंत प्रेमभराने आशिर्वाद देऊन गुरुजींनी सांगितले - 'बाळे, तुझ्या सत्वाचे रक्षण होईलच. चिंता करू नको. मी आजपर्यंत तुला उपदेशिलेल्या ज्ञानसाधनेचा आपल्या जीवनात उपयोग कर. भगवान श्रीरामाचे स्मरण नित्य ठेव. आणि घरात सर्वांशी प्रेमाने वागून पतीची प्रीति संपादन कर. लवकरच परमभक्त कुलदिपक असा पुत्र तुझ्या उदरी येईल. पतीच्या सेवेत नित्य रहा. रात्री निवांत वेळी देवसभेची सेवा कर. कोणत्याही प्रकारचा आळस करू नको. तो भगवान श्रीराम आणि तुझी ही गुरुभक्ति तुझ्या सत्वाचे रक्षण करील.' गुरु महाराजांचा कृपाशिर्वाद घेऊन व प्रेमाचा निरोप घेऊन मातापित्यांना व देवसभेला वंदन करून त्यांचा आशिर्वाद घेऊन तिने आपल्या संसारात पदार्पण केले. यथायोग्य समयी तिला पुत्र रत्नाची प्राप्ती झाली. त्याचे नाव रोहिदास अथवा रोहितकुमार असे ठेवले. (श्लोक १-१७)

तारामतीचा मुलगा रोहिदास थोडा मोठा झाल्यावर आपल्या बाललीलांनी तो मातापित्यास सर्वांना मोहवून टाकी. बालपणापासून मातेने त्याला सच्चरित्रात्मक पौराणिक कथा सांगून व नितीनियम पालन, शुध्द आचरण धार्मिक प्रवृत्तीकडे लावला. त्याची निष्पाप, निरागस व प्रेमळवृत्ति पाहून सर्वांना अतिशय आनंद होई. असाच कांही काळ गेल्यानंतर एकदा ताराराणीच्या दासीनी नवल विशेष गोष्ट पाहिली की, मध्यरात्रीच्या सुमारास राणी बाहेर कोठेतरी जाते. ताबडतोब त्या धीट दासीनी गुप्त सल्ला करून हरिश्चन्द्राच्या कानावर ही हकिकत घातली व तारामतीविषयी द्वेष मत्सर बाळगणाऱ्या त्या हलकट दासींनी त्याच्याही पुढे मजल मारून राजाच्या मनात भरविले की हे स्वामीन् आम्ही आपल्या दासी आहोत पण लहानतोंडी मोठा घास घेणे आम्हाला शोभत नाही. पण पुढचा अनर्थ टळावा म्हणून दुर्लक्षही करता येत नाही. स्वच्छंदी

व बाहेरख्याली अशा राणीला मान देऊन आपली दुष्किर्ती करून घेऊन नये. वगैरे वगैरे कटू शब्दांनी राजाचे मन तारामतीविषयी कलुषित केले. सत्य हकीकत काय याचा स्वतःच छडा लावण्याचा निश्चय राजाने केला. एके दिवशी रात्री तारामती राजाची चरणसेवा करीत असतां हरिश्चन्द्र राजाने तिला विचारले - 'राणी तुला एक गोष्ट विचारायची आहे. आज तुझे मन आनंदीत कां दिसत नाही? एवढी रात्र झाली तरी तुला कां झोप येत नाही? तू कसली चिंता करीत आहेस? तू एवढी उदास कां? राणीने सांगितले - 'कांही नाही महाराज तशा उदासीनितेचे कांही कारण नाही. आपल्या प्रेमळ स्नेहमय कृपा छत्राखाली मी अगदी आनंदात आहे. किरकोळ मस्तक दुखण्यामुळे आज झोप अंतरीत आहे एवढेच! तुम्ही निश्चिंत आराम करा. चिंता करण्याचे काही कारण नाही! अशी राजाची समजूत घालून ती त्याची चरणसेवा करू लागली. कांही क्षण गेल्यानंतर राजाला गाढ झोप लागली असे पाहून राणी हळूच उठली. दिवा मालविला. अंगावरील रत्नहार वगैरे राजसी अलंकार काढून संदुकमध्ये ठेवून सौभाग्य अलंकार फक्त ठेवून जपमाला वगैरे पूजासाहित्य घेऊन ती राजमहालातून बाहेर येऊन एकटीच घोडशाळेजवळ आली. राजाला राणीचे चरित्र पाहावयाचे असल्याने त्याने झोपेचे केवळ निमित्त केले होते. पण राणी मंचकावरून उठल्यापासून गुप्तरीतीने त्याने सारे निरीक्षण केले. राजमहालातून त्याने सुध्दा गुप्तरीतीने राणीच्या पाठोपाठ प्रयाण केले. राणीने राजाचा अत्यंत आवडता शामकर्ण हंसला घोडा सोडून त्यावर खोगीर वगैरे घालून त्यावर ती स्वार झाली. क्षणभर राजाच्या चित्तात विचार आला. दासी जे सांगत होत्या ते सत्य आहे. काढावी तलवार व करावा शिरच्छेद अशा राणीचा. पण नको., अजून ती काय करते हे पूर्णपणे पाहिल्याशिवाय कांहीही करू नये असे ठरवून गुप्त रीतीने पळत जाऊन त्याने घोड्याची शेपटी पकडली. तारामतीला कोणत्याही प्रकारची चाहूल लागू न देता त्या घोड्यानेही राजाचा भार शेपटीवरच सहन केला. राणी तर उशीर झाल्यामुळे केव्हा आपण जाऊ आणि केव्हा नाही असे तिला झाले होते. (श्लोक १८-३०)

घोडशाळेमधून हंसला घोड्यावर स्वार झाल्यानंतर ताराराणी नगर दरवाजाजवळ आली. राजाने रात्री चौकी पहारे करण्याकरीता आणि द्वाररक्षणाकरीता करडे पहारेकरी नेमलेले होते. पण त्यापैकी कोणालाही कोणत्याही प्रकारची चाहूल लागू न देता सातही दरवाजाची कुलुपे आपोआप उघडून व दरवाजेही आपोआप उघडून राणीचा घोडा बिनदिक्कत दरवाजामधून बाहेर निघाला व घोडापुढे जाताच दरवाजा आपोआप

बंद झाला. राजा ह्या साऱ्या घटना पाहून आश्चर्यचकित झाला. विस्मयाने तो विचार करीत आहे तोच घोडा राजमार्ग सोडून आडमार्गाने भरधाव उडू लागला व क्षणात गंगाकिनारी आला. पुढे गंगेचे अफाट पात्र दिसत आहे. आता आपण काय करावे असा राजा विचार करू लागला तोच तारामतीने त्या गंगामातेची अफाट अशा त्या सागराची विनंती करताच नदी दुभंगून त्यातून घोडा निर्वेधपणे पार जाऊ लागला. राजा तर हे सर्व पाहून विस्मयचकित झाला आणि उत्सुकतेने पुढे काय होते हे पाहू लागला. तेथून निघून ताराराणी भरधाव वेगाने आपल्या पित्याच्या आश्रमात गेली. घोड्याचा वेग कमी होताच राजाने लगबगीने शेपूट सोडून दिले. व एका वृक्षाआड होऊन पुढे पाहू लागला. आश्रमाच्या द्वाराशीच तिचा पिता वीरलोचन तिची वाट पाहात होता. तिने घोड्याला एका वृक्षांशी बांधून तशीच पित्याजवळ गेली. त्यांना नमस्कार केला. अतिशय प्रेमाने पित्याने तिचे मस्तक हुंगून आशिर्वाद देऊन उशीर होण्याचे कारण विचारले. तिने सांगितले पिताजी देवसभेची वेळ होऊन गेली मला फार उशीर झाला. पण चला ताबडतोब, असे म्हणून ते दोघेजण देवसभेत गेले. सर्वांनी तिला कुशलक्षेम विचारले व उशीर होण्याचे कारण विचारले पण तिने सर्वांच्या मनाचे समाधान करून सर्वांना प्रणाम केला. तेवढ्यात राजा गुप्तरीतीने उतरून देवसभेच्या दाराआड उभा राहून पुढील सारा चमत्कार पाहू लागला. (श्लोक ३१-४८)

देवसभेच्या दरवाजाआड गुप्तरीतीने उभा राहून राजा पाहू लागला. तो त्यास काय दिले? समोर मोठी यज्ञवेदी असून तिच्याजवळ चांदीच्या छोट्या सिंहासनावर चांदीच्याच कलशाची स्थापना केलेली आहे. सर्व गतगंगा त्याठिकाणी जमली असून कलश घटपाटाची पूजा होत आहे. त्याच्याजवळ रत्नजडित सुवर्णसमईत शुध्द घृताच्या तीन ज्योति व दुसऱ्या समईत दोन अशा ज्योति तेवत असून त्यांचा सौम्य प्रकाश सर्वत्र पसरलेला आहे. उदधूप, दिप, फळ, पुष्प, गंध, अक्षता, इ. साधनांनी पूजा अर्चा चालू असून युगधर्मास अनुकुल अशा यजुर्वेदी गायत्री मंत्र व वैदिक मंत्रानी पूजा होत आहे. मुख्य स्थानावर तारामतीचा बाप वीरलोचन बसून सभोवती पसरलेल्या आसनावर युगगुरु वसिष्ठ, सनकसनकादि ऋषि, देवर्षि, ब्रह्मर्षि, यक्ष, मेघ, किन्नर, गण, गंधर्व, अष्टवसु, दिक्पाल, आदित्य, रूद्रगण, अश्विनीकुमार, सूर्य, चंद्र, वायु, वरूण, कुबेर यमधर्म अग्नी वगैरे सर्व प्रगट प्रत्यक्ष रूपाने येऊन विराजमान झालेले आहेत. मुख्य सिंहासनावर ब्रह्मा, विष्णु, महेश, आदिनारायण वैकुंठनाथ असून बाजूला लक्ष्मी, पार्वती, सावित्री, गायत्री, सरस्वती, वगैरे सृष्टीचक्र चालक देवदेवता प्रगट

होऊन ब्रह्मर्षि, वसिष्ठादि ऋर्षीनी दिलेल्या आहुत्या स्विकारून पूर्ण तृप्त व आनंदीत होत आहेत. त्यांनी दिलेल्या नैवेद्याचा स्वीकार करून प्रसाद म्हणून गतगंगेतील सद्भक्तांना देत आहेत असे राजाने पाहिले. दुसऱ्यास क्षणात त्यास दिसले आपला तेजस्वी असा हंसला शामकर्ण वारू त्याठिकाणी आणून मंत्रोपचाराने पूजा अर्चा करून आहुति देऊन यज्ञकुंडात त्या आहुती टाकीत आहेत व शेवटी सर्वजण उभे राहून हात जोडून यज्ञवेदीला वंदना करताच त्याच यज्ञकुंडातून शामकर्ण वर आलेला आहे. हे सर्व चमत्कार व आश्चर्यकारक हकिकत प्रत्यक्ष डोळ्याने पाहात असलेला हरिश्चन्द्र राजा गूढविचार दिङ्मूढ झाला. एवढ्यात त्यास दिसले सती तारामती सर्व देवदेवतांना नमस्कार करून सद्गुरूचरणी प्रणाम करीत आहे. सर्वांनी तिला इष्ट वर देऊन संतुष्ट केले व सर्व देवसभा गुप्त झाली. सर्वांनी तारामतीला प्रेमाने निरोप देवून रोहिदासाला देण्याकरीता एका पानाच्या द्रोणात प्रसाद दिला. तो घेऊन लगबगीने तारामतीने पित्याचा निरोप घेतला व त्वरा करून बाहेर येण्याकरीता वळली. हा भानामतीचा खेळ असावा? राजाला हेच उमजत नसल्याने तो बराच संभ्रमात पडला व त्याची समजूत झाली की, आपल्या घोड्याला मारून जीवहिंसा करून त्यांनी यज्ञ केला व प्रसाद म्हणून तेच मांस वाढून घेतले व रोहिदासाला सुध्दां त्यातील कांही भाग दिलेला आहे. आपण राणीचा आता चांगलाच समाचार घेऊ असे ठरवून त्याने तेथे दरवाजात राणीच्या सुवर्णमंडित जरतारीने वेलबुट्टी वगैरे काढून हिरेमाणिक रत्न जडविलेल्या सुंदर चपला काढलेल्या होत्या. त्यापैकी एक उचलून लगबगीने धावत जाऊन तो पहिल्या झाडावर चढून बसला व पुढील गंमत पाहू लागला. जवळच हंसला घोडा जशाच तशा बांधलेला होता. (श्लोक ४९-६६)

देवसभेमधून सर्वांचा आशिर्वाद घेऊन तारामत बाहेर आली आणि पाहाते तो आपली एक चप्पल नाही. आजूबाजूला बरेच पाहिले, पण एक चप्पल दिसेना. तारामती व सर्वजण आश्चर्यचकित होऊन आता काय करावे याची चिंता करू लागले. शेवटी तारामतीने सांगितले - आपल्या साक्षात् जागृत पूजास्थानातच आपण आराधना करूं असे म्हणून सर्वजण आत गेले. तारामती मनोभावे आराधना करू लागली, हे स्वामीन् आज माझी लाज जाण्याची पाळी आलेली आहे. चप्पलची किंमत नाही पण त्यायोगे माझ्यावर संकट येऊ शकेल. राजाच्या जाणिवेलाही गोष्ट येताच माझ्या कुळ-शील-गुण वगैरे चारित्र्याला काळीमा लागेल व देवसभेची गुप्तता राखता येणार नाही. हे स्वामीपूर्वकाळात आपण अंबरीष, रूख्मागंद, धृव, प्रल्हाद वगैरे सद्भक्तांचे मोठमोठे कार्य करून त्यांना संकटमुक्त करून अमर केलेस.

मी तर पामर आपली एक क्षुद्र दासी आपल्याला मनोभावे शरण आलेली आहे. माझ्या शीलरक्षणाकरितां माझ्यावर कृपा करा.' राणी अशी विनंती करीत आहे तोच एक कुदरती चप्पल अंतरिक्षातून खाली आली. ती पहिल्या चप्पलच्या अगदी बरोबर जोडीची चप्पल पाहून राजा हरिश्चन्द्र तर आश्चर्यचकितच झाला. पण सर्व गतगंगेस सुध्दा आनंद झाला. हर्षोत्फुल्ल अंत:करणाने तिने गतगंगेस पुन्हा प्रणाम केला. त्वरा करून ती घोडयाजवळ आली. तिचा पिता तिला निरोप देण्यासाठी वारंवार फिरून फिरून पाहून अत्यंत गद्गद् प्रेमळ वाणीने म्हणाला, 'बाळे, तुझे रक्षण परमेश्वर करो. तुझ्या सेवेचे सार्थक होवो. धन्य भाग्य माझे तुझ्यासारखे कन्यारत्न मला लाभले. धन्य भाग्य हरिश्चन्द्र राजाचे की कुलतारण सती त्याला लाभली. बाळे, आपल्या अंगच्या गुणांनी आणि सेवेने सर्वांना संतोषित कर आणि आपल्याबरोबर साऱ्यांच्या उध्दारास तत्पर हो.' अतिशय प्रेमाने स्नेहार्द्रतेने निरोप देऊन डोळ्यातील अश्रु पुसून विरलोचन माघारी गेला. ते कारूण्य पाहून हरिश्चन्द्र सुध्दा द्रवला. पण आणखी पुढे काय होते या जिज्ञासेने व आतुरतेने तो पाहू लागला. सर्व जण दृष्टीआड होताच राणीने घोडयावर स्वार होऊन टाच मारली. एवढयात हरिश्चन्द्रानेसुध्दां लगबगीने खाली उतरून चाहुल न देता चपळाईने धावत जाऊन घोडयाची शेपटी पकडली व त्याच्या पाठोपाठ तो सुध्दां जाऊ लागला. घोडा वायुवेगाने निघून गंगातीरावर आला. पूर्वीप्रमाणे गंगेने त्याला वाट करून दिली. नंतर नगराच्या मुख्य सप्तद्वाराजवळ घोडा येताच दरवाजे आपोआप उघडले गेले. राणीने आत प्रवेश करताच दरवाजे पूर्ववत बंद झाले. नंतर घोडशाळेत जाऊन राणीने खोगीर वगैरे उतरून घोडयास बांधले तेवढया संधीचा फायदा घेऊन राजा आपल्या महालात येऊन मंचकावर झोपून राहिला. थोडया वेळाने तारामती येऊन तिने पाहिले राजा अजून झोपलेला आहे. सुटकेचा निश्वास टाकून ती आपल्या महालात गेली. कुमार रोहिदासाकरिता दिलेल्या प्रसादाची थाळ तिने कोनाडयामध्ये ठेवून शयन मंदिरात आली. पूजेचा वेष उतरून जपमाळ वगैरे ठेवून राजवेष शयनवेष धारण केला. दिवा प्रगट करून हळूच राजाच्या पायथ्याशी बसून त्याची चरणसेवा करू लागली. राजा मनातल्या मनात विचार करू लागला, आता काय करावे, राणी तारामतीला कसे विचारावे याची तो मनातल्या मनात जुळवणी करू लागला. (श्लोक ६७-९७)

आळस देवून राजा मंचकावर उठून बसला आणि राणीला म्हणाला, 'राणी, मला आताच मोठे विचित्र स्वप्न पडलं. स्वप्नात मला असं दिसलं कीं तू तुझ्या

माहेरी गेली होतीस आणि आपला हंसला घोडा त्याठिकाणी मारला.' तारामती लटकेच हसून म्हणाली - 'स्वामी स्वप्नातील घटना सत्यच असतात किंवा घडतात असे नाही आणि स्वामी, असत्य अशा या स्वप्नांचा आपण विचार सुध्दां करू नये. त्यामुळे हीनकळा येते. निष्क्रियता येऊन जीवीताचा नाश सुध्दां होतो. राणीचे हे वचन ऐकताच राजाला भयंकर क्रोध आला. रागाने तो लालबुंद झाला. त्याची सर्व गात्रे थरथर कापू लागली. श्वास जोरजोराने वाहू लागला आणि संतापातिशयाने तो राणीला म्हणाला, - 'राणी, असत्य स्वत: बोलून मला तू असत्य ठरवितेस. ही बघ तलवार, या तलवारीने तुझे राई राई एवढे तुकडे करून पशुंच्या पुढे टाकीन. खरे सांग रात्री तू माझा घोडा घेऊन कोठे गेली होतीस? तू तुझ्या माहेरी गेली होतीस की नाही? त्याठिकाणी अठरा वर्णाची जात एकाठिकाणी जमून जीवहिंसा करतात हे सत्य आहे किंवा नाही? तू लक्षांत ठेव. आजपासून घराच्या बाहेर पाय टाकलास तर या तलवारीने तुझी खांडोळी करीन. दासींनी मला सत्य कथन केले ते मी प्रत्यक्ष पाहिले आणि मला तू असत्यपणाचा काळीमा लावतेस?' तारामती अजीजीने म्हणाली - 'स्वामी, तुम्ही दासींचे वचन सत्य मानून माझ्यावर हा आरोप करीत आहांत. आपण माझ्यावर शस्त्र उगारल्यास मी तत्काळ आपल्या शिरावर सहन करीन पण या अबलेवर असा आळ घेऊन कलंकित करूं नका.' राणीचे हे वचन ऐकून राजास अधिक त्वेष चढला. अत्यंत कोपीष्ट होऊन त्याने राणीला हिनवून खडसून विचारले - मी सांगतो हा जर तुला आळ वाटत असेल तर मग रात्री प्रसाद म्हणून जी थाळ आणली ती दाखव म्हणजे अन्य प्रमाणांची आवश्यकता नाही. हे राणी मला तू असत्य ठरवित आहेस पण लक्षात ठेव. तुझ्या साऱ्या पापांचा घडा आता भरला हे निश्चित समज. मी प्रत्यक्ष पाहूनच तुला सांगत आहे. कोणाच्याही वचनावर विसंबून तुला दोष देत नाही, तर प्रत्यक्ष मला जे जे दिसले, अनुभविले त्यावरूनच मी तुला सत्य विचारीत आहे. रात्री आणलेली थाळ दाखव म्हणजे सर्व गोष्टींचा निर्णय होईल.' राजाचे वचन ऐकून राणीच्या हृदयात धस्स झाले. आता काय करावे? सर्व सत्य कथन केल्यास देवसभेची गुप्तता राहणार नाही आणि राजा त्या सर्व गोष्टीचा छडा लावून देवसभाच उध्वस्त करून टाकील. या भीतीने सून्न होऊन ती आपल्या महालात आली. आणि मनोमन त्रिभुवनपतींची विनंती करू लागली. (श्लोक ९८-११४)

राजाचे ते कठोर वचन ऐकून राणीला फार वाईट वाटले. प्राण गेला तरी हरकत नाही, शरीराचे तुकडे तुकडे झाले तरी हरकत नाही पण देवसभेचे गुप्तत्व अबाधित राहावे असे तिला वाटत होते. पण राजाची तिला आज्ञा मोडता येत नव्हती. ती मनोमन विचार करीत होती. राजाने थाळ पाहून मनाचा आणखी कांही गैरसमज करून घेतला तर मोठा अनर्थ ओढवेल म्हणून तिने भगवंताची मनोमन आराधना सुरु केली. पदर पसरून तिने परमेश्वराच्या दरबारात आपली मागणी केली की - 'हे स्वामीन्, जगन्नियंत्या आता माझी नव्हे पण तुझीच लाज जाण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे. मी तर यत्किंचित आपली दासी, आपल्या ब्रीदाचे रक्षण करून हे भगवंता तूच धावून ये. हे श्रीरामा, तू लवकर प्रगट होऊन या दासीच्या अब्रुचे रक्षण कर. सद्‌गदीत वाणीने ती परमेश्वराची आराधना करीत आहे, नयनात सारख्या अश्रुंच्या धारा वाहात आहेत, तेवढ्यात राजा हरिश्चन्द्र तलवार सरसावीत तिथे आला व मोठ्याने गर्जना करून म्हणाला, 'राणी दाखवितेस किंवा नाही मला ती थाळ, कां ठेवू हे शस्त्र तुझ्या मानेवर?' नाईलाजाने राणीने ती थाळ उचलून राजापुढे ठेविली तो काय आश्चर्य. त्याठिकाणी एवढा सुगंध प्रगटला कीं राजाचे मन चक्रावून गेले. डोळे फाडून राजा पाहू लागला. एका नागवेलीच्या पानावर सर्व प्रकारची फुले शेवंती, बकुळ, गुलाब, मोगरा, कमोद, जास्वंद वगैरे रंगीबेरंगी फुले व सर्वप्रकारची फळे पाहून राजा आश्चर्यचकित झाला. एका बाजूस भात प्रसाद व निरनिराळा मेवा मिष्ठान्नाचा भाग पाहून राजाची बुध्दीच चक्रावून गेली. आपण रात्री पाहिले काय आणि हे प्रत्यक्ष इथे आहे काय! राजाला कांही करता काहीच समजेनासे झाले. शेवटी त्याने हातातील खड्ग फेकून दिले आणि अतिशय प्रेमाने राणीकडे पाहून म्हणाला - 'हे सती, तू कोणत्याही प्रकारे दोषी नाहीस. तू कुलतारक सती आहेस. आमच्या कुळाचा उध्दार करण्यासाठीच आमच्या अनंत जन्मांच्या पुण्याईने तुझा लाभ आम्हाला झाला. मी तुझ्यावर अनन्वित आरोप लादला पण त्याचा मला पश्चात्ताप होतो. तू ज्या धर्माचे पालन करीत आहेस तो धर्म कोणता ते तू मला सांग. मला सुध्दा त्या धर्माची सेवा करायची आहे. तर राणी तू आचरीत असलेल्या सत्‌धर्माचे मर्म आता मला पूर्णपणे समजून आले. या त्रैलोक्यात मुक्तिप्रद असा या सत् धर्माखेरीज अन्य कोणताही धर्म नाही. मुक्तिप्रद नेणाऱ्या अशा या धर्मतत्त्वांचे तू मला मार्गदर्शन कर. मी सुध्दां त्याप्रमाणे वागून देवसभेची सेवा करील. (श्लोक ११५-१३१)

तारामती म्हणाली - 'महाराज आपण सुखाने कालक्रमणा करून नितीनियमाने राज्याचे पालन करून प्रजेला आनंदीत करा. मी आचरीत असलेला हा युगधर्म अत्यंत बिकट आणि सूक्ष्म आहे. तलवारीच्या धारेवर चालण्याप्रमाणे या सतपंथाचे आचरण आहे. स्वकष्टाने व सचोटीने उपार्जन केलेल्या धनसंपत्तीचा व आपल्या निर्वाहाकरीता विनियोग करायला हवा. आसक्तीरहित कर्म करून ती सारी कर्मे ईश्वरार्पण करावी. कायिक, वाचिक व मानसिक हिंसासुध्दा आपल्या हातून होऊ नये याची दक्षता घ्यावी. सदैव निर्मल शुध्द व पवित्र क्रियाचरण करून मन प्रफुल्लीत करून अत्यंत प्रेमाने दयार्द्रतेने ईश्वराचे स्मरण करणे वगैरे वगैरे हे सारे क्रियाचरण या धर्माचे आहे. राज्याचा हा एवढा मोठा भार वाहून नेऊन या धर्माप्रमाणे वागणे अत्यंत कठिण पडेल म्हणून स्वामी माझी आपल्याला अशी विनंती आहे की, तुम्ही एवढ्या मोठ्या राजाचे धनी आहांत. केवढं मोठ अफाट तुमचं चतुरंग सैन्य, कितीतरी मांडलिक राजे नित्य आपल्या मुजऱ्याला येऊन आपल्या आज्ञेत राहतात. आपले मंत्री सभासद त्याचप्रमाणे हे राज्यसभेतील नृत्य गायन नानाविध छंद आणि त्यात रमलेल्या मनाला हा धर्म रूचणार नाही, मानवणार नाही हे हजारो लाखो भाट आपली नित्य वाहवा करून कथापुराण गायन करून आपले मन रिझवितात या सर्वांना सोडून आपले मन त्या धर्माचरणात रमणार नाही. गांवोगांव आणि देशोदेश आपल्या राज्यशासनाची ख्याती पसरली आहे. त्या यशाच्या प्रसिध्दीत या धर्माचरणाने न्यूनता येईन. कारण या धर्माचे आचरण करतांना या साऱ्या एषणांचा, त्याग करायचा असतो. पुत्रेषणा दारेषणा, वित्तेषणा, लोकेषणा या साऱ्यांचा त्याग केल्याशिवाय सत्य धर्माचरण होऊ शकणार नाही. म्हणून म्हणते महाराज, आपण या आपल्या राजकारणात राहून सुखाने कालक्रमणा करा. या धर्माचे आचरण करीत असता सद्‌गुरुंचे वचन शिरसावंद्य मानून त्यांच्या आज्ञेत व सेवेत राहायचे असते. आपले सर्वस्व त्यांना अर्पण करून त्यांचे आपण केवळ दास सेवक आहोत. अशाप्रकारचा भाव अंतरात बाळगून संसारात राहावे अशा प्रकारचे तत्व या धर्माचे आहे. धर्माचरण करतांना कदाचित ईश्वराज्ञा झाली तर राज्याचा त्याग करण्याची पात्रता हवी आहे. तुमच्या आवडत्या राणीचा, प्राणाहून प्रिय अशा पुत्राचा सुध्दा वेळेवर त्याग करावा लागेल, स्वत:स विकून सुध्दा उदरनिर्वाह करावा लागेल. अशा प्रकारची परिस्थिती येऊ नये पण कदाचित आल्यास त्यास धैर्याने, निश्चयाने तोंड देऊन आपले सत्व आपण रक्षण केले पाहिजे. महाराज म्हणून मी पदर पसरून आपणाजवळ क्षमा मागते. लहानतोंडी मोठा घास घेऊन मी आपणास दुखवू शकत नाही. मला क्षमा करा आणि हा विचार मनातून काढून टाका.'

राजा हरिश्चन्द्र म्हणाला - 'हे साध्वी राणी, त्या सर्व गोष्टीस मी तयार आहे. सतपंथाच्या पालनाकरितां सत्वरक्षणाकरिता मी माझ्या साऱ्या इच्छा, वासना, कामना सोडण्यास तत्पर आहे. अमौलिक असे हे द्रव्यभांडार, हे राज्यपद, स्त्री, पुत्र वगैरेचा सुध्दा सद्गुरुंची आज्ञा झाल्यास त्याग करीन, पण या धर्माचा स्वीकार करून देवसभेची सेवा केल्याशिवाय मी अन्नही ग्रहण करणार नाही.'

राणी तारामतीला विस्मय वाटला. राजाचा दृढनिश्चय पाहून तिने सद्गुरु महाराजांना तशी विनंती केली. वशिष्ठ मुनींनी राजाला सतपंथाचे, सत्यधर्माचे, मुक्तिमार्गा सर्व भेद उकलून दाखविले. अगम्य अशा आगमवाणीचे कथन करून जन्मसाफल्य करण्यासाठी करावयाच्या साधना वगैरे सर्वांचे ज्ञान त्याला शिकविले.

भक्तिभाव प्रेमाने त्याने तनमनाने गुरुसेवा करून आत्मज्ञान संपादन केले. रात्रीच्या सुमारास वेष पालटून लोहाराकडे घनऐरणी ठोकण्याचे सुध्दा काम करून स्वकष्टाने सचोटीने जमविलेल्या धनसंपत्तीतून दानधर्म करून देवपूजा केली. वीरलोचनच्या घरी होत असलेले देवसभेचे स्थान आपल्या घरी एकान्त महालात मांडून तेथेच त्याने गुरुसेवा नामस्मरण भक्ति पूजा ध्यान सेवेचे व्रत सुरु केले व आजन्म हे व्रत पाळण्याचे ठरविले. सर्वांना आनंदी आनंद झाला. जनता जनार्दनापर्यंत ह्या साऱ्या गोष्टींची जाण पसरली. प्रधान व मंत्रीसुध्दा राजाच्या या व्रतपालनाने आनंदीत होऊन ते सुध्दा ज्ञानश्रवण स्मरण सेवा पूजा वगैरे करून राजाच्या कार्यास अनुमोदन व प्रोत्साहन देऊ लागले. जिकडे तिकडे हरिश्चन्द्र, तारामती आणि रोहिदास यांच्या धवल किर्तीचा सुगंध पसरला. सर्वजण आगम होणाऱ्या श्रीराम अवताराचे चरित्र गुरु वसिष्ठांच्या मुखातून ऐकून दृढ श्रध्देने भक्तीप्रेमाने त्यांचे स्मरण करू लागले. (श्लोक १३२-१५०)

एकदा जगत् विहाराकरिता निघालेले भगवान वैकुंठनाथ कनली वनातील प्रख्यात असलेल्या वसिष्ठ ऋषींच्या आश्रमात आले व त्यांनी सर्व कुशलक्षेम विचारले. वसिष्ठांनी सांगितले स्वामी आपण तर सर्वान्तर्यामी व सर्वसमर्थ आहात. दिवसानुदिवस राक्षस प्रबल होत आहेत. अन्याय, अनाचार, अत्याचार, हिंसाचार वगैरे कृत्यांना ऊत येत आहे. रावण, प्रहस्त, महोदर आदि राक्षस डोके वर काढू पहात आहेत. ऋषिमुनि, तपस्व्यांना त्यांच्यापासून उपद्रव जाणवू लागला आहे. पण विशेष अशी चिंताजनक परिस्थिती नाही. पण स्वामीन् आपल्या चरणाजवळ एक विनंती आहे. परवा देवसभेत

सर्व देवांच्या समक्ष एक लक्ष्यवेधी घटना घडली. सर्वसभा भरलेली असता सर्व देव, ऋषि वगैरे बसले असता तेथे नारदमुनि आले. इंद्राने नारदाची पूजा वगैरे करून त्यांचा गौरव केला व कांही अश्रुतपूर्व पाहण्यात आले असल्यास कथन करावे अशी विनंती केली. तेव्हा नारद म्हणाले, 'देवेन्द्रा आज अयोध्येतील हरिश्चन्द्र राजाकडे मी गेलो होतो. त्यासारखा सत्वशिल, सत्यव्रत, पुण्यवान व धर्मरत राजा मला वाटते देवलोकी देखिल मिळावयाचा नाही. त्या राजाचे प्रधानही राजाप्रमाणे सदाचार संपन्न, दयाळू व धर्मरत असे आहेत. त्या राजाच्या स्त्रीचे नाव तारामती असून पुत्राचे नाव रोहिदास आहे. देवेन्द्रा, त्याची स्त्री व पुत्रही राजाप्रमाणेच पूर्ण सत्वशील आहेत. फार काय पण आज हरिश्चन्द्राची बरोबरी करणारा त्रिभुवनात कोणी नाही. त्याने मृत्युलोकातच प्रतिस्वर्ग निर्माण केला आहे असा तो सत्वशील आहे. नारदाने केलेली स्तुति ऐकून अनेक ऋषींनी माना डोलाविल्या.' वसिष्ठ पुढे म्हणाले, 'हे स्वामी मी सुध्दा म्हटले खरोखर त्या हरिश्चन्द्र राजाची योग्यता तशीच विलक्षण आहे. त्याच्यासारखा दानशूर सत्वशील व धर्मरत राजा असा सांप्रत या त्रिभुवनात तोच एक आहे.' मी केलेली ती हरिश्चन्द्राची वाखाणणी ऐकून विश्वामित्राला फार राग आला. विश्वामित्र ऋषि माझा पूर्वीपासूनच द्वेष करतात. ते म्हणाले, 'वसिष्ठा, तू सूर्यवंशाचा पुरोहित असल्यामुळे हरिश्चन्द्राची निष्कारण वाखाणणी करीत आहेस. अरे किती झाले तरी तो मृत्युलोकी वास करणारा, त्याची बरोबरी स्वर्ग लोकांच्या राजाबरोबर कशी होईल? त्याला कसोटीवर धरले तर तो किती सत्त्वशील आहे हे तेव्हाच दिसून येईल.' त्यांचे भाषण ऐकून मी म्हटले, 'अहो विश्वामित्रऋषी, आपण काय वाटेल तो प्रयत्न केला तरी हरिश्चन्द्र सत्वापासून कधीही ढळणार नाही. अशी माझी पूर्ण खात्री आहे. तो राजा आपले प्राणही खर्ची घालील परंतु सत्व जाऊ देणार नाही.' माझे हे भाषण ऐकून विश्वामित्र संतापले ते म्हणाले, 'वसिष्ठा, असे असेल तर मी त्या हरिश्चन्द्राला आताच सत्त्वापासून ढळवितो. त्याची एवढी कथा ती काय? मी अशी प्रतिज्ञा करतो कीं, हरिश्चन्द्र राजाला सत्वापासून ढळवीनच ढळवीन आणि जर माझा प्रयत्न फुकट गेला तर मी आजपर्यंत जी अनेक तपे केलेली आहेत त्यांचे पुण्य हरिश्चन्द्राला अर्पण करीन.' अशी प्रतिज्ञा करून विश्वामित्र तसेच सभेतून निघून गेले. विश्वामित्र हे कृतनिश्चयी आहेत ते तसे काहीतरी केल्याशिवाय सोडणार नाही. म्हणून आपणास माझी अशी विनंती आहे कीं, भक्ताचे सत्त्वरक्षण करावे. त्याची सारी आशा आकांक्षा पुरवून उपकृत करावे असे मला वाटते.'

भगवंतांनी वसिष्ठांना आश्वासन देवून सांगितले - 'विश्वामित्राने जीवाचा आटापिटा करून कितीही आपल्या भक्तास त्रास दिला तरी त्याच्या हृदयात बसून मी त्याचे व त्याच्या सत्वाचे रक्षण करील, तुम्ही चिंता करू नका. पण ताबडतोब त्या भक्तास परिस्थितीची जाणीव द्या. असे सांगून भगवान अंतर्धान पावले. वसिष्ठऋषी तेथून अयोध्येला आले आणि त्यांनी हरिश्चन्द्रांची भेट घेऊन इंद्रसभेत घडलेली हकीकत व विश्वामित्राने केलेली प्रतिज्ञा त्यास कळविली. ते म्हणाले, 'राजा, विश्वामित्राने तुला सत्वापासून परावृत्त करण्याची प्रतिज्ञा करून ते सिध्दाश्रमात येऊन राहिलेले आहेत तर त्या आश्रमात तू जाऊ नकोस आणि प्रसंग आलाच तर सत्त्वापासून ढळू नकोस.' कुलगुरु वसिष्ठांची आज्ञा हरिश्चन्द्राने शिरसावंद्य केली व म्हणाला, 'स्वामी सद्गुरुनाथ आज खरोखर आपण पूर्ण जाणीव देऊन जागृत केले हेच महान उपकार झालेत. आपल्या आज्ञेच्या एक रतिभरही मी बाहेर वागणार नाही. हे शिरकमल जरी अर्पण करण्याची वेळ आली तरी आपल्या कृपेने मी मागे सरणार नाही. आपल्या नावाला व सत्त्वाला मी कधीही कलंक लावणार नाही असा आशिर्वाद आपण द्यावा.' वसिष्ठ ऋषींनीं राजास राणीस व रोहिदासास तसा आशिर्वाद देऊन त्यांना या कसोटीत यश यावे म्हणून स्वत: अनुष्ठान करण्यासाठी ते आपल्या आश्रमात निघून गेले. (श्लोक १५१-१६४)

विश्वामित्राने हरिश्चन्द्र राजास सत्वभ्रष्ट करण्याची घोर प्रतिज्ञा करून तो देवसभेतून उठून निघून गेला. तो अयोध्यानजिकच्या कनलीवन अथवा सिध्दाश्रमात येऊन राहिला. त्याठिकाणी त्याने एक अग्निकुंड सिध्द केले व स्वत: मेंढ्यावर बसला आणि स्वत:च्या शरीरातून रक्त काढून त्यात तांदूळ भिजवून त्याच्या आहुती तो अग्नीकुंडात देऊ लागला. विश्वामित्राची ती उग्र तपश्चर्या पाहून अग्नीकुंडातून प्रत्यक्ष भवानीची मूर्ति निघाली. तिने विश्वामित्राचे छिन्नविछिन्न झालेले शरीर पूर्ववत करून वर माग म्हणून म्हणाली. तेव्हा विश्वामित्र म्हणाला, - 'हे माते भवानी, अयोध्येतील राजा हरिश्चन्द्राला सत्वभ्रट करण्याची मी प्रतिज्ञा केलेली आहे. या माझ्या कार्याला मदत म्हणून मला सांबरी विद्या हवी आहे. मी मनात आणील तसे रूप घेण्याची व तशाप्रकारचे वातावरण निर्माण करण्याची माझ्या ठायी शक्ति दे.' भवानी 'तथास्तु' म्हणून अदृश्य झाली.

विश्वामित्राने असूर मंत्र जाप करून डुकराचे रूप धारण केले. ते प्रचंड डुकर राजाच्या वाडीत जाऊन तेथील फळझाडांची व फूलझाडांची नासधुस करू लागले.

ती फुलेफळे घटपाट पूजेला राजा नेहमी उपयोगात आणी. त्यांच्या रक्षणासाठी त्याने खास संरक्षक नेमले होते. त्यांना कोणत्याही प्रकारची दाद न देता उध्वस्त करण्याचा उपक्रम डुकराने चालूच ठेवला. शिपायांनी शिकस्त केली पण उपयोग होईना, म्हणून हरिश्चन्द्राला त्यांनी समाचार दिला. ते ऐकून राजाला क्रोध आला व त्या डुकराच्या शिकारीसाठ तो स्वत: तलवार धनुष्यबाण घेऊन निघाला.

राजा हरिश्चन्द्र वाडीत जाऊन पाहतो तो सारी वाडी उध्वस्त झालेली. ते पाहून त्यास फार वाईट वाटले. इतक्यात त्याला तो प्रचंड डुक्कर दिसला. लगेच राजाने त्वरेने त्याच्यावर बाण सोडला पण अत्यंत चपळतेने त्याने बाण चुकविला असे एकदा नव्हे शेकडो बाण चुकवून तो डुक्कर राजाच्या पुढून पळू लागला. राजाबरोबर बरेच सैनिक होत पण कोणालाही दाद न देता सर्वांच्या नजरा चुकवून तो राजा पुढून जात असता हातची शिकार जाते की काय या शंकेने राजा अधिक त्वेषाने त्याच्या मागून घोडा फेकून पळू लागला. असे करता करता विश्वामित्र एकट्या राजाला खूप दूर अरण्यात घेऊन आला. शेवटी राजा दमला. सोबत कोणीही नसल्यामुळे राजानेही पुढे जाण्याचे टाळले व घोड्यावरून उतरून एका जलाशयाजवळ हातपाय धुवून विश्रांती घेण्यासाठी बसला. एवढ्यात त्याला जवळच एक झोपडी दिसली व एक वृध्द ब्राह्मण चिंतेत बसलेला दिसला. राजा तसाच उठून वृध्दाजवळ गेला व म्हणाला - 'हे ब्राह्मण देव आपण असे चिंतीत आणि उदास का दिसता? कोणापासून आपणास कांही उपद्रव आहे काय? असल्यास मला सांगा. मी तुमचा दु:खाचा भार हलका करीन. ब्राह्मण म्हणाला, - 'नाही नाही तसे कांही दु:ख किंवा कोणापासून उपद्रव नाही, पण --- तुम्ही उगाच कशाला आमच्याकरिता त्रास घेता! पूर्व कर्मदोषामुळे मला ही गरीबी प्राप्त झाली. होऊन जाईल कसेतरी माझे काम. ब्राह्मणाचा लाघवीपणा पाहून राजा अधिक उत्साहाने म्हणाला, 'भूदेव, आपण अगदी नि:शंक मनाने मोकळ्या दिलाने सांगा. मी अयोध्याधिपति हरिश्चन्द्र आहे. आपल्या राज्यातील गरीब रंजल्या गांजल्या पीडित प्रजेचा दु:खभार हलका करणे माझे कर्तव्यच आहे. तेव्हा तुमचे काय काम अडलेले आहे ते सांगा. ते मी पूर्ण करीन. ब्राह्मण म्हणाला, 'महाराज आपण आग्रहच करीत आहात तर सांगतो बापडा. हा माझा मुलगा आहे. त्याचे लग्न करायचे आहे. आणि ही मुलगी वधू म्हणून आम्ही निश्चित केली आहे पण तिला या जगात ना आई ना वडिल ना भाऊ आप्त वगैरे कोणीही नाही. म्हणून कन्यादान कोण करू शकेन? त्या

अभावी हे लग्न रद्द होत आहे. मी समर्थ असता तर कांहीही खटपट करून लग्न लावून दिले असते पण मी पडलो कंगाल. माझी तुमच्यावर सुध्दा कांही तशी सक्ति नाही. तुमची इच्छा नसली तर राहु द्या. मी दुसरा कांही तरी उपाय शोधीन.' ब्राह्मणाचे म्हणणे ऐकून राजा अधिक उताविळीने म्हणाला, 'असे कसे म्हणता भूदेव, अहो तुम्ही मागाल ते कन्यादान द्यायला मी तयार आहे. तुम्ही संकल्प सांगा त्याप्रमाणे मी दान करतो. ब्राह्मणाने ऋग्वेदी मंत्रानुसार मंगल गायन करून संकल्प सांगितला त्यानुसार सर्व हत्तीदल माहुतासहित ब्राह्मणाने मागितले. यजुर्वेदी मंत्राच्या मंगल गायनानंतर अश्वदळ मागितले. सामवेदी मंत्र गायनानंतर संपूर्ण अर्थभंडार व अथर्ववेदी मंत्र म्हटल्यानंतर नवखंड पृथ्वीचे राज्य त्याने मागितले. राजाने भाष्य दिल्याप्रमाणे ब्राह्मणाने मागितलेल्या सर्व दानाचा संकल्प पूर्ण केला. मनात किंचीतही उणेपणा न आणता त्याने वर कन्येला संतुष्ट केले व सर्व राज्य सैन्यासह व अर्थ भांडारासह त्यांच्या स्वाधीन केले. शेवटी ब्राह्मण म्हणाला, 'हे उदारबुध्दी राजा, तुझे नवल करावे तेवढे थोडेच आहे. तुझ्या उदारपणाची खरोखर वाखाणणीच करायला पाहिजे. तू कन्यादान देऊन वधूवराला संतुष्ट केले पण या गरीब उपाध्यायाला दक्षिणा म्हणून औटभार सुवर्णाची मी इच्छा करतो.' राजा म्हणाला - 'ब्राह्मणदेव, ते सुध्दा मी आपणास देईन. आपण माझ्याबरोबर चालावे व संकल्पाप्रमाणे सर्वदान आपल्या ताब्यात घ्यावे. असे म्हणून राजा त्या ब्राह्मणाला राजवाड्यात घेऊन आला.

राजा हरिश्चन्द्राने ताबडतोब राजदरबार भरवून सर्व प्रजाजनांना दरबारात पाचारण केले. तारामती व रोहिदास यांना सुध्दां सभेत बोलाविले व सर्वांच्या समक्ष निवेदन केले. 'माझ्या प्राणाहूनही प्रीय अशा सभासद गणांनो, प्रजाजनहो आजपर्यंत राजा या नात्याने माझ्या हातून जशी करता आली तशी आपली सेवा केली. पण आज मी त्यातून निवृत्त होत आहे. कारण माझ्या जवळ बसलेल्या या ब्राह्मण महाराजांना मी सारे राज्य दान दिलेले आहे. आजपासून पुढे आपण सर्वांनी यांची आज्ञा शिरसावंद्य मानावी.'

इतक्यात ब्राह्मण म्हणाला - 'राजा दक्षिणा देतो, म्हणून मला येथे घेऊन आलास पण माझ्या दक्षिणेची अजुन वाट लावीत नाही! ब्राह्मणाची दक्षिणा देण्याकरिता राजा भंडारखान्यातून औटभार सुवर्ण मागवू लागला. तेव्हा तो ब्राह्मण राजाला अडवून म्हणाला, 'राजा तू आपले संपूर्ण राज्य अर्थभांडारासह कन्यादानाच्या वेळी आम्हाला दान केले आहेस, तेव्हा तुझा आता येथे कशावरही अधिकार उरलेला नाही. मी

म्हणतो हे असत्य आहे असे म्हणून जर तुला आपले सत्त्व गमवावयाचे असेल तर मी आपला आल्या मार्गाने परत जातो.' वृध्द ब्राह्मणाचे ते भाषण ऐकून हरिश्चन्द्र राजाच्या लक्षांत सर्व प्रकार आला. तो त्या ब्राह्मणाला म्हणाला, 'महाराज, आपण जरा शांत व्हा, म्हणजे मी आपल्या दक्षिणेची कांहीतरी व्यवस्था करतो. आपण त्या संबंधाने मुळीच काळजी करू नये. मी आपणास स्वप्नात जरी माझे सर्व राज्य दिले असते तरी ते मी कालत्रयीही नाकबूल केले नसते.' या प्रमाणे राजा व ब्राह्मण यांचा संवाद चालला आहे तो ते वर्तमान सर्व नगरात झाले. त्या ब्राह्मणाचे अनर्गल प्रलाप ऐकून सर्वांना त्याचा राग आला व ते सर्व त्याचा तिरस्कार करू लागले. तेव्हा तो ब्राह्मण संतप्त होऊन म्हणाला, 'हरिश्चन्द्रा तू सत्वशील म्हणवतोस व लोकाकडून माझी अशी अवहेलना करवतोस काय? दक्षिणा द्यावयाची नसल्यास नाही म्हणून सांग म्हणजे मी आपला येथून निघून जातो.' तेव्हा तारामती म्हणाली, 'महाराज, नाही म्हणून सांगणे आम्हाकडून कधीही होणार नाही. माझ्या अंगावर हे अलंकार आहेत ते आपण आपल्या दक्षिणेच्या ऐवजी घ्या.' रोहिदास म्हणाला, 'महाराज तसेच मीही माझ्या अंगावरील अलंकार आपणास दक्षिणा म्हणून देण्यास तयार आहे. आपण आम्हा दोघांच्या अंगावरील अलंकार खुशाल घ्यावेत व माझ्या पित्याला आपल्या ऋणातून मुक्त करावे. तो ब्राह्मण गर्जना करून म्हणाला, 'अरे मुर्खांनो, तुमच्या अंगावरची वस्त्रे व अलंकार यावर माझीच सत्ता आहे. तेच दान व तीच दक्षिणा असे करून तुम्हास आपले सत्त्व गमवावयाचे असेल तर माझी हरकत नाही.' ब्राह्मण पुढे म्हणाला, 'राजा हरिश्चन्द्रा तुला जर आपले सत्व राखावयाचे असेल तर एक उपाय आहे तो हाच की तू निष्कांचन स्थितीत माझ्या राज्यातून स्त्रीपुत्रासह बाहेर निघून जावे व वाटेल तो प्रयत्न करून औटभार सुवर्ण मिळवून मला द्यावेस. असे करावयाचे नसेल तर आपल्या सत्वावर पाणी सोड म्हणजे मी कांही एक न मागता निघून जातो.' ब्राह्मणाचे भाषण ऐकून हरिश्चन्द्र राजा म्हणाला - 'महाराज आपण म्हणता ते खरे आहे. संपूर्ण नवखंड पृथ्वीही आपणास मी दान दिली आहे. पण दहावे खंड काशी क्षेत्र मात्र राहिलेले आहे तर तेथे जाऊन मी, स्त्री पुत्रासह स्वत:चा विक्रय करून घेतो व आपली दक्षिणा देतो.'

राजाचे भाषण ऐकून नागरिकांचे डोळे पाण्याने भरून आले. प्रधान व सूज्ञ प्रजाजन म्हणाले, 'महाराज आम्ही नागरिक राजासाठी सुवर्ण देतो पण आपण राजाला

ऋणातून मुक्त करावे. त्यांचे भाषण ऐकून ब्राह्मण हसला तो म्हणाला, 'अरे राजाने जर सर्व राज्य मला अर्पण केले आहे तर प्रजेच्या संपत्तिवर व जिवीतावरही आता माझीच सत्ता आहे हे तुम्हाला कळत कसे नाही?' तेव्हा हरिश्चन्द्र म्हणाला, 'महाराज आता मजबरोबर वाराणसी क्षेत्रात यावे तेथे आपली दक्षिणा मी देतो. आपली दक्षिणा दिल्याशिवाय मी अन्नपाणी सुध्दा घेणार नाही.' तो ब्राह्मण म्हणाला, 'बरे आहे बाबा! तुझ्यासाठी मी वाराणसीला येतो. तुम्ही आता तिघेही आपापली वस्त्रे व अलंकार येथे काढून ठेवून एकेका वस्त्रानिशी काशीच्या मार्गाला लागा. तुम्ही तेथे पोहोचेतोपर्यत मीही मागावून येतो.' ब्राह्मणाच्या आज्ञेप्रमाणे राजा राणी व राजपुत्र या तिघांनी वस्त्रालंकार काढून ठेवली व एकेक वस्त्र घेऊन ते मार्गाला लागले. (श्लोक १६६-१९० )

सत्वशील राजा हरिश्चन्द्र भक्तिमति सती तारामती आणि मातृपितृगुरुभक्त बालक रोहिदास ब्राह्मणाच्या आज्ञेवरून अंगावरील किंमती वस्त्रे व अलंकार टाकून एकेका साध्या वस्त्रानिशी राजवाड्यातून बाहेर जायला लागले. तेव्हा प्रथम तिघेजण देवसभेच्या एकांताच्या महालात आले. देवाला आणि कलशघटपाटाला, दिव्य ज्योतीला प्रणाम करून त्यांनी प्रार्थना केली तेव्हा राणी तारामती आणि राजाने भक्तिभाव प्रेमाने परमेश्वरास विनंति केली की - 'हे अखंडज्योतिस्वरूप नारायणा कलशोद्भव भगवंता आम्हाला आपल्या दर्शनाची, आपल्या स्वरूप प्राप्तीची अत्यंत आशा होती. हे आगमस्वरूपी श्रीरामचंद्रा प्रत्यक्ष प्रगट रूप या नयनांनी पाहावे अशी आमची आंतरीक अभिलाषा होती पण तुझ्या कृपेवाचून तसे घडणे दुरापास्त आहे. आम्ही उणियाचारी पापी कृतघ्न, आपल्या त्या स्वरूपमनोहराचे दर्शन घेण्यास सर्वस्वी अपात्र आहोत. आम्हा दुर्भाग्याकडून आपली सेवा सुध्दां पूर्णपणे घडू शकली नाही, म्हणून आमची लाज तू राख असं कोणत्या तोडाने म्हणून? हे जगदीश्वरा, आपल्या आज्ञेवाचून या जगतात एक पानही हलू शकत नाही. आपण आमच्या शिरावर सत्वपालनाचा जो भार दिला तो आनंदाने सहन करण्याची शक्तिसुध्दा आम्हाला, तुझ्यावाचून दुसरा कोण देवू शकणार आहे! आज हा कोट हे नगर आणि हे राज्य सोडून जाण्याचे आमच्या नशिबी आले म्हणून आम्ही दुःखी झालो असे नव्हे पण आपल्या सेवेत अंतरणार म्हणूनच फार वाईट वाटते. स्वामी आमची आपल्या चरणारविंदी एकच प्रार्थना आहे. कीं, प्राप्त परिस्थितीत आम्ही कोठेही असलो तरी आपले स्मरण नित्य या हृदयात राहील अशी कृपादृष्टी आमच्यावर करा. देवसभेत हजर होण्याचे सदभाग्य

जरी आमचे नसले तरी तुझे स्मरण हेच सर्व काही आहे असे मानून आमची मति बुध्दि सदैव तुझ्या ठायी लीन राहील अशी पदर पसरून मागणी मागीत आहोत.' सद्गदीत अंत:करणाने कळकळीची प्रार्थना करून प्राप्त परिस्थितीला धैर्याने तोंड देण्याकरिता देवसभेतून निघून भव्य राजप्रासादाला वंदन करून ते तिघेही नगराबाहेर पडले. त्यावेळेस हजारो प्रजाजन राजाला आडवे झाले व लहान पोराप्रमाणे रडू लागले. तेव्हा राजाने त्या सर्वांची मोठ्या कष्टाने समजूत करून काशीचा मार्ग धरला. ज्याना कधी उन्ह-तहान यांचा संसर्ग नाही सुकुमार तारामती व कुमार रोहिदास यासह राजा हरिश्चन्द्र मार्ग आक्रमित असता विश्वामित्राने भयंकर उष्णता निर्माण केली त्यायोगे सर्व पृथ्वी तापली. अशा स्थितीत त्यांचे सत्व हरण करण्याकरीता विश्वामित्र वृध्द ब्राह्मणाचे रूप घेऊन मार्गावर आला व राजाची याचना करून म्हणाला, - 'बाबा मी एक गरीब ब्राह्मण आहे. बायको गरोदर आहे व मूल लहान आहे. त्यांचे पाय या उन्हाने करपून गेले. कृपा करून तुमच्या पायातले तेवढे जोडे द्या.' ब्राह्मणाची केविलवाणी स्थिती पाहून त्या तिघांनीही आपले जोडे त्याच्या स्वाधीन केले व अनवाणी पायांनी ते पुढील मार्गक्रमणा करूं लागले.

विश्वामित्र मोठा मानी व पराक्रमी होता. त्याने हरिश्चन्द्राचे सत्व हरण करण्यासाठी हर प्रयत्न करण्याचे ठरवून सूर्यास प्रखर उन्ह पाडण्यास व वरूणास सर्वपाणी नाहीसे करण्यास सांगितले. तप:सामर्थ्यामुळे सर्व देवतांवर विश्वामित्राचा अधिकार चालत असे. आज्ञा होताच सूर्याने हरिश्चन्द्राचा मार्ग विस्तवाप्रमाणे तप्त केला व वरूणाने पाणी आटवून टाकले. विश्वामित्राने अशी व्यवस्था केल्यावर हरिश्चन्द्र, तारामती व रोहिदास यांना फार कष्ट होऊ गले. मार्ग तप्त लोखंडाप्रमाणे तापल्यामुळे त्यांचे पाय होरपळून त्यांना फोड आले व तृषेने तिघांचे प्राण व्याकूळ झाले. इतक्यांत त्या अरण्यास विश्वामित्राने वणवा लावला तेव्हा त्या वणव्यात हरिश्चन्द्र, तारामती व रोहिदास अशी तिघांची चुकामुक झाली. ऋषि विश्वामित्राने एवढी व्यवस्था केल्यावर ज्यामार्गाने हरिश्चन्द्र चालला होता त्या मार्गावर एक लहानसे मायावी उपवन, सुंदर पाणपोईसह उत्पन्न केले. इकडे ते तिघे जंगलात एकमेकांचा शोध करीत भटकत असता राजा हरिश्चन्द्र त्या पाणपोईजवळ येऊन पोहोचला. तेव्हा पाणक्याचे सोंग घेतलेला विश्वामित्र राजाला म्हणाला, 'हे महाभागा, ये, थोडे साखरपाणी घे.' राजा म्हणाला, 'महाराज मी आपल्या श्रमाने दुसऱ्यांना संतुष्ट करावे हा माझा धर्म आहे. दुसऱ्यांच्या श्रमाने मी सुखी व्हावे हे अनुचित आहे. त्यामुळे हे पाणपोईतले

पाणी मला पिता येत नाही.' असे म्हणून राजा पुढे निघून गेला. राजा गेल्यानंतर तृषेने व्याकुळ झालेली तारामती तेथे आली. तिला पाहून तो वेषधारी पाणक्या म्हणाला, 'बाई, कोण ही तुझी स्थिती झाली आहे! आता अमळ येथे बैस, पाणी पी, थोडी विश्रांती घे आणि मग पुढे जा.' पाणक्याची विनंती तारामतीने नाकारली. तेव्हा तो तोतया पाणक्या म्हणाला, 'बाई तू अगदी वेडी आहेस. हरिश्चन्द्रासारखे सत्वशील राजे देखिल या पाणपोईतील पाणी नि:शंकपणाने पितात, मग तुला प्यायला काय हरकत आहे? पुढे शंभर कोसपर्यंत पाणी नाही म्हणून तुला एवढा आग्रह करतो. तो पहा हरिश्चन्द्र राजा अजून आतच विसावा घेत बसलेला आहे.' असे म्हणून विश्वामित्राने एक मायावी हरिश्चन्द्र निर्माण करून त्या पाणपोईत बसविला होता तो दाखविला. परंतु त्या पतिव्रता तारामतीचा त्यावर विश्वास बसला नाही ती म्हणाली, 'हरिश्चन्द्र राजाच्या सत्वशीलपणाची मला पूर्ण खात्री आहे. तो पाणपोईतील पाणी प्राणान्तीही पिणार नाही. असे म्हणून तारामती तशीच पुढे निघून गेली. तारामतीचा सत्वशीलपणा पाहून विश्वामित्राला आपल्या प्रतिज्ञेची निराशा वाटू लागली. इतक्यात त्याचमार्गाने रोहिदास आला. तेव्हा विश्वामित्राने हरिश्चन्द्र व तारामति अशी उभयता मायावी निर्माण करून ती रोहिदासाला दाखविली व तो म्हणाला - 'बाळ ये हे तुझे आईबाप येथे विश्रांती घेत आहेत. तूही येथे थोडे पाणी पी व विश्रांती घे. पुढे शंभर कोसपर्यंत पाणी नाही.' पाणक्याचे भाषण ऐकून रोहिदास म्हणाला, 'महाराज, अन्नसत्रातले अन्न व पाणपोईतले पाणी ही आम्हा क्षत्रीयांना वर्ज्य आहे. करिता हे पाणी मला पिता येत नाही. आणि माझे तात व माता हे धर्म पाणपोईतील पाणी प्राणांतीही पिणार नाही अशी माझी पूर्ण खात्री आहे. आपण जे दाखविता ते केवळ असत्य होय.' असे म्हणून रोहिदास तेथे न थांबता पुढे निघून गेला.

याप्रमाणे तिघांचेही विलक्षण धैर्य व सत्वशीलपणा पाहून विश्वामित्र अगदी थक्क झाला. परंतु त्या तिघांना सत्वभ्रष्ट करावयाचेच अशी त्याने प्रतिज्ञा केलेली असल्यामुळे तो पुन्हा त्यांच्या मागे लागला. ज्या जंगलातून ती तिघे चालले होते त्या जंगलास त्याने आग लावली व काळ्याकुट्ट अशा धुराने सर्व दिशा धुंद करून टाकल्या. तेव्हा त्या तिघांना दिसेनासे होऊन तिघे तीन मार्गास लागले. तारामती आपल्या पुत्र व पति यांचा शोध करीत फिरत असता तिला एक वृध्द ब्राह्मण भेटला. तो ब्राह्मण म्हणजे वेषधारी विश्वामित्रच होय. तारामती त्याला केविलवाण्या स्वराने म्हणाली, 'अहो महाराज, या अरण्यात एक पुरुष व एक लहान मुलगा

आपल्या दृष्टीस पडला कां? तेव्हा तो तोतया ब्राह्मण म्हणाला, 'बाई तू आपल्या पतीचा व पुत्राचा शोध करीत आहेस असे दिसते. बाई या वणव्यातून तू जिवंत बाहेर पडलीस हे आपले भाग्य समज. मी देखिल या वणव्यात सापडलो होतो. पण मोठ्या कष्टाने वाचलो आणि मार्गाने येत असतांना एक मुलगा व एक पुरुष भाजून मरून पडलेले दिसले. तुझा पती व पुत्र तेच जर असतील तर तुझे प्राक्तन फुटले म्हणावयाचे दुसरे काय? असे म्हणून विश्वामित्राने आपणाबरोबर तारामतीला घेतले व तिला राजाचे व राजपुत्राचे कृत्रिम प्रेत दाखविले. ती दोन्ही प्रेते पाहून तारामतीचे हृदय फाटून गेले व ती शोकाकूल होऊन धाडकन जमिनीवर पडली व बेशुध्द झाली.

थोड्यावेळांने शुध्दीवर येऊन मोठमोठ्याने ती विलाप करू लागली. तारामतीने त्यावेळी जो शोक केला त्याचे वर्णन करणे कठिण. हा पति! हा स्वामी! हा वत्स म्हणून ती टाहो फोडून आपले मस्तक ताडन करून घेऊ लागली. तेव्हां विश्वामित्र म्हणाला, 'बाई, आता तू कितीही शोक केलास तरी त्याचा काय उपयोग आहे? जे होऊ नये तेच झाले खरे आता अस्तमान होऊन गेला आहे. तेव्हा येथे अरण्यात बसणे बरे नव्हे. माझे घर जवळच आहे. तेथे रात्रभर राहा. सकाळी या प्रेतांची काय व्यवस्था करावयाची ती कर.' तारामती म्हणाली - 'महाराज या प्रेतांना रानावनात टाकून कशी बरे घरी येऊ? मी रात्रभर या प्रेताजवळच बसून राहाते. त्यात माझे जे व्हावयाचे असेल ते होईल! तारामतीने असे सांगितल्यावर विश्वामित्र तेथून निघून गेला. इकडे तारामति त्या भयंकर अंधाऱ्या रात्री प्रेतांचे संरक्षण करीत बसलेली असता विश्वामित्र तेथे व्याघ्राचे रूप घेऊन आला व दोंन्ही कृत्रीम प्रेते घेऊन गेला. पतीचे व पुत्राचे प्रेतही व्याघ्राने नेले तेव्हा तारामतीचे दुःख फारच वाढले. हा हरिश्चन्द्र! हा रोहिदास! असे म्हणून ती मोठ्याने टाहो फोडू लागली. याप्रमाणे तारामती शोक करीत आहे तो हरिश्चन्द्र व रोहिदास दोघेही शोक करीत करीत तिच्याजवळ आले. त्यांना पाहताच ही पिशाच्चे आहेत की मनुष्ये आहेत असा तिला प्रथम संशय आला. परंतु हरिश्चन्द्राने व रोहिदासाने इत्थंभूत हकीकत सांगून तिचा भ्रम दूर केला तेव्हा तिला आनंद झाला. ते सर्व दुःख विसरून वाराणशीच्या मार्गाला लागले. ती तिघेही काशीचा मार्ग क्रमीत असता एका ओसाड नगरात येऊन दाखल झाले. त्या नगरात मोठमोठी घरे, मंदीरे होती पण ती सर्व मोडकळीस आलेली असून सर्व शहरात विंचू, सर्प, घोण, सरडे,

मंडूक, नाग वगैरे विषारी जीवजंतू निर्भयपणे वावरत होते. अशा शहरात रात्रभर मुक्काम करणे अत्यंत धोक्याचे होते. परंतु रात्र बरीच झालेली असल्यामुळे एक मंदीर पाहून त्यांत त्यांनी ती रात्र ईश्वरावर भरवसा ठेवून जागृतावस्थेतच काढली. सूर्योदय झाल्यावर तिघेही मार्गाला लागली. काही मार्ग आक्रमण केल्यावर त्यास काशिक्षेत्राचे दर्शन झाले. गंगेचा प्रवाह व देवाच्या नांवाचा होत असलेला जयघोष पाहून त्यांना आनंद झाला. त्यांनी गंगेत स्थान करून काशिविश्वेश्वराचे दर्शन घेतले व ते शंकराची प्रार्थना करू लागले. इतक्यात ब्राह्मण रूपधारी विश्वामित्र तेथे आला आणि रागाने म्हणाला, 'ब्राह्मणाला यत्किंचित औटभार सुवर्णाच्या दक्षिणेसाठी एवढ्या लांब तंगडयातोड करावयाला लावणारा राजा तू मोठा सत्वशील दिसतोस. बाबा, मी म्हणून इतक्या लांब जिवंत आलो. दुसरा कोणी असता तर वाटेतच मरून पडला असता. राजा हरिश्चन्द्रा आता कबूल केल्याप्रमाणे माझी दक्षिणा दे किंवा स्पष्ट नाही म्हणून तरी सांग. आता अस्तमानाला थोडा अवकाश राहिला आहे. आज सूर्यास्ताच्या आत माझी दक्षिणा दिलीस तर बरे आहे नाही तर तू देत नाहीस असे समजून मी येथून निघून जाईल! विश्वामित्राचे ते भाषण ऐकून राजाला मर्मांतिक दु:ख झाले. तो हात जोडून म्हणाला - 'महाराज आपण मजबरोबर बाजारात चलावे व तेथे आम्हा तिघांचा विक्रय करून आपली दक्षिणा घ्यावी. राजाचे म्हणणे विश्वामित्राने कबूल केले व त्याने त्या तिघांना बरोबर घेऊन राजमार्गाने विक्रीसाठी चालविले. (श्लोक १९१-२१२)

एक ब्राह्मण तीन माणसे विकत आहे हे वर्तमान हा हा म्हणता सर्वत्र पसरले व ती मजा पाहण्यासाठी विश्वामित्रासभोवती हजारो लोक जमले. राजा, राणी व राजपुत्र यांच्या करूणामय सुस्वरूप चेहऱ्याकडे पाहून लोकांना आश्चर्य वाटले. तारामतीचे ते अप्रतिम लावण्य पाहून एका गणिकेस तिची लालसा उत्पन्न झाली व तिने विश्वामित्राजवळ तिची मागणी केली. तारामतीने विश्वामित्राचे पाय घट्ट धरले व ती करूण स्वराने म्हणाली, 'महाराज ही जी स्त्री मला विकत मागत आहे ती गणिका असून पशुवृत्तिसाठी ती मला विकत घेत आहे. तेव्हा माझा सतीत्व धर्म राखण्यासाठी मजवर दया करा आणि मला ह्या बाईच्या स्वाधीन करू नका.' तारामतीने केविलवाणीने केलेली ती विनंती पाहून जमलेल्या सर्व लोकांचे डोळे पाण्याने भरून आले. पण विश्वामित्राच्या मनावर त्याचा कांही परिणाम झाला नाही. तो म्हणाला - 'तारामती तुला गणिकेस विकू नये हे खरे पण अन्य कोणी विकत न घेतले तर मला माझ्या दक्षिणेसाठी विकणे भाग आहे.'

विश्वामित्राचे ते कठोर भाषण ऐकून तारामती दीनवदनाने जमलेल्या लोकाकडे पाहू लागली. त्यात कालकौशिक नावाचा एक सत्त्वस्थ ब्राह्मण होता. त्यास तारामतीची दया आली. त्याने तारामतीला विकत घेण्याचे ठरविले व तो विश्वामित्राला म्हणाला, 'महाराज, आपणच हा मनुष्य विकण्याचा धंदा करीत आहांत काय? मला ह्या स्त्रीला विकत घ्यायचे आहे. तर हिची किंमत काय ती मला सांगा.' विश्वामित्र म्हणाला, 'हो मी हा राजा हरिश्चन्द्र, ही राणी तारामती व हा राजपुत्र रोहिदास ह्या तिघांचा विक्रय मांडला आहे. राजाचे मोल दोन भार सुवर्ण, तारामतीची किंमत एकभार सुवर्ण व या राजपुत्राची किंमत अर्धा भार सुवर्ण आहे. ज्याची इच्छा असेल त्याने सुवर्ण द्यावे व ह्यांना विकत घ्यावे.'

विश्वामित्राच्या मागणीप्रमाणे कालकौशिकाने एकभार सुवर्ण काढले व ते तो विश्वामित्राच्या हातात मोजून देऊ लागला. तेव्हा तारामती त्या ब्राह्मणाला म्हणाली, 'महाराज, आपण मला कोणत्या कार्यासाठी विकत घेत आहात ते सांगाल तर मजवर आपला अनुग्रह होईल.' तेव्हा कालकौशिक म्हणाला, 'बाई, तू त्या संबंधाने मुळी देखील काळजी करूं नको. मी तुला आपल्या मुलीप्रमाणे वागवीन. माझ्या आश्रमात अनेक ऋषि आहेत त्यांना तू स्वयंपाक करून भोजन घालीत जा म्हणजे झाले.' ब्राह्मणाने आपणास चांगल्या कार्यासाठी विकत घेतले हे पाहून तारामतीला समाधान वाटले. तिने आपल्या पतीचा मोठ्या कष्टाने निरोप घेतला. रोहिदासाला आपल्या हृदयाशी घट धरून कुरवाळून धरले. रोहिदास मातृवियोग दु:खाने विव्हल झाला व मातेच्या गळ्याला मिठी मारून म्हणाला, 'माते, या अभागी रोहिदासाने आता आई म्हणून कोणाला हाक मारावी. आई, मलाही तुझ्याबरोबर घेऊन चल. तू मला आपणापासून दूर लोटू नकोस!' तेव्हा तारामती त्या कौशिक ब्राह्मणाचे आर्जव करून म्हणाली, 'महाराज, या माझ्या पुत्रालाही जर आपण अर्धभार सुवर्ण देऊन विकत घ्याल तर मजवर आपले अनंत उपकार होतील. आम्हां मायलेकराची होणारी ताटातूट आपण दूर कराल तर मी जन्मजन्मान्तरीची ऋणी होईन. या तुमच्या धर्मकन्येची एवढी विनंती मान्य करा.' तारामतीची करूणवाणी ऐकून कालकौशिकाला तिची दया आली व त्याने रोहिदासाचे मुल्य देऊन त्यासही विकत घेतले. नंतर रोहिदास व तारामती यांनी अत्यंत जड अंत:करणाने राजाचा निरोप घेतला व ते कालकौशिकाबरोबर त्याच्या आश्रमात गेले.

स्वत:च्या स्त्रीपुरुषाचा विक्रय झाल्यावर राजा सचिंत मनाने आपल्या प्राक्तनाचा विचार करीत रस्त्यावर स्वस्थ उभा राहिला. तेव्हा विश्वामित्र त्याला हलवून म्हणाला, 'राजा, असे स्वस्थ उभे राहून कसे चालेल? तू मला दक्षिणेचे आमिश लावून येथवर रखडत आणलेस. तुझ्या दक्षिणेची यातायात करता करता माझी चांगली खोड मोडलीस. तुझ्याकडून दक्षिणा मिळविण्याकरिता माझे प्राण बाबा कंठात आले आहेत, आता एकदाचे दोन भार सुवर्ण देऊन माझा पिंड सोड.' विश्वामित्राचे ते मर्मभेदक शब्द ऐकून राजाचे हृदय विदीर्ण झाले. तथापि तो शांतवृत्तीने म्हणाला, 'महाराज आपणास माझ्याकरिता फार श्रम पडले त्याबद्दल क्षमा करा! मी आपल्या दक्षिणेची तजवीज आता लवकरच करतो.' असे म्हणून हरिश्चन्द्रराजा जमलेल्या नगरवासियाकडे दीनमुखाने पाहून म्हणाला - 'अहो दयावंत लोकहो, मजवर दया करा आणि मजबद्दल दोन भार सुवर्ण या ब्राह्मणाला देऊन मला विकत घ्या. राजाचे शब्द ऐकून सर्व लोक हळहळू लागले. परंतु राजाला विकत घेण्यासाठी कोणीच पुढे होईना. पण एक डोंब पुढे होऊन म्हणाला - मला एका मनुष्याची गरज आहे, पण मी जातीने नीच डोंब आहे. तेव्हा या कुळातल्या मनुष्यास घेऊन काय करूं? हरिश्चन्द्र म्हणाला - 'बाबा, तू डोंब असो अथवा कोणीही असो या ब्राह्मणाला दोनभार सुवर्ण दे व मला विकत घे. मजवर तुझे फार उपकार होतील. तू सांगशील ते तुझे काम मी करीत जाईन. मला खाण्यापुरते अन्न देत जा म्हणजे झाले.' राजाचे भाषण ऐकून डोंबाला त्याची दया आली व त्याने लागलीच दोन भार सुवर्ण विश्वामित्राला देऊन हरिश्चन्द्राला आपल्या घरी नेले. ठरल्याप्रमाणे हरिश्चन्द्राकडून विश्वामित्राला दक्षिणा मिळाल्यावर आपण केलेली प्रतिज्ञा फुकट गेली असे वाटून विश्वामित्राला कसेसेच झाले. परंतु त्याने पुन्हा त्या तिघांना छळण्याचा विचार केला. (श्लोक २१३-२२६)

हरिवंश झांपडा नावाच्या डोंबाने हरिश्चन्द्राला घरी आणल्यावर त्याला पाणी भरण्याचे काम सांगितले. त्या डोंबाची स्त्री त्याला खाण्यासाठी जे कांही देई ते घेऊन हरिश्चन्द्र पाणवठ्यावर जाई आणि शिदोरी सोडताच विश्वामित्र निरनिराळ्या भिकाऱ्यांच्या रूपाने, कुत्र्यांच्या रुपाने येऊन सर्व शिदोरी फस्त करून टाकी. उदारबुध्दि दानवीर राजा मनात कोणत्याही प्रकारचे दु:ख न करता स्वत: उपवासी राहून अतिथी भिक्षुक व पशुपक्ष्यांना तृप्त करी. पण असे किती दिवस चालणार? अन्नाचा एकही घास पोटात न गेल्यामुळे तो फार अशक्त, दुबळा झाला म्हणून डोंबाने त्याला

अधिक शिदोरी देण्यास सांगितले. एकदा राजा हरिश्चन्द्र पाणी भरत असता मोठमोठ्या घागरी भरल्या त्या त्याच्याने उचलल्या गेल्या नाही. कारण विश्वामित्राने त्यांच्यावर अदृश्यरुपाने भार देऊन त्या जड केल्या होत्या. त्या कोणी आपल्या डोक्यावर उचलून देईल का म्हणून तो इकडे तिकडे पाहू लागला. कुमार रोहिदास गाईला चारा नेण्यासाठी अचानक त्याठिकाणी आला होता. पण त्याने आपल्या पित्यास ओळखले नाही. तो म्हणाला, 'मला तुझ्या शरीराला स्पर्श करता येणार नाही. तसे केले तर माझा स्वामी रुष्ट होईल. पण तुला एक युक्ति सांगतो. पाण्याचे घडे घेऊन तू खोल पाण्यात जा व मग डोक्यावर घे म्हणजे सहज तुला उचलले जातील. राजाने बालकास ओळखले. हा तर आपलाच मुलगा. त्याला पाहताच त्याच्याविषयी राजाच्या मनात प्रेमभाव उचंबळून आला. पण त्यास दुःख होऊ नये म्हणून सर्व प्रकारचा हेतभाव आवरून राजाने मनाची समजूत घातली. विश्वामित्राने रांजणास भोक पाडून सर्व पाणी वाहून गेले. पाणी भरता भरता राजा दमला पण रांजण भरत नव्हता. म्हणून डोंबाची स्त्री फार संतापली व त्याला तोंड टाकून बोलू लागली. मग त्या डोंबाने हरिश्चन्द्रास स्मशानाच्या रखवालीचे काम सांगितले व जो कोणी प्रेत जाळण्याकरिता येईल त्याच्याजवळून कर घेण्याची आज्ञा केली.

इकडे कालकौशिकाच्या आश्रमात रोहिदास असता एके दिवशी तो ऋषिपुत्रांबरोबर समिधा व फुले आणण्यासाठी गेला. ही संधी साधून विश्वामित्राने भयंकर विषारी सर्पाचे रूप घेतले व रोहिदासाला दंश केला. सर्पदंश होताच रोहिदास गतप्राण होऊन भूमिवर पडला. तो प्रकार पाहताच सर्व मुलें घाबरली. त्यांनी ते वर्तमान तारामतीला कळविले. ते अशुभ वर्तमान ऐकताच तारामतीची गात्रे शिथील झाली. परंतु धैर्य करून ती म्हणाली - 'मुलांनो. आत ऋषिमंडळी भोजनास बसली आहे. त्यांच्या कानावर हा प्रकार जाईल तर ते अर्ध्या जेवणातूनच उठतील व तो दोष लागेल याकरिता बाळांनो थोडा वेळ तरी बोलू नका.' असे मुलांना बजावून ती महासाध्वी तारामती पाकशाळेत गेली. तिने आपले दुःख तसेच दाबून ठेवले व ऋषींना भोजन घालून तृप्त केले. सर्व कांही आटोपल्यावर ती आश्रमातून निघाली व वाडीत रोहिदासाच्या प्रेताजवळ आली. प्राणाहून प्रीय पुत्राचे ते चैतन्यरहित व काळेनिळे पडलेले ते शरीर पाहून हृदय पिळवटून तिने हंबरडा फोडला. पुत्रविरह दुःखाने ती विव्हल होऊन निश्चेष्ट पडली. सावध करून सांत्वन करायला तिच्याजवळ त्यावेळेस कोणीही नव्हते.

थोड्यावेळाने विश्वामित्र ब्राह्मणाचे रुप घेऊन तेथे आला व तारामतीची समजूत करून ते प्रेत स्मशानात नेऊन दहन करण्याविषयी त्याने तिला सल्ला दिला. राणीने काही लाकडे जमा करून मुलाचे प्रेत ब्राह्मणाच्या साहाय्याने स्मशानात नेले व त्यावर काष्टे रचून त्यास अग्नी लावला. ब्राह्मण निघून गेला एवढ्यात विश्वामित्राने बाराही मेघांना विनंती करून जोराची वृष्टी करण्यास सांगितले. एका क्षणात काळेकुट्ट ढग आकाशात जमून जोराची मुसळधार वृष्टी सुरु झाली. चिता जळू शकली नाही. अर्धवट जळालेली लाकडे पाण्याने वाहून गेली. तारामतीने आपल्या बाळाचे ते अपूर्ण जळालेले प्रेत जवळ घेऊन तेथेच शोक करीत बसली. पावसाने ओलेचिंब झालेली, थंडीने गारठून गेलेली अशी ती तारामती रात्रीच्या भयाण वेळी तेथे बसलेली असतांनाच त्या कपटवेषधारी ब्राह्मणाने स्मशानाची रखवाली करणाऱ्या हरिश्चन्द्रास कोणी एक स्त्री प्रेत संस्कार करीत आहे तिच्याजवळून कर घेतलास किंवा नाही - नसल्यास ती अजून तेथेच बसलेली आहे असे सुचविले. हरिश्चन्द्र तसाच उठला व त्या स्त्रीजवळ गेला. दोघ एकमेकाना अनोळखी झालेले म्हणजे हरिश्चन्द्रास ह्या कामगिरीवर नेमलेले असेल अशी तिला जाणीवही नव्हती व ही तारामतीच असेल याची त्याला कल्पना नव्हती. हरिश्चन्द्र एकदम संतापून म्हणाला, 'हे साध्वी स्त्रिये, प्रेतसंस्काराचा कर न देता तू प्रेत जाळतेस हा गुन्हा आहे. कर दिल्याशिवाय तुला प्रेत जाळता येणार नाही.' तारामतीला त्यावेळी अति दुःख झाले पण करील काय? कर देण्याला जवळ कांहीच साधन नव्हते. तेव्हा ती प्रेतास पुढे घेऊन शोक करू लागली. तिने हरिश्चन्द्रास विनविले - 'महाराज कर देण्यास माझ्याजवळ तर दुसरे कांहीही नाही, माझ्या प्राणप्रिय मुलाच्या प्रेतास गुंडाळण्यासाठी वस्त्रसुध्दां नाही. पण ह्या माझ्या साडीने झाकले आहे तर मग आपणास कर म्हणून काय देऊ? राजाने तारामतीस ओळखले. पण सत्व जाऊ नये व भावी अनर्थ टळावा म्हणून तसे न दाखविता वस्त्राचाच एक तुकडा फाडून कर भरण्यास सांगितले. तारामतीने आपल्या साडीचाच पदर फाडून हरिश्चन्द्रास दिला व पुढिल व्यवस्था काय करावी याची चिंता करून शोक करू लागली. अपार दुःखमय स्थितीत सुध्दा राजा हरिश्चन्द्र व तारामती यत्किंचितही सत्वापासून ढळले नाही. (श्लोक २२७-२३९)

विश्वामित्राने काशिनगरातील धवलचंद्र राजाचे लहान मुल रात्रीच्या सुमारास नाहीसे केले. प्रभातकाळीच राजवाड्यात सर्वत्र मोठा हाहाःकार झाला. सर्वत्र मुलाची शोधाशोध सुरु झाली. तेवढ्यात विश्वामित्राने कुडबुड्या ज्योतिषाचे रूप घेतले व

राजद्वारी जाऊन सांगू लागला 'महाराज आपले मूल रात्रीच्या चौथ्या प्रहरात नाहीसे झाले ना. मग ठिक आहे मी ज्योतिष पाहून सांगतो माझे भविष्य अगदी अचूक निघते.' त्याने काही आडव्या उभ्या रेषा ओढून कांही अंक मोजून सांगितले - 'आपल्या गंगानदीच्या घाटावरील स्मशानभूमीत एक लावीण आपल्या मुलाला मारून त्याचे प्रेत भाजून खाण्याच्या उद्देशाने जवळ घेऊन बसली आहे. त्वरा करून जाल तर तीही मिळेल व राजपुत्राचे प्रेतही मिळेल.' ज्योतिषाच्या सांगण्याप्रमाणे कांही सैनिक स्मशान भूमीकडे धावले. पाहातात तो खरोखर एक अर्धवट कपडे धारण केलेली स्त्री लहान मुलाचे प्रेत मांडीवर घेऊन बसलेली त्यांना दिसली. त्यांनी ताबडतोब राजाला हे वर्तमान कळविले व ज्योतिषी सांगतो ते खरे आहे हे जाणून ताबडतोब राजाने हुकूम सोडला. त्या लाविणीला दंडभार करून बालकाचे प्रेत सोडवा. हुकूमाप्रमाणे सैनिक गेले पण स्वत: मारण्याची हिंमत कोणाचीच होईना. न जाणो स्मशान आहे ते, आपण त्या लाविणीला मारले तर आपल्या मागेच लागेल ती, त्यापेक्षां त्या स्मशानाचा मालक जो हरवंश डोंब आहे त्यालाच सांगावे तो तिला मारून टाकीन म्हणून त्यांनी डोंबास बोलाविले. डोंबाने आपल्या सेवकास म्हणजे हरिश्चन्द्रास आज्ञा केली की या चांडाळीला तू मारून टाक अशी राजाज्ञा आणि माझी सुध्दा तुला आज्ञा आहे. हरिश्चन्द्राजवळ भयंकर अक्राळविक्राळ श्वान होते. ते तारामतीवर सोडले. पण कुत्रे तिथे गेले आणि प्रेमाने तारामतीला हुंगून परत आले. डोंबाने आज्ञा केली - हातात तलवार घेऊन तिचा शिरच्छेद कर. अगदी नाईलाज म्हणून आणि राजाज्ञा व स्वामीची आज्ञा म्हणून हरिश्चन्द्राने हातात तलवार घेतली आणि तो तारामतीजवळ गेला. हे वर्तमान नारदास समजताच नारद विष्णुलोकी गेला व विष्णुला म्हणाला, 'हे अनंता, तुझ्या भक्ताच्या कसोटीचा कळस झाला तरी तू स्वस्थ कसा? आता तारामतीचा वध होत आहे तर देवा क्षणाचाही विलंब न करता तू काशिक्षेत्री जा आणि त्या तिघांचाही उध्दार कर.' हे वर्तमान ऐकताच विष्णु म्हणाले - 'नारदा भक्ताच्या सत्व कसोटीचा अवधी पूर्ण झाला आहे. आणि पुढची सारी योजना तयार आहे. चल या विमानात बैस. आपण सर्व तिथे जाऊ.' (श्लोक २४०-२४९)

स्वामी आज्ञा आणि राजाज्ञेप्रमाणे राजाने हातात तलवार घेऊन तारामतीजवळ गेला. आता आपल्या जीवनाचा शेवटच आहे असे जाणून तारामती, रोहिदास आणि हरिश्चन्द्राच्या नावाने टाहो फोडून शोक करू लागली. राजा हरिश्चन्द्राला पुत्रमृत्यू आणि त्याच्या अंतिम संस्काराची दुर्दशा व राणीची बिकट स्थिती पाहून अतिशय

वाईट वाटले. त्याला खूप भडभडून आले. एकसारखा अश्रुप्रवाह त्याच्या डोळ्यातून वाहू लागला. हरिश्चन्द्र म्हणाला, 'राणी तारामती मीच तुझा तो अभागी पति हरिश्चन्द्र आहे. क्षणानंतर याच दुर्भाग्याकडून तुझा अंत होणार आहे. यासाठी तू आता आपल्या हृदयात असलेल्या आणि अंत:काल समयी भक्ताची आशा पूर्ण करणाऱ्या सद्‌गुरुंची आठवण कर. नंतर त्यांनी दर्शविलेल्या ध्येयपुरुष अवतारपात्र श्रीरामचंद्र प्रभुचे स्मरण कर. आणि त्यानंतर आपली कामधेनुरुप असलेली गतगंगा तिचे स्मरण कर. ज्या सुखी गुरुगतगंगेची सेवा आपण निरिच्छ बुध्दीने केली त्या सेवेला आपण आता अंतरलो आहोत. आपण अभागी या जन्मात हे कार्य आपणाकडून आता पुनश्च घडणार नाही, असो आपले नशिब तसे खडतर असे म्हणून राजा व राणी मनोमन सद्‌गुरु वसिष्ठमुनि व भगवान श्रीरामचंद्र आणि मुखी गतगंगा कलश घाटपाट व अखंड ज्योतीचे ध्यान करण्यात मग्न होऊन गेले. तेव्हाच भगवान लक्ष्मीनारायण अदृश्यरूपाने तेथे येऊन उभे राहिले.

'हरिश्चन्द्रा, उशीर का करीत आहेस म्हणून डोंब त्याला दरडावीत आज्ञा करीत आहे तोच राजाने उजव्या हातात खड्ग व डाव्या हाताने राणीचे केस धरून उभा राहिला. राणी भानावर नव्हती. आपल्याच अंतरात्म्याशी ध्यान चिंतन रूपाने ती एकरूप झालेली होती. राजाने हात उगारून वार करणार एवढ्यात अंतरीक्षातून भगवान श्रीहरींनी त्याच्या हातातील तलवार हिसकून दूर फेकून दिली. राजाच्या पाठीवर हात ठेवून प्रेमाने ते त्याला कुरवाळू लागले. ताबडतोब त्याठिकाणी पुष्पवृष्टी होऊन गुरुवशिष्ठ, विश्वामित्र, नारद, सनकादिकऋषि, ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, लक्ष्मी, पार्वती, सावित्रीसह प्रगट झाले. इंद्र, चंद्र, वायू, वरूण, यमधर्म आदित्य, वसु वगैरे सर्व देव प्रगट झाले. हे सर्व पाहून राजाचे हृदय अपार प्रेमाने उचंबळून आले. त्याने तारामतीला जागृत केले व म्हणाला राणी उठ आपले स्वामी गुरुदेव आपल्याला दर्शन देण्यासाठी आलेले आहेत. दोघही सतगुरु वसिष्ठांच्या आण भगवंतांच्या चरणी लागून आनंदाश्रुंनी त्यांनी त्यांचे चरण भिजवले. तोच रोहिदास अंग मोडून उठला व तोही त्यांच्या चरणी लीन झाला. त्या सद्‌भक्तांना त्या क्षणाला केवढा आनंद झाला असेल, कल्पनेने त्याचे वर्णनही करता येणार नाही.

भगवान श्रीहरी म्हणाले, 'भक्ता हरिश्चन्द्रा, तारामती, मागा, तुम्हाला काय वरदान देऊ ते सांगा. तुम्ही विश्वामित्राच्या सत्त्वपरीक्षेतून पार उतरलेले आहात. सतपंथांच्या कसोटीतून पूर्णपणे पार उतरलेले आहात. तुमची काय इच्छा असेल ती सांगा मी

ताबडतोब पूर्ण करतो.' भक्त हरिश्चन्द्र व तारामती दोघही एकदम म्हणाले - 'स्वामी, आम्ही अपराधी आहोत. आमच्या हातून आपली व गतगंगेची आणि सद्‌गुरु महाराजांची सेवासुध्दा पूर्ण रूपाने झाली नाही, स्वामी विश्वामित्र ऋषींनी सत्व परीक्षा घेण्यांकरिता आमच्या घरी येऊन आमच्यावर जो अनुग्रह केला आहे, त्यांच्या वतीने मी आपली क्षमा मागतो. त्यांनी आम्हाला दुष्टबुध्दीने हा ताप दिला नसून आम्हाला परमपावन करण्यासाठी व आपल्या दर्शनास पात्र करण्यासाठी आमच्यावर कृपा केलेली आहे. त्यांच्या ऋणातून मुक्त न होता उलट आमच्या हातून त्यांची सेवा घडावी असा आशिर्वाद द्यावा.' भक्ताचे निर्वैर आणि कोमल अंत:करण जाणून सर्व देवदेवतांना व ऋषीमुनींना गहिवरून आले. त्यांनी विश्वामित्राला साहाय्य होऊन भक्तांना छळल्याबद्दल क्षमा मागितली. विश्वामित्राने सांगितले, 'सद्‌भक्तानों तुम्ही केवल वशिष्ठमुनींचे शिष्य असून तुमची स्वर्गात वाहवा होत आहे या द्वेषाने प्रेरीत होऊन मी तुमचे सत्त्वहरण करण्याकरिता प्राणांतिक कसोटी घेतली पण तुम्ही यत्किंचितही सत्वापासून न ढळता आपल्या गुरुवचनांवर श्रध्दा, इष्ट ध्येय पुरूषावर श्रीरामावर निष्ठा, गतगंगेची सेवा आणि सत्य धर्माच्या आचरणापासून कधीही अंतरले नाही. म्हणून प्रसन्न होऊन मी तुम्हास माझ्या साऱ्या तपश्चर्येचे दान करतो असे म्हणून विश्वामित्राने सर्वदेवासमक्ष संकल्प सोडला.

सद्‌गुरु वशिष्ठ मुनि म्हणाले, 'माझा खरा सद्‌भक्त युगधर्मानुसार वेदवचन प्रमाण मानतो. नित्य सत्संगात गतगंगेत येऊन सत्संगाची संत सद्‌भक्तांची सेवा करतो. मुखी-सद्‌गुरुंच्या आज्ञेनुसार ध्येय पुरुष अवतारपात्राचे नामस्मरण चिंतन ध्यान करतो, दृढश्रध्दा ठेवून सद्‌गुरुंची सेवा करतो त्यास अमरपद प्राप्त होते. आत्मज्ञान साधनेने जीवात्मा अखंड अविंचलपदास पोहोचतो भक्तिज्ञान तपश्चर्या, शुचिर्भूतता आणि नामस्मरण चिंतन ध्यानाने सद्‌भक्तांस मोक्षगति प्राप्त होते. माझ्या या भक्ताने अनन्य कसोटीच्या रूपाने हे सारे पूर्ण केलेले आहे.' तेव्हा भगवान संतुष्ट होऊन हरिश्चन्द्रास म्हणाले, 'हे सद्भक्त राजा हरिश्चन्द्रा! तुझी सदिच्छा काय आहे ती सांग मी ती पूर्ण करतो.' हरिश्चन्द्र म्हणाला, 'स्वामीन्, आपण प्रसन्न असला तर ज्या सद्‌भक्तांनी माझ्यावर, देवसभेवर आणि सत्पंथावर अपार प्रेम केले आहे, अशा माझ्या नगरवासियांना सद्‌गति लाभावी हीच एक कामना.' ताबडतोब त्याठिकाणी अंतरिक्षातून विमाने उतरली. हरिश्चन्द्राच्या नगरीतील सारे सद्भक्त सात कोटी भगवद्‌भक्तगण हरिश्चन्द्राच्या पुण्यप्रभावाने त्यात बसून अमरपदाला निघून गेले. अंतरिक्षातून देवगण गंधर्व यांनी नृत्यगायन,

मंगलवाद्य वाजवून व त्यांच्यावर पुष्पवृष्टी केली. धन्य राजा भक्त हरिश्चन्द्र! धन्य राणी तारामती! आणि धन्य सद्‌भक्त बालक रोहिदास! असे सर्व त्यांचे गुणगान गाऊ लागले.

युगायुगांच्या ठायी प्रगट झालेल्या महात्मा सद्भक्तांनी जीवनात अनंत कसोटी सहन करून, सध्दर्माकरिता प्राणपणाने वागून आत्मोध्दाराबरोबर अन्य जीवात्म्यांचा सुध्दा उध्दार केलेला आहे. अशाच लोकोत्तर किर्तीच्या संत सद्भक्तांच्या नामप्रतापाने हल्लीसुध्दां कित्येक जीवात्मे उध्दरले जात आहेत. आणि चंद्रसूर्य जोपर्यंत आहेत तोपर्यंत त्याची धवल किर्ती व जगदुध्दारक शक्ति अविंचल राहणार आहे.

पहिल्या मत्स्य अवतारात भगवान विष्णुने तलपाताळात वसलेल्या सद्‌भक्त कनकासूर राजाला वरदान दिले होते कीं, त्रेतायुगात रामावताराच्या वेळेला तू अत्यंत पुण्यवान सत्वशील, सत्पंथी असा राजा होशील. तुझे नाव हरिश्चन्द्र राहून तुझी तारामति ही कुलवान शीलवान अशी परम सति होईल आणि तुझ्या घरी कुलदीपक असा सत्यवादी रोहिदास भक्त जन्माला येईल. सत्वपालनाकरिता तुम्हाला जीवापाड कसोटी सहन करावी लागेल. पण ती सहन करून तुम्ही आत्मोध्दाराबरोबर सात कोटी जीवात्म्यांचे उध्दारक व्हा. तुमच्या पुण्यप्रभावाने व सत्वकसोटीरुप तपश्चर्येच्या बळानेच भगवान श्रीविष्णूचा सातवा अवतार श्री रामचंद्र भगवान चतुरपुरुषार्थांनी युक्त अशा चार भावासह तुझ्याच वंशात जन्म घेतील व आपले वचन पूर्ण करतील. ते वरदान येथे पूर्ण केले व भगवान श्रीराम आपल्या अवतार धारणाची भूमिका तयार करू लागले.

## ★ श्रीराम अवताराची पूर्वपीठिका ★

प्राचिनकाळी ब्रह्मारण्यात वाल्मिकी या नावाने महान तपस्वी व अंतर्ज्ञानी ऋषि होऊन गेले. पूर्वाश्रमात तो एक तपस्वी ब्राह्मणाचा मुलगा होता. लहान वयातच त्याला दुर्जनांचा सहवास लागून तो दुराचारी बनला. तो कोळ्यांच्या सगतीने वाटमाऱ्याचा धंदा करू लागला. तो ब्रह्मकर्मे विसरून जातिभ्रष्ट झाला. त्याने आपले जानवेही फेकून दिले. त्याचा काल चोर दरोडेखोर यांच्या सगतीत जाऊ लागला. कोणतेही दुष्ट कृत्य करण्याचे भय त्यास वाटेना. लोक त्याला वाल्ह्या कोळी म्हणू लागले. त्याला कोणी जवळ येऊ देईनात. तेव्हा तो आपला गाव सोडून अरण्यात सहकुटुंब

जाऊन राहिला. त्या अरण्यात प्रवाशांचा जाण्यायेण्याचा रस्ता होता. त्या रस्त्यावर तो रात्रंदिवस दबा धरून बसे. प्रवासी आले कीं त्याचेवर हल्ला करून त्यास ठार करी. त्यांच्या जवळची चिजवस्तु हिरावून घेई. असा त्याचा क्रम सुरु असे. त्याने कितीतरी जीवांचा नाश केला त्याची गणनाच नव्हती. त्याचे मुलगेही मोठे झाले. परंतु त्याच्या दुष्टकर्मात फरक पडला नाही. आता तो म्हातारा झाला तरी त्याचे दुष्ट कृत्य किंचीतही कमी झाले नाही. तोच त्याच्या गतजन्मींच्या पुण्याईने उध्दाराची वेळ आली.

एके दिवशी म्हातारा वाल्हया नित्याप्रमाणे दबा धरून शिकारीची वाट पाहात बसला असता त्याच मार्गाने नारदमुनिंची स्वारी काही ऋषिमंडळी सह आली. नारद मुनी जवळ येताच शस्त्र उगारून वाल्हया त्यांच्या अंगावर धावला आणि म्हणाला, 'अरे भटुरड्यांनो, कुठे चाललात उभे राहा आणि जवळ असेल नसेत ते सर्व माझ्या स्वाधीन करा नाहीतर प्राणास मुकाल.' तेव्हा नारदांनी त्या वाटमाऱ्याकडे पाहिले. त्रिकालज्ञतेने त्यांनी आपले सावज म्हणून ओळखले व म्हणाले, 'वाल्होबा, आम्ही गरीब ब्राह्मण. आमच्याकडून तुला काय मिळणार आहे. हा वीणा व या चिपळ्या. यांचा तुला काय उपयोग आहे. आम्हाला मारून उगाच आपल्या पातकात भर टाकू नकोस. तू आजपर्यंत जी पातके केली आहेस त्याची शिक्षा यमधर्माजवळ गेल्यावर तुला भोगावी लागणार आहे. तू आजवर असंख्य पापे करून खूप संपत्ती मिळविली असशील. त्या धनाचे वाटेकरी होण्यास बायकोमुले तयार आहेतच, पण तुझ्या पापाचे वाटेकरी होण्यास कोणी तयार होणार नाही. तुझे आयुष्य आता संपत आले आहे. तू मेल्यावर तुला नरकात जाण्याची पाळी येईल. या यातनातून सोडविणारा कोणी आहे कां बरे? त्यावेळी तुझी बायको मुले आप्तमित्र तुला त्या दारूण यातनातून सोडविण्यास येतील कां? तुझ्या पातकांचा कोणी विभागी होईल कां? जा, त्यांना विचारून ये. तू परत येईपर्यंत आम्ही येथून जाणार नाही, याची खात्री बाळग.'

क्षणकाल संतांच्या सहवासाचा परिणाम वाल्हयाच्या मनावर झाला. त्याची बुध्दी पालटली. तो धावतच आपल्या घरी गेला. त्याने आपल्या बायको, मुलांना जवळ बोलाविले आणि म्हणाला, 'मी आजपर्यंत जे धन मिळविले ते पापे करूनच मिळविले आहे. या धनाचे भागीदार होण्यास तुम्ही तयार आहांत? तसेच मी आजपर्यंत जी पातके केली त्याचे तुम्ही वाटेकरी व्हाल काय? वाल्हयाचा हा प्रश्न ऐकून त्याच्या बायकोने व मुलांनी कानावर हात ठेवले. ती सर्व म्हणाली, 'तुम्ही जी संपत्ति

कमवून घरी आणलीत ती आम्ही घेतली ती मिळवण्यासाठी पापे करण्यास आम्ही तुम्हाला सांगितले नाही. म्हणून त्याचा दोष आमचेकडे नाही. तुमची पापे तुम्हास ठाऊक त्याचे फळ आम्ही काय म्हणून भोगावे? म्हणून आम्ही तुमच्या पातकाचे वाटेकरी होणार नाही. तुम्ही केलेल्या पातकांचे प्रायश्चित तुम्ही भोगा.' असे भाषण ऐकताच वाल्हयास फार वाईट वाटले. तो सद्गदित झाला. त्याचे हृदय भरून आले. तो खिन्न होऊन धावतच नारदाकडे आला आणि त्याने नारदाचे पाय धरले. त्यांचे पाय आपल्या अश्रुंनी भिजविले आणि हात जोडून उभा राहिला. करूणवाणीने नारदांना म्हणाला, 'महाराज तुम्ही सांगितले तेच खरे आहे. मी तुम्हाला शरण आलो आहे. मला या पापातून मुक्त होण्याचा मार्ग सांगा. मी तुमचे वचन आमरण पाळीन. माझ्यावर दया करा.' वाल्होबास खरोखरीच उपरति झाली हे ओळखून नारद त्यास म्हणाले - 'वाल्हया भिऊ नकोस. यातून तू मुक्त होशील. तुला मी एक दिव्य मंत्र सांगतो तो तू अहर्निश जप. तो मंत्र अगदी सोपा आहे. 'राम' ही दोन अक्षरे रात्रंदिवस तू मूखातून उच्चारीत राहा. पापातून मुक्त होशील.' असे म्हणून त्यांनी वरदहस्त त्याच्या मस्तकावर ठेवला. ते तेथून ऋषिसह निघून गेले. वाल्हया त्याचठिकाणी राम-राम-राम-राम असा जाप उच्चारू लागला. तो ध्यानस्थ बसून जप करू लागला. तो त्यात देहभान विसरला. भूक तहान आळसनिद्रा भय सारे पळून गेले. रामनाम स्मरणात तो रंगला. त्याला कित्येक वर्षे झाली. अंगावर मोठे वारूळ वाढले. त्याच्या हातातील सुकलेल्या काठीचा वृक्ष होऊन त्याला पाने फुटली. हा सुध्दा रामनामाचाच महिमा म्हणावा नाही तर काय'

पुढे कांही काळाने नारदमुनि त्याठिकाणी पुन्हा आले यावेळी मंद मंद असा रामनामाचा ध्वनी त्यांचे कानावर येऊ लागला. ते उत्सुकतेने इकडे तिकडे पाहू लागले. तो एका वारूळातून हा ध्वनी येत आहे हे त्यांच्या लक्षात आले. त्यांना नवल वाटले. त्यांनी ते वारूळ उकरले. पाहताता तो वाल्हया दिव्य तेजाने चमकत होता. रामनामाच्या जपामुळे त्याची सर्व पातके नष्ट झाली होती. नारदास पाहताच त्याने साष्टांग नमस्कार घातला आणि म्हणाला, 'हे सद्गुरो, मी आता यापुढे काय करावे?' नारद म्हणाले, 'तुझी पातके रामनामाने नष्ट झाली आहेत. तू आता त्रिकालज्ञ ऋषि झालास. आजपासून कांही वर्षांनी श्रीविष्णू दशरथ राजाचे घरी अवतार घेणार आहेत. तो राम अवतार होय. त्याचे चरित्र तू तुझ्या दिव्य दृष्टीने जाणून लिही. त्यांचे चरित्र तू भविष्यवाणीने वर्णन करशील तसे राम पुढे आपले वर्तन करील. तुझा ग्रंथ त्रिभुवनात वंद्य व अपूर्व होईल.' असा वर देऊन नारदमुनि निघून

गेले. नारदांच्या आज्ञेप्रमाणे देववाणी संस्कृत मध्ये वाल्मिकीऋर्षीनी शतकोटी रामायण रचले. ते त्यांचे शिष्य भारद्वाजमुनि यांनी लिहून घेतले. हे मूळ रामायण सत्यलोकी ब्रह्मदेवाने नारदास एकाच श्लोकांत सांगितले होते. नारदांनी ते शंभर श्लोकांत वाल्मिकीला कथन केले व वाल्मिकीने शतकोटी श्लोकांत त्याचे अद्‌भुत रसाळ व विस्तृतरूपाने कथन केलेले आहे. ते एक श्लोकी रामायण असे.

आदौ राम तपोवनादिगमनं हत्वा मृगं कांचनं।
वैदेहिहरणं जटायुमरणं सुग्रीव संभाषणम्॥
वालीनिर्दलनं समुद्रतरणं लंकापुरीदाहनं।
पश्चाद्रावण कुंभकर्ण हननं येतध्दि रामायणम्॥

त्रेतायुगात सातवा अवतार प्रभु श्रीरामचंद्र रूपाने प्रगट झाले त्या काळात प्रमत्त झालेला दैत्य रावण, कुंभकर्णादि दुष्ट दुर्जनांचा नाश करण्यासाठी हा अवतार परमेश्वरास घ्यावा लागला.

ब्रह्मदेवाला पुलस्ती या नावाचा मुलगा होता. तो मोठा तपस्वी होता. त्याचे लग्न तृणबिंदूच्या देववर्णी नावाच्या कन्येशी झाले. तिला विश्रवा नावाचा मुलगा झाला. त्याला भारद्वाजाची मुलगी दिली होती. तिला कुबेर नावाचा मुलगा झाला. त्याला वैश्रव्याच्या मुलगा म्हणून वैश्रवण असे म्हणत. कुबेराने घोर तप करून ब्रह्मदेवास संतुष्ट केले. त्यांनी प्रसन्न होऊन त्याला लंकेचे राज्य दिले. ही लंका पूर्वी त्यांनीच निर्माण केली होती. लंकेत त्यापूर्वी राक्षसांचे राज्य होते. ते कुबेराचे हाती दिल्यामुळे राक्षसांना फार राग आला. ते आपले राज्य परत मिळविण्याच्या मागे लागले.

या कार्यासाठी 'सुमाळी' नावाचा राक्षस लंकेत आला. त्याने लंकेचे वैभव पाहिले. त्याला ते राज्य मिळविण्याची अभिलाषा निर्माण झाली. तो चाणाक्ष होता. युध्दाने कार्यभाग होणार नाही हे त्याचे लक्षात आले. त्याने कपटी डावपेचाने हे कार्य साधण्याचे ठरविले. कुबेराचे सुंदर रूप व सशक्त शरीर पाहून त्याने योजले की याचे बापास आपली मुलगी द्यावी व तिला जे पुत्र होतील त्यांना आपण राक्षसांनी साहाय्य करून कुबेरापासून लंकेचे राज्य हिरावून घ्यावे. असा विचार करून तो पाताळात गेला आणि आपल्या कैकशी नामे कन्येस घेऊन लंकेत आला. सुमाळीने ब्राम्हणाचे बेमालुम रूप घेतले, त्यामुळे विश्रवा फसला. सुमाळी विश्रव्याकडे आला व म्हणाला, 'महाराज, मी एक दरिद्री ब्राह्मण आहे. ईशचिंतनात काळ घालवितो. माझी कन्या उपवर झाली आहे. तिचा तुम्ही अंगिकार करावा म्हणजे मी संसार जालातून मुक्त होऊन अरण्यात तपासाठी जाईन.' कपटी सुमाळीच्या या बोलण्यावर

विश्रवा फसला. त्याने कैकशीबरोबर लग्न लावले. त्यांचा संसार सुरु झाला. हे पाहून सुमाळी तेथून निघून पाताळात गेला. लंकेचे राज्य आपल्या नातवास मिळवून देण्याचा बेत तो रचू लागला.

पुढे एके दिवशी सूर्यास्तसमयी होम चालला असता ती कैकशी विश्रव्याजवळ भोग मागू लागली. तिचे ते अनुचित मागणे ऐकून ऋषि म्हणाले, 'हे पापरूप तामसे, तू ब्राह्मणकन्या नसून राक्षसी आहेस, तुझ्या पोटी दुराचारी राक्षस उत्पन्न होतील. हे पतीचे भाषण ऐकून एकतरी सुपुत्र द्या कैकयीने प्रार्थना केली. ती विनंती मान्य केल्यामुले पुढे तिला रावण, कुंभकर्ण व बिभीषण अशी तीन मुलें व त्राटिका आणि शूर्पणखा अशा दोन मुली झाल्या. वराप्रमाणे बिभीषण सुपुत्र निघाला. भगवद्भक्त त्याची गणना झाली आणि चिरंजीवीत्व लाभले. रावण, कुंभकर्ण व बिभीषण थोडे मोठे होताच गोकर्णक्षेत्री जाऊन राहिले. तेथे रावण श्रीशंकराची, कुंभकर्ण ब्रह्मदेवाची व बिभीषण श्रीविष्णूची आराधना करू लागले. त्यांनी घोर तपश्चर्येचे ठाण मांडले. त्यांच्या तपाने संतुष्ट होऊन तीनही देवांनी त्यांना दर्शन दिले. व वर मागण्यास सांगितले. त्यावेळी रावणाने मला संतति, संपत्ति, विद्या याची पूर्ण प्राप्ती होऊन देवादिकावर माझी सत्ता चालावी असा वर मागितला. कुंभकर्णाने मला इंद्रासन दे असे म्हणावयाच्या ऐवजी अखंड निंद्रासन दे, असा वर मागितला. नंतर बिभीषणाने मला भगवंताच्या सेवेचा लाभ व्हावा.' असे सांगितले तेव्हा तिघ देवांनी 'तथास्तु' म्हटले व आपापल्या लोकी निघून गेले.

या वराने रावण उन्मत्त झाला. त्याने प्रहस्त, महोदर यांना प्रधान नेमले. तसेच विद्युज्जिव्ह, जंबुमाळी, वज्रदंष्ट्र, विरूपाक्ष, खर, दूषण, इडूक, सारण वगैरे बलवान राक्षस बरोबर घेऊन रावण लंकेवर चालून गेला. कुबेराचा पराभव होण्याचे चिन्ह दिसेना. उलट त्याचीच सरशी होत असलेली दिसू लागली. तेव्हा रावणाने कपटी डाव टाकला. त्याने आपल्या बापाचे मन वळवून त्याजकडून एक पत्र लिहून घेतले आणि ते कुबेराकडे पाठविले. त्या पत्रात विश्रव्याने 'तुझा सावत्र भाऊ रावण याचे स्वाधीन लंकेचे राज्य कर.' असे लिहिले होते. कुबेर मोठा पितृभक्त होता. त्याने वडिलांची आज्ञा शिरसावंद्य मानून लंकेचे राज्य रावणाचे स्वाधीन केले व आपण देवलोकात निघून गेला कारण तो ब्रह्मदेवाचा पणतू होता. ब्रह्मदेवांनी मेरू पर्वतावर अलंकापूरी नगरी स्थापून येथील राज्य त्यास दिले. रावण लंकेचा राजा झाल्यावर त्याने मयासुराची कन्या मंदोदरी हिजबरोबर लग्न केले. कुंभकर्णाचे लग्न बळीची नात दीर्घज्वाला हिजबरोबर झाले. बिभीषणाने मात्र राक्षसकन्येबरोबर विवाह न करता सरमा नामक एका गंधर्वकन्येशी लग्न केले. रावणाने गादीवर बसल्यावर अनेक देश जिकले. त्यावर तो करडा अंमल चालवू लागला. उन्मत्तपणे त्याने गोब्राह्मणांचा

अनन्वित छळ चालविला. तेव्हा कुबेराने त्यास निरोप पाठविला, 'तू ऋषिपुत्र आहेस. तुला असे वागणे चांगले नाही.' तो निरोप ऐकताच रावणास राग आला. त्याने सैन्यानिशी अलंकापुरीवर हल्ला केला. कुबेराची संपत्ति व पुष्पक विमान हिसकावून घेतले. तेव्हा कुबेर इंद्राकडे गेला. तेव्हा इंद्राने त्यास कोषाध्यक्ष नेमले.

रावणाला मंदोदरीपासून मेघनाद नावाचा मुलगा झाला. तसेच इतर स्त्रियापासून अनेक मुले झाली. त्याचा परिवार फार वाढला. त्याचेजवळ अठरा अक्षौहिणी सैन्य झाले. वाद्ये सतत वाजत. सर्व भूपति त्याचेपुढे हात जोडून उभे असत. त्याचा सर्वत्र दरारा वाढला. देवांना भीति उत्पन्न झाली. पर्वतांनी आमचे पंख इंद्र आपले वज्राने छेदन करतो असे गाऱ्हाणे रावणास सांगितले. रावण आपल्या सैन्यासह इंद्रावर चालून गेला. यावेळी पर्वतांनी हत्तींची रूपे घेतली. त्यांचेसह रावण इंद्राबरोबर युध्द करू लागला. मेघनादाने ऐरावतास जिंकले. इंद्रास पाशात बांधून ठेविले तेव्हा ब्रह्मदेवाने इंद्रजीतास इच्छित वर देऊन इंद्रास पाशापासून मुक्त केले. तेव्हापासून मेघनादाला इंद्रजीत म्हणू लागले. देवांचा पराभव झाला. ते रावणाचे सेवक बनले. त्याचेबरोबर लंकेस आले. रावणाने त्यांना कामे वाटून दिली. ती अशी - इंद्राने माळा गुंफाव्या, कुबेराने सडासंमार्जन करावे. देवतांनी धान्य दळणकांडण करावे. वरूणाने पाणी भरावे. चंद्राने छत्र धरावे. वायुने अंगण झाडावे. अग्नीने स्वयंपाकसिध्दी करून वस्त्रे धुवावीत. ब्रह्मदेवाने पुराण सांगावे, नारद तुंबरू यांनी गायन करावे. नवग्रहांच्या पायऱ्या बनवून त्यावरून तो आपल्या रत्नखचित राजसिंहासनावर बसून राज्यकारभार करीत असे. (श्लोक २७३-२८५)

सत्यवादी हरिश्चन्द्र राजासारख्या सद्भक्तांचा उध्दार करून त्यांचा सन्मान करण्यासाठी त्याच सूर्यवंशात त्रेतायुगाच्या शेवटच्या प्रहरात भगवान श्रीहरीने सातवा श्रीराम अवतार धारण केला. दैत्य रावण आपल्या अंगच्या प्रबलशक्तीने, अतुलनीय पराक्रमाने त्रिभुवन विजयी झाला होता. साऱ्या देवांना जिंकून त्याने आपल्या घरी निरनिराळ्या कामगिरीकरीता नेमले होते. त्या विजयाने धुंद होऊन मदोन्मत्त रावण एकदा पुष्पक विमानात बसून शंकराचे भेटीस गेला. तेथे दारात नंदी होता. तो रावणास म्हणाला, 'शिवपार्वती एकान्तात आहेत. पुढे जाऊ नकोस.' तेव्हा रावणाला राग आला. दोघांचे भांडण झाले. रावण तसाच पुढे चालला, तेव्हा नंदी म्हणाला, 'उन्मत्त रावणा, तुझा नर वानर संहार करतील. तू दहा रूद्र जिंकलेस तरी अकरावा रूद्र मारूती वानररूपाने तुझा गर्व हरण करील.' तेव्हा रावणास क्रोध आला. त्याने कैलास पर्वत उचलून

नेण्यासाठी पर्वताखाली हात घातला. पर्वत डळमळू लागला. हे शंकरांनी पाहिले. तेव्हा त्यांनी आपल्या पायाने तो पर्वत खाली दडपला. रावणाचा हात चिरडल्यामुळे आक्रंदत तो खाली पडला. मग रावणाने शंकराची स्तुती केली. तेव्हा रावणाचा हात मोकळा होऊन तो लंकेत गेला. अशीच विटंबना सहस्त्रार्जुनाने व पाताळातील बळी राजाने रावणाची केली होती तरी त्याचा गर्व कमी होईना. कांही दिवसांनी किष्किंधेचा राजा वाली यास जिंकण्यासाठी पुष्पक विमानात बसून रावण आला आणि वालीपुढे उभा राहिला. वाली यावेळी ध्यानस्थ बसला होता. तो गडबडीमुळे सावध झाला. त्याला राग आला. त्याने रावणास काखेत मारून चतु:समुद्राचे स्नान केले. रावणास घरी नेले व आपल्या अंगद नावाच्या मुलाच्या पाळण्यावर उफराटे टांगले. अंगदाचे ते एक खेळणेच झाले. अंगदाने वानरचेष्टेने त्यास हैराण केले. रावणाची अशी दशा पाहून विश्रवा वालीकडे आला. त्याने रावणाची भिक्षा मागितली तेव्हा वालीने त्याच्या तोंडाला काळे लावून त्याची तंगडी धरून त्यास लंकेत फेकून दिले.

एकेदिवशी रावण ब्रह्मदेवास म्हणाला, 'माझा मृत्यु कोणाच्या हस्ते होईल ते मला सांगा.' ब्रह्मदेव म्हणाले, अजराजाचा मुलगा जो दशरथ त्याच्या पोटी श्रीराम जन्म घेतील, त्याचे हस्ते तुला मृत्यु येईल. ते ऐकताच तो मनात म्हणाला जर दशरथासच मारले तर मला मृत्यूच येणार नाही.' म्हणून तो अयोध्येकडे राक्षस सेना घेऊन निघाला.

यावेळी अजराजाने दशरथ कौसल्येचा विवाह मांडला होता. इतक्यात नारद तेथे आला आणि अजराजास म्हणाला, 'दशरथाच्या लग्नास रावण विघ्न आणणार आहे. तरी त्याचे रक्षण कर.' ते ऐकताच अज राजाने उभयतास जहाजात घालून त्या जहाजातच उभयतांचे लग्न लावून देण्याचे ठरविले. ती वार्ता रावणाच्या कानावर गेली. ऐन लग्नवेळी जाऊन रावणाने नौका पाण्यात बुडविली आणि फक्त कौसल्येस एका पेटीत खालून ती पेटी, एका बलिष्ठ माशाजवळ देऊन सांगितले ही पेटी माझ्याखेरीज कोणाजवळ देवू नकोस. चांगली जतन करून ठेव असे सांगून रावण सैन्यासह लंकेस आला. माशाने ती पेटी एका बेटात ठेवून दिली व तो भक्षार्थ तेथून निघून गेला. होणारे कधीच चुकत नाही. दैवयोगाने फळीच्या साहाय्याने तरत पोहत दशरथ राजा त्या बेटावर आला. तेथे ती पेटी त्याच्या नजरेस पडली. ती त्याने उघडली. तो त्यात आपली वधु कौसल्या त्यास दिसली. त्याला अपरिमित

आनंद झाला. इतक्यात नारदमुनि तेथे आले. त्यांनी उभयतांचे लग्न लावले व दोघांना पेटीत बसवून पेटी बंद करून निघून गेले.

इकडे आनंदात राज्यासनावर बसून रावण ब्रह्मदेवास म्हणाला, 'मी दशरथ कौसल्येचे लग्न बुडवून आलो. आता त्याला मुलगा होणार नाही आणि त्याच्या हातून मी मरणार नाही. मी चिरंजीव झालो. ते ऐकून ब्रह्मदेव म्हणाले - 'रावणा हा तुझा भ्रम आहे, त्यांचे उभयतांचे लग्न मघाच झाले. रावण आश्चर्याने म्हणाला, 'ही गोष्ट होणे शक्य नाही आणि जर असे असेल तर तू मागशील ते मी तुला देईन. वचनभंग करणार नाही.' असे म्हणून ती पेटी रावणाने आपल्या सेवकाकडून तेथे आणविली व तीत काय आहे ते पाहण्यास ब्रह्मदेवास सांगितले. ब्रह्मदेवांनी ती पेटी रावणासमोर उघडली. तो त्यात सर्वांना दशरथ-कौसल्या हे दोघे दिसले. तेव्हा तलवार उपसून रावण दशरथावर धावला. तेव्हा त्याचा हात धरून ब्रह्मदेव म्हणाले 'माझे मागणे- मला दे. या दोघास जीवतदान देऊन माझे स्वाधीन कर.' तेव्हा वचनाप्रमाणे त्या दोघांना ब्रह्मदेवाचे स्वाधीन करणे रावणास भाग पडले. नंतर ब्रह्मदेवांनी त्या दोघास अयोध्येस आणले. उरलेला लग्न सोहळा मोठ्या थाटाने पार पडला. सर्वांना फार आनंद झाला. मग इंद्राने दशरथास राज्यावर बसविले आणि ब्रह्मदेव, इंद्र स्वस्थानी निघून गेले. आपले इप्सित साध्य झाले नाही म्हणून रावण फारच बिथरला त्याने गोब्राह्मण देव व मानवांचा छळ मांडला. यज्ञयागादि कृत्यांचे विध्वंसन सुरु केले. पृथ्वी चळचळा कापू लागली ती दीन होऊन ऋषिसह गार्यींच्या रूपाने ब्रह्मदेवास शरण गेली आणि आपल्या पाठीवर होणारा छळ त्यांना सांगितला. तो ऐकल्यावर सर्वासह ब्रह्मदेव क्षिरसागराचे स्थळी येऊन शेषशायी श्रीविष्णुचे स्तवन करू लागले. तेव्हा सागरातून आवाज आला. 'देवहो, भिऊ नका. मी रावणाच्या नाशासाठी अयोध्या नगरीत दशरथ-कौसल्येचे घरी जन्म घेतो. मी राम होईन, शेष लक्ष्मण, शंख भरत, चक्र शत्रुघ्न, अशा रूपाने आम्ही दशरथाच्या घरी जात आहोत. लक्ष्मी जनक राजाची कन्या होऊन मला वरील. तुम्ही सर्वांनी वानरांच्या रूपाने अवतार घ्यावेत. शंकर हनुमान होतील, ब्रह्मदेवाने जांबुवंत व्हावे, धन्वंन्तरी सुषेण, बृहस्पती अंगद, सूर्य सुग्रीव, अग्नि नल, वायु नील याप्रमाणे अवतार घेऊन रावणाच्या नाशासाठी रामास साहाय्य करावे. याप्रमाणे वागाल तर तुमचे मनोरथ पूर्ण होतील. अशी आज्ञा होताच सर्वांना आनंद झाला. ते भगवान शेषशायी नारायणास वंदन करून आपापल्या स्थानी निघून गेले.

दशरथ राजा अयोध्येच्या गादीवर बसल्यानंतर त्याने अनेक स्त्रियांशी लग्ने केली. त्यात कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या मुख्य होत्या. त्यात कौसल्या पट्टराणी तर कैकेयी आवडती राणी होती. त्याने मोठ्या न्यायाने राज्य केले. त्याला सर्व सुखे अनुकूल होती. पण पुत्रसंतान नव्हते म्हणून तो खिन्न व चिंतातूर दिसे. एके दिवशी दशरथ राजास वाईट स्वप्न पडले. त्याने ते आपले गुरु जे वशिष्ठऋषि त्यांना सांगितले. वशिष्ठ राजास म्हणाले, स्वप्न वाईट आहे. पण त्याचा शेवट चांगला आहे. स्वप्नात तुझ्या हातून दोन पुरुष व एक स्त्री यांची हत्या झाली आहे. त्यासाठी शिकारीस जाऊन तीन श्वापदे मारून आण. नंतर होम करून त्यांची शांति करू. म्हणजे स्वप्नदोष निघून जाईल.'

वशिष्ठ ऋषिंच्या आज्ञेप्रमाणे राजा मृगयेसाठी अरण्यात गेला. पुष्कळ फिरला पण श्वापद कांही दिसले नाही. सूर्यास्त झाला. तेव्हा एक सरोवराजवळील एका झाडावर बसला. आता श्वापद पाणी पिण्यास येईल व आपणास शिकार सापडेल. म्हणून तो धनुष्य सज्ज करून टेहळणी करू लागला. दैवगतीने त्याच मार्गाने श्रावण नावाचा मातृ-पितृभक्त ब्राह्मणपुत्र अंध मातापित्यास कावडीत बसवून ती कावड खांद्यावर घेऊन तीर्थयात्रेकरीता चालला होता. श्रावण त्या सरोवरापाशी विश्रांतीसाठी थांबला होता. तेव्हा आईवडिल त्याला म्हणाले, 'आम्हाला फार तहान लागली आहे. पाणी आणून पाज.' श्रावण हातात कमंडलु घेऊन पाणी आणण्यास निघाला.

पूर्वी मानससरोवरावर एक हंस पक्षाचा जोडा राहात होता. दोघांचे एकमेकावर अकृत्रिम प्रेम होते. सकाळपासून सरोवरावरून निघून पृथ्वीतील साऱ्या तीर्थस्थानात स्नान करून दर्शन घेऊन ते संध्याकाळचे सुमारास सरोवरात परत येत व रात्री बराच वेळ गप्पागोष्टी करून परमेश्वराच्या अगाध लिलांचे वर्णन गात गात झोपत. त्यांचा एक मित्र कासव होता. तो एकटाच होता. तो सुध्दा त्याच्या सत्संगाच्या वेळी येऊन त्यांच्या तोंडून परमेश्वराच्या व तीर्थक्षेत्रांच्या अद्भुत कथा ऐकून दंग होई व आपल्या नशिबास दोष देत म्हणे की, 'मित्र हो, तुम्हाला ईश्वराने पंख दिले आहेत म्हणून तुम्ही सर्व तीर्थक्षेत्रांची यात्रा करून येतात. केवढे भाग्यवान आहात तुम्ही! नाहीतर मी पापी इथेच कित्येक वर्षापासून खितपत पडलो आहे. मला कसले तीर्थक्षेत्राचे दर्शन व कसले काय? माझ्या सारखा अभागी दुसरा कोण असू शकेल!' वारंवार त्याचा हा विलाप ऐकून त्या दोघांनी त्याला तीर्थक्षेत्राला घेऊन जाण्याचे ठरविले. दोघ जणांनी एक दणकट काठी दोन्ही बाजूंनी आपल्या

पायात घट्ट धरली व मध्यभागी कासवास काठी पकडण्यास सांगितले व याप्रमाणे तिघांची यात्रा सुरु झाली. नित्यनियमाप्रमाणे ते तीर्थक्षेत्रावर स्नान करून दर्शन घेऊन पुढे पुढे जाऊ लागले. कासवास फार आनंद झाला. पुढे कुरुक्षेत्राच्या भूमीवरून जेव्हा ते जाऊ लागले तेव्हा हंस व हंसिणीच्या मनात विपरीत भाव उत्पन्न झाला. 'या कासवाचे हे भयंकर ओझे आपण विनाकारण वाहून नेत आहोत. हा आपल्या या उपकाराची फेड ती काय करू शकणार?' असा दोघांच्या मनात एकदाच विचार येताच दोघांच्या पायांची पकड ढिली पडली व काठी पायातून एकदम निसटून कासवासह खाली पडली. कासव तर जमिनीवर पडताच घायाळ झाला व मरणोन्मुख होऊन तो त्या दोघा हंसाचे मनोमन गुणगान करीत वाट पाहू लागला. दोघांना झालेल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप झाला व ते त्या कासवाजवळ आले. त्यांनी आपली चूक कबूल केली व त्याची क्षमा मागितली. कासव म्हणाले, 'सत्संगी मित्रांनो, तुमचे एवढे उपकार माझ्याने जन्मोजन्मी फिटणार नाही. झाली एवढीच यात्रा पुरे. त्यातच मला समाधान आहे. तुम्ही तुमच्या मनाला वाईट वाटून घेऊ नका. मी तुमच्या ऋणात बांधला गेलो आहे. ईश्वरकृपेने त्या ऋणातून मुक्त होण्याचे सौभाग्य मला लाभो. बरे तर मी आता येतो. श्री राम --' असे म्हणून त्याने प्राण सोडला. झालेल्या घटनेबद्दल दोघांना फार वाईट वाटले. पण विधीघटनेपुढे सर्व व्यर्थ असे समजून त्यांनी उरलेले आयुष्य ईश्वर चिंतनात घालविले. कालांतराने हंस तोच सत्यदेव व हंसिणी तीच सत्यवती रूपाने जन्माला आली व त्यांचा विवाह होऊन कासव तोच श्रावणकुमार त्यांच्या घरी जन्माला आला.

पूर्वजन्मीच्या सुकृताने तो बालपणापासून सुसंस्कारी झाला. मातापित्यांची उत्तमप्रकारे सेवा चाकरी करून त्यांच्या आज्ञेप्रमाणे वागत असे. उपजिविकेकरितां छोटेसे दुकान काढून व्यवसाय करूं लागला. एका ब्राह्मण कुमारीकेशी त्याचे लग्न झाले. पण दुर्दैवाने ती कर्कशा घरात आल्यापासून नित्य कलह सुरु झाले. श्रावण तिची समजूत घालून सासुसासऱ्यांची सेवा करण्याचे वारंवार बजावी, पण तो बाहेर गेल्यावर पालथ्या घड्यावर पाणी. ती वाटेल तसे अद्वातद्वा बोलून त्यांची मने दुखवी. त्यांच्याकडून जीवापाड श्रम करून घेई व खायला कदान्न देई अथवा मुळीच देत नसे. मुलांवरील प्रेमामुळे त्याच्या मनाला वाईट वाटू नये म्हणून ती दोघही तिच्याविषयी कांहीही न सांगता सारं काही निमुटपणाने सहन करीत. अत्यंत परिश्रम व उपासमार आणि कदान्नसेवन यांच्यामुळे दोघांची दृष्टी अंध झाली. त्यांना मुळीच दिसेनासे झाले. दिवसेंदिवस त्यांना उदास व दुःखी पाहून एकदा श्रावणाने त्याविषयी विचारले. पण त्यांनी काहीही सांगितले नाही.

एकदा अचानक तो माध्यान्हाच्या वेळी घरी आला व पाहतो तो आपल्या आईबापाच्या पुढे कदान्न वाढलेले आणि त्याची बायको त्यांचेवर वाटेल तसे आरडाओरड करून त्यांना जेवण सुध्दा मुष्किल करीत आहे असे त्याला आढळले. ताबडतोब त्याने तिला माहेरी पाठवून दिले व तो स्वतः आपल्या आईबापाची सेवा करू लागला. त्या दोघांनी सांगितले, 'बाळा, आमची एकच इच्छा आहे. कुडीत प्राण आहे तोपर्यंत विश्वेश्वराचे दर्शन घ्यावे. पण आमच्यात काही त्राण राहिला नाही. काय करावे काही सुचत नाही.' श्रावणाने संगितले - 'चिंता करू नका. जोपर्यंत अंगी शक्ति आहे तोपर्यंत तुम्ही निश्चिंत रहा. लवकरच तुमची इच्छा मी पूर्ण करीन.' त्याने एक कावड तयार करून एका बाजूस पित्यास व दुसऱ्या बाजूस मातेस बसवून घरादाराचा त्याग करून काशियात्रेला निघाला. परमेश्वराचे स्मरण, भजन, किर्तन, श्रवण करीत व गात गात ते अयोध्येच्या अरण्यात आले. रात्र झाल्यामुळे व आईवडिलांना तहान लागल्याने त्याने कावड खाली ठेवली व झारी घेऊन पाण्याचा शोध करीत करीत तो चालू लागला. एक क्षणभरच त्याच्या चित्तात विचार चमकला. 'आईबापाचे हे एवढे मोठे ओझे घेऊन रानोरान भटकणे त्यात काय सार्थक आहे. इतक्यात त्याने आपल्या चित्ताला सावरले व अशाप्रकारचे दुष्ट विचार मनात आल्याबद्दल स्वतःलाच हटकले. जवळच असलेल्या तळ्यात उतरून त्याने पाण्याने झारी भरली, तोच एक बाण त्याच्या रोखाने सुं सुं करीत येऊन त्याच्या छातीत घुसला. - 'अग आई ग.....हे तात..... असे उद्गार त्याच्या मुखातून निघाले व तळ्याच्या काठावरच तो धाडकन कोलमडून पडला. थोड्यावेळात अयोध्येचा राजा दशरथ त्याठिकाणी आला. झालेला प्रकार पाहून त्यास फार वाईट वाटले. त्याने श्रावणाची क्षमा मागितली. श्रावण म्हणाला, 'महाराज सर्व कामे सोडून आधी हे पाणी माझ्या अंध मातापित्याला नेऊन पाजा. तहानेने व्याकुळ होऊन ते माझी वाट पाहात असतील, पण आपण श्रावणच आहात असे त्यांना सांगा. माझी हकिकत त्यांना सांगून दुःखी करूं नका. बरे मी येतो -- श्री राम -----' असे म्हणून त्याने प्राण सोडला. श्वापद पाणी पिण्यास आले असे समजून आपण सोडलेला बाण या निष्पाप व मातृपितृ सेवक मुलाचा काळ ठरला हे जाणून राजास फार दुःख झाले. त्याने पाण्याची भरलेली झारी उचलून श्रावणाच्या मात्यापित्याला शोधू लागला. तो एका वृक्षाखाली त्याचे वृध्द व अंध माता-पिता आपल्या मुलाची वाट पाहात बसलेले दिसले. त्यांना पाहून राजाचे हृदय अत्यंत कळवळले. थरथरत्या हाताने त्याने श्रावणाच्या पित्याच्या मुखाशी झारीचे तोंड लावले

पण तो म्हणाला, 'बाळा श्रावणा, तू बोलत कां नाहीस? तुला अतिशय श्रम पुरलेत! आज तू फार दमलास काय? आणि तरीसुध्दां पाणी आणण्यासाठी आम्ही तुला पाठविले. बाळा, तुझ्यासारखा मुलगा अनंत जन्मांच्या पुण्याईने आणि तपश्चर्येने सुध्दां मिळणार नाही. बाळा, एकदा बोलून आमच्या मनाची तहान शांत कर. आता आम्ही तुला जास्त श्रम देणार नाही. बोल बाळा ---' पण तिथे श्रावण असेल तर ना? राजा दशरथाने दु:खी अंतकरणाने झालेली सारी हकिकत सांगितली. ते ऐकून दोघांचे हृदय विदीर्ण झाले. दु:खातिरेकाने त्यांनी दशरथास शाप दिला - 'हे राजा दशरथा, ज्याप्रमाणे आम्ही आपल्या पुत्रवियोगाने प्राण सोडीत आहोत तसाच तुही तुझ्या पुत्रवियोगाने प्राण सोडशील.' असे म्हणून श्रीरामाचे स्मरण करीत त्यांनी प्राण सोडला.

ब्राह्मणाच्या शापाचे ऋण घेऊन दशरथ राजाने त्या तिघांची अंतेष्टी करून घरी आला. त्याने आपले कुलगुरु वसिष्ठांना झालेली सारी हकिकत सांगितली. तेव्हा त्यांनी अंतर्ज्ञानाने जाणून श्रावणाची पूर्व जन्माची वार्ता सांगून राजाच्या मनाचे समाधान केले. त्या दोषाच्या शांतिकरीता एक याग करून दोषमुक्त हो म्हणजे ब्राह्मणाने दिलेल्या शापवाणी प्रमाणे तुला पुत्रलाभ होईल.

यानंतर दशरथाच्या देशात दुष्काळ पडला. वृषपर्वा दैत्याने मेघांना बंदीत टाकले होते. त्यांच्यामुळे वृष्टी होते. अन्नधान्याची सुबत्ता होते. त्यायोगे ब्राह्मण ऋषि-मुनि यज्ञ करतात. त्यामुळे देव देवता बलवान होतात. म्हणून त्या वृषपर्व्याने मेघांना बंदिस्त केले व देवांशी युध्द सुरु केले. शुक्राचार्य त्याला संजीवनी विद्येच्या रूपाने साहाय्य करीत, त्यामुळे देवांचा पराभव होऊ लागला. म्हणून इंद्राने मातलीस रथ घेऊन पृथ्वीतलावरील दशरथ राजास साहाय्य करण्यास बोलाविले. दशरथाबरोबर कैकेयीसुध्दां रथात बसून देवेन्द्राकडे आली. त्या युध्दात दशरथाच्या रथाचा आस मोडला तेव्हा तो कैकेयीने हात घालून रथ सावरून धरला. युध्दात दशरथाला विजयश्री मिळाली. ह्यास कारणीभूत कैकेयी असे जाणून राजाने तिला दोन वर मागण्यास सांगितले. योग्य वेळ आल्यावर वर मागून घेईल असे तिने सांगितले. विजय प्राप्त करून देणाऱ्या दशरथास निरोप देण्याच्या वेळी बृहस्पति व इंद्र म्हणाले, 'राजा, तुझी खिन्नता आम्ही ओळखतो. तुझ्या पोटी त्रिभुवनपति अवतार घेतील. त्यासाठी विभांडक ऋषीचा पुत्र शृंगऋषि याला आणून पुत्रकामेष्टी यज्ञ कर. म्हणजे तुला पुत्र प्राप्त होतील. या वराने आनंदित होऊन दशरथ राजा कैकेयीसह अयोध्येस आला. मेघांनी

त्यांचे स्वागत केले. मेघांच्या वर्षावाने भूमी फुलली. नद्यानाले, ओढे पाण्याने वाहू लागले. वृक्षलता, पाने, फुले, फळे यांनी अन्नाची सुबत्ता झाली. सर्वत्र आनंदी आनंद झाला.

देवगुरु व देवराजांच्या वराने आपणास पुत्रप्राप्ति होणार म्हणून दशरथ आनंदात होता. त्याने वसिष्ठांच्या संमतीने पुत्रकामेष्टी यज्ञ उभारला. इंद्राने रंभा, उर्वशी, तिलोत्तमा इ. देवांगनांना शृंगऋषीस आणण्यास पाठविले. शृंगऋषीने कधीच स्त्रियांची तोंडे पाहिली नव्हती. त्या अप्सरांच्या मोहक स्वरूपाकडे त्याचे मन आकृष्ट झाले. त्यांच्या गायन, नृत्य, हावभावांनी तो भुलला. त्याचा पिता विभांडक ऋषि तपास गेल्यावर त्या देवांगना त्याला भुलवून अयोध्येस दशरथाजवळ आणले. राजाने त्याचा चांगला मान सन्मान करून आपल्या शांता नावाच्या पाळलेल्या कन्येशी त्याचा विवाह करून यज्ञाच्या मुख्य ऋत्विजाचे स्थान त्याला दिले.

पुत्रकामेष्टी यज्ञाची समाप्तिची मंत्राहूति शृंग ऋषीने टाकताच तेथे अग्निनारायण प्रगट झाला व दिव्य पायसाने भरलेले पात्र देऊन गुप्त झाला. ऋषीने राजाजवळ त्या पायसाचे सारखे तीन पींड करून तिघही राण्यांना खावयास देण्यास सांगितले. अत्यानंदाने दशरथाने प्रथम कौशल्या, दुसरा सुमित्रा व तिसरा कैकेयी यांना ते पिंड दिले, पण कैकेयी मानीपणाने पहिल्यांदा मला पिंड द्यायला हवा म्हणून रूसली. इतक्यात एका घारीने झडप घालून कैकेयीच्या हातावरील पींड उचलून नेला. अखेर कौशल्या व सुमित्रांनी आपापल्या पिंडाचे दोन भाग करून एकेक भाग स्वत:स ठेवून दुसरा भाग कैकैयीस दिला. असे दोन पिंड कैकेयीस मिळाले. तेव्हा तिचे समाधान झाले. ते पींड भक्षण केल्याने त्या गर्भवती झाल्या. घारीने जो पींड उचलून नेला तो ऋष्यमूक पर्वतावर केसरी वानराची स्त्री अंजनी पुत्रप्राप्तीस्तव तपश्चर्या करीत होती तिच्या हातात घारीच्या चोचीतून वायुच्या वेगाने निसटून पडला. शिवस्मरण करून तिने तो पींड भक्षण करताच ती गर्भवती झाली. तिला फार आनंद झाला. नऊ मास पूर्ण होताच अक्षय सुवर्ण कौपीन धारण केलेला ब्रह्मचारी पुत्र तिला झाला. तोच मारूती होय.

योग्य काळ गेल्यानंतर वसंत ऋतूत चैत्र महिन्यातील शुध्द नवमीच्या दुपारी मध्यान्ह झाल्यावर पुष्य नक्षत्रावर पूर्ण ब्रह्म नारायणाने कौशल्येच्या उदरी जन्म घेतला. बालकाचा जन्म होताच कौशल्येला भगवान श्रीविष्णुंची हातात शंख, चक्र, गदा,

पद्मधारी किरीट कुंडले घातलेली, गळ्यात दिव्य वैजयंती माळा असलेली सावळी सुकुमार मूर्ति दिसली. ती मूर्ति पाहताच तिला धन्यता वाटली. तिने त्या मूर्तीला नमस्कार केला व आपल्या कुशीकडे वळून पाहिले तो गोजिरवाणे सुंदर बालक तेथे हसत असलेले दिसले. तिला परमानंद झाला. एवढ्यात सुमित्रेला एक व कैकेयीस दोन मुले झाल्याचे वर्तमान समजताच राजाला परम संतोष झाला. दशरथ राजाने मोठा उत्सव करून अपार दानधर्म केला. वसिष्ठ गुरुंच्या सांगण्यावरून कौशल्येच्या मुलाचे नाव 'राम', सुमित्रेच्या मुलाचे नाव 'लक्ष्मण' व कैकेयीच्या मुलांची नावे 'भरत' व 'शत्रुघ्न' अशी ठेविली. ही मुलें दिवसागणिक राजवाड्यात वाढू लागली. त्यांच्या बाललीलांनी दशरथ राजाला आणि राण्यांना खूप आनंद होऊ लागला. ती मुले रांगू लागली तेव्हा दशरथाने त्यांना खेळण्यासाठी चिमुकली धनुष्ये दिली. ती सज्ज करून ती मुले एकामागून एक बाण सोडीत. पुढे राक्षसांची चित्रे करून त्यांची शिरे बाणांनी उडवीत. या त्यांच्या बाललीलांनी दशरथ राजास परम संतोष होई व कौतुकही वाटे. चारही मुलें अशा बाललीलांनी वडिलास सुखवीत मोठी होत होती. शरयु नदीच्या तीरावर चारही भाऊ आपल्या सवंगड्यांना बरोबर घेऊन निरनिराळे खेळ खेळीत. त्यांच्या खेळांची रंगत सुरु झाली. म्हणजे गाई, हरीण, सारस, मोर, पोपट, कोकिळा वगैरे पशुपक्षीसुध्दां मुग्ध होत. मोर तर राम भरत वगैरेना पाहून व विशेषत: त्यांच्या शरीराचा नीलवर्ण पाहून आनंदाने नाचत बागडत. सर्व जीवप्राणिमात्र त्यांच्या त्या बाललीला पाहाण्यास आतुर होत. कित्येक ऋषीमुनी निरनिराळ्या पक्ष्यांच्या रूपाने तेथे येऊन त्यांच्या स्वरूप माधुर्यांचं एकटक अमृतपान करीत. खेळतांना किंवा नेहमी बोलतांना राम जरी सर्व भावंडात मोठा असला तरी स्वत: लहानपण पत्करून लहानांना मोठ्याप्रमाणे वागवून त्यांच्या आज्ञा पाळीत असे. विशेषत: भरतास तो विशेष मान देऊन वागे. लहान सहान धनुष्ये घेऊन आपापसात ते लुटुपुटुचे युध्दाचे खेळ खेळत. त्यांच्या अशा लीला चालू असतां आठ वर्षाचा काल केव्हा संपला त्याची कल्पनाच करता येईना.

मौजीबंधनास योग्य झाल्यावर वसीष्ठऋषींच्या अनुमतीने राजाने सुमुहूर्तावर मोठ्या समारंभाने त्यांना मुंजी बांधल्या. यज्ञोपवित धारण केल्यावर श्रीरामादि चारही भाऊ वसिष्ठाजवळ अध्ययन करू लागले. त्यांनी प्रथम वेदाध्ययन नंतर समाजशास्त्र, नीतीशास्त्र, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशासन, धनुर्वेद वगैरे शास्त्रांचा अभ्यास अवघ्या १२ वर्षातच अवगत केला. नंतर राम बंधुसह सुमंत प्रधानास बरोबर घेऊन तीर्थाटनास गेला.

त्यांनी भरतखंडातल सर्व तीर्थे पाहिली. तेथील देवतांची दर्शने घेतली. साधुसंतांचा परामर्श घेतला. ठिकठिकाणी दानधर्म केला व शेवटी घरी येऊन आईबापाची दर्शने घेऊन कृतार्थ झाले. यापुढे काही दिवस त्यांनी विरक्तस्थितीत काढले. त्या अवस्थेत त्यांना वसिष्ठगुरुंनी आत्मज्ञानाचा उपदेश केला. विशेषत: श्रीरामाच्या अंत:करणात तो उपदेश कायमचा ठसला.

एकदा विश्वामित्रऋषि दशरथाकडे आले आणि राजाजवळ त्याने आपले गाऱ्हाणे मांडले. ते म्हणाले, 'राजा, माझ्या यज्ञात राक्षस विघ्न करतात. होमद्रव्याचा नाश करून यज्ञ मोडून टाकतात. तेव्हा माझ्या यज्ञाचे संरक्षण करण्यासाठी तुझ्या रामाला मागण्यासाठी मी आलो आहे. तेव्हा माझी ही इच्छा पूर्ण कर.' विश्वामित्राचे ते मागणे ऐकून राजाच्या अंत:करणास मोठा धक्काच बसला. पण वसिष्ठाने त्याची समजूत घालून राम लक्ष्मणास पाठवून विश्वामित्रांचे समाधान केले.

विश्वामित्र राम-लक्ष्मणाला घेऊन जात असतां प्रथम गंगातीरी आले. तेथे त्यांनी स्नाने करून आन्हीक उरकले. नंतर विश्वामित्राने राम लक्ष्मणास धनुर्विद्येचा उपदेश दिला, कारण पूर्वाश्रमी विश्वामित्र क्षत्रीय होते. त्यांना तो अध्यापनाचा अधिकार होता. विश्वामित्राने पुढील विद्या श्रीराम लक्ष्मणाला शिकविल्या -- धर्मचक्र, कालचक्र, ब्रह्मास्त्र, रूद्रास्त्र, धर्मपाश, शिवशूल, कालपाश, वज्रास, ब्रह्मशिरास्त्र, अरिरास्त्र, क्रौचास्त्र, मूसळकापाल, दोनसहस्त्रधनुष्ये, महाशक्ति, शिखरी, मोदकीची, मुष्टी, संहारास्त्र, परिघास्त्र, किंकणी, विद्याधरा, वरूणास्त्र, आग्न्यस्त्र, मानवास्त्र, मोहास्त्र, घातास्त्र, पतनास्त्र, सौरास्त्र, धैर्यास्त्र, निद्रास्त्र, दिव्यास्त्राचे दोन भाते, उदकास्त्र, पर्वतास्त्र, पर्जन्यास्त्र, राक्षसास्त्र, नारायणास्त्र, शोषणास्त्र, मोहिन्यास्त्र, वातास्त्र, प्रशमनास्त्र, चतुरंग सैन्य जिंकण्याची विद्या, महावीर विद्या वगैरे अनेक विद्या विश्वामित्रांनी त्यांना दिल्या. सर्व विद्या संपन्न झाल्यावर एकदा राम लक्ष्मणासह रथात बसून विश्वामित्र अरण्यातून जात असता रामाचे मन पाहण्याकरिता विश्वामित्र म्हणाला, 'रामा या मार्गाने चालण्यापेक्षा दुसऱ्या वाटेने जाऊ, कारण, पुढे अरण्य असून तेथे त्राटिका नावाची राक्षसी राहते. ती येणाऱ्या जाणाऱ्यास भक्षण करते. मी चुकून तुम्हाला इकडून घेऊन आलो. आता त्वरा करून दुसरीकडून जाऊ! हे ऐकून रामचंद्र म्हणाले, - 'स्वामी, आपण भिऊ नका. तुमची कृपा असली तर आम्ही कोणालाही चिरून टाकू. मग त्राटिकेची भिती ती काय?' तोच भयानक गर्जना करून त्राटिका आली. केस मोकळे सोडलेली. नरमुंडांच्या माळा गळ्यात घातलेली अशी मोठ्याने गर्जना करीत सैन्यासह आली.

तिला पाहताच रामानी अचूक बाण सोडून तिचे हृदय विदीर्ण केले. ती धाडकन कोसळून मरण पावली. सर्वराक्षस सैन्याचा नाश करून सिध्दाश्रमास पोहोचले. तेथे विश्वामित्राने इतर ऋषींच्या मदतीने यज्ञास सुरुवात केली. रामलक्ष्मणास यज्ञ रक्षण करण्यास ठेविले. यज्ञात ऋषि आहुति देत होते. इतक्यात राक्षसांची प्रचंड सेना यज्ञाचा विध्वंस करण्यासाठी आली. त्या सेनेत मारीच व सुबाहु हे मुख्य होते. रामाने त्यांच्याशी युध्द करून एकाच बाणाने सुबाहुचा कंठछेद केला व त्याच बाणाचा ओझरता धक्का बसून मारीच समुद्रात जाऊन पडला. अशारीतीने सर्व राक्षसांचा संहार करून यज्ञाचे रक्षण केले. यज्ञ निर्विघ्नपणे संपला. सर्व ऋषीमुनींनी रामाचा जयजयकार करून त्यांना आशीर्वाद दिले.

रामाच्या साहाय्याने विश्वामित्राचे यज्ञकार्य पूर्णपणे सिध्दीस गेले. आता त्यांना अयोध्येस परत पाठविण्याचा विचारात विश्वामित्र होते तोच मिथिलेचा राजा जनक यांचेकडून सीतास्वयंवरास येण्याबद्दल विश्वामित्रास बोलावणे आले. विश्वामित्र रामलक्ष्मणास बरोबर घेऊन जाण्यास निघाले. वाटेत अनेक ऋषींचे आश्रम लागले. प्रत्येकाने राम लक्ष्मणाची पूजा करून आदर सत्कार केला. रथ दौडत होता. रस्त्यात त्यांना एक मानवाकृति शिळा लागली. श्रीराम ती प्रचंड शिळा पाहाण्यास निघाले. तोच रामाच्या पायांनी उडालेल्या धुळीचे कण त्या शिळेवर पडले, त्याबरोबर ती शिळा नाहीशी होऊन तेथे एक सुंदर स्त्री प्रगट झाली. त्या स्त्रीने प्रभु रामचंद्रास नमस्कार केला. तेंव्हा 'हा काय चमत्कार आहे,' म्हणून रामांनी विश्वामित्रास विचारले. तेव्हा विश्वामित्रांनी सर्व हकीकत सांगितली.--

'अहिल्या ही ब्रह्मदेवाची मानसकन्या. ती अत्यंत सुंदर होती. तिला अनेक देवांनी मागणी घातली. तेव्हा ब्रह्मदेवाने पण लावला की जो दोन प्रहरात पृथ्वीला प्रदक्षिणा घालून सर्वांचे पुढे येईल त्यास अहिल्या माळ घालील. तो पण जिंकण्यास अनेकजण निघाले. देव, गंधर्व, ऋषि पळू लागले. त्यात इंद्र पुढे होता. त्याचदिवशी गौतमऋषि गंगेत स्नान करून घरी येत असतां एक कपिला गाय नुकतीच प्रसूत होत असून तिच्या वत्साचे मुख बाहेर दिसत आहे अशी गाय गौतमऋषीच्या दृष्टीस पडली. अशा गायीस प्रदक्षिणा घातली तर शास्त्राप्रमाणे पृथ्वी प्रदक्षिणा करण्याचे पुण्य मिळते. म्हणून त्यांनी गायत्री मंत्र जपून त्या गायीस तीन प्रदक्षिणा घातल्या व घरी आले. नंतर गौतमऋषि अनुष्ठान आटोपून सत्यलोकी ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेवांनी शास्त्राप्रमाणे अशा गायीस तीन प्रदक्षिणा घातल्या म्हणून अहिल्या त्यांना अर्पण

केली व विधीयुक्त उभयतांचा विवाह लाविला. नंतर काही वेळाने इंद्र त्याठिकाणी आला. अहिल्येचा विवाह झालेला त्याच्या दृष्टीस पडला. तो संतापला. ब्रह्मदेवास फाडफाड बोलला आणि या गोष्टीचे वैर मनात धरून स्वस्थानी गेला.

गौतमऋषी अहिल्येस घेऊन आपल्या आश्रमात आले व सुखाने कालक्रमणा करू लागले. काही दिवसांनी सूर्यग्रहण आले. तेव्हा गौतम गंगेवर स्नानास गेले आणि गंगेच्या तीरावर अनुष्ठान करीत बसले. ही संधी आपल्याला पापहेतु तडीस नेण्यास चांगली आहे असे पाहून इंद्र गौतमाचे रूप घेऊन त्याच्या आश्रमी आला आणि धाडकन दारापुढे पडला. तेव्हा अहिल्या दार उघडून घरातून बाहेर आली. आणि काय झाले असे म्हणत त्यांना उठविले आणि शय्येवर नेऊन निजविले. त्याक्षणी कपटवेष घेतलेल्या इंद्राने वैर साधून तिचा उपभोग घेतला. इतक्यात अनुष्ठान पुरे करून गौतमऋषि परत घरी आले आणि त्यांनी अहिल्येस दार उघडण्यासाठी हाक मारली. तेव्हा कोणीतरी दुष्टाने आपणास फसविले हे तिच्या लक्षात आले आणि तिने भीतभीतच दार उघडले. झालेला सर्व प्रकार गौतमाच्या लक्षात आला. त्यानी इंद्रास शाप दिला कीं, तुझ्या अंगास सहस्त्र भगे पडतील. इंद्र विव्हळत तेथून निघून गेला. इंद्र जाताच थरथर कापत असलेल्या अहिल्येस गौतम म्हणाला, 'तू सहस्त्र वर्षे शिळा होऊन पृथ्वीवर पडशील.' तेव्हा तिने आपला दोष नसल्याचे सांगून उ:शाप देण्याबद्दल गौतमास विनविले. तेव्हा रामाच्या पदधुळीने तुझा उध्दार होईल असे तिला सांगितले. तेव्हा ती ताबडतोब शिळा होऊन येथे पडली. गौतमऋषी आपला संसार संपला म्हणून बदरिकाश्रमी अनुष्ठानास निघून गेले. रामा! या गोष्टीस आज सहस्त्रवर्षे पूर्ण झाली. आज अहिल्या - गौतमाचा पुण्योदय झाला. विश्वामित्र असे म्हणत आहेत तोच अंतर्ज्ञानाने जाणून गौतमऋषि तेथे आले. रामलक्ष्मणानी त्यांना नमस्कार घातले. विश्वामित्रांनी त्या पतिपत्निंचे ऐक्य केले. त्यांनी रामाचा सत्कार करून आशिर्वाद दिला - 'जानकी तुला वरील. पुढें तू रावणाचा वध करून सर्व देवांना त्याच्या बंदीतून सोडवशील.' नंतर विश्वामित्र रामलक्ष्मणासह मिथीलेस जाण्यास निघाले. त्यांचेबरोबर गौतमाचा पुत्र जनकाचा पुरोहित 'शतानंद' सीतेचे स्वयंवर पाहण्यास निघाला. मिथिलेस आल्यावर ते नगराबाहेर एका उपवनात उतरले. तो राजधानीतून बातमी आली की, 'जो शिवधनुष्याला गुण लावील याला सीता वरील.' हे ऐकून श्रीरामांनी विश्वामित्रास जानकीबद्दल व शिवधनुष्याबद्दल विचारले. तेव्हा विश्वामित्र म्हणाले --

पूर्वी पद्माक्ष नावाचा राजा होऊन गेला. त्याने लक्ष्मीला प्रसन्न करून 'तू माझी कन्या हो' असा वर मागितला. तेव्हा लक्ष्मी म्हणाली 'मी तुझी कन्या झाले तर तुझे कल्याण होणार नाही. तू दुसरा वर माग.' पण राजा आपला हट्ट सोडीना. तेव्हा लक्ष्मी म्हणाली, 'मी विष्णुच्या आधिन आहे. तेव्हा त्यांची आज्ञा घे म्हणजे झाले.' म्हणून तो राजा विष्णुकडे गेला. त्यांना प्रसन्न करून घेऊन आपले म्हणणे सांगितले. तेव्हा विष्णुंनी एक महाळूंग फळ त्याला दिले आणि तुझी इच्छा पूर्ण होईल म्हणून सांगितले. ते फळ घेऊन राजा घरी आला. नऊ महिने गेल्यानंतर त्यातून एक सुंदर कन्या निर्माण झाली. तिचे नाव पद्माक्षी अथवा वेदवती असे होते. ती उपवर झाल्यावर जो तो तिच्याकरिता मागणी घालू लागला. पण पद्माक्षीला कोणताच वर पटेना. तेव्हा सर्वांनी मिळून पद्माक्ष राजाला ठार मारले. पद्माक्षीने अग्नीकुंडात उडी घेतली. शेवटी निराश होऊन सर्व राजे तेथून निघून गेले.

पुढें काही दिवसांनी रावण आपल्या विमानात बसून तेथून जात असता ती कन्या त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या रूपलावण्याला भुलून रावणाने तिच्यावर झडप घातली. तेव्हा ती पुन्हा अग्नीकुंडात गुप्त झाली. ते अग्निकुंड रावणाने विझविले. त्यात त्याला पाच रत्ने सापडली. ती अत्यंत तेजस्वी रत्ने रावणाने एका पेटीत घालून मंदोदरीच्या महालात ती ठेवून दिली. एके दिवशी रावणाने उत्सुकतेने मंदोदरीस ती रत्नांची पेटी दाखविली. आनंदाने मंदोदरी पेटी उचलायला गेली पण तिच्याने उचलेना म्हणून रावणाने उचलली पण त्याच्यानेही ती पेटी उचलली गेली नाही; तेव्हा प्रधानाकरवी ती पेटी उघडली. तीत सुंदर अशी सहा महिन्यांची कन्या त्यांना दिसली. तो चमत्कार पाहून मंदोदरी घाबरून म्हणाली, 'ही पद्माक्ष राजाची कन्या, हिचेमुळे तो राजा मरण पावला. हे विघ्न तुम्ही घरी आणले आहे. हिच्यामुळे त्या राजाप्रमाणे तुमचाही कुलक्षय होईल, याकरितां हिला लंकेबाहेर घालवा व दूर कोठे तरी नेऊन टाका. सेवकांनी ती पेटी बंद करून जनकाच्या राज्यात येऊन शेतात पुरली आणि राक्षस निघून गेले ते शेत जनक यज्ञवेदी मांडण्याकरिता नांगरत असता ती पेटी त्याला सापडली. राजाने ती पेटी उघडून पाहताच आंत पाच वर्षाची अत्यंत स्वरूपवान व तेजस्वी मुलगी निघाली. तिचे त्याने पालनपोषण केले. म्हणून त्या मुलीला 'जानकी' म्हणू लागले. तीच ही सीता होय.

एके दिवशी महापराक्रमी परशुराम प्रचंड त्र्यंबक धनुष्य घेऊन जनकाकडे आले. राजाने त्यांची पूजा आदि करून आदरसत्कार करून भोजनास नेले. त्यांचे प्रचंड

शिवधनुष्य बाहेर पडले होते. ते सीतेने घेतले व सहज लीलेने घोडा करून ती खेळू लागली. भोजन झाल्यावर जनकासह परशुराम बाहेर आले. शिवधनुष्याचा घोडा करून सीता खेळत आहे हे पाहून त्यांना फार आश्चर्य वाटले. त्यांना पाहताच सीता ते धनुष्य तेथेच टाकून पळाली. ते तेथून कोणासही उचलेना. तेव्हा परशुराम म्हणाले, 'आज आमचे अवतारकृत्य संपले.' शेवटी ते धनुष्य सीतेने जागच्या जागी ठेविले. सीतेचे कौतुक करून परशुराम जनकास म्हणाले, - 'राजा, हे धनुष्य मी येथेच ठेऊन जातो. जो पुरुष याला गुण लावील तोच पुरुष सीतेचे पाणीग्रहण करील.' असे सांगून परशुराम तेथून निघून गेला. तेच परशुरामाचे धनुष्य जनकाने स्वयंवरास मांडले.

प्रथम रावणाने ते धनुष्य उचलण्याचा प्रयत्न केला पण त्याच्याने ते उचलले गेले नाही. कसेतरी बळ एकवटून त्याने ते उभे केले. तोच त्याचा तोल जाऊन रावणाच्या अंगावर पडले. शेवटी श्रीरामचंद्रांनी ते त्याच्या अंगावरून उचलले व त्यास गुण लावून आकर्ण ओढताच मोठ्याने कडकडाट होऊन ते मोडले. सीतेने रामाला वरमाला घातली. सर्वांना आनंदी आनंद झाला. जनकाने खास संदेश अयोध्येला पाठवून दशरथास सहपरिवार बोलावून घेतले व लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न या मुलांचे उर्मिला, मांडवी व श्रुतकीर्ति या मुलींशी विवाह केले. कित्येक दिवसपर्यंत तो सोहळा चालल्यानंतर राजा दशरथाने राजा जनक, विश्वामित्र वगैरेंचा निरोप घेऊन राम लक्ष्मणासह सर्व परिवारास बरोबर घेऊन अयोध्येस प्रयाण केले.

मार्गात नारदाच्या सांगितल्यावरून परशुराम रामाशी युध्द करण्यासाठी आले. दोघांचे युध्द होऊन त्यात परशुरामाच्या बाणांचे केवळ रामाच्या नजरेने पाणी होत होते. म्हणून परशुरामांनी धनुष्य वगैरे टाकून देऊन रामाला अत्यंत कळकळीने मिठी मारली. तेव्हा परशुरामाच्या मुखातील अवतारज्योति रामाच्या मुखात शिरली. परशुरामाचे अवतारकृत्य संपले आणि परशुरामाच्या इच्छेप्रमाणे एक बाण सोडून रामाने त्याचा मृत्युमार्ग बंद केला. त्यामुळे परशुराम चिरंजीव झाले. नंतर परशुराम रामाचा निरोप घेऊन स्वस्थानी गेला व दशरथ राजाची स्वारी परिवारासह अयोध्येस आली. (श्लोक २९३-३१०)

एके दिवशी राजा दशरथाने मनात ठरविले कीं आता आपला वृध्दापकाळ जवळ आलेला आहे. आता रामास युवराज्यभिषेक करून आत्मज्ञान मिळविण्याच्या मार्गास आपण लागावे म्हणून त्याने आपला विचार वसिष्ठ कुलगुरु व आपल्या अष्ट प्रधानास सांगितला. तो सर्वांस पसंत पडला. वसिष्ठाने सुमुहुर्त पाहून पुष्य नक्षत्रावर रामास राज्यसिंहासनावर बसविण्याचे ठरविले. ही वार्ता ऐकून राजवाड्यातील सर्वांस आणि नगरजनास अत्यानंद झाला. राज्यभिषेकाच्या तयारीस सुरुवात झाली. दुंदुभी निनादू लागल्या. चौघडे झडू लागले. जिकडे तिकडे सुस्वरवाद्यांचे ध्वनी सुरु झाले. पण स्वर्गात देवांना मोठी चिंता उत्पन्न झाली. 'जर राम राजा झाला तर तो रावणाला मारावयास कसा जाणार? रावण जिवंत आहे तोपर्यंत आमची बंदीशाळेतून सुटका होणे शक्य नाही. म्हणून इंद्रादि सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले आणि राम वनात येईल अशी युक्ति करण्यास सांगितले. ब्रह्मदेवाने विकल्पाला अयोध्येस जाऊन रामराज्याभिषेकाला विघ्न करण्याचे सांगितले. आज्ञेप्रमाणे विकल्प अयोध्येस आला व त्याने मंथरा नावाच्या कैकेयीच्या दासीच्या शरीरात प्रवेश केला. मंथरा दासी रामाची नेहमी खोडी काढीत असे. म्हणून रामाने तिला सात ठिकाणी वाकडी होशील असा शाप दिला होता. म्हणून ती रामाचा नेहमी द्वेष करी आणि आता तर विकल्पाने तिच्या शरीरात प्रवेश केला ती धुसफुसत रडत कैकेयीच्या महालात गेली. तिने धाडकन अंग जमिनीवर टाकले आणि रागाने फणफणत कैकेयीस म्हणाली, 'राणीसाहेब, तुम्ही अगदी भोळ्या आहांत; अभागी, फुटक्या नशिबाच्या आहात. तुमची मुलें भरत, शत्रुघ्न यांना मामाच्या घरी पाठवून देऊन रामाला राज्यभिषेक करून त्याला राज्य देत आहेत. दशरथाचा हा कपटी डाव तुमच्या लक्षात कोठून येणार? राम राज्यावर बसला की तुमच्या मुलांना परस्पर ठार मारून तो तुम्हास दास्यत्व करावयास लावील, तेव्हा वेळीच सावध व्हा.' कैकेयीने तिची समजूत घातली. पण मंथरेने आक्रोश मांडला, भूषणे फेकून दिली व गडबडा लोळू लागली. कैकेयीने तिला उठवून हृदयाशी लावताच विकल्पाने कैकेयीच्या हृदयात प्रवेश केला. तिची बुध्दी पालटली व तिला मंथरेचे म्हणणे खरे वाटले व तिने यावर काय उपाय करावा असे मंथरेस विचारले. मंथरा म्हणाली याला एक तोड आहे. राजाने पूर्वी तुला दोन वर दिले आहेत ते मागून घे. एका वराने भरताला राज्य व दुसऱ्याने रामास चौदा वर्षे वनवासाला पाठवावे. रामाबरोबर लक्ष्मणही वनवासाला जाईल. चौदा वर्षात तुझा भरत चौदा भुवने जिंकून प्रबल होईल. शत्रुघ्न त्याला मदत करील. रामलक्ष्मण वनवासाला गेल्यावर दुष्ट राक्षस त्यांना मारून खातील. अनायासे भरताचे राज्य निष्कंटक

होईल. विकल्पामुळे ते वचन कैकेयीस पटले व तिने रडण्याचे सोंग करून केस मोकळे सोडले वस्त्रालंकार फेकून दिले व जुने वस्त्र नेसली. राजा दशरथ तिथे येताच तिचे स्वरूप पाहून व तिचा तो रागीटपणाचा हावभाव पाहून त्याने तिची बरीच मनधरणी केली पण व्यर्थ. तिने आपला हट्ट सोडला नाही. शेवटी वरांची आठवण देऊन तिने राजाला अडविले व भरतास राज्याभिषेक आणि रामाला वनवास द्यायला भाग पाडले. तिचे वचन ऐकताच दशरथाच्या अंगावर जणू वीज पडण्याइतके दु:ख झाले. याने कैकेयीचे पाय धरले आणि केविलवाणीने म्हणाला, 'कैकेयी, इतकी निष्ठूर होऊ नकोस. तुझ्या भरतास राज्य देतो पण माझ्या, तुझ्या, सर्वांच्या लाडक्या रामाला वनवासाला पाठवू नकोस. एवढी भिक्षा तू मला घाल.' पण ती म्हणाली, 'तुमच्या पूर्वजांनी दिलेले वचन पूर्ण करण्यांसाठी प्राण देण्यासही मागेपुढे पाहिले नाही. तुम्ही आज त्या सूर्यकुलास - रघुकुलास कलंक लावीत आहांत. कैकेयीचे हे अति कठोर मर्मभेदी भाषण ऐकताच दशरथ राजा अतिदु:खाने मूर्च्छीत होऊन पडला.

सर्व गोष्टींचा भेद जाणून प्रधानाने प्रात:काळी श्रीरामास कैकेयीच्या महालात बोलावून आणले. दशरथाची तशी अवस्था आणि एकंदर वातावरण बघून रामाने कैकैयीस असे होण्याचे कारण विचारले. तेव्हा कैकेयी म्हणाली, 'तुझ्या वडिलांनी मला प्रसन्न होऊन दोन वर दिले होते. ते आज मी त्यांच्याकडे मागितले. त्यामुळे दु:ख होऊन ते शोक करीत आहेत.' ते ऐकून राम म्हणाला, 'माते तू कोणते वर मागितले आहेत ते मला सांग. मी तुझी इच्छा पूर्ण करून पितृवचन खरे करीन.' कैकेयी म्हणाली, 'एका वराने भरतास राज्य मिळावे आणि दुसऱ्या वराने तू चौदा वर्ष वनवासास जावे. अशा दोन वरांची माझी मागणी आहे.' श्रीरामानी तात्काळ उत्तर दिले 'इतकेच ना! मी तुझे वचन आत्ताच खरे करतो. आता बाबांची काळजी घे.' असे म्हणून कौसल्येच्या महालात मातेची आज्ञा घेण्यासाठी राम आला. त्याने मातेस नमस्कार करून सारे वर्तमान कळवून वनात जाण्याची आज्ञा मागितली. ती दु:खाने विव्हळ झाली तेव्हा श्रीराम म्हणाला, 'आई मी कैकेयीच्या इच्छेसाठी वनात जात नाही, पण पितृवचन खरे करणे हा पुत्रधर्म आहे, म्हणून मी वनात जात आहे. मी जर पितृवचन पाळले नाही तर माझे कीर्तिस मोठा कलंक लागेल म्हणून मला आज्ञा दे.' माता कौसल्या विलाप करू लागली. तोवर ही बातमी सर्व नगरात पसरली. सर्व लोक विव्हळ झाले. लक्ष्मणास तर अतिशय क्रोध येऊन

कैकेयीस ठार मारण्याची आज्ञा तो रामाला मागू लागला. रामाने त्याचे सांत्वन करून मातेचा वध करणे हा पुत्रधर्म नव्हे. प्राणांताची वेळ आली तरी विपरीत कर्म करु नये, वगैरे सांगून शांत केले. तेव्हा मी सुध्दा तुमच्याबरोबर वनवासात येणार. तुमच्याशिवाय एक क्षणभर ही येथे राहणार नाही असे सांगितले. रामाने माता सुमित्रा व सती उर्मिलेची संमति घेऊन लक्ष्मणास सोबत येण्यास होकार दिला. नंतर सीतेची समजूत घालण्यासाठी तिच्या मंदीरात श्रीराम आले. सीतेने त्यांचे पूजन करून वंदन केले. रामांनी सर्व परिस्थिती निवेदन करून मी पितृवचनासाठी वनवासात जातो. तू कौसल्या, सुमित्रा मातेजवळ राहून त्यांची सेवा कर. चौदा वर्षानंतर तुला भेटेन हे ऐकून सीता म्हणाली, 'स्वामी मला टाकून तुम्ही एकटेच वनात जाऊ नका. माझ्याने हे विरहाचे दुःख सोसवणार नाही,' असे रामास सांगितले. नंतर सीता वसिष्ठाजवळ जाऊन वनात जाण्याची आज्ञा मागू लागली. कुलगुरु वसिष्ठांनी सर्व गोष्टीचा विचार करून सीतेला आणि लक्ष्मणालाही बरोबर नेण्याची रामास आज्ञा केली. (श्लोक ३११-३३३)

पितृवचन पालनाकरिता गुरु वशिष्ठांची आज्ञा घेऊन श्रीराम, लक्ष्मण व सीता तिघेही वनवासात जाण्यास सिध्द झाले. तेव्हा सर्व नगरजनास अत्यंत दुःख झाले. सर्वत्र हाहाःकार उडाला. राम, लक्ष्मण व सीतेस पाहण्यास राजवाड्यासमोर असंख्य स्त्रीपुरुष जमले. त्यांच्या नेत्रातून अश्रुधारा वाहात होत्या. वनात जाण्यापूर्वी राम लक्ष्मण सीतेसह कैकेयीच्या मंदीरात आले. त्यांनी दशरथास व कैकेयीस नमस्कार केला. राम नम्रपणे वनात जाण्याची आज्ञा दोघाजवळ मागू लागला. तेव्हा रामास जवळ बसवून कुरवाळून दशरथ म्हणाला, 'रामा तू वनात गेल्यावर माझे प्राण राहणार नाहीत. सुकुमारा चौदा वर्षे वनात तू कशी काढणार? त्यासाठी बरोबर सैन्य धन, वस्त्रे व इतर सामुग्री घेऊन जा.' तेव्हा राम म्हणाले, 'वनात एवढे ऐश्वर्य कशाला? मी तपासाठी अरण्यात जाणार आहे. तेथे सैन्याचे काय काम? मी वल्कले नेसून अरण्यवासी होईन आणि तप करेन.' हे ऐकताच कैकेयीने ती वल्कले लगेच रामापुढे आणून ठेविली ती तिघांनी नेसून अरण्यात जाण्यास सिध्द झाले. दशरथास ते पाहवेना तो वारंवार कैकेयीस दोष देत दांत ओठ खाई. पण वचनबध्द झालेला असल्याने त्याचा कांहीही इलाज चालत नव्हता. तिघांना आशिर्वाद देऊन दशरथ म्हणाले, 'रामा, तू नगरातून पायी चालत जाऊ नकोस. सुमंत तुला गंगेच्या तीरापर्यंत पोहोचवील तशी आज्ञा त्यांनी सुमंताला दिली. राम, लक्ष्मण,

सीता रथात बसून वनवासास निघाले. ते पाहून नगरात आणि राजवाड्यात जो आकांत झाला तो वर्णन करता येणे अशक्य आहे. लोक रथाच्या मागे धावूं लागले. कित्त्येक रथाच्या पुढे उभे राहून आडवे येऊ लागले. नगरातील, नगराबाहेरील पशुपक्षी सुध्दा रडू लागले. हत्ती, घोडे, गायी, मृग, पोपट, सारस, कोकिळा वगैरे सर्व स्तब्ध होऊन सर्वांच्या नयनातून अश्रुधारा वाहू लागल्या. नगरातील स्त्रीया, मुलें, माणसे सर्व मोठमोठ्याने आकांत करू लागले. ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य, व्यापारी, शेतकरी, शुद्र सेवक वगैरे शोक करू लागले. सोनार, शिंपी, सुतार, कोष्टी वगैरे सर्व जातीचे व धर्माचे लोक हाहा:कार करू लागले. ऋषिमुनी, ब्राह्मण, यति वगैरे तर रामाच्या रथाजवळ येऊन विनवू लागले, 'स्वामी, आपण जाऊ नका. आपण त्रिभुवनपति आहांत. हे त्या हलकट बुध्दीच्या कैकेयीला काय माहित? आपला प्रताप न जाणता तुच्छ बुध्दीने स्वार्थांध होऊन त्या कैकेयीने हा सर्व अनर्थ केला आहे. अशा त्या दुष्ट बुध्दि कैकेयीच्या राज्यात आम्हाला राहायचे नाही. ज्याठिकाणी आमचे स्वामी राम तिथे अरण्यात आम्ही दु:खात सुख मानून राहू. पण नगरात आता परत जाणार नाही.' सर्व लोकांचा हा आकांत ऐकून रामाला राहावेना. त्यांनी रथ थांबविला आणि सर्वांना हात जोडून म्हणाले - 'हे जनताजनार्दनहो, तुम्ही असे विपरीत वागू किंवा बोलू नका. मी काही कायमचा वनवासात राहणार नाही. पितृआज्ञेने काही राजकीय, सामाजिक कार्य करण्यासाठी मी जात आहे. कार्य आटोपल्यावर मी तत्काळ येईन तोपर्यंत तुम्ही सुखाने आनंदाने महाराज दशरथ आणि युवराज भरताच्या आज्ञेचे पालन करावे. नगरात परत जा.' मोठ्या जड अंत:करणाने प्रजाजन स्तंभीत झाले. नंतर सुमंताला रामाने वायुवेगाने रथ हाकण्यास सांगितले. नजरेआड होईपर्यंत सारे प्रजाजन राम, लक्ष्मण, सीतेच्या नावाने टाहो फोडून शोक करीत होती. दृष्टीपथाच्या आड गेल्यावर सर्वजण उदास अंत:करणाने, भग्नहृदयाने नगरात आले. तिकडे राम गंगातीरावर जाऊन पोहोचले. त्यांनी स्नानसंध्या आन्हिक वगैरे आटोपल्यावर गवताच्या आसनावर बसून रामांनी व लक्ष्मणाने वडाच्या रसाने केसांच्या जटा वळल्या. सर्वांगास विभूति लावून ते योगी बनले. त्यांनी गंगेच्या पार घेऊन जाण्याकरिता गुहकाला सांगितले. त्याने त्या तिघांना वंदन करून आपल्या नौकेत बसविले. निघतांना त्यांनी सुमंत प्रधानास निरोप दिला. सुमंतास फार वाईट वाटले. त्याच्या डोळ्यातून घळघळा अश्रू वाहू लागले. रामांनी त्याचे सांत्वन केले. नौका निघाली. पैलतीराला लागेपर्यंत सुमंत रामाकडे पाहात होता. नंतर रामाने इशारा करताच सुमंत अयोध्येस परत आला. तिकडे राम, लक्ष्मण, सीता यांनी त्रिवेणीत स्नान

केले. पूजाविधी आटोपून पुढे निघाले. भारद्वाजाच्या आश्रमात जाऊन त्यांच्या आशीर्वाद घेतला. पुढे राम सिध्दवटीस जाऊन चित्रकुटावर आले.

अयोध्येस सुमंत रिकामा रथ घेऊन गेला. त्याने दशरथास रामाचे सारे वर्तमान सांगितले. राम चित्रकुटावर मढी बांधून तपसाधना करणार आहे हे वर्तमान ऐकताबरोबर दशरथ राजा शोकात बुडाला. त्याच्या दु:खास पारावारच राहिला नाही. त्याने तत्क्षणी "राम राम" म्हणत प्राण सोडला. दशरथास चार पुत्र होते. पण दैवगतीमुळे अंत:काळी एकही पुत्र जवळ नव्हता. सुमंत प्रधानाने आपली मांडी त्याच्या उशास दिली. श्रावणाच्या वृध्द माता पिताचा शाप खरा ठरला. सर्व अयोध्या नगरी दु:खात बुडाली. कौसल्या, सुमित्रा, दशरथाच्या इतर सातशे राण्या यांनी अपार शोक केला. कौसल्या, सुमित्रा तर प्राण देण्यास सिध्द झाल्या. वसिष्ठांनी सर्वांचे सांत्वन केले. सिंहासनावर पुत्राला बसविल्याशिवाय राजाच्या प्रेताचे दहन करू नये असे शास्त्र असल्यामुळे भरत शत्रुघ्नाला मामाच्या घरून् अयोध्येस बोलाविले. भरताने येताच छत्रभंग झालेला पाहिला. त्याबरोबर त्याचे काळीज चरकले. पित्याचा मृतदेह, राम, लक्ष्मण, सीता यांचे वनगमन हे सारे पाहून जाणून भरताने हृदय पिळवटून जो आक्रोश केला तो ऐकून दगडालाही पाझर फुटला. त्याने या सर्व अनर्थास मूळ म्हणजे आपली माता कैकेयीच आहे हे जाणून तिची निर्भत्सना केली. संतापातिशयाने त्याने माता नसून तू पतीचा प्राण घेणारी लाव आहेस, वैरीण आहेस वगैरे शब्दांनी मातेचा निषेध केला. राज्यासनावर न बसताच त्याने दशरथाचा अंतेष्टी संस्कार केला आणि वस्त्रालंकाराचा त्याग केला. वल्कले धारण केली. सर्वांगास भस्म फासले. वडाच्या रसाने जटा वळवून पायी चालत श्रीरामाच्या भेटीस तो निघाला. (श्लोक ३३४-३५३)

कैकेयीने भरतास परोपरीने सांगितले पण त्याचा कांही उपयोग झाला नाही. उलट निर्भत्सना पदरी पडली. ती हळहळत तेथून निघून गेली. तिचा राजमाता म्हणून गौरव करून घेण्याची इच्छा अतृप्तच राहिली. दैवगती अशी विपरीत असते. भरत श्रीरामाच्या भेटीस निघाला. त्याच्याबरोबर सर्व सैन्य, वसिष्ठऋषि, सुमंतादि प्रधान, शत्रुघ्न, कौसल्या, सुमित्रा, अयोध्येतील प्रजाजन रामास भेटण्यास निघाले. भरताबरोबर ही सारी सेना चित्रकुट पर्वतावर चढतांना जेव्हा लक्ष्मणाने पाहिली तेव्हां त्याने रामास शत्रु सैन्य आल्याचे सुचविले. पण निरिक्षण केल्यावर ते अयोध्येचे असल्याने लक्ष्मणास शंका आली. कदाचित कैकेयीने आपणास मारण्याकरीता हे सैन्य पाठविले असावे असे तो रामाला सांगू लागला व धनुष्य बाण सरसावून तो त्यावर धावून गेला.

तेव्हा रामाने भरताकडे पाहून अरे हा तर भरत, शत्रुघ्न यांच्याशी युध्द करू नकोस. ते आपल्या भेटीसाठी येत आहेत. राम, लक्ष्मण त्यांना सामोरे गेले. भरताने रामास पाहिले तो धावत लोटांगण घालीत रामाकडे आला. तो लोटांगण घालीत रामाच्या चरणावर पडणार तोच रामांनी त्याला उचलून पोटाशी धरले आणि सर्वांगावरून हात फिरवून त्यास कुरवाळले. ही पहिली श्रीराम-भरत भेट आहे. नंतर शत्रुघ्नास रामांनी क्षेमालिंगन दिले. मागोमाग सुमंत म्हणाला, पलिकडे वसिष्ठ गुरुजी, कौसल्यामाता, सुमित्रामाता तुझ्या भेटीसाठी आतूर झालेले आहेत. असे कळताच धावत जाऊन रामलक्ष्मणांनी त्यांच्या चरणावर मस्तक ठेवले. वसिष्ठांनी श्रीरामास दशरथाच्या निधनाचे वृत्त सांगितले. ते ऐकून राम-लक्ष्मणास फार दुःख झाले. तुझ्या वियोगाने दुःखीत होऊन त्यांनी राम राम म्हणत प्राण सोडला. वसिष्ठांनी रामाचे सांत्वन करून प्रयागास जाऊन पित्याची उत्तरक्रिया करण्यास सांगितले. ते सर्वजण प्रयागास जाऊन पींडदान करून परत चित्रकुटावर आले. श्रीरामांनी सर्व प्रजेस दर्शन देऊन - भेटून सुखविले.

भरत रामाला हात जोडून म्हणाला - 'रामा तू अयोध्येस परत चल. तुझे राज्य तू सांभाळ.' राम म्हणाले, भरता मी एकवचनी, एकबाणी व एकपत्नि आहे. चौदा वर्षे चौदा दिवस भरल्याशिवाय मी अयोध्येस येणार नाही. मी कैकेयी मातेस दोष देणार नाही. हा कर्मप्रभाव आहे. गुरु महाराजांच्या आशिर्वादाने आणि अनुमतीने मी इथेच तपश्चर्या करीन. रावण, मारिच वगैरे दुष्ट राक्षसांचा वध करून मी लगेच अयोध्येस येईन तोपर्यंत तू प्रजेचे पालन आणि संरक्षण कर.' भरत म्हणाला, 'मला तुझ्या चरणसेवेशिवाय दुसरे कांहीही नको. मी राज्यासनावर बसणार नाही. मी सर्व मंगलभोग टाकून नंदीग्रामी तुमची वाट पाहात राहीन. चौदा वर्षे चौदा दिवस भरताच पंधरावे दिवशी तुम्ही न आल्यास मी अग्नीकुंडात प्राण देईन.' रामांनी भरताचे म्हणणे कबूल केले. आपल्या पादुका भरतास दिल्या, त्या मस्तकावर धारण करून त्याचे शोकास आवर घातला. शत्रुघ्न व सुमंतास राज्यकारभार पाहण्याबद्दल बजावून रामांनी दोघा मातांचे समाधान केले आणि सर्वांना निरोप दिला. सर्वजण अयोध्येस परत आले. भरत नंदीग्रामीच राहिला. शत्रुघ्न व सुमंत यांनी रामाच्या पादुकावर छत्र धारण करून राज्यकारभार चालवू लागले. (श्लोक ३५४-३७१)

चित्रकुट पर्वतावर उत्तमस्थळ पाहून लक्ष्मणाने तिथे पर्णकुटी बांधली. डमरो, मरूवो, शिअळ, वैयळ वगैरे सुगंधी लाकडे जमा करून बांबु व गवत यांच्या साहाय्याने उत्तम बांधणी करून राहण्यास योग्य अशी त्यांत व्यवस्था केली. आजुबाजुला

ऋषिमुनी वगैरे वस्ती करून राहिले होते. त्यांच्या संगतीत श्रीराम-लक्ष्मण सीता यांचे दिवस आनंदाने पार पडत होते. सद्गुरु वसिष्ठांच्या मार्गदर्शनानुसार श्रीराम तपसाधना करीत. लक्ष्मण फळे, फुले, कंदमुळे वगैरे आणून त्यांची सेवा करी व गृहस्थधर्मास अनुसरून सीता त्यांची सेवा करी. त्यांचा खरा महिमा न ओळखणारे कांही ब्राह्मण व ऋषि रामाकडे आले व म्हणाले, 'रामा तू येथे राहिला आहेस म्हणून आम्हास फार भीती वाटत आहे. तुझी बायको फार सुंदर आहे. तिची अभिलाषा धरून त्रिशिरा, खर, दूषण वगैरे रावणाचे साहाय्यक राक्षस मोठे सैन्य घेऊन चाल करणार आहेत अशी बातमी आम्हाला समजली. यासाठी तू येथून गेलास तर आमच्यावर फार उपकार होतील.' श्रीरामांनी तुम्ही भिऊ नका. कोणत्याही संकटापासून मी तुमचे संरक्षण करीन वगैरे आश्वासन दिले पण रात्र झाल्यावर सर्व ब्राह्मण व ऋषि पळून गेले. एकटे वाल्मिकीच तेथे राहिले. श्रीरामांनी त्यांना नमस्कार करून त्यांचा निरोप घेतला व दंडकारण्याचा मार्ग ते चालू लागले.

दंडकारण्य अरण्यच असल्याने मनुष्यवस्ती विरल होती. ठिकठिकाणी ऋषिमुनींचे आश्रम होते. कुठे तीन दिवस, कुठे एक महिना तर कुठे तीन महिने वर्षभर सुध्दा वाटेत मुकाम करीत. श्रीरामांनी सीता लक्ष्मणासह वनवासाचा खडतर काल मनोनिग्रहाने, संयमाने आनंदात घालविला. अशी बारा वर्षे संपली. पुढे ते अत्रीऋषींच्या आश्रमात गेले. अत्री-अनुसुयेला त्यांनी नमस्कार घातला. अत्रीऋषींनी त्यांना मंगल आशिर्वाद दिला. अनुसयेने सीतेस आपल्या कपाळाचे कुंकू तिच्या कपाळी लावले व कधीही न मळणारे दिव्य वस्त्र तिला नेसविले. आणि कधीही न सुकणाऱ्या फुलांची माळा तिच्या गळ्यात घालून तुला राक्षस दिसले तरीही त्यांची भीति वाटणार नाही असा वर दिला. तेथून त्यांनी परशुराम माता रेणुकेचे दर्शन घेतले. तेथून शरभंग ऋषींच्या आश्रमात जावून त्यांची भेट घेतली. नंतर अगस्तीचे दर्शन घेऊन त्यांचा आशिर्वाद घेऊन त्यांच्या सांगण्याप्रमाणे पंचवटीला आले. तेथे जटायुची भेट होऊन त्याच्या संमतीने एक पर्णकुटी बांधून श्रीराम-लक्ष्मण-सीता तेथे राहू लागली. तेथील वास्तव्य श्रीरामास सुखकर वाटू लागले. लक्ष्मण रोज वनात जाऊन फळे, मुळे आणून देऊ लागला. तो मात्र सीतेच्या आज्ञेवाचून फळे भक्षण करीत नसे. तिला वाटे कीं, हा अरण्यात फळे खाऊन उरलेली आम्हास आणून देतो. पण नकळत निराहार व निद्रारहित रामसेवा त्याचे हातून घडत होती. श्रीरामांनी पुढील भविष्यार्थ जाणून तिकडे दुर्लक्ष केले. (श्लोक ३७२-३८३)

नित्यक्रमाप्रमाणे लक्ष्मण पंचवटीच्या अरण्यात फळे शोधीत असतां तेथे एक बाबुंचे बेट त्याला दिसले. तो सहज तेथे आल्यानंतर एक कालखड्ग आपोआप त्याच्या हातात आले. त्याने सहज ते खड्ग त्या बेटावर चालवून बेट साफ केले. तो त्यातून रक्त वाहू लागले. हे पाहून लक्ष्मण घाबरला. आपल्या हातून एखाद्या ऋषीची हत्या झाली असावी असे त्याला वाटले. तो रामाकडे आला व त्याला सर्व हकिकत सांगितली. रामाने अंतर्ज्ञानाने जाणून लक्ष्मणास सांगितलें की - 'लक्ष्मणा तू घाबरू नकोस. तुझ्या हातून ऋषीची हत्या झाली नसून एक राक्षस मारला गेला. रावणाचा भाचा म्हणजे शूर्पणखाचा मुलगा शंबरी हा तेथे वाळूच्या बेटात शंकराजवळून कालखड्ग मिळविण्यासाठी तपश्चर्या करीत होता. शंकराने प्रसन्न होऊन त्याला कालखड्ग दिले. पण खड्गाने विचार केला की या राक्षसाच्या हाती मी गेल्यास माझ्याकडून व्यर्थ जीवहिंसा - निष्पाप जीवात्म्यांचा नाश होईल, त्यापेक्षा लक्ष्मणाच्या हातात गेल्यास श्रेयस्कर होईल म्हणून ते तुझे हाती आले आणि त्याची तिक्ष्णता जाणण्यासाठी तू त्या वाळूच्या बेटावर चालविले त्यांत शंबरी कापला गेला. आता आपण सावध राहिले पाहिजे. त्याची आई व अनेक राक्षस येऊन हल्ले करतील. तू सावध राहून सीतेचे रक्षण कर.'

इकडे शूर्पणखेला स्वप्नात दुश्चिन्ह झाल्यामुळे मुलाच्या चिंतेने ती तेथे आली व मुलाची ती अवस्था पाहून मोठा हंबरडा फोडून शोक केला. मुलाचा अंत्यसंस्कार करून तेथे मनुष्याची पावले उमटलेली होती, त्याचा मार्ग काढीत ती रामाच्या पर्णकुटीकडे येऊ लागली, तो थोड्या अंतरावर तिला लक्ष्मण फळे तोडतांना दिसला. यानेच आपल्या मुलास मारले असावे असा विचार करून तिने मायावी सुंदर रूप धारण केले व लक्ष्मणाजवळ येऊन म्हणाली, 'हे सुंदर प्राणसख्या मी तुजवर मोहित झाली आहे. कित्त्येक दिवस मी वर शोधित आहे. पण मनासारखा पति मिळत नव्हता. परंतु माझ्या पुण्याईने आज आपली भेट झाली. मी धन्य झाले.' असे म्हणून नवरत्नांचा हार त्याच्या गळ्यात घालू लागली.

लक्ष्मण तिला म्हणाला, 'तू म्हणतेस ते खरे असेल पण माझे वडिल बंधू श्रीराम सीतेसह पंचवटीत राहतात त्यांच्या आज्ञेशिवाय मी तुझा अंगिकार करणार नाही. त्याची आज्ञा व त्याबद्दल त्यांची खूण तू आण; मी तुझा स्वीकार करीन. शूर्पणखा रामाकडे आली आणि आपली कार्यसिध्दी झाली असे समजून यांना अशीच भूरळ घालून रात्री तिघांना खाऊन टाकू असा तिने विचार केला. ती सीतेजवळ

जाऊन रामाची अनुमति मिळवून देण्याबद्दल विनवू लागली. अखेर सीतेने रामाची संमति मिळवून देऊन तिच्याजवळ लक्ष्मणाला खूण म्हणून देण्याकरिता कांही शोधू लागले पण कांहीच वस्तू सापडेना म्हणून रामांनी सांगितले - 'तुझ्या पाठीवरच संदेश लिहून देतो. तुझी पाठ मजकडे कर.' तेव्हा तिने लाज वाटते म्हणून सीतेस सांगितले पण त्याशिवाय दूसरे काही साधन नसल्याने रामाने तिच्या पाठीवर कांही लिहून लक्ष्मणाकडे पाठविले. आनंदाने ती लक्ष्मणाजवळ जाऊन म्हणाली, ही पहा श्रीरामाची लेखी आज्ञा मी लिहून आणली आहे, ती वाचा आणि वृक्षलतांच्या साक्षीने माझ्याशी विवाहबध्द व्हा.' लक्ष्मणाने तिच्या पाठीवरील आज्ञा वाचली आणि तिचे नाक, कान छेदून विद्रूप केले. मोठ्याने आक्रोश करीत ती राक्षसांना हाक मारू लागली तोच त्रिशिरा, खर, दूषण वगैरे राक्षस तिथे धावून आले. श्रीरामांनी त्या सर्व प्रमुख व इतर चौदा हजार राक्षसांचा संहार केला. शूर्पणखा आक्रंदत डोके पीटीत रावणाकडे आली. तिने सर्व वर्तमान रावणास सांगितले. रावण ते ऐकून स्वस्थ विचार करीत बसला. तिने त्याची निर्भत्सना सुरु केली. शूर्पणखा म्हणाली, 'राम, लक्ष्मण-सीता पंचवटीत राहात आहेत. लक्ष्मणाने माझे नाककान कापले. रामाने खर, दूषण, त्रिशिरा यांच्यासहित चौदा हजार राक्षसांचा संहार केला. तुझ्या पोटावर पडलेले धनुष्य फुलासारखे उचलून मोडून टाकले आणि सीता पटकावली, त्यावेळी तुझे तोंड काळे झाले. तू लाजेने पळून आलास. काय तुझा पुरुषार्थ. आता तुझी लंका जिंकून तो ब्राह्मणास दान करील. अजून तुझ्यात कांही पुरुषार्थ असेल तर सीतेला पळवून आणून तुझे तोंड उजळ कर. माझी लाज राख.' हे ऐकून रावण म्हणाला, 'मी तोच विचार करीत आहे. कपटानेच मी या गोष्टींचा सूड उगवतो.' असे म्हणून रावणाने शुर्पणखेचे सांत्वन केले. (श्लोक ३८४-३९२)

रावणाने त्रिभुवन विजय मिळविल्यावर सर्व देवांना बंदीशाळेत ठेवून त्यांच्याकडून तो निरनिराळे कार्य करवून घेत असे. ब्रह्मदेवाकडून त्याला आपले विधीलिखित समजले हो`. दशरथाच्या मुलाकडून श्रीरामाकडून आपला नाश होणार हे भवितव्य त्याला समजले असल्याने त्याने एकदा दशरथ कौसल्येच्या विवाहास विघ्न केले पण नियतीने ती गोष्ट घडवून आणली तेव्हापासून तो श्रीरामाच्या जन्मापर्यंत रावण स्वस्थ बसला. परंतु राम जन्मानंतर त्याला आणखी चुटपुट लागली. जसजसा रामचंद्र वाढू लागल तसतसे रावणाचे त्याला मारण्याचे प्रयत्न सुरु झाले. शेवटी सीतास्वयंवराच्या वेळी त्याला पूर्णपणे श्रीरामाचे बळ समजून आले. त्याचे विचारचक्र एकसारखे फिरू

लागले. पण श्रीरामाला मारण्याचा एकही उपाय अचूक रीतीने त्याला सुचला नव्हता. तो त्याच विवंचनेत असता एकाएकी त्याच्या कानावर बातमी आली की कैकेयीच्या वरामुळे दशरथाच्या आज्ञेवरून रामाला वनवास घडला व पितृवचन पालनासाठी तो लक्ष्मण व सीतेला घेऊन दंडकारण्यात पंचवटीला येऊन राहिलेला आहे. राम लक्ष्मणांनी सांसारीक राजभोगांचा त्याग करून सीतेसह वनवास पत्करला. तेव्हा कोणत्याही उपायाने सीतेला लंकेत पळवून आणायची व रामलक्ष्मणाचा नाश करायचा. असा विचार त्याच्या डोक्यात थैमान घालीत होता. तोच विद्रूप झालेली शूर्पणखा तिथे आली तिने सर्व इत्यंभूत हकिकत सांगितल्यावर त्याच्या विचारांना जोराने चालना मिळाली.

प्रथम तो मारीचाकडे गेला व त्याला कपटबुध्दीच्या योजनेचा डाव समजवून सांगितला. माझ्या योजनेत तू सुवर्णाचे मृग होऊन रामाला कोणत्याही रीतीने पर्णकुटीपासून दूर ने. येवढे कार्य केले म्हणजे यतिवेष घेऊन सीतेला पळवून आणण्याचे कार्य मी करतो. नंतर तिचा शोध करीत तो लंकेत आलाच तर त्याचा मी संहार करीन.' मारीच म्हणाला, 'रावणा, रामाचा पराक्रम तुला माहीत नाही काय. सीतास्वयंरात तुझी एवढी फजिती झाली ती विसरलां कां? अरे त्याने एका बाणाच्या नुसत्या फटकाऱ्याने मला समुद्रात उडवून दिले होते आणि सीता तर लक्ष्मीचाच अवतार आहे. तेव्हा अशा साध्वीविषयी दुष्टबुध्दि बाळगणे हे तुझ्या सारख्या शूर व त्रिभुवन विजयी सम्राटास शोभत नाही. यात तुझा आणि तुझ्याबरोबर निष्पाप लंकावासियांचा नाश आहे ही दुष्टबुध्दी सोडून सद्बुध्दिप्रमाणे वाग.' रावण संतप्त झाला. त्याने तलवार उपसून 'माझे हिताहित मला समजते निमुटपणे तू माझ्या योजनेत मला साहाय्य करतोस कां उडवूं तुझे शीर! असे म्हणून तो त्याला मारायला धावला. मारीच्याने विचार केला या दुष्टाच्या हातून मरण्यापेक्षां रामाच्या बाणानेच आपल्याला मरण आल्यास सद्गती लाभेल म्हणून त्याने रावणास होकार दिला. लगेच चपळ रथात बसून ते पंचवटीस आले. मारीचाने सुंदर कांचनमृगाचा वेष घेऊन राम स्मरण करीत आश्रमासमोर फिरूं लागला.

इतक्यात सीतेची नजर त्या सुवर्णमृगाकडे गेली. ती रामचंद्रास म्हणाली असला सुंदर मृग मी कधीच पाहिला नाही. याच्या कातड्याची चोळी केली तर ती फार सुंदर दिसेल. अयोध्येस गेल्यावर मी ती चोळी घालीन ती पाहून सासुबाईंना आनंद होईल. तेव्हा त्या कांचनमृगाचे कातडे मला आणून द्या.' हे बोलणे ऐकताच लक्ष्मणास सीतेच्या रक्षणार्थ ठेऊन श्रीराम धनुष्यास बाण लावून त्या मृगाचे पाठीस लागले. मारीच राक्षसाने हुल दाखवीत रामास बरेच दूर नेले. शेवटी रामाने नेम धरून बाण सोडून त्याचा प्राण घेतला व श्रमपरिहारार्थ एका झाडाखाली विश्रांतीस बसले. (श्लोक ३९३-४१५)

इकडे राम पर्णकुटीपासून बरेच दूर गेले असे पाहून लक्ष्मणास गुंफेजवळून हलविण्याकरीता रावणाने श्रीरामासारखा आवाज काढून लक्ष्मणा धाव! धाव! अशी आरोळी मारली व करूणवाणीने ओरडू लागला. ती करूण हाक ऐकून सीता घाबरली. श्रीराम कसल्यातरी संकटात सांपडले आहेत, असे वाटून तिने लक्ष्मणास रामाच्या मदतीस जाण्यास सांगितले. लक्ष्मण म्हणाला, 'देवी हे सगळे राक्षसांचे कपट आहे. राम संकटात सापडणे कधीच शक्य नाही. तुम्ही निर्धास्त स्वस्थ राहा.' लक्ष्मणाचे बोलणे ऐकून सीतेस क्रोध आला. ती कठोरतेने म्हणाली, 'तुम्ही सावत्र बंधू. तुमचे कपट आता मला कळले. माझ्या अभिलाषेमुळे तुम्ही असे बोलत आहात. तिकडे राक्षसांनी त्यांना वनात मारले तर तुम्हाला हवे आहे! वारे बंधुप्रेम! म्हणे सीता मला मातेसारखी!' सीतेचे हे मर्मभेदक भाषण ऐकताच लक्ष्मण म्हणाला, 'मी बालक आणि तू माझी आईच आहेस. अन्यभावना माझ्या मनात कधीच शिरलीसुध्दां नाही. याला हा सूर्यनारायण साक्षी आहे. मला विनाकारण दुषणे कां लावीतेस. यामुळे तू सहामहिने दुःखात पडशील. तुझ्या आग्रहास्तव मी रामाच्या शोधास जातो, पण कुटीबाहेर मी एक रेषा ओढून ठेवतो. ती ओलांडून तूं बाहेर जाऊ नकोस. ती ओलांडशील तर महान संकटात सापडशिल.' असे सांगून मोठ्या दुःखाने तो रामाच्या शोधास निघाला.

रामाची पाऊले पाहात पाहात लक्ष्मण त्या दिशेकडे बराच वेळ गेल्यावर एका वृक्षाखाली बसलेल्या रामरायास त्याने पाहिले. रामाचीही दृष्टी त्याचेकडे गेली. त्याबरोबर त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा सुरु झाल्या. त्याने तात्काळ जाऊन रामाचे पाय धरले. रामाने त्याला उठवून हृदयाशी धरले आणि म्हटले, - 'बाळा लक्ष्मणा, सीतेला टाकून का आलास?' तेव्हा रडत रडत लक्ष्मणाने सारा वृत्तान्त सांगितला आणि म्हणाला सीतामाईच्या दृष्टीने मी दोषी आहे. तेव्हा कृपा करून माझा वध करावा. एवढीच आता इच्छा आहे.' हे ऐकून स्त्रीयांच्या अदूरत्वाचा हा दोष आहे. तू मुळीच दोषी नाहीस. असे परोपरीने सांगून रामांनी त्यांचे समाधान केले. नंतर दोघेही जड पावलांनी पर्णकुटीकडे यावयास निघाले. (श्लोक ४१६-४२५)

लक्ष्मण पर्णकुटीतून बाहेर जाताच रावणाने यतिवेष घेतला व तो लक्ष्मण रेषेपर्यंत आला. पण ती रेषा त्याला ओलांडता येईना. तेव्हा लाघवी भाषेत त्याने सीतेला कोण, कोठले, कशाकरिता वनांत आले वगैरे विचारले. सीतेने सरळ मनाने विनयाने

सर्व हकिकत सांगून आत येवून भिक्षा घेऊन जाण्यास सांगितले. तेव्हा तो कपटाने सीतेस म्हणाला, 'हे वन राक्षसांचे आहे. येथे राहाणारी राक्षसी कशावरून नसशील? मी आत येताच तू मला खाऊन टाकशिल. तेव्हा तुला जी भिक्षा द्यावयाची आहे. ती बाहेर येऊन सत्वर दे.' हे ऐकताच 'शिव शिव' म्हणत कानावर हात ठेवून सीता म्हणाली - 'आम्ही आपणासारख्या अतिथी अभ्यागत यतीचे सेवक आहोत. तुम्हाला आमच्या कडून थोडासुध्दा त्रास पोहोचणार नाही. थोडावेळ थांबा माझे पति आता येतील!'

रावणाने विचार केला कांहीतरी कपट केल्याशिवाय सीता कांही रेषेच्या बाहेर येणार नाही. त्याने अकस्मात मूर्छा आल्याचे ढोंग केले. थोड्या वेळाने गडबडा लोळत सीतेस म्हणाला - 'मी कित्येक दिवसांचा उपाशी आहे. माझ्या पोटात कांहीच नसल्यामुळे माझे प्राण कासावीस होत आहे. एखादे फळ आणून माझ्या पोटात घालशिल तर माझे प्राण वाचतील.' तेव्हा सीता संभ्रमात पडली. इतक्यात गुप्त रुपाने सर्व देव सीतेचे स्तवन करून म्हणाले, 'माते, तू लंकेत न जाशिल तर रावणाच्या बंदीतून आमची मुक्तता होणार नाही, तरी तू आपले रूप अग्नीत गुप्त करून छाया रूपाने लंकेत जा म्हणजे राम तुला शोधीत येईल आणि रावणास ठार करील. नंतर बिभीषण बंदीशाळेतून आमची मुक्तता करील.' देवांची ही वाणी ऐकताच दयाळू सीतामातेने देवकार्याकरितां आपले स्वरूप अग्नीत गुप्त करून छायारूपाने रावणाला फळ देण्यासाठी आपला हात रेषेवर नेला. तोच तिचा हात धरून रावणाने सीतेस बाहेर ओढले आणि आपले खरे रूप प्रगट करून तिला आपल्या रथाकडे घेऊन गेला. तिला रथात घातले आणि आकाशमार्गे रथ हाकू लागला. तेव्हा सीतेने खूप आक्रोश केला. श्रीरामाला व लक्ष्मणाला मोठमोठ्याने हाका मारल्या. मी लक्ष्मण भावोजींना निष्कारण बोलले त्याचे हे फळ मला मिळाले. म्हणून ती दैवाला दोष देत म्हणू लागली - 'वृक्षलता, पशुपक्ष्यांनो मला रावण पळवून नेत आहे हे वर्तमान रामचंद्रास कळवा.' सीतेचा विलाप ऐकून पशुपक्षीही रडूं लागले.

सीतेचा शोक ऐकून जटायू रावणास आडवा आला. त्याने आपल्या चोचीने त्याच्या रथाचे घोडे मारले. रथही मोडला त्याची दहाही मस्तके रक्तबंबाळ केली. रावण घाबरला त्याने कपटाने जटायूस विचारले -'तुझ्या मृत्यूचे अंग कोणते ते मला सांग म्हणजे मीही माझा मृत्यु कसा आहे ते सांगतो. मग अखेरचे युद्ध

करू. जर तूं खोटे सांगशिल तर तुला रामाची आण आहे.' जटायु सरल मनाचा रामभक्त होता. त्याने सांगितलें, 'माझे दोन्ही पंख उपटलें की मला मृत्यू येईल. रावणाने खोटेच सांगितलें कीं, 'माझा उजव्या पायाचा अंगठा फोडला की मला मृत्यू येईल.' जटायूने रावणाचा अंगठा फोडताच रावणाने वीसही हातांनी त्याचे दोन्ही पंख तोडून टाकले. रक्तबंबाळ होऊन जटायू जमिनीवर पडला. रामाचे स्मरण करीत त्याची वाट पाहू लागला. सीतेला जटायूची स्थिती पाहून फार दु:ख झाले. रावणाने तिकडे लक्ष न देता तिला खांद्यावर घेतले व आकाशमार्गे त्वरीत लंकेकडे निघाला.

मार्गात ऋष्यमुक पर्वतावरून जात असता काही वानर (नळ, निळ, जांबुवंत, सुग्रीव व हनुमंत) दिसले. तात्काळ सीतेने आपल्या साडीचा पदर फाडून त्यात आपल्या अंगावरचे अलंकार बांधून खाली टाकले. मारूतीच्या अंगावर ते पडताच त्याने वर पाहिले तो भयंकर राक्षस एका सुंदर स्त्रीला पळवून नेत असल्याचे त्याला दिसले. मारूतीने त्याला पकडण्यासाठी उड्डाण केले तोच वायुवेगाने चाललेला रावण लंकेत शिरला. ते पाहून मारूती परत आला. त्याने ते अलंकार जपून ठेवले.

लंकेत गेल्यावर रावणाने सीतेस धन, संपत्ति, वैभव, अलंकार वगैरेचे बरेच आमिश दाखवून वश करण्याचा प्रयत्न केला. सीतेने त्याची निर्भत्सना करून धि:कार केला. त्याने त्रिजटेस बोलावून सीतेस तिच्या स्वाधीन केले. तिला अशोक वनात घेऊन जाण्यास सांगितले व तेथे राक्षसांचा पहारा ठेविला. सीतेने त्रिजटेस आपली सर्व हकिकत सांगितली. त्रिजटेने तिचे सांत्वन केले. तेव्हा सीता रामाची आठवण काढीत त्याचे गुण गात अशोक वनात राहू लागली. (श्लोक ४२६-४३८)

मारीच वध करून श्रीराम, लक्ष्मण बऱ्याच वेळाने आपल्या पर्णकुटीत आले. पण त्यांना तिथे सीता दिसेना. त्यांनी इकडे-तिकडे शोधून पाहिले पण सीतेचा पत्ता लागेना. सीतेशिवाय ती पर्णकुटी भणभणीत-शून्य दिसू लागली. श्रीराम बेचैन झाले. त्यानी लक्ष्मणास मिठी मारली आणि म्हणाले, 'लक्ष्मणा माझी सीता कोठे आहे ते सांग. त्यांना सीतेचा विरह सहन होईना. त्यांचे हृदय गहिवरले. त्यांच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या. त्यांना मूर्च्छा देखील आली. लक्ष्मणाने रामास सावध केले. तेव्हा रामचंद्र उठले आणि 'सीते, सीते,' म्हणत लक्ष्मणासह शोधास लागले. सीतावियोगाने श्रीरामाची स्थिती अगदी भ्रमिष्टासारखी झाली. ते सीतेचा शोध करीत

पुढे जाऊ लागले. तो बारा हात लांबीची राक्षसाची पावले व त्यांच्याजवळ सीतेच्या पायाच्या मुद्रा उमटलेल्या दिसल्या. जवळच रक्त सांडलेले व पंख पडलेले दिसले. इकडे तिकडे शोधताच त्यांना जटायुची क्षीण वाणी ऐकू आली. रामांनी त्याला तशी अवस्था होण्याचे कारण विचारल्यावरून त्याने सांगितले - 'रावण सीतेला घेऊन लंकेत जात असता त्याचे हातून तिला मी सोडविले पण त्याने तुझी शपथ घालून कपटाने माझे पंख तोडले. रामा आता मला जास्त बोलवत नाही. तुझ्या मांडीवर डोके ठेवून प्राण सोडावा हीच एक इच्छा आहे.' श्रीरामाच्या मांडीवर डोके ठेवून त्याने प्राण सोडले. श्रीरामाने त्याची अंतेष्टी करून सीता शोधाकरीता दक्षिण दिशेकडे पुढे निघाले व मयुरगिरीवर आले. तिथे वृक्षपाषाणास सीता समजून आलिंगन देत हिंडू लागले. पार्वतीने सीतेचे रूप घेऊन त्यांची परिक्षा घेतली. पण रामांनी ताबडतोब ओळखले. तिने विचारले, ''आपण बाईलवेड्या प्रमाणे वृक्षपाषाणास सीता समजून कां आलिंगन देत आहांत?' श्रीराम म्हणाले, 'माते मी बाईलवेडा नाही पण अवतार चरित्र दाखवून सीतेच्या निमित्ताने या वृक्षपाषाणरूप धारण केलेल्या महातापसांना आलिंगन देऊन त्यांच्या उध्दार करीत आहे.' अंबेचा गैरसमज दूर झाला. तिने रामास वर दिला - 'प्रभुरामा, तू रावणाचा वध करून सीतेसह आनंदाने अयोध्येस येशील.'

नंतर राम तेथून दक्षिणेकडे किष्किंधेच्या मार्गाला लागले. वाटेत त्यांना शबरीचा आश्रम लागला. तिने रामाची मोठ्या भक्तीभावाने पूजा करून फळे, मूळे अर्पण केली. रामांनी तिथे लक्ष्मणास ज्ञानोपदेश करून रामगीता सांगितली आणि लक्ष्मणाचा संमोह दूर केला. नंतर श्रीराम पंपा सरोवरास गेले. त्या स्थळाचे सृष्टी सौंदर्य अवर्णनीय होते. तेथील वृक्षलता फुले फळे यांनी बहरलेल्या होत्या. त्या ठिकाणी एका स्फटिकशिळेवर लक्ष्मणाच्या मांडीवर डोके ठेवून श्रीराम विश्रांती घेत बसले. त्यांना ऋष्यमूक पर्वतावरून नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव, हनुमंतांनी पाहिले. हनुमंताला त्यांच्याकडे पाहताच खूप आनंद झाला. (श्लोक ४३९-४५१)

श्रीरामास पाहताच हनुमान आनंदीत झाला. सुग्रीव, नळ, नीळ, जाबुवंत वगैरे वानरविरांना ते दोन क्षत्रीय विर पाहून आश्चर्य वाटले. त्यांनी हनुमंताला त्यांचा शोध घेण्यास पाठविले. मारूती एकाच उड्डाणात पंपातीरी आला आणि एका वटवृक्षावर बसून नाना तऱ्हेच्या माकडचेष्टा करू लागला, वेडावून दाखवून त्याने रामाचे लक्ष आपणाकडे वेधले. श्रीरामांनी त्यास ओळखले व लक्ष्मणास सांगितलें की, हा वटवृक्षावर

बसलेला वानर त्याने वज्राप्रमाणे झळकणारी सुवर्णांची दिव्य कौपीन परिधान केलेली असल्यामुळे तो जितेंद्रिय ब्रह्मचारी असा हनुमान असावा असे वाटते. हनुमंताने तत्काळ रामाच्या पुढ्यात उडी घातली व हा माझा स्वामी असे म्हणून रामचरणी लोटांगण घातले. श्रीरामांनी त्याला उठवून हृदयांशी धरले आणि यावच्चन्द्रदिवाकरौ तू चिरंजीव होशील असा त्याला आशिर्वाद दिला. मारूतीने श्रीरामाची स्तुति करून पदसेवा केली. तेव्हा श्रीरामांनी आपली सर्व हकीकत मारूतीला सांगितली. तेव्हा मारूती म्हणाला, 'सुग्रीवाशी तुम्ही सख्य करून त्यास मदत केल्यास तुमचा बराचसा कार्यभाग होईल.' श्रीरामांनी अनुमति देताच त्यांनी सुग्रीवास बोलावून घेतले व त्यास साद्यंत हकीकत सांगितली. सुग्रीवाने मोकळ्या अंत:करणाने आपली हकिकत सांगून मदत करण्यास विनविले. वालीने निरपराधी सुग्रिवास कांही गैर समजामुळे राज्यभ्रष्ट करून त्याच्या स्त्रीवर बलात्कार केला होता. म्हणून श्रीरामांनी त्यांच्या द्वन्द्वयुध्दात बाण सोडून वालीचा अंत केला व सुग्रीवास राज्य आणि स्त्री मिळवून दिली. श्रीरामांनी वालीच्या मुलास अंगदास युवराज्यभिषेक करून त्या काका-पुतण्यांचे ऐक्य घडवून आणले. हा उपकार जाणून सुग्रीवाने श्रीरामास सीता शोधास मदत केली. सर्व वानरविरांना चौफेर पाठवून त्यांनी सीतेचा शोध घेतला पण कोठेही शोध लागेना. म्हणून हनुमंताला बोलावून श्रीरामांनी त्याला सीताशोधास पाठविले. हनुमंताने कांही दागिने आणून श्रीरामांना दाखविले श्रीरामांनी ते ओळखताच त्यांना सीतेची तीव्रतेने आठवण झाली व ते शोकाकुल झाले. शोकावेग ओसल्यावर हनुमंताने सांगितले 'कालच एक दैत्य एका स्त्रीला आकाशमार्गे पळवून घेऊन गेला तेव्हा त्या स्त्रीने हे गाठोडे फेकले ते नेमके माझ्या पुढे पडले. उचलून सोडून पाहताच हे अलंकार दिसले. हे अलंकार जर सीतेचेचे असतील तर मग मला निश्चित वाटते ती स्त्री सीताच असावी. तिला पळवून नेणारा तो दुष्ट राक्षस लंकापति रावण असावा. स्वामी! आपण कांही खूण दिल्यास व एखादी गुप्त गोष्ट सांगितल्यास व मला सीताशोधास जाण्यास आज्ञा आणि आशिर्वाद दिल्यास मी आनंदाने ही कामगिरी स्विकारीन.' श्रीरामांनी ताबडतोब आपल्या बोटातील मुद्रिका देऊन मारूतीस अंतरखूण सांगितली कीं, 'आम्ही घरातून निघतेवेळी कैकेयीच्या मंदिरात मी सीतेला माझ्या हाताने वल्कले नेसविली होती. सीतेच्या अंगाला कस्तूरीहून विशेष सुवास आहे. तो अर्ध्या योजनावरून उमगतो. तिची कांति कापरासारखी शुभ्र आहे. माझ्या नामाचा ती अहोरात्र जप करीत असते.' वगैरे खूणा सांगून श्रीरामांनी हनुमानास आशिर्वाद देऊन पाठविले.

किष्किंधेहून निघून हनुमान पवनवेगाने महेन्द्र पर्वतावर येऊन पोहोचला. तेथून समुद्रउल्लंघून त्याला लंकेला जायचे होते. तो उड्डाणाच्या पावित्र्यात उभा राहिला. त्याने सर्व वानरांना पाषाणवृक्ष पर्वतास कवटाळून धरण्यास सांगितले. सर्वजण त्याच्याकडे कौतुकाने पाहू लागले. मारूतीने उड्डाणापूर्वी प्रचंड भुभुःकार केला. त्यासे सर्व आकाश दणाणले. नंतर श्रीरामाचे स्मरण करून त्या नामाची मोठ्याने गर्जना करीत मारूतीने उड्डाण केले. त्याबरोबर त्याच्या अंगवाताने मोठमोठे वृक्ष हलले. पर्वत डळमळू लागले, धरणीकंपासारखी सर्वत्र स्थिती दिसू लागली. मारूती आकाशमार्गे उड्डाणावर उड्डाण घेत चालला. देवांनाही त्याचे कौतुक वाटले. बऱ्याच अडीअडचणींना तोंड देऊन रामनाम स्मरणाने त्यातून सुखरुपतेने सुटून मारूतीने उडी घेतली. ती पड लंकेत पडली. तिथे रावणाची बहीण क्रौंचा राहात होती. लहानरूप धारण करून हनुमानाने तिच्या शरीरात प्रवेश केला व तिच्या कानातून शेपटी काढून त्यायोगे बऱ्याच राक्षस राक्षसींना मारून शेवटी क्रौचेचे सुध्दा पोट विदीर्ण केले. मग तेथील शिल्लक राहिलेल्या काही वृध्द राक्षसींना त्याने लंका कोठे आहे असे विचारले. त्यांनी मारूतीस लंका दाखविली. लंकेत त्याने इंद्रजीताचे, बिभीषण, इ. अनेक घरे धुंडाळली पण रामाने वर्णन केलेल्या प्रकारची स्त्री कोणी आढळली नाही. हनुमानाने सुक्ष्मरूप धारण करून रावणास व त्याच्या सहकार्यांना बरेच छळले. सर्व वृध्द व शहाण्या मंत्र्यांनी रावणास सीतेला सोडून देण्याबद्दल विनविले. तसे केल्यास लंकेवरील अनर्थ टळेल असेही सांगितले पण व्यर्थ.

इकडे हनुमंताने रावणाच्या सर्व स्त्रियांची मंदीरे धुंडाळली. शेवटी मंदोदरीच्या मंदीरात आल्यानंतर रावणाने एका दासीस सीतेच्या समाचारासाठी पाठविले ते हनुमानाने ऐकले व त्या दासीच्या पाठोपाठ जाऊन अशोक वनात एका वृक्षाखाली बसलेल्या सीतेस त्याने पाहिले. त्याला खूप आनंद झाला. त्याने गुप्त रीतीने रामाची मुद्रिका सीतेच्या समोर ठेवली व अशोक वृक्षावर बसून रामाचे चिंतन व रामचरित्राचे गायन करू लागला. इकडे ध्यानस्थ बसलेल्या सीतेस श्रीरामाचे दिव्य रूप न्याहाळीत असता उजव्या करंगुलीत अंगठी नसल्याचे आढळले म्हणून डोळे उघडून पाहते तो तीच अंगठी आपल्यासमोर. ही कोणी आणून टाकली म्हणून इकडे तिकडे पाहू लागली. तो रामचरित्राचे गायन तिच्या कानावर आले. ते गीत ऐकून सीता आनंदीत झाली. हनुमानाने खाली उडी घेऊन सीतेचे चरणी लोटांगण घातले आणि म्हणाला, 'हे जगन्माते, मी रामाचा दासानुदास हनुमान आहे. श्रीराम किष्किंधेत सुखरूप आहेत.

त्यांचेच आज्ञेवरून तुझा शोध करीत मी येथे आलो आहे. मारूतीच्या मुखातून निघालेले हे अमृताहून गोड शब्द ऐकून सीतेस अपार आनंद झाला. तिने चन्द्रार्कापर्यंत तुझे कल्याण होईल असा आशिर्वाद मारूतीस दिला. नंतर मारूतीने रामाचा सर्व वृत्तान्त तिला निवेदन केला. तो ऐकून सीतेने अंतर्खूण विचारल्यावरून हनुमानाने रामचंद्रांनी स्वहस्तांनी सीतेस वल्कले नेसविल्याची खूण सांगितली. हनुमान श्रीरामाचा सच्चा सेवक असल्याची सीतेला खात्री झाली. सीतेने एक शंका आणखी विचारली. 'तू तर लहान आहेस. तुझ्यासारखे जर सर्व वानर लहान असतील तर लंका नगरीचा पाडाव तुमच्या हातून कसा होणार?' त्याबरोबर हनुमानाने आपले भीमकाय प्रचंड रूप प्रगट करून या शंकेचे निरसन केले. तो म्हणाला, 'मी आजच ही लंकानगरी पालथी घातली असती पर श्रीरामाची तशी मला आज्ञा नाही. माझ्यापेक्षाही जास्त बलवान, प्रतापवान वानर रामाजवळ आहेत. तू चिंता करू नकोस. (श्लोक ४५२-४६२)

हनुमान सीतेला म्हणाला, 'माते मी दोन दिवसांचा उपाशी आहे. मी दुसऱ्या कोणाच्या हातची फळे खात नाही. तरी या वनातील फळे खावयास मला आज्ञा दे.' तेव्हा सीता म्हणाली, 'बाळा हनुमंता या वनातील फळांना वायुसुध्दा स्पर्श करीत नाही. तो सुध्दा भितो. या वनाचे संरक्षणास साठ हजार राक्षस ठेविले आहेत. तेव्हा मी तुला कशी आज्ञा देऊ? हे ऐकताच भुकेने प्राण व्याकुळ झाल्याचे दाखवून मारूती धरणीवर गडबडा लोळू लागला. तेव्हा सीतेने त्याचे मुख कुरवाळून खाली पडलेली फळे भक्षण करण्यास सांगितले. मात्र वृक्षावर चढून फळे न तोडण्याची शपथ घातली. तेव्हा खाली पडलेली फळे भक्षण्यांकरिता तो उठला त्याने सीतेचे चरण धरले. नंतर खाली पडलेली फळे वेचून खाऊ लागला. मूठभर फळांनी त्याची भूक कशी शमणार? खाली पडलेली फळे खाऊन होताच सीतेच्या शपथेस्तव तो झाडावर चढला नाही. पण शेपटीने झाडे उपटून ती झोडपून खाली पडलेली फळे तो भक्षण करीत सुटला. अशा अनेक वृक्षांचा विध्वंस त्याने केला. ते पाहताच साठ हजार राक्षस मारूतीच्या अंगावर धावले. मारूतीने सर्वांचा संहार केला. रावणाचे अनेक सेनापति, त्याची सात मुलें, जंबुमाली, अखय वगैरेना हजारो सैनिकासहीत यमसदनास पाठविले. शेवटी इंद्रजित रावणाचा मुलगा चतुरंग सैन्य घेऊन आला. मारूतीने त्याच्याशी युध्द करून त्याला एका विवरात फेकून विवराच्या मुखाशी प्रचंड शिळा ठेवून बंद केले. रावणाने ब्रह्मदेवास पाठवून इंद्रजिताला सोडविले. शेवटी हनुमानाने ब्रह्मपाशाने स्वत:स बांधून घेऊन निमूटपणे तो इंद्रजिताच्या स्वाधिन होऊन त्याच्याबरोबर रावणाच्या सभेत गेला.

हनुमान रावणाच्या समोर त्याच्या सिंहासनापेक्षा सवा हात उंच असा आपल्या शेपटीचा गुंडाळा करून त्यावर बसला. रावण संतापला. क्रोधातियाने दात ओठ खाऊन त्याने विचारले 'मर्कटा तू कोणाचा कोण आहेस? तू येथे कां आलास? तुला येथे कोणी पाठविले? हे उर्मटप्रश्न ऐकून मारूती म्हणाला, 'हे निशाचरा, मशका, दुष्टचोरा! ज्याने सीता स्वयंवरात तुझ्या छातीवर पडलेले धनुष्य उचलून तुझे प्राण वाचविले. त्या प्रभू रामचंद्राचा मी दास हनुमान आहे समजलास! तुझी दहाही शिरे छेदून, टाकण्यास येथे आलो आहे. मीच अशोक वनाचा विध्वंस केला. जंबुमाळी, अखयास ठार मारले. इंद्रजीताची विटंबना केली. श्रीरामाची आज्ञा असती तर आताच तुझी दहाही शिरे छेदून सीतेस परत घेऊन गेलो असतो. पण तुझे मरण रामाचे हातून आहे. मशका तुझे सामर्थ्य तरी पाहू दे.'

मारूतीने केलेली ही निर्भत्सना रावणास सहन झाली नाही. त्याने मारूतीचे नाक, कान व जीभ कापण्यास सांगितले. मारूती निवांत बसून गंमत पाहात होता. तो म्हणाला, 'या तुच्छ शस्त्रांनी मला कसले मरण येणार!' तेव्हा रावण म्हणाला, 'तर मग तुला रामाची शपथ आहे. तुझा मृत्यु कशात आहे ते सांग.' मारूती म्हणाला, 'मला मृत्यूच नाही. मी चिरंजीव आहे.' यावर रावण म्हणाला जगत्कर्त्या ब्रह्मदेवालाही मृत्यू आहे. मग तूच अमर कसा? ते ऐकून रावणाची खोड मोडण्यासाठी मारूती म्हणाला, 'माझ्या शेपटीला वस्त्रे गुंडाळून त्यावर तेल, तूप टाकून पेटवा ते जळताच मला मृत्यु येईल. मात्र थोडेसुध्दां ते उघडे राहिले तर मी मरणार नाही.' मारूतीच्या म्हणण्याप्रमाणे त्याच्या शेपटीस वस्त्रे गुंडाळली. तीवर तेल, तूप टाकून ते पेटविले. मारूतीने आपले पुच्छ प्रथम रावणाच्या दाही मुखांना लावताच त्याच्या दाढी-मिशा जळून विटंबना झाली. दुसऱ्याच क्षणी त्याने सर्व राजवाड्यास व नगरात सर्वत्र आग लावून दिली. कित्येक राक्षस जळाले. कित्येक चेंगराचेंगरीत चिरडून गेले. कित्येकांना हनुमानाने झोडपून काढले. अशाप्रकारे सर्वांची दुर्दशा करून जळत्या लंकेकडे पाहात आनंदाने टाळ्या पीटीत तो समुद्रकिनाऱ्यावर आला व आपली शेपटी विझवू लागला. सागराने त्याची शेपटी विझविली. नंतर मारूती अशोकवनात जाऊन सीतेची अनुज्ञा व खूण म्हणून तिच्या मस्तकावरील मणी घेऊन समुद्रावरून उड्डाण करून ऐलतिराला आला. सर्व वानर, नल, नील, जांबुवान, अंगद वगैरे उत्सुकतेने त्याची वाट पाहात उभे होते तिथे आला. हनुमान कार्यसिध्दी करून आलेला आहे हे जाणून सर्वांना आनंद झाला. आणि श्रीरामाचा व हनुमानाचा जयजयकार करून आनंदाने टाळ्या पिटून नाचू लागले. (श्लोक ४६३-४८१)

सर्व वानरसेना हनुमानाबरोबर किष्किंधेस आली, आणि आनंदभरात त्यांनी सुग्रीवाच्या मधुवनाचा विध्वंस केला. तेथून ते रामभेटीकरीता उड्या घेत किष्किंधेस आली. मारोतीस पाहताचा राम, लक्ष्मण व सुग्रीव त्यास सामोरे गेले. तोच मारूती उड्डाण करून लोटांगणे घेत रामाजवळ आला. तेव्हा रामांनी त्याला उठवून प्रेमालिंगन दिले. नंतर सर्व वानर वीरांची भेट रामांनी घेतली. नंतर रामलक्ष्मण आसनावर बसले आणि सर्व वानर मंडळी सभोवती बसताच मारूतीने सीतामाईकडून आणलेला मणी व ब्रह्मदेवाने दिलेले पत्र प्रभु रामचंद्रापुढे ठेवले. त्यावेळी अंगदाने समुद्रतीरापर्यंतचा वृत्तान्त सांगितला व पुढचा वृत्तांत फक्त मारूतीस माहिती आहे. तेव्हा रामांनी मारूतीकडे पाहिले. हनुमान हात जोडून म्हणाला, 'प्रभो तो वृत्तान्त ब्रह्मदेवांनी त्या पत्रात लिहून दिलेला आहे. सीतादेवी सुखरूप असून त्या कृश झाल्या आहेत. त्यांनी हा मणी खूण म्हणून माझ्या हाती दिला आहे. नंतर मारूतीने सीतेने सांगितलेली तिलकासंबंधीची अंतरीची खूण रामास निवेदन केली. ती गोष्ट ऐकताच रामाचे हृदय गहिवरून आले आणि सीतेने दिलेला दिव्य मणी हृदयाशी धरून अश्रु ढाळू लागले. पण सीतेचा शोध लागल्यामुळे आनंदून रामचंद्र म्हणाले, 'वा हनुमंता! एवढा अफाट समुद्र तू कसा तरून गेलास?' मारूती म्हणाला 'जातांना तुमच्या मुद्रिकेच्या सामर्थ्याने तरलो आणि परत येतांना मातेच्या दिव्य मण्याने तरलो. या उत्तराने मारूतीचे चाणाक्षपण व नम्रता साऱ्या विद्वानांच्या नजरेस आली. भक्तीचे महत्व निदर्शनास आणणे हेच देवाचे कार्य आहे.

श्रीरामाच्या आज्ञेवरून लक्ष्मणाने ब्रह्मदेवाचे पत्र वाचून दाखविले त्यांत हनुमानाने सीतेचा शोध आणि लंकादहन करून रावणास कशी दहशत बसविली याची इत्थंभूत हकीकत होती. श्रीरामास पत्रातील मजकूर ऐकून मारूतीचे कौतुक वाटले. त्यांनी मारूतीस प्रेमालिंगन दिले आणि त्याला कुरवाळून म्हणाले - 'तू जानकीचे कुशलवृत्त आणून मला सुखी केले आहेस. या दिव्यमण्यामुळे आज जानकीच मला भेटत आहे. सख्या हनुमंता, तू धन्य आहेस. तुझे ऋण माझ्याने फिटणार नाही.' हे ऐकताच मारूती म्हणाला - 'प्रभो तुमचा आनंद तो माझा आनंद! तुम्ही सीतेच्या दिव्य मण्याने इतके सुखावलास तर सीताभेटीमुळे तुमच्या आनंदास पारावार राहणार नाही. मग मलासुध्दा खूप धन्यता वाटेल. तेव्हा मला आताच आज्ञा द्या म्हणजे रावणादि साऱ्या राक्षसांना मारून सीतामातेला घेऊन येतो.' श्रीराम म्हणाले - 'हनुमंता तुझा पराक्रम व स्वामिनिष्ठा मी जाणून आहे. पण अजून अवधी आहे. योग्य

काळवेळ झाल्यावर तुला जशी आज्ञा होईल तसे वाग.' असे सांगून श्रीरामांनी त्यास हाती धरून जवळ बसविले व त्याच्याकडून लंकेची इत्थंभूत हकिकत विचारली.

हनुमानाने युध्दाच्या दृष्टीने लंकेच्या स्थितीचे वर्णन केले. नंतर श्रीरामचंद्राच्या अनुमतीने हनुमंताने मोठ्याने भुभु:कार केला. तो काय आश्चर्य संपूर्ण भरतखंडातील रीस, वानरे, गोलांगुले त्याठिकाणी जमा झाले. त्यात बहात्तर कोटि रीस, छप्पनकोटी गोलांगुले व अठरापद्म वानरगण होते. नळ, नीळ, जांबुवंत, सुषेण, अंगद, हनुमान यासह सुग्रीव युध्दावर जाण्यास सिध्द झाला. हनुमंताने रामास, अंगदाने लक्ष्मणास खांद्यावर घेतले. सर्वांनी श्रीरामाचा जयजयकार केला. भुभु:कार करीत व श्रीरामास वंदना करीत वानरसेना दक्षिणेकडे निघाली व वायुवेगाने ती समुद्रतीरी पोहोचली. त्याठिकाणी सैन्याच्या तळ पडला ही बातमी रावणाला कळताच तो चिंताग्रस्त झाला. त्याने आपले पुत्र, प्रधान व सेनापती एकत्र जमविले व म्हणाला - 'राम आपली वानरसेना घेऊन पैलतीरावर आला आहे. मागे एकाच वानराने आपणास हैराण केले होते. तेव्हा रामलक्ष्मण व वानरसेना यांच्या नाशाचा विचार करून उपाय सांगा.' तेव्हा सर्वांचा विचार घेऊन प्रहस्त प्रधान म्हणाला, 'लंकाधीश, तुम्ही मुळीच काळजी करू नका. ते नर, वानर, रीस वगैरे तर आमचे भक्ष्य आहे. दातांनी कचकचा तोडून दाढेने चावून त्यांना गिळून टाकू आपण निश्चिंत राहा.' असे म्हणून सर्वांनी रावणाचा जयजयकार केला.

बिभीषण म्हणाला, 'तुम्ही सगळे बोलके वीर आहांत. मागे फक्त एकच वानर आला. त्याने अनर्थ करून तुम्हास जर्जर केले. त्याचा प्रतिकार तुम्हाला करता आला नाही. आता तर पूर्णब्रह्म सनातन राम आपल्या अफाट वानर सैन्यासह आला आहे. त्याच्यापुढे तुमचा काय पाड. अजूनतरी सावध व्हा आणि सीतादेवीस श्रीरामाकडे पाठवून आपले कल्याण साधा. हे पितृतुल्य बंधू माझे म्हणणे लक्षांत घे. लंकेत अपशकुन होत आहेत, उल्कापात, रक्ताचा पाऊस पडत आहे. मंदोदरीस दुष्य स्वप्न पडले आहे. तिच्या सांगितल्याप्रमाणे वाग. माझ्या भाषणाचा विषाद मानू नकोस. तुझ्या हितासाठी मी बोलत आहे.' इंद्रजीत म्हणाला, 'काका, या तुमच्या भाषणाबद्दल मी तुमचा वधच केला असता पण तुम्ही माझ्या पित्याचे बंधु आहात. तुम्ही शत्रुचे पक्षपाती आहात. शत्रुसमोर असता त्यास तोंड देणे हे शूराचे कर्तव्य विसरणे हे तुम्हाला शोभत नाही,' प्रहस्त म्हणाला, 'आपण ही काही कमी नाही पण ही बडबड व भित्रेपणा पराक्रमी राजपुरुषाला शोभत नाही.'

तेव्हा बिभीषण म्हणाला, 'मुर्खानो, तुमच्या सारख्यांच्या संगतीने रावण निर्बुध्द झाला आहे. त्याला सुविचार सोडून गेलेले आहेत. रामाच्या हातून तुम्हाला योग्य शिक्षा होताच तो शुध्दिवर येईल पण त्याचा काही उपयोग नाही. तुम्ही सगळे उन्मत्त झाला आहात. हिताचे बोल तुम्हाला रूचत नाहीत. शेवटी सांगतो कीं, माझे वचन न ऐकाल तर तुमचा क्षय होईल.' ही भयंकर शापवाणी ऐकताच रावणास क्रोध आला आणि तो शस्त्र घेवून बिभीषणावर धावला. तेव्हा बिभीषण रामाच्या सेवेस जाण्यास सिध्द झाला व आपल्या चार प्रधानासह उड्डाण करून पैलतीरावर रामाच्या छावणीजवळ आला.

श्रीरामाला हे वर्तमान समजताच त्याला जवळ बोलावून आणले. बिभीषणाने रामापुढे लोटांगण घातले. तेव्हा त्याला उठवून राम म्हणाले, 'तुझे अक्षय कल्याण असो. मारूतीप्रमाणे तुही चिरंजीव होशिल. चन्द्रसूर्य असेपर्यंत लंकेचे राज्य करशील.' नंतर लक्ष्मण व सर्व वानरवीर बिभीषणास भेटले. रामांनी चतु:समुद्राचे पाणी आणून लंकापति म्हणून बिभीषणास राज्यभिषेक केला. श्रीरामांनी त्यास सागर तरून जाण्यास काय उपाय योजावा असे विचारल्यावरून त्याने सांगितले. 'सागराची पूजा करून त्याच्याजवळ विचारावे.' श्रीरामांनी तीन दिवस एकसारखे सागराचे पूजन केले. पण समुद्र प्रसन्न होईना. तेव्हा रामाने धनुष्यबाण काढला व बाण सोडणार तोच सागर प्रगट होऊन आला व त्याने श्रीरामाची आपला जावई म्हणून पूजा करून उत्तमोत्तम वस्त्रे अलंकार किरिटकुंडले अर्पण केली व नळाच्या हातून सेतू बांधून पैलतीरावर जावे असे सांगितले. नळ व हनुमान यांनी श्रीरामाच्या नावाने सर्व वानरवीरांनी आणलेले दगड समुद्रात टाकून सेतूबंधन केले. पाच दिवसात शंभर योजने सेतू बांधून सुवेळाचल पर्वतापर्यंत नेला. श्रीरामांनी नळाला प्रेमालिंगन देऊन त्याचा गौरव केला. त्याबरोबर त्याचा श्रमपरिहार झाला. (श्लोक ४८२-५००)

श्रीराम उत्तम वेळ पाहून सर्व दळभारासह लंकेस जाण्यास निघाले. हनुमानाने श्रीरामांना व अंगदाने लक्ष्मणास खांद्यावर घेऊन सर्व सेना रामाचा जयजयकार करीत सेतूवरून चालू लागले. व अर्ध्या प्रहरात सुवेलाचलावर आली. ही खबर रावणास मिळाली. त्याने शुक व सारण यांना पाठवून रामसेनेची गणती करून आणण्यास सांगितले त्या दोघांनी वानरांचा वेष घेऊन रामसेनेत आले. पण बिभीषणाने त्यांना ओळखून रामाजवळ सांगितले. श्रीरामचंद्रांनी त्याची चौकशी करून सेवकांना सैन्य दाखविण्याची आज्ञा दिली. सारे वर्तमान घेऊन ते दोघे रावणाकडे आले. त्यांनी

रावणाला सोळा मजल्यावरील माडीवर घेऊन जाऊन तेथून सर्व माहिती सविस्तर सांगून दहा योजने लांब असणाऱ्या वानरसेनेचा तळ रावणास दाखविला. ते म्हणाले, 'भगवान विष्णूनीच तुमचे वधासाठी श्रीरामाचा अवतार घेतला आहे. आम्ही असे ऐकले. तेव्हा त्यांचेपुढे आपला निभाव लागणार नाही. यास्तव रामाची सीता परत देऊन हा युध्दप्रसंग टाळावा.' हे ऐकून रावणाने क्रोधाने त्या दोघांना तेथून हाकून दिले व स्वत: चौथऱ्यावर उभा राहून रामसैन्याची टेहळणी करू लागला. बिभीषणाने रामलक्ष्मणास रावण टेहळणी करीत असल्याचे सांगताच लक्ष्मणाने बाण सोडून त्याचे मुकुट छेदून भुमीवर पाडले. रावण घाबरला व तो गच्चीखाली आला. चिंताग्रस्त झाल्यामुळे तो कोणाशीही धड बोलेना. त्यास अन्न गोड लागेना. रामसेना प्रत्यक्ष पाहिल्यावर रावणाचे मन विचलीत झाले. त्याला आपली इच्छा पूर्ण होणे दुस्तर वाटू लागले. त्याने विद्युतजिव्हा करवी रामाचे मायावी शीर तयार करून ते सीतेला दाखवून राम मरण पावल्याचे सांगितले. तेव्हा आता मीच तुझा आधार आहे. तुला पट्टराणी करून मंदोदरीला तुझी दासी बनवीन वगैरे प्रलोभन दाखवून सीतेला वश करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा बिभीषणपत्नि सरमा हिने गुप्त रूपाने येऊन रावणाचा हा मायावी खेळ आहे. तू फसू नकोस. रामलक्ष्मण त्यांच्या सैन्यतळावर सुरक्षित आहे. ही महत्वाची बातमी देऊन सीतेला सावध केले. सीतेने सरमेचे आभार मानले.

असे रावणाने बरेच प्रयोग केले पण व्यर्थ. सीता त्यास बधेना म्हणून मंदोदरीला पाठवून त्याने सीतेला वळविण्याचा प्रयत्न केला. तेव्हा सीतेने मंदोदरीचे स्वागत करून तिला सांगितले - 'तू एक महान प्रतिव्रता आहेस तशीच मीही. मग माझे अंत:करण तू ओळखायला हवे आहे? सीतेने तिला ज्ञानाचा उपदेश देऊन ब्रह्मानंदात निमग्न करून टाकले. तिच्या मनातला दुष्ट हेतू नष्ट झाला. रावणाकडे गेल्यावर तिने त्याची बरीच कान उघाडणी केली व रामाचे स्वागत करून मानसन्मानाने सीतेला परत करावे म्हणून विनविले. मंदोदरीचे भाषण ऐकून रावण म्हणाला, 'प्रिये तुझे म्हणणे मला मान्य आहे पण खरे पुरुषार्थी आपला वीरधर्म कधीच सोडत नाहीत. श्रीराम आदिपुरुष आहे हे मी जाणतो, पण तो माझ्याशी युध्द करण्याच्या हेतूने आला आहे. तेव्हा युध्द करणे माझे कर्तव्य आहे ते मी बजावणारच., त्याला मी आपल्या पराक्रमाने जिंकीन हे तू लक्षात ठेव.

रावणाचे भाषण ऐकून मंदोदरी निघून गेली. इकडे वीरश्रीच्या भाषणाने स्फुरण येऊन रावण गोपुरावर चढून वानर सैन्य पाहू लागला, तोच सुग्रीवाने उडी घेऊन रावणाच्या अंगावर जाऊन आदळला. त्याने एका चपराकीने रावणाची दहाही छत्रे व दुसऱ्या चपराकीने दहाही मुकुट खाली पाडले व रावणाशी मल्लयुध्द करून खाली लोळविले आणि उड्डाण करून पुन्हा आपल्या सैन्यात परत आला. रामाने सांगितले, 'मित्रा, आपल्याजवळ सैन्य असता राजाने पुढे उडी घेऊ नये. तुला जय मिळाला हे फार चांगले झाले. आता आपण सारे मिळून अंगदाला शिष्टाईसाठी रावणाकडे पाठवू. सामोपचाराने त्याने न मानल्यास पुढची तजवीज करू. अंगद रावणसभेत जाऊन त्यास म्हणाला, 'मी वालीपुत्र अंगद रामदूत तुझ्याजवळ शिष्टाईकरीता आलो आहे.' असे म्हणून त्याने रामाचा संदेश त्याला सांगितला. 'राजाचे कर्तव्य प्रजेचे पालन, अन्यायाचा विरोध ज्ञानी असून खुळयासारखे वागणे वगैरे बद्दल चेतावणी देऊन, जानकी आपली कन्या मानून श्रीरामास अर्पण कर आणि जन्माचा सुखी हो.' अंगदाने रावणास कल्याणकारी बोधवचने सांगितली. पण दुर्बुध्दि रावणाला ते काहीच रूचले नाही. उलट त्याने अंगदास रागावून वाटेल तसे हिनवून उध्दटपणाने हाकून लावले. तेव्हा अंगदाने आपण केलेल्या पराक्रमाचे व रामाने दाखविलेल्या शौर्याचे वर्णन करून त्यास आठवण करून दिली. रावणास क्रोध येऊन त्याने दुरुत्तरे बोलण्यास सुरुवात केली व सेवकास आज्ञा करून अंगदास पकडून बांधण्यास सांगितले. तेव्हा अंगदाने भयंकर गर्जना करून आपल्या पुच्छाचा तडाखा रावणाच्या हृदयावर मारून पायाच्या अंगठ्याने त्याचे दहाही मुकुट उडविले आणि चौदा गावे विस्तिर्ण मंडप डोक्यावर घेऊन माघारी आपल्या सैन्य तळावर परत आला. संपूर्ण सभामंडप डोक्यावर घेऊन येत असलेल्या अंगदास पाहून सर्व वानरांनी आनंदाने बुभु:कार केला. तोच अंगद खाली उतरला आणि रावणाचा मुकुट रामापुढे ठेऊन तो रामचरणी लागला. रामाने तो रावणाचा मुकुट बिभीषणाच्या मस्तकी घातला व रामांनी त्याचा गौरव केला नंतर श्रीराम म्हणाले, 'अंगदा धन्य तुझी, तू खरा वीर आहेस. तू मंडप आणलास पण पुढे बिभीषण राजा झाल्यावर सभा भरवून कोठे बसेल? ते ऐकून अंगदाने तो मंडप जेथल्या तेथे परत नेऊन ठेवला.

नंतर रामाजवळ येऊन अंगदाने रावणाच्या सभेतील सर्व वृत्तांत श्रीरामलक्ष्मणासह साऱ्या विरांना निवेदन केला व रामास म्हणाला - 'युध्दात रावणास जिंकल्याशिवाय सीतादेवी परत मिळणे शक्य नाही.' हे वाक्य उच्चारताच धनुष्य सज्ज करून त्याला

रामांनी बाण लावला व प्रत्यंचा कानापर्यंत ओढताच सप्तद्विपे दणाणली. सुग्रीवाने हांक देताच अठरा पद्मे वानर, छप्पनकोटी रीस गर्जना करीत उठले. वानरांचे भुभु:काराने लंकानगर दणाणले. पृथ्वी डळमळू लागली, नक्षत्रे पडू लागली. लंकेतील लोकांना प्रलयकाळ जवळ आला असा भास होऊ लागला. अग्रभागी सुषेण वानरराज वीसकोटी वानरवीरासह चालून गेला. मारूती भुभु:कार करीत त्याचे मागून धावला. प्रतापी वानर राक्षसांचे केस धरून त्याना खाली पाडू लागले. कित्येक वानर लंकेच्या किल्ल्यावर चढले. किल्ल्यातील राक्षसांचा त्यांनी संहार केला.

राक्षस उल्हाटयंत्रे, तोमर, भिंडीमाला, इ. शस्त्रे चालवून वानरसेनेला मारू लागले. तेव्हा कोट्यावधी वानर राक्षसावर असंख्य पर्वत फेकू लागले. त्यामुळे शस्त्रासहित राक्षसांचा चुराडा होऊ लागला. कोणी आपल्या तीक्ष्ण नखाग्रांनी राक्षसांची पोटे फाडून प्रेते फेकून देऊ लागले. किल्ल्याच्या सभोवतालचा खंदक प्रेतांनी भरून गेला.

रावणाने धुम्राक्ष, इंद्रजीत वगैरे वीराबरोबर अगणित सैन्य देऊन रणांगणावर पाठविले. दोघा सैन्याचे घोर युध्द होऊन असंख्य वीर मारले गेले. मारूतीच्या जबरदस्त प्रहाराने धुम्राक्ष मृत झाला. तेव्हा इंद्रजीताने त्वेषाने लढून रामलक्ष्मणासह घायाळ केले. नागपाशांनी बांधून तो आकाशमार्गाने अशोकवनात सीतेस दाखविण्यासाठी घेऊन गेला. ते करूणदृष्य पाहून सीता मूच्छिर्त पडून शोक करू लागली. नंतर सीतेला सरमाने सावध करून धीर दिला व श्रीराम लक्ष्मण थोडया वेळाने शुध्दिवर येतील. तू चिंता करू नकोस असे सांगितले. सर्व वानरवीर चिंतातूर झाले. इतक्यात वायुदेवाने श्रीरामांना थोडे सावध करून गरूडाचा मंत्र जपण्यास सांगितले. रामांनी गरूडाचे स्मरण करताच गरूडाने येऊन त्यांचे नागपाश तोडून बंधमुक्त केले. ते पाहून सर्व वानरगण आनंदित झाले व मोठ्या उत्साहाने जयजयकार करू लागले. नंतर त्यांनी आपल्या सैन्याच्या तुकड्या करून चारी दिशेने लंकेला घेरले. रामलक्ष्मण नागपाशातून मुक्त होताच वानर सैन्यासह युध्दास उभे आहेत ही बातमी रावणास समजली तेव्हा आश्चर्यचकित होऊन त्याने प्रहस्तास वीस अक्षौहिणी सैन्यासह पाठविले. तो रावणाचा मुख्य प्रधान व सेनापति होता. निघतांना त्याला बरेच अपशकुन झाले ते न जुमानता आवेशाने तो रामसैन्यावर धावून आला. हा हा म्हणता दोन्ही सैन्य एकवटून तुमुल युध्द सुरु झाले. प्रहस्ताबरोबर युध्दास नीळाला पाठविले कारण दोघेही सेनापति होते. दोघामध्ये दारूण युध्द झाले. प्रहस्ताने नीळाच्या सर्वांगावर बाण मारले. नीळाने

प्रचंड ताडवृक्ष प्रहस्तावर फेकताच त्याचा रथासह चुराडा झाला. वानरांनी नीळाचा जयजयकार केला. ते पाहून रावण स्वत: युध्दावर आला व घनघोर युध्द करू लागला. एवढ्यात मंदोदरी आपला पुत्र अतिकाय व प्रधान माल्यवान यांना बरोबर घेऊन तेथे आली आणि रावणाला हात जोडून म्हणाली - 'प्राणनाथ तुम्ही हा अनर्थ करू नका. अन्यायाने वागल्यास कोणासही यश येत नाही. वेदशास्त्रांनी निषिध्द मानलेल्या परधन व परदाराहरण या अनुचित कार्याला प्रवृत्त होऊन आपल्याच हाताने आपला घात करून घेऊ नका. वगैरे परोपरीने विनविले पण त्याचा कांही एक उपयोग झाला नाही. रावण म्हणाला, 'पुरुषार्थी पुरुषाने शत्रु समोर उभा असता त्यास पाठ देऊ नये. मी शत्रूला ठार मारून माझा हेतु तडीस नेणार! आता तू घरी जा. माझी काळजी करू नको. ज्याने कैलास हालवून सर्व देव बंदीस्त घातले. त्याच्यापुढे या मर्कटांचा काय पाड? मंदोदरी खिन्नपणाने तेथून निघून गेली. मग रावणाने सुग्रीव, गवय, गंधमाधन, मैंद, कुमुद, द्विवध, गवाक्ष, नळ या सर्वांना जर्जर करून सोडले व तो लक्ष्मणावर धावला. रावणाने अनिवार ब्रह्मशक्ति अभिमंत्रीत करून तो बाण लक्ष्मणावर सोडला. लक्ष्मणाने तो तोडला पण अर्धा बाण त्यास लागून लक्ष्मण मूर्च्छित झाला. रामांनी पुढे होऊन लक्ष्मणाला सावरले व तीन बाणांनी रावणास घायाळ करून जमिनीवर लोळविले. श्रीराम रावणास म्हणाले, 'दशवदना आज मी तुला सोडतो. आजच्या दिवस आपल्या ऐश्वर्याचा उपभोग घे. उद्या सर्व राण्यांचा, पुत्र पौत्रांचा व सर्व परिवाराचा निरोप घेऊन युध्दास ये. मग मी तुझा वध करीन.' ते भाषण ऐकून हतवीर्य झालेला रावण दीन वदनाने घरी परतला. (श्लोक ५०१-५२०)

अवमानीत झालेला रावण लंकेत परत आला. अपमानाने त्याचे हृदय जळू लागले. चिंताग्रस्त स्थितीत महोदरास म्हणाला - 'मी एवढा पराक्रमी असता एका क्षुल्लक मानवाने मला युध्दात पळवून लावावे काय!' तेव्हा महोदराने रावणास धीर देऊन म्हटले, लंकापते, अशी चिंता करू नका. आता कुंभकर्णास उठवावे. ते क्षणात रामलक्ष्मणासह सर्व वानर सैन्य गिळून टाकतील.' रावणाला ते म्हणणे पसंत पडले व कुंभकर्णास उठविण्यास दहा हजार राक्षसांना विरूपाक्ष व महोदराबरोबर पाठविले. कुंभकर्ण डाराडूर घोरत झोपला होता. राक्षसांनी त्याला जागे करण्याकरिता भयंकर आरोळ्या मारल्या मोठ्याने वाद्ये वाजविली. त्याच्या शरीरास नाना हत्यारांनी टोचले, तरी तो जागा होईना. शेवटी विरूपाक्षाने कित्त्येक किन्नरी स्त्रिया त्याच्या कानाजवळ

बसविल्या. त्यांच्या कर्कश गाण्यांनी तो जागा झाला व उठून बसला. रावणाने अन्नाचे पर्वत व मद्याच्या हजारो पखाली तेथे आणून ठेवल्या होत्या. ते सर्व त्याने भक्षण व प्राशन करून फस्त केले. कित्येक पशूंना सुध्दां दाताखाली रगडले. मग ताजातवाना झाल्यावर महोदराकडे पाहिले. त्याने कुंभकर्णास सीता हरणापासून रावणाच्या पराजयापर्यंतची सर्व हकिकत सांगितली. कुंभकर्ण रावणाच्या भेटीस जाण्यास निघाला. त्याला पाहताच कित्येक राक्षस भ्याले मग वानरांची कथा काय! बिभीषणाने रामास कुंभकर्ण जागा झाल्याचे व त्याच्या विलक्षण भुकेचा वृत्तान्त सांगिला. ते ऐकून कित्येक वानर थंडीने कुडकुडू लागले. कित्येकांच्या मुरकुंड्या वळल्या. त्याना वाटू लागले कीं आता आपली धडगत नाही. तेव्हा त्यांची भीती नष्ट करण्यासाठी रामाने मारूतीस नेत्रसंकेत केला. तो पाहून मारूतीने आकाशात उड्डाण केले आणि कुंभकर्ण रावणाकडे जात असता त्याचे मागे उतरला. त्याने तीन वेळा कुंभकर्णास उचलले पण मद्याच्या धुंदीत असल्याने ते कुंभकर्णास समजले नाही. चौथ्या वेळेस त्याला धरून गरगरा फिरविले. याला फेकले तर अनेक जीव निष्कारण मरतील म्हणून त्याला खाली ठेऊन मारूती परत आला. त्यावेळी कपिवीरांनी त्याच्या गळ्यास मिठी घालून त्याचा गौरव केला. सर्वांची भीति नाहीशी झाली.

कुंभकर्ण रावण सभेत गेल्यावर त्यास वंदन करून आपल्या आसनावर बसला व विचारपूस केली. तेव्हा रावणाने साद्यंत हकिकत त्यास निवेदन केली. तेव्हा तो म्हणाला, 'तुम्ही सीतेला घरी आणून व्यर्थ कुलक्षय आरंभीला आहे. श्रीराम आदिनारायणाचा अवतार असून वानर हे देव आहेत. नारदांनी तुम्हास हे सर्व समजावून सांगितले असून तुम्ही समजून उमजून विपरीत कर्म करीत आहात. त्याची वाईट फळे भोगल्यावाचून सुटका नाही. आपण करू नये ती गोष्ट केली पण आपली मनोकामना पूर्ण झाली कां?' रावण म्हणाला - 'सीतेने पूर्वी माझा अपमान केला म्हणूनच मी तिला पळवून आणले. मी सर्व उपाय केले पण ती मला वश होत नाही. कुंभकर्ण म्हणाला - 'दादा मी तुला एक उपाय सुचवितो. इंद्राने जसे अहिल्येस फसविले तसे तू रामाचे रूप कापट्यमंत्राने घे म्हणजे ती तत्काळ तुला वश होईल.' रावण म्हणाला - 'कुंभकर्णा मी रामनाम घेतलं की माझी दुर्वासनाच नाहीशी होईल आणि मी एकबाणी, एकवचनी व एकपत्नि होईल मग माझा सर्व खटाटोप

व्यर्थ जाईल. तेव्हा तू युध्दास जाऊन राम लक्ष्मणाचा वध कर म्हणजे सीता मला वश होईल.' तेव्हा नाईलाजाने कुंभकर्ण युध्दास जाण्यास निघाला. त्याने रावणास नमस्कार करून आश्वासन दिले की 'आज रामासह सर्वांना भक्षण करतो. तू चिंता सोड.' नंतर कुंभकर्ण अगणित राक्षससेना घेऊन समरांगणी आला. उभय सैन्यामध्ये घनघोर युध्द जुंपले. रणांगणावर रक्ताचे पाट वाहू लागले. एकच धुमश्चक्री उडाली. कुंभकर्ण मुग्दल घेऊन रामावर धावला. हे पाहून मारूतीने एक मोठा पर्वत कुंभकर्णावर टाकला. मुग्दलाने त्याचे चूर्ण करून टाकले. मारूतीवर त्याने शूलाचा प्रहार करताच मारूतीस मूर्च्छा आली. नीळ, नळ, सुग्रीव वगैरेवर त्याने प्रहार केला. सुग्रीवाने त्याच्या खांद्यावर चढून कुंभकर्णाचे नाक कान कापून रामापुढे आणले. कुंभकर्णास विजयोन्मादाने ते समजले सुध्दा नाही. कुंभकर्ण विजयी होऊन येत असल्याची बातमी कळताच रावण अत्यानंदाने सामोरा जाऊ लागला. तो कुंभकर्णाचे नाक, कान कापलेले पाहून रावणाने त्याच्यासमोर आरसा धरून आपले प्रतिबिंब दाखविले. आपले विकृत स्वरूप पाहून कुंभकर्णास लाज वाटली व तो तसाच रणांगणावर परत येऊन रामावर धावला. बिभीषणाने त्यास अडविले. पण कुंभकर्णासे त्यास सांगितले - 'तू बंधुद्रोही आहेस. आपले घर सोडून शत्रुला जाऊन मिळालास, पण तू वंशवृध्दीस कारण आहे. तू आम्हास तिलांजली देण्यास उपयोगी पडशिल फिर मागे आणि रामाच्या मागे दडून बैस.' बिभीषण मागे फिरला व कुंभकर्ण रामासमोर आला. राम त्याला म्हणाले, 'तुम्ही राक्षसांनी त्रिभुवनाला पीडा करून गांजून सोडले तुमच्या वधासाठी मी अवतार घेतला आहे.' असे म्हणून रामाने धनुष्य सज्ज केले. कुंभकर्ण म्हणाला 'श्रीरामा तू आमचा जन्मजन्मांतरीचा वैरी आहेस. तुला आता गिळूनच टाकतो. तुझ्या बाणाची कथा ती काय!' एक दिव्य बाण काढून त्यावर प्रलयाग्नीची स्थापना करून रामांनी कुंभकर्णावर सोडला त्यायोगे त्याचे दोनही हात तुटून पडले. दुसऱ्या बाणाने त्याचे दोनही पाय तोडले व तिसऱ्या अद्भुत बाणाने त्याचे शिर उडविले. ते प्रचंड शिर लंकेत जाऊन पडले. त्याने असंख्य घरांचा चक्काचूर केला त्याबरोबर वानरांनी श्रीरामाचा जयजयकार केला. आकाशात दुदुंभी वाजू लागल्या. सर्व देवांना आनंद झाला. इकडे कुंभकर्ण मरण पावताच त्याचे गुण आठवून रावण शोक करू लागला. संपूर्ण लंका नगरी दुःख सागरात बुडाली. (श्लोक ५२१-५३३)

कुंभकर्णाचा वध झाल्यावर रावणाचा धीर खचला तो उद्विग्न झाला. त्याला काही सुचेना. मोठमोठे वीर रणागणांत पडले होते. आता रामावर कोणास पाठवावे या चिंतेत रावण असता महोदर, महापार्श्व, नरांतक, देवांतक, त्रिशीर व अतिकाय हे वीर रावणाकडे आले आणि म्हणाले - 'आम्ही रणांगणावर जाऊन राम लक्ष्मणास ठार मारतो. तुम्ही गांगरू नका.' असा धीर देऊन ते रणांगणावर आले. हे पाहताच कपिवीर पुढे सरसावले. अंगद, वृषभ, नळ व मारूती या चौघा महावीरांनी त्यांच्याशी निकराची लढाई करून त्या सहाही राक्षसवीरांना यमसदनास पाठविले. लक्ष्मणाने एक दिव्य बाण सोडून अतिकायाचा शिरच्छेद केला. हे वर्तमान समजताच रावणाला मूर्च्छा येऊन खाली पडला. त्यावेळी इंद्रजिताने आपल्या पित्याचे सांत्वन केले आणि म्हणाला, 'पिताजी जे होणारे ते कल्पांतीही चुकत नाही. त्याचा शोक करू नका. मीच आता युध्दास जाऊन शत्रूंचा नाश करतो.' असे म्हणून त्याने रक्ताने स्नान केले. रक्तवस्त्र नेसला. अग्निकुंड पेटवून बेहडयाच्या समिधा, मोहऱ्या यांचे मंत्रयुक्त विधीपूर्वक हवन केले. ते पूर्ण होताच अग्निकुंडातून धनुष्य, बाण, भाते, अनेक प्रकारची शस्त्रे अश्वसारथी युक्त दिव्य रथ बाहेर आला. त्या रथावर बसून इंद्रजीत मेघाआड होऊन युध्द करू लागला. हजारो वानरवीर, रीस, गोलांगुले धारातीर्थी पडले. वानरसेनेत एकच हाहा:कार झाला. सर्व वानरसेना मूर्च्छित झाली. शेवटी राम लक्ष्मणाला सुध्दां मूर्च्छित पाडून दुंदुभी वाजवीत आनंदाने तो लंकेत गेला. इंद्रजीताने रामलक्ष्मणाला सुध्दां मूर्च्छित केले पण हनुमान व बिभीषणावर मात्र काहीच परिणाम झाला नाही. जांबुवंताला त्यांनी सावध करून झालेली सर्व घटना निवेदन केली. जांबुवंताने सांगितलें - 'सूर्योदयापूर्वी जर कोणी द्रोणागिरीवरील वनस्पती औषधी घेऊन येईल तर त्या औषधाच्या सुगंधी वासाने रामलक्ष्मण सावध होतील व सर्व वीर तात्काळ उठतील.' तेव्हा हनुमान द्रोणागिरीवरील औषधी आणण्यास निघाला. जाण्यापूर्वी तो म्हणाला, 'मी येईपर्यंत रामलक्ष्मणांचे चांगले संरक्षण करा.' असे सांगून हनुमानाने श्रीराम नामाचा जयजयकार करून उड्डाण केले व समुद्र ओलांडून द्रोणाचलाजवळ आला व म्हणाला, 'हे गिरीवर्या श्रीराम व लक्ष्मण युध्दात बाणांनी विध्द झालेले आहेत तर तुझ्याजवळील दिव्य वनस्पती औषधी दे.' द्रोणागिरी गर्वाने म्हणाला, 'देवांनासुध्दा दुर्लभ अशा माझ्या औषधी वनस्पति मानवांना कोठून मिळणार?' हे ऐकताच हनुमानाने आपल्या शेपटीने द्रोणाचलास गुंढाळले व उपटून त्याला हातावर घेतले व वायुवेगाने चौथ्या प्रहरी सुवेळाचलास आणले. त्याच्या थंडगार सुगंधी वासाने राम लक्ष्मण वानरवीर व सर्व सैन्य सावध झाले. नंतर तो पर्वत मारूतीने जेथल्या तेथे नेऊन ठेवला. मारूतीच्या या अदभूत कामगिरीमुळे श्रीरामांनी त्याला क्षेमालिंगन दिले.

नंतर सर्व वानरांना सुग्रीवाने सांगितले कीं, तुम्ही हातात मशाली घेऊन लंकेत जा व लंकेतील सर्व घरांना आगी लावा. वानरांनी त्याप्रमाणे आगी लावताच सोसाट्याच्या वाऱ्याने सर्वत्र ती आग पसरविली. सर्वत्र एकच धांदल उडून राक्षस स्त्रिया, मुले सर्व सैरावैरा पळू लागले ही बातमी रावणाच्या कानावर जाताच संतापाने त्याने विरूपाक्ष, शोणिताक्ष, कुंभ, निकुंभ, जंघ, प्रजंघ व क्रोधन या सात मुलांना वानर सैन्याच्या संहारार्थ पाठविले. उभय दलांचे निकराचे युध्द होवून वानरवीरांनी रावणाच्या त्या सातही मुलांचा संहार केला. हे रावणास समजताच त्याला फार दु:ख झाले. नंतर खराक्ष, विलाक्ष आणि मकराक्ष हे वीर पुढे आले. श्रीरामानी त्यांचा समाचार घेऊन अंत केला. ही बातमी कळताच संतापाने इंद्रजित पुन्हा आला. यावेळी त्याने होम हवन करून एक कृत्या निर्माण केली. तिला रथावर बसवून तिच्या आडून तो रामलक्ष्मणावर बाण सोडू लागला. तो अनेक वीरांशी लढून रामलक्ष्मणासहित जर्जरीत करून जयजयकारात लंकेत परत गेला, तेव्हा रावण त्याला म्हणाला, 'पराक्रमी इंद्रजिता, तू प्रत्येक वेळी कपिसैन्याचा नाश करून येतोस पण रात्र संपताच ते सर्व सावध होऊन त्रास देतात. यावर काहीतरी तोडगा काढून रामलक्ष्मणांचा वध कर.' हे ऐकून इंद्रजित म्हणाला, 'आता जर रामलक्ष्मणाचा युध्दात वध न करीन तर मी तुम्हाला माझे तोंडच दाखविणार नाही?' (श्लोक ५३४-५४४)

श्रीराम लक्ष्मणाच्या वधाची प्रतिज्ञा करून इंद्रजित रणागणावर आला. त्याने मायावी सीता निर्माण करून 'हिनेच आमचा कुलक्षय चालविला म्हणून हिचाच आधी वध केला पाहिजे' असे म्हणून शस्त्राने तिचा शिरच्छेद केला व विजयरथ प्राप्तीकरिता निकुंभीलेत होम हवन करण्यासाठी निघून गेला. हनुमंतास सीतेचा वध झाला असे खरेच वाटून तो शोक करीत रामाकडे आला व स्फुंदतच ही हकिकत रामास सांगितली. ते ऐकून रामही विलाप करू लागले. तेव्हा बिभीषण तेथे आला व म्हणाला, 'सीतादेवी लंकेत सुखरूप आहे. मायावी सीतेचे हनन इंद्रजिताने केले. माझे प्रधान या गोष्टीचा तपास घेऊन आताच आले आहेत.' हे ऐकून सर्वांना आनंद झाला. नंतर बिभीषण म्हणाला, 'इंन्द्रजित निकुंभीलेत होम करीत आहे. त्या होमातून विजयरथ अर्धा बाहेर आला आहे. जर सर्व विजयरथ बाहेर येईल तर तो कोणास आटोपणार नाही. यासाठी त्याच्या होमहवनाचा नाश करा. दोन वेळा इन्द्रजित रणांगणावर आला आणि विजयी होऊन गेला. याचे कारण हा विजयी रथच. तेव्हा त्याचा होम प्रथम विध्वंसीला पाहिजे. शिवाय जो चौदा वर्षे निराहारी

व विवाहीत असून ब्रह्मचारी असेल त्याचे हातून इन्द्रजिताचा मृत्यू आहे. असे त्याचे भविष्य आहे. यासाठी असा वीर इन्द्रजीताच्या होमाचा नाश करण्यास पाठवा.' हे निवेदन संपताच श्रीरामाने लक्ष्मणाकडे पाहिले. तेव्हा तो धनुष्यबाण घेऊन रामासमोर उभा राहिला. रामांनी त्यास जवळ घेऊन त्याने कानात मंत्रोपदेश केला आणि मस्तकावर वरदहस्त ठेविला. लक्ष्मणाने ती आज्ञा घेऊन रामास वंदन करून तिकडे निघाला. अंगदाने लक्ष्मणास खांद्यावर घेतले व मुख्य वानरवीर उड्डाण करून निकुंभीलेस गेले. त्याठिकाणी राक्षससेना सात व्यूह रचून इन्द्रजिताचे रक्षण करीत होती. इन्द्रजित त्या गडातील एका विवरात बसून हवन करीत होता. रक्ताने न्हाऊन निघालेला इंद्रजित रक्तमांसाच्या आहुति होमात टाकीत होता. त्या अग्निज्वाळातून रथ अर्धा बाहेर आला होता. त्या होमकुंडावरच मारूतीने अकस्मात पर्वत टाकला. त्याबरोबर अग्नि सर्वत्र पसरला. अग्नीने रथ भस्मसात केला. वृषभाने होमपात्रे फोडून टाकली. यज्ञद्रव्ये फेकून दिली. हा गलबला ऐकताच ध्यानस्थ इंद्रजित सावध झाला. यज्ञाचा विध्वंस झालेला त्याने पाहिला. त्याला वाटले आज आपली शंभर वर्षे भरली. तेव्हा तो दैवाला दोष देत निकुंभिलेच्या बाहेर आला. तो त्याला लक्ष्मण वानरसेनेसह युध्दास सज्ज असलेला दिसला. त्यास पाहताच कृध्द होऊन इन्द्रजिताने लक्ष्मणावर बाणांचा वर्षाव केला. लक्ष्मणाने एकाच बाणाने त्यांचे खंडन केले. इन्द्रजिताने पर्जन्यास्त्र सोडले म्हणून लक्ष्मणाने वातास्त्र सोडून त्याचे निवारण केले. एकाने सर्पास्त्र सोडले तर दुसऱ्याने गरूडास्त्र सोडावे असे बराच वेळ अस्त्रांचे युध्द झाल्यावर इंद्रजित आकाशात उडाला व ढगांच्या आड राहून लक्ष्मणावर बाण सोडून लागला. तेव्हा मारूतीने प्रचंड रूप घेऊन आपल्या हातावर लक्ष्मणास उभे करून तो आकाशात उडाला त्याठिकाणी लक्ष्मण व इंद्रजित यांचा अद्भूत संग्राम झाला असे युध्द आजपर्यंत कोणी पाहिले नव्हते. पृथ्वी कंपायमान झाली. इंद्रजित खाली उतरला. ते पाहून लक्ष्मण सुध्दा खाली आला. आणखी त्यांचा निकराचा संग्राम सुरु झाला. शेवटी लक्ष्मणाने एक रामनामांकित दिव्य बाण काढून धनुष्यास लावला व म्हणाला, 'सूर्यवंशात जन्मलेला श्रीराम हा पूर्णब्रह्म परमेश्वराचा अवतार आहे, हे जर सत्य असेल, जगन्माता सीतादेवी जर खरी पतिव्रता असेल व मी विवाहीत असून ब्रह्मचारी व चौदा वर्षे निराहारी असेन तर माझ्या या बाणाने इन्द्रजीताचे शिर तूटून पडेल.' असे म्हणून श्रीरामाचे स्मरण करीत लक्ष्मणाने बाण सोडताच इंद्रजिताचे शीर व भुजा तुटून भुजा लंकेत आणि शिर खाली पडले. ते वृषभाने धावत जाऊन झेलले. सर्वांनी रामलक्ष्मणाचा जयजयकार केला. देवांनी त्यांचेवर पुष्पवृष्टी केली.

इंद्रजिताच्या वधाने रावण हतबल झाला. इन्द्रजित पत्नि - सुलोचना, मंदोदरी वगैरे यांना शोक अनावर झाला. सारी लंकानगरी शोक सागरात बुडाली. सुलोचना सासुसासऱ्यांची आज्ञा घेऊन श्रीरामाकडे शिर मागण्यासाठी आली. दु:खातिशयाने कळवळून रामाने इंद्रजिताचे शिर दिले. त्यासह सुलोचना सती गेली. रावणाने मुलाची अंतेष्टी केली. श्रीराम ही शत्रुत्व बाजूस ठेऊन रावणाच्या त्या दु:खद प्रसंगी सहभागी झाले. इंद्रजिताच्या अंतेष्टीपर्यंत श्रीरामांनी युध्द बंद ठेवले.

पुत्र इंद्रजित, बंधु कुंभकर्ण, प्रहस्तादि वीर व अनेक राक्षसांच्या संहाराचे दारूण दु:ख रावणास झाले. तो शोक करीत बसला असता विद्युज्जिव्ह प्रधान तेथे आला व त्याने त्याचा शोक निवारण करून पाताळातील अहिरावण व महीरावण यांना पाचारण करून रामलक्ष्मणांशी युध्द करण्यास सुचविले. त्याच्या सुचनेप्रमाणे रावणाने त्यांना संदेश देऊन बोलावून घेतले व त्यांना सर्व माहिती सांगितली. त्यांनी गुप्तपणे रामलक्ष्मणांना नागपाशाने बध्द करून उचलून पाताळात नेले. हनुमानाने अतुल पराक्रम करून अपार कष्ट सहन करून व योग्य ठिकाणी बुध्दिबळाचा वापर करून अहीरावण व महीरावण यांचा संहार करून राम लक्ष्मणाला सोडवून आणले.

इंद्रजिताची आठवण होऊन रावणास आवेश आला व तो युध्दास निघाला. होते नव्हते तेवढे सर्व सैन्य त्याने बरोबर घेतले. क्षणकाळात तुंबळ युध्द झाले. श्रीरामांनी सात बाण मारून रावणास घायाळ केले. रावणाने बिभीषणावर ब्रह्मशक्तिबाण सोडला. लक्ष्मणाने तिचे तीन तुकडे केले. तेव्हा रावणाने बिभीषणाची निर्भत्सना केली. रावणाने अनिवार मयशक्ति गवसणीतून बाहेर काढली व अभिमंत्रीत करून ती लक्ष्मणावर सोडली. हनुमंताने तिला अडविले तोच त्या शक्तीने स्त्री रूप घेतले आणि म्हटले, 'हनुमंता तू ब्रह्मचारी म्हणवितोस आणि स्त्रियांच्या अंगाला कसा झोंबतोस? मी रावणकन्या असून लक्ष्मणास वरण्यास जात आहे. लग्नवेळ चुकेल तेव्हा मला सोड.' त्याबरोबर मारुतीने तिला सोडून दिले. तेव्हा ती स्त्रीरूप सोडून लक्ष्मणाच्या छातीवर आदळली आणि त्याच्या हृदयास भोक पाडून पाताळात निघून गेली. त्यामुळे लक्ष्मणाचे शरीर छिन्नविछिन्न होऊन तो मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. त्याबरोबर सर्वत्र हाहाकार उडाला सर्व वानरवीर तिथे आले. श्रीराम बिभीषणासह आले. लक्ष्मणाच्या सर्वांगातून रक्त वाहात होते. श्रीरामांनी लक्ष्मणास मांडीवर घेऊन शोक करू लागले. बिभीषण म्हणाला, 'प्रभो रामचंद्रा, ही वेळ शोक करण्याची

नाही. शत्रु समोर उभा आहे. त्याचा अगोदर नाश करा. लक्ष्मणाला काही भीती नाही. त्याला सुषेण औषधी लावील.' हे ऐकताच उठून श्रीरामांनी धनुष्याचा टणत्कार केला आणि म्हणाले, 'निशाचरा, दैत्याधमा, रावणा' आता तू लक्ष्मणावर शक्ति टाकलीस आता तू कसा पळतोस ते मी पाहातो. पहा माझा पराक्रम.' असे म्हणून रामांनी असंख्य बाणवृष्टी करून रावणास जर्जर करून सोडले. त्यावेळी राक्षसांची असंख्य शिरे तट तट तुटू लागली. सैन्य किती गारद झाले त्याची गणना शेषासही करता आली नाही. राम धनुष्याच्या चौदाही घंटा घणघणू लागल्या. त्याचा अर्थ असा की अपरिमीत सैन्य धरणीवर पडले. रावण तटस्थ झाला. त्याला जिकडे तिकडे राम दिसू लागला. मागेपुढे, उजवीकडे, डावीकडे सर्वत्र धनुर्धर राम त्याला दिसू लागला. तेव्हा त्याने अंतर्यामात पाहिले तेथेही त्याला राममूर्ति दिसली. तेथून पळत तो लंकेत आला. तेथेही सर्वत्र रामरूप दिसू लागले. शेवटी तो मंदोदरीच्या महालात आला व त्याने तिला रणवृत्तांत सांगितला. मंदोदरीने त्याची समजूत घातली. रामाशी मैत्री जोडा म्हणून विनविले. तेव्हा रावण म्हणाला, 'प्रिये आता ती वेळ निघून गेली आहे.'

इकडे लक्ष्मणाला मांडीवर घेऊन राम दुःख करू लागले. वैद्यराज सुषेणाच्या सांगण्यावरून द्रोणागिरीवरील अमृतवल्ली आणण्यास परत हनुमानास पाठविले. हनुमानाने पूर्वीप्रमाणे उड्डाण करून द्रोणागिरी आणला मध्येच आकाशमार्गाने नंदीग्रामावरून जात असता भरताने रामनामांकीत बाण सोडून मारूतीस खाली उतरविले. त्याच्या मुखातून रामनामाचा उच्चार ऐकताच तू कोणाचा कोण असे विचारले. मारूतीने थोडक्यात रामाचा व आपला वृत्तांन्त सांगून लक्ष्मण रावणाच्या बाणाने मूर्च्छागत झाला आहे. सूर्योदयाच्या आंत मला तेथे गेले पाहिजे तरच लक्ष्मण वाचेल असे मारूतीने सांगताच भरतास गहिवरून आले. तो शोकाकुल झाला व आपण श्रीरामाच्या सेवकास अडथळा आणला पण आपणास रामाचा वृत्तान्त समजला एवढे बरे झाले तेवढेच समाधान मानून त्याने हनुमानास पर्वतासह बाणावर बसण्यास सांगितले व एकाच झेपेत तुला लंकेस पोहोचवितो, तू चिंता करू नकोस. पण श्रीरामाला माझा नमस्कार सांग व चौदा वर्षे पूर्ण होताच परत अयोध्येस न याल तर तुमचा बंधु प्राणत्याग करील असा निरोप दिला आणि हनुमंतास विजयी हो असा आशिर्वाद दिला. मारूतीने उड्डाण करून रात्रीच्या चौथ्या प्रहरी सुवेळाचलास आला. रामास व सर्वास आनंद झाला. सुषेणाने द्रोणागिरीस नमस्कार करून दिव्य अमृतवल्लीचा

रस काढून लक्ष्मणास पाजला व चोथा लक्ष्मणाच्या जखमेवर लावतोच तो उठून बसला व कोठे आहे तो रावण म्हणून धावत सुटला. त्याला धरून श्रीरामांनी त्यास आलिंगन दिले. त्या वृक्षवल्लीच्या साहाय्याने सुषणाने सर्व वानर जिवंत केले. सर्वांनी मारूतीचा जयजयकार केला. मारूतीने श्रीरामास भरताचा निरोप कळविला. ते ऐकून राम्र सद्‌गदित झाले व म्हणाले, 'रावणाचा वध करून मी लवकरच भरताच्या भेटीस जाईन.' नंतर मारूती द्रोणागिरी मुळच्या जागेवर ठेवून परत आला.

लक्ष्मण सावध झाल्यावर मारूतीच्या पराक्रमाचे शुभ गान करीत राम वानरगणासह आनंदात बसले असता बिभीषण आला व म्हणाल, 'राघवोत्तमा, श्रीरामचन्द्रा! इंद्रजिताप्रमाणे रावणही गुप्तरीतीने गुहेत होमहवन करीत बसला आहे. विजयीरथ जर बाहेर आला तर रावण कोणासच आटोपणार नाही. तरी त्वरीत जाऊन होमाचे विध्वंसन करावयास पाहिजे. तेव्हा नळ, निळ, अंगद, जांबुवंत इ. कपिवीर सैन्यासह रावणाच्या यज्ञाचा विध्वंस करण्यास निघाले व लंकेत जाऊन रावणाचा शोध करू लागले. बिभीषण पत्नि सरमाने गुप्तपणे येऊन वानरांना रावणाचा ठावठिकाणा सांगितला. नगरदूर्गाखालच्या विवरात रावण होम हवन करीत होता. त्याने आपले डोळे मिटलेले होते., विजयरथ हळूहळू होमकुंडातून पुढे सरकत होता. तेव्हा वानरांनी पर्वतप्राय प्रचंड शिळा फेकून यज्ञाचा विध्वंस केला. विजयी रथ अग्निकुंडात गुप्त झाला. रावणास सावध करण्यासाठी अनेक प्रयत्न केले पण ध्यानस्थ बसलेला रावण डोळे उघडीना. शेवटी अंगदाने मंदोदरीची थोडी विटंबना करून तिला रावणाच्या अंगावर फेकले. तिच्या ओरडण्याने रावण सावध झाला. मंदोदरी रागाने रावणास म्हणाली, 'जळले तुमचे अनुष्ठान! तुमच्या पत्निची तुमच्यासमोर विटंबना केली तुम्हाला ती कशी पाहवते! रावणाने मंदोदरीची झालेली विटंबना पाहून व होमकुंडाचा विध्वंस झालेला पाहून संतापून वानरांना लाथा-बुक्क्यांनी मारू लागला. तेव्हा राम सैन्यासह युध्दाच्या तयारीतच उभे होते. आता दोघाचे निकराचे अखेरचे युध्द जुंपले. श्रीरामांनी रावणास समजावून नीतिनियम राजधर्म वगैरेची आठवण देऊन त्यास तसे न वागता अन्याय अनितीने वागून कुलक्षय करवून घेतल्याबद्दल दूषण दिले. रावणाने संतापून रामावर शरवृष्टी केली. इंद्राने रामाकडे सारथी, शस्त्रास्त्रे घेऊन रथ पाठविला. त्यावर स्वार होवून रामाने रावणाशी निर्वाणीचे युध्द केले. तो अद्‌भूत रणसंग्राम सात दिवस अहोरात्र सुरु होता. कोणीही विसावा घेतला नाही.

शेवटी रामांनी एक अर्धचंद्राकृती दिव्यबाण सोडून रावणाची दहाही शिरे तोडली. तोच त्याठिकाणी दुसरी दहा शिरे प्रगटली. पुन्हा रामानी ती छेदली तो आणखी नविन शिरे तेथे प्रगटली. हा प्रकार पाहून रामाला आश्चर्य वाटले. त्याच्या सारथ्याने - मातलीने त्यास सांगितले, या रावणाच्या हृदयातील अमृतकूपी काढल्याशिवाय रावण मरणार नाही. तेव्हा श्रीरामांनी अगस्तीदत्तबाण काढून त्यावर ब्रह्मास्त्र अभिमंत्रीत करून तो बाण रावणावर सोडताच त्याचे हृदय विदीर्ण होऊन त्यातील अमृतकूपी बाहेर फेकून फोडली. नंतर त्या बाणाने रावणाची तीन शिरे तोडून तो बाण परत रामाजवळ येऊन भात्यात शिरला. बाकीची शिरे तोडण्यासाठी राम दुसरा बाण काढू लागला तोच लक्ष्मण म्हणाला, रामराया आता युध्द पुरे करा. रावण मृत झाला आहे. हे ऐकून रामांनी आपले धनुष्यबाण व भाता लक्ष्मणाच्या हाती देऊन म्हटले, 'आज आमचे अवतार कार्य संपले.'

त्यावेळी सर्वांनी एकच जयजयकार केला. देवांनी श्रीरामचंद्रावर आकाशातून पुष्पवृष्टी केली. यक्ष, किन्नर, गंधर्व आनंदाने नाचू लागले. ऋषिवर्ग, संतोषला परमआनंद झाल्यामुळे वानर परस्परास मिठ्या मारून या झाडावरून त्या झाडावर अशा उड्या घेत माकडचेष्टांनी आपला आनंद व्यक्त करू लागले. त्यामुळे रामाचे समाधान झाले. त्यांनी संतोषित मनाने आपल्या साऱ्या दलभराकडे नजर फिरविताच सर्ववीर उल्हसित झाले, कृतार्थ झाले.

नंतर श्रीराम सर्वांसह रावणाच्या शवाजवळ आले. बिभीषणाने अपार शोक केला. श्रीरामांनी विवेकाच्या गोष्टी सांगून त्याचे सांत्वन केले. इतक्यात रावणाच्या ऐशी हजार स्त्रिया वक्षस्थल बडवीत मंदोदरीसह तेथे आल्या. मंदोदरी पतीच्या शवास कवटाळून अपार शोक करू लागली. तेव्हा श्रीरामांनी मंदोदरीस आत्मज्ञानाची ओलख करून देऊन तिचे सांत्वन केले आणि बिभीषणास म्हणाले, 'मंदोदरी तुझ्या वडिलबंधूंची स्त्री तुला मातेसमान आहे. ती महापतिव्रता असून ज्ञानी आहे. तेव्हा तिला तिच्या मंदीरात पोचती कर.' नंतर रामाच्या आज्ञेवरून रावणाचे शव समुद्रतीरी नेऊन त्याचे शास्त्रोक्त दहन केले. ब्रह्मदेवांनी सांगितल्याप्रमाणे रावणाची उत्तरक्रिया तेथेच करून बिभीषण रामाजवळ सुवेळाचलास आला. (श्लोक ५४५-५५४)

बिभीषण येताच रामांनी लक्ष्मण, सुग्रीव व मारूती यास सांगितले कीं तुम्ही लंकेत जाऊन बिभीषणाची राज्यावर स्थापना करावी. सर्व देवांना व राजांना मुक्त

करावे. ज्याची वस्तू त्यास द्यावी. मी व्रतस्थ आहे. भरत भेट होईपर्यंत मी वनवासाचे व्रत सोडणार नाही. ती रामाची आज्ञा ऐकून लक्ष्मण सर्व वानरास लंकेत घेऊन गेला.

सुमुहूर्तावर बिभीषणास राज्यभिषेक केला. बिभीषणाने मानापानाप्रमाणे वस्त्रभूषणे देऊन सर्वांचा गौरव केला. नंतर बिभीषण सर्व सेवकांना घेऊन सुवेळाचलास आला. लक्ष्मणाबरोबर वानर समुदाय होताच. त्यावेळी मंगलवाद्ये वाजू लागली. सर्वांच्या भेटी झाल्या. त्यांच्या आनंदास पारावर राहिला नाही. मंदोदरी आत्मज्ञान संपन्न असल्याने तिने अंतर्यामी असलेल्या आत्मारामास प्रत्यक्ष प्रकट सगुण स्वरूपात समोर पाहून तिचे हृदय भक्तिभावाने उचंबळून आले. तिने श्रीरामाच्या कर्तव्य तत्पर, मर्यादाशिलपणा, अन्यायाचा उच्छेद, धर्मनीती नियमांचे पालन वगैरे गुणांचे गुणगान करून धन्यता व्यक्त केली ती म्हणाली, 'हे अंतर्यामी स्वरूपी श्री रामचंद्रा आजचा दिवस धन्य झाला. आज ही लंकापूर नगरी आपल्या परम पावन चरणांनी पुनीत झाली. आपण पूर्णब्रह्म सनातन परमात्मा आमच्या या भूमीवर अवतरीत होऊन आपल्या नानाविध गुणांनी व लीलाचरित्राने आम्हा पतीतांना पावन केले. सती सीतेने आपल्या अंगच्या सोज्वळ व सुशील गुणांनी आम्हा स्त्रियांच्या समोर सतीत्वाचा आदर्श ठेवला. धन्य ती सती सीतादेवी! आज आम्ही आपले स्वरूप दर्शन करून कृतार्थ झालो. आपण त्या निर्मळ पवित्र सतीचा स्विकार करावा.'

सीतेला मंगलस्नान करवून घेऊन येण्याची आज्ञा होताच हनुमान आनंदातिशयाने अशोक वाटिकेत गेला. त्याने श्रीरामाची आज्ञा जानकीस कळविली. त्रिजटा व सरमा यांनी जानकीस अभ्यंग स्नान घातले. तिच्या अंगावर भर्जरी वस्त्रे अनेक दागिने अलंकार घातले. कुंकुम-कस्तुरी-तिलक तिच्या कपाळी लावला, नंतर रसभरीत फळांनी तिची ओटी भरली व त्यातील फळे खाण्याची विनंती केली. सीतेने त्यातील एक फळ खाल्ले व प्रसाद म्हणून बाकीची वाटून दिली. नंतर एक दिव्य नवरत्नांचा हार बिभीषणाने सीतेपुढे ठेवला. तो उचलून सीतेने आपल्या गळ्यात घातला. रामाज्ञेप्रमाणे सीतेला पालखीत बसवून सेविकांनी पालखी उचलली. पालखीच्या एका बाजूस बिभीषण व दुसऱ्या बाजूने हनुमान चालू लागले त्यांच्या बरोबर असंख्य सेना वाद्ये वाजवित होती. पालखी वानराजवळ येताच सीतेस पाहाण्यास वानर धावले. तेव्हा वेत्रधारी त्यांना मारू लागले. रामांनी बिभीषणास सांगितले, 'वानरांनी सीतेसाठी खूप कष्ट सोसले आहेत. त्यांना मारू नका. तेव्हा पालखी खाली ठेवून सीता बाहेर आली.

सर्वांनी तिचे दर्शन घेतले. सीतेचे दिव्य लावण्य पाहून सर्व चकित झाले. देव, गंधर्व, असूर यांच्या मनात विकल्प झाला. ही अती सुंदर स्त्री रावणाच्या बंदीत असल्याने रावण स्वस्थ कसा राहिल असे ते आपापसात कुजबूजू लागले. ही शंका रामच्या लक्षात येताच ते जानकीला म्हणाले - 'जानकी तुला राक्षसाने चोरून नेले. हा जनअपवाद जगात पसल्यामुळे मी तुला सोडविले. परंतु तू शत्रूगृही सहा महिने राहीलीस, या तुझ्यावरील आक्षेपांचे तूं निरसन कर?'

श्रीरामाचे हे कठोर शब्द ऐकताच सीतेला वज्राचा प्रहार हृदयावर केल्याचे दु:ख झाले. ती शोकाने म्हणाली - 'प्राणनाथ, या आक्षेपापेक्षा तुम्हीच माझा वध करावा आता जगण्यात अर्थ नाही. सहा महिन्यांनी पतिचरण दिसले, पण कर्म आडवे आले. जळत्या घरातून काढावे व परत वणव्यात टाकावे तशी माझी अवस्था झाली आहे. सुवर्णाची परिक्षा अग्नितूनच होत असते. तेव्हा आता मी सर्वासमक्ष अग्निप्रवेश करते. अशुध्दता माझे अंगी असेल तर अग्निदिव्यात माझे भस्म होईल.' जानकीने वानरांना एक अग्निकुंड प्रज्वलित करण्यास सांगितले. ज्वाला धगधगू लागल्या. तिने अग्नीकुंडास तीन प्रदक्षिणा घातल्या. श्रीरामचंद्राकडे डोळे भरून पाहिले. हृदयात ती मूर्ति साठविली. गळ्यातील सुमनहार काढून अग्निकुंडात टाकला आणि त्या अग्नित सीतेने उडी घेतली. त्यावेळी पृथ्वीमाता कापू लागली. वानरांनी एकच हाहा:कार केला. लक्ष्मण, मारूती, वानरवीर अश्रु ढाळू लागले.

सीता अग्निकुंडात एक घटका गुप्त झाली होती व छाया रूपाने रावणाबरोबर गेली होती. तिचे छायारूप आज अग्नीत विलीन झाले आणि मूळ स्वरूपात अग्निदेवांनी तिला वर आणून अग्नितच उभे केले. तेव्हा तिचे रूप पूर्वीपेक्षा शतपट तेज:पुंज दिसू लागले. त्या तेजाने दाही दिशा लखलखीत दिसू लागल्या. तिला पाहताच सर्वांनी एकच जयजयकार केला. देवानी तिच्यावर अमित पुष्पवृष्टी केली. सीता कुंडाबाहेर आली. तिच्या चरणावर मस्तक ठेवून मारूती नाचू लागला. लक्ष्मण, बिभीषण, सुग्रीव यांनी तिच्यापुढे लोटांगण घातली. तिच्या शुध्दतेची आता सर्वांना खात्री झाली. नंतर मंद मंद पावले टाकीत जानकी रामाकडे आली. श्रीराम उठून उभे राहिले. दोघांची दृष्टादृष्ट होताच रामाचे मुखमकल पाहून ती हसली. नंतर तिने रामचरणास मीठी घातली. रामांनी आपल्या हातांनी तिला उठवून आलिंगन दिले व वामांकावर बसविले. तेव्हा सर्वांनी राम जानकीचा जयजयकार केला. देव, दानव, वानर, राक्षस वगैरे सर्व भूमंडळ आनंदमय झाले, इंद्राने अमृतवृष्टी करून सर्व मृत

वानरांना जिवंत केले. श्रीरामांनी बिभीषणास अयोध्येस जाण्याची आज्ञा मागितली. बिभीषणाला श्रीरामाचा विरह होणार म्हणून दु:ख झाले. श्रीरामांनी पुष्पक विमान आणविले. सीतेची अंगुली धरून तिच्यासह आत बसले. जवळ लक्ष्मणास घेतले. पायाजवळ मारूती समोर बिभीषण, सुग्रीव, नल, निळ, जांबुवंत, अंगद व सुषेण इ. वानरवीर बसले. त्याच्या पाठोपाठ सर्व वानर, सर्व रीस, सर्व गोलांगुल व बिभीषणाची सर्व राक्षस सेना त्यात बसली. नंतर रामाची आज्ञा घेऊन लंकापुरीस प्रमाण करून मंगल वाद्याच्या गजरात पुष्पक विमान अयोध्येकडे निघाले. (श्लोक ५५५-५६२)

पुष्पक विमान आकाशातून उत्तरेकडे जात असता श्रीरामांनी सीतेला मार्गातील रम्य स्थळे दाखविली. सुवर्णलंका, सुवेळाचल, समुद्रावरील सेतु, मलयाचल, सुग्रीवाची राजधानी किष्किंधानगरी, पंपासरोवर, ऋष्यमुक पर्वत, गौतमीतीर, पंचवटी वगैरे पाहून अगस्ती ऋषिंच्या दर्शनासाठी त्याच्या आश्रमात उतरले. तेथून भारद्वाजाच्या आश्रमात आले. त्याचे दर्शन घेऊन चौदावर्ष चौदा दिवस पूर्ण झाले म्हणून अयोध्येस येऊन भरतास भेटले. श्रीरामांनी त्याला प्रेमाने आलिंगन दिले. दोघांच्या डोळ्यातून आनंदाश्रु वाहू लागले. सर्वांना अत्यानंदाने भेटून भरताने आज आपल्या व्रताचे साफल्य झाले म्हणून प्रेमाने सर्वांचे स्वागत केले. श्रीरामांनी वसिष्ठांना नमस्कार करून त्यांचा आशिर्वाद घेतला. तिन्ही मातांना नमस्कार केला. सर्वांना आनंदीआनंद झाला. युध्दात सहाय्य केल्याबद्दल श्रीरामांनी सर्व वानरवीरांचा यथोचित गौरव केला व ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे उपहार, वस्त्र, अलंकार, पदव्या देऊन उपकृत केले. सर्व वानरवीरांचा यथोचित गौरव करून नळ, नीळ, जांबुवंत, अंगद, सुग्रीव, बिभीषण, सुषेण वगैरे सर्व सुहृदांना प्रेमाने निरोप दिला. मोठ्या जड अंत:करणाने सर्व आपापल्या स्थानी निघून गेले. हनुमान कायमचा श्रीरामचरणी स्थित झाला. श्रीराम बंधुसहवर्तमान राज्य करू लागला. त्यांच्या राज्यात प्रजा सुखी झाली. दु:ख भय नाहीसे झाले. श्रीरामांनी अकरा हजार वर्षे यथान्याय अयोध्येचे राज्य केले.

कालांतराने सीता गर्भवती होऊन तिला सहा महिने होताच तिचे ओटीभरण केले. त्यांनी शास्त्राप्रमाणे डोहाळ्याबद्दल विचारल्यावरून तिने सांगितले, 'मला असे वाटते की भागिरथीच्या तिरी ऋषिपत्निंच्या समवेत पाच दिवस फलाहार करून राहावे.' पुढील भविष्यार्थ जाणून श्रीसमांनी तिला तसे वचन दिले. पुढे काही दिवसांनी एका रजकाच्या निंदेवरून श्रीरामांनी सीतेचा त्याग केला. लक्ष्मणाला सांगून सीतेला रथातून

तापसारण्यात नेण्याची व तिथे सोडून येण्याची आज्ञा श्रीरामांनी केली. तसे न करण्याविषयी लक्ष्मणाने बरीच समजूत घातली पण एकवचनी रामाने लोकापवादास कारण होऊ नये म्हणून लक्ष्मणाचे वचन मानले नाही. लक्ष्मणास फार दुःख झाले. सीतेस तर आभाळ फाटल्यासारखे झाले. तिला सर्व दिशा शून्य झाल्या. विलाप करीत असताच तिला अरण्यात मूर्च्छा आली. ती सावध झाली तेव्हा वाल्मिक ऋषि तिच्या दृष्टीस पडले. त्यांनी सीतेजवळ येऊन म्हटले, 'बाळे, तू कोण? येथे कशी आलीस?' सीतेने आपली हकीकत सांगून 'अपराधाशिवाय श्रीरामाच्या आज्ञेने लक्ष्मणाने मला वनात आणून सोडले.' वाल्मिकी द्रवले. त्यांनी तिला आश्रमात नेऊन मुलीप्रमाणे वागविले. तिथे तिला दोन मुले झाली. वाल्मिकीने शास्त्रविधीकरून धाकट्या मुलास लव्हाळ्यावर ठेऊन अभिषेक केला म्हणून त्याचे नाव लहु ठेवले. थोरल्या मुलास कुशावर ठेऊन अभिषेक केला म्हणून त्याचे नाव कुश असे ठेवले. वाल्मिकी परमप्रितीने त्या मुलांचे लालनपालन करू लागले. शुक्लेन्दुप्रमाणे ती मुले वाढू लागली. सात वर्षे पूर्ण होताच वाल्मिकीने कामधेनुला आणून मोठ्या समारंभाने ऋषिसमुदायात त्यांचे मौजीबंधन केले. नंतर त्या दोघांना त्यांनी लिहीणे, वाचणे, शिकवून वेदाध्ययन करविले, षड्शास्त्रे, अठरापुराणे यांचा अभ्यास झाल्यावर शतकोटी रामायण शिकविले व शेवटी त्यांना धनुर्विर्धेतही पारंगत केले.

सीतेचा त्याग केल्यापासून इकडे अयोध्येत बारा वर्षेपर्यंत पाऊसच पडला नाही. दुष्काळ पडल्यामुळे अयोध्यानगरी ओसाड, रूक्ष, कळाहीन दिसू लागली. तेव्हा वसिष्ठ म्हणाले, 'श्रीरामा सीतादेवीला तू अपराध नसतांना वनात घालविलेस म्हणून कुललक्ष्मी तुझ्यावर रूष्ट झाली आहे. तू अश्वमेघ यज्ञ कर म्हणजे अवर्षण दूर होईल. श्रीरामांनी गुरु वसिष्ठांच्या अनुमतीने यज्ञ उभारला व बिभीषण, सुग्रीवादि राजांना आमंत्रण देऊन बोलाविले. दिग्विजयासाठी एक शामकर्ण घोडा सोडून त्याच्या रक्षणासाठी शत्रुघ्नाबरोबर अपार सैन्यदळ पाठविले. चौदा दिवसात छपन्न देश जिंकून घोडा तापसारण्यातून जात असता लवाने त्याला पकडून त्यावरील आज्ञा वाचून बांधून ठेवला व शत्रुघ्नाची वाट पाहू लागला. शत्रुघ्न तेथे आल्यानंतर ऋषीकुमारांच्या या बाललीला समजून मुलांकडून घोडा सोडवू लागला. तोच लवाने त्यास खडसाविले व युध्द केल्याशिवाय घोडा नेता येणार नाही, असे म्हणून तो युध्दास सिध्द झाला. शत्रुघ्नाने अनेक बाण सोडून लवास विध्द केले. ते सर्व लवाने निवारण केले. शेवटी लव आटोपत नाही असे जाणून श्रीरामाने दिलेला एक प्रखर बाण लवावर सोडला तो निवारण्याचा

उपाय कुशाला माहित होता पण दैववात कुश वनात लाकडे व समिधा आणण्यासाठी गेलेला होता म्हणून लवाला त्याचे निवारण करता आले नाही. बाण जिव्हाग्री लागून लव मूच्छींगत झाला. शत्रुघ्नाने ताबडतोब त्याला आपल्या रथावर घेतले व तो अयोध्येस येण्यास निघाला हे वर्तमान कुशास समजतात तो धनुष्यबाण घेऊन शत्रुघ्नाच्या पाठोपाठ धावत आला व आपल्या अंगच्या पराक्रमाने शत्रुघ्नास हरवून लवाला घेऊन घरी येऊ लागला, पण पूर्वीच्या पराजित झालेल्या सैनिकांनी हे वृत्त श्रीरामाला कळविले. लक्ष्मण व भरत सर्व सैन्य घेऊन निघाले. हनुमान, सुग्रीव व जांबुवान हे सुध्दा त्यांच्याबरोबर निघाले. ते सर्व वीर त्या दोघा क्षत्रियकुमारांना पाहताच दुसरे रामलक्ष्मणच आहेत की काय अशा आश्चर्यात पडले. शेवटी दोघ पक्षाकडची लढाई सुरु झाली. एका बाजूला लक्ष्मण, भरत, हनुमान, सुग्रीवादि मोठमोठे रणवीर सैन्यासह लढत होते तर दुसऱ्या बाजूला फक्त लव आणि कुश दोघे बारा वर्षाचे सुकुमार बाळे युध्द करीत होती. पण ते कोणासही आटोपत नव्हते. शेवटी बालकांनी सर्व योध्दयास जेरीस आणून हतबल केले आणि सर्वांना मूच्छींगत केले. श्रीरामाला ही बातमी समजताच ते समरांगणावर आले. बिभीषण बरोबर होता. दोघाबालकांना पाहाताच श्रीरामानी सीता त्यागाची गणती केली. बरोबर बारा वर्षाचा काळ लोटला गेला होता. म्हणून मनात पक्का निश्चय केला की ही आपलीच मुले असावीत, पण क्षात्रधर्माला अनुसरून त्यांना जिंकल्याशिवाय गत्यंतर नाही, असा विचार करून त्यांनी मुलांवर शस्त्रप्रहार सुरु केला तेव्हा मुलांनी रामावर सुध्दां मोहनास्त्र टाकून त्यांना मूर्च्छीत केले व रामलक्ष्मणांची किंमती वस्त्रे व मुकुट काढून स्वत: धारण करून, हनुमान व जांबुवान यांच्या शेपट्या धरून अश्वाला घेऊन ते सीतेकडे आले.

प्रथमत: रामलक्ष्मण आल्याचा भास सीतेला झाला पण मुले जवळ येऊन त्यांनी तिच्या चरणी मिठी घातली. त्यावरून ही आपलीच मुले; पण त्यांनी ही वस्त्रे आभुषणे, किरीट कोठून आणले म्हणून ती संभ्रमात पडली. मुलांनी खेळण्यासाठी दोन मजेदार वानर धरून आणले आहेत असे मातेला सांगताच तिला हनुमान, जांबुवान, नळ, नीळ, अंगद, वगैरे वानर वीरांची आठवण झाली. तिने त्यांना सोडून देण्याबद्दल बाळांना सांगितले. हनुमान, जांबुवान यांना सीतेचे दर्शन घेऊन धन्यता वाटली. त्यांनी रामास सावध करून आश्रमातील वृत्तान्त सांगितला. इतक्यात वाल्मिकी पाताळात वरूणाच्या अनुष्ठानासाठी गेले होते ते वरील घटना अंतर्ज्ञानाने जाणून आपल्या आश्रमात आले. सीतेने त्यांना युध्दाचा वृत्तान्त सांगून शामकर्ण घोडा दाखविला. वाल्मिकींनी

समरांगणावर जावून आपल्या कमंडलूतील पाणी सर्वांच्या अंगावर शिंपडून सर्वांनाच सावध केले व श्रीरामास म्हणाले, 'श्रीरामा! तुझे सामर्थ्य अतर्क्य आहे. सर्वांचा गर्व हरण करण्यासाठी केवळ तू ही लीला केली आहेस. पुत्राकडून स्वत:ला जिंकून घेतलेस हा तुझा खेळ आहे.' वाल्मिकींच्या या भाषणाने श्रीराम संतुष्ट झाले. त्या दिवशी श्रीराम सर्व सैन्यासह ऋषींच्याच आश्रमात राहिले. लव आणि कुश हे रामाचेच पुत्र असून श्रीराम पुत्रासह पत्निस भेटणार आहेत हे कळताच तो सोहळा पाहण्यासाठी अयोध्येतील सर्व स्त्री पुरुष तेथे जमले. वसिष्ठादि मुनिवर सुध्दा तेथे आले. वाल्मिकींनी आश्रमात जाऊन लव, कुश व श्यामकर्ण यांना श्रीरामाजवळ आणले तोच आकाशवाणी झाली.' श्रीरामा, सीता ही सति असून निर्दोष हे. तिचा तू स्विकार कर. हे पुत्र तुझेच आहेत.' हे ऐकताच देवतांनी जयजयकार केला. लव-कुशांनी श्रीरामा पुढे लोटांगणे घातली. श्रीरामांनी उचलून त्यांना हृदयाशी धरले व पुढ्यात बसविले. सीतेला पुढे करून वाल्मिकींनी सांगितले - 'रामा, मी हिचे धर्मकन्या समजून पालन केले. आज तुझ्या दर्शनाने पुनीत झालो. आता आपल्या सत्वशील पत्निला मांडीवर घे म्हणजे आमच्या नेत्रास सुख वाटेल व मी धन्य होईल,' आकाशवाणीच्या आज्ञेप्रमाणे श्रीरामांनी सीतेला आलिंगन दिले व मांडवीर बसविले. दोघांनीही लवकुशांची चुंबने घेतली. नंतर लवकुशांनी वाल्मिकीने शिकविलेले रामायण सुस्वर आवाजात गाऊन दाखविले. श्रीरामांनी ते ऐकून वाल्मिकींना धन्यवाद दिले.

नंतर ती सर्व मंडळी ऋषिसमुदायासह रामाच्या विनंतीवरून अयोध्येस आली. कौसल्या, सुमित्रा, कैकेयी यांनी सीतेस आलिंगन दिले. लवकुशावरून मुदी ओवाळून टाकल्या. गुरु वसिष्ठांच्या सांगण्यावरून श्रीरामांनी यज्ञदीक्षा घेतली आणि ऋषिकडून अश्वमेघ यज्ञ पूरा केला त्यावेळी श्रीरामांनी षड्रसान्नाचे भोजन दिले. भांडार फोडून याचकांना अपार द्रव्यदान केले. सर्व राजांना नजराणा देऊन निरोप दिला. सुग्रीव, बिभीषण व सर्व वानरवीरांचा गौरव करून त्यांची रवानगी केली. श्रीराम पुत्र व बंधुसह वर्तमान राज्य चालवू लागला. कुललक्ष्मी परत घरी आल्याने प्रजेचे दैन्य दूर झाले. अवर्षण दूर होऊन वरूण राजाची कृपावृष्टी झाली सर्वत्र समृध्दी झाली. (श्लोक ५६३-५६७)

त्रेतायुगातील श्रीहरीचे तीन प्रगट अवतार झालेले आहेत. वामन, परशुराम आणि श्रीराम. तीन दैत्यांचा संहार झालेला आहे. बली, सहस्त्रार्जुन आणि रावण. तीन सद्भक्तांचा उध्दार झालेला आहे. कमळाधेन, कमळापति व हरिश्चन्द्र.

हरिश्चन्द्र राजाने सत्पंथाच्या सत् तत्वपालनाकरिता अपार कसोटी सहन केली. कायीक, मानसिक कष्ट सहन करून दिलेले वचन पालन करण्यासाठी स्वत:स विकून सत्त्व कायम राखले. त्याच्याबरोबर त्याची राणी तारामती, पुत्र रोहिदास हे ही त्या कसोटीच्या भट्टीत रखडले गेले - भाजले गेले व सत्त्व अबाधित ठेऊन तेही सतपंथाच्या आचरणाने चमकून निघाले. त्यांनी युगप्रवर्तक युगगुरु भगवान वसिष्ठांच्या आत्मज्ञानाप्रमाणे साधना करून त्यांच्या वचनावर दृढनिष्ठा ठेवून ध्येयपुरुष भगवान श्रीरामाच्या भक्ति प्रेमरसात एकतान झाले व आत्मोध्दाराबरोबर अन्य सात कोटी सद्भक्तांचा उध्दार करून अमरपद स्वरूपात स्थिर झाले. ज्या लोकांनी सध्दर्म स्विकारून डळमळीत श्रध्देने सत्यस्वरूप भगवंताची भक्ति केली नाही ते लक्षचौर्यायशींच्या फेऱ्यात पडले व जे नास्तिकपणाने केवळ आपल्या उदरभरणासाठी चोरी, हिंसा, दुराचार करण्यास प्रवृत्त झाले, ईश्वर, धर्म वगैरे पुराणांच्या गप्पा आहेत. त्याच्या दृष्टीने असलेले सुखीजीवन उध्वस्त करणारे उपाय या दृष्टीकोनातून ज्यांनी संत, सद्भक्त, धर्मशास्त्र यांची अवहेलना केली. त्यांचा अनन्वित छळ केला असे जीवात्मे प्रलयापर्यंत नरकयातनेचे दु:ख भोगू लागले. अशाप्रकारे त्रेतायुगातून युगधर्म दिग्दर्शित करून ज्या संत भक्त महात्म्यांनी सत्धर्माची स्थापना केली अशा वसिष्ठऋषींनी अनेक आश्रम स्थापन करून, विद्यापीठ स्थापन करून तेथून आर्य धर्मतत्व व संस्कृतीचा जगतात सर्वत्र प्रसार व प्रचार केलेला आहे. त्यांच्याकडूनच श्रीरामचंद्रांनी व त्यांच्या पूर्वज अनुजांनी आत्मज्ञान प्राप्तिकरीता दीक्षा देऊन साधना करून आत्मज्ञान संपन्न झालेले आहेत. त्यांच्या या धर्मतत्त्वास ज्यांनी विरोध केला व तशी विद्यापीठे उध्वस्त करण्यासाठी ज्या सहस्त्रार्जुन, रावण, कुंभकर्णादि राक्षसांनी प्रयत्न केला त्यांचा उच्छेद भगवंतानी परशुराम, श्रीरामाचा अवतार धारण करून केला. युगधर्मानुसार यजुर्वेदाच्या क्रियाचरणाने अनंत सद्भक्तांचा उध्दार केला. अनंत चतुर्दशी ही या युगाची युगतिथी होती. जलदाग हा प्राधान्यभूत प्रेतसंस्कार होता. पूर्वदिशा पूजनीय मानली जाऊन पूर्वाभिमुख बसून गायत्री मंत्राच्या उच्चाराबरोबर श्रीरामाच्या बीजमंत्राचे स्मरण चिंतन व ध्यान केले जाई. यजुर्वेदाचा पीतवर्ण म्हणून पीतवस्त्रांचा वापर केला जाई. कलश घटपाट हे रूपेरी वर्णाचे म्हणजे चांदीचे असून अर्थ भांडार चांदीचे नाण्यांनी मापले जाई. अशा प्रकारचा युगधर्म त्रेतायुगात प्राधान्यभूत होता. येथे त्रेता युग संपले. त्रेतायुगाचे प्रमाण १२,९६,००० वर्षे असून तीन अवतार झालेले आहेत. आता पुढे द्वापारयुगास सोमवती अमावश्येस सुरुवात झालेली आहे.

चौर्यायशी दिवसपर्यंत लंकेत संग्राम चालला होता. शेवटी पुत्रपरिवारासह राक्षसपति रावण मारला गेला. रामाचा विजय झाला. युध्दास फाल्गुन महिन्यात सुरुवात होऊन रावणाचा वध वैशाख वद्य अमावश्येस झाला. रावणाच्या मृत्यूनंतर रामांनी बिभीषणास लंकेचा व राक्षसांचा स्वामी केला. पण बिभीषण व त्याचे सर्वसहयोगी लंकावासीयांनी राक्षसधर्माचा त्याग करून आर्यमार्गानुसरण केले. जे या गोष्टीत सहमत झाले नाहीत. त्यांनी लंकेचा त्याग करून दुसरीकडे निघून गेले. सीतेला सोबत घेऊन राम पुष्पक विमानात बसून किष्किंधेला आले. कांही दिवस सुग्रीवाचे आतिथ्य स्विकारून दण्डकारण्यात आले. तेथे अगस्त्यादि प्रमुख ऋषितपस्व्यांनी श्रीरामाचा भव्य स्वागत सत्कार केला. त्यावेळी बिभीषण, सुग्रीव, हनुमान वगैरे सर्व प्रमुख वीर रामाबरोबरच होते.

इकडे भरताने चौदा वर्षे वनवासाचा अवधी पूर्ण होताच सुमंत प्रधानास रथ घेन श्रीरामास सन्मानपूर्वीक अयोध्येस परत घेऊन येण्यास दंडकारण्यात पाठविले होते. अज्ञात चोराने सति सीतेला चोरून नेले आणि रामलक्ष्मण तिचा शोध करीत वनोपवन भटकत किष्किंधेकडे गेले आहेत हा समाचार मिळताच एक दूत त्याने किष्किंधेस पाठविला त्याने परत अल्यावर सांगितलें 'लंकापति रावणाने बलात्काराने सीतापहरण केले असून रामाच्या साहाय्याकरिता राजा सुग्रीवाने आपल्या सर्व वानरगणासह लंकेकडे प्रयाण केले आहे.' हा समाचर मिळताच अयोध्येचा वृध्दमंत्री अश्रू ढाळीत तीव्र गतीने अयोध्येस परत आला व संपूर्ण समाचार भरतास कळविला ते ऐकताच अयोध्येत सर्वत्र हाहा:कार उडाला. अयोध्या शोकसागरात बुडाली. श्रीरामाने अशा अत्यंत विपत्काली सुध्दा आपणास काही एक न सुचविता परस्पर प्रयाण केले हे जाणून भरतास अत्यंत ग्लानी आली. विशाद वाटला. त्याने स्वत: अयोध्येची चतुरंग सेना बरोबर घेऊन जलदगतीने मुक्काम दर मुक्काम करीत दक्षिणेकडे प्रयाण केले. पण ते दण्डकारण्यापर्यंतच पोहोचले असतील एवढ्यात राम लंकेवर विजय मिळवून तेथपर्यंत येऊन पोहोचले होते. भरतास चतुरंग सेनेसहित आलेला पाहताच रामचंद्राने अगस्तीप्रमुख सर्व ऋषि, वानरवीर आणि राक्षसेंद्र बिभीषणासह पुढे होवून भरताचे अभिनंदन केले. सर्व भाऊ साश्रुनयनांनी भेटले. चिरवियोगाच्या दारूण दु:खाचा अंत झाला. सीतेसह रामलक्ष्मणांनी मातांची व गुरुजनांची पदवंदना केली. मातांनी दोघापुत्रांना प्रेमाश्रुंनी भिजवून हृदयाशी लावले. सीतेला प्रेमाने आशिर्वाद दिले.

आता राम, वसिष्ठ, वामदेव, इंद्र, अगस्त्य, बिभीषण, सुग्रीव, सुतीक्ष्ण, आदि श्रेष्ठ नरपति व नरवंशांचे नेते यांची सभा दण्डकारण्यात भरली. उत्तरापथ, आर्यावर्त, दक्षिणावर्तातील सर्व प्रतिनिधी नेते, देवीलोक व मृत्यूलोकातील प्रतिनिधी. दक्षिण द्विपसमुहातील सर्व अधिपति, नागकुलपति दंडकारण्यात येऊन वरील महत्वाच्या सभेत दाखल झाले. पृथ्वीतील राज्यांचे योग्य विघटन झाले. रावणाचे साम्राज्य छिन्नभिन्न झाले. बिभीषणाला लंकेचा राजराजेश्वर व द्विपसमुहांचा संरक्षक निवडले. देवलोक व आर्यावर्तातील राज्यांच्या नव्या सीमा निर्धारीत झाल्या आणि तेव्हापासून दक्षिणारण्यापर्यंतचा संपूर्ण भारतवर्ष आर्यावर्त घोषित करण्यात आला. वसिष्ठ आणि विश्वामित्र यांनी परिसंवाद करवून आर्यांच्या संमिश्र जातीचे नविन पध्दतीने संगठन करून गुण व कर्मावरून चार वर्णात विघटन केले व वर्णमर्यादांच्या ऋचा प्रस्तुत करून वेदान्तर्गत स्विकृत केल्या. आता वेद म्हणजे आर्यांच्या सांस्कृतिक व्याख्येचा धर्मग्रंथ म्हणून निश्चित मानला गेला. चार वर्ण झाल्यामुळे सर्व लहान मोठे, मूर्ख वा विद्वान, स्वामी - सेवक परस्पर अलग अलग समुहांचे प्रतिनिधीत्व करूनही समष्टी रूपाने आर्यच म्हटले जाऊ लागले. जिंकले गेलेले, अनार्य, पतीत वगैरेंना सुध्दा शूद्र असे नाव देऊन आर्यत्वाच्या जातीमर्यादेत समाविष्ट केले. देव, आर्य व आर्येतरामध्यें मैत्रीसंबंध प्रस्थापित झाले, आर्यांचे सौष्ठवत्व सर्वांनी स्विकारले. वसिष्ठ हे आर्यांचे सर्वश्रेष्ठ धर्मनेते म्हणून स्विकृत झाले. त्यांची यज्ञविधी आर्यांनी स्विकारला. फक्त देवानी ना वर्णमर्यादा स्विकारली ना परिवार प्रथा ना पितृमूलक कुलपरंपरा ना वसिष्ठांचा यज्ञविधी. त्यांचा धर्मनेता नारदऋषि वामदेवच राहिला आणि त्यांची वामविधी देवांनी स्विकारली पण दोघांमध्ये सद्भाव कायम राहिला.

अशाप्रकारे सर्व व्यवस्था करून रामचंद्र मित्र-परिजनासह भरताला पुढे करून नंदीगावाला आले आणि चौदाव्या वर्षाच्या समाप्तीनंतर चारही भावानी जटा काढून तपस्वी वेष टाकून राजोचित वेश व राजछत्र धारण केले. नंतर मित्र पुरोहित आणि ऋषिमुनिगणासह अयोध्येस येऊन रामाने धामधुमीने राज्याभिषेक करविला. संपूर्ण आर्यावर्त, देवलोक आणि द्विप-उपद्विपातील प्रतिनिधींनी रामराज्यभिषेकात भाग घेतला. राम समस्त आर्यावर्ताचे एकछत्र चक्रवर्ती सम्राट घोषित झाले व जनकनन्दिनी सीता आर्यांची राजमर्हिषी सम्राज्ञी झाली. सर्व समारोह संपन्न झाल्यावर रामाने दान-मान यायोगे उपकृत करून देव, दानव, मानव, नर, नाग, असूर, राक्षस, यक्ष, वानर, ऋक्ष, दैत्य, प्रतिनिधी, राजर्षि, यति, ब्रह्मचारी, वेदपाठी, भट, सुभट, मित्र, बांधव वगैरेना निरोप दिला. सेवकांना संतुष्ट केले व अयोध्येत रामराज्य प्रस्थापित केले.

मथुरेचा शासक लवणासुराने रामाचे शासन स्विकृत केले नाही. तो यादवनरेश भीम सात्वत याचा प्रतिनिधी होता. तो राक्षसधर्मी व नरभक्षी होता. म्हणून रामानें शत्रुघ्नास त्याच्यावर चढाई करण्यास पाठविले. शत्रुघ्नाने घोरसंग्राम करून लवणासुरास ठार मारले. रामाने शत्रुघ्नासच मथुरेच्या राज्यावर अभिषिक्त केले. यादवनरेश भीम शत्रुघ्नाच्या भयाने दक्षिणेकडे खूप दूर निघून गेला. शत्रुघ्नाने बारा वर्षेपर्यंत मथुरेत राज्य केले. कालांतराने रामास दोन मुले झाली कुश आणि लव. लक्ष्मणाचे अंगद व चन्द्रकेतु, भरताचे तक्ष व पुष्कर. शत्रुघ्नाचे सुबाहू व शत्रुघाती अशी मुले झाली.

याच सुमारास कैकेय देशाचा आनव राजा भरताचा मामा युधाजित् याला मारून गंधर्वांनी त्यांचे राज्य हिसकून घेतले. हे ऐकून रामांनी भरताला चतुरंग सैन्य देऊन गंधर्वांशी लढाई करण्यास पाठविले. भरताने गंधर्वांचा पराजय करून गंधर्व देश आणि कैकैय देश यावर अधिकार मिळविला. रामांनी भरतास तेथील राजा बनविला. कांही समयाने भरतपुत्र पुष्कर याने पुष्करावतीनगरी बसवून त्याने आपली राजधानी बनविली. भरतपुत्र तक्षाने तक्षशिला ही नगरी बसविली. तेच हल्लीचे पेशावर आणि तक्षशिला ही प्रसिध्द नगरे होत.

रामांनी आणखीही बऱ्याच राज्यांना जिंकून पूत्र परिवारांना वाटून देऊन सूर्यवंशीयांच्या गाद्या स्थापन केल्या. रामाने आपला वडिलमुलगा कुश याला युवराज म्हणून घोषित केले आणि विंध्याद्रीच्या दक्षिणेस कुशस्थलीत कुशावतीनगर बसवून त्याला तेथील राज्यपाल नेमले. लवास उत्तर कोसलची राजधानी श्रावस्तीला स्थापित केले ते गोंडा अथवा बहराइन जिल्ह्यात आहे. लवाने पंजाबात लवपूर नावाचे नगर वसविले तेच हल्लीचे लाहोर होय. लक्ष्मणाचा मुलगा अंगद व चंद्रकेतु यांना कारापथ राज्यात अंगदनगर व चंद्रावती नगरीचे राज्य दिले हे मल्लदेशात हिमाचल प्रदेशात बसलेले आहे. सुबाहूला मथुरा व शत्रुघातीला विदि हल्लीचे भलसा हे राज्य दिलेले आहे. अशा रीतीने रामाने आपल्या भावांना व त्याच्या आठही मुलांना अलग अलग राज्य विभागून मुख्य अयोध्येची गादी आपल्या स्वाधिन ठेवली.

श्रीरामाने सुग्रीव, बिभीषण व शत्रुघ्न यांच्यासह केवल आपल्या बाहुबळाने अकरा राज्यांचा अभिषेक केला. अंग, बंग, मत्स्य, शृंगवेरपूर, काशी, सिंधु, सौवीर, सौराष्ट्र, दक्षिणकोसल, किष्किंधा व लंका ही रामाची मित्रशक्ति होती. यावेळपावेतो आर्यांच्या इतिहासात रामापेक्षा श्रेष्ठव्यापक प्रभावशाली सार्वभौम सम्राट दुसरा कोणीही

झालेला नव्हता. रामराज्यात आर्यांचा प्रभाव संपूर्ण नृवंशावर पडला आणि आर्यांची जाती ही साऱ्या पृथ्वीतलावर श्रेष्ठजाती म्हणून स्विकारली गेली. गोदावरीच्या पलिकडे दक्षिणेपर्यंत आर्यांचे प्रबल राज्य प्रस्थापित झाले. पंपा, मलय, लंका आदि सुदूर दक्षिणेकडिल सर्व द्विपसमुहात रामनामाचे माहात्म्य व आर्यांचा प्रबल प्रभाव स्थापित झाला.

राम रावणाच्या या महायुध्दात जवळजवळ सर्व दैत्य-दानव-नागवंशी राजे व राजप्रतिनिधी रावणाच्या साहाय्यास आले होते. रावण लंकेच्या आजूबाजूस असलेल्या सप्तद्विपाचा अधिपति होता. आजची भौगोलीक परिस्थिती जरी बदललेली असली तरी आज आस्ट्रेलिया, जावा, सुमात्रा, मेडागास्कर, आफ्रिका इ. नावानी ते प्रसिध्द आहेत. अशा प्रबळ शत्रुला मारणे सहज गोष्ट नव्हती. तिमीरध्वज, शंबर आणि वर्चिन यांच्यानंतर रावणाचे निधन हे असे होते की, ज्यायोगे संपूर्ण अनार्यांचे बळ तुटले होते. त्यामुळे रामाचे नाव व यश या द्विपात प्रसारीत झाले आणि संपूर्ण मंडलात राम विख्यात झाले. लोक महीदेव व जगदीश्वर या रूपाने रावणाच्या ऐवजी रामाची पूजा करायला लागले. चम्पा, कम्बोडीया, थॉयलँड, बर्मा, मध्ये सुध्दा रामाचा प्रताप व्यापला. युरोपातील कोणत्याना कोणत्या जाती रामप्रभावीत प्राचिन जातीशी संबंधित आहे. अशा रीतीने युरोपातील प्रमुख देश इंग्लंड, स्पेन, स्विडन, नॉर्वे, स्कैण्डिनेविया ग्रीस, इटलीसुध्दा रामप्रभावाने प्रभावीत झाले. अशाप्रकारे आजच्या सर्व देशात या आर्यनेता विजेता मर्यादापुरुषोत्तम श्रीरामाचे कांहीना काही रूपाने सांस्कृतिक मिश्रण आहे. असे इतिहासावरून समजून येते.

एकदा काल पुरुष व दुर्वासमुनि श्रीरामाजवल आले. श्रीरामास वैकुंठास येण्याची सूचना देण्याकरिता काळास ब्रह्मदेवाने पाठविले होते. त्याने एकान्तात येऊन श्रीरामास सांगितले की तुमच्याशी कांही महत्वाची मंत्रणा करायची आहे म्हणून येथे एकांतात दुसरा कोणीही येता कामा नये. जर कोणी आत आला तर आपण त्याचा वध करावा. श्रीरामाने त्या प्रमाणे करण्याची प्रतिज्ञा केली व लक्ष्मणास बोलावून सांगितले कीं, 'तू द्वारावर उभा रहा. कोणासही मध्ये येऊ देऊ नकोस. जर कोणी मध्ये आला तर मी त्याचा वध करीन.' लक्ष्मणाने रामाची आज्ञा शिरोधार्य मानून द्वारावर उभा राहिला. एवढ्यात दुर्वास ऋषि तेथे आले. लक्ष्मणाने त्यांना प्रणाम करून दोन घडी प्रतिक्षा करण्यास सांगितले. दुर्वासांना क्रोध आला. ते म्हणाले, 'मला

आत जाऊ दे नाहीतर मी तुला भस्म करून टाकीन.' लक्ष्मण घाबरला तो त्यांच्या आगमनाची वार्ता सांगण्यास आत गेला. त्याला पाहताच काळ पुरुष उठला व रामास म्हणाला, 'रामा आपण आपली प्रतिज्ञा पूर्ण करावी. मी येतो.' असे म्हणून काळ निघून गेला. श्रीरामांनी दुर्वासांची भेट घेऊन त्यांचे अर्घ्यपाद्याने पूजन करून भोजन घालून संतुष्ट करून रवाना केले. नंतर लक्ष्मणाजवळ येऊन म्हणाले, 'लक्ष्मणा धर्म पालनात मोठे संकट आलेले आहे कारण प्रतिज्ञा पालनाकरिता तुझा वध करणे आवश्यक आहे. हे वीरा मी तुझा त्याग करतो हाच तुझा वध आहे. आता तू जेथे तुझी इच्छा असेल तेथे निघून जा.' काळाचा महिमा जाणून लक्ष्मण सरयू नदीच्या दक्षिण तीरावर ध्यानस्थ बसला व त्याच्या शरीरातून अत्यंत दैदिप्यमान तेजस्वी असा हजार फणाचा नाग निघून शरयूत विलीन झाला त्याच वेळी श्रीरामांनी सुध्दा स्नान संध्या तर्पण करण्याकरीता शरयूत बुडी मारली व त्या शरयुजलात विलीन होऊन गेले. अशा प्रकारे युगधर्माच्या प्राधान्यानुसार त्यांनी जलदाग घेऊन आपल्या कलेवराचा अंत करून अवतारी लिला संपविली. (श्लोक ५६८-५९०)

॥ इति श्रीराम अवतार समाप्त ॥

ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु।

# ॐ श्री कृष्ण अवतार



दैत्य कंस-दुर्योधनने मारवा, गीता सार समजाववा।
श्रीकृष्ण योगेश्वर थई आव्या सऊ भक्तोने उगारवा।।





॥ॐ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नमः॥

# अष्टम श्रीकृष्ण अवतार प्रारंभ

त्रेतायुग संपल्यावर सोमवार वद्य अमावस्येला म्हणजे सोमवती अमावस्येला द्वापारयुगाची सुरूवात झाली. त्रेतायुगात सद्गुरू वसिष्ठांनी दिग्दर्शित केलेल्या युगधर्मात कालपरिवर्तनाने बाह्यांग स्वरूप बदलवून वेदव्यासांनी नविन धर्माची स्थापना केली. अंतरंग स्वरूपाने व्यासांनी दर्शविलेला युगधर्म जरी सनातन होता तरी सामवेदाच्या प्राबल्याने त्याचे बाह्य स्वरूप परिवर्तीत झाले. त्यांनी संपूर्ण वेदांची घुसळण करून, अभ्यास करून, निकष काढून, नविन ज्ञानसाधनेचा मार्ग शोधला व त्याचा प्रसार करण्याचा प्राणपणाने प्रयत्न केला. त्या कार्यासाठी भगवंतांनी श्रीकृष्णांचा अवतार धारण करून सद्भक्त पांडवाकडून त्या धर्माचे आचरण करवून जगतात त्याचा प्रसार केलेला आहे. आणि या कार्याबरोबरच दुष्ट-दुर्जनाचे निर्दालन सुध्दां भगवान श्रीकृष्णांनी केलेले आहे.

श्रीरामाचा अवतार संपल्यानंतर बऱ्याच काळाने द्वापार युगाला सुरूवात झाली. अशा सुमारास या पृथ्वीवर मोठमोठे दैत्य माजून पुन्हा सर्वांना त्रास देऊ लागले. त्यात कंस, चाणूर, मुष्टिक, केशी, प्रलंब, शिशुपाल, वक्रदंत, जरासंध हे अत्यंत प्रबळ होऊन प्रजेचा छळ करू लागले. जरासंधाने बावीस हजार राजे आपल्या बंदीशाळेत आणून ठेविले. भौमसुराने चौदाही भुवनांच्या सुंदर स्त्रियांचा छळ चालविला. बाणासूर, कालयवन, यांच्या पापकर्माला पारावर उरला नाही. दुष्ट कौरवही अनीतीने वागून धर्माला किमंत देईनासे झाले त्यांनी लोकास त्रास देण्यास प्रारंभ केला. यज्ञयागादि कर्मांना प्रतिबंध करावा, ब्राह्मणांना छळावे, लोकांचा द्रव्यापहार करावा, स्त्रियांना भ्रष्ट करावे याप्रमाणे त्या राक्षसांनी जेव्हा उत्पात मांडला होता. तेव्हा सर्व लोक त्रस्त झाले. शेवटी पृथ्वी गाईचे रूप घेऊन ब्रह्मदेवाला शरण गेली. तिन मोठ्याने हंबरडा फोडून आक्रोश केला. इतक्यात थोर ऋषीही ब्रह्मदेवाजवळ आले. त्यांनी दैत्यांनी चालविलेल्या छळाचा वृत्तान्त निवेदन केला. देवांचा राजा इंद्रही सर्व देवगणासह पृथ्वीवर घडलेल्या पापांचे गाऱ्हाणे सांगण्यास ब्रह्मदेवाकडे आला तेव्हा ब्रह्मदेव सर्व देवासह क्षीरसागरी श्रीविष्णुकडे गेले व सर्वांनी हात जोडून भगवान शेषशाई आदिनारायणाच्या नावाने जयजयकार करून प्रार्थना करू लागले. ते म्हणाले, 'हे पुराणपुरूषा! आदिनारायणा! तुमच्या पदकमली आमचे शतशः प्रणाम असोत. हे दीनरक्षका! दीनानाथा! पृथ्वीवर दैत्यांने मोठा अनर्थ मांडला आहे आणि जरासंधाने सर्व धर्मनिष्ठ राजांना धरून आणून

आपल्या बंदीशाळेत ठेवले आहे. त्या दैत्यांनी धर्माचा मोठा उच्छेद चालविला आहे. त्यामुळे पृथ्वी अगदी गांजून गेली आहे. हे दयार्णवा यातून प्रजेची संकटे हरण करण्यास तूच एक समर्थ आहेस.' अशी प्रार्थना करून सर्व जण तटस्थ होऊन पाहू लागले. तो क्षीरसागरातून आकाशवाणी ऐकू आली की 'देवहो तुम्ही भिऊ नका. मी लवकरच यादवकुळात जन्म घेऊन सर्व दुष्टांचा नाश करीन. तुम्ही सर्व देवांनीही यादवी कुळात जन्म घ्यावा आणि उपदेवांनी गोपाळांच्या जन्मास यावे. त्याचप्रमाणे शेषांनी बलरामाच्या जन्मास यावे कारण राम अवतारात त्यांना चौदा वर्षे उपवास सहन करावा लागला. तसेच अत्यंत कष्ट उचलावे लागले. पण या जन्मी मी त्याचा धाकटा भाऊ होऊन त्याची सेवा चाकरी करीन. यम, वायू, इंद्र आणि अश्विनीकुमार यांनी कुंती-माद्रीच्या उदरी जन्म घ्यावा. बृहस्पतीने द्रोण होऊन पांडवांना विद्या शिकवावी मी वसुदेवाची पत्नि देवकी तिच्या पोटी जन्म घेईन!' ही आकाशवाणी ऐकून सर्वांनी नमस्कार करून भगवंताचा जयजयकार करू लागले. सर्वांना आनंद झाला व आपआपल्या स्थानी निघून गेले.

भगवंताने ब्रह्मदेवाला या प्रमाणे सांगितल्यावर सर्व देवासह ब्रह्मदेव तेथून निघाला व सर्वांनी पृथ्वीवर मथुरा, वृदावन, गोकुळ वगैरे ठिकाणच्या सच्चरित्रसंपन्न लोकांच्या घरी जन्म घेतले. इकडे भगवान शेषाला म्हणाले, 'शेषा, तुजवर माझा फार लोभ आहे. पृथ्वीवर जाऊन वसुदेव-रोहिणीचे उदरी जन्म घेऊन नंद व यशोदेच्या घरी जाऊन राहा. यावेळी तू माझा वडिलबंधु हो मीही लवकरच वसुदेव-देवकीचे उदरी जन्म घेईल व तुझ्याच सहवासाला येऊन राहिन.' भगवंताचे वचन ऐकून शेष म्हणाला, 'हे प्रभो, त्या वसुदेवाच्या घरी तू जन्म घेणार आहेस तेव्हा त्याची काय योग्यता आहे?' शेषाने अशी शंका घेतल्यावर भगवान म्हणाले, 'शेषा, स्वयंभू नावाचा मनू सुतपा या नावाने ब्राह्मणवंशात जन्मला. त्याची स्त्री प्रौणी या नावाची होती. त्यांच्या सहस्त्र वर्षाच्या तपानंतर मी त्यांच्यावर प्रसन्न होऊन त्यांच्या उदरी तीन वेळा जन्म घेण्याचे कबूल केले होते. पूर्वी कश्यप आणि अदिती हीच ती सुतपा आणि प्रौणी होय. त्यांच्यापासून मी वामन अवतार धारण केला. नंतर जमदग्नी व रेणुका हीच कश्यप व अदिती असून त्यांच्या उदरी मी परशुराम अवतार घेतला. आता सांप्रत वसुदेव व देवकी हीच ती कश्यप-अदिती असून त्यांचे उदरी मी आता कृष्ण अवतार घेणार आहे. तसेच ज्या नंद यशोदेच्या घरी आपणाला राहायचे आहे ते पूर्वीचे द्रोण व प्रणिता या नावाचे महान तपस्वी ब्राह्मण असून पुत्रप्राप्ती

करिता अनंत वर्षे त्यांनी माझे तप केले म्हणून त्यांचे घरी पुत्ररूपाने राहाण्याचे आश्वासन मी त्यांना दिले आहे. तो द्रोण व प्रणिता हेच नंद व यशोदा होत. त्यांना दिलेले वचन यावेळी मी पूर्ण करीन. '

गोकुळातील शूरसेन यादवास वसुदेव नावाचा मुलगा झाला. तो सोमवंशीय राजा होता. वसुदेवाच्या उदरी भगवंताचा अवतार होणार हे देवांना माहीत असल्याने त्याच्या जन्माचे वेळी देवांनी आनंदीत होऊन दुंदुभी वाजविल्या. तो फार स्वरूपवान तेजःपुंज व पुण्यवान होता. गोकुळातील रोहिणीशी त्याचा प्रथम विवाह झाला. त्याचा दुसरा विवाह मथुरेचा राजा उग्रसेन याची लावण्यवती कन्या देवकी हिच्या बरोबर ठरला. तेव्हा मोठ्या तयारीनिशी शूरसेनाने वसुदेवास विवाहास आणले. उग्रसेनाचा पुत्र कंस हा मोठा दुष्ट राक्षसी वृत्तीची होता. तो आपल्या आईबापाचा द्वेष करी. बापास बाजूस सारून तो स्वतःच मथूरेचे राज्य करू लागला होता. उग्रसेनाने देवकीचे लग्न मोठ्या थाटाने करून दिले. आपला मेहुणा गुणवान, सुंदर, आपल्या बहिणीस अनुरूप आहे हे पाहून कंसाने दोघाची वरात मोठ्या आनंदाने उत्साहाने काढली. उभयतांना एका रथात बसवून तो स्वतः रथ हाकू लागला. सर्वजण मिरवणूकीच्या आनंदात निमग्न होते तोच आकाशवाणी झाली की, 'हे कंसा, या देवकीच्या उदरी जो आठवा गर्भ येईल त्यापासून तुझा प्राणनाश होईल' ती विलक्षण आकाशवाणी ऐकून सर्वजण चकित झाले. कंसाला अत्यंत संताप आला. जिच्या पोटी आठवा गर्भ येऊन आपला नाश होणार त्यापेक्षा बहिण देवकीलाच मारून टाकावे. त्याने म्यानातून तलवार काढली व एकदम देवकीच्या मानेवर धरली. तेव्हा वसुदेव त्याची विनवणी करू लागला, 'हे कंसा, निष्पाप देवकीचा निष्कारण वध करून तुला काय फायदा आहे' शरीर हे पंचभूतांचे असून आत्मा अविनाशी आहे. तू हिला मारशिल तर ती अन्यठिकाणी जन्म घेईल व तेथे हिला संतती होईल. जे प्राक्तनाणीत लिहिलेले असेत ते कधीहि टळायचे नाही. तेव्हा निष्कारण आपल्या बहिणीला मारून पाप व अपकीर्ती का जोडून घेतोस?' वसुदेवाने याप्रमाणे कंसाची पुष्कळ विनंती केली. पण त्याला स्वतःच्या प्राणाचा मोह अधिक असल्याने त्याच्या विनंतीकडे तो मुळीच लक्ष देईना. तेव्हा वसुदेव म्हणाला, 'कंसा , हिला तू मारू नको हिच्या पोटी जो आठवा गर्भ उत्पन्न होईल त्याचा तू नाश कर. ते आठवे मूल जन्मताच मी तुझ्या स्वाधीन करीन.' वसुदेवाने सांगितलेली गोष्ट कंसाला पसंत पडली पण विश्वास नसल्यामुळे त्याने त्या उभयतांना बंदीगृहात ठेवले.

काही दिवसांनी नारदमुनींची स्वारी कंसाकडे आली. कंसान नारदास सर्व हकिकत सांगून पुढे कशी तजवीन करावी म्हणून प्रश्न केला. तेव्हा नारदमुनि म्हणाले, 'कंसा तू ही व्यवस्था केली आहे ती बरी आहे. पण आठवा गर्भ कोणता हे ठरविणे कठिण आहे. कारण उलट मोजल्यास पहिलाही आठवा येतो. कदाचित दुसराही आठवा येईल. सारांश आठवा गर्भ कोणता हे समजावयाला मार्ग नाही तर तू असे कर की या वसुदेव-देवकीच्या उदरी जी मुले होतील ती सर्व मारून टाक आठ गर्भांचा संहार केल्यावर मग त्यांना सोडून दे म्हणजे तू संकटातून मुक्त होशील. नाही तर कोणत्या गर्भाकडून तुझा नाश होईल हे काही सांगता येत नाही.' याप्रमाणे सांगून नारद तेथून गेल्यावर देवकीला कांही दिवसांनी एक सुंदर मुलगा झाला. तुरूंगावरील पहारेकऱ्यांनी तो प्रकार तात्काळ कंसाला जाऊन कळविला. त्याबरोबर कंस तुरूंगात आला व त्याने देवकीच्या मांडीवरून ते सुंदर बालक हिसकावून घेऊन बाहेर दगडावर जोराने आपटले. त्याबरोबर ते मुल शतखंड होऊन त्याचे पंचप्राण पंचभूतात मिळाले. त्या दुःखद प्रसंगाने वसुदेव-देवकी अत्यंत शोकाकुल झाली. परंतु काही उपाय नसल्यामुळे बिचारे निमुटपणे तुरूंगात आयुष्याचे दिवस कंठित होते. त्यानंतर देवकीला दुसरा मुलगा झाला. तोही कंसाने मारला. याप्रमाणे कंसाने देवकीचे सहा पुत्र मारले. या सहा मुलांच्या वधामुळे कंसाने तप करून जो काही थोडाफार पुण्यसंचय केला होता तो सर्व नाहीसा होऊन त्याच्या मस्तकावर भृणहत्येचा पापाचा डोंगर तयार झाला.

कंसाने ज्या सहा मुलांचा नाश केला ते पूर्वी मरिचीचे बंधु होते. ब्रह्मदेव सरस्वतीचा अभिलाष धरून जेव्हा कामातूर झाला त्याप्रसंगी मरिचीचे बंधु ब्रह्मदेवाला पाहून हसले होते, म्हणून ब्रह्मदेवांनी त्यांना असा शाप दिला होता की, 'तुम्हाला मृत्यूलोकी जन्म घेऊन दुःख भोगावे लागले.' याप्रमाणे ब्रह्मदेवाने शाप दिल्यावर ते नारदाला शरण गेले व आमची ही अधःपतन अवस्था चुकव म्हणून विनवू लागले. तेव्हा नारदाने त्यांना अभय दिले व तुम्ही पृथ्वीवर जन्म घेतल्यावर मी तुमची ताबडतोब सुटका करीत जाईन असे सांगितले. त्या मरिची बंधुंना तसा सल्ला दिल्यावर इकडे कंसाला त्याने तसे करण्यास सुचवून त्या सहा मुलांचा नाश करविला. त्यानंतर भगवान विष्णुंनी शेषाला देवकीच्या उदरी जन्म घेण्यास सांगितले. त्याप्रमाणे शेषाने देवकीच्या उदरी गर्भ धारण केल्यावर विष्णु मायेला म्हणाले, 'हे माये, तू देवकीकडे जाऊन तिच्या उदरातील गर्भ गोकुळात असलेल्या रोहिणीच्या उदरात नेऊन घाल

आणि तु यशोदेच्या उदरी प्रवेश करून राहा.' आज्ञेप्रमाणे मायेने देवकीच्या उदरातील सातवा गर्भ कोणाला नकळत काढला व नंदाचे घरी रोहिणी निद्रिस्त असतांना तिचे उदरात नेऊन ठेविला आणि आपण स्वत: यशोदेच्या उदरी प्रवेश करून राहिली. याप्रमाणे मायेने व्यवस्था केल्यावर देवकी जागी होवून पहाते तो उदरात गर्भ नाही. गर्भ नाहीसा झालेला पाहून देवकी व वसुदेव दोघेही शोकाकुल झाली. इकडे राहिणी जागे होऊन पाहू लागली तो तिचे पोट मोठे दिसू लागले व आपण गरोदर आहे असे तिला कळून आले. एकाएकी मी कशी गरोदर झाली हे माहित नसल्याने ती फार भयभीत झाली. इकडे कंस देवकी अद्याप कशी प्रसुत होत नाही या चिंतेते होता तो त्याला सातवा गर्भ नाहीसा झाल्याचे समलजे. थोडे दिवस गेल्यावर देवकी पुन्हा गरोदर झाली. भगवंतांनी लक्ष्मीस विदर्भ देशाचा भीमक राजा त्याच्या राणीच्या उदरी जन्म घेण्याची आज्ञा करून स्वत: देवकीच्या गर्भात प्रवेश केला. (श्लोक १-१४)

देवकीच्या उदरात यावेळेला श्रीहरीनेच प्रवेश केला होता, यामुळे ती अत्यंत दिव्य व उल्हसीत दिसू लागली. वसुदेवाची स्थितीही तशीच आनंददायक होती. आनंदभरामुळे देवकीला गर्भावस्थेचे दु:ख मुळी न होता ते नऊ महिने केव्हाच संपून गेले. योग्य समय प्राप्त होताच श्रावण वद्य अष्टमी बुधवारी मध्यरात्री प्रभुने जन्म घेतला. त्यावेळी रोहिणी नक्षत्र असून पाऊस सारखा पडत होता. देवकी व वसुदेव या दोघांना निद्रा लागलेली होती. दोघेही निद्रीस्त आहेत असे पाहून प्रभुंनी देवकीच्या उदरातून बाहेर प्रवेश केला व नंतर देवकीला जागे केले. प्रभुची ती बालमूर्ति पाहून देवीकीला अत्यानंद झाला व तिने आपल्या पतिला जागे केले. वसुदेव जागा होऊन पहातो तौ पुढे प्रभूची सुंदरश्यामल बाल मूर्ति उभी आहे. सर्वांग सुंदर मूर्ति पाहून दोघेही आनंदाने तन्मय झाले पण मागील सहा मुलाच्या दु:खाचे स्मरण होऊन ते खिन्न झाले तेव्हा ती बालमूर्ति म्हणाली, 'गोकुळामध्ये नन्दाचे घरी यशोदेच्या उदरी योगमायेने आताच जन्म घेतला आहे. तेव्हा तुम्हाला माझे संबंधाने काळजी करण्याचे काराण नाही. वसुदेवा! तू मला यशोदेच्या घरी नेऊन ठेव व यशोदेच्या त्या मुलीला तू येथे घेऊन ये. हे वसुदेवा! तू पूर्वजन्मीचा सुतपा ब्राह्मण आहेस. तुझ्या उदरी मी श्रीकृष्ण अवतार घेऊन तुझ्या ऋणातून मी मुक्त झालो आहे. तुला आता मोक्षाची प्राप्ति होईल. तुम्हा उभयतांना माझे लालन पालन करण्याची इच्छा आहे हे मला माहित आहे म्हणून मी गोकुळात क्रिडा करून लवकरच तुम्हाकडे येईन.

श्रीकृष्णाने वसुदेव-देवकीला पुढील व्यवस्था सांगून आपले खरे रूप टाकून बालरूप धारण केले. नंतर देवकीने त्याला पोटाशी धरून त्याचे चुंबन घेतले व जवळ असलेल्या फडक्याने त्याचा देह आच्छादन करून ते मूल तिने वसुदेवाजवळ दिले व आदिमाता जी अंबिका तिची अत्यंत करूणा भाकली. वसुदेवाने त्या बालकास एका दुरडीत घालन ती डोक्यावीर घेतली व तो जाऊ लागला. दरवाजे भक्कम होती व त्याला मोठमोठी कुलुपे लाविली होती पण त्याचा स्पर्श होताच कुलूपे व दरवाजे आपोआप उघडले गेले. पहारेकरीही स्वस्थ घोरत पडलेले होते. त्यामुळे वसुदेवाला रस्त्याला लागेपर्यंत कोणी अडविले नाही. बाहेर घनदाट अंध:कार मुसळधार पाऊस पडत होता. अशा स्थितीत मार्ग काढायचा अत्यंत कठिण, शिवाय कंसाची भिती. कसातरी तो घाई घाईने मार्ग क्रमीत होता. तो यमुनातीरी येऊन पाहोचला. कृष्ण पाण्याने भिजू नये म्हणून शेष त्याच्या मागोमाग फणा पसरून चालत होता. वसुदेवाला त्याचे भानही नव्हते. पावसाळ्याचे दिवस, मुसळधार पाऊस म्हणून यमुनानदी पुराने दुथडी भरून वाहोत होती. तशा स्थितीत वासुदेव कृष्णास मस्तकावर घेऊन पाण्यात शिरला त्यावेळी कृष्णाच्या स्पर्शाकरिता यमुनेचे पाणी वाढू लागले. तेव्हा कृष्णाने आपला एक पाय बाहेर काढून पाण्यास स्पर्श केला. त्याबरोबर मार्गाचे ठिकाणी यमुना दुभंग झाली व वसुदेव कृष्णाला घेऊन पुढे गेला. त्यावेळी गोकुळातील नंदाच्या घराचा दरवाजा उघडला होता. वसुदेव कृष्णाला घेऊन नि:शंकपणे नंदाच्या घरात शिरला व जेथे यशोदा निजली होती त्या खोलीत गेला. पाहाते तो पलंगावर यशोदा निद्रिस्त असून ती नुकतीच प्रसुत झाल्यामुळे जवीळ योगमाया खेळत होती. वसुदेवाने कृष्णाला तेथे ठेवले व योगमायेला घेऊन तो तसाच परत आपल्या तुरुंगात येऊन दाखल झाला. तो तुरुंगात दाखल होताच दरवाजा पूर्वीप्रमाणे बंद झाला व त्या पहारेकऱ्याची निंद्रा दूर होऊन तेही हुषारीने पहारा करू लागले. तोच योगमाया मोठमोठ्याने रडू लागली. देवकी बाळंतीण झाली हे वर्तमान दूतांनी कंसाला कळविले. कंस तात्काळ उत्कंठतेने तुरुंगात आला पाहातो तो देवकीच्या मांडीवर मुलगा नसून कन्या आहे. तेव्हा क्षणमात्र त्याच्या मनाची चलबिचलता झाली. परंतु कन्येची उत्पत्ति आठव्या गर्भापासून आहे. तेव्हा हिचा नाश आपल्याला केलाच पाहिजे असा विचार करून त्याने ती मुलगी देवकीच्या मांडीवरून ओढून घेतली व तो तिला पाय धरून दगडावर आपटण्यासाठी गरगर फिरवू लागला. इतक्यात योगमाया हातातून निसटली व आकाशात निघून गेली. ती आकाशात जाता जाता कंसाला म्हणाली,

'अरे दुष्टा, पाप्या कंसा! या बालहत्येच्या पापामुळे तुया पापाचा घडा पुरा भरला आहे. आता तुझा नाश होण्याला मुळीच अवकाश लागणार नाही. तू आपल्या बहिणीच्या वंशच्छेदनाचा प्रयत्न केलास, पण तुझ्या या कृत्याने तुझ्याच वंशाचा नाश होईल. जो आपल्यं आई-बापाचा अपमान छळ करतो, जो गुरुचा द्रोह करतो, श्वसुर वा जामात यांना त्रास देतो; बहिणीचा छळ करतो तो निश्चयाने नरकाचा अधिकारी होतो. तू आपल्या बहिणीचा व मेहुण्याचा छळ करून आपल्या मस्तकावर पापाचा पर्वत तयार करून घेतला आहेस. त्याचे फळ तुला लवकरच मिळेल. तुझा शत्रु सुखाने नांदत असून त्याच्या हाताने तुझा लवकरच नाश होईल.' याप्रमाणे त्या योगमायेने गर्जना केली व ती विजेप्रमाणे आकाशात लुप्त झाली. योगमायेची वाणी ऐकून कंस चिंताग्रस्त झाला. ( श्लोक १५-३२ )

गोकुळात कृष्ण आल्यावर तो यशोदेच्या कुशीत शिरला. कांही वेळाने यशोदा जागी होऊन पाहाते तो आपल्या कुशीत सुंदर बालक झोपले आहे. त्याला पाहाताच ती उठून बसली व त्या बालकाला मांडीवर घेऊन न्याहाळले. त्या बालकास कोठे ठेवू आणि कोठे नाही असे तिला झाले. ते मनोहर रूप ती डोळ्यात साठवू लागली. इतक्यात बाळ जागे झाले. त्याने यशोदेकडे पाहुन हास्य केले. यशोदेला मुलगा झाल्याची बातमी गोकुळात परसरली. सर्वत्र आनंदी आनंद झाला. रोहिणी व सर्व गौळणी तिला व कृष्णाला पाहण्यासाठी नंदाच्या वाड्यात आल्या. घरात दाटी झाली. म्हणून नंदाने त्यांना बसण्यासाठी मंडप उभारले त्या मंडपात नानातऱ्हेची वाद्ये वाजू लागली. प्रत्यक्ष श्रीहरीचाच अवतार नंदाच्या घरी झालेला मग तेथील वातावरण प्रफुल्ल झालेले-आनंदाने भरलेले असल्यास नवल ते काय! ते कौतुक पाहण्यासाठी देवांचीही आकाशात दाटी झाली. सर्वांनी नंद-यशोदेचे व बालकृष्णाचा गौरव केला. नंदाचे कुलउपाध्याय गर्गमुनि बालकास पाहण्यास व त्याचे जातक वर्तविण्यास सर्वांचे आधी धावत आले. ज्या दिवशी कृष्णाचा जन्म झाला त्या दिवशी गोकुळात पर्जन्यवृष्टी तर मथुरेत रक्तवृष्टी झाली. सुचिन्हे गोकुळात तर दुश्चिन्हे मथुरेत झाली.

नन्द स्नान करून व गर्गमुनी इतर ब्राह्मणासह यशोदेच्या मंदिरात गेला तेथे पुण्याहवाचन करून कृष्णाच्या मुखात त्याने मध घातला. कृष्णाचे मुखावलोकन करताच नन्दाला अवर्णनीय आनंद झाला व आपले अनंत जन्मांचे पुण्य फळास आले असे त्याला वाटले. पुत्रजन्माप्रित्यर्थ त्याने दोन लक्ष गायी नानाप्रकारची रत्ने, पुष्कळ

अलंकार व वस्त्रे दान केली. गौळ्यांनी नंद राजाची पूजा करून अहेर अर्पण केले. तर यशोदेला गौळणींनी अक्षय्यवाणे देऊन तिला धन्यवाद देऊन जयजयकार केला. बाळाला पाहताच गौळणींनी त्याचे कौतुक केले. ज्या मंदिरात गोपाळकृष्णाचा जन्म झाला ते मंदिर सजविण्यात आले. त्याच्या भींती केशरकस्तुरींनी सारवल्या. वर सुंदर चांदवे लावले. सभोवार मोत्यांच्या झालरी सोडल्या. मध्यभागी सुंदर रत्नजडीत मंचक ठेऊन यशोदा कृष्णास घेऊन त्यावर बसली. दोन गौळणींनी त्याच्यावर श्वेत चामरे ढाळली.

ठरलेल्या वेळी गर्गमुनि इतर पंडितासह बालकाची लक्षणे व जन्मपत्रिका पाहण्यासाठी आले. त्याचा हात व जन्मकाळची वेळ पाहून गर्गमुनि म्हणाले, 'यशोदे, तुझे भाग्य थोर आहे. प्रत्यक्ष श्रीहरी तुझ्या उदरी आला आहे. तो आपली किर्ती त्रैलोक्यभर करील. तो सज्जनास सुखदाई व दुर्जनास दुःखदायक होणार आहे. या मुलावर नानातऱ्हेची संकटे येणार आहेत. पण त्या सर्वांतून हा सुखरूप बाहेर पडेल, लहान पणीच याला मारण्यास एक कपटी स्त्री येईल. एक दैत्य वायुचे रूप घेऊन येईल, त्यांचा हा संहार करील. दोन प्रचंड वृक्ष याच्यावर मोडून पडतील. पण त्याला त्यापासून काहीही इजा होणार नाही. हा विषारी सर्पाचे दमन करील, पर्वत उचलून गोकुळाचे रक्षण करील. एकवेळ दावानलच पिऊन टाकील. गुरुचा मेलेला पुत्र सजीव करून गुरुस संतोषीत करील. सवंगड्याना दुध दही खाण्यास देईल. गौळणींना मोह पाडून आपल्या छंदी लावील. कंसाला याचे हातून मृत्यू आहे. समुद्रात अद्भूत नगरी बांधील. अनेक स्त्रियांशी लग्न करील. संतति, संपत्ति, ऐश्वर्य, यशदायक किर्तीवान होईल. सर्व गोकुळ उध्दरून नेईल. भक्तांचा कैवार घेऊन पृथ्वीचा भार उतरविल. ज्ञानाचा सर्वत्र प्रसार करील.' अशा प्रकारे याचे भाग्य फार मोठे आहे.

हे जातक ऐकून सर्वांना आनंद झाला. गोकुळात घरोघर मंगल उत्सव होऊ लागले. पण मथुरेत याच्या उलट सर्व दुश्चिन्हे दिसू लागली. कन्या निसटून गगनात शिरली व त्या दिवसापासून कंसाचे मन धाकाने व्यापून गेले. त्याला ध्यानी मनी स्वप्नी देवकीचा आठवा गर्भस्थ बालक दिसू लागला. एकदा राज्यसभेत जात असता त्याच्या मस्तकावरील मुकूटच खाली पडला. त्याला वाईट स्वप्ने पडू लागली. छत्राचा दांडा मोडून खाली पडला. हे सर्व जाणून कंस मनात फार घाबरला. शेवटी त्याने राजसभा भरवून महाबलाढ्य असुरसभेस बोलाविले व सांगितले, 'जसे राजाने प्रजेस सुखी ठेवण्यासच झटावे. तसेच प्रजेने राजास सुखी ठेवण्यास झटावे. मला तर

आकाशवाणीचा ध्यास लागला आहे. जो कोणी खरा स्वामीभक्त असेल त्याने गोकुळात जाऊन माझा वैरी शोधून त्यास जीवे मारावे, माझे हे संकट जो निवारील त्याचे माझ्यावर अत्यंत उपकार होतील. त्याला तो मागेल ते बक्षिस देईन.' कंसाचे निवेदन ऐकून एक महाबलाढ्य महाबळ नामक दैत्य उठून त्याने कंसास आश्वासन देऊन सांगितले कीं, 'कंसमहाराज, आपल्या शत्रूचा शोध लावून त्याचा नि:पात करण्याची मी पैज मारतो. गोकुळात तुमचा शत्रू कोणत्या ठिकाणी आहे ते शोधून त्याचा नाश करण्याची मी प्रतिज्ञा करतो.' महाबळाने गोकुळात येऊन एका ज्योतिषी ब्राह्मणाचे रूप घेतले व घरोघर भटकून शेवटी नंदाच्या घरी आला. त्या ठिकाणी गर्गमुनि हे बालकृष्णाचे जातक सांगत होते. तेव्हा तो म्हणाला, 'या मुलाचे ग्रह कांही ठिकाणी उलटे सुलटे झाले आहेत. यामुळे हा चोर, शिंदळ होईल, कपटी होईल, सगळ्या गोकुळातल्या स्त्रिया हा भ्रष्ट करील. नानातऱ्हेची कृष्णकृत्ये याचे हातून होतील. शेवटी हा मुलगा स्वकुळघातक होऊन सर्वांचा संहार करील. यासाठी या मुलास मनात दया न आणता खडड्यात पूरा, अगर समुद्रात टाका नाहीतर अन्यमार्गे याचा संहार करावा, न केला तर हे पोर पुढे सर्वांस घातक होईल.' महाबळ भटाच्या मुखातून पूरा, तुडवा, संहार करा अशी अक्षरे निघताच घरातल्या सर्व निर्जिव वस्तू सजीव झाल्या व लाटणे-पाट, पाटे-वरवंटे वगैरे सर्व वस्तू त्याच्या अंगावर पडू लागल्या. त्याच्या सर्वांगावर फटाफट त्यांचा मार बसू लागला. भांडी, मडकी, यांचे भडाभड प्रहार त्याच्या अंगावर होऊन आतडी तुटू लागली. ताम्हणे येऊन तोंडात मारू लागली. सूया, दाभणे त्याच्या अंगास टोचू लागली,. त्यांचा मारा चुकविण्यासाठी तो उठून पळू लागला. तोच बाज पुढे येऊन त्याला अडवू लागली. कुदळ, फावडे, कुऱ्हाडी, मुसळे वगैरे येऊन त्यांचा मार त्याला बसू लागला. शेवटी कृष्णाकडे पाहून त्याने कृष्णस्तुति केली. तेव्हा कृष्णाने त्याला जिवंत सोडले. कंसापुढे उभा राहून तो म्हणाला, 'महाराज, आपला वैरी गोकुळात वाढत आहे. त्याची शक्ति अभ्दुत आहे. निर्जीव वस्तू सजीव होऊन त्यांनी मला भयंकर मार दिला. ही कांही मानवीकृति नाही. प्रत्यक्ष परमेश्वर त्या ठिकाणी अवतरला आहे त्याची ही साक्ष आहे. मथुरापते तुमचा शत्रु गोकुळात वाढत आहे. तो बाळ असला तरी तो कृतांताला आवरणार नाही. मला तर असे वाटते कीं, आपले मरण जवळ आले आहे. महाबळाचे मुखातून हे शब्द ऐकताच कंसाचे छातीत धस्स झाले. तो अतिशय चिंतेत पडला. (श्लोक ३३-४४)

महाबळाची फजिती ऐकून कंसाला फार चिंता पडली. काय करावे असा एकसारखा विचार करीत असाताच पूतना तिथे आली व म्हणाली, 'कंसराया मी सुंदर स्त्री रूप घेऊन स्तने विषाने भरून गोकुळात जाते आणि तेथील कृष्णासह सर्वी मुलांना पाजून ठार मारते. तुम्ही काळजी सोडा.' पूतनेचे हे भाषण ऐकून कंसाला परमसंतोष झाला आणि त्याने वस्त्राभूषणे देऊन तिचा गौरव केला व निरोप दिला. पूतनेने लगेच अत्यंत सुंदर स्त्रीचे रूप घेतले. नेत्रात काजळ घातले. अंगावर नानाप्रकारचे अलंकार घातले. पायात पैंजण घातले. ती दुसरी रंभाच दिसू लागली. ती मथुरेतून बाहेर आली. ती नानाप्रकारच्या निमित्ताने लोकांच्या घरात शिरून त्या घरातील बालकांचे प्राण घेत चालली. पुढे ही पूतना नंदाच्या घरात शिरली. तिचे लावण्य पाहताच कोणीतरी स्वर्गीची देवांगना असेल असे समजून यशोदेंने तिचा चांगला आदरसत्कार केला. ही आपल्या मुलास टोपी, करदोळा व पाळणा घेऊन पाहण्यास आली असे पाहून यशोदेस आनंद झाला. पूतना कृष्णाच्या पाळण्याजवळ गेली पाळण्यात खेळत असलेले ते सुंदर बालक पाहून म्हणाली, 'यशोदाबाई आम्ही स्वर्गात राहणारे व आपला पुत्र परब्रह्म अवतार तोही आमच्यामधीलच. तेव्हा आमची जुनी ओळख आहे.' नंतर कृष्णाकडे पाहून म्हणाली, 'अरे लबाडा तू आम्हाला सोडून इकडे पळून आलास! बाळा ओळख विसरलास काय? ये इकडे ये माझ्याकडे, खांद्यावर एकदा तुला खेळवू दे. तुझा विरह मला अगदी असहय्य झाला. केव्हा तुला हृदयांशी धरावे असे मला झाले आहे. असे ती म्हणत आहे तोच कृष्णाने तिच्याकडे पाहून हास्यवदन केले आणि आपल्या आईच्या कडेवरून तिच्याकडे झेप घेतली. तेव्हा यशोदेने तिच्याजवळ कृष्णास दिले. तिने त्याला मांडीवर घेऊन टोपी करदोळा घातला व आपला पदर काढीत आहे. तोच कृष्णाने तिची चोळी फाडून तिच्या स्तनास मुख लाविले. वज्रमिठी मारून विष शोषण्यास आरंभ केला.

कृष्णाने तिच्या स्तनातील सर्व विष शोषून घेतले. स्तनातील सर्व दुध ही संपले. आता रक्त शोषण्यास आरंभ केला. आता तिचे अंग कापू लागले. तेव्हा अंगास आळेपिळे देऊन तोंड वेडेवाकडे करून ती त्यास सोडवू लागली. परंतु तो सुटतो कसला! कित्येक गौळणींनी त्यास सोडविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांचा प्रयत्न व्यर्थ गेला. तेव्हा पुतना म्हणाली, 'सावळ्या, नको रे जास्त ओढू. सोड सोड मला.' खरोखर माझा जीव आता कासावीस होऊ लागला. मी तुझ्या गोकुळात आता केव्हाही येणार नाही.' अशी ती कृष्णास आळवू लागली. ती अत्यंत व्याकूळ

झाली. ती मूर्च्छित पडली व गतप्राण होऊन जमिनीवर पडली. कृष्ण तिच्या वक्षस्थळावर तिचा स्तन मुखात धरून खेळत होता. गवळ्यांनी कृष्णास उचलून घेतले व यशोदेजवळ दिले. तेव्हा तिच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या. तिने त्याला हृदयाशी धरले. (श्लोक ४३-६६)

पूतनेस मारल्याची हकिकत ऐकून कंस तर फारच घाबरला. त्याचे चित्त जाग्यावर राहिले नाही. तो ज्याला त्याला टाकून बोली. अंगावर धावत असे. कृष्णाला कशारीतीने मारावे याची तो सतत चिंता करू लागला. एके दिवशी कृष्ण उपडा होऊन रांगू लागला. म्हणून नंदाने त्याबद्दल मोठा उत्सव केला व दानधर्म केला. कृष्ण आता रांगू लागला हे शकटासुराने पाहिले. तो कंसाच्या आज्ञेवरून कृष्णवधाची संधी पाहात होता. कृष्ण अंगणात खेळत आहे ही संधी साधून तो दुष्ट गाड्याच्या रूपाने कृष्णाच्या चुराडा करण्यासाठी त्याच्या अंगावर धावला. तो समोरून येत असता कृष्णाने पाहिले व सहज त्याला एक लाथ मारली त्याबरोबर त्या प्रचंड गाड्याचा चूरा झाला. भगवंताच्या चरणस्पर्शाने तो दैत्य उध्दरून गेला.

आता बालकृष्ण नि बलराम अंगणात जोडीने खेळू लागले. त्यांच्या बाललीला पाहून सर्वांचे मन हरखून जाई व सर्वजण त्यांना उचलून घेऊन कौतुक करीत व खेळवू लागत. त्यांचे ते दुडदुडू चालणे, हळूहळू बोबडे बोल ऐकून सर्वांना आनंद होई. ते सुध्दां त्यांच्यात भागीदार होत. असा आनंद सर्वांना कृष्ण सहवासात गवळी, गौळणी, नन्द-यशोदा-रोहिणी यांना मिळू लागला. नन्दवाड्यात नन्दनवन फुलले.

एकदा कृष्ण अंगणात खेळत होता. तोच कंसाकडून प्रतिज्ञा करून तृणावर्त राक्षस वाऱ्याच्या रूपाने गोकुळावर आला. वारा भयंकर सुटला. गोकुळ आता वाऱ्यासरसे आकाशात उडून जाते की काय, सर्व घरे पडून जातात की काय असे सर्वांस वाटले. त्यावेळी सर्वांनी आपापली दारे लावली. यशोदा कृष्णास अंगणातून आणण्यासाठी बाहेर आली. तो तृणावर्ताने कृष्णास वरच्यावर उडविले. धुळीचा एकच लोट सर्व ठिकाणी उडाला. कोणी कोणास दिसेना. मोठमोठे वृक्ष घरावर आदळून मोडून पडले. जिकडे तिकडे हलकल्लोळ झाला. त्या धुमश्चकीत कृष्णाने विराटस्वरूप घेऊन तृणावर्ताची मान मोडून टाकली व त्याचा वध करून कृष्ण अंगणात आपले मुळचे बालरूप घेऊन आला. लोक सावध झाले. त्यावेळी कृष्ण अंगणात खेळत असलेला दिसला. सर्वांस आश्चर्य वाटले. यशोदेने त्याला हृदयाशी धरले. मथुरेत तृणावर्त मेल्याचे कंसास कळल्यावर तो भयाने व्याकुळ झाला.

एके दिवशी यशोदा कृष्णास मांडीवर घेऊन बसली असतां तिने कृष्णाच्या सुकुमार मुलावरील केस बाजूला सारले. त्याचे मुख कुरवाळले. हे रत्न पूर्वपुण्याईने आपणास लाभले असा विचार तिच्या मनात आला. ती पुन्हा कृष्णमुखाकडे पाहू लागली. इतक्यात कृष्णाने जांभई दिली तोच त्याच्या तोंडात सप्तपाताळ, सप्तसागर, ब्रह्मा, विष्णु, महेश्वर आदिकरून तेहतीस कोटी देव तिला दिसले. तसेच बलरामकृष्ण हे कंसचाणूर यास त्यांच्या सिंहासनावर चढून मारीत आहेत असे पाहून ती तटस्थ झाली. क्षणिक असे कौतुक दाखवून तिच्यावर मायाजाळ टाकून तो स्तनपान करू लागला. तो तिच्या मनातील सर्व भावतरंग निघून गेला. नंतर तिने त्याचा मुका घेऊन तोंड कुरवाळले. ( श्लोक ६७-७४ )

नन्द राजाच्या घरी नऊलाख गोधन होते. अनेक गवळी व गौळणी त्याच्या घरी राहून कामधंदा करीत व उदरनिर्वाह करीत. काही गवळ्यांच्या घरी एक एक दोन दोन अशा गाई होत्या. गाईशिवाय पोट भरण्याचे त्यांच्याजवळ दुसरे कांहीही साधन नव्हते. दही, दुध दुभते करून मथुरेच्या बाजरात नेऊन ते विकायचे, राजाचा कर भरायचा व उरलेल्या पैशाअडक्यांचे मिळेल तेवढे धान्य आणून त्यावर कुंटुंबाचा निर्वाह करीत. घरात गाईम्हशी असल्यावर सुध्दां त्यांना किंवा त्यांच्या मुलांना एखादे दिवशीही दुध अथवा दही मिळत नव्हते. राजाचा करही एवढा होता कीं अर्धे अधिक दहीदुध कररूपाने निघून जाई. मुलांना सात्त्विक आहाराचा नेहमी अभाव. त्यामुळे सर्व मुले दुबळी पतली अशक्त पंगू अशी होती. कसेतरी उदरनिर्वाह करून ते दिवस काढीत. सर्व गोकुळाची अशीच स्थिती होती. बालकृष्णाच्या मनात हा विचार येताच त्याने निश्चय केला की, प्रथम गोकुळातील विषमता नष्ट करायची जे गरीब कंगाल असतील त्यांना निदान पोट भरण्यापुतरे तरी साधन उपलब्ध करून द्यायचे आणि त्यांच्या मुलाबाळांना दही दुध लोणी मिळवून देऊन त्यांना सशक्त करायचे. निरनिराळे खेळ खेळून त्यांना बलवान बनवायचे. मल्ल आखाडे स्थापन करून व्यायाम, मल्लयुध्द वगैरेच्या योगाने त्यांना पराक्रमी मल्ल बनवून कंसाच्या जाचक राजवटीस व अन्यायी जुलुमास तोंड देण्याचे धैर्य त्यांच्यात उत्पन्न केले तरच गोकुळ वाचेल नाहीतर कंसाच्या अन्यायी कर आणि कारभाराने ते नष्ट होण्यास वेळ लागणार नाही. या साऱ्या गोष्टींचा विचार करून कृष्णाने ठरविले कीं बालकांना दही, दुध, लोणी मात्यापित्याकडून सहजासहजी मिळणार नाही, तर त्यांच्या नकळत गुपचुप घरात घुसून दहीदुधाचे भांडे मुलांच्यापुढे काढून ठेवावेत. प्रथमतः मुले तसे

करण्यास भीतील. म्हणून स्वत: दुध दही लोणी खायचे व मग मुलांना द्यायचे म्हणजे एकप्रकारे गोरसाची चोरी केल्याशिवाय गोकुळात समृध्दता होणार नाही. अशी योजना आखून त्याने १०/१२ मुलांचे टोळके जमा केले.

एके दिवशी बलराम कृष्णाला खेळण्यासाठी बाहेर घेऊन गेला. तेथे गवळ्यांची पुष्कळशी मुलें खेळण्यासाठी जमली होती. ती सर्व मुले चेंडू, चक्रे, विटीदांडू, वगैरे नानाप्रकारची खेळ खेळू लागली. त्यामुळे अनेक सवंगडी त्यांना मिळाले. नंतर त्यांनी पूर्वसंकेतानुसार प्रत्येक गवळ्याच्या घरी सर्व गोपाळासह जाऊन दही दुध खाण्याचे ठरविले. कृष्ण सर्वांच्या पुढे होवून सर्व गोपाळासह एका गौळणीच्या घरात घुसला. त्यांनी घरात असलेले दुध दही यांचा क्षणार्धात चट्टामट्टा उडवून तूप, साय, लोणी व खवा बरोबरच्या गोपाळास वाटला. नंतर तेथून बाहेर पडून ते दुसऱ्या गौळणीच्या घरात शिरले. तेथेही पूर्वीप्रमाणे दही दुध लोणी वगैरेचा फडशा पाडून तिसऱ्या घरी गेले. अशाप्रकारे अनेक घरातील दुधदुभत्यावर त्या बालगोपालांनी यथेच्छ हात मारला. तेथून सर्व गोपबालक आपापल्या घरी झोपावयास निघून गेले. पण इकडे जिथे जिथे जाऊन कृष्ण व त्याच्या सवंगड्यांनी गोरस दही लोणी यांचा फडशा पाडला. त्या त्या घरांचे स्वरूप पालटले. ती घरे दुभदुभत्यांनी समृध्द झाली व त्यायोगे त्यांची आर्थिक स्थितीही वाढत गेली. गोकुळातील सर्व घरे व कुटुंबे समृध्द करण्यासाठी कृष्णाने प्रत्येक घरात प्रवेश करून दही दुधाची नासाडी केली.

एखाद्या घरात गोरसाची चोरी करतांना गौळणीने पकडले तर तिच्या तोंडावर आपल्या तोंडातील दुधाचा फवारा उडवायचा, एखाद्या गौळणीच्या सुनेच्या बाजेवर गोरसाचे रिकामे भांडे ठेऊन नकळत तिच्या तोंडाला दहीदुधाचा फेस लावून द्यायचा. कोण्या गौळणीने पकडलेच तर काही संपादणी करून स्वत:ची सोडवणूक करून घ्यायची. दिवासानुदिवस त्याच्या अशा खोड्या जास्त जास्त वाढू लागल्या. त्याच्या कांगाड्या सांगण्यासाठी गौळणी यशोदेच्या घरी येत पण तिथे त्याचे दर्शन घडताच त्या सर्व देहभान हरपत. त्याच्या स्वरूपाच्या ध्यानात त्या तल्लीन होऊन जात. प्रत्येकीला मनात वाटत होते की, कृष्णाने नेहमी आपल्या घरी यावे, दुध प्यावे व कृपाकटाक्षाच्या तृप्तीने आपल्याकडे पाहावे. कृष्ण जर एखादे दिवशी आपल्या घरी आला नाही तर त्यांना चुकल्यासारखे होई. त्यांच्या मनात चैन पडेना म्हणून कांगांड्याचे निमित्त करून कृष्णदर्शनार्थ यशोदेच्या घरी येत. गोकुळातील सर्व गौळणीचे, मुलांचे असे विलक्षण प्रेम बालकृष्णावर जडले होते. (श्लोक ७५-८७)

एकदा कृष्णाने आपल्या लहान सवंगडयांना बोलावून आणले व सर्व मिळून गोरस चोरून खाण्याचा विचार केला. एका गौळणीच्या घरात कोणी नाही असे पाहून सर्व मंडळी घरात घुसली व दही, दुध, लोणी, तूप सर्व खाऊन फस्त केले. सर्व मडके, भांडे फोडून उध्वस्त केले. त्यांचा घरात हा सर्व कारभार चालला आहे तोच ती गौळण बाहेरून आली आणि आता सर्व चोर मुद्देमालासकट सापडले म्हणून तिने दरवाजा बाहेरून बंद करून घेऊन यशोदेकडे तक्रार घेऊन आली. तेव्हा यशोदा म्हणाली, 'बाई, तू खोटयाच कांगाडया करीत आहेस. माझा कृष्ण तर इथे माझ्या जवळच आहे. केव्हापासून इथेच खेळतो आहे. असे म्हणून यशोदेने कृष्णास हाक मारली तो कृष्ण घरातून धावत आला व कां बोलाविले म्हणून विचारू लागला. तेव्हा ती गौळण खजिल होऊन घरी परत आली. दरवाजा उघडून पाहते तर कोणीच मुले नाहीत व सर्व चिजवस्तु जशाच्या तशाच तिला आढळल्या. दुसऱ्या एका गौळणीच्या घरी कृष्णाने सोबत्यांना नेले व गोरस, दहया, लोण्यावर यथेच्छ ताव मारला. गौळणीला त्याचा सुगावा लागताच ती काठी घेऊन मारायला धावली. सर्व मुलांमधून कृष्णाने केव्हा पोबारा केला ते कोणालाही समजले नाही. गौळणीच्या हातचा मार मात्र मुलांना खावा लागला.

गोकुळातील एक दाम्पत्य आपल्या गोरसास फार जपत असे. त्यांची फजिती करण्यासाठी तो एक दिवस गोपाळासह त्या घरात शिरला. त्यावेळी ते जोडपे झोपले होते. ते पाहून गोपाळांनी तेथील सर्व गोरस भक्षण केला व बिछान्यावर एक मुंगुस सोडून सर्वांसह कृष्णाने तेथून पोबारा केला. थोडया वेळाने मुंगुसाने धुमाकुळ घातला. दोघजण घाबरून उठली व भूत भूत म्हणून ओरडली. सर्व गौळणी तेथे जमल्या. दिवे लावून पाहतात तो मुंगुस. सर्वांनी म्हटले हा त्या खोडकर कृष्णाचाच खेळ आहे. दुपारपासून मुंगुसाला घेऊन तो भटकत होता. हल्ली तो कृष्ण फार व्रात्य झाला आहे. गोकुळातील सगळी मुले त्याने बिघडवून टाकली आहेत. दुसऱ्या दिवशी सकाळी त्या गौळणीने यशोदेजवळ रात्रीची सर्व हकीकत सांगून म्हणाली तुझा कृष्ण आम्हास असाच त्रास देतो. यशोदा माता हसू लागली. तोच दुसरी म्हणाली, 'कृष्णा, तू माझ्या घरी आलास तर तुझी शेंडी धरून घुसळ खांबालाच बांधून टाकीन.' त्याच दिवशी रात्री कृष्णाने त्या गौळणीच्या घरी जाऊन मुलाबरोबर दुध दहयावर यथेच्छ ताव मारला. ती दोघ पतिपत्नि गाढ झोपलेली होती. सर्व मुलांना कृष्णाने हाकून दिले व मागे एकटा राहून त्याने त्या दोघा नवरा-बायकोची दाढी व वेणीची

गाठ मारली. दुसऱ्या दिवशी सकाळी त्या दोघांचे खूप भांडण जुंपले. सर्व लोक ती गंमत पाहण्यास तिथे जमले व ती गाठ सोडण्याचा प्रयत्न करू लागले. कृष्ण तिथे होताच तो म्हणाला, 'कोण्या एखाद्या देवास किंवा सत्पुरुषास तुम्ही छळले तर नाही ना! तुम्ही मला सगळे सांगाल तर मी गाठ सोडून देतो. तेव्हा सर्वांनी त्याला सांगताच त्याच्या नुसत्या नजरेने गाढ ढिली झाली व सुटली. दोघजण शरमेने कृष्णास वंदन करून घरात निघून गेले.

एकदा बऱ्याच गोपी कृष्णाच्या खोडचा यशोदेस सांगू लागल्या व कृष्णाच्या तोंडाकडे पाहून हसू लागल्या. तेव्हा कृष्ण म्हणाला, 'मला पाहून हसता काय? मी सर्वांतीत असून निर्मळ आहे. मला ह्या गोपी धाकटा बाळ म्हणतात. 'आई,! यांच्या खोडचा तुला मी किती सांगू! मला या हृदयाजवळ धरून कुसकरतात, मुका घेतात, अनेक कुचेष्टा शिकवितात, या सगळ्या जणी माझ्या सभोवती जमून गातात, नाचतात व म्हणतात कृष्णा मोठा असतास तर किती बरे झाले असते. हे ऐकून यशोदा हसू लागली. तेव्हा गोपी लटक्याच रागाने म्हणाल्या, 'यशोदाबाई आपणास आपल्या मुलाचे बोलणे ऐकून मोठे नवल वाटते, पण हा परम अनाचारी आहे. हा नसतेच आळ आम्हावर घेतो. हा दांडगा झाला असून तू मात्र उलट त्याचेच कौतुक करतेस. काल काय झाले. हा एकदम एकीच्या घरात शिरला. त्याठिकाणी आम्ही बऱ्याच जणी याच्याच गोष्टी बोलत होतो. आमच्यातील एकीने सहज कौतुकाने याला विचारले, 'कृष्णा, तुला बायको कशी पाहिजे बरे!' तेव्हा हा म्हणाला, 'अनंत ब्रह्मांडाची घडामोड जिच्या इच्छेने होते. ती आदिमाया मला नवरी पाहिजे. ब्रह्मा, विष्णु, महेश, चंद्रसूर्य, इंद्र, वरूण ही सगळी दैवते जी नाचविते ती नवरी भेटली तरच मी तिच्याशी लग्न करीन. जी सगळ्या पतिव्रतेत थोर आहे. तिनेच मला नावरूपाला आणले ती सगळे खेळ माझ्याच सत्तेने खेळत असते. अशा कांही गोष्टी रचून तो आम्हाला सांगत असतो.' दुसरी गौळण म्हणाली, काल हा कृष्ण माझ्या घरी अला व दहया दुधाची शिंकी पाहू लागला. पण मी ती लपवून ठेवली. तेव्हा तो म्हणाला, 'अग गौळणी, शंखासुर वेद लपवून समुद्रात पळाला. तेव्हा मी मत्स्य अवतार घेऊन त्या दुष्ट दैत्याचा नाश केला व वेद पृथ्वीवर आणले; त्या माझ्यापुढे दही, दुध, लोणी कोठे लपवशिल.' नंतर तिसरी गौळण म्हणाली, होय हो, यशोदाबाई हा तुझा मुलगा अशाच काही गोष्टी रचून सांगतो. परवा सकाळी मी ताक करीत होते. हा कृष्ण तेथे आला व म्हणाला - तुमचे

अशा प्रकारचे मंथन माझ्या मनात येत नाही. मागे मी कूर्मअवतार घेऊन क्षीरसागर घुसळला. तेव्हा मंदराचळाची रवी केली. वासुकीची दोरी करून बिरडे बांधले. त्याचे एक टोक देवांनी व दुसरे टोक दैत्यांनी धरले. मंदराचळाला आधार देण्यांकरिता मी कासवाचे रूप घेतले. त्यातून चौदा रत्ने निघाली. मग मी मोहिनीचे रूप घेतले. मंथनातून निघालेले अमृत देवांना पाजले. देव अमर झाले. असे म्हणून मोहिनीसारखे हावभाव करून हा नाचू लागला. असा हा सोंगाड्या आहे.' चौथी गौळण म्हणाली, 'मला देखील हा तुझा वात्रट मुलगा अशाच मोठ मोठ्या गोष्टी सांगत होता. मी यमुनेवर पाणी भरीत असता माझ्याकडून घागर उचलली जात नाही हे पाहून हा म्हणाला अग तुम्ही गोपी अशा कशा! तुम्हाला हलकीशी घागर उचलत नाही. मागे मी वराह अवतार घेऊन ही पृथ्वी दाढेवर उचलून धरली होती आणि क्षर्णाधात हिरण्याक्ष दैत्याचा नाश केला होता. एवढे मोठे ब्रह्मांड दाढेवर उचलून धरले आणि तुम्हाला एवढीशी घागरसुध्दां उचलता येत नाही. असे म्हणून त्याने आमची हेटाळणी केली. एकदा काय झाले आम्ही घरात काकड्या, भोपळे चिरीत होतो. इतक्यात कृष्ण तेथे आला व म्हणाला - गौळणींनो, हिरण्यकश्यपुला असाच चिरून मी त्याची आतडी बाहेर काढली होती. त्याकरितां मी नरसिंहाचे रूप घेतले होते. हिरण्यकश्यपुला नखाग्राने चिरून ठार मारले व भक्त प्रल्हादाचे रक्षण केले. पाचवी गौळण म्हणाली, 'यशोदाबाई, एकदा मी माझ्या पतिचे चरण धुत होती. हा हळूच येऊन म्हणाला, बळीनेअसेच माझे पाय धुतले होते. बळीने मला त्रिपादभुमी दान दिली. त्यावेळी मी विराटरूप घेतले व त्याला पाताळात स्थापला व त्याचा मी द्वारपाल झालो. एका अवतारात मी परशुराम होऊन सहस्त्रबाहु असलेल्या प्रचंड अर्जुनाचा वध केला व २१ वेळा पृथ्वी नि:क्षत्रीय केली. एका अवतारात श्रीराम झालो. रावणाचा वध केला. बिभीषणाला लंकेचे राज्य दिले. तोच मी आज कृष्ण होवून गोकुळात आलो. मी कंसाला मारणार आहे. चाणूर, मुष्टीक, अधासूर, वगैरे राक्षसांना ठार मारीन. रासक्रिडा खेळून सर्व गोपींचे मनोरथ पूर्ण करीन. मी पुढे सोळा हजार एकशे आठ बायका करणार आहे. दुष्टांचे हनन, भक्तांचे रक्षण करणे हे माझे कार्य राहिल. मी पांडवांचा पाठीराखा होऊन त्यांना गीताज्ञानाचा उपदेश करीन. मी आदिनारायण आहे. ब्रह्मदेवाचा बाप आहे. असे हा आपल्या तोंडात येईल ते बोलतो. केव्हा मुलांना म्हणतो, मी पुढे बौध्द अवतार घेणार अहे. दहाव्या अवतारात मी निकलंकी होऊन म्लेंछांचा संहार करीन. मी कीती अवतार घेणार आहे आणि घेतले आहेत त्याची शेषालाही गणती करता येणार नाही.'

त्यानंतर एक गोपी म्हणाली, हा कृष्ण मोठा नाटकी आहे. अचाट गोष्टी सांगतो. सर्व ईश्वरी अवतार माझेच आहेत असे म्हणतो. अग यशोदे तू पहा रांजणातले पाणी पाहिले की हा भितो मग प्रलय समुद्रात मत्स्य कसा झाला असेल? निजतांना हा माझी पाठ हळूहळू थोपट म्हणतो मग याने पाठीवर मंदराचल कसा धरला असेल? चेंडू उचलत नाही म्हणतो मग याने दाढेवर पृथ्वी धरली हे कसे संभवते? अंगरख्याचे बंद सोडताच माझी नखे दुखतात म्हणतो तर याने दैत्याला नखाने कसे फाडले असेल? ऊस ज्याच्याने मोडवत नाही तो म्हणतो मी परशुरामाचे धनुष्य तोडले हे कसे बरे शक्य आहे? जो बागुलबोवाच्या भीतीने लांब लांब पळतो तो रावणास कसा मारील? यावरून याचे बोलणे सर्व खोटे आहे. कंसाला मारीन वगैरे म्हणणे या साऱ्या थापा आहेत. तसेच नेहमीच आमच्या काहीना काही खोडचा करतो. हा आमचा गोरस राहू देत नाही, वासरे रानात सोडून देतो, त्यामुळे दुधदुभत्याची आम्हास पंचाईत होते. त्यामुळे असे वाटते की गोकुळ सोडून कुठे तरी निघून जावे.' अशी अनेक गाऱ्हाणी यशोदेजवळ सांगितली. तेव्हा यशोदा कृष्णास म्हणाली, 'कृष्णा किती रे खोडचा करशिल? एक क्षणभर देखिल तुझे पाऊल घरात टिकत नाही. तू आता बाहेर जाऊन कोणाच्या खोडचा करशिल तर मी तुला उखळाशी बांधीन.' तेव्हा कृष्ण म्हणाला, 'आई नाही ग उखळांशी बाधू. तुझ्या चरणाची शपथ घेऊन सांगतो कीं, आजपासून मी तुझ्या जवळच राहीन.'

कोणत्याही मार्गाने कृष्णाच्या खोडचा कमी होत नव्हत्या म्हणून यशोदामातेने पुराणिक बुवांना विचारून संकष्टी चतुर्थीचे व्रत सुरु केले. उपाध्यायाकडून व्रताची माहिती घेतली. ती हात जोडून गजाननाला म्हणाली, 'गणपतिबाप्पा, माझ्या बाळाला गुण दे. मी तुझी पूजा करीन व तुझे संकष्टी व्रत कधीच सोडणार नाही.' कृष्णाने हे बोलणे ऐकले व गणेशाला सत्य करण्यासाठी एक चतुर्थी येईपर्यंत खोडचा केल्या नाही. हे पाहून यशोदा म्हणाली, 'गणेश देव धन्य आहे. मला त्याने प्रचिती दिली. आता हे व्रत मी येत्या संकष्टी चतुर्थी पासून दरमहा थाटाने करीन.' लवकरच चतुर्थी आली. त्यादिवशी यशोदेने उपोषण केले. व्रतास आरंभ केला. मोठ्या उत्साहाने समारंभ केला. चंद्राचा उदय होताच तिने गणपतीची पूजा केली. नैवेद्यासाठी तिने एकवीस लाडू, मोदक तयार केले व एका हाऱ्यात घालून देवासमोर ठेवले. स्नान घालण्यासाठी सर्व देव देव्हाऱ्यातून बाहेर काढले. धूप विसरल्यामुळे ती कृष्णास मंदीरातच ठेवून धूपासाठी घरात गेली ही संधी साधून कृष्णाने ते लाडू एकदम

फस्त करून टाकले. यशोदा आल्यावर तो हारा रिकामा पाहून आश्चर्य करू लागली. कृष्णाकडून ते लाडू खाववणार नाहीत. देव खातच नाही. आणि लाडू तर गेले. हा आश्चर्यकारक प्रकार पाहून ती संभ्रमात पडली. मग कृष्णास म्हणाली, 'अरे बाळा या हाऱ्यातील लाडू काय झाले खरे सांग.' कृष्ण म्हणाला, 'आई तू बाहेर गेलीस इतक्यात एक सोंड असलेला बुवा उंदरावर बसून अनेक लोकांसह येथे आला. त्याने ते लाडू सर्वांना वाटले व स्वत:ही खाल्ले. मी त्यांना म्हणालो तुम्ही लाडू खाऊ नका. आई मला मारील. तेव्हा तो म्हणाला, माझे नाव गणपति हे लाडू, मोदक माझ्याकरिता केले आहेत. तू आईस सांग की हे लाडू गणपतीने खाल्ले. इतके सांगूनही तुझ्या आईने तुला मारलेच तर मी तुला सोडवीन. तो आपली सोंड भयंकर हलवीत होता. त्याला पाहून मी भिऊन गेलो. माझी बोबडी वळली. आता मला फार भूक लागली आहे. मला लाडू दे ना ग आई! यशोदा रागावून त्याला म्हणाली, 'लबाडा, तू खोटे बोलत आहेस. तूच ते लाडून खाल्लेस, आधी तुझे तोंड उघडून दाखव पाहू.' ते ऐकून कृष्ण आईकडे पाहून रडू लागला. त्याने रडण्याकरिता आपले तोड उघडले. व यशोदेला दाखवले. तेव्हा त्या मुखात अनेक ब्रह्मांडे, सर्व अवतार यशोदेस दिसू लागले. तसेच कौरव, पांडव, गौळणी, हजारो देव, दैत्य, ऋषि, राजे सैन्यासह यशोदेच्या दृष्टीस पडले. यशोदा तो दिव्य प्रकार पाहून तटस्थ झाली. इतक्यात कृष्णाच्या मुखातून एक गणपति यशोदेला म्हणाला, 'यशोदे हा कृष्ण सनातन देवाधिदेव तुझ्या उदरी अवतरला आहे. आम्ही सर्व देव त्याचे अवयव आहोत. हे भाग्यवती माते, या पूर्णब्रह्मानंद परब्रह्मास तू भज. मी मंगलमूर्ति खरा पण माझा मंगलमूर्ति हा कृष्ण आहे.' हे ऐकताच यशोदेला समाधी लागली. ती ब्रह्मानंदात निमग्न झाली. काही वेळाने ती शुध्दीवर आली. डोळे उघडून पाहाते तो कृष्ण तिच्याजवळ उभा असून 'आई, मला भूक लागली आहे. मला लाडू दे. असे म्हणत आहे.' ते ऐकून माता यशोदेने सद्‌गदित होऊन त्याला उचलून कडेवर घेतले. ती कृष्णासह घरात आली आणि सर्व ब्राह्मणास मोदकांचे भोजन घालून कृष्णासह तिने व नन्दाने जेवण केले. (श्लोक ८८-१०५)

एके दिवशी यशोदा कृष्णास घेऊन बसली होती. घरात चुलीवर दूध तापत ठेवले होते. ते उतू गेल्याचा वास आला म्हणून ती कृष्णास खाली ठेवून लगबगीने आत गेली. तो सर्व दुध उतू गेल्याचे तिला दिसले. काही वेळाने बाहेर येऊन पाहते तो आपणास मांडीवरून खाली ठेऊन आत गेली म्हणून कृष्णाने डेऱ्यावर

मोठा खडा घालून तो फोडून टाकला. जिकडे तिकडे गोरस सांडलेला दिसला. हे कृष्णाचे कृत्य पाहून यशोदेस कृष्णाचा राग आला. ती कृष्णास उखळीस बांधू लागली. इतक्यात पुष्कळ गौळणी तिथे आल्या व त्यांनीही यशोदेस सांगितले की या दांडग्याला-चोराला उखळाशी घट्ट बांधा यानेआमच्या घरात अशीच नासाडी केली आहे. दिवसेंदिवस याचा व्रात्यपणाही वाढत आहे. यशोदेने एक दावे आणले व कृष्णास उखळांशी बांधू लागली. तेव्हा काकुळतीने तो म्हणाला, 'आई मला उखळाशी बांधू नको ग. मी आजपासून खरोखर चोरी किंवा व्रात्यपणा करणार नाही.' तिकडे दुर्लक्ष करून यशोदा दाव्याने कृष्णास बांधू लागली. पण ते दावे पुरेना म्हणून तिने दुसरे दावे त्याला जोडले पण तेही पुरेना म्हणून तिसरे चौथे असे कितीतरी दावे त्यास जोडली पण कृष्ण काही केल्या बांधला जाईना. शेवटी त्यास मातेची दया आली व त्याने आपणास उखळाशी बांधून घेतले. ते पाहून गौळणी हसत हसत घरी गेल्या व यशोदाही घरात आली. अंगणात कोणीही नाही असे पाहून कृष्ण रांगत रांगत त्या उखळासुध्दा अंगणात दोन मोठे वृक्ष होते त्याजवळ आला. त्या दोन वृक्षामधून पलिकडे चालला पण मध्ये उखळ अडकले. त्याचा धक्का त्या वृक्षास लागताच ते वृक्ष उन्मळून खाली पडले व त्यातून दोन दैदिप्यमान पुरुष बाहेर आले व कृष्णापुढे हात जोडून उभे राहिले. बाहेर मोठा काडकाड असा आवाज झाला म्हणून घाबरत यशोदा बाहेर आली तो तिने पाहिले दोन झाडे पडली आहेत व कृष्णापुढे दोन दिव्यपुरुष हात जोडून उभे आहेत. ते कृष्णास म्हणाले, 'महाराज, आम्ही दोनही उन्मत्त गंधर्व होतो. आमची नावे यमल व अर्जुन अशी आहेत. आम्ही पूर्वीचे कुबेरपुत्र असून नारदमुनींचे शापाने वृक्षाच्या जन्मास आलो. अविचाराने उन्मत्त होऊन आम्ही स्त्रियासमवेत जलक्रिडा करीत असतांना नारदमुनींची स्वारी त्याचमार्गाने जाऊ लागली. आम्ही ब्रह्मर्षिना पाहीले पण विषयांधथेमुळे खुशाल नारदासमक्ष जलक्रिडा चालू ठेवली. हे पाहताच नारदांना क्रोध आला, व त्यांनी तुम्ही दोघे वृक्ष व्हाल.' असा शाप दिला. ती शापवाणी ऐकताच आम्ही शुध्दीवर आलो आणि नारदमुनींना शरण गेलो. त्यांचे पाय धरून उ:शाप देण्याची प्रार्थना केली. तेव्हा नारदमुनि म्हणाले, 'तुम्ही गोकुळात जन्माला याल याठिकाणी यशोदामाता बालकृष्णास उखळास बांधील, ते उखळ ओढीत कृष्ण तुम्हा दोघामधून उखळासह पलिकडे जाईल. त्यावेळी कृष्णाचे पाय तुम्हाला लागतील तेव्हा तुमचा उध्दार होईल.' आज आमचा उध्दार झाला.' असे बोलून ते गंधर्व कृष्णास नमस्कार करून गंधर्वलोकी निघून गेले. यशोदामाता आश्चर्यचकित झाली. इतक्यात नन्दही बाहेरून तेथे आले

आणि दोन प्रचंडवृक्ष उन्मळून पडून त्यांच्यामध्ये कृष्ण उखळांशी बांधलेला आहे असे पाहून त्याला बंधमुक्त केले व वर उचलून घेतले. सर्व गवळी गौळणी तेथे जमले. नन्दाजवळून यशोदेने कृष्णास आपल्या कडेवर घेऊन त्याचे चुंबन घेऊन मीठमोहऱ्या उतरून टाकल्या व आपला बाळ या संकटातून वाचला म्हणून त्यांनी बराचसा दानधर्म केला. (श्लोक १०६-११७)

एके दिवशी कांही गोपी कृष्णाची गाऱ्हाणी सांगण्यासाठी यशोदेकडे जमल्या होत्या. कृष्ण आता गोपींच्या खोड्या दिवसेंदिवस जास्त करीत होता. गौळणीच्या सुनांच्या थट्टा करून त्यांना भंडावून सोडी. त्यामुळे गौळणी चिडत. यमुना नदीवर पाणी आणण्यास, धुणेभांडी धुण्यास गोपस्त्रिया गेल्या म्हणजे तेथे मुद्दाम चिडविण्याकरिता तो खडे मारी तर कित्येकांची मडकीच फोडी. कित्येकांची वस्त्रेच पळवी. एक ना दोन, हजारो खोड्या करून तो त्या स्त्रियांना त्रास देई. त्या सर्व मिळून यशोदेकडे गाऱ्हाणी नेत आणि यशोदा कृष्णाची चांगली कानउघाडणी करी. पण त्याचे खोड्या करण्याचे काम कधी सुटले नाही. कित्येक गोपी मथुरेच्या बाजारात दही, दुध, लोणी विकण्यास नेत. त्यांना अडवून तो आपल्या सवंगड्यासह ते लुटून घेई व खाऊनपिऊन फस्त करी. कोणी हमरीतुमरी केल्यास त्यांचे मडके फोडी. त्यांचे वस्त्र ओढी. तेव्हा त्या काकुळतीस आल्या म्हणजे सोडून देई. या सर्व खोड्या सांगण्याकरितां त्या यशोदेकडे येत तेव्हा कृष्ण म्हणत असे, 'आई, ह्या सर्व गौळणी लबाड आहेत या मला पाहण्यासाठी तुझ्याकडे येतात.' हे त्याचे बोलणे ऐकून यशोदा नंद हसू लागत.

कृष्णाच्या खोड्या व चोऱ्या कशा थांबतील याचा यशोदामाता विचार करीत असतांना एका गौळणीने सांगितले, 'यशोदे, तुझा कृष्ण आता वनात वासरे, गाई घेऊन चारावयास जाण्यायोग्य झाला आहे. त्यामुळे त्याच्या चोऱ्या व खोड्या थांबतील. तेव्हा त्याला वनात वासरे घेऊन पाठव. त्याच्याबरोबर त्याचे बालगोपाळ सवंगडी आपापल्या गाईवासरासह जातील. त्याच्याबरोबर त्यांनी शिदोऱ्या घाव्यात. तूही भरपूर शिदोरी कृष्णाबरोबर देत जा.' गौळणीचे म्हणणे सर्वांस पटले. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी कृष्णाने गोकुळातील सर्व बरोबरीची मुले जमा केली. सर्व वासरे जमविली. वासरे पुढे गोपाळ मागे. मध्यभागी कृष्ण अशा थाटाने ते सर्व वनात निघाले. प्रत्येक मुलाजवळ पावा, घुमऱ्या, टाळ इ. सुस्वर वाद्ये होती. त्यांचा मोठा सुस्वर गजर होत होता. कृष्णाची चिमुकली मूर्ति पितांबर नेसलेली, कमरेत लहान मेखला

घातलेली, पायात लहान लहान नुपुरे खुळखुळणारी, अंगावर मोत्यांची झालर असलेली घोंगडी शोभून दिसत होती. अंगाला केशराची उटी लावली होती. ललाटभागी कस्तुरीचा सुंदर तिलक रेखिला होता. डोक्यावर मयुरपंख असलेला रत्नजडित मुकूट होता. कानात मकराकार कुंडले शोभत होती गळ्यात मोत्यांचे चिमणेहार घातले असून त्यावर वनपुष्पांच्या माळा शोभत होत्या अशी ती श्यामसुंदर मनोहर मूर्ति गवळ्यांच्या असंख्य मुलांना बरोबर घेऊन वनात जाण्यास निघाली. काही वेळाने कृष्ण त्या परिवारासह यमुनातीरावर आला. वनात वासरे चरण्यासाठी मोकाट सोडून दिली व आपण सवंगड्याबरोबर खेळू लागला. चेंडू, लगोऱ्या, सुरपारंब्या, विटीदांडू, हुतूतू, हुंबरी, हमामा इ. निरनिराळे खेळ खेळत होता. त्यांचा वेळ कसा निघून गेला हे त्यांना समजलेही नाही. नंतर कृष्णांनी मुरली वाजविली त्याबरोबर रानातील सर्व वासरे पाणी पिण्यासाठी यमुनातीरी आली. वासरे पाणी पिऊन फिरून मोकाट वनात गेली. वासरे कशी सापडतील ही गोपाळांची काळजी दूर झाली. ते निर्धास्त झाले. आता सर्वांना भूका लागल्या. ती दुसऱ्या प्रहरची वेळ होती सर्व मुलांनी आपापल्या शिदोऱ्या आणल्या. सर्व गोपबालक वाटोळे बसले. कृष्ण मध्यभागी बसला. मग सर्वांनी आपापल्या शिदोऱ्या आणून कृष्णापुढे ठेवल्या. त्या शिदोऱ्यात अनेक प्रकारचे मिष्ठान्न व साधे पदार्थ होते. कृष्ण म्हणाला, 'प्रत्येकाने आपापली शिदोरी खावी. दुसऱ्याची शिदोरी चांगली आहे. म्हणून तिचा हेवा कोणी करू नये.' कृष्णाचे हे सांगणे पेंद्याला आवडले नाही. तो लगेच उठला व एका बाजूस दूर झाडाखाली जाऊन बसला. त्याचे ते कृत्य पाहून ती बाकीची मुलेही पेंद्याजवळ जाऊन बसली. कृष्ण एकटाच त्या जागी राहिला. त्यास तेथे चैन पडेना. तेव्हा तो उठून मुलाजवळ गेला आणि काकुळतीने त्यांना म्हणाला, 'गड्यांनो, तुम्ही सांगाल त्याप्रमाणे मी वागेन. तुम्ही असे माझ्यापासून दूर राहू नका. बोलता बोलता त्याच्या डोळ्यात अश्रू आले. हे पाहताच पेंद्याने धावत जाऊन कृष्णाचे चरण धरले. इतर गोपाळ कृष्णचरणी लीन झाले. मग सर्वांनी कृष्णास मध्ये बसवून सर्व त्याच्या सभोवर बसले. सर्वांच्या शिदोऱ्या एकत्र केल्या. त्या समप्रमाणात सर्वांना वाढल्या. गोपाळकाला सुरु झाला. कृष्णाने आपल्या हाताने सर्वांना घास दिला. गोपाळांनी आपल्या हातांनी कृष्णमुखात घास घातला. एकमेकांशी एकमेकांस भरविले. कृष्ण अतिप्रेमाने सर्वांसह जेवला. हा प्रेमाचा काल्याचा सोहळा पाहून प्रत्यक्ष स्वर्गीच्या देवांना हेवा वाटला. त्यातला प्रसाद भक्षण करण्याकरितां ते निरनिराळ्या पशुपक्ष्यांच्या रूपाने येऊन एककण जरी मिळाला तरी समाधान मानून तृप्त झाले.

नित्यनियमाने कृष्ण गोपाळासह यमुना नदीच्या काठी गाई चारीत असता एकदा तेथे वत्सासुर नावाचा राक्षस बैलाचे रूप घेऊन आला. तो कंसाचा गुप्त हेर असून कपटाने कृष्णाचा नाश करावा या उद्देशाने आला होता. परंतु कृष्णाने त्यास ओळखले. कृष्णाने त्याचे मागचे पाय धरून खूप गरगर फिरविले आणि एका शिळेवर आपटून मारून टाकले. त्याप्रमाणे एकदा बगासूर नावाचा राक्षस प्रचंड बगळ्याचे रूप धारण करून आकाशमार्गाने एकदम आला व कृष्णावर झडप घालून त्याने त्याला आपल्या प्रचंड चोचीत धरले. पण कृष्णाने त्या बगळ्याची चोच दोन्ही हाताने धरून त्याला उभाच्या उभा चिरून फेकून दिले. बगासुराची ती दशा झालेली पाहून अघासुर नावाचा एक राक्षस अत्यंत संतप्त झाला व कृष्णाचा नाश करण्यासाठी प्रचंड अजगराचे रूप धरून तेथे आला. इकडे कृष्ण व गवळ्यांची मुले दहीभात खात असता त्या अजगराने एकावर एक वेटोळीघालून आपल्या शरीराचा एक पर्वत तयार केला व पर्वतातील दरीप्रमाणे तोंड पसरून तो तेथे बसला. गोपाळांचा दहीभात खाणे झाल्यावर ते उठले व इकडे तिकडे खेळू लागले तेव्हा कित्येक मुले सहजगत्या तो अजगर एक डोंगरच आहे असे समजून त्याच्यावर चढली. काही मुले चढल्यावर बाकीच्या मुलांनाही त्यावर चढण्याची इच्छा होऊन तीही चढली. तो सर्व प्रकार कृष्णाच्या लक्षात आला व हा अजगर आपला नाश करण्यासाठी आला आहे असे त्याने ओळखले.

त्या मुलांच्या संरक्षणासाठी कृष्णालाही त्यावर चढावे लागले. ती मुले पुढे अजगराच्या मुखाजवळ आली. अजगर आपला प्रचंड जबडा पसरून बसलेला असल्यामुळे मुलांना ती एक दरीच आहे असे वाटले व कसलाही विचार न करता ती त्या अजगराच्या मुखात शिरली. त्यांच्या संरक्षणाकरिता कृष्णही आत शिरला. कृष्ण आपल्या मुखात आला आहे असे पाहताच अजगराने आपले तोंड बंद केले व सर्वांना दाबून मारण्याचा प्रयत्न करू लागला. सर्व गोपाळ घाबरले व या संकटाचे निवारण करण्यासाठी कृष्णास विनवू लागले. तेव्हा कृष्णाने प्रचंड स्वरूप धारण करून त्या अजगराचे पोट फाडले व सर्व गोपाळ सुरक्षितपणे बाहेर काढले. तो अजगर जेव्हा मरण पावला तेव्हा त्याच्या शरीरातून तेजस्वी ज्योत बाहेर पडली. ती कृष्णाने गिळली. कृष्णाच्या हातून अघासुराचा मृत्यु झाल्याने त्याचा उध्दार होऊन मोक्षाची प्राप्ति झाली. नंतर तेथून बलराम, कृष्ण व सर्व गोपाळ यमुनेच्या काठी वृंदावनात आले. तेथे थोडावेळ जलक्रिडा करून गोपाळकाला केला व देवासह सर्व गोपालांनी भोजन केले.

एकेदिवशी कृष्ण, बलराम आणि गोपाळ दहिकाला खात बसलेले आहेत व त्यांच्या गाईवासरे चरत चरत रानात बऱ्याच दूरवर गेल्या आहेत. हे पाहून ब्रह्मदेव तेथे आला. ब्रह्मदेवाने सर्वांची नजर चुकवून त्या सर्व गाई सत्यलोकी नेऊन ठेवल्या. बऱ्याच लांबपर्यंत गाई दिसत नाही असे पाहून गोपाळ म्हणाले - 'कृष्णा गाई कोठेच दिसत नाहीत. त्या लांब गेल्या तर सापडणार नाहीत. तेव्हा आपण गाईंना इकडे हाकून आणू व नंतर बसू. तेव्हा कृष्ण म्हणाला, 'तुम्ही येथे बसा. मी सर्व गुरांना इकडे घेऊन येतो. असे सांगून कृष्ण व बलराम गाईंच्या शोधासाठी गेले. कृष्ण गोपालापासून बराच दूर गेला असे पाहून ब्रह्मदेव त्या मुलाजवळ आला व त्यांनाही सत्यलोकांत घेऊन गेला व आता पुढे काय होते हे पाहत बसला. इकडे गाई सापडत नाहीत असे पाहून कृष्ण माघारी आला पण तेथे एकही गोपबालक दिसला नाही. तो प्रकार पाहून बलराम फारच विस्मित व चिंतातूर झाला. परंतु कृष्णाचे लक्षात तो प्रकार येऊन हे कृत्य ब्रह्मदेवाचे आहे असे त्याने ओळखले. ब्रह्मदेवाला आपली लीला दाखविण्यासाठी कृष्णाने गाई व वासरे जितकी नाहीशी झाली होती तितकी पूर्वीप्रमाणे गोपाळासहीत नविन निर्माण केली आणि त्या सर्वांसह तो गोकुळात घरी आला. गाई व वासरे व गोपाळ या सर्वांत आता कृष्णाचा अंश असल्यामुळे गोकुळात घरोघर कृष्ण अवतीर्ण झाल्यासारखे झाले. पूर्वी नन्द-यशोदा ही दोघेच कृष्णाचे कौतुक करीत होते. परंतु ब्रह्मदेवाच्या या कृतीने आता सर्वांनाच त्याचे लालनपालन करण्याचा योग आला. याप्रमाणे एक वर्ष गेल्यावर ब्रह्मदेवाला वाटले कीं, आपण केलेल्या प्रकारामुळे गोकुळात मोठा घोटाळा झाला असेल तो पाहाण्यासाठी तो गोकुळात आला आणि पाहातो तो पूर्वीप्रमाणे सर्व गायी गोपाळ जसेच्या तसे असून त्यांचे व्यवसाय आनंदाने चालले आहेत. तो प्रकार पाहून ब्रह्मदेव आश्चर्यचकित झाला. त्याला वाटले आपण इकडे आलो असे पाहून कृष्णाने सत्यलोकातून गाईगोपाळांना पळवून आणले असेल म्हणून तो परत सत्यलोकी गेला तो तेथेही गाईगोप आहेत. पुन्हा पृथ्वीवर अला तो तशाच गाई गोपाल आहेत. आपण सत्यलोकी आहोत कि मृत्युलोकांत आहोत अशा भ्रमाने तो भिऊ लागला. शेवटी क्षमा मागण्याच्या इच्छेने तो कृष्णाजवळ जाऊ लागला. तो सर्व गोपाळ कृष्णासारखे त्यास दिसू लागले. तेव्हा कोणत्या कृष्णाला शरण जावे हे त्याला समजेना. ते अनंत कृष्ण पाहून ब्रह्मदेव अत्यंत विस्मीत झाला व झालेल्या प्रमादाबद्दल क्षमा मागू लागला. ब्रह्मदेव म्हणाला - 'हे अनादि परब्रह्म पुरुषा! मी खद्योताने तुला आपला पराक्रम दाखविण्याचा प्रयत्न करून चांगला फजित पावलो. हे निराकार निर्गुणा आज तुझ्या

सगुण स्वरूपाचीही मला चांगली ओळख पटली. तू हे सगुण स्वरूप धारण न करतास तर या अनंत पतितांचा उध्दार झाला नसता. हे करूणानिधे! तू दुष्टांच्या संहारासाठी आणि साधूंच्या संरक्षणासाठी सदैव तयार आहेस. तू परब्रह्म ॐकार आहेस. हे भगवंता! जो मी केवळ तुझ्या कृपाबळाने हे एवढे विश्व निर्माण करतो त्या तुला जिंकावयास मी पामर पूर्णपणे असमर्थ आहे. माझ्या अपराधाची क्षमा कर.' याप्रमाणे ब्रह्मदेव कृष्णाची अनन्यभावाने प्रार्थना करून त्याने भगवंताच्या चरणावर मस्तक ठेवले. कृष्णाने त्याच्या मस्तकावर अभयकर ठेवून त्याला उठवले व त्याला सत्यलोकी जाण्याची परवानगी दिली. मग ब्रह्मदेवाने पूर्वीच्या गाई, वासरे व गोपाळ कृष्णाचे स्वाधिन केले व तो निघून गेला.

एकेदिवशी श्रीकृष्ण, बलराम व गोपाळ वृंदावनात खेळण्यात दंग झाले आहेत असे पाहून तेथे धेंनुकासुर या नावाचा दुष्टराक्षस बरोबर बैलांचा परिवार घेऊन आला. तो गोपाळांना शिंगांनी व लाथांनी मारू लागला. त्याचा असा दुष्टपणा पाहून बलरामाला राग आला व त्याने त्याचे पाय धरून मस्तक त्याचा प्राण जाईपर्यंत ताडाच्या वृक्षावर आपटले व शेवटी त्याचा नाश केला. इकडे कृष्णाने त्या राक्षसाचा जो बैलांचा परिवार होता तो गदेने नाहीसा करून टाकला.

नंद प्रतिवर्षी इंद्राने यथासमयी यथायोग्य अशी वृष्टी करावी म्हणून त्याच्या प्रसन्नतेसाठी होम-हवन करीत असे. त्याप्रमाणे एके वर्षी नंद गवळ्यांच्या घरोघरी हिंडून दही, दुध, तूप वगैरे होमाची सामग्री गोळा करून होमाची तयारी करू लागला. तेव्हा कृष्ण नंदाला म्हणाला, 'बाबा, ही सामग्री गोळा करून तुम्ही काय करणार?' नन्द म्हणाला - 'कृष्णा या सामग्रीचा उपयोग होमासाठी करावयाचा आहे. हा होम केला म्हणजे इंद्र प्रसन्न होतो व तो पृथ्वीवर पर्जन्यवृष्टी करून धनधान्याची समृध्दि करतो.' नंदाचे बोलणे ऐकून कृष्ण म्हणाला, 'पर्जन्यादि हे सृष्टीचे व्यापार आहेत. त्याच्याशी इंद्राचा काही संबंध नाही. ज्या त्या ऋतुत जे ते व्यापार होतात आणि ते अष्टदिशांचे दिक्पाळ घडवून आणतात. पश्चिम दिशेला वरूण या नावाचा दिक्पाळ आहे त्याच्याजवळ द्रोण, पवन, पागुळ वगैरे अनेक मेघ आहेत. त्या मेघाकडून पर्जन्यवृष्टी करून पृथ्वीवर तो धनधान्य निर्माण करतो. त्यात इंद्राचा कांहीही संबंध नाही. अमूक देव अमूक कार्य करतो. ही ज्याची त्याची भावना आहे. जो तो त्या प्रमाणे आपल्या देवतेला प्रमुख समजतो. शैवांना शंकर काय तो सर्वस्व वाटतो. वैष्णव विष्णुशिवाय, शाक्त शक्तिदेवीशिवाय, गणेश गणपतिशिवाय, सौर्य सूर्याशिवाय

कोणाला ओळखीत नाही. याप्रमाणे अनेक मार्ग असून त्या त्या मार्गातले लोक आपापल्या देवतेचे स्तोम माजवितात. वस्तुत: जगदात्मा हा सर्व एकच असून तो आपल्या भक्तांच्या इच्छेप्रमाणे निरनिराळे अवतार घेऊन आपल्या भक्तांचे मनोरथ पूर्ण करीत असतो. तेथे इंद्र देवांचा राजा कसला किंवा ब्रह्मा, विष्णु, महेश यांचे तरी महत्व कसले. जशी ज्याची भावना तशी त्याने आपली देवता मानून त्याची खुशाल आराधना करावी. परंतु वास्तविक पृथ्वीला पर्वतांचा आधार आहे व त्याच्या शक्तिमुळे पर्जन्याची वृष्टी होते. अष्टकुळ पर्वताचे मूळ जो मेरू पर्वत तो तर सर्वांना आधार आहे. त्या मेरू पर्वताच्या मस्तकावर ब्रह्मा, विष्णु, महेश तसेच अष्टदिक्पाळ, इंद्र वगैरे सर्व राहतात. तेव्हा या सर्वांना आश्रयभूत जो मेरू तोच सर्वांना अधिक वंद्य आहे. गोवर्धन हा त्या मेरूचाच वंशज आहे. तेव्हा इंद्राने कारण नसता महत्व घेऊन गोवर्धन पर्वताची अवहेलना केली आहे. आता यापुढे त्या पर्वताचीच उपासना करा.' कृष्णाचे हे म्हणणे सर्वांना पसंत पडले. म्हणून त्यांनी इंद्रपूजेची यागाची तयारी मोडून पर्वताच्या पूजेकरितां यात्रेची तयारी केली. आपापल्या शक्तीप्रमाणे अन्न, दही, दुध, लोणी, तूप वगैरे दान करण्यासाठी गाड्या भरून पर्वताच्या पायथ्याशी आले. तेथे मंडप वगैरे घालून पूजेची तयारी करू लागले. इतक्यात तो पर्वत मनुष्याप्रमाणे बोलायला लागला. तेव्हा सर्व गवळ्यांनी दही, दुध, तूप, यांच्या घागरीच्या घागरी ओतून पर्वताला स्नान घातले, केशर, गंध, फुले वाहिली. फुलांच्या माळा घातल्या व सोबत आणलेल्या अन्नाचा नैवेद्य घातला. पर्वताने आपले तोंड उघडून सर्व अन्न भक्षण केले. नंतर तो पर्वत म्हणाला, 'हे नन्दादि, गवळ्यांनो तुमच्या या भक्तीने मी प्रसन्न झालो आहे. तुम्ही जे जे मनोरथ कराल ते ते सर्व पूर्ण होतील.' पर्वताचे हे शब्द ऐकून सर्वांना आश्चर्य वाटले व आज कृष्णाने आपणास खरा देव दाखविला त्याबद्दल फारआनंद झाला. हळू हळू हे वृत्त सर्वत्र पसरताच सर्व देशोदेशीचे लोक गोवर्धनाची पूजा करू लागले. इंद्रयाग बंद पडला. हे पाहून इंद्राला राग आला. त्याने त्याच्या अंकीत असलेल्या चार मेघ व अष्टदिक्पाल यांना बोलावून त्यांना म्हणाला, 'मेघांनो त्या कृष्णाने माझा फारच मानभंग केला आहे. तुम्ही आताच्या आता गोकुळावर जा व अशी जोराने वृष्टी करा की सर्वत्र जलप्रलय होऊन जाईल. इंद्राच्या आज्ञेप्रमाणे मेघ गोकुळावर वृष्टी करू लागले. तेव्हा गाई, गोपाळ, गवळी याची अत्यंत त्रेधा उडाली. जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन गेले. गावातील घरे पडली. घराचे बाहेर निघावे तर पाऊस व गारांचा मारा होई. ते सर्व कृष्णाकडे आले आणि म्हणाले, 'कृष्णा तू त्या इंद्राचे होमहवन बंद करविलेस

म्हणून त्याचा हा सारा परिणाम.' तेव्हा कृष्ण म्हणाला, 'असे असेल तर ज्या पर्वताने आपली पूजा घेतली तो पर्वत आपले संरक्षण करील. चला आपण त्या पर्वताकडे जाऊ.' असे कृष्णाने सांगितल्यावर सर्व आबालवृध्द कृष्णाच्या मागे त्या पर्वताजवळ आले. तेथे कृष्णाने गोवर्धन पर्वत उचलला व तो करांगुलीवर धरला आणि त्याखाली सर्व लोकांना बसविले व सर्वांचे संरक्षण केले. याप्रमाणे सात दिवस त्या पर्वताखाली राहिल्यावर आकाशात जमलेले ढग इंद्राकडे परत गेले व त्यांनी इंद्रास सांगितले. 'आम्ही प्रयत्नांची शिकस्त केली पण गोवर्धन पर्वत गोकुळावर छत्रीप्रमाणे राहिल्यामुळे आमच्या वृष्टींचा काहीही उपयोग झाला नाही.' इंद्र तेथे येऊन पाहतो तर कृष्णाने करांगुलीवर पर्वत उचलून धरलेला आहे हे पाहून इंद्र खजिल झाला. त्याचा गर्व पार नाहीसा झाला व कृष्णाला अनन्यभावाने साष्टांग नमस्कार करून स्तुति करू लागला. कृष्णाने वरदहस्त त्याच्या शिरावर ठेवला व त्यांचा निरोप घेऊन इंद्र स्वर्गलोकी निघून गेला. (श्लोक ११८-१२५)

एकदा कृष्ण गोपाळासह वर्तमान यमुना नदीचे काठी विटी दांडू खेळत असता खेळता खेळता विटी यमुनेत जाऊन पडली व बुडाली. तेव्हा कृष्णाने विटी शोधण्यासाठी पाण्यात बुडी मारली. त्या यमुनेमध्ये कालिया नावाचा एक प्रचंड सर्प येऊन राहिला होता. त्याला एकशेएक मुखे होती. तो पूर्वी रमणक द्विपात राहात होता. पण गरूडाच्या भीतीने त्याला तेथे राहणे कठिण जाऊ लागले. म्हणून यमुनेत येऊन राहिला होता. याठिकाणी यमुनते गरूडाची भीती नव्हती कारण एके वेळी यमुनेतील जलचरांना गरूड फारच त्रास देऊ लागला. तेव्हा त्यांनी सौभरीची प्रार्थना केली कीं, 'हे सौभरी तू परमपवित्र असून आम्ही तुझ्या परिवारातले आहोत तर गरूडापासून आमचे संरक्षण होईल अशी काही तजवीज कर.' तेव्हा सौभरीने त्यांना यमुनेमध्ये एक योजनात राहावयला सांगितले व त्या भागात गरूड आल्यास नाश पावेल असा शाप दिला. कालिया सर्पालाही गरूडाचा फार त्रास होत असे. त्याला जेव्हा यमुनेतील एक योजनाचा भाग निर्भय झाल्याचे कळले तेव्हा तोही रमणकद्विप सोडून आपल्या परिवारासह यमुनेत येऊन राहिला. त्या भयंकर सर्पाचे विष यमुनेत पसल्यामुळे तिच्या पाण्यास स्पर्श करणेही भयावह झाले. अशा त्या पाण्यात कृष्णाने निर्भयपणे उडी टाकली व पाण्यात बुडी मारून विटी शोधू लागला. इतक्यात कालीयाच्या पत्न्यांची दृष्टी त्याच्यावर गेली. सर्वांगसुंदर सुकुमार अशी कृष्णाची बालमूर्ति पाहाताच त्यांना फार दया आली व त्या त्याच्याजवळ येऊन म्हणाल्या, 'मुला! तुझी ही

रूपसंपन्नता पाहून आम्हाला फार दया येते तर त्वरा करून तू या पाण्यातून बाहेर निघून जा. जर आमच्या पतीला तू येथे आल्याचे कळले तर तो तुझा केव्हाच नाश करून टाकील. तू या बिकट वाटेने भूलून किंवा चुकून आला असशिल तर ताबडतोब उशिर न करता आलेल्या वाटेने निघून जा.' त्या कालियापत्न्यांचे हे भाषण ऐकून गोपाळकृष्ण म्हणाला, 'नागस्त्रियांनो मी वाट चुकलेला नाही. मला येथेच यायचे होते. मथुरेचा राजा कंस व आम्ही द्यूत खेळत असता त्यात आम्ही कालियाचे शिर पणाला लावले. पण आम्ही हरल्याने ते शिर घेण्याकरिता मी आलेलो आहे.' कृष्णाचे वचन ऐकताच कालियाच्या स्त्रियांनी कालियास व इतर सर्पास जागविले व त्यांना सर्व हकिकत सांगितली.

कालियाचे संरक्षक नाग कृष्णाचे अंगावर धावत आले व त्यांनी कृष्णाला वेढून टाकले. परंतु कृष्णाने त्या सर्वांना क्षणार्धांत पायाखाली तुडवून टाकले व तो तसाच पुढे कालीयाकडे चालला. तेव्हा कालीया कृष्णावर फुत्कार टाकीत धावून आला. त्या दोघांचे खूप घनघोर युध्द झाले. कृष्णाच्या अंगावर ठिकठिकाणी दंश करून कालीयाने विष टाकले पण ते कृष्णाच्या शरीरावर पडताच अमृत होत होते. शेवटी कृष्णाने पदन्यास करून कालियाला घायाळ केले. कृष्ण त्याच्या मस्तकावर चढला व एखाद्या जलद गमन करणाऱ्या नौकेप्रमाणे त्याला तो इकडून तिकडे फिरवूं लागला. त्याच्या फणावर कृष्ण मुरली वाजवून नृत्य करू लागला. बराच वेळ नृत्य केल्यानंतर कालीया मूर्च्छित होऊन पडला. ताबडतोब कृष्णाने विटीच्या टोकाने कालीयाच्या सर्व फणा नाथल्या. त्या कालियाची ही विटंबना पाहून त्याच्या स्त्रिया कृष्णाजवळ आल्या व त्याला म्हणाल्या, 'हे देवाधिदेवा अनंता, तुझी शक्ति अतर्क्य आहे. आम्ही तुझ्या धर्माच्या बहिणी आहोत. आमच्यावर कृपा कर व आम्हाला चुडेदान दे. आम्ही तुला शरण आल्या आहोत. आम्हाला एवढी सौभाग्यभिक्षा दे.' कृष्णाला त्यांची दया आली तो कालियाला म्हणाला, 'हे कालिया तू ब्रह्मदेवाचा पणतू असल्यामुळे तुझा वध मला करता येत नाही. परंतु तू या पाण्यात आपले विष कालवून मोठा अपराध केला आहेस. माझे सर्वगोपाळ व गाई हे पाणी पिऊन मरून पडले होते आणि त्यांच्या प्रमाणेच पुष्कळ लोक मेले असतील तर तू हे विष नाहीसे करून आताच्या आता येथून निघून जा.' तेव्हा कालिया म्हणाला, 'अनंता, गरूड मला अत्यंत त्रास देतो. त्याच्या भीतीने मी येथे येऊन राहिलो आहे. आता मी येथून दुसरीकडे गेल्यास तो पुन्हा मला त्रास देऊ लागेल.' कृष्ण म्हणाला, 'कालिया, माझ्या पायाचे चिन्ह तुझ्या मस्तकावर आहे. ते चिन्ह पाहिल्यावर गरूड मुळीच त्रास देणार नाही.'

याप्रमाणे इकडे पाण्यात कृष्ण व कालिया यांचा संवाद चालला आहे. तोवर यमुनेच्या बाहेर कृष्ण पाण्यात बुडाला अशी बातमी गोकुळात पसरली आणि सर्व लोक यमुनेच्या काठावर येऊन दु:ख करीत बसले. धिवर ठिकठिकाणी जाळी टाकून कृष्णाचा शोध करीत होते. यमुनेची दोन्ही तीरे शोधली परंतु कृष्णाचा शोध लागेना. तेव्हा सर्व आबालवृध्द शोकाकुल होऊन अश्रु ढाळू लागले. कृष्णाबरोबर खेळणारे गोपाळ तर धाय मोकलून रडू लागले. नंद व यशोदा यांच्या शोकास पारावार राहिला नाही. नन्द तर ती दु:खदायक वार्ता कानावर पडल्याबरोबर गतधैर्य होऊन दु:खाने वेडा झाला. यशोदेच्या शोकावस्थेला तर सीमाच उरली नव्हती. परंतु बलराम निश्चिंत मनाने बसून तो सर्व प्रकार पाहात होता. शेवटी यशोदा आत्महत्या करण्यास प्रवृत्त झाली असे समजताच कृष्ण त्या कालिया सर्पावर बसून पाण्यातून वर आला. त्याला पाहिल्याबरोबर सर्वांची मुखे आनंदीत झाली व त्यांच्या नेत्रातून आनंदाश्रु वाहू लागले. नन्द व यशोदा या उभयतांनी धावत जाऊन त्यास दृढ आलिंगन दिले. ईश्वराने या संकटातून कृष्णाची सुटका केली म्हणून तिने त्याची स्तुति केली. नंतर कृष्णाने या कालीया सर्पाला समुद्रात पाठवून दिले व पवित्र यमुनानदीला विषरहित केले.

कृष्णाला बरोबर घेऊन नंद, यशोदा, गोपाळ वगैरे यमुनेवरून गोकुळात येऊ लागले. पण कृष्णासाठी सबंध दिवसभर लोक उपवासी होते. त्यांना क्षुधा खूप लागल्याने व रात्रही बरीच झाल्याने सर्वांनी तेथेच मुक्काम केला. वनभोजन करून सर्वजण रात्री झोपले असता एकाएकी दावानल पेटला व त्याने सर्व जंगल व्यापून टाकले. त्या उष्णतेने सर्व लोक खडबडून जागे झाले. चारही दिशांनी अग्नी पेटलेला असल्याने कोठून पळून जाण्यास मार्ग नव्हता. सर्वजण कृष्णास शरण गेले. कृष्णाने सर्वांना डोळे मिटण्यास सांगितले व विशालमुख करून तो बारा गावे (योजने) अग्नी गिळून टाकला. नंतर पूर्ववत शरीर धारण करून सर्वांस डोळे उघडण्यास सांगितले. तो त्यांना अग्नीचे चिन्हही दिसेना. अरूणोदय होताच कृष्णाचा जयजयार करीत सर्व घरी आले.

गोपाळासह कृष्ण भांडारवडाच्या झाडाखाली कुरघोडीचा खेळ खेळत असता प्रलंबासूर गोपाळांचा वेष घेऊन सर्वांबरोबर खेळू लागला. त्याचे राज्य आले तेव्हा बलराम त्यावर बसला. तो राक्षस बलरामाला दूर घेऊन गेला. त्याचे कपट ओळखून बलरामाने त्यावर इतका भार घातला की तो जमिनीवर पडून मरण पावला.

गोकुळातील गौळणी गौरीपूजनेसाठी यमुनाकाठी आल्या होत्या. गौरीची पूजा केल्यावर यमुनेचे निर्मळ पाणी पाहून त्यांना जलक्रिडा करण्याची इच्छा झाली. अंगावरील सर्व वस्त्रे काढून तीरावरील कदंबाच्या झाडाखाली ठेवली व पाण्यात उतरून जलक्रिडेत गुंग झाल्या. इतक्यात कृष्ण तेथे आला व ती सर्व वस्त्रे घेऊन कदंबावर चढून बसला. जलक्रिडा झाल्यावर गौळणी वस्त्रे घेण्यास आल्या. पाहतात तो तेथे वस्त्रे नाहीत. लज्जेमुळे त्या खोलवर पाऱ्यात जाऊन इकडे तिकडे पाहू लागल्या. तोच त्यांना कंदबावर कृष्णाच्या हाती वस्त्रे दिसली तेव्हा त्या आवेशाने कृष्णास झटकू लागल्या व आम्हाला नग्नावस्थेत पाहण्यासाठी येथे आलास कां? आता घरी गेल्यावर नन्दराजाला कळवतो व तुला शिक्षा करायला लावतो. असे त्या म्हणू लागल्या. कृष्ण म्हणाला, 'तुम्ही पाण्याबाहेर या म्हणजे तुमची वस्त्रे मी देतो. निःशंकमनाने कोणाचीही लाज मर्यादा न बाळगता येथे खुशाल नागव्याने स्नान करतात. याबद्दल तुम्हाला शिक्षा पाहिजेच. स्त्रियांना काय करावे हे समजेना. निरूपाय म्हणून गुह्यांगे झाकून त्या बाहेर आल्या. तेव्हा कृष्ण म्हणाला, 'या अपराधाबद्दल दोन्ही हात जोडून सूर्यदेवाला नमस्कार करा.' त्यांना लाज वाटली व तसे करण्याचे टाळू लागल्या. तेव्हा कृष्ण म्हणाला, 'देहभाव सोडून नमस्कार करा म्हणजे अपराधापासून मुक्त व्हाल.' शेवटी त्यांनी तसे करताच कृष्णाने त्यांची वस्त्रे परत दिली. कृष्ण सवंगड्यामध्ये खेळण्यासाठी निघून गेला. स्त्रियाही त्यांच्या कृत्याबद्दल कौतुक करीत करीत घरी गेल्या.

एके दिवशी सर्व गोपाळांनी सकाळी उठल्याबरोबर आपल्या आईजवळून शिदोरी घेतली व गाई घेऊन वृंदावनात आले आणि यमुनेच्या काठी गाई वासरांना चरण्यास सोडून खेळ खेळू लागले. थोड्या वेळाने भूक लागली म्हणून सर्वांनी शिदोरी सोडून यथेच्छ भोजन केले व आणखी खेळू लागले. माध्यान्हानंतर त्यांना आणखी भूका लागल्या. सकाळीच सर्व खाऊन टाकले. आता जर आणखी घरी जाऊन खायला मागितले तर आईच्या हातचा मार मात्र खायला मिळेल. तेव्हा कृष्णाने त्यांना ऋषीच्या आश्रमात जाऊन 'कृष्ण व बलराम गाई चरण्यासाठी रानात आलेले आहेत, त्यांना खूप भूक लागली आहे तर अन्न द्या असे सांगा. ते अन्न देतील. ते येथे घेऊन या. मग आपण सर्वजण भोजन करू.' असे सांगितले. कृष्णाच्या सूचनेप्रमाणे ते सर्वजण ऋषींच्या आश्रमात गेले व कृष्णाचा निरोप सांगून त्यांना अन्न मागू लागले. ऋषींनीं त्यांना झिडकारून म्हटले, 'चला जा, अद्यापि देवतार्चन चालले आहे ते

पुरे झाल्यानंतर आम्ही देवांना नैवेद्य अर्पण करू व नंतर तुम्हाला अन्न मिळेल. त्याच्या अगोदर काहीही मिळणार नाही.' ऋषीकडून गोपाळ विन्मुख आलेले पाहून कृष्णाने त्यांना ऋषीपत्न्यांकडे जाऊन अन्न आणण्यास सांगितले. गोपाळ ऋषीपत्न्यांकडे जाऊन अन्न मागू लागले. तो कृष्णाचा निरोप ऐकून त्या स्त्रियांना फार संतोष वाटला व त्या आपापल्या पतीकडे जाऊन कृष्णाकडे अन्न नेण्याची परवानगी विचारू लागल्या. तेव्हा ते ऋषि रागावून म्हणाले, 'देवतांची तृप्ती झाल्यावाचून कोणलाही अन्न देणे अनुचित आहे. हे शास्त्र तुम्हाला माहित असतांना हे भलतेच विचारण्यासाठी तुम्ही इकडे कशाला आलात? तुमच्या मनाला काहीच शंका कशी वाटत नाही? ऋषींनी असे झिडकारल्यावर त्या स्त्रिया म्हणाल्या 'अहो तो कृष्ण प्रत्यक्ष भगवान देवाधिदेव या पृथ्वीवर अज्ञजनांच्या उध्दारासाठी अवत्तीर्ण झाला आहे असे तुम्हीच आम्हाला सांगितले नव्हते कां? एकदा नन्द पूजेला बसला असता कृष्ण तिथे आला व तेथील सर्व साहित्य त्याने गिळून टाकले आणि देवाच्या आसनावर आपण बसला तेव्हा यशोदा रागावली व त्याला मारण्यासाठी आली पण पाहते तो आसनावर कृष्णाचीच शंक-चक्र-गदा-पद्मधारी चर्तुभुज मूर्ति आहे.' याप्रमाणे ज्या कृष्णाने चमत्कार केले तो साक्षात् जगदीश्वर आपण होऊन आमचे जवळ अन्न मागत आहे यापेक्षां आमचे दुसरे थोर भाग्य कोणते असणार!' याप्रमाणे त्या स्त्रियांनी सांगितल्यावर त्यांच्या पतींनीं त्यांना अन्न घेऊन जाण्याची संमती दिली. परंतु त्यांच्यात एक अतिचमत्कारिक ऋषि होता. कृष्ण हा साधारण मनुष्याप्रमाणेच असून त्याचे या लोकांनी निष्कारण थोतांड माजविले आहे. असा त्याचा समज होता. त्याची स्त्री जेव्हा कृष्णाकडे अन्न घेऊन निघाली तेव्हा तो तिला कठोर शब्दांनी पुष्कळ बोलला व इतर स्त्रियांतून ओढून काढून तिला त्याने एका झाडाशी बांधले व आपण नित्यकर्म करण्यास आश्रमात निघून गेला. इकडे बाकीच्या स्त्रिया सोबतीणीबद्दल खेद करीत अन्न घेऊन कृष्णाकडे आल्या. कृष्ण बलरामाची ती प्रसन्न मुद्रा पाहून सर्व स्त्रियांना फार आनंद झाला. त्यांनी आणलेली अन्नसाम्रगी कृष्णापुढे ठेऊन त्यांना वंदन केले. त्या स्त्रिया तेथे पाहतात तो ज्या स्त्रिला ऋषीने झाडाशी बांधले होते ती स्त्री कृष्णाजवळ उभी आहे. तो प्रकार पाहून सर्व स्त्रियांना आश्चर्य वाटले. मग त्या स्त्रियांनी कृष्णाला आसनावर बसविले त्याचे चरण धुतले. त्याच्या अंगाला चंदनाची उटी लावली आणि ताटे मांडून कृष्णाला जेवावयाला बसविले. सर्वांचे पोटभर जेवण झाल्यावर त्या स्त्रियांनी सर्वांना तांबूल दिले. कृष्णाने तृप्तीचा एक कटाक्ष त्यांच्यावर टाकून घरी जाण्यास सांगितले. तेव्हा स्त्रिया म्हणाल्या, 'हे कृष्णा! आम्ही मुद्दाम तुझ्या प्राप्तीसाठी

घर सोडून येथे आलो. आता तू आम्हाला तुझ्या चरणापासून दूर करू नकोस. तू शरणांगतांचे संरक्षण करतोस मग आम्ही शरण आले असतां आमचाच अव्हेर का करतोस? त्या स्त्रियांची करूणवाणी ऐकून कृष्ण म्हणाला, 'स्त्रियांनो तुम्ही ऋषिबरोबर विवाहसंबंधाने बध्द झालेल्या असल्यामुळे त्यांच्यापासून तुम्हाला दूर करणे हे इहलोकाच्या दृष्टीने पाप आहे. एवढ्यासाठी तुम्ही आपल्या आश्रमात राहून पतिसेवा करा व माझे चिंतन करीत जा. माझे भक्त माझेपासून कितीही दूर असले तरी मी अहर्निश त्यांच्या जवळच असतो.' कृष्णाने असे सांगितल्यावर त्या स्त्रियांनी कृष्णास नमस्कार केला व आपल्या आश्रमात परत आल्या. नंतर ज्या ऋषीने त्याच्या स्त्रिला झाडाला बांधून ठेवले होते तो त्या स्त्रियाकडे आला व त्यांचा उपहास करून म्हणाला, 'तुम्ही सर्व जणी त्या गवळ्याच्या मुलाचा सत्कार करण्यासाठी गेला होता. त्याने तुम्हाला त्याचा मोबदला कांहीच दिला नाही असे मला वाटते. तो गवळ्याचा मुलगा, मनुष्यासारखा मनुष्य. तो तुम्हाला काय देणार!' हे ऐकून त्या स्त्रिया म्हणाल्या, 'अहो जगदीश्वर सर्व काही देण्यास समर्थ आहे. आमची तितकी भक्ति नाही म्हणून त्याने आम्हाला कांही दिले नाही. तुमच्या स्त्रिचे भाग्य थोर, तिची भक्ति मोठी म्हणून कृष्णाने तिला आपल्याजवळ ठेऊन घेतले आणि आम्हा सर्वांना जाण्यास निरोप दिला. त्या स्त्रियांचे बोलणे ऐकून ऋषीला फार आश्चर्य वाटले. तो म्हणाला, 'मी तर माझ्या स्त्रिला झाडाशी बांधून ठेविले आहे. तेव्हा त्या स्त्रिया म्हणाल्या, 'आम्हाला खोटे बोलून काय करायचे आहे. आम्ही तेथे प्रत्यक्ष जे पाहिले तेच तुम्हास सांगितले.' हे ऐकून तो ऋषि झाडाजवळ जाऊन पाहू लागला. तो बायको प्रेतवत झालेली दिसली. त्याने तिला झाडापासून सोडली व सर्व ऋषींना बोलावून तिची स्थिती दाखविली. तेव्हा ते सर्व म्हणाले, 'तुझी बायको मेली.' आपल्या स्त्रिची ती स्थिती पाहून त्याला कृष्णाची निंदा केल्याबद्दल फार पश्चाताप होऊ लागला. या सर्व स्त्रियांनी आपल्या स्त्रिला कृष्णाकडे जातांना पहिले तेव्हा तिचा लिंग देह तेथे गेला असून येथे फक्त स्थूल शरीर आहे असे जाणून तो सर्व ऋषींना बरोबर घेऊन कृष्णाकडे गेला. साष्टांग प्रणिपात करून तो म्हणाला, 'हे दयानिधी आम्ही अत्यंत पापी असून शास्त्रांच्या अभिमानामुळे अंध झालेले आहोत. तू निर्विकल्प निराकार असून वेळोवेळी आपल्या भक्तासाठी सगुण साकार स्वरूप धारण करीत असतोस. तुला जाणावयाला वेदांचाही अधिकार नाही. मग आम्ही मूढ तुला कोठून जाणणार. हे पुरुषोत्तमा, आम्ही अनंत अपराधी असून हे अपराध पोटात घालणारा तुझ्यावाचून कोणीही कृपावंत नाही. हे कृपानिधे आमच्या

अपराधांची आम्हाला क्षमा कर व आमचे संरक्षण कर.' त्या ऋषीची प्रार्थना ऐकून कृष्ण म्हणाला, 'अहो द्विजोत्तमहो आम्ही गवळी असून आपणा द्विजांचे आज्ञाधारक दास आहोत. मला भगवान भगवान असे म्हणून निष्कारण माझ नाव लोकात करू नका. आपली आज्ञा काय असेल ती सांगा. मी आपले कार्य करण्यास तयार आहे.' तेव्हा तो ऋषि म्हणाला, 'हे प्रभो नारायणा, माझी स्त्री मृत्यू पावली आहे. ती जिवंत होऊन मला मिळावी. एवढीच आपणास माझी विनंती आहे. ती ब्राह्मणाची विनंती ऐकून कृष्ण म्हणाला, 'ऋषिमहाराज आपण आपले आश्रमात जा म्हणजे आपली स्त्री आश्रमात कामकाज करीत आहे असे आपणास दिसून येईल.' त्याप्रमाणे तो आश्रमात येऊन पाहातो तो आपली स्त्री रोजच्याप्रमाणे कामकाज करीत आहे. ते पाहून त्याला फार आनंद झाला. अज्ञानांध जीवात्म्याने श्रीकृष्णासारख्या कल्पवृक्षांची प्राप्ति झाली असतांना सुध्दा मोक्षमुक्ती वगैरे दुसरे काही न मागता फक्त स्त्रीच मागितली. एका अभागी कंगाल दरिद्र्याने कल्पवृक्षाखाली बसून फक्त जुंपणाची तेही एक सोडून दोन जुंपणाची मागणी करावी तसा हा प्रकार आहे. (श्लोक १५०-१६७)

एकदा शरद ऋतुला प्रारंभ झाला असतां कुंजवनात जाऊन कृष्ण मुरलीवादन करीत बसला. त्यावेळी कुंजवनातील जाईजुई, मोगरा, चमेली वगैरे वेलींना फुलांचा बहर आला होता. सुवासाने सगळे अरण्य भरून गेले होते. त्यादिवशी कार्तिक शुक्ल पौर्णिमा असल्यामुळे सर्वत्र स्फटिकाप्रमाणे स्वच्छ चांदणे पडले होते. इतक्यात कुंजवनात कृष्णाचे चाललेले मुरलीवादन ऐकून गोकुळातील सर्व लोक तल्लीन होऊन गेले. त्या मधूर व चित्ताकर्षक वेणुनादाने स्त्रिया आपले देहभान विसरून गेल्या. कृष्णाच्या जवळ जाऊन ती मुरली ऐकावी असे त्यांना वाटले. त्या भान हरपून आपल्या घरादाराचा व कामकाजाचा त्याग करून कुंजवनात कशा आल्या हे त्यांनासुध्दा समजले नाही. त्या आपल्या पतींना शय्येवर निजवून ठेऊन कुंजवनात आल्या. कित्त्येक स्त्रिया मुलांना पाजीत होत्या त्या आपल्या मुलांना ठेऊन तशाच कृष्णाकडे आल्या. स्त्रियाप्रमाणेच गोपाळ, गाई, वनातील पक्षी वगैरे सर्वांची तशीच चमत्कारिक अवस्था झाली. सर्वजण कुंजवनात कृष्णाजवळ जाऊन उभे राहिले. त्या आलाप पदावर सुस्वर वेणुनादाने दशदिशांना फिरणारा वायुही स्थिर झाला होता व यमुनेचे पाणीही स्तब्ध झाले होते. स्वर्गातून देवगंधर्व व अप्सरागण ही त्या मुरलीच्या नादाने तल्लीन होऊन आकाशात आपापल्या विमानात बसून आले होते. त्या वेणुनादाने देहभान

हरपून गेलेल्या गोपींनी मुरलीच्या स्वराबरोबरच खेळण्यास आरंभ केला. कृष्णानेही आपल्या लीलेने अनेक रूपे धारण केली. आणि प्रत्येक गोपीबरोबर कृष्ण याप्रमाणे फेर धरून सुंदर गाणी म्हणून नाचू-खेळू लागले. मध्यभागीही आपणच वेणू वाजूव लागला. त्यावेळी कृष्णाची ती रासक्रिडा झाल्यावर सर्व गोपी आनंदाने नाचतच गोकुळात येऊ लागल्या. गोप आपल्या स्त्रियांचा शोध करू लागले. तो त्या आपल्या मंदीरात निद्रिस्त असलेल्या दिसल्या. नंद कृष्णाचा शोध करतो तर कृष्ण व बलराम आपापल्या मंचकावर गाढ निद्रेत असलेले दिसले. सारांश प्रभुची ती अपूर्व लीला पाहून सर्व थक्क झाले. (श्लोक १६-१७५)

मथुरेच्या कंस राजाने कृष्ण व बलराम यांच्या संहाराकरिता अनेक राक्षस पाठविले. त्यांनी अनेक प्रकारचे कपटाचरण करून बलराम-कृष्ण, गाई व गोप यांना छळले-पीडले. परंतु त्या उभयतांनी साऱ्यांचे कुडकपट जाणून त्यांचा संहार केला. शंखचूड, अरिष्टासूर, केशी, व्योमासूर वगैरे महाबलाढ्य व कपटी विद्येत निष्णांत अशा दुष्टांचा संहार झाल्यावर कंसाचे धाबे दणाणले. तो अत्यंत चिंताक्रांत झाला. एवढ्यात नारदमुनींनी सुध्दा येऊन कंसासुराच्या हृदयात कृष्ण वधाबद्दल सुरूंग पेरला. नारदाच्या सांगितल्यावरून कंसाने आपल्या चाणूर, मुष्टिक वगैरे मल्लांच्या साहायाने धनुर्याग करून त्या दोघांना बोलावून आणून त्यांचा संहार करावा असे ठरविले. उग्रसेनाने कंसाला बऱ्याच उपदेशपर गोष्टी सांगून त्या कृत्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. पण कंसाने त्याच्या हातापायात बेड्या घालून तुरुंगात टाकून हालाहाल केले. शेवटी नारदमुनि गोकुळात येऊन कृष्णाला भेटले व म्हणाले, 'हे श्रीकृष्णा, तू केवळ दुष्टांच्या संहारासाठी व साधुंच्या संरक्षणासाठी अवतार घेतला आहेस व आतापर्यंत तू बऱ्याच अंशी हे कार्य केलेले आहेस. पण प्रत्यक्ष तुझे आई वडिल व सर्व प्रजेचे पुत्रवत पालन करणारा सत्वशिल राजा उग्रसेन हे दुष्ट कंसाच्या कारागृहात खितपत पडले आहेत. त्यांच्या सुटकेचा तू काहीच कसा विचार करीत नाही. आता कंसाने धनुर्याग रचून त्यात चाणूर व मुष्टिक यांनी तुझा वध करण्याचा विडा उचलला आहे. त्या यागासाठी तुला लवकरच निमंत्रण येईल. त्यावेळी तू तेथे जा व कंसाचा नाश करून सर्वांना सुखी कर.'

नारदाने कृष्णाला सांगितल्याप्रमाणे कंसाने मथुरेस धनुर्याग उभारला. त्याचे निमंत्रण देण्यासाठी व नंदाला बलराम कृष्णासह घेऊन येण्यासाठी त्याने अक्रुरास पाठविले. कंस हा क्रूर आणि कपटी आहे आणि त्याने राम-कृष्णाला मारण्यासाठीच हा घाट रचलेला आहे हे सर्व अक्रूराला माहित होते. पण तो कंसाचा ताबेदार असल्याने कृष्णाला आणण्याची जबाबदारी त्याच्यावर आली म्हणून त्यास फार वाईट वाटले. कृष्णाला कंसाचे हे कपट कळवावे किंवा नको याबद्दल त्याने आपल्या स्त्रिचा सल्ला घेतला. तिने सांगितले, 'श्रीकृष्ण हा जगदीश्वर आहे. सर्वांच्या अंतर्यामीचे विचार तो जाणतो. आपण येथे बोलत आहोत हे देखिल सुक्ष्मदृष्टीने तो पाहात आहे. मग कंसाचा निच मनोदय त्याला कळला नसेल काय? स्वामीकार्यास अनुसरून व सज्जनांना सांभाळून वागावे. सर्व खरी हकिकत कृणाला कळविणे हे युक्त आहे.' स्त्रिच्या संमतीने अक्रूराने रथ सज्ज करून तो गोकुळात येण्यास निघाला. प्रत्यक्ष श्रीकृष्ण दर्शन होईल, त्याच्या लीला, क्रिडा पाहाण्यास मिळतील, म्हणून तो अतिशय आनंदीत होता. गाईंच्यामागे त्याची उमटलेली सुचिन्हेयुक्त पाऊले पाडून तो रथाच्या खाली उतरला व त्या पावलांना वंदन करीत भूमीवर गडबडा लोळू लागला. कृष्ण चरणधूलीने आपण पावन झालो असे त्यास वाटले. नंदाने त्याचा भव्य सत्कार केला. त्याने भगवंताचे दर्शन घेतले त्यास श्रीकृष्णाची शंक-चक्र-गदा-पद्मधारी चतुर्भुजमूर्ति दिसू लागली. अपरिमित आनंद होऊन तो सद्‌गदित झाला. श्रीकृष्णाने आपला प्रेमळ भक्त मिळाला म्हणून कृतज्ञता दाखवून त्याच्या शिरावर आपला प्रेमळ वरदहस्त ठेवला. त्यास धन्यता वाटली. नंतर नंदाने त्याची पूजा करून पंचपक्वान्नाचे भोजन दिले व नंतर येण्याचे कारण विचारले. अक्रूराने सर्व हकिकत सांगून कंसाचे निमंत्रण कळविले. नन्दाने एकटेच येण्याचे कबुल केले. पण कृष्णाने कंसाची इच्छा पूर्ण करणे जरूर आहे असा आग्रह करून बलरामासह येण्याचा आग्रह केला. ते ऐकून सर्व गोपी विव्हळ झाल्या. त्यांना अत्यंत शोक झाला. श्रीकृष्णाचा व आपला वियोग होणार म्हणून त्या फार दुःखी झाल्या. प्रभूच्या मायेने सर्वजण इतके मोहून गेले की, त्यास कृष्णाचा वियोग असह्य वाटून अनेक स्त्रिया रथाखाली आडव्या पडल्या. तेव्हा रथ उभा करून श्रीकृष्ण खाली उतरले व त्यांनी सर्वांना आत्मप्रचिती दाखवून त्यांची भ्रांति दूर केली. भक्ताजवळ श्रीकृष्ण नेहमी वास करतो अशी समजूत पडताच सर्व लोक समाधानाने परत फिरले व श्रीकृष्ण, बलराम, नंद वगैरे मथुरेस निघून गेले.

मार्गाला लागल्यानंतर अक्रूराने कृष्णास कंसाचे कपट कथन केले व आपणास फार दुःख होत आहे असे सांगितले. अक्रूराची ती निस्सीम भक्ति पाहून कृष्णाला आनंद झाला आणि त्यास आपले खरे स्वरूप दाखवून त्याची भिती दूर केली. यमुनेवर आल्यावर त्यांनी स्नानसंध्या केली. अक्रूराने पाण्यात बुडी मारताच त्याला सर्वत्र श्रीकृष्णाचीच मूर्ति दिसू लागली व त्यामुळे अक्रूराच्या मनातील भय पूर्णपणे निघून गेले. मथुरेला पोहोचल्यावर एका उपवनात ते उतरले. अक्रूर तेथून नगरात निघून गेला. कृष्ण व बलराम यांनी ठरविले की आपण राजवेष धारण करूनच नगरप्रवेश करावा. तोच राजाचा एक परीट कपडे धूवून घेऊन जात होता. तो त्यांना दिसला. बलराम-कृष्णाने त्याला ठार मारून ती सर्व वस्त्रे गोपाळांना घालण्यास दिली व स्वतःही उत्तम वस्त्रे परिधान केली. नंतर त्यांनी नगरात प्रवेश केला. वाटेत सुदाम माळी भेटला. त्याने संतोषाने सर्व फुले व फुलहार बलराम कृष्णाला व त्यांच्या सोबत्यांना दिले. नंतर कुब्जा दासी मिळाली. कंसाकरिता चंदन उगाळून घेऊन जात होंती. पण कृष्ण दिसताच त्याला तिने चंदन लावून अंगमर्दन केले. कृष्णाने तिची भक्ति पाहून तिच्या पायांच्या अंगठ्यावर पाय ठेवून व डाव्या हाताने हनुवटी धरून तिला वर उचलले. त्याबरोबर ती वाकडी व कुरुप कुब्जा सरळ होऊन एखाद्या सुंदर देवांगनेप्रमाणे दिसू लागली. ती सुखकारक अवस्था प्राप्त होताच त्या कुब्जेला कामवासना उत्पन्न झाली व कृष्णाचा हात धरून माझा स्विकार कर असे म्हणाली. 'कुब्जे मी कांही कार्यासाठी कंसाकडे जात असल्याने ब्रह्मचर्याचा स्विकार केला आहे. कंसाकडून परत आल्यावर मी तुझा स्विकार करीन.' असे कृष्णाने सांगितले. आता कृष्ण व बलराम गोपालांना मागे ठेवून सभामंडपात आले. मंडप उत्तम उत्तम वस्तूंनी शृंगारला होता. ते दोघे मंडपात येताच खेळण्याच्या सामुग्रीतील दोन धनुष्ये काढली. ती प्रचंड धनुष्ये दोघांनी वाकवून मोडून टाकली. तो प्रचंड कडकडाट ऐकून मंडप संरक्षणासाठी जे वीर होते ते त्यांच्या अंगावर धावून आले. त्या सर्वांचा संहार करून एका क्षणात मंडप उध्वस्त करून टाकला. ते वर्तमान ऐकताच कंसाच्या छातीत धडकी भरली व विनाकारण यांना इथे बोलाविले असा त्याला पश्चाताप झाला. नंतर प्रधान मंडळाच्या सल्ल्यानुसार त्याने तिकडे गोकुळावर स्वारी करून गोपाळ व गोपस्त्रियांना त्रास देण्याचे ठरविले. कृष्णाने गोपबालकांना ताबडतोब गोकुळाकडे रवाना करून स्वतः राजवाड्यात गेला. तेथे जात असतांना मथुरावासियांनी त्यांचे दर्शन घेऊन त्यांच्यावरील संकट टळावे म्हणून ईश्वराची करूणा भाकू लागले. त्याची पूजाअर्चा व नमस्कार करू लागले. हजारो प्रेक्षक श्रीकृष्णाच्या

दर्शनासाठी राजवाड्याच्या दरवाजाजवळ जमले होते. त्या दोघा सुकुमार तरूण वीरांना पाहून लोकांना त्यांचे कौतुक वाटत होते. श्रीकृष्णाचा त्यांनी जयजयकार केला. जशा प्रवृत्तीचे लोक असतात तशा स्वरूपातून त्यांना परमेश्वराचे दर्शन घडते.

श्रीकृष्ण व बलराम दरवाजात येताच तेथे एक प्रचंड हत्ती उभा होता. श्रीकृष्ण त्याला म्हणाला, 'अरे माहूता, हत्ती जरा बाजूला घे. आम्हाला राजवाड्यात जायचे आहे.' तेव्हा माहूत उपहासाने हसून म्हणाला, 'अरे गवळ्यांनो, रानात गोट्या खेळायच्या सोडून तुम्हाला या मल्लाबरोबर खेळण्याची दुर्बुध्दी कोठून आठवली? तुम्ही या हत्तीला जर एवढे भ्यालात तर पुढे काय करणार ते दिसतेच आहे.' असे म्हणून त्या माहुताने तो हत्ती उभयहतांच्या अंगावर सोडला. त्या बरोबर कृष्णाने माहुताला खाली ओढले व बलरामाने हत्तीची सोंड धरून त्याला खाली पाडले आणि त्याचे दोन्ही दात उपटून दोघांनी हातात धरले. राजवाड्यात प्रवेश करताच चाणूर, मुष्टिक, कूट, जेठी, सकुळ वगैरे मल्ल कृष्णाची वाट पाहातच बसले होते. प्रथम चाणूर उठून मध्यभागी आला. मग मुष्टिक, कूट वगैरे एकापेक्षा एक प्रचंड बलवान मल्ल आखाड्यात कुस्तीसाठी उतरले, पण सर्वांना त्या दोघांनी एकाच मुक्तीच्या मार्गावर नेऊन सोडले. हे पाहून कंस घाबरला, पण आपल्या सैनिकांना हुकून सोडू लागला. 'अरे सैनिकांनो पाहाता काय, वीर म्हणवता, तुम्ही इतके जण अजिंक्य असता या पोरांची काय बिशाद! तुम्ही सर्व एकदम चारी बाजूने होऊन त्यांच्यावर हल्ला करा.' कंस असे बोलत आहे तोच बलराम व कृष्ण त्याच्या रोखाने धावले. त्याना पाहाताच कंस मोठ्याने गर्जना करून म्हणाला, 'वीरहो धावा! धावा! ह्या दुष्टांना अगोदर धरा. यांना बंदीशाळेत नेऊन वसुदेव देवकीच्या समोर यांचा वध करा. नंदासह सर्व गवळ्यांना धरून ठार मारा. धनुर्यागाचा समारंभ पाहण्यासाठी यांना आम्ही आमंत्रण दिले, तर हे आमच्या प्राणावरच उठले. वीर हो, हे ज्यांच्या हाती सांपडतील त्यांनी यांचा संहार करावा. गोकुळाला आग लावा. त्या गवळ्यांची सर्व संपत्ति लुटून आणा. कंसाच्या गर्जना - वल्गना ऐकून कोणालाही स्फूरण येईना. बलराम-कृष्णाचा पराक्रम पाहून सर्व वीर गर्भगळीत होऊन स्तंभीत झाले होते. जे अवसान धरून समोर आले त्यांचा त्या दोघांनी तत्काळ नाश केला. शेवटी दोघेजण कंसाच्या सिंहासनावर चढले. कंस भीतीने गांगरून गेला. संतापाने वेडापिसा झाला. तो सिंहासनाजवळ उतरून सुरक्षितपणाचा मार्ग शोधू लागला. पण जिकडे पाही तिकडे श्रीकृष्ण त्याला दिसू लागला. शेवटी कृष्णाने त्याचे केस धरून कोठे पळून जातोस म्हणून खडसावले.

कंस तोंडाने बाष्कळ प्रलाप करीत केस सोडवण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु कृष्णाच्या हातातून केस सुटेनात. श्रीकृष्ण म्हणाला, 'कंसा नुसते केस ओढूनच तुझा प्राण घेतला असता पण अशा रीतीने तुझा नाश करणे हे वीराचे कर्तव्य नाही. म्हणून मी तुला आता मोकळा सोडून देतो. नीट तयारी कर. आपली शक्ति एकवटून तुला ज्या काही युक्तिप्रयुक्तिने माझा नाश करायचा असेल तर त्याची योजना कर.' कंस एखाद्या पिसाळलेल्या सिंहाप्रमाणे कृष्णावर धावला. तेव्हा कृष्णाने सहज लीलेने त्याचे छातीत एक बुक्की मारली त्याबरोबर कंस लांब जाऊन पडला. परंतु तो पुन्हा उठला व हातात तलवार घेऊन कृष्णाच्या अंगावर धावून आला. कृष्णाने त्याच हात धरून तलवार काढून घेतली व त्याला म्हणाला, 'कंसा ही तलवार तू आणून दिलीस हे फार चांगले झाले. पण निर्जनस्थळापेक्षा सर्वलोकासमक्षच तुला कायमचा या लोकातून नाहीसा केला पाहिजे.' असे म्हणून त्याला राजरस्त्यावर ओढून आणले. तलवार बलरामाजवळ देऊन नि:शस्त्र होऊन तीन वेळा कंसास ढकलले. कृष्ण अचल उभा होता. कंस आपली शिकस्त करीत होता. पण एखाद्या मुलाला खेळवावे त्याप्रमाणे कृष्ण त्याच्या प्रत्येक तोडीला तोड देऊन खेळवू लागला. तो युध्द चमत्कार पाहाण्यासाठी आकाशात देवांच्या विमानांची दाटी झाली. बराच वेळ खेळवून कृष्णाने कंसाला खाली पाडले व त्याच्या छातीवर बसून त्याचा कंठनाळ कापून मस्तक दूर फेकून दिले. कंसासारखा दुष्ट, क्रूर, जुलमी व प्रजेला छळणारा राजा मृत्यू पावल्यामुळे सर्व प्रजेला आनंद झाला. सर्वांनी श्रीकृष्णाला व बलरामाला खांद्यावर घेऊन मिरवणूकीने घेऊन चालले. रस्त्याने अनेक वाद्ये वाजवून पताका उभारून नाचू लागले. इकडे कंसाच्या राण्या आक्रोश करीत आल्या व कंसाच्या छिन्नभिन्न झालेल्या शरीरावर पडून शोक करू लागल्या. त्या स्त्रियांची पतिनिष्ठा पाहून कृष्णाला त्यांची दया आली. त्याने त्या स्त्रियांना योग्य उपदेश करून त्यांचे दु:ख कमी केले. मग त्याची और्ध्वदैहिक क्रिया केली. तो मुक्तीला गेला हे निराळे सांगणे नको.

श्रीकृष्ण व बलराम कंसवधानंतर आपल्या माता पित्याकडे जेथे त्यांना तुरुंगात ठेवले होते तेथे गेले. त्यांच्या हातापायातील बेड्या काढल्या व आई-वडिलांना ते कडकडून भेटले. त्या स्पर्शाने त्यांचे काचलेले हातपाय पूर्ववत झाले. 'जन्म दिल्यापासून आजतागायत ज्या मुलांना कधी न्हाऊ घातले नाही, कधी स्तनाला लावून पाजले नाही, कधी मांडीवर घेऊन खेळविले नाही. कधी पाळण्यात निजवून झोके दिले

नाहीत, कधी कडेवर घेऊन हिंडविले नाही, कधी जेवायला घातले नाही, अशा मुलांची एकाएकी भेट झाल्यावर त्यांना काय वाटले असेल याची कल्पना करणे अशक्य आहे. वात्सल्याच्या प्रेमभरात वसुदेव देवकींनी त्या दोघांना वारंवार कुरवाळून त्यांचे चुंबन घेतले. देवकी म्हणाली, 'बाळानो, आम्ही नावाचे मात्र तुमचे आईबाप आहोत. तुमचे लालनपालन करण्याचा योग आम्हां हतभाग्यांच्या नशिबी नव्हता. जे आईबाप मुलाचे योग्य लालनपालन करीत नाहीत ते पुत्रऋणातूनमुक्त होत नाहीत असे म्हणतात.' आपल्या प्रिय मातेचे ते उद्‌गार ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, 'जे आपल्या पुत्राचे अहर्निश कल्याण चिंतीतात, त्यांचा सर्व पातकापासून उध्दार होतो व ते सर्व ऋणातून मुक्त होतात. त्याप्रमाणे तुम्ही उभयता निष्काम बुध्दीने - आमचे कल्याण चिंतीत होतात म्हणून आमचे हातून एवढे महत्वाचे कार्य घडून आले. तुमची नि:स्वार्थ प्रीति हीच माझी सर्वशक्ति होय त्याच शक्तीमुळे मी दुष्टांचा संहार करू शकलो. ही सर्व तुमचीच कृपा आहे.' याप्रमाणे आई-बापाचे त्याने सांत्वन केले व त्यांच्या चरणावर मस्तक ठेवले आणि आपल्या नयनाश्रूंनी त्यांचे चरण धुतले. बलरामानेही आपल्या आईबापांना त्याचप्रमाणे वंदन केले.

कंसाने राज्यतृष्णेच्या भरीस पडून आपल्या जन्मदात्या पित्याला तुरुंगात ठेवले होते व तेथे त्याचे बेसुमार हाल मांडले होते. उग्रसेन सत्वशील असून ईश्वरभक्त होता. निमूटपणे हे सर्व दु:ख तो सहन करीत होता. तुरूंगवासातच कंसाच्या हातून आपला मृत्यू होणार असे त्यास वाटत होते त्या दु:सह स्थितीत एकेक दिवस कष्टाने कंठीत होता. अशा स्थितीत उग्रसेन असता श्रीकृष्ण तेथे गेला. दरवाजा उघडून, 'उग्रसेन महाराजांचे कुशल असो! उग्रसेन महाराजांचा जयजयकार असो!' असा जयध्वनी केला. ते ऐकून उग्रसेनाला आश्चर्य वाटले व इकडे तिकडे पाहू लागला. कृष्ण व बलराम त्याच्याजवळ जाऊन त्यांनी त्यास आलिंगन दिले. कृष्ण म्हणाला, 'उग्रसेना, तुला सर्व संकटातून मुक्त केले आहे. केवळ साधुंच्या संरक्षणासाठी मला कंसाचा वध करावा लागला. मी त्यात आपला कोणताही स्वार्थ साधला नाही, कंसाच्या राज्याची मला काडीमात्रही अपेक्षा नाही. तू आपल्या सिंहासनावर बसावे व आनंदाने राज्य चालवावे अशी माझी इच्छा आहे.' मग कृष्णाने उग्रसेनाला राज्याभिषेक करून समारंभाने सिंहासनावर बसविले. उध्दव व अक्रूर यांना प्रधान नेमले. त्यांनी मथुरेचे राज्य उत्तमरीतीने चालवून सर्व प्रजेला सुखी केले. उग्रसेनाच्या विनंतीवरून पुढे श्रीकृष्ण, बलराम वसुदेव-देवकी, नन्द-यशोदा वगैरे परिवारासह

मथुरेत राहिले. श्रीकृष्णाच्या समागमामुळे मथुरेतील लोक प्रत्यक्ष वैकुंठाचे सुख भोगू लागले. ज्या लोकांना उग्रसेनासारखा राजा, उध्दव अक्रूरासारखे प्रधान, श्रीकृष्णासारखा सखा लाभला ते खरोखर फार भाग्यवान होत. (श्लोक १६६-१८२)

श्रीकृष्ण आपल्या परिवारासह मथुरेस राहात असतां कंसाच्या राण्या आपला पिता जो जरासंध त्याच्याकडे गेल्या व घडलेली सर्व हकिकत त्याला निवेदन केली. तेव्हा जरासंधाने १७ वेळा मथुरेवर स्वाऱ्या केल्या, पण प्रत्येक वेळी कृष्णाने त्याचा पराभव केला. त्याच्या या स्वाऱ्यामुळे मथुरेतील लोक फार त्रस्त झाले. जरासंधाने पुढे पुन्हां स्वारी करून कालयवनाला बरोबर घेतले. श्रीकृष्णाने द्वारका या नावाची नविन नगरी स्थापन करून त्यात वास्तव्य केले. कालयवनाचा मुचकुंदाकडून वध करविला. जरासंधाचा नाश भीमाकरवी करविला. त्याच्याच अस्थिंचे फासे बनवून शकुनि कपटद्यूत खेळत असे. जरासंधाचा सहदेव नावाचा मुलगा होता. त्याला सिंहासनावर बसवून त्याच्या बंदिशाळेत असलेल्या राजांची सुटका केली. पुढे द्वारकेस राहात असता बलरामाचा विवाह रैवत राजाची मुलगी रेवती हिचेबरोबर झाला. तर श्रीकृष्णाचा विवाह विदर्भ देशातील कौण्डिन्यपूर नगराच्या भीमक राजाच्या मुलीशी - रूक्मिणीशी झाला. श्रीकृष्णाचे आणखी बरेचसे विवाह झालेले आहेत. त्यात मुख्य सत्यभामा, जांबवंती, कालिंदी, मित्रवृंदा, याज्ञाजिती, भ्रदा, लक्ष्मणा ह्या स्त्रियांशी निरनिराळ्या काळी लग्न करून श्रीकृष्णाने गृहस्थाश्रमात पदार्पण केले. पुढे एकदा भौमासुर अर्थात नरकासुरावर स्वारी करून श्रीकृष्णाने त्याला ठार मारून त्याच्या बंदीगृहात असलेल्या जगातील सुंदर लावण्यलतिका अशा सोळा हजार एकशे कुमारीकांना सोडविले. समाजात त्यांची दुर्दशा होऊ नये व त्या सर्वांना आश्रय मिळावा म्हणून श्रीकृष्णाने त्यांच्याशी लग्न केले व त्याच्या पालन पोषणसंरक्षणाची जबाबदारी स्वत:चे शिरावर घेतली.

एकदा धर्मराजाने केलेल्या राजसूय यज्ञात सर्व देशोदेशीचे राजे महाराजे उपस्थित असतांना मोठ्या थाटाने पूजा साहित्याचे ताट यज्ञमंडपात आणले व अग्रपूजेचा मान कोणाला द्यावा म्हणून विचारले. तेव्हा कृष्णाने भिष्माला मान द्यावा अशी सुचना केली. परंतु ही श्रीकृष्णाची सूचना शिशुपालाने नापसंत केली. तो म्हणाला, 'भीष्माला पुत्र किंवा कन्या कोणतीच संतती नाही. अर्थात तो गृहस्थ नाही. यति म्हणावा तर तसे याचे तप:सामर्थ्यही दिसत नाही. मग याला अग्रपूजेचा मान काय म्हणून द्यायचा? वडिल म्हणून द्यावयाचा असेल तर हा खरोखर वडिल नाही.

शूद्र वृध्दाला मान देतात. ब्राह्मण ज्ञात्याला वृध्द समजतात. वैश्य श्रीमंताला वृध्द समजतात आणि जो सर्व क्षात्रधर्म जाणत असेल त्याला क्षत्रीय वृध्द समजतात. त्याप्रमाणे या भीष्माच्या अंगी क्षात्रधर्माची कांहीच चिन्हे नाहीत. अर्थात याला अग्रपूजेचा मान केव्हाही देता येणार नाही.' याप्रमाणे शिशुपालाने सभेमध्ये कडकडाट केला. तेव्हा सर्व सभासद शिशुपाळावर प्रक्षुब्ध झाले. भीम तर जागेवरून मुठी आवळून उठला. परंतु भीष्माने त्याला मागे ओढले व शांत करून जागेवर बसविले मग जरासंधाचा मुलगा सहदेव याने श्रीकृष्णाला अग्रपूजेचा मान द्यावा अशी सुचना केली. परंतु शिशुपाळाला श्रीकृष्णही पसंत पडले नाहीत. त्याने कृष्णाची सारखी निंदा सुरु केली. तेव्हा त्याची प्रत्येक शिवी श्रीकृष्ण बोटे घालून मोजू लागला. एक, दोन, तीन याप्रमाणे मोजता मोजता एकशे एक संख्या पूरी झाली त्याबरोबर श्रीकृष्णांनी शिशुपाळावर सुदर्शनचक्र सोडून त्याचा नाश केला. शिशुपाळाचा बंधू दंतवक्र हा भावाचा सुड घेण्यासाठी कृष्णाच्या अंगावर धावून गेला. परंतु त्याचाही श्रीकृष्णांनी सुदर्शनचक्र सोडून नाश केला. त्या दोघांचा मित्र विदूरथ हा होता. तो आपली गदा सरसावून श्रीकृष्णाच्या अंगावर चालून आला. परंतु कृष्णांनी त्याच्या हातातील गदा घेऊन त्याच गदेने त्याचा संहार केला. शिशुपाळ व वक्रदंत हे पूर्वीचे जयविजय नावाचे परमेश्वराचे द्वारपाळ होते. ब्रह्मशापामुळे त्यांना दानवत्व प्राप्त झाले. पण त्यांचा संहार होताच त्यांची प्राणज्योत भगवंताच्या आत्मज्योतीत येऊन मिळाली.

एकदा दुर्वासऋषि चातुर्मासात गोमतीच्या काठी येऊन राहिले होते. त्यांची पूजा करण्याकरिता कृष्णाच्या सोळा हजार एकशे आठ स्त्रिया निरनिराळे पूजासाहित्य व नैवेद्याची ताटे घेऊन निघाल्या. परंतु मार्गात गोमती पाण्याने तुडूंब भरून वाहात असल्यामुळे पलिकडे जाणे अशक्य होते. म्हणून त्या सर्व कृष्णाकडे परत आल्या व आपणास पलिकडे पोहोचते करण्याविषयी त्यांनी श्रीकृष्णाची विनंती केली. तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, 'तुम्ही सर्वजणी गोमतीला असे सांगा की जर श्रीकृष्ण ब्रह्मचारी असेल व आम्हीही जर व्रतस्थ कुमारी असू तर तू दुभंग होऊन आम्हाला मार्ग दे.' त्या स्त्रियांनी गोमतील तसे म्हटल्याबरोबर ती दुभंग झाली. ते पाहून सर्वजणी आश्चर्यचकित झाल्या व पलिकडे निघून गेल्या. नंतर त्यानी दुर्वासांची यथाविधी पूजा केली व आपापले नैवद्य समर्पण केले. दुर्वासांनी सर्वांची इच्छा जाणून ते सर्व अन्न खाऊन टाकले. सोळा हजार एकशे आठ ताटातले सर्व अन्न एकटयाने खाल्लेले पाहून त्या स्त्रियांना मोठे आश्चर्य वाटले. भोजन झाल्यावर दुर्वासांनी त्यांना

आशिर्वाद दिला व जाण्याची परवानगी दिली. तेव्हा त्या दुर्वासांना म्हणाल्या, 'ऋषिमहाराज गोमतीला फार पाणी आले आहे. पलिकडे जाण्यास मार्ग नाही तेव्हा आम्ही पलिकडे कसे जावे?' दुर्वासांनी सांगितले, 'तुम्ही गोमतीला माझा असा निरोप कळवा कि, दुर्वासऋषि जर खरोखर निराहारी असेल तर तू दुभंग हो.' याप्रमाणे दुर्वासांचा निरोप गोमतीला सांगताच नदी दुभंग झाली. नंतर सर्व स्त्रिया पलिकडे निघून गेल्या. त्यांना झालेल्या त्याप्रकाराबद्दल फारच आश्चर्य वाटले व त्यांनी सर्व प्रकारचा अहंभाव सोडून प्रभुची चिद्शक्ति अशा रूक्मिणीस याबद्दल विचारताच तिने भगवंताच्या लीलेविषयी इतर स्त्रियांना सांगितले कीं, 'आपणा सर्वांजवळ प्रभु सगुण स्वरूपाने एकाच वेळी सगळीकडे राहातात यात अशक्य असे काहीच नाही. सर्वांजवळ असून तो आत्मस्वरूप भगवंत अलिप्त आहे. म्हणूनच ते ब्रह्मचारी आहेत. तसेच दुर्वासऋषि हे रूद्ररूप आहेत. ते संपूर्ण विश्वही खाऊन टाकण्यास समर्थ आहेत. तेथे आपणा सर्वांच्या अन्नाचा हिशेब काय?' याप्रमाणे रूक्मिणीने त्या सर्व स्त्रियांना समजावून सांगून त्यांची शंका दूर केली. (श्लोक १८३-१९४)

शेषशायी नारायणाच्या नाभीकमलातून ब्रह्मदेवाचा जन्म झाला. ब्रह्मदेवापासून दक्ष प्रजापति झाला. त्या दक्षाची मुलगी अदिती होय. ती कश्यपाला दिली होती. तिच्यापासून विवस्वान नावाचा मुलगा झाला. त्याचा मुलगा मनू, त्याचा पुरुरवा, त्याचा आयु, त्याचा पुत्र नहुष, त्याचा मुलगा ययाति हा शुक्राचार्यांचा जावई होता. पण दानवकन्या शर्मिष्ठे पासून ययातीला पुरु झाला. त्याचा मुलगा जनमेजय, त्याचा पुत्र प्रतिध्वान, त्याचा शर्याति, त्याचा अहच्याति व त्याचा पुत्र जयत्सेन झाला. त्याचा पुत्र प्रचिन्वान, त्याचा मुलगा महाभीम, त्यापासून प्राचिनधन्वा, त्याचा मुलगा अयुत, त्याचा पुत्र अक्रोधन, त्याचा देवातिथी, त्याला ऋच नावाचा पुत्र झाला, त्याचा पुत्र दक्ष, दक्षाचा इलिन त्याचा मतिनार, मतिनारचा मुलगा दुष्यंत, त्याचा भरत. भरताच्या मुलाचे नाव सुहोत्र, त्याचा मुलगा हस्तिप, झाला. यानेच हस्तिनापूर नगर निर्माण केले. या हस्तिपाचा मुलगा बिकट, त्याचा अजमिढ, त्याचा पुत्र संहरण, त्याचा परिक्षीत, त्याचा भीम, भीमाचा प्रतीप झाला. प्रतीपाला शंतनू व वाल्मिक झाले. शंतनूचा पूत्र भीष्म, याच शंतनुला सत्यवतीपासून चित्रांगद आणि विचित्रवीर्य ही दोन मुले झाली. विचित्रविर्याला धृतराष्ट्र, पांडू व विदूर ही तीन मुले झाली. यापैकी धृतराष्ट्राला शंभर, पंडूला पाच पुत्र झाले तेच कौरव, पांडव होत. पांडवाना द्रौपदीपासून प्रतिविंध्य, श्रुतसोम, श्रुतकिर्ती, शतानिक व श्रुतकर्मा हे पाच पुत्र झाले.

श्रीकृष्णाची बहिण सुभद्रा अर्जुनाला दिली होती. तिला अभिमन्यु नावाचा मुलगा झाला. त्याचा परिक्षीत, त्याचा जनमेजय, त्याला शतानिक आणि शतकर्ण ही दोन मुले होती. शतकर्णाचा मुलगा सुदंत हा होय. अशा प्रकारची ही पुरुवंशाची वंशावळ होय.

पूर्वी इक्ष्वाकु कुळात महाभिष नावाचा पराक्रमी राजा होऊन गेला. त्याने एक हजार अश्वमेध व शंभर राजसूय यज्ञ केले. त्यामुळे त्यास पुण्य प्राप्त झाले व तो स्वर्गलोकी गेला. एकदा तो ब्रह्मदेवाच्या सभेत बसला असतां गंगा घाईघाईने वस्त्र नेसत होती ते सुटले. ते बघताच देवसभेत बसलेले सर्व लोक खाली पाहू लागले. परंतु महाभिषाने मात्र मान खाली न घालता उलट तिच्याकडे एकटक बघितले. इतक्यात गंगेची नजर त्याच्याकडे गेली व ती हसली. ते पाहताच ब्रह्मदेवांनी त्या दोघांना असा शाप दिला की, 'तुम्ही दोघेही मृत्युलोकांत मनुष्य जन्म घ्याल व त्याठिकाणी तुम्ही वासना पूर्ण झाल्यावर परत तुम्हाला स्वर्गलोक प्राप्त होईल.' त्यानंतर गंगा आकाशात फिरत असता अष्टवसु रडत असतांना तिच्या दृष्टीस पडले तेव्हा तिने त्यांना रडण्याचे कारण विचारले असता ते म्हणाले कीं, 'वसिष्ठऋषींची गाय चोरून आम्ही आमच्या आश्रमात बांधली म्हणून त्यांनी आम्हाला शाप दिला कीं, तुम्ही माणसाच्या जन्माला जाल.' म्हणून आम्ही तुझ्या पोटी जन्म घेऊ. आम्ही जन्माला येताच तू आम्हास गंगेत फेकून दे त्यामुळे आम्ही शापातून मुक्त होऊ.' हे ऐकून गंगा म्हणाली, 'मी तसे केले तर लोक मला राक्षसी म्हणतील, आठही मुलांना मी पाण्यात कशी टाकू?' वसु म्हणाले कीं, 'तु सातांना पाण्यात टाक व आठव्याचा सांभाळ कर. आम्हा आठही वसुंचा मिळून तुझा आठवा पुत्र महाप्रतापी जितेंद्रिय आणि धर्मात्मा होईल.'

यानंतर काही वर्षांनी हस्तिनापुराचा प्रतीपराजा एकदिवस शिकार करीत हिंडत असता गंगेच्या तीरावर आला व अत्यंत थकल्यामुळे विश्रांतीसाठी थोडावेळ तेथे बसला. इतक्यात त्या पवित्र नदीच्या प्रवाहातून गंगेची पांढरे वस्त्र नेसलेली अत्यंत रूपसुंदर गौरवर्ण मूर्ति बाहेर निघाली. राजा अत्यंत आश्चर्यचकित होऊन ही सुंदर कन्या कोण आहे म्हणून तिच्याकडे पाहू लागला. इतक्यात ती राजाच्या उजव्या मांडीवर येऊन बसली व मला वर असे त्याला म्हणाली.' तेव्हा राजा म्हणला की, 'बाळे, मी एक पत्नी आणि व्रतस्थ आहे. आणि तू माझ्या उजव्या मांडीवर बसल्यामुळे तू मला मुलीसारखी किंवा सुनेसारखी आहेस म्हणून तू माझी सुन हो.'

त्यावर गंगा म्हणाली की, 'राजा माझ्या पोटी जो पुत्र होईल तो तुझ्या वंशाची किर्ती वाढवीन.' असे बोलून गंगा अंतर्धान पावली.

महाभिष राजा हा प्रतीपाचा पुत्र शंतनू याच्या रूपाने जन्मास आला होता. देशोदेशीच्या राजांची शंतनु आपला जावई व्हावा अशी इच्छा होती. परंतु प्रतीपाच्या मनात गंगेला आपली सून करावी असे होते. त्याप्रमाणे प्रतीपने एकदिवस शंतनुस सांगितले कीं, 'गंगा तुला माळ घालणार आहे म्हणून तू दुसऱ्या स्त्रिशी लग्न करू नकोस. नंतर लवकरच प्रतीपाने शंतनुला सिंहासनावर बसविले व तो तप करण्यासाठी निघून गेला. इकडे शंतनू गंगातीरावर नेहमी शिकार करण्यासाठी जाऊ लागला. परंतु त्याचा खरा हेतु शिकारीचा नसून गंगेची भेट व्हावी हा होता. एके दिवशी गंगा सुंदर रूप गुण लावण्याने प्रगट झाली व तिने शंतनुला माळ घातली तेव्हा ती राजाला म्हणाली कीं, 'राजा, मी जे कांही करीन ते प्रमाण मानले पाहिजे. जर मी केलेली गोष्ट तुला मान्य नसेल तर मी त्याच क्षणी तुझ्याजवळून निघून जाईल.' राजाने तसे वागण्याचे तिला वचन दिले व तिला तो आपली पट्टराणी करून घरी घेऊन आला. पुढे राणीला दिवस गेले व योग्यकाळी तिला मुलगा झाला. परंतु त्या मुलाला ताबडतोब राणीने गंगेच्या प्रवाहात सोडले. अशी सातमुले तिने पाण्यात नेऊन सोडले. शंतनु भीडेने कांही बोलला नाही. राणीला नंतर सूर्यासारखा तेजस्वी असा मुलगा झाला. तो ती गंगेत टाकण्यास नेऊ लागली तोच राजा आडवा झाला आणि तिला म्हणाला, 'चांडाळणी, हा तरी मुलगा राहू दे. त्याला इतराप्रमाणे पाण्यात टाकून तू त्याची वाट लावू नकोस!' हे ऐकून गंगा म्हणाली कीं, 'अष्टवसुस मी आज शापातून मुक्त केले. मी आता येथून जाते. हा आठवा मुलगा मी तुला योग्य समयी आणून देईन. असे म्हणून गंगा गुप्त झाली. आठव्या मुलाला ती आपल्याबरोबर घेऊन गेली. त्यादिवसापासून राजा दु:खी बनला. रात्रंदिवस त्याचे मन डळमळू लागले. तो अस्वस्थपणाने राज्यकारभार पाहू लागला. अशा तऱ्हेने छत्तीस वर्षे गेली. एकदिवस राजा गंगेच्या काठी शिकार करीत असता गंगेचा झुळझुळ वाहणारा प्रवाह शांत झालेला पाहून त्याला आश्चर्य वाटले व त्याचे कारण शोधून काढण्याची त्याला इच्छा झाली. त्याप्रमाणे शोध करीत असता तो हरीद्वारापर्यंत जाऊन पोहोचला. त्याठिकाणी एका पराक्रमी मुलाने बाणांचे जाळे करून गंगेचा प्रवाह अडवून धरला आहे असे दृश्य त्याला दिसले. तो मुलगा शंतनुचाच होता. पण त्याला त्याची ओळख पटली नाही. परंतु त्याला

पाहून राजाच्या मनात विलक्षण मोह उत्पन्न झाला. राजाने त्याला विचारले कीं, 'बाळ तू कोणाचा पुत्र आहेस?' हा प्रश्न ऐकताच तो मुलगा एकदम गंगेच्या प्रवाहात गुप्त झाला. राजाला त्यावेळी अत्यंत वाईट वाटले. त्याला आपल्या राणीची आठवण झाली. त्याच्या डोळ्यातून अश्रु वाहू लागले. गंगेची मूर्ति आठवून तो तिला म्हणाला की, 'हे प्रिये, आठवा पुत्र आणून देईन असे वचन तू मला दिले होतेस ते वचन यावेळी मला भेटून आणि पुत्र देवून खरे कर. आता मन कठिण करू नकोस.' राजाने असे म्हणताच गंगा मुलाला हातात धरून एकदम प्रगट झाली. त्यां मुलाच्या अंगावर उत्तम वस्त्रे होती व त्यावर मोत्यांच्या माळा झळकत होत्या. दुसरेही अनेक अलंकार त्याच्या अंगावर होते. त्या मुलाला राजाच्या हवाली करून गंगा त्याला म्हणाली, 'ह्या आपल्या मुलाला सांभाळा. याला वशिष्ठांनी विद्या शिकविली आहे. भार्गवरामानं धनुर्विद्या शिकविली आहे, बृहस्पतीपाशी मंत्रविद्या शिकून हा प्रवीण झाला आहे. हा तुझ्या कुळाची कीर्ति वाढविल. याला आपल्या घरी घेऊन जा आणि युवराजपद दे. हा तुझ्या आज्ञेप्रमाणे वागेल.' असे बोलून गंगा गुप्त झाली. नंतर राजा भिष्माला घेऊन हस्तिनापुरात आला. सर्व राजे आणि प्रजा यांनी त्यांचे स्वागत केले. व मंगल वाद्यांच्या गजरात पितापुत्र राजवाड्यात आले. पुढे राजाने भिष्माकडे राज्यकारभार सोपविला व भिष्माने उत्तम प्रकारे राज्य केले.

एकेदिवशी शंतनु अरण्यात शिकार करीत हिंडत असता एकाएकी त्याला दिव्य सुवास आला. त्या वासाचा शोध घेत असता एका कोळ्याचे नगर त्याच्या दृष्टीस पडले. त्याठिकाणी नदीच्या तिरी एक कोळ्याची मुलगी एका होडीचे रक्षण करीत होती. तिचे लावण्य पाहून राजा मोहित झाला. तिच्याच अंगाला तो दिव्य वास येत होता. व तो लांबवर दरवळत होता. राजा तिला म्हणाला, 'हे सुंदरी तू कोण आहेस? तू कोणाच्या नौकेचे रक्षण करीत आहेस? ती स्त्री म्हणाली कीं, 'मी निषेधराजाची मुलगी सत्यवती आहे. मी उतारूंना पैलतीराला नेत असते.' हे ऐकून राजा निषाधराजाच्या घरी गेला. त्याला म्हणाला कीं, तुझी ही सुंदर मुलगी तू मला दे. मी तिला माझी पट्टराणी करीन.' निषाध म्हणाला कीं, 'महाराज आपले म्हणणे मला मान्य आहे. परंतु माझी एक अट आहे. ती अशी कीं, हिला जो मुलगा होईल त्याला आपल्यानंतर सिंहासनावर बसविण्याचे वचन आपण मला द्यावे.' ते ऐकून राजा दचकला व मनात म्हणाला, 'भीष्मासारखा पुत्र तिन्ही लोकात मिळणार नाही. सर्वगुणसंपन्न व ज्याच्यावरून तनमनधन प्राण ओवाळून टाकावे असा

तो पुत्र आहे. राज्यपदाचा त्याचा अधिकार घेऊन त्याला निराश्रीत करावे हे योग्य नाही.' राजा शंतनु काही न बोलता तेथून उठला व परत आपल्या नगराला आला. परंतु त्याच्या मनात मात्र सत्यवतीचेच विचार येत होते. राजा नेहमीसारखा आनंदी न दिसता चिंतातूर का दिसतो हे भीष्माला कळेना. शेवटी तो हात जोडून शंतनूला म्हणाला कीं, 'बाबा असे चिंतातूर कां? कोणत्या गोष्टीची आपल्याला काळजी वाटते आहे. माझ्या सारखा मुलगा असतांना आपण काळजीत असणे योग्य नाही. प्रत्यक्ष इंद्रालाही दुर्लभ असलेली वस्तू मी आपणास क्षणात आणून देईन पण आपण आपल्या काळजीचे कारण सांगावे.' हे ऐकून शंतनु म्हणाला, 'भीष्मा तुझ्यासारखा दुसरा मुलगा मिळणार नाही हे खरे आहे. परंतु तुझ्या पाठीवर तुला भाऊ असावा असे मला वाटते.' हे ऐकून भीष्माने प्रधानाला बोलावून तो म्हणाला कीं, 'महाराजांना धर्मसंग्रहासाठी पत्नि पाहिजे म्हणून एखादी वधू बघा.' यावर शंतनुने आपल्या पुरोहितांना एकान्तात बोलावून म्हटले, 'निषाधराजाची मुलगी सत्यवती हिला राणी करावे. अशी माझी इच्छा आहे. तिच्याशिवाय दुसरी स्त्री मला नको.' राजाची ही इच्छा पुरोहितांनी भीष्माला कळविली. तेव्हा तो लगेच सत्यवतीच्या बापाकडे गेला. त्याने त्याचे स्वागत केले. भीष्माने त्याला आपला येण्याचा हेतु कळविला. तेव्हा भीष्म म्हणाला, सत्यवतीच्या उदरी जो पुत्र होईल त्यावर मी छत्र धरीन आणि त्याच्याच वंशाची राज्यावर स्थापना करीन हे त्रिवार सत्य आहे. माझा हा शब्द केव्हाही खोटा होणार नाही.' हे ऐकून निषाध म्हणाला, 'महाराज आपण आपला शब्द खोटा करणार नाही. पण आपली मुलें राज्य हिरावून घेणार नाहीत याची खात्री?' निषाधराजाचे शब्द ऐकून भीष्माने अचाट अशी प्रतिज्ञा केली. तो गर्जून म्हणाला, 'मी आजन्म ब्रह्मचारी व व्रतस्थ राहीन अशी प्रतिज्ञा करतो. यापुढे जगातील सर्व स्त्रिया मला माझ्या गंगामातेसमान आहेत. मदनाचा मी संहार करतो. या क्षणापासून ब्रह्मचर्याचे व्रत मी घेतो. संततीवाचून मी मोक्षपदाची प्राप्ती करवून घेईन.' भीष्माची ही अलौकिक प्रतिज्ञा ऐकताच त्या सर्व मंडळीनी त्याला वडिलाबद्दल जे प्रेम वाटते होते त्याचा जयजयकार केला. नंतर निषाधाने सत्यवतीला भीष्माच्या स्वाधिन केले. नंतर भीष्मांनी सोन्याच्या रथातून सत्यवतीला हस्तिनापुरास आणले व पुढे लवकरच चांगला मुहूर्त पाहून तिचे शंतनुशी लग्न लावले. त्यावेळी शंतनूने प्रसन्न होऊन भीष्माला असा आशिर्वाद दिला कीं तू भीषण अशी प्रतिज्ञा केलीस म्हणून तुला यापुढे 'भीष्मप्रतिज्ञ' म्हणून ओळखतील. भीष्मा तू इच्छामरणी होशील आणि तिनही लोकात धन्य होशील.'

शंतनूला पुढे सत्यवतीपासून चित्रांगद व विचित्रवीर्य असे दोन मुले झाली. काही वर्षांनी शंतनु स्वर्गवासी झाला. तेव्हा भीष्मांनी चित्रांगदाला गादीवर बसवून त्याला राज्यभिषेक केला. त्याने सर्व जग जिंकून अपार धन मिळविले. प्रत्येक स्वारीत त्याचा जय झाला कारण त्याचा पाठीराखा भीष्म होता. परंतु गंधर्वांचा राजा चित्ररथ याला आपलेच नाव या राजाला आहे असे पाहून त्याचा हेवा वाटला व त्याने हस्तिनापूरावर स्वारी केली आणि चित्रांगदाचा कपटाने प्राण घेऊन तो गंधर्वलोकी पळून गेला. मग भीष्मांनी विचित्रविर्याला गादीवर बसविले व त्याच्यासाठी योग्य अशी वधू भीष्म शोधू लागला. इतक्यात कांही ऋषींनी त्याला माहिती दिली कीं काशीच्या राजाने आपल्या अंबा, अंबिका व अंबालिका नावाच्या मुर्लींचे स्वयंवर मांडले आहे. हे ऐकून भीष्म तेथे गेला व त्या तिन्ही मुर्लींना जिंकून त्यांनी हस्तिनापुरास आणले व सत्यवतीच्या स्वाधिन केले. त्यावेळी अंबा म्हणाली मी मनापासून शाल्व राजाला वरले आहे. हे ऐकताच भीष्माने तिला रथात बसवून सन्मानाने पुष्कळ सैन्य बरोबर देऊन शाल्व राजाकडे पाठविली. परंतु शाल्वाने तिला 'भीष्माने तुला जिंकून नेल्यामुळे आता मी तुझा स्विकार करणार नाही.' असे सांगून परत पाठविले. इकडे भीष्मांनी व्यास वगैरे ऋषींना बोलावून अंबिका व अंबालिका यांचे विचित्रविर्याशी मोठ्या थाटात लग्न लावले. अंबा परत आल्यावर भीष्माला म्हणाली, 'तुम्ही मला स्वयंवरातून जिंकून आणले आहे तेव्हा मी आता तुम्हालाच वरमाला घालणार आहे.' तेव्हा भीष्म म्हणाला, 'अंबे, तू मला आईप्रमाणे आहेस. सर्वच स्त्रियांना मी आईसारख्या समजतो. म्हणून तू आपल्या बापाच्या घरी परत जा.' भीष्माचे हे बोलणे ऐकून अंबेला आपला अत्यंत अपमान झाल्यासारखे वाटले. ती एकटीच बदरीकाश्रमी निघून गेली. तेथे तिने खडतर अशी तपश्चर्या केली. श्री परशुरामांना प्रसन्न केले व त्यानी तिला वर मागण्यास सांगितले तेव्हा तिने त्यांना असे सांगितले की, 'तुमचा शिष्य भीष्म याच्याशी माझे लग्न लावून द्या.' ते ऐकून परशुराम तिला बरोबर घेऊन हस्तिनापुरास आले व भीष्मांना अंबे बरोबर लग्न करण्यास सांगितले. परंतु भीष्माने आपली प्रतिज्ञा सांगून लग्न करण्यास नकार दिला. तेव्हा परशुरामांना राग आला व त्यांनी भीष्माला युध्दाचे आव्हान दिले. भीष्मांनी ते स्विकारले. त्या दोघांचे निकराचे युध्द झाले. त्यात भीष्मांनी परशुरामास बाणांनी खिळवून टाकले. आपल्या शिष्याचा हा पराक्रम पाहून परशुराम संतुष्ट झाले. त्यांनीसुध्दा अंबेला तिच्या पित्याकडे परत जाण्यास सांगितले. नंतर ते स्वस्थानी निघून गेले. अंबा अरण्यात गेली व भीष्माचा प्राण घेण्याचा हेतु मनात धरून तपश्चर्या केली व देहाचा त्याग केला.

याचवेळी द्रुपद नावाचा राजा पुत्र व्हावा या इच्छेने शंकरांना प्रसन्न करून घेण्यासाठी तप करीत होता. त्याच्या तपश्चर्येमुळे प्रसन्न होऊन शंकरांनी त्याला असा वर दिला की, 'तुला पुत्र होईल पण तो आधी स्त्री व नंतर पुरुष होईल.' पुढे अंबा द्रुपदाच्या मुलीच्या रूपाने जन्माला आली. तीचे नांव द्रुपदाने शिखंडी असे ठेविले. राजाने ती मुलगी आहे ही गोष्ट गुप्त ठेवली व तिला मुलाचा वेष देऊन वाढविले. शिखंडी मोठा झाल्यावर दशार्णव देशाचा राजा हिरण्य याच्या मुलीशी त्याचे लग्न केले. मग हिरण्याच्या मुलीला आपला नवरा पुरुष नसून स्त्री आहे हे कळून आले व ती परत आपल्या बापाकडे गेली. तिने ती गोष्ट त्याला सांगितली तेव्हा तो आपले सैन्य घेऊन द्रुपदाबरोबर युध्द करण्यासाठी आला. ते बघून शिखंडी अरण्यात पळून गेला व तेथेच रडत बसला. इतक्यात त्या वाटेने स्थूलकरण नावाचा कुबेराचा सेवक जात होता. त्याने शिखंडीचे रडणे ऐकले व त्याच्या जवळ जाऊन रडण्याचे कारण विचारले तेव्हा शिखंडीने सर्व गोष्ट त्याला सांगितली. ती ऐकून स्थूलकरण म्हणाला की मी तुझे स्त्रीपण घेऊन आठदिवस माझे पुरुषपण तुला देतो. त्याप्रमाणे शिखंडी पुरुष होऊन घरी आला. त्याने झालेली सर्व हकीकत बापाला सांगितली. ती ऐकून राजाला अतिशय आनंद झाला. त्याने दूताबरोबर हिरण्याकडे निरोप पाठविला की माझा पुत्र पुरुष आहे. खात्री करून मग पाहिजे तर युध्द करावे.' हिरण्याने कांही स्त्रियांना पाठवून आपली खात्री करून घेतली. नंतर आपल्या मुलीची द्रुपदाच्या घरी रवानगी केली. आठ दिवसांनी शिखंडी परत वनात गेला. त्याचवेळी त्याच्या सुदैवाने कुबेर तेथे आला. त्याने आपल्या सेवकास स्त्रीवेशात पाहिल्यावर त्याला शाप दिला की, शिखंडी मरेपर्यंत तू असाच स्त्री होऊन येथे राहा. तुझे पुरुषत्व शिखंडी भोगील. शिखंडीने कुबेराचे पाय धरले. कुबेराने त्यास पुरुष होऊन सुखाने नांद असा आशिर्वाद दिला.

विचित्रवीर्य राजा पुष्कळ वर्षे राज्य करून निपुत्रिक असताच मरण पावला. वंशाला पुढे संतान नाही हे पाहून सत्यवती खिन्न झाली व तिने भीष्माला लग्न करण्यास सांगितले. परंतु भीष्म आपली प्रतिज्ञा मोडण्यास तयार होईना. तेव्हा सत्यवती भीष्माला म्हणाली की यावेळी व्यासाची प्रार्थना करून त्याला वंशवृध्दी करण्याची विनंती करावी म्हणजे तो आपले मनोरथ पूर्ण करील. मी कुमारी असता पराशर ऋषीपासून माझ्याच पोटी त्याचा जन्म झाला असल्यामुळे तो माझाच मुलगा आहे. भीष्मांनी या गोष्टीला आनंदाने रूकार दिला. सत्यवतीने शुचिर्भूत होऊन व्यासाचे

स्मरण केले. व्यास प्रगट झाले. तिने मनातील हेतु त्यास सांगितला. त्याने मातेची आज्ञा मान्य केली. त्याचे पासून अंबिकेला धृतराष्ट्र नावाचा मुलगा झाला. तो अत्यंत पराक्रमी व नऊ हजार हत्तींचे बळ असलेला असा वीर होता. पण जन्मत:च आंधळा होता कारण की व्यासाबरोबर समागम करतांना त्यांचे तेज अंबिकेला सहन न झाल्यामुळे तिने डोळे झाकले होते. आंधळा मुलगा जन्माला आल्याचे पाहून सत्यवतीला फार वाईट वाटले व तिने अंबालिकेला पुत्र उत्पन्न करण्यास सांगितले. परंतु समागमाच्या वेळी व्यासास पाहून ती थरथरा कापू लागल्यामुळे तिला झालेला मुलगा पांढूर रंगाचा झाला ते पाहून सत्यवतीने परत व्यासांना बोलाविले व अंबिकेच्या पोटी आणखी एक मुलगा उत्पन्न करण्यास सांगितले. व्यासांनी आईची आज्ञा मान्य केली. परंतु भयामुळे यावेळी अंबिका स्वत: न जाता तिने आपल्या दासीस पाठविले. तिच्या पोटी विदुर हा सर्वांगसुंदर पुत्र जन्माला आला. विदूर हा यमधर्माचा अवतार आहे. दासीच्या पोटी यमाने जन्म घेण्याचे कारण असे की, पूर्वी मांडव्य नावाचा ऋषि एका पायावर उभा राहून तप करीत होता. एकदा काही चोरांनी राजाच्या खजिन्यावर हल्ला केला व पाठलाग करणाऱ्या शिपायांच्या भयामुळे ते मांडव्याच्या मागे येऊन लपले. शिपायांनी त्या चोराबरोबर ऋषीलाही पकडले व त्या सर्वांना राजाने सुळावर देण्याची आज्ञा केली. मांडव्य यमलोकी गेल्यानंतर त्याने यमाला तू दासीच्या पोटी जन्माला येशील असा शाप दिला. त्यावेळी यमाने प्रार्थना करून उ:शाप मागितला. तेव्हा मांडव्याने त्याला असे सागितले कीं, व्यासापासून तुझा जन्म होईल व तूं महाज्ञानी, धार्मिक आणि ईश्वरभक्त होशिल.

धृतराष्ट्र, पांडू व विदुर ही मुले मोठी होईपर्यंत भीष्म राज्यकारभार पाहात होता. पुढे ते तिघे वेदशास्त्र व शस्त्रादि विद्येत तरबेज झाले. त्यांच्यापैकी विदूराने तर सर्वविद्यांचा अभ्यास करून दिव्यज्ञान मिळविले होते. तेव्हा भीष्माने प्रधान, ऋषि व इतर प्रजाजन यांना एकत्र बोलावून असे सांगितले कीं, 'आता या तीन मुलातून कोणाला राज्यावर बसवावे.' तेव्हा सर्वांच्या मते असे ठरले की धृतराष्ट्र आंधळा आहे व विदूर हा दासीचा पुत्र आहे म्हणून दोघेही राजा होण्यास योग्य नाहीत. म्हणून पंडूसच राज्याधिकार द्यावा. तेव्हा भीष्माने पंडूला राज्यावर बसविले नंतर धृतराष्ट्राचे लग्न गांधार देशाचा राजा जो सौबल त्याच्या गांधारी नावाच्या मुलीशी झाले व पंडूचे लग्न वसुदेवाची बहिण कुंती आणि मद्रदेशाच्या राजाची कन्या माद्री या दोघीशी झाले. याप्रमाणे राज्याची योग्य व्यवस्था झाली त्यावेळी पंडूने मोठमोठे यज्ञ केले व सर्व पृथ्वीचे राजे आपल्या अधिकारक्षेत्राखाली आणले.

कुंती ही शूरसेनाची मुलगी व वसुदेवाची बहिण होय. ती पंडूराजास दिली होती. तिच्या लग्नापूर्वीची गोष्ट अशी कीं, 'एकदा शूरसेनाने आपला मित्र राजा कुंतीभोज याच्याकडे कुंतीस पाठविले होते. त्यावेळी दैवयोगाने अनुसयापुत्र दुर्वासमुनि कुंतीभोजाकडे चातुर्मासाकरिता आले होते. राजाने त्यास आदराने आपल्या घरी ठेवून घेतले. कुंतीने रात्रंदिवस दुर्वासांची सेवा करून त्यांची मर्जी संपादन केली. त्यांनी प्रसन्न होऊन कुंतीच्या डोक्यावर वरदहस्त ठेवला. कानात पांच मंत्र सांगितले व ते पुढे असे म्हणाले कीं, 'आपत्काळी तू या मंत्रांचा जप कर म्हणजे दिव्य तेज धारण केलेली पाच दैवते प्रकट होऊन तुला पुत्र देतील. ती दैवते सूर्य, यम, इंद्र, वायु आणि अश्विनीकुमार ही होत. यांचे स्मरण करताच ते तुझी मनोकामना पूर्ण करतील.' असे सांगून दुर्वास निघून गेले. पुढे बरेच दिवस गेल्यानंतर कुंती गंगा नदीवर गेली. तेथे एकटी असता दुर्वासांच्या मंत्राचा अनुभव घ्यावा असे तिच्या मनात आले. तिने सूर्याला आवाहन केले. त्याबरोबर तिच्यापुढे येऊन उभा राहिला. त्याने तिला बोलावण्याचे कारण विचारले. त्याला पाहून कुंती घाबरली व खाली मान घालून हळूच म्हणाली कीं आपण मजवर प्रसाद करावा परंतु माझे कौमार्य तसेच राहावे व ही गोष्ट अशीच गुप्त राहावी. हे ऐकून सूर्याने कुंतीस सांगितले, 'तू अतिशय भाग्यवान आहेस तुझ्याजवळ अपार पुण्य असल्यामुळें तूला माझे दर्शन झाले आहे. माझ्या संगाने तुझे कौमार्य भंगणार नाहीच. परंतु एक राजा येऊन अतिशय आदराने तुला वरील.' नंतर सूर्याच्या प्रसादाने कुंतीला तात्काळ सूर्यासारखाच दिव्य पुत्र झाला. त्याच्या अंगावर जन्मत:च किरीट कुंडले वगैरे भूषणे होती. तोच कर्ण होय. सूर्य निघून गेलेला होता. ती दचकली व तिने तो मुलगा गंगेत सोडून दिला व ती आपल्या पित्याकडे आली.

कुंतीने मुलाला गंगेत टाकले परंतु तो बुडाला नाही. कारण स्वत: गंगेने त्याचे रक्षण केले. नदीच्या पाण्याच्या लाटांशी तो खेळू लागला. इतक्यात अधिरथ नावाच्या कोळ्याने त्यास उचलून घेतले. त्याने आपली स्त्री राधा हिला बोलावून तो मुलगा तिच्या ओटीत घातला. दोघांनी आवडीने त्याचे नाव वसुषेण असे ठेवले. परंतु राधेने त्याचे पालनपोषण केल्यामुळे त्यास राधेय म्हणत. पुढे ऋषींनीं त्यास वेदाध्ययन शिकविले. तो धनुर्वेद उत्तम शिकला. अर्जुनाचे हातून त्याला मरण येऊ नये म्हणून सूर्याने प्रगट होऊन त्यास सांगितले कीं, 'रोज सूर्योपस्थान जपत जा. गायत्री मंत्राचा जप करून याचकांची इच्छा पूर्ण करण्यासाठी उदार हो. परंतु तुझ्या अंगाला अक्षय

असे कवच जडले आहे ते मात्र कोणाला देऊ नकोस. म्हणजे शत्रूच्या शस्त्राने तुला कधीही मरण येणार नाही.' असे सांगून सूर्य निघून केला. कुंतीच्या पुत्रापैकी अर्जुन हा इंद्राचा मुलगा होता. इंद्रशक्ति व सूर्यशक्ति यांच्या संघर्षणाने अर्जुनाची बाजू घेऊन इंद्राने ब्राह्मणरूप घेऊन कर्णाकडे गेला व त्याने कर्णाची बरीच स्तुति करून कवच मागितले. तेव्हा त्या उदार कर्णाने ताबडतोब त्वचेसकट अंगाचे कवच काढून ब्राह्मणास दिले. हे पाहून इंद्र चकित झाला. मग प्रसन्न होऊन इंद्राने त्यास दिव्य शक्ति दिली व असे सांगितले कीं जीवावरचा प्रसंग येईल तेव्हा त्याचा उपयोग शत्रुवर कर. मग तो शत्रू कोणीही असो त्याचा नाश होईल. असे सांगून इंद्र निघून गेला. त्यावेळी कर्णासारखा उदार, रूपवान, धर्नुधारी वीर श्रीकृष्णाशिवाय दुसरा कोणीही नव्हता.

भीष्माने पराभव केला त्या दिवसापासून परशुराम हा क्षत्रियास विद्या शिकवित नसे. म्हणून धनुर्विद्या शिकण्याकरिता कर्ण ब्राह्मणाचे रूप घेऊन त्याच्याकडे गेला व हात जोडून उभा राहिला. परशुरामाने त्यास तुझा वर्ण कोणता असे विचारले असता त्याने ब्राह्मण हे उत्तर दिले. ते ऐकून परशुरामांनी त्यास सर्व विद्या शिकविल्या. ते पाहून कर्ण पुढे अर्जुनास अनर्थ करील अशी इंद्रास धास्ती वाटली म्हणून त्याने कर्णाच्या अपायाची योजना केली. एकदा कर्णाच्या मांडीवर डोके ठेवून परशुराम झोपला असता इंद्राने भृंगा होऊन लाकडाप्रमाणे कर्णाची मांडी कोरली. त्यामुळे रक्ताची धार वाहू लागली पण कर्णाने मांडी हलविली नाही. तेव्हा भुंग्याचे रूप घेतलेला इंद्र परशुरामाच्या कानास झोंबला. त्यामुळे परशुराम जागा झाला. तेव्हा त्याला सगळीकडे रक्त पसरलेले दिसले. ते पाहून तो कर्णास म्हणाला कीं, 'तू इतक्या वेदना सहन केल्यास व मांडी हलविली नाही यावरून तू क्षत्रीय असून मोठा शूर आहेस. तुझे नाव काय ते सांग. कर्णाने आपले नाव सांगितले ते ऐकताच परशुराम कर्णास म्हणाला , 'मी क्षत्रीयास विद्या शिकवित नाही हे माहीत असताना ती तू चोरून शिकलास म्हणून ही तुझी विद्या अर्जुनापुढे निष्फळ होईल. पुढे भार्गवरामाची आज्ञा घेऊन कर्ण घरी परतला.

एकदा पंडू राजा दोन्ही स्त्रियाबरोबर मोठ्या आनंदाने अरण्यात शिकार करीत असता मैथून करीत असलेल्या एका हरिणाची त्याचेकडून हत्या झाली. परंतु तो हरीण नसून कर्दमऋषि होता. त्याने तात्काळ पंडूस शाप दिला की, तू सुध्दां आपल्या स्त्रीबरोबर रममाण होताच मरण पावशील? या घटनेमुळे पंडूस फार वाईट वाटले

व तो तेथे तापसाचा वेष धारण करून स्त्रीसह राहिला. ही गोष्ट भीष्मास कळताच त्याला फार वाईट वाटले. पंडूराजा या शापामुळे शतशृंग नावाच्या पर्वतावर बरेच दिवस राहिला. त्यामुळे सर्व राज्यकारभार धृतराष्ट्राच्या नावाने चालला होता. पंडू ज्या अरण्यात राहात होता. तेथील काही ऋषि एकदिवस स्वर्गास जाण्यास निघाले. पंडू पण त्यांच्याबरोबर जाऊ लागला. परंतु ऋषींनी त्याला असे सांगितले कीं, 'ज्यांच्यापोटी संतान नाही त्यास स्वर्गात जाता येणार नाही.' हे ऐकून पंडूस फार दु:ख झाले. परंतु त्याची स्त्री कुंती म्हणाली, 'महाराज आपण काळजी करू नका. दुर्वासाने मला पाच मंत्र दिले आहेत यांचा जप करताच मला संतती होईल. ह्या मंत्राचा खरेपणा पाहण्यासाठी मी पूर्वी सूर्याच्या मंत्राचा जप केला व सूर्यनारायण माझ्यापुढे येऊन उभा राहिला. त्याच्यापासून मला महातेजस्वी असा मुलगा झाला. मी भीतीमुळे त्यास तेथेच टाकून पळून गेले. जन्मत:च त्याच्या अंगावर कवच कुंडले होती. त्या मंत्रापैकी अद्याप चार मंत्र माझ्याजवळ आहेत. आपण आज्ञा द्याल तर आपल्याला पुत्र होईल.' पंडूने या गोष्टीला आनंदाने रूकार दिला. मग तीने यम, वायु व इंद्र या तीन देवतांच्या तीन मंत्राचा क्रमाक्रमाने जप केला. त्यामुळे तिला युधिष्ठिर, भीम व अर्जुन असे तीन पुत्र त्या देवापासून झाले. अश्विनीकुमाराचा चौथा मंत्र तिने माद्रीस दिला. त्यापासून तिला नकुल व सहदेव असे दोन पुत्र झाले. धृतराष्ट्र व गांधारी यांना दुर्योधन, दु:शासन इ. शंभर पुत्र झाले. धृतराष्ट्राचा एक युयुत्सु नावाचा दासीचा पुत्र होता. हे शंभरपुत्र गांधारी एकदम प्रसवली त्याची कथा अशी आहे की एकदा व्यासांनी प्रसन्न होऊन गांधारीला शंभर पुत्र होतील असा वर दिला. त्या वराच्या प्रभावाने गांधारी गरोदर राहिली. परंतु पंचवीस महिने गेले तरी ती प्रसूत होईना. इतक्यात कुंतीला मुलगा झाल्याची बातमी घेऊन ब्राह्मण आला. तेव्हा गांधारीने इर्षेने कोणास न कळविता आपल्या पोटावर दगडाने मारून घेतले. तोच पोटातून रक्तवर्णाची एक पिशवी बाहेर पडली. गांधारीने प्रसूत होण्यासाठी हा उपाय केला परंतु त्यामुळे गर्भपात झाला म्हणून ती मोठ्याने रडू लागली ही गोष्ट सर्वांना समजताच एकच आकांत झाला. त्यावेळी व्यास तेथे प्रगट झाले व आपल्या कमंडलूतील पाणी मंत्रून त्या रक्तवर्ण पिशवीवर त्यांनी शिंपडले. त्याबरोबर तिच्यातून शंभर निरनिराळे भाग बाहेर पडले मग व्यासांच्या आज्ञेने तो एकएक भाग घटात ठेवत असतांना शंभरापेक्षा एक भाग अधिक झाला त्याची दु:शीला नावाची मुलगी झाली. व्यासांच्या आज्ञेवरून हे एकशेएक भागांचे घट मंत्रून एका बाजूस ठेवले. प्रत्येक घटाजवळ एक दिवा लावून एक स्त्री रक्षणासाठी ठेवली होती. पुढे

त्यातून दुर्योधन जन्मताच गाढवाप्रमाणे ओरडला. इतकेच नव्हे तर हस्तिनापुरातील सर्व गाढवे त्याचवेळी ओरडू लागली, रक्ताचा पाऊस पडला, वादळी वारा सुटला वीजा कडकडू लागल्या. उल्कापात व धरणीकंप होऊ लागले. तेव्हा हा पुत्र अपायकारक व वंशाचा नाश करणारा आहे म्हणून यास गंगा नदीत टाकून द्यावे असे ऋषींनी केलेले भविष्य विदूराने धृतराष्ट्रास सांगितले, पण ते त्याने कबूल केले नाही.

विषयाची गोडी विलक्षण आहे. पंडूस आपल्या शापाची आठवण होती तरीही एकदा माद्रीला पाहून तो कामातुर झाला व ती नको नको म्हणत असता तिच्याशी रमू लागला. तेव्हाच त्याचा प्राण गेला. त्याच्याबरोबर माद्री सती गेली. त्याच्या मृत्यूने कुंती व धृतराष्ट्र वगैरेंना अतिशय दुःख झाले. पुढे कुंती पाच पुत्रांना घेऊन हस्तिनापुरास आली. तेथे ती मुख्य राजवाड्यात आपल्या मुलासह राहू लागली. भीष्म, विदूर, व धृतराष्ट्र तिची योग्यप्रकारे काळजी घेत होते. दिवसेंदिवस धृतराष्ट्राची व पंडूची मुलें मोठी होत होती. त्यात भीमसेन हा लहानपणापासून शक्तिमान व दांडगा असा होता. तो दुर्योधन वगैरेना मारत असे. धृतराष्ट्रचे मुलगे कौरव व पंडूचे मुलगे पांडव या नावाने पुढे प्रसिध्द झाले. दुर्योधनादि कौरव हे स्वभावाने फार दुष्ट होते. दुर्योधनाचा मामा शकुनि यांची त्यांस साथ मिळत असे त्यायोगे पांडवांचा ते फार द्वेष करीत. भीमाविषयी तर त्यांना फारच मत्सर वाटू लागला. एकदा खेळत असतांना सर्व कौरव झाडावर चढले आहे असे पाहून भीमाने झाड गदगदा हलविले. त्याबरोबर फळाप्रमाणे सर्व कौरव झाडावरून खाली पडले. हे पाहून दुर्योधन, दुःशासन व शकुनि हे एकांतात बसून भीमाला ठार मारण्याचा बेत रचू लागले. तेव्हा फांस, विषप्रयोग किंवा सर्पदंश करण्याचा विचार प्रथम ठरविला पण शकुनि म्हणाला की, कोणत्याही प्रकारे न उघडकीस येणारी युक्ति आपण योजली पाहिजे. भीमाला मोदक फार आवडतात. म्हणून ते त्यास खावयास द्यावे. ही गोष्ट सर्वांना पसंत पडली. मग दुर्योधनाने गंगेच्या तीरावर एक मंडप सुशोभित केला व आपल्याबरोबर जलक्रिडा व वनभोजनास येण्याचे आमंत्रण त्याने धर्मास दिले. मग सर्व बंधूना घेऊन धर्म जलक्रीडा करण्यास गेला. त्यावेळी दुर्योधनाने फराळासाठी पुष्कळशी पक्वाने बरोबर घेतली होती. त्यातच भीमासाठी विष घालून तयार केलेले मोदकही होते. सर्व मंडळी जलक्रीडेसाठी गंगेत शिरली. जलक्रीडा चालली असतांना कौरवांनी अनेकदा भीमाला बुडविण्याचा प्रयत्न केला. परंतु भीमच सर्वांना धरून पाण्यात बुचकून बाहेर काढीत असे. पुढे संध्याकाळ झाल्यावर सर्व मंडळी बाहेर आली. नंतर भोजनास

आरंभ झाला. त्यावेळी दुर्योधन स्वतः भीमाला वाढू लागला व त्याने चलाखीने विष घातलेले मोदक भीमाच्या पानात वाढले. भोजन झाल्यावर सर्व आपापल्या ठिकाणी जाऊन निजले. मध्यरात्रीच्या सुमारास भीमाच्या सर्व शरीरात विष चढले व तो मृतवत पडला. ते पाहून दुर्योधन, दुःशासन, शकुनि हे भीमाजवळ गेले व त्याची मोट बांधून त्याच्या गळ्याला एक मोठा दगड बांधला व त्याला गंगेत मध्यभागी नेऊन सोडून दिले. अशातऱ्हेने भीम बुडाल्यामुळे दुर्योधनास अतिशय आनंद झाला व तिघासह गुपचुप येऊन आपल्या जागेवर निजला. भीमसेन बुडत असतांना त्याच्या हिसक्याने गळ्याला बांधलेला दगड सुटला व तो वाहात वाहात समुद्रात गेला. तेथील सर्पांनी त्याला पाताळात ओढून नेले. तेथे अनेक सर्पांनी त्यास दंश करून त्याच्या अंगातील विष शोषून घेतले व त्यास सावध केले. भीमाने स्वतःच्या बळाने आपल्या भोवतालची बंधने तोडली व तो मोकळा झाला. ही गोष्ट सर्पांनी वासुकीला कळविली. तो आपल्या परिवारासह त्यास बघण्यास आला. भीमाने आपले सर्व वर्तमान त्यास सांगितले. भीम हा पंडूराजाचा पुत्र व श्रीकृष्णाचा आतेभाऊ असून जीवलग मित्र आहे असे कळल्यावर वासुकी आग्रहाने त्याला आपल्या मंदीरात घेऊन गेला. त्याने त्याची पूजा केली व अमृताची भरलेली आठ कुंडे त्यास दाखविली. भीमाने ताबडतोब त्या कुंडातील अमृत पिऊन ती कुंडे रिकामी केली. मग तृप्त झाल्यावर त्यास वासुकीने पलंगावर नेऊन निजविले.

इकडे दुसरे दिवशी सकाळी गंगास्नान करून कौरव मंडळी मोठ्या आनंदाने आपल्या नगरात परत गेली. त्यावेळी कौरव आपापसात मोठ्याने बोलू लागले की आम्ही पांडवाकरिता जीव तोडीत असता त्यांची वागणूक बघा. भीम तर अगदीच निष्ठूर आहे. तो अगदी बेपर्वाईने आमच्या अगोदर एकटाच नगरात निघून गेला. धर्म आणि अर्जुन यांनी मुकाट्याने सर्व ऐकून घेतले. धर्माने कुंतीजवळ चौकशी केली. तेव्हा भीम घरी आला नसल्याचे त्यांस समजले हे ऐकताच धर्म घाबरला. मग दुर्योधनाने भीमाचा घात केला असे मनात येऊन ते सर्व रडू लागले. इतक्यात विदूर तेथे येऊन त्यांचे सांत्वन करू लागला. तेव्हा कुंती त्याला म्हणाली कीं, 'दुर्योधनाने भीमाचा नक्की घात केलेला आहे.' हे ऐकून विदुर म्हणाला कीं, 'तू असे म्हणू नकोस. कारण तो दुष्ट पुरुष जर हे ऐकेल तर उरलेल्या चौघांचा देखिल तो नाश करील. तुम्ही काळजी करू नका. श्रीकृष्णाचे चिंतन करा म्हणजे तो भीमाला सुखरूप आणून तुमची भेट करवील. विदुराच्या भाषणावर विश्वास ठेवून ती सर्व स्तब्ध बसली.,

वासुकीकडे भीमसेन झोपला तो आठ दिवसपर्यंत तसाच घोरत पडला. नवव्या दिवशी जाग आल्यावर वासुकीने आपली पद्मावती नावाची सुंदर कन्या भीमास दिली व वस्त्रे, अलंकार आंदण देऊन वासुकीने भीमाची रवानगी केली. मग भीमाने निर्भयपणाने हस्तिनापुरात प्रवेश केला. भीमापासून पद्मावतीला जो मुलगा झाला तो बर्बरीक होय. घरी सर्व मंडळी काळजीत बसलेली असता भीम अचानक आलेला पाहताच अती आनंदाने कुंती, विदूर व चोघे भाऊ त्यास भेटावयास धावले. त्यावेळी भीमाने कुंती, विदूर व धर्म ह्यांना साष्टांग नमस्कार घातला. अर्जुन, नकुल व सहदेव हे भीमाच्या पाया पडले. मग भीमाने सर्व वृत्तांत त्यांना सांगितला. नंतर कुंतीने भीमाची दृष्ट काढली व त्याच्या अंगावरून सुवर्णभूषणे ओवाळून टाकली व अमाप दान करून याचकांना सुखी केले. त्यावेळेपासून पांडवांनी विदूराच्या सल्ल्याने वागण्याचे ठरवून कौरवांची संगती सोडली. त्यांच्याशी बोलणे सुध्दां वर्ज्य केले. तेव्हापासून ते पाचही जण एकमेकावर अवलंबून असत, एकविचाराने, मर्यादेने वागत असत. श्रीकृष्णाचे चरित्रे ऐकून त्याचे भजन-पूजन, ध्यान व सतत स्मरण करीत असत. विदुराने अनेक कला व राजधर्म धर्मास शिकविले. तसेच खुणेने समजावयाच्या अनेक भाषा (करपल्लवी, नेत्रपल्लवी भाषा) विदुराने पाचही भावांना सांगून बर्बर भाषा सुध्दा शिकविली. (१९५-२०८)

पुढे शंभर कौरव, दासीपुत्र युयुत्सु, व पाचही पांडव मिळून एकशे सहा जणास धनुर्वेद शिकविण्यासाठी धृतराष्ट्राने कृपाचार्य यांची योजना केली. कृपाचार्य हा गौतम मुनीचा पुत्र होता. गौतमाने आपला पुत्र कृपाचार्य यास धनुर्वेद, अस्त्र, मंत्र इ. सकल विद्येत प्रविण केले होते. भारद्वाज मुनीचा पुत्र द्रोणाचार्य यास गौतमाने आपली मुलगी कृपी दिलेली होती. तिला पुढे एक पुत्र झाला त्याचे नाव अश्र्वत्थामा. त्याने जन्मत:च घोड्याप्रमाणे टाहा फोडला म्हणून त्याचे नाव अश्र्वत्थामा असे ठेवले. त्याचा टाहो ऐकून देवांना आनंद झाला. तो रूद्रांश असल्याने देवांनी त्याला चिरंजीव केले. द्रोणाने अश्र्वत्थाम्यास सर्व विद्येत पारंगत केले. एकेदिवशी कौरव पांडव एका खाड्याजवळ खेळत असतांना त्यांची विटी व अंगठी त्या खोल खाड्यात पडली. ती अंगठी बाहेर काढीत असता अचानकपणे द्रोण तेथे आला व म्हणाला, 'राजपुत्रांनो, असाध्य वस्तु कशी प्राप्त करून घ्यावी ही विद्या तुम्ही कोणाकडूनही प्राप्त करून घेतलेली दिसत नाही.' असे बोलून त्याने एक दर्भ मंत्रून कूपात टाकला त्याबरोबर ती विटी वर आली. तसेच धनुष्याला एक बाण लावून सोडताच तो आपल्या

मुखात ती अंगठी घेऊन वर आला. हे त्याचे अद्भुत कृत्य पाहून मुलांस फार आश्चर्य वाटले. ते पितामह भीष्माकडे जाऊन त्यांनी तो सर्व प्रकार सांगितला. ते ऐकताच भीष्माने द्रोणास ताबडतोब वाड्यात बोलावून घेतले आणि सर्व मुलांना विद्या शिकविण्यासाठी आपल्या आश्रयास ठेवले. द्रोणाचार्यांनी सर्व विद्यार्थ्यास मन लावून शिकविले पण सर्व विद्यार्थ्यांत अर्जुन धनुर्विद्येत व भीम गदायुध्द, मल्लयुध्द, यात विशेष चमकू लागले. म्हणून द्रोणांचेही त्यांच्यावर अतिशय प्रेम होते. पुढे बहुतेक सर्व शिक्षण संपल्यावर द्रोणाने सर्वांची परिक्षा घेण्याचा विचार करून एक दिवस निश्चित केला. त्या परिक्षेकरीता सर्व विद्यार्थी मोठ्या आस्थेने अभ्यास करीत होते. ती परिक्षा घेण्याकरिता हस्तिनापूरच्या उत्तरेस मैदानात एक भव्य मंडप तयार केला. ठरलेल्या दिवशी हजारो लोक तेथे जमले होते. मोठमोठे राजे व ऋषि तेथे आले होते. तसेच राजस्त्रियांस युध्द पाहाता यावे म्हणून तेथेच पडदपोशीचीही काही जागा राखून ठेवली होती. भीष्म व कृपाचार्य हे मुख्य परिक्षक होते. त्यावेळेच्या चालीप्रमाणे गुरु द्रोणाचा योग्य सत्कार झाल्यावर सर्व विद्यार्थ्यांना आपले विद्याकौशल्य प्रगट करण्यास सांगून परिक्षेस सुरुवात झाली. ते जरी खरे युध्द नव्हते तरी सर्वांना ईर्षा उत्पन्न होऊन ते पस्सपराशी निकराने लढले. मध्येच भीम व दुर्योधन या दोघांचे काही वेळपर्यंत निकराचे गदायुध्द झाले. त्यावेळी त्यांच्या भयंकर गर्जना व एकमेकांना मारण्याचे संधान पाहून सर्व लोकांत भीति उत्पन्न झाली. ते दोघे तर अगदी आणीबाणीवर येऊन पोहोचले. दोघांपैकी कोणीच माघार घेत नाही असे बघून द्रोणाने युध्द बंद करण्याची सूचना दिली. परंतु ते दोघे ऐकेनात. शेवटी अश्वत्थाम्याने जाऊन त्यांची झोंबी सोडविली व दोघास दोन्हीकडे लावून दिले. नंतर अर्जुनानेही आपले युध्दकौशल्य दाखविले त्याची परिक्षा चालू असतांनाच कर्ण तेथे आला. त्याचा त्यावेळेचा आवेश, मुद्रा व अवसान पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. आपले युध्द कौशल्य दाखवून अर्जुनावर आपली सरशी व्हावी म्हणून कर्ण अर्जुनास पुष्कळ टाकून बोलला. त्यावेळी कर्णाचे विलक्षण धैर्य पाहून दुर्योधनास अतिशय आनंद झाला. त्याने ताबडतोब कर्णाशीं मैत्री करून त्याला आपला जीवलग मित्र मानले. अर्जुनाला हा अपमान सहन झाला नाही. कर्णास न घाबरता अर्जुन त्याला पुष्कळ बोलला. शेवटी दोघांचे युध्द व्हावे असे आव्हान कर्णाने त्यास केले व दोघे रणभूमीवर उभे राहिले. परंतु कर्ण हा क्षत्रीय नाही व राजाही नाही म्हणून तो अर्जुनाची बरोबरी करण्यास अयोग्य आहे असा युक्तिवाद करून त्यांचे युध्द टाळले गेले. त्यामुळे कर्णाचा फार हिरमोड झाला. दुयोधनाने ती संधी साधून त्यावेळी कर्णास अंग देशाचे राज्य दिले व

सर्व मांडलिक राजाकडून त्यास राजाचा मान देवविला. तेव्हा कर्णास अतिशय आनंद झाला व तो दुर्योधनास म्हणाला, 'मित्रा, यावेळी तू माझ्याजवळ कांही तरी माग.' हे ऐकून दुर्योधन कर्णास म्हणाला, 'मित्रा, आपली मैत्री निरंतर वाढत राहावी इतकेच मागणे आहे.' तेव्हा ठिक आहे असे कर्णाने त्यास वचन दिले. इतक्यात कर्णाचा पिता अधिरथ हा तेथे आला. तेव्हा कर्णाने त्यास साष्टांग नमस्कार घातला. थोड्या वेळाने कर्णाचे व भीमाचे एकमेकांना उद्देशून निंदायुक्त भाषण सुरु झाले व ते दोघे युध्दास सरसावले. तेव्हा द्रोणाचार्य मध्ये पडले व त्यांनी दोघांची समजूत घातली. इतक्यात सूर्यास्त झाला व सर्वसभाजन आपापल्या घरी गेले.

दुर्योधनाचा मामा शकुनि हा स्वभावाने फार दुष्ट होता. त्याच्या अंगी पराक्रम नसल्यामुळे कपटाने दुसऱ्याचा नाश करण्यात त्याला समाधान वाटे. कर्ण दुर्योधन यांना पांडवांचा होत असलेला उत्कर्ष सहन होत नव्हता. त्यातच शकुनीची भर पडली. परिक्षेचा समारंभ झाल्यानंतर भीष्माने द्रोणाची स्तुति केली. परंतु आपल्या मुलांपेक्षा पंडूची मुले जास्त हुशार आहेत असे ऐकून धृतराष्ट्रास ह्या समारंभापासून व्हावे तसे समाधान झाले नाही. दुर्योधनादि पांडवांचा नाश करण्यासाठी नेहमी टपून असत. त्यामुळे सत्यवती, अंबिका व अंबालिका यांस तेथे राहणे ठिक वाटेना म्हणून त्या त्यांच्याच मताने बद्रिकाश्रमी जाऊन राहिल्या. भीष्म व व्यासमुनि मात्र तेथेच राहिले.

यानंतर एकेदिवशी द्रोणाचार्य आपल्या सर्व शिष्यांना म्हणाले, 'तुमची सर्व विद्या पूर्ण झाली. आता तुम्ही मला गुरुदक्षिणा दिली पाहिजे. ती अशी कीं तुम्ही द्रुपद राजाला जिंकून त्याला बांधून आणून माझ्या स्वाधिन करा.' कौरव-पांडवांनी हे कबूल केले व ते मोठे सैन्य घेऊन द्रुपद राजावर स्वारी करण्यास निघाले. द्रुपदाच्या हेरांनी ही बातमी द्रुपदाला जाऊन सांगितली. तेव्हा द्रुपदराजा आपले सर्व सैन्य घेऊन नगराबाहेर आला. कौरवांना आपल्या पराक्रमाचा गर्व झाला होता. म्हणून सर्वांच्या आधी ते आपले सैन्य घेऊन द्रुपदावर चाल करून गेले. द्रुपदाच्या सैन्याचे व कौरवांच्या सैन्याचे बराच वेळ भयंकर युध्द झाले. स्वत: द्रुपदाने कौरवावर बाणांचा इतका प्रचंड मारा केला कीं सर्व कौरव आणि त्यांचे सैन्य पळून जाऊ लागले. द्रुपदाची सेना त्यांचा पाठलाग करू लागली, कौरव मदतीसाठी पांडवांना हाक मारू लागले. त्या हाका ऐकून भीम आणि अर्जुन द्रोणाचार्यांना नमस्कार करून रथातून खाली उतरले आणि दुप्रदाच्या सैन्यावर त्यांनी चाल केली. भीमाने आपल्या गदेने

द्रुपद सैन्याची दाणादाण केली. द्रुपद आणि अर्जुन यांचे युध्द जुंपले. अर्जुनाने आपल्या तेजस्वी बाणांनी द्रुपदाच्या रथावरील ध्वज व छत्र तोडून टाकली. रथाचे घोडे मारले. सारथ्याचा वध केला आणि द्रुपदाचे धनुष्य व भाता तोडून टाकला. मग अर्जुन आपल्या रथातून खाली उतरला व द्रुपदाला उचलून त्याने आपल्या रथात आणून घातले. ते पाहताच कौरवांनी जयजयकार केला व ते द्रुपदाची नगरी लुटण्यास धावले. परंतु द्रुपदराजा हा द्रोणाचार्यांचा गुरुबंधू असल्यामुळे त्याचे नगर लुटणे अगर प्रजेस त्रास देणे अयोग्य आहे असे अर्जुनाने कौरवांना सांगून मागे फिरविले. मग अर्जुनाने दूत पाठवून द्रुपदाच्या प्रधानांना बोलावून आणले व त्यांच्यासह द्रुपदराजाला तो द्रोणाचार्यांच्यापुढे घेऊन गेला. त्यावेळी द्रुपदाने खाली मान घालून गुरुबंधू द्रोणाची क्षमा मागितली. द्रोणांनी त्याला आलिंगन देऊन म्हटले, 'द्रुपदा तू आणि मी बालपणीचे मित्र आहोत. आपण लहानपणी एकाच ठिकाणी विद्या शिकलो हे मी विसरलो नाही. आज अर्जुनाने तुला तुझ्या राज्यासहित गुरुदक्षिणा म्हणून मला अर्पण केले आहे. त्यापैकी अर्धे राज्य मी तुला आनंदाने देतो. वैरभाव टाकून तू त्या राज्याचा सुखाने उपभोग घे.' असे बोलून द्रोणाने द्रुपदाला सन्मानाने त्याच्या नगरात पाठवून दिले. परंतु या अपमानाने द्रुपद मनातल्या मनात जळफळल्याशिवाय राहिला नाही. तो मनात म्हणाला, 'मी श्रीशंकरांना प्रसन्न करून द्रोणाचा वध करणारा मुलगा व अर्जुनाला वरणारी मुलगी मागून घेईन.' मग कौरव पांडव आपल्या सैन्यासह नगरास परत आले. नंतर एका वर्षाने भीष्मांनी धर्माला युवराजपद दिले. भीम बलरामाकडे जाऊन गदायुध्द शिकला. ते पाहून दुर्योधनही बलरामाकडे जाऊन ती विद्या शिकला. अर्जुन, नकुल, सहदेव धर्माची आदराने सेवा करू लागले. कांही दिवसांनी धर्माची आज्ञा घेऊन अर्जुन, भीम, नकुल, सहदेव यांना बरोबर घेऊन दिग्विजय करण्यास निघाला. त्याने सर्व राजांना जिंकून अमाप संपत्ति मिळविली. धृतराष्ट्राला ही बातमी समजल्यावर तो काळजीत पडला. तो म्हणाला, 'पांडव फार पराक्रमी झाले आहेत. सर्व राज्य तेच घेतील आणि माझी मुले भिक्षा मागतील असे दिसत आहे.' मग त्याने कणिक नावाच्या आपल्या एका प्रधानाला बोलाविले. हा प्रधान अत्यंत दुष्ट स्वभावाचा होता. तो मोठा कपटी, पापी व नीच होता. धृतराष्ट्राने एकांतात त्याला आपली चिंता सांगितली. तेव्हा कणिक म्हणाला, - 'मरण दूर आहे म्हणून कधी स्वस्थ बसू नये. त्याचा विचार ताबडतोब करावा. वैरी, सर्प आणि अग्नि लहान असले तरी त्यांची केव्हाही उपेक्षा करू नये. सर्व कार्ये बाजूला ठेऊन त्यांचा आधि नाश करावा. वैऱ्याशी कृत्रीम मैत्री जोडून त्यांचा

प्राण घ्यावा. प्रत्यक्ष आईबाप, भाऊ हे जरी आपल्या स्वार्थात हरकत घेऊ लागले तरी त्यांचाही वध करण्यास मागे पुढे पाहू नये.' कणिकाने अशाप्रकारे आपल्या दुष्ट नीतीचा धृतराष्ट्राला बराच वेळ उपदेश केला. तो ऐकून राजा म्हणाला, 'कणिका तू सांगितलेले खरे आहे परंतु आज माझ्या मनात जी चिंता उत्पन्न झाली ती नाहीशी करण्यास काय युक्ति करावी ते सांग.' कणिक म्हणाला - 'युक्ति हीच की बाहेर चांगुलपणा दाखवून शत्रूंचे प्राण घ्यावे.' यावाचून दुसरी युक्ति मला दिसत नाही. पांडव जोपर्यंत जिवंत आहेत तोपर्यंत तूझे मुलगे वाचत नाहीत. याहून अधिक मी तुला काय सांगणार.' असे बोलून कणिक निघून गेला.

इकडे पांडवांचे वर्तन पाहून प्रजा संतुष्ट झाली. आता धर्मराज्य होणार म्हणून सर्व लोकांना आनंद झाला. प्रत्येक जण धर्माला गादीवर बसवावे असे म्हणू लागला. दुर्योधनाच्या हेरांनी घरोघर चाललेली ही चर्चा व पांडवाबद्दल लोकांना वाटणारे प्रेम या गोष्टी दुर्योधनाच्या कानावर घातल्या. ही गोष्ट ऐकून त्याचा संताप झाला व तो आपल्या बापाकडे गेला. तो धृतराष्ट्राला म्हणाला, 'बाबा, सर्व प्रजा एक होऊन धर्माला राज्य देऊ पाहात आहे. तुम्ही अंध त्यामुळे तुम्हाला राज्याधिकार नाही असे ते म्हणतात. द्रोणाचार्य आणि भीष्म हे त्यांना मिळालेले आहेत. ते सर्व मिळून माझा वध केल्याशिवाय राहणार नाहीत. तेव्हा आता याउपर पांडवांना आपणापासून दूर ठेवावे. यातच आपले कल्याण आहे.' दुर्योधनाच्या मर्जीप्रमाणे धृतराष्ट्राने पांडवांना बोलावून आणले व तो त्यांना म्हणाला, 'तुम्ही आजपासून वारणावतीला जाऊन राहा. तेही राज्य आमचेच आहे.' धर्मराजाने चुलत्याची आज्ञा मान्य केली व आताच तिकडे जातो असे सांगून धृतराष्ट्र, भीष्म, द्रोणाचार्य व विदूर यांना वंदन करून त्यांचा निरोप घेतला. ( श्लोक २०९-२२१ )

दुर्योधनाने कणिक, शकुनि, कर्ण, दुःशासन इत्यादिंना बोलावून त्यांच्या विचाराने एक नवीनच व्यूह रचला. पुरोचन नावाच्या एका म्लेंच्छ कारागिराला दुर्योधनाने बोलावून घेतले व त्याला म्हणाला, 'तू वारणावतास जाऊन तेथील सर्व प्रजाजनांना बरोबर घेऊन पांडवांना सामोरा जा. त्यांचा मोठा सत्कार कर व मी सांगतो तसा प्रासाद तयार करून राहावयास दे. हा प्रासाद, लाख, राळ आणि कापूर यांच्या साहाय्याने बांध व त्यात वेळू, तेल आणि लाकडे यांचा निरनिराळ्या कामास करता येईल तेवढा उपयोग कर. प्रासादाच्या भींती लोण्यात कापूर कालवून लिपून त्यावर मातीचा

थर देऊन चांगल्या घोट आणि मग त्यावर मनोहारी चित्रे काढ. प्रासाद तयार झाल्यावर सर्व प्रकारच्या उत्कृष्ठ सरंजामाने पांडवांना अर्पण कर. मग आम्ही जेव्हा सुचना करू तेव्हा प्रासादाला आग लावून पांडव त्यात जळून मरतील अशी व्यवस्था कर. मात्र एक चकार शब्दही कोणाला कळता कामा नये हे पुरते ध्यानात ठेव. तुझी कामगिरी व्यर्थ जाणार नाही. जा आता आपल्या कामाला लाग.' पुरोचनाने त्याचे म्हणणे कबूल केले व तो आपल्या कामाला लागला.

पांडव, कुंतीसह हस्तिनापूर सोडून वारणावतास जाण्यास निघाले तेव्हा लोकांना फार दु:ख झाले. लोकांचे समाधान करून त्यांनी सर्वांचा निरोप घेतला. विदुराने निरोप देतेवेळी सांकेतिक बर्बर भाषेत धर्मास भावी संकटाची जाणिव देऊन सावध राहाण्यास सांगितले. दुर्योधन जवळ असल्यामुळे त्याला स्पष्टपणे बोलता येईना. म्हणून तो धर्माला म्हणाला, 'तुझ्यावर फार कठिण संकट येणार आहे म्हणून अहोरात्र सावध राहा. गृंहरूपाने अग्नि तुला भेटणार आहे. त्यात काय ते समज. वणव्याचे भय दृष्टीला पडताच प्राणी आपापल्या विवरातून बाहेर पडतात हे तुला ठाऊकच आहे. दिवसा रानात शिकारीला जात जा व रात्र श्रीहरीचे स्मरण करण्यात घालवा. धर्मा शत्रुचा गोड शब्दही विषासारखा असतो. म्हणून कोणत्याही शब्दाला भुलू नकोस. शत्रूच्या घरचे अन्न विषरूपच मानावे. या सर्व गोष्टी नीट लक्षात ठेव. उत्तर दिशेकडून दक्षिणेकडे पुढे जाऊन हा भीमसेन पुन्हा एकदा विजयी होईल. नेहमी श्रीकृष्णाचे स्मरण करीत जा. म्हणजे कोणत्याही गोष्टीची बाधा होणार नाही. धर्मा मी सांगितलेले सर्व नीट लक्षात राहिल ना!' धर्माने होय असे सद्‌गदीत उत्तर दिले. वारणावताजवळ येताच पुरोचन सर्व लोकासह त्यांना सामोरा आला. त्याने वस्त्रे, अलंकार वगैरे देऊन त्यांचा सत्कार केला व त्यांना तो एका जुन्या वाड्यात घेऊन गेला व तेथेच त्यांची काही काळ राहण्याची व्यवस्था केली. तेथे नित्यक्रमानुसरून पांडवांनी भोजन केले. मग पुरोचनाने नविन बांधलेला प्रासाद पाहावयास चला अशी त्यांना विनंती केली. तो प्रासाद फारच सुंदर होता. पण धर्माला विदूराच्या शब्दांची आठवण असल्याने त्याने भीमाला त्या घराची परिक्षा करण्यास सांगितले. धर्म म्हणाला, 'भीमा या घराच्या भीतीवर पाणी शिंपडून सुवास येतो की काय ते पाहा बरे.' भीमाने त्याप्रमाणे करताच विदुराने सांगितलेल्या गोष्टीचा प्रत्यय आला. ते पाहून भीमाने तेथे राहाण्याबद्दल नाराजी व्यक्त केली. पण धर्म म्हणाला, 'आपले रक्षण श्रीकृष्ण करील. सध्या आपण पुरोचनाशी मैत्रीनेच वागू या.' इकडे श्रीकृष्णाने विदुराच्या

स्वप्नात येऊन त्याला सांगितले कीं, 'खोदकाम करणाऱ्याला बोलावून घेऊन पांडव राहिले आहे त्या घरासाठी मोठे विवर तयार करा.' मग विदुराने आपल्या एका विश्वासू कारागिराला बोलावून खोदकाम कसे करावयाचे याच्या सुचना देऊन धर्माकडे पाठविले. धर्माच्या संमतीने कारागिराने त्या घराच्या खाली सात योजने लांब अशी एक गुप्त वाट तयार केली नंतर त्याने ती वाट भीमाला दाखवून तिच्या तोंडावर मोठी शिळा बसविली व कुंतीसह तुम्ही बाहेर पडल्यावर हे तोंड बूजवून टाकावे असे सांगितले. कृष्णपक्षातील चतुर्थीच्या दिवशी रात्री पुरोचन घराला आग लावील असे सांगून तो कारागिर परत गेला. ('श्लोक २२२-२३८)

कृष्णपक्षातील चतुर्थीचा दिवस उगवला. धर्मराजाने त्यादिवशी ब्राह्मणांची समाराधना घातली. त्याच दिवशी एक भिल्लीण आपल्या पाच मुलांना घेऊन तेथे आली. कुंतीने त्याना ठेवून घेतले व भोजन दिले. त्या रात्री ती त्याच घरात निजली. पुरोचन त्या दिवशी पांडवाबरोबरच जेवला. रात्री सर्व मंडळी झोपली. भीम मात्र झोपेचे सोंग करून आपण सावध राहून बारकाईने सगळीकडे बघत होता. बारा घटका रात्र उलटल्यानंतर पुरोचन चूड पेटवून घराजवळ आला. भीम जागा झाला. भीमाने विचारले, 'पुरोचना चुड कशाला पेटविलीस?' त्याने उत्तर दिले, 'मला फार थंडी वाजत आहे म्हणून पेटविली.' भीम परत झोपेचे सोंग घेऊन निजला. आणखी एक घटका लोटली व पुरोचन परत चुड घेऊन आला. भीम त्याला म्हणाला 'पुरोचना, घराला कारे आग लावतोस. तुला थंडी फार वाजत असेल तर चल तुला घरात नेऊन चांगला शेकतो.' असे म्हणून त्याने त्या म्लेंच्छाला बांधून घरात आणून टाकले. मग भीमाने त्या घराला चारही बाजूंनी आग लावली व कुंतीसह आपल्या चौघा भावांना घेऊन विवरात उतरला. मशाली पेटवून सर्वजण विवरातून बाहेर पडले. नंतर त्या विवराचे द्वार बुजवून टाकले. इकडे ते सर्व घर क्षणार्धात पेटले. पूरोचन, भिल्लीण व तिचे पाच मुलगे आगीत जळून गेले. लोकांनी पांडवांचे भस्म झाले असे समजून एकच हाहा:कार केला. दूत हस्तिनापूरात गेले व त्यांनी धृतराष्ट्राला आगीचे वर्तमान सांगितले. धृतराष्ट्राने चार अश्रू ढाळले. कौरवांनीही तसेच नाटक केले. मग दुर्योधनाने त्यांची उत्तरक्रिया वगैरे केली व त्या प्रासादाच्या ठिकाणी मठ बांधण्याची आज्ञा केली.

इकडे पांडव विवरातून बाहेर पडले. ते भागीरथीच्या तीरावर जाऊन पाहोचले. इतक्यात विदूराने पाठविलेला नावाडी आपली नौका घेऊन त्याठिकाणी आला. त्या

नावेत बसून सर्वजण पैलतीरी गेले. धर्मान त्या नावाडयाला आलिंगन दिले व तुझे उपकार जन्मभर विसरणार नाही असे सांगितले. मग नावाडी धर्मराजाला नमस्कार करून हस्तिनापुराला परत गेला. नंतर पांडवांनी गंगेत स्नान करून त्या पुण्यशील भागीरथीला वंदन करून तिची स्तुति केली. नंतर भीमाने कुंतीसह सर्वांना खांद्यावर घेतले व आपण अंधारातून त्या भयंकर जंगलातील मार्ग क्रमू लागला. बराच मार्ग चालून गेल्यावर कुंतीने थोडी विश्रांती घेण्याविषयी भीमाला सांगितले. वाटेच्या श्रमामुळे कुंतीला फारच तहान लागली होती. तेव्हा भीमाने सर्वांस खाली उतरवून ठेवले. कुंतीच्या जवळ धर्म, पार्थ वगैरे बसले आणि भीम पाणी आणण्यासाठी गेला. अंधारात पाणी कोठे आहे त्याला बरोबर दिसेना. त्याने बराच वेळ इकडे तिकडे शोधून मोठ्या कष्टाने पाणी मिळविले पण ते नेण्यासाठी भांडे वगैरे कांही जवळ नसल्यामुळे त्यास चिंता पडली. शेवटी तो आपले वस्त्र पाण्यात भिजवून घेऊन आला. इकडे भीमास येण्यास उशीर झाल्यामुळे सर्व झोपी गेली होती. सर्वजण निद्रेत निमग्न झाले आहेत असे पाहून त्यांना न उठविता भीम त्यांचे संरक्षण करण्यासाठी रात्रभर जागत बसला. त्या अरण्यात हेडंब नावाचा राक्षस आपल्या हेडिंबा नावाच्या बहिणीसह राहात होता. माणसांची चाहूल लागताच त्याने आपल्या बहिणीस शोध करण्याकरितां पाठविले. ती शोध करीत करीत पांडवाजवळ आली. तेथे पाचजण निजले असून सहावा त्यांचे संरक्षणार्थ बसला आहे असे पाहून त्या नरमांसलोलूप हेडिंबा राक्षसीला फार आनंद झाला. ती भीमाच्या जवळ गेली. भीमाची ती तेजस्वी मूर्ति पाहताच तिच्या मनात कामवासना उत्पन्न झाली. तिने रंभेप्रमाणे सुंदर रूप धारण केले व भीमास हाक मारून म्हटले कीं, 'हे सुंदर पुरुषा, माझा भाऊ एक महापराक्रमी राक्षस असून तो जवळच एका झाडावर बसला आहे. त्याची व माझी शक्ति सारखीच असून मी तुम्हाला केव्हाच मारून टाकले असेत पण तुझ्या रूपाने मला मोहित केले आहे. तेव्हा तू माझी इच्छा पूर्ण कर.' भीम तिला म्हणाला, 'तू बऱ्या बोलाने आल्या वाटेने परत जा. मी वेड्यासारखा तुझ्या नादी लागणार नाही व मला तुझ्या भावाचे काहीच भय नाही. त्याच्यासारखे हजारो राक्षस समोर आले तरी क्षणार्धात मी त्यांचा नायनाट करीन.' हेडंब तेथून फार लांब नव्हता. त्याला भीमाचे हे आवेशयुक्त बोलणे ऐकू आले. त्यामुळे तो चवताळून भीमाच्या अंगावर धावून आला. भीमही सावध होताच दोघांची धडाक्याची झटापट झाली. राक्षस मधून मधून मोठ्याने आरोळ्या फोडीत होता. त्या नादाने ते रान दणाणून गेले व धर्म वगैरे दचकून जागे झाले. ते इकडे तिकडे पाहातात तो

भीमाची एका अक्राळविक्राळ राक्षसांशी झोबी लागलेली. तेव्हा सर्वजण राक्षसाच्या अंगावर धावून गेले. पण भीमाने एकट्याने हेडंबास ठार मारले व दूर फेकून दिले. नंतर सर्वास पहिल्यापासून घडलेली सारी हकिकत सांगितली. हेडिंबेसही तो ठार मारणार होता पण तिने आपला हेतु कुंती व धर्म यांस सांगितला व म्हटले, 'मी राक्षसी आहे म्हणून माझा धिक्कार करू नका. मी तुम्हा सर्वांना सुख देईन. माझ्या पोटी जो पुत्र होईल तो तुमच्या शत्रूंचा नाश करून भगवान श्रीकृष्णाच्या साक्षीने अर्जुनाचे प्राण रक्षण करीन.'

धर्माने ती कपटी नाही अशी पूर्ण खात्री करून व पुढील भविष्यार्थ जाणून भीमाला म्हटले, 'तुला हिच्यापासून काही अपाय होणार नाही. तेव्हा हिच्याबरोबर निर्धास्तपणे तू लग्न लाव. धर्माच्या व कुंतीच्या परवानगीने हेडिंबेबरोबर गंधर्व पध्दतीने भीमाचा विवाह झाला. नंतर त्या अरण्यात हेहिंबेने त्यांची उत्तम व्यवस्था ठेवल्यामुळे कांही दिवस पांडव तेथेच राहिले. पुढे हेडिंबेला भीमापासून घटोत्कच नावाचा मुलगा झाला. पुत्रप्राप्ति झाल्यावर हेडिंबेने पुढे जाण्यास त्यांना संमति दिली. पांडवास जातेवेळी तिने असे सांगितले कीं, संकटसमयी आमचे स्मरण केले असता आम्ही तेथे येऊ व तुमच्या संकटाचे निवारण करू.' इतक्यात इंद्राने तेथे येऊन सांगितले कीं, 'घटोत्कच मोठा शूर होईल व हा तुम्हाला अनेक प्रसंगी उपयोगी पडेल. तसेच हा प्रसिध्द वीर जो कर्ण त्यास एकवेळ जिंकील.' असे सांगून इंद्र अमरावतीस निघून गेला. नंतर पांडवांना व्यासांची भेट झाली. व्यासांनी त्यांना एकचक्रा नगरास एक महिना जाऊन राहण्यास सांगितले.

माता कुंतीला घेऊन पांडव एका गरीब ब्राह्मणाच्या घरी येऊन राहिले. तेथे ते माधुकरी मागून आपला निर्वाह करीत असत. त्या गांवी बक नावाचा एक राक्षस होता. त्याला रोज एक गाडाभर अन्न, रेडे, म्हशी, बकऱ्या व मनुष्य इतके खाण्यास लागे व गावातील लोकांना आळीपाळीने प्रत्येक दिवशी ते जंगलात नेऊन द्यावे लागे. एके दिवशी पांडव ज्या ब्राह्मणाच्या घरी राहात होते. त्या ब्राह्मणाच्या घरातील मनुष्याची पाळी आली. परंतु त्यांच्या घरात तो, त्याची बायको, एक मुलगा व मुलगी अशी फक्त चारच माणसे होती. त्यातून कोणाला पाठवावे या काळजीने ते सर्व रडत असता कुंतीने त्यांचे रडणे ऐकून त्यांना दु:खाचे कारण विचारले. त्याने तिला बकाचे वर्तमान सांगून उत्तर दिले कीं 'जर कुणी पाळी चुकविली तर राक्षस एकदम गांवात शिरून जे समोर येतील त्यांचा संहार करून टाकतो.'

कुंतीस त्या ब्राह्मणाची दया आली व तिने ब्राह्मणाला असे सांगितले की बदलीसाठी मी माझा एक पुत्र देते. परंतु स्वत:साठी परक्याचा नाश होणे अयोग्य आहे म्हणून ब्राह्मणाने तिचे म्हणणे नाकारले. शेवटी कुंतीने त्याला भीमाचा पराक्रम सांगितला व म्हटले की तो त्या बकाचा नाश करील व तुम्हा लोकांना कायमचा सुखी करील पण ही गोष्ट तू कोणाजवळ बोलू नकोस.' याप्रमाणे ब्राह्मणाचे समाधान करून कुंतीने ती गोष्ट आपल्या मुलास सांगितली. ती ऐकून बकासुराबरोबर युध्द करावयास मिळेल व पुष्कळ दिवसांनी पोटभर अन्न खावयास मिळेल म्हणून भीमाला आनंद झाला व तो दुसरा दिवस उजाडण्याची वाट पाहू लागला.

दुसऱ्या दिवशी एक गाडाभर अन्न, रेडे इ. घेऊन भीम बकाच्या नेहमीच्या जागी गेला. तेथे भीमाने अन्नाची गाडी सोडून रेडे, म्हशी, बकऱ्या, बोकड यांना नगराकडे सोडून दिले व भीम निर्धास्तपणे अन्न खाऊ लागला. इतक्यात बकासूर तेथे आला व तो प्रकार पाहून त्वेषाने गर्जना करीत भीमाच्या अंगावर धावला आणि त्याला लाथाबुक्यांनी मारू लागला. परंतु भीमाने खाणे सोडले नाही. सगळे अन्न संपल्यावर भीमाने बकासुरास ठार मारून त्याचे प्रेत वेशीजवळ आणून टाकले. मग बकाचे जे थोडे साथीदार होते ते भीमाला शरण आले. तेव्हा भीमाने 'त्यांना सांगितले की जर तुम्ही मनुष्य भक्षण कराल तर तुमचीही अशीच अवस्था होईल. ते कबूल करून ते सर्वजण अरण्यात निघून गेले. भीमाने त्रिपदेचा जप केला व मोठ्या हर्षाने आपल्या माणसांना येऊन भेटला. इकडे गावचे लोक वेशीजवळ आल्यावर त्यांना बकासुराचे प्रेत दिसले. त्यांनी हे वर्तमान गांवच्या राजास कळविले. राजाने ज्या ब्राह्मणाची पाळी होती त्यास बोलावून विचारणा केली. तेव्हा ब्राह्मणाने सांगितले कीं, 'मी अन्नाचा गाडा घेऊन गेलो. इतक्यात एक तपस्वी आला. त्याने एक दर्भ मंत्रून बकाच्या अंगावर टाकला. त्याच क्षणी तो मरून पडला. हे ऐकून सर्वांना आनंद झाला. (श्लोक २३९-२५६)

पांडव ब्राह्मणाच्या घरी राहात असतांना एका रात्री पांथस्थ ब्राह्मण तेथे आला. रात्री जेवण वगैरे आटोपल्यावर अर्जुनाने त्यास आपण कोठे जाणार असे विचारले तेव्हा तो म्हणाला, 'येथून सुमारे सात दिवसांच्या वाटेवर अहीपंचाल नामक एक मोठे नगर आहे तेथे द्रुपद नावाचा राजा राज्य करीत आहे. त्याचा पूर्वी द्रोण नावाच्या ब्राह्मणाने आपल्या अर्जुन नामक शिष्याकडून पराजय करविला. त्यामुळे त्यास दुःख झाले व द्रोणाचा पराजय करावा या इच्छेने रानोमाळ भटकू लागला.

असाच हिंडत असता तो एके दिवशी गंगेच्या काठी गेला. तेथे याज व उपयाज असे दोघे महान तपस्वी बंधू त्यास भेटले. त्यांना द्रुपदाने विनंती केली - 'द्रोणाचा वध करील असा एक पुत्र व अर्जुनला वरील अशी एक रूपवान कन्या द्यावी. माझी ही मनोकामना पूर्ण झाल्यास तुम्हाला अपरंपार धन देईन व तुमची इच्छा पूर्ण करीन!' तेव्हा त्या दोघांनी त्यास सांगितलें - 'यज्ञ करून तुझी इच्छा सफल होईल म्हणून यज्ञ कर.' ते ऐकताच द्रुपदाने तात्काळ यज्ञाची तयारी केली. यज्ञ होऊन द्रुपदाने पूर्णाहुती देताच यज्ञकुंडातून धृष्टद्युम्न नामाचा पुत्र उत्पन्न झाला व त्या पाठोपाठ एक मुलगीही उत्पन्न झाली. तिचे नाव याज्ञसेनी. परंतु ती द्रुपदाची कन्या म्हणून द्रौपदी असेही तिला म्हणतात. त्यावेळी आकाशवाणी झाली कीं, 'ही मुलगी मोठी पतिव्रता होईल. हिच्या योगाने पृथ्वीवरील दुष्टांचा नाश होईल. धृष्टद्युम्नाच्या हातून द्रोणाचार्याचा वध होइल.' हे ऐकून द्रुपदाचा आनंद गगनात मावेना. त्याने यज्ञ करणारास पुष्कळ द्रव्य दिले व पुत्र आणि कन्येसह आपल्या नगरात परत आला. ती मुलगी मोठी झाल्यावर अर्जुनला देण्याचा बेत केला होता. परंतु वारणावती मुक्कामा लाक्षागृहात पांडव जळून गेले असे वर्तमान समजल्यावर तो फार दुःखी झाला. परंतु पांडव महाबलाढ्य असून द्रोणाचार्यापासून धनुर्विद्येत आणि विदुरापासून व्यवहारज्ञानात निष्णात असल्याने ते अजून जीवंत असावेत असे वाटून त्याने द्रौपदीचे स्वयंर करण्याचा निश्चय केला आहे. त्यामुळे हजारो लोक द्रुपदपुरीस चालले आहेत.

परमेश्वर कृपेने तेथे पांडव प्रगट झाले तर द्रुपदास आनंद होऊन तो भरपूर दानधर्म करील. मी दरिद्री असल्याने मलाही द्रव्यलाभ होईल म्हणून मी तिकडे चाललो आहे. आजपासून बरोबर सातव्या दिवशी स्वयंवर आहे.' इतके पांडवास सांगून उजाडताच तो ब्राह्मण निघून गेला. पांडवांच्या मनात हा योग साधावयाचा होता. म्हणून ते गरीब ब्राह्मणाच्या रूपाने कुंतीसह पांचालपुरीस जाण्यास निघाले. एकदोन दिवस चालल्यावर वाटेत त्यांना गंगानदी लागली. तेथे अंगापर्ण नावाचा एक गंधर्व आपल्या कुंभीनसी वगैरे स्त्रियासह क्रिडा करीत होता. त्याने पुढे जाण्यास हरकत घेतली. त्यावेळी अर्जुन पुढे होऊन म्हणाला, 'आम्ही वाटसरू आहोत. तू कोण चोरासारखा इतक्या रात्री येथे बसला अहेस, चल हो बाजूला.' हे ऐकून गंधर्वास राग आला. त्याने रथात बसून अर्जुनाच्या अंगावर बाण सोडले. त्यामुळे अर्जुनास राग येऊन त्याने गंधर्वास पराजित करून त्याची शेंडी धरून शिरच्छेद करण्यास

तलवार काढली. तेव्हा त्याची स्त्री कुंभीनसी धर्मास शरण गेली पतिदान मागितले. धर्माज्ञेवरून अर्जुनाने त्यास सोडून दिले. गंधर्वाने संतुष्ट होऊन अर्जुनाला वज्रशरीराचे पाचशे घोडे व कोठेही कौतुक होत असेल ते बसल्याठिकाणीच दृष्टीस पडावे अशी चाक्षुषी विद्या दिली. अर्जुनाने त्याला अग्न्यास्त्र दिले. अशा रीतीने पांडवांचा स्नेह संपादून, संकटकाळी स्मरण कराल तेव्हा मदतीला धावून येण्याचे आश्वासन देऊन तो गंधर्व स्त्रियासह स्वर्गलोकी निघून गेला. पांडवही आपल्या मार्गास लागले.

ते अरण्यातून जात असतां व्यासऋर्षींनी त्यांना दर्शन दिले. पांडवांनी त्यांना तृणासनावर बसवून पूजा केली व नमस्कार केला. व्यासांनी त्यांना सांगितले 'हे सद्भक्तहो सध्या तुम्ही हे कष्ट भोगत आहात. असेच काही दिवस सहन करा. लवकरच तुमचे हे नष्टचर्य संपून ऐश्वर्याची प्राप्ती करून घ्याल. तरीपण आमची व शास्त्रांची तुम्हाला आज्ञा आहे की आज तुम्ही धर्मसंग्रह आणि निग्रहवृत्ति धारण केल्यास तुमचा पुढे जय होईल. पुढे अत्यंत भीषण परिस्थिती उपस्थित होईल. कौरवांच्या दानवी शक्तीशी तुम्हाला संघर्ष करावा लागेल. कदाचित बऱ्याच प्रमाणात प्राणहानीही होईल पण आपले सत्व न सोडता निर्धाराने श्रीकृष्णचरणांची कास धरा. ते तुम्हाला यथास्थित मार्गाला लावतील. आता तुम्ही पांचालपुरीस जाऊन पण जिंकून द्रौपदी नवरी मिळवा. ती तुम्हा पाचांनाही वरील, कारण तिने पूर्वी शिवाची आराधना करून पाच पती मिळावे असा वर मिळवून घेतला आहे. मीही तेथे प्रगट होऊन सर्व कार्य निर्विघ्न तडीस नेईन.' इतके बोलून व्यास अंतर्धान पावले व कुंतीमातेसह पांडव आपला मार्ग आक्रमू लागले व यथासमयी पांचालास जाऊन पोहोचले.

पांडवांनी धारण केलेल्या वेषावरून हे कोणी महातपस्वी आहे असे पाहाणारास वाटे. ते द्रुपदपुरीस जाऊन पोहोचण्यापूर्वी तेथे हजारो राजे आपल्या सैन्यासह आले होते. त्यात मुख्यतः दुर्योधन, कर्ण, शल्य, शकुनि, श्रीकृष्णासह बलराम इ. राजे व पुष्कळ महान ऋषीही आले होते. द्रुपदाने त्या सर्वांस त्यांच्या योग्यतेप्रमाणे मोठमोठे तंबू राहावयास दिले होते. स्वयंवराकरिता एक विस्तीर्ण मंडप तयार करण्यात आला होता. नगरात प्रवेश केल्यावर पांडवांनी कुंतीमातेस एका कुंभाराच्या झोपडीत ठेवले व ते लग्नमंडपाकडे वळले. ठरल्यावेळी सर्व राजे, ऋषि, ब्राह्मण वगैरे लोक सभेस येऊन बसले होते. पण त्या सभेत पांडव न दिसल्याने द्रुपदास संतोष वाटेना. पांडव ब्राह्मण वेषाने दक्षिणेकरितां जमलेल्या ब्राह्मणांच्या गर्दीत येऊन बसले होते.

स्वयंवराची वेळ होताच धृष्टद्युमाने द्रौपदीस उत्तम अलंकार व भूषणे घालून हत्तिणीवर बसवून मंडपात आणविले. तिचे रूप पाहातच सर्व क्षत्रीय मोहीत होऊन गेले. नंतर स्वयंवराकरितां लावलेला पण धृष्टद्युमनाने जाहीर केला. तो म्हणाला, 'राजे महाराजे व ऋषिमुनिगण हो! येथे धनुष्यबाण ठेवले आहेत ते घेऊन नलिकायंत्रांच्या छिद्रद्वाराने जो खाली पाण्यात पाहून वर चक्रावर फिरत असलेल्या माशाचा डोळा फोडील त्यास माझी बहिण माळ घालली. तरी आता क्षत्रियांनी सज्ज व्हावे.' तो पण ऐकून बहुतेक क्षत्रीय निराश होऊन जागच्या जागी बसले. बराच वेळपर्यंत कोणी उठेना. हे पाहून आज पृथ्वी नि:क्षत्रीय झाली काय? असा प्रश्न धृष्टद्युम्नाने विचारला. ते ऐकताच कर्ण मोठ्या आवेशाने पुढे आला व मोठ्या डौलाने म्हणाला, 'द्रौपदी आता माझीच पट्टराणी होणार.' असे म्हणून कर्ण ते धनुष्य उचलू लागला पण ते त्याला उचलेना. मोठ्या कष्टाने ते तो वर करीत आहे तो धाडकन् खाली कोसळला. पुन्हा उठून कर्ण ते धनुष्य उचलणार तोच द्रौपदीने कर्णाला ओळखले व सर्वासमक्ष धृष्टद्युम्नास सांगितले 'हा वर्णरहित व कुलहीन आहे म्हणून मी याला वरणार नाही.' हे शब्द कानी पडताच कर्णाचा संताप अनावर झाला. तो हात चोळीत मोठ्या रागाने जागेवर जाऊन बसला.

कर्ण हा महावीर असून त्याची बरोबरी करणारा अर्जुनावाचून कोणी नव्हता. त्याची झालेली फजिती पाहून कोणी क्षत्रीय पुढे सरसावेना. तेव्हा त्या भिक्षुक ब्राह्मणांच्या मेळाव्यातून अर्जुन व भीम उठून पुढे आले. ते पुष्कळ दिवसपर्यंत रानावनात हिंडत असल्याने केस, दाढीमिशा वाढलेल्या अंगावर वल्कलवस्त्रे व सर्वांगास भस्म फासलेले अशा अवस्थेत असल्याने ते कोणास ओळखू आले नाहीत. परंतु विरोचित असे अवसान पाहून सर्वजण त्यांच्याकडे मोठ्या उत्सुकतेने पाहू लागले. इतक्यात ते धनुष्य अर्जुनाने लिलया उचलले त्यामुळे सर्वांना आश्चर्य वाटले. मग त्याने सर्वासमक्ष पाच बाण घेतले व नीट संधान करून पहिल्याच बाणाने माशाचा उजवा डोळा फोडला. हे त्याचे कौशल्य पाहून सर्वांना फार आश्चर्य वाटले. नंतर द्रुपदाने द्रौपदीकडून अर्जुनास माळ घालविली. अर्जुनाने द्रौपदीला धर्म, नकुल व सहदेव यांच्या स्वाधीन केले. द्रौपदीने राजांना सोडून सामान्य माणसास वरलेले पाहून दुर्योधनादि कौरव, तेथे जमलेले इतर राजे आपापली शस्त्रे सरसावून द्रुपदाच्या अंगावर धावले हे क्षत्रीयांचे काम ब्राह्मणाने केले हे शास्त्राविरूध्द होय. सबब ह्याचवेळी द्रौपदीला क्षत्रीय धर्माप्रमाणे जाळून टाकले पाहिजे असे बोलून लग्नमंडपात त्यांनी कलह माजविला.

त्यामुळे युध्दास प्रारंभ होऊन अर्जुन, भीम, द्रुपद व धृष्टद्युम्न हे दुर्योधन, कर्ण, शल्य यांच्या सैन्याबरोबर युध्द करू लागले. त्यांनी कौरव पक्षातील लोकांची दाणादाण उडवून टाकली. अर्जुनाने कर्णास व भीमाने शल्यास तेथून हाकलून लावले. लढाई आटोपल्यावर पांडव आपल्या बिऱ्हाडी परतले तोपर्यंत त्यांना कोणीच ओळखले नाही. नंतर पांडव द्रौपदीस घेऊन घरी आले व उत्तम भीक्षा आणली आहे असे मातोश्रीस सांगताच तिने न पाहताच आणलेली भिक्षा सर्वांनी वाटून घ्या असे सांगितले. मातेचे वचन ऐकताच पांडव दचकले व विस्मयाने आईला म्हणाले, 'आई, तुझी प्रत्येक आज्ञा आम्ही शिरसावंद्य मानतो पण आजची आज्ञा पाळणे कठिण होईल.' द्रौपदीला पाहताच एकंदर प्रकार कुंतीच्या लक्षात आला व अनवधानाने तिला आपली चूक समजून आली. आता काय करावे अशा चिंतेत असतांनाच त्याठिकाणी व्यासमुनि व भगवान श्रीकृष्णसुध्दां आले. इकडे संध्याकाळ होऊन लोक स्वस्थानी गेल्यावर पांडव आपल्या दृष्टीस पडले नाहीत व आपली मुलगी कोणा ब्राह्मणानेच नेली अशी शंका येऊन द्रुपदास फार वाईट वाटले. मग धृष्टद्युम्नाने कांही गुप्त हेर पाठवून पांडवांचा तपास काढला व मागोमाग आपण त्यांच्याकडे गेला. त्यावेळी पांडव आपल्या आईशी लढाईच्या गोष्टी बोलत आहेत असे त्यास दिसले. मग त्यांची भेट होऊन त्या सर्वांस त्याने मोठ्या सन्मानाने राजवाड्यात नेले. दुसऱ्या दिवशी मोठ्या सन्मानाने भोजन वगैरे झाल्यावर द्रुपदाने आपण कोण असे धर्मास विचारले तेव्हा धर्माने लाक्षागृहात जाळल्यापासून सर्व हकीकत द्रुपदाला सांगितली. ती ऐकून हे पांडवच आहेत अशी खात्री झाल्याने द्रुपदाचा आनंद गगनात मावेना. मग त्याने लग्नाची सिध्दता केली. लग्नसोहळा उत्तमप्रकारे सुरु झाला तेव्हा व्यासांनी सांगितले द्रौपदीचे लग्न पाचही भावाशी लावावे. हे ऐकून द्रुपदास मोठे कोडेच पडले. व्यासांनी सांगितले 'राजा ही तुझी मुलगी द्रौपदी साक्षात स्वर्गलक्ष्मी आहे. पूर्वी दुर्वासऋषि अनुष्ठानास बसले असता ऐरावतावर बसून इंद्र तेथे आला. तो दुर्वासऋषीला नमस्कार वगैरे न करताच उन्मत्तपणे पुढे जाऊ लागला. तेव्हा दुर्वास इंद्रावर अत्यंत संतप्त झाले. इंद्र भयभीत होऊन खाली उतरला व ऋषीला साष्टांग प्रणाम केला तेव्हा दुर्वासांनी प्रसन्न होऊन आपल्या गळ्यातील माळ काढून इंद्राला दिली. ती इंद्राने हत्तीच्या गंडस्थळावर ठेवली. हत्तीने सोंडेने ती माळ भूमीवर टाकून पायाने तुडविली. हे पाहून दुर्वासांनी इंद्राला शाप दिला की 'तू उन्मत्त झाला आहेस. तुझी स्वर्गलक्ष्मी पृथ्वीवर जाईल.' शाप वचनाप्रमाणे तीं पृथ्वीवर आली असता सहजगत्या तिची दृष्टी एका गाईकडे गेली. तिच्यामागे पाच बैल लागलेले पाहून स्वर्णलक्ष्मीला हसू आले. ती

आपल्या मनाशी म्हणाली ही गाय मोठी व्यभिचारीणी असावी. म्हणून तिच्या मागे पाच बैल लागले आहेत. स्वर्गलक्ष्मीच्या हसण्याने गाईस वाईट वाटले व तिने स्वर्गलक्ष्मीला असा शाप दिला कीं, 'तू मला हसलीस म्हणून तुझाही पाच पति उपभोग घेतील.' तो शाप ऐकून स्वर्गलक्ष्मीला फार वाईट वाटले. तिच्या नेत्रातून खाली असलेल्या नदीत दुःखाश्रू पडू लागले. त्या अश्रुपासून नदीत स्वर्णकमळे निर्माण झाली. व ती वहात खाली गेली पुढे ती कमळे यमाच्या यज्ञसमारंभासाठी आलेल्या इंद्राला दिसली. ती कोढून येत आहेत याच शोध घेत घेत व कमळे पूर्ण झाल्यावर त्याला नदीतीरावर एक सर्वांगिण सुंदर स्त्री दिसली. तिच्या अश्रुंनी तयार झालेली ती कमळे होती. त्या स्त्रीचे अनुपमेय सौंदर्य पाहून इंद्र कामातूर झाला व तिला म्हणाला, 'हे सौंदर्यशालीनी तुझे हे सौंदर्य बघून मला पंचबाणांनी विव्हळ केले आहे तर तू माझा स्विकार कर.' मी स्वतंत्र नसून महामुनीच्या अधीन आहे असे सांगून ती जाऊ लागली. इंद्र तिच्या पाठोपाठ जाऊ लागला. बरेच योजने गेल्यानंतर त्याला एक दिगंबरावस्थेत असलेला महामुनि दिसला. परंतु तो या उभयतांना पाहून आणखी लांब जाऊ लागला. इंद्र अज्ञानाने व कामानलाने व्यथित असल्याने त्या महापुरुषाला ओळखले नाही. इंद्र त्याला टाकून बोलू लागला. तेव्हा त्या महापुरुषाने त्याला एका विवरात टाकले. तेथे त्याच्या सारखे आणखी चार इंद्र त्याने पाहिले त्या सर्वांनी त्या अदिपुरुषाची स्तुती करून तेथून सोडविण्याबद्दल विनंती केली तेव्हा तो आदिपुरुष पाचही इंद्रांना आश्वासन देऊन म्हणाला, 'माझ्या कांही कार्यासाठी तुम्हा सर्वांना पृथ्वीवर पाठवतो. पृथ्वीवर श्रीकृष्णांनी अवतार घेतला म्हणजे तुम्हीही अवतार घ्या. ही स्वर्गलक्ष्मी तुम्हा पाचही जणांची स्त्री होईल. तीच ही द्रौपदी व पाच इंद्र तेच पांडव होय. ही स्वर्गलक्ष्मी पूर्वी एका ब्राह्मण स्त्रिच्या उदरी जन्माला आली होती. ती तरूण होऊन जाणती झाल्यावर पतीप्राप्तिसाठी ईश्वरसेवा करू लागली. ईश्वर तिला प्रसन्न झाले. त्या आनंदभरात तिने ईश्वराजवळ मला कीर्तिशाली व सुंदर असा पति मिळावा असे पाचवेळा म्हटले शंकरांनी तिला तितक्याही वेळा 'तथास्तु' असे म्हटले. म्हणून या द्रौपदीचे कुंतीच्या वचनाप्रमाणे पाचही जणाशी लग्न लावावे.' त्यांचे वचन मान्य करून द्रुपदाने पाच पांडवांबरोबर द्रौपदीचे लग्न लावले व पांडवास यथाशक्ति देणगी दिली.

पांडव इकडे लग्नाच्या धांदलीत असतांना दुर्योधन व कर्ण यांना पांडव जीवंत असल्याचे समजले तेव्हा त्यांना मरणप्राय दुःख झाले. धृतराष्ट्र व दुर्योधनादि कौरवास

पांडवांचा उत्कर्ष पाहवेना. त्यांनी कांहीतरी कारणाने पांडव व कृष्ण यात वैर यावे व एकच स्त्री असल्यामुळे पांडवात आपापसात कलह यावा असे करण्याचे योजले. कोणाच्या तरी उपायाने पांडवांशी भांडण करण्याच्या अनेक क्लृप्त्या निघाल्या. शेवटी कर्णाने तर स्पष्टच सांगितले की प्राण गेला तरी हरकत नाही, पण काहीही करून पांडवांना ठार केलेच पाहीजे. त्यांना आता हस्तिनापुराचे तोंड परत दृष्टीस पडता कामा नये. हा विचार विदुरास समजला. तेव्हा त्याने धृतराष्ट्रास सांगितलें. 'तू असल्या वाईट विचाराकडे अजिबात लक्ष देऊ नकोस. पांडव महापराक्रमी असून परमेश्वर भक्त आहेत. त्यांचा पराभव कोटयावधी कर्णाकडून ही होणे केवळ अशक्य आहे. त्यांच्या सद्‌गुणामुळे भीष्म द्रोणादिंची त्यांच्यावर पूर्ण कृपा आहे. म्हणून मोठया सन्मानाने त्यांना येथे आणून त्यांच्या विचाराने वागण्याने तुझा मोठा लौकिक होईल. त्यांच्यापासून तुझ्या मुलांना काडीमात्र अपाय होणार नाही याची जोखीम मी घेतो.' त्यास धृतराष्ट्राने रूकार दिला व पांडवास मोठ्या सन्मानाने घेऊन येण्यास विदुराला पाठविले. विदूर पांडवास पित्यापेक्षाही प्रिय होता. त्यामुळे विदूर येत असल्याचे कळताच जसे गाईचे हंबरणे ऐकताच वासरू धाव घेते तद्वतच ते धावत त्याला सामोरे गेले. त्यांनी भोगलेली दुःखे ऐकून विदुरास फार दुःख झाले. सर्व पांडव त्याच्या गळयात पडून रडू लागले. त्या सर्वांची द्रुपद राजाने मोठया कष्टाने समजूत घातली व मोठया सन्मानाने त्याने विदुरास राजवाडयात आणले नंतर त्याचा योग्य तो आदर सत्कार केला. विदुराने पांडवास सर्व वर्तमान सांगून 'मी तुम्हास हस्तिनापुरास परत नेण्यास आलो आहे असे सांगितले. श्रीकृष्णही तेथेच होता. त्याने सुध्दा पांडवांना हस्तिनापुरास परत जाण्याची अनुमति दिली व मीही तुम्हाला पोहचविण्यास येतो असे सांगितले. पांडवांचा विदूर व श्रीकृष्णावर पूर्ण विश्वास असल्याने त्यांनीही ते तात्काल मान्य केले.

चांगला मुहूर्त पाहून कुंती, द्रौपदी, श्रीकृष्ण, पांडव व धृष्टद्युम्न हस्तिनापुरी जाण्यास निघाले. त्यावेळेस द्रुपदाने त्यांस पुष्कळ संपत्ति दिली. पांडव परत येत असल्याचे समजताच लोकांना फार आनंद झाला. लोकांनी त्यांचे स्वागत करून नगरातून राजवाडयापर्यंत वाजत गाजत नेले. रस्त्यावर त्यांना पाहण्यासाठी अलोट गर्दी जमली होती. पांडवांनी वाडयात गेल्यावर सर्व मोठया लोकास नमस्कार करून व द्वेषभाव विसरून कौरवांच्याही भेटी घेतल्या. एकदोन दिवस गेल्यावर धृतराष्ट्राने धर्मराजास एकांती भेटून सांगितले की - 'माझ्या मनात तुमच्याबद्दल मुळीच कपट

नाही. केवळ शकुनि, कर्ण, दुर्योधनाच्या समजुतीसाठी मला त्यांच्या म्हणण्यास रूकार द्यावा लागतो, म्हणून तू राज्याचा अर्धा भाग घेऊन इंद्रप्रस्थास राहा व राज्याचा उपभोग घे. मी तुला उद्याच राज्याभिषेक करवितो. धर्मराजाला त्याचे बोलणे खरे वाटले. मग विदूर, भीष्म, कृष्ण यांच्या संमतीने धर्मराजास राज्याभिषेक करवून इंद्रप्रस्थास रवाना केले. त्यावेळेस पांडवांचा वियोग होणार म्हणून नगरवासियांना दुःख झाले असले तरी झालेला प्रकार समाधानकारकही वाटला. मग थोड्याच दिवसात मोठ मोठे राजप्रसाद गगनचुंबी इमारती, रस्ते, बाजारपेठा वगैरे बांधून धर्मराजाने इंद्रप्रस्थास राजधानीचे स्वरूप प्राप्त करवून दिले. व मोठ्या चातुर्याने पांडव तेथे राज्यकारभार चालवू लागले.

कांही दिवसांनी धर्मराजाकडे नारद आले. त्यांनी पांडवांना सांगितले कीं 'तुमची धर्मयुक्त राजनिती पाहून मी फार संतुष्ट झालो आहे पण शहापणाचे चार शब्द सांगण्याची माझी इच्छा आहे. ते असे की तुम्हा पाच भावात द्रौपदी ही एकच स्त्री आहे. मनुष्य एकदा कामातूर झाला म्हणजे त्याला सारासार विचार रहात नाही. पूर्वी हिरण्यकश्यपूचे नातू- निकुंभाचे मूलं सुंद-उपसुंद अत्यंत बलवान व त्रिभुवनविजयी होते. त्यांचे आपसात अलौकिक सख्य होते. जणू दोन शरीर पण एकच प्राण अशारीतीने ते राहात. पण एका स्त्री करितां त्यांचे आपापसात युध्द होऊन दोघे मरण पावले. एवढ्यासाठी तुम्ही आपल्या स्त्री संबंधाने कांही नियम करावेत. असे न केल्यास द्रौपदी तुमच्या नाशास कारण होईल व कौरवांचा अनायासे कार्यलाभ होईल. या साठी तुम्ही असे करा की दोन महिने बारा दिवसा पर्यंत एकेकाने द्रौपदीचा उपभोग घ्यावा व ज्याची पाळी असेल त्या वेळात ती उभयता एकांतात असता जर कोणाच्या पहाण्यात आली तर त्याने बारा वर्षे तीर्थयात्रा करावी. असा नियम ठरवून त्याप्रमाणे वागाल तर त्यातच तुमचे हित आहे' हे नारदाचे म्हणणे पांडवांनी मान्य केले. नंतर नारदमुनि तेथून निघून गेले. नियमाप्रमाणे दोन महिने बारा दिवस झाल्यावर द्रौपदी अग्निकुंडात प्रवेश करी व त्यातून ती पवित्र होऊन बाहेर निघून दुसऱ्या पतीची सेवा करीत असे.

एकेदिवशी धर्मराजा द्रौपदीसह एकांतात बोलत बसला असता एक ब्राह्मण चोरांनी गाई पळविल्या अशी तक्रार घेऊन अर्जुनाकडे आला. तेव्हा घाईघाईने अर्जुन आपली शस्त्रे आणण्यास गेला असता त्याच्या दृष्टीस धर्मराज व द्रौपदी पडली. तेव्हा नाईलाजास्तव अर्जुन शस्त्रे घेऊन बाहेर पडला व चोरास शिक्षा करून ब्राह्मणाच्या गाई परत

मिळवून दिल्या. पण त्याच्या कडून नकळत नियमभंग झाल्याने तो तीर्थयात्रा करण्यास निघाला. अर्जुनाचा बारा वर्षे वियोग होणार म्हणून सर्वांना दु:ख झाले. अर्जुन क्रमाक्रमाने तीर्थे बघत फिरत असता गंगेच्या किनारी आला. तेथे उलूपी नावाची सुंदर स्त्री अर्जुनास पाहून मोहित झाली ती कौरव नावाच्या नागराजाची कन्या होती. तिने अर्जुनास तो गंगेत स्नान करीत असतां ओढून पाताळात नेले व तेथे आपले मनोगत सांगितले. त्यावेळेस अर्जुनाने व्रतस्थ असल्याचे सांगितले पण ते तिने ऐकले नाही. शेवटी त्याने तिच्याशी गांधर्व विवाह केला व एकरात्र तिचे मन संतुष्ट करून पुढे गेला. मग बद्रिकेदार, हिरण्यगर्भ वगैरे तीर्थे करीत तो मणिपूर नगरी आला. तेथे त्यावेळेस चित्रवाहन नामक राजा राज्य करीत होता. त्याची मुलगी चित्रांगी ही स्वरूपवान होती. तिच्या दृष्टीस अर्जुन पडताच तिला त्याच्याशी लग्न करण्याची इच्छा झाली व ती इच्छा, बापाची अनुमती घेऊन पूर्ण केली. तेथे अर्जुन तीन वर्षे राहिला. चित्रांगीच्या पोटी बभ्रुवाहन नावाचा मुलगा झाला. मग अर्जुन तेथून निघून तीर्थयात्रा करीत काम्यक वनात आला व तपश्चर्या करीत बसला. तो ज्या जागेवर बसला होता तेथेच श्री शंकर तपश्चर्या करण्यास बसत असत. अर्जुनाला आपल्या जागेवर बसलेला पाहून शंकराला राग आला व अर्जुनाने शंकरास न ओळखल्यामुळे या क्षुल्लक कारणावरून दोघांचे युध्द झाले. त्यावेळी अर्जुनाचे शौर्य पाहून शंकर प्रसन्न झाले व त्यांनी त्याला कवच व किरीट दिले.

नंतर शंकराची कृपासंपादून अर्जुन सेतूबंध रामेश्वरास गेला. तेथे मारूतीची व त्याची गाठ पडली. रामाच्या सेतुबंधनावरून दोघात थोडी चकमक झाली. पण भगवंताच्या कृपेने अर्जुनाची सरशी होऊन मारूतीने लढाईच्या प्रसंगी अर्जुनाच्या रथाच्या ध्वजावर येऊन बसावे असे ठरले. नंतर अर्जुन तीर्थे करीत द्वारकेजवळ येऊन पाहोचला. त्यावेळी श्रीकृष्णाची बहिण सुभद्रा ही उपवर झाली होती. ती आपल्याला मिळावी या उद्देशाने त्रिदंडी संन्याशाच्या रूपाने अर्जुन द्वारकेस राहिला. तो आपल्या आतेचा मुलगा अर्जुनच आहे ही गोष्ट श्रीकृष्णावाचून कोणासाही ठाऊक नव्हती. बलरामाने तर त्याला एक महान यति समजून त्याचा चांगला सत्कार केला व सुमारे चार महिने अर्जुनास आपल्या राजवाड्यात ठेवून घेतले. नंतर महाशक्तीच्या यात्रेच्या प्रसंगी कृष्णाच्या सांगण्यावरून अर्जुनाने सुभद्रेस पळविले. तेव्हा त्याची व यादवांची मोठी लढाई होऊन यादवांचा पराभव झाला. शेवटी सर्वांच्या मताने अर्जुनाचे सुभद्रेशी लग्न झाले. नंतर पार्थ सुभद्रेसह एक वर्षभर पुष्करक्षेत्री जाऊन राहिला. तोपर्यंत पार्थाची बारा

वर्षे पूर्ण झाली. नंतर श्रीकृष्ण व सुभद्रा यासह पार्थ इंद्रप्रस्थास आला. त्यामुळे सर्वांना फार आनंद झाला. एकदा खांडववन अग्निप्रकोपामुळे जळत असता त्यातून अर्जुनाने मयासुरास त्याच्या दीनवाण्या प्रार्थनेवरून वाचविले होते. तो अर्जुनाचा उपकार कोणत्यातरी रीतीने फेडावा म्हणून मयासुराने धर्म, अर्जुन व कृष्ण यांची प्रार्थना केली. मयासुर मोठा शिल्पशास्त्रज्ञ होता हे कृष्णास माहित होते. म्हणून त्याने त्यास एक सुंदर सभागृह बांधण्यास सांगितले. त्याप्रमाणे मयासुराने अवर्णनीय असे सभागाह तयार केले. ते सभागृह बांधतांना पाण्याच्या ठिकाणी जमिनीचा व जमिनीच्या ठिकाणी पाण्याचा भास होईल अशी रचना करून आपले अपार कौशल्य सर्वास दाखवून चकित केले. ही इमारत बांधून पूर्ण झाल्यावर धर्मराजा आपले बंधू, आप्तजन व ऋषिवर्य यासह ती पाहण्यास गेला त्यावेळेस आपण प्रत्यक्ष स्वर्गातच आलो आहोत असा सर्वांना भास झाला. मयासुराने भीमसेनास एक सुरेखशी भव्य गदा बक्षिस दिली आणि अर्जुनास देवदत्त नांवाचा शंक दिला. त्या मयसभेत धर्माने कोट्यावधी ब्राह्मणांना इच्छाभोजन दिले. युध्दकौशल्यात अर्जुन परिपूर्ण असल्यामुळे त्याच्याजवळ युध्दकला शिकण्यासाठी अनेक राजपुत्र येत. त्या सर्व विद्यार्थ्यात यादववीर सात्यकी व अभिमन्यु हे प्रवीण झाले.

पांडवांनी नंतर राजसूय यज्ञ केला. भीमार्जुनाशी दिग्विजय करून सर्व राजांना जिंकून करभार आणला. नंतर भीष्म, विदूर, द्रोण, कर्ण, दुर्योधनादि कौरववीरांना यज्ञास बोलाविले. त्याप्रमाणे ते सर्व वीर यज्ञास आले. भीष्म व कृष्ण यांच्या सल्ल्याने यज्ञाच्या कामाची योजना धर्म करू लागला. तेव्हा कृष्णाने ब्राह्मणांचे पाय धुण्याचे व वेळप्रसंगी उष्टी काढण्याचे काम स्वत:साठी मागून घेतले. सर्व ऋषीस लागणारे उपचार विदूराने पाहाण्याचे ठरविले. राजे लोकांची सर्व बडदास्त ठेवण्याचे काम संजयाकडे, द्रव्य देण्याचे काम अश्वत्थाम्याकडे व राजांच्या सैन्याच्या खाणापिण्याची व्यवस्था दु:शासनाने पाहण्याचे ठरले. दानधर्म करण्याचे व दक्षिणा देण्याचे काम कृपाचार्याकडे, जे राजे येतांना करभार आणतील ती घेऊन व्यवस्थित ठेवण्याचे काम दुर्योधनाकडे होते. यज्ञाला पुष्कळ विघ्ने येण्याचा संभव असतो. म्हणून ती निवारण्याचे काम अर्जुनाकडे, भोजनसमयी ब्राह्मणांची यथासांग प्रार्थना करण्याचे काम भीमाकडे, गंधाक्षता, सूमनमाला धूपदिपादि सुवासिक द्रव्ये सर्वांना पुरविण्याचे काम नकुलाकडे, तूप, मध, इ. पंचामृत वाटण्याचे काम सहदेवाकडे, भोजन वाढण्याची योजना द्रोणाकडे, जेवणाचे वेळी सर्वांना सुंदर पात्रातून थंडगार सुवासिक पाणी पुरविण्याचे काम पांडवाच्या पाच पुत्राकडे, सर्व लोकांच्या पानसुपारीची व्यवस्था ठेवण्याचे काम धृष्टद्युम्नाकडे

होते. ब्रह्मदेव, वसिष्ठ, व्यास व याज्ञवल्क्य हे चार ऋत्वीज व यजमानपद धर्मराजाकडे होते. या सर्वांची कामे ठिक चालली आहेत किंवा नाही हे पाहण्याचे काम भीष्मपितामहाने पहावे अशी सर्व व्यवस्था ठरली. यज्ञ संपूर्णपणे निर्विघ्नपणे पार पडला. यज्ञात अग्रपूजेचा मान श्रीकृष्णास दिल्याने शिशुपाल व वक्रदंत यांनी नापसंती व्यक्त केली व ते त्यांची निंदा करू लागले. भगवान श्रीकृष्णाने त्या सर्वांचा संहार केला. यज्ञ समाप्त झाल्यावर एकेदिवशी व्यास महर्षि पांडवाकडे आले. त्यांनी धर्मास एका बाजूस नेऊन सांगितले कीं, 'आता कौरवांचा उत्कर्षकाळ आला असून तुम्हाला तेरावर्षे अनेक कष्ट, विपत्ति संकटे भोगावी लागतील. तुम्ही श्रीकृष्णाविषयी पूज्यबुध्दि ठेवा तो तुम्हाला सर्व संकटातून पार पाडेल. साधुसंताचे आशिर्वाद घेत जा. जुगार खेळू नका आणि कदाचित कांही कारणांनी सर्व राज्य ले तरी धैर्य सोडू नकोस निष्कांचन होऊन वनात जा व तेथे एकान्तभक्ति आणि योगसाधना करा. धौम्यऋषि हे तुम्हाला मार्गदर्शन करतीलच त्यांच्याच सान्निध्यात राहून ज्ञान साधना करा.' या प्रमाणे सांगून व्यास निघून गेले. मग हे वर्तमान धर्माने आपल्या भावास सांगितले. ते ऐकून अर्जुन म्हणाला, 'व्यास व नारदांनी ज्याअर्थी ही सुचना दिली त्याअर्थी आपणावर काहितरी कठिण प्रसंग येणार हे निश्चित. आपण आता जास्त सावधगिरीने राहिले पाहिजे.

मयसभेत सर्व पांडव, कौरव, कुंती, द्रौपदी, भानुमति वगैरे बसली असतांना दुर्योधन तेथे आला. त्यावेळी त्या सभेत ज्यांनी यज्ञसमारंभास मदत केली त्यांचे गौरव करण्याचे कार्य चालले होते. धर्माने प्रथम दुर्योधनालाच बोलाविले त्याप्रमाणे दुर्योधन मोठ्या आढ्यतेने त्या मयसभेत आला. पण आल्याबरोबर तो जमिन समजून पाण्यात जाऊन पडला. तेव्हा सर्व सभेत एकच हशा पिकला. त्यावेळी द्रौपदीची व दुर्योधनाची दृष्टादृष्ट झाली. द्रौपदी हसत आहे असे पाहून दुर्योधनास फारच वाईट वाटले. दुर्योधन पडल्याबरोबर भीमाने पुढे होऊन दुर्योधनाला पाण्यातून वर काढले व नवा पोषाख घालण्यासाठी दिला. धर्माने त्याच्या यथोचित गौरव केला पण त्यात त्याचे लक्ष लागेना. या फजितीमुळे त्याला मोठी चुटपुट लागून राहिली होती. पांडवांची त्यातून विशेषत: द्रौपदीची चांगलीच विटंबना करावी या करितां तो आपल्या चौकडीत सल्लामसलत करू लागला. (श्लोक २५७-२७९)

भीष्मद्रोणादिकांना विचारल्यावरून त्यांनी दुर्योधनास सांगितले कीं, 'दुर्योधना सहज घडलेल्या गोष्टीबद्दल मनात एवढी अढी धरणे बरे नव्हे. द्रौपदी तुला सुनेप्रमाणे

असून धर्मादिक तर तुझे बंधूच आहेत. तेव्हा त्याच्यांविषयी द्वेष करणे हे अत्यंत अनुचित होय.' परंतु हा उपदेश त्यास रुचत नसे. त्याने शेवटी आपला हेतु शकुनिमामाला कळवून त्याचा सल्ला विचारला. शकुनिमामा कपटद्युतात प्रविण होता. तो म्हणाला, - 'पांडव आणि तू जर द्युतात खेळाल तर मी पांडवांना खचित नागवीन. एकदा समारंभ करण्याचे ठरवून सर्व राजांना निमंत्रणे पाठव आणि पांडव आले म्हणजे चार दिवस ठेवून घे व द्यूत खेळण्याचा घाट घाल. द्युतात पांडवांना आपण जिंकून घेऊ अशी मी सर्व व्यवस्था करतो.' शकुनीचे हे म्हणणे दुर्योधनाला पसंत पडले. त्याने एका मोठ्या समारंभाची तयारी करून देशोदेशीच्या राजाना निमंत्रणे पाठविली. त्याप्रमाणे हजारो राजे हस्तिनापुरास आले. त्यांत पांडवही आले. तो समारंभ यथासांग पार पडल्यावर दुर्योधनाने सर्वांना निरोप दिला. पण पांडवांना मात्र आग्रहाने चार दिवस राहण्यास सांगितले व एकेदिवशी संधी साधून धर्माजवळ द्यूत खेळण्यास गोष्ट काढली. धर्माने त्यास आपली संमती दिली. मग दुर्योधनाने सभा करून भीष्मद्रोणादिक प्रमुख सभासदांना आणून बसविले. नंतर सर्वांच्या समक्ष द्यूत खेळण्यास आरंभ केला. पांडवाकडून धर्म व कौरवाकडून दुर्योधन याप्रमाणे द्यूत खेळण्यास बसले होते. द्यूत खेळण्यास आरंभ झाल्यावर प्रत्येक डावात दुर्योधन हरू लागला व धर्म जिंकू लागला. कांही डाव खेळणे झाल्यावर दुर्योधन आपले सर्व गमावून बसला. नंतर शकुनीने तयार केलेले कपटी फासे दुर्योधनास देऊन पुन्हा द्यूत खेळण्यास बसविले. त्या खेळात धर्म हरू लागला. तेव्हा धर्म अधिक इर्षेला चढला व त्याने आपली एकेक वस्तू द्युतात लावून ती गमावून टाकली. गज, रथ, घोडे, शस्त्रभांडार, रत्ने, राज्य वगैरे गमविल्यावर दुर्योधन ते सर्व धर्मराजाजवळ मागू लागला. धर्म हा सत्यवचनी असल्यामुळे त्याने भीमास इंद्रप्रस्थास पाठवून सर्व संपत्ति आणवली व ती दुर्योधनाच्या स्वाधीन केली. पण दुर्योधनाचे करणे भीष्म द्रोणादिक व धृतराष्ट्र गांधारी यांना आवडले नाही. विदुराने दुर्योधनास उपदेशाच्या गोष्टी सांगून पांडवांचे हरण केलेले वैभव परत देवविले. (श्लोक २८०-२९७)

काही दिवसांनी बलरामाने आपली मुलगी वत्सला ही अभिमन्युला देण्याचे ठरविले. तो विवाह समारंभ लवकरच व्हावयाचा होता. परंतु इतक्यात धर्माला द्युत खेळण्याची दुर्बुध्दी झाली. दुर्योधनाच्या घरी द्यूत खेळल्या दिवसा पासून त्याला द्यूत खेळण्याचे व्यसन लागले होते. द्यूत खेळण्यासाठी दुर्योधनाला हस्तिनापुराहून मुद्दाम बोलावून आणले व द्यूत खेळण्याची इच्छा दर्शविली. यावेळी पांडवांना चांगले नागवायचे असा दुर्योधनाने अगोदर विचार केला होता. तो धर्माला म्हणाला, 'धर्म आता

तू पूर्वीप्रमाणे उगीच खेळावयाचे नाही. जो जे जिंकील ते त्याने खरोखरच घेतले पाहिजे. असे असल्यास मी खेळावयास बसतो,. निष्कारण खेळण्यात अर्थ नाही. धर्माने हे म्हणणे मान्य केले. नंतर उभयतात शपथा घेऊन द्यूत खेळण्यास आरंभ झाला. प्रथम धर्माचा जय होऊ लागला. परंतु शकुनिमामाने आपले कपटी फासे खेळावयास काढताच धर्म एकेक वस्तू हरू लागला. रथ, हत्ती, घोडे, जामदारखाना, वस्त्रे, अलंकार याप्रमाणे हरता हरता शेवटी राज्यही गमावले तथापि तो खेळावयाचा थांबेना. त्याने आपल्यासहित पाचही भावांना पणाला लावून पुढे खेळण्यास आरंभ केला. पण तो डावही दुर्योधनाने जिंकला. तेव्हा धर्माने द्रौपदीस पणाला लावले व तोही डाव दुर्योधनानेच जिंकला. शेवटी धर्माने बारा वर्षे वनवासाचा डाव लावला व तो डावही दुर्योधनाने जिंकला. तेव्हा धर्म निराश झाला. त्याने आणखी एक वर्ष अज्ञातवासाचा डाव लावला पण तोही डाव दुर्योधनाने जिकला. दुर्योधनाने मोठमोठ्याने राक्षसी अक्राळ विक्राळ हास्य करून दुःशासनाच्या हातावर टाळी देऊन म्हणाला, 'दुःशासना, आज आपले भाग्य थोर आहे. आपण मातापित्याच्या सद्गुरुच्या चरणी लागलो पाहिजे. भीष्मपितामह, गुरुद्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा ह्या सर्वांना विदीत व्हावे की, पांडवांचे राज्य त्यांच्यासहित व त्यांच्या स्त्रीसहीत आम्ही जिंकलेले आहे व ते आज आम्ही सर्व आमच्या ताब्यात घेत आहोत. यावर विदुराने धृतराष्ट्रास सांगितले, 'तू यांचा खेळ बंद कर. नाहीतर निष्कारण भांडणांचा प्रसंग येईल. या खेळापासून खात्रीने महाअनर्थ घडेल. भीष्मास सांगून शकुनि व दुर्योधन यांना कैद करावे. हे ऐकताच दुर्योधन विदुराच्या अंगावर धावून म्हणाला, 'तू मोठा लुच्चा आहेस. तू पांडवांचे कल्याण इच्छीतोस आणि आमचे खाऊन आमचा घात करूं पहातोस. तुला आता शेवटचे सांगतो. तुला बोलायचे असेल ते निपक्षपणाने बोल. नाहीतर स्वस्थ बैस.' हे ऐकून विदुरही फारच संतापला. तो म्हणाला, - 'या कौरवांच्या वंशाचा तू नाश करणार. या द्यूतात तू जर पांडवांची संपत्ति घेतलीस तर ती व तुझी सर्व संपत्ति पुढे थोड्याच काळात त्यांना परत द्यावी लागेल. इतकेच नव्हे तर तुम्हां सर्व कौरवांना नाश होईल.' दुर्योधन धर्माला म्हणाला - 'धर्मा मी तुला सर्व प्रकारे जिंकीले आहे तू आपले सर्वराज्य माझ्या स्वाधिन करून आपल्या भावासह वनवासाला निघून जा.' हे ऐकून धर्म म्हणाला - 'दुर्योधना जिंकल्याप्रमाणे तू माझे सर्व राज्य घे. मी आपल्या बंधुसह वनवासास जाण्यास तयार आहे.' धर्माचे अनुमोदन मिळताच दुर्योधनाने इन्द्रप्रस्थ येथील सर्व राज्य आपल्या ताब्यात घेतले व सिंहासनावर बसला. त्या सभेत भीष्म द्रोण आदि मंडळी पाण्यातील ढेकळासारखी विरघळून गेली. कौरवांचा आनंद तर गगनात मावेनासा झाला. (श्लोक २९८-३१०)

द्युतात द्रौपदीस जिंकल्यावर दुर्योधन म्हणाला 'विदुरा उठ व लवकर द्रौपदीला येथे घेऊन ये. ती आता आमची दासी झाली आहे.' हे ऐकून विदूर खवळला. तो म्हणाला, 'नीचा, चांडाळा, तूला लाज कशी वाटत नाही. मला हे काम सांगतांना तुझ्या जिभेचे तुकडे कसे झाले नाहीत.' तेव्हा दुर्योधन म्हणाला, 'तू पांडवांचा हितकारी आहेस हे मला पहिल्यापासून ठाऊक आहे.' मग दुर्योधनाने प्रतिकारी नावाच्या एका सारथ्याच्या मुलास द्रौपदीला आणण्याकरितां पाठवून दिले. तो द्रौपदीस जाऊन तिला म्हणाला, बाई धर्मराजाने द्यूत खेळून सर्व राज्य घालविले आहे आणि पाचही पांडवास व तुम्हास दुर्योधनाने जिंकले म्हणून दुर्योधनाने तुम्हास सभेत बोलाविले आहे.' हे शब्द ऐकताच द्रौपदीच्या काळजात धस्स झाले. तिचे डोळे पाण्याने भरून आले व तोंडातून एकही शब्द फुटेना. तरीही मोठ्या प्रयत्नाने ती त्यास म्हणाली, 'आता तू परत जाऊन सभेत भीष्म, द्रोण बसले आहेत. त्यांना विचार की, तुमच्यासमोर यावे हे बरे दिसते काय? मी पाच पांडवांची स्त्री असल्यामुळे फक्त धर्माचीच माझ्यावर सत्ता आहे असे नाही. ह्यात ह्यावेळी कालविभागाप्रमाणे पांडवापैकी मी भीमाची स्त्री असतां मला धर्म कसे हरविणार?' हे ऐकून तो परत येऊन सर्व वर्तमान त्याने दुर्योधनास कळविले. ते ऐकून दुर्योधनास फार राग आला. त्याने त्या प्रतिकामीला झिडकारून दुःशासनास म्हटले, 'तू स्वत: जा व तिला घेवून ये. हे काम इतरांचे नाही. द्रौपदी येत नसेल तर तिचे केस धरून तिला ओढून आण. आता ती आमची दासी झाली असून आमच्या सांगण्याप्रमाणे तिने वागलेच पाहिजे.' हे त्याच्या तोंडचे शब्द ऐकताच दु:शासन द्रौपदीकडे गेला. त्या दुष्टाला पाहून द्रौपदी घाबरली. तिला तो एखाद्या क्रूर श्वापदासारखा वाटला. तो म्हणाला, 'द्रौपदी तुला आम्ही द्युतात जिंकले आहे. आता तू दुर्योधनाची पट्टराणी हो. मग तर तू मोठ्या भाग्याची होशील. तुझ्या मागची ही पाच नवऱ्यांची कटकट आता चुकली म्हणून दुर्योधनाचे उपकार मान. आता लौकर चल.' हे ऐकून ती म्हणाली, 'नीचा हे काय बोलतोस? तुझी राखरांगोळी होऊन जाईल.' हे शब्द ऐकताच दु:शासन तिच्या अंगावर धावला. तेव्हा ती महालात जाऊ लागली. दु:शासनही तिच्या मागोमाग धावू लागला. तेव्हा ती कळवळून म्हणाली, 'भावोजी आता तुम्ही दुर्योधनाची समजूत करा. मी अस्पर्श आहे. आपला ब्राह्मणधर्माप्रमाणे पवित्र असा क्षत्रीय धर्म आहे. मी अबला आहे. अबला स्त्रीचे रक्षण करणे हे कर्तव्य आहे.' पण तो कसले ऐकणार! उलट त्याने तिची वेणी धरून एक हिसका मारून तिला खाली पाडले व ओढू लागला. द्रौपदीने त्याची पुष्कळ विनवणी केली. पण त्या पाषाण हृदयीला तिची यत्किंचीतही दया आली नाही. त्याने तिला तसेच ओढीत ओढीत सभेत आणले. (श्लोक ३११-३२८)

द्रौपदीला सभेत आणलेली पाहून सभेतील सर्व लोक दिङ्मूढ झाले. भीष्म, द्रोण इत्यादिकांनी तर आपली तोंडे झाकून घेतली. पांडव दीनासारखे आपली तोंडे खाली करून बसले होते. द्रौपदीला पाहून कर्ण म्हणाला, - 'हे पांचाली, पाहतेस काय? बैस आता दुर्योधनाच्या मांडीवर, आता पांडवांची आशा सोडून सुखाने राजविलास भोग.' त्यावेळी दु:खी होऊन द्रौपदीने भीमार्जुनाकडे पाहिले. त्यामुळे त्यांचा कोपाग्नी एकदम भडकून गेला. परंतु करतात काय? जसा एखादा वाघ सापळ्यात सापडावा त्याप्रमाणे त्या द्यूतातील पणामुळे त्यांचा निरूपाय होवून गेला. धर्मराजही भावांना वारंवार शांत करीत होता. तो म्हणाला, 'भीमा, सध्या आपल्याला यांनी जुगारात जिंकले आहे. ही वेळ राग करण्याची नाही तुला जर फारच राग येत असेल तर तुझी गदा माझ्या डोक्यात घाल. पण नियमाबाहेर एक पाऊलही जाऊ नकोस.' त्यावेळी संतापून भीम कळवळ्याने म्हणाला, 'धर्मा, अरे तुला व्यासाने सांगितले, नारदाने कळविले, विदूर तुझ्या कानीकपाळी ओरडत होता तरी त्यांच्या भाषणास झुगारून तू दु:खात पडलास व आम्हालाही दु:खातच टाकलेस. राज्यही गेले, वैभवही गेले तरी मला पर्वा नाही. परंतु द्रौपदीची जी विटंबना चालली आहे ती मला सहन होत नाही. तुझ्या शरीराचे तुकडे तुकडे करून टाकावेसे वाटते. ज्या हातांनी द्यूत खेळून नाश केलास ते तुझे हात तोडून टाकतो.' असे बोलून भीमाने गदेला हात लावला. इतक्यात अर्जुनाने हात धरून म्हटले, 'दादा, हे काय करतोस. अद्यापपर्यंत थट्टेत देखील तू धर्माची मर्यादा सोडली नाहीस आणि आता तुझा विचार कोठे गेला? या सर्व ब्रह्मांडात धर्मासारखा सत्यवचनी कोणी नाही. जे संकट आपल्यावर आले आहे ते त्याच्यावर नाही काय? ह्याप्रसंगी धर्माला मारून अपकीर्तीचे भांडार भरून ठेवशील?' याप्रमाणे अर्जुन बोलल्यावर भीम मुकाट्याने जागच्या जागी बसला.

या साऱ्या गोष्टी द्रौपदीला असह्यनीय होत्या. भीष्म, द्रोणादिक गुरुजनासमोर अशा स्थितीत उभे राहाणे तिच्या सहनशीलतेच्या पलिकडचे होते. भरलेल्या सभेत कौरव कर्ण, शकुनिसारख्या क्रूर नरपशुंच्या बुभुक्षित आणि उपहासात्मक नजरा तिला असह्य झाल्या होत्या. पण असहाय, दीन, पराजित अबला काय करू शकणार? रक्षणाच्या आशेने ज्यांच्याकडे पाहावे ते एक नव्हे पाचही पती लज्जेने चूर होऊन हीनदीन बसलेले. भीष्मद्रोणादिकही हतबल झालेले. अशा स्थितीत द्रौपदी आपल्या अंतरातील साक्षिभूत परमात्म्याला आठवून आळवू लागली. ती म्हणाली, 'हे गुरुवर ईश्वरा! आयुष्यात ज्या सतीचे केवळ एक नखसुध्दां परपुरुषास दिसले नाही. जिने

एवढ्या दिवसात एकदासुध्दा पाऊल घराच्या बाहेर टाकले नाही. त्या या अबलेवर आज हे काय अरिष्ट घातले! हे सारे लोचट बुभुक्षित दुष्ट यासभेत माझी लाज काढीत आहेत. निर्लज्जपणे ओढीत आणून येथे उभी करीत आहेत. हे भगवंता याहून मरणप्राय दु:ख आणखी कोणते असू शकणार?'

सती द्रौपदी मनोमन भगवंताची आराधना करू लागली 'हे स्वामी, माझी हाक तुला ऐकू येईल कां? ज्या पांडवांनी मला वनातून घरी आणले. अर्जुनाने मत्स्यवेध करून मला जिंकले हा सर्व तुझ्याच चरणाचा प्रताप आहे. हे स्वामी माझ्या प्राणसख्या श्रीकृष्णा तू तर म्हणत होता की, बाई द्रौपदी तुझ्याएवढी प्रेमळ दुसरी कोणती बहीण नाही. हे लक्ष्मीपते, तुझा तो प्रेमळपणा आज कोठे निघून गेला. ह्या दुष्ट दु:शासनाने माझे केस धरून या सभेत ओढत आणले. हे तुला कसे रे सहन झाले! हे नाथ कृष्णा या हीनदीन रंक अबलेवर एवढी या करून ताबडतोब ये आणि या दुष्टांच्या कचाट्यातून आम्हाला काढ रे! प्राणसख्या, भक्तवत्सला, अनंत संकटातून माझ्या पतींचे रक्षण केलेस. अनंत बळ देऊन साऱ्या संकटातून तू त्यांना वाचविलेस पण आज तेच माझे पती हीन दीन पराजित झालेले आहेत. आता तुझ्यावाचून आमचे रक्षण करण्यास कोण समर्थ आहे.' सती द्रौपदी मनोमन भगवंताचा धावा करीत आहे, तो वर दु:शासनाने द्रौपदीला सर्वांच्यासमोर सभेत उभे कले. तेव्हा भीष्म व द्रोण यांस ती म्हणाली, 'अहो महाथोर ऋषीवर्य हो, तुम्ही मला वंद्य आहात तुमच्या देखत माझी अशी विटंबना चालली असतां तुम्ही स्वस्थ कसे बसलात?' परंतु त्यांनी काहीच उत्तर दिले नाही. त्यानाही असा पेच पडला कीं, 'तिला दुर्योधनाने जिंकले असे म्हणावे तर हे दुष्ट तिची हवी तशी विटंबना करतील व न म्हणावे तर धर्माकडे खोटेपणा जातो.' म्हणून त्यांनी फक्त इतकेच म्हटले की 'धर्म स्वत:च मी हरलो असे म्हणतो आहे. तेव्हा आमच्या न्यायाला कोण ऐकतो.' नंतर कोणी बोलत नाही असे पाहून कौरवामधील विकर्ण नांवाचा विचारी भाऊ एकदम उभा राहून मोठ्याने म्हणाला, 'येथे जो द्यूताचा खेळ झाला तो खरा नसून ते सर्व कपट होते. त्यामुळे द्रौपदीला जिंकले असे म्हणता येणार नाही. दुर्योधनास दुर्बुध्दि झाली असून धृतराष्ट्र मायेने आंधळा झाला आहे. भीष्म व द्रोण हे दुष्टांच्या अन्नाने बांधलेले आहेत. धर्मराज हा साक्षात् धर्मच असून द्रौपदी तर मूर्तिमंत देवीच आहे.' हे ऐकताच कर्ण चवताळून म्हणाला, 'अरे महामूर्खा आताच तुला ठार केले असते, पण तुझ्या आईला वाईट वाटेल

म्हणून सोडून देतो. निर्लज्जा! येथे तुझ्या पेक्षा हजारो शहाणे लोक बसले आहेत ते एकही शब्द बोलत नाही तूच मोठा शहाणा झालाय का? अरे मूढा! जी दासी झाली तिला सभेत आणण्याला कोणती हरकत आहे? जिला पाच नवरे आहे ती पतिव्रता कसली? तीची एवढी प्रतिष्ठा कशाला? हा जर अन्याय असता तर पांडव येथे स्वस्थ का बसले असते. चला त्यांची वस्त्राभूषणे काढून घ्या. द्रौपदी, तू आता सर्व कौरवांची दासी झाली आहेत. तेव्हा तू दुर्योधनाच्या मांडीवर जाऊन बैस.' कर्णाचे हे भाषण ऐकून द्रौपदी अत्यंत संतापली ती सर्वांना उद्देशून म्हणाली 'सभासदहो मी विवाहीत स्त्री असून दांडगा कर्ण सर्वासमक्ष जे अमंगल भाषण करीत आहे त्याबद्दलही तुम्हास कांहीच वाटत नाही काय? परस्त्रीची विटंबना केल्यामुळे रावणासारख्याचीही दुर्दशा उडाली, तेथे तुम्हासारख्यांची कथा ती काय! दुर्योधनाच्या मांडीवर कर्णाच्या इच्छेप्रमाणे भीमाची गदा बसून त्याची इच्छा लवकर तृप्त होईल.' द्रौपदीच्या भाषणाने दुर्योधन अत्यंत संतापला. तो रागाने म्हणाला - 'दु:शासना, ही द्रौपदी आमची इभ्रत न ओळखता वाटेल तसे बोलत आहे. तिची फजिती झाली पाहिजे. ऊठ आणि तिचे वस्त्र सोडून तिला भर सभेत नग्न कर.'
(श्लोक ३४२-३५६)

दुर्योधनाची आज्ञा होताच क्षणाचाही विलंब न करता दु:शासन उठला व तिच्याजवळ जाऊन तिचे वस्त्र ओढू लागला. त्यावेळी भीष्म द्रोणादिकांनी दुर्योधनाला तसे न करण्याविषयी पुष्कळ सांगितले, पण त्याने सर्वांना दुरुत्तरे देवून गप्प बसविले व दु:शासनाला द्रौपदीचे वस्त्र सोडण्याविषयी सुचविले. हा विपरीत प्रकार पाहाताच द्रौपदी अत्यंत चिंतातूर झाली. भीमार्जुन तिचे रक्षण करण्यास समर्थ होते, परंतु धर्माने त्यांना स्वस्थ बसण्यास सांगितल्यामुळे त्यांचा नाईलाज झाला होता. तेव्हा श्रीकृष्ण भगवंतावाचून रक्षण करणारा यावेळी कोणी समर्थ नाही असे जाणून ती अंत:करणपूर्वक श्रीकृष्णाचा धावा करूं लागली. ती म्हणाली -'हे करूणाघना, तूं माझ्या साहाय्यास येण्यास कां उशीर करीत आहेस. सुवर्णाच्या द्वारकानगरीत सोळा सहस्त्र राण्याबरोबर रमलास कां? गोकुळातील सोळा सहस्त्र गोपीबरोबर रासक्रिडा करण्यात दंग झालास. प्राणसख्या! सवालाख भक्तांच्या हृदयातच अडकून राहिलास. कां या दीनहीन दासीला विसरून गेलास? कृपाळा, आम्ही कितीही अपराधी असलो तरी तुझेच भक्त ना. मग आमच्यावर अशी उपेक्षा कां? स्वामी तुला कोणत्या शब्दाने आळवूं! तू अंतर्यामी असूनही आर्ततेने मारलेली माझी हाक तुला ऐकू येत नाही कां? हे दीनदयाळा, कृपावत्सला आता हा दुष्ट दु:शासन वस्त्र ओढून मला

नग्न केल्याशिवाय राहाणार नाही. भगवंता श्रीकृष्णा या तुझ्या बहिणीची तुला कशी करूणा येत नाही. या सभेत होत असलेली विटंबना तुझ्याने सहन कशी होते? नारायणा आता माझा आधार फक्त तूच एकमेव आहेस. हे सद्गुरुमूर्ति या दासीकडून आपल्या सेवेत काय अंतर पडले? तुम्ही ताबडतोब जाऊन माझ्या आत्मचंद्र भगवंताला - श्रीकृष्णाला या दीनदासीचा संदेश कळवा. आता ही विटंबना माझ्याने सहन होत नाही. तरी ताबडतोब येऊन आमचा उध्दार करा.' द्रौपदीने डोळे मिटून एकाग्रचित्ताने भगवान कृष्णाचे व सद्गुरु वेदमूर्ति व्यासांचे स्मरण केले. तिच्या नयनातून एकसारखा अश्रुप्रवाह वाहू लागला. ती संपूर्ण जगताचे भान विसरली. पर्तींची अवस्था, दुष्टांचा परिहास, आपली स्थिती वगैरे सर्व कांही ती विसरली. केवळ एकमेव प्राणसख्या तो मुरली मनोहर मेघ:शाम त्याच्याच स्वरूपध्यानाशी ती तद्रूप झाली. (श्लोक ३५७-३६७)

परमेश्वर स्तुति करीत असतां सती द्रौपदीचे ध्यान केन्द्रीत झाले. हात जोडून अंतरिक्षाकडे डोळे मिटून पण मनोमन दृष्टी लावून ती एकाग्रतेने श्रीकृष्णाचे ध्यान करू लागली. इकडे भगवान कृष्ण द्वारकेत सुखासनावर पडून निद्रावश झाले होते. जवळच रूख्मिणी बसून भगवंताला वारा घालीत होती. एवढ्यात वेदमूर्ति व्यासमुनी तेथे आले आणि सांगू लागले, 'भगवंता आपला दास दुष्टांच्या तावडीत सापडला असून विलंब न करतां ताबडतोब त्याच्या रक्षणाकरितां आपण गेले पाहिजे. आपण जर एक क्षणाचाही विलंब केला तर अनर्थ ओढवेल. स्वामी आपण ताबडतोब गरूडावर स्वार होऊन यावे. मी आधी जाऊन भक्ताला आश्वासन देतो असे म्हणून व्यासमुनी अंतर्धान झाले व मनोवेगाने येऊन भक्तिमति सती द्रौपदीला अंतरिक्षातूनच आश्वासनपर आशिर्वाद देऊन धीर देऊ लागले. गरु महाराजांचा आशिर्वाद व आश्वासन मिळताच सतीला धीर आला. इकडे द्वारकेत रूख्मिणी श्रीकृष्णाला विचारू लागली - 'स्वामी आपण एवढे खडबडून जागे झाले व भावावेगाने गलबलून गेले, एवढा महान तुमचा भक्त आहे तरी कोण आणि त्याजवर असे कोणते दुस्तर संकट आले ते सांगावे.' भगवंतांनी सांगितले - 'रूख्मिणी ती माझी भक्तिमति भगिनी द्रौपदी पांचाली आहे. त्रेतायुगात तारालोचनी रूपाने अवतरलेली माझी अनन्यनिष्ठावान भक्तिमति परमपिय सुहृद अशी माझी भगिनी द्रौपदीरूपाने या युगात अवतरलेली आहे. पांडव द्यूतात हरून पांचालीलाही हरवून विन्मुख होवून बसलेले आहेत आणि दुष्ट कौरव जेतेपणाने उन्मत्त होऊन सती द्रौपदीला सभेत आणून तिची विटंबना करून नग्न करू पहात आहेत.' रूख्मिणी म्हणाली - 'अहाहा हायरे दुर्दैवा कायही भक्ताची

कसोटी! स्वामी, आपण ताबडतोब जाऊन ज्या भक्ताची तंद्री आपणाकडे लागलेली आहे, तनमन व धन अर्पून जे भक्त निरहंकार, निर्विकारी झालेले आहेत त्या परम सद्भक्त सज्जनांच्या शीलाचे रक्षण करणे आपले ब्रीद आपण सत्य करावे.' रूख्मिणीचे वचन ऐकून भगवान म्हणाले, 'प्रिये' सत्यधर्माचे पालन करतांना भक्तावर आलेले संकट हे प्रत्यक्ष भक्तावर नसून ते गुरुवर आराध्यदैवतावरच असते म्हणून त्याचे निवारण करणे हे आमचे आद्यकर्तव्य आहे.' असे म्हणून भगवंताने गरूडाचे स्मरण करताच गरूड हात जोडून समोर उभा राहिला. भगवंतांनी त्यावर आरूढ होऊन वायुवेगाने इंद्रप्रस्थास पांडवांच्या राजसभेत अंतरिक्षात येउन उभे राहिले. एकमेव भक्ताशिवाय ते कोणाला दिसू शकणार?

इकडे दुःशासन मोठमोठयाने उपहास करीत द्रौपदीजवळ गेला व म्हणाला हे द्रौपदी, विचार कसला करतेस. आता ह्या सभेत कोणीही तुझ्या साहाय्याला येत नाही म्हणून हे बघ तुझे नवरे कसे हतबलासारखे बसले आहेत. त्यांनी वस्त्रे काढून वल्कले घेतली व ते रानात जाण्याच्या तयारीत आहेत. तू कशाला त्यांची चिंता करतेस. तू खुशाल इथे राहून दुर्योधनाबरोबर राज्यमहिषिचा उपभोग घे. जा, त्याच्या मांडीवर जावून बैस. का ओढू तुझे वस्त्र?' द्रौपदी कळवळून म्हणाली, 'भावोजी तुम्हाला असे बोलणे शोभत नाही. माझेकडून काही चूक झाली असेल तर त्याची क्षमा करा. वाटल्यास प्राणदंडाची शिक्षा करा. पण अशा रीतीने एखाद्या स्त्रीची भरसभेत विटंबना करणे योग्य नाही. शिवाय मी तुमची वडील भावजय आहे. शास्त्रवचनानुसार वडिलभावाची पत्नि मातेसमान मानायला पाहिजे व शहाणपणा धरून तुम्ही ही माझी विटंबना थांबवायला पाहिजे.' यावर दुर्योधन मोठ्याने ओरडला 'अगे द्रौपदी आज तू आमची दासी आहेस. तुमच्या राज्यसभेत बांधलेल्या विचित्र महालात तू मला पाण्यात पडलेला पाहून उपहासाने हसली होती व हा भीम 'आंधळ्याचा मुलगा दुर्योधन' असे म्हणाला होता. आता तू आमची दासी झाल्याने आमच्या मनाप्रमाणे हवी तशी तुला वागवू आणि शास्त्रात असे सुध्दां म्हटले आहे की सर्पाच्या शेपटीवर पाय देऊ नये अथवा त्याच्या वाटेला जाऊ नये. तसे केल्यास तो दंश केल्याशिवाय राहात नाही. अरे दुःशासना काढ तिचे वस्त्र, उघडे कर तिचे अंग, पाहूं दे या साऱ्या सभासदांना आमचा प्रताप.' दुर्योधनाची आज्ञा होताच जशी एखादी जळू अंगाला बिलगते त्याप्रमाणे दुःशासनाने द्रौपदीचे वस्त्र धरले. एका हाताने तिचा हात वर करून दुसऱ्या हाताने वस्त्र ओढू लागला. भक्तांच्या सहनशीलतेची सीमा झाली. सर्व सज्जनांनी डोळे मिटले. दुष्टांनी डोळे फाडून उत्साहाने सतीकडे निरखून पाहिले. काय दिसले त्यांना? (श्लोक ३८७-४०३)

दु:शासनाने एक वस्त्र फेडले तो त्यात त्यापेक्षाही उत्कृष्ट वस्त्र दिसू लागले. तो प्रकार पाहून सर्वांना आश्चर्य वाटू लागले. पण दुर्योधन म्हणाला 'दु:शासना ही मोठी हुशार दिसते. आपणास चकविण्याकरीता बरीच वीस्त्रे नेसून आली आहे असे वाटते. कांही हरकत नाही. घे ती वस्त्रे सर्व ओढून.' दुर्योधनाची आज्ञा होताच दु:शासनाने भराभर तिची वस्त्रे फेडण्यास आरंभ केला. पण काय, एक वस्त्र सोडावे तो त्यापेक्षाही अधिक मौल्यवान असे वस्त्र आत तयारच. दु:शासनाने तेही वस्त्र फेडले तो आत तिसरे वस्त्र तयार. त्यावेळी द्रौपदीचे नखही कोणाच्या दृष्टीस पडेना व दु:शासनही वस्त्र फेडण्याचे आवरेना. लाल, पांढरे, हिरवे, पिवळे, गुलाबी, किरमीजी, नारिंगी, जरतारी, वेलबुट्टीदार असे ते लाखो मोलाचे एकेक वस्त्र पाहून सर्वांचे डोळे दिपून गेले. वस्त्रे फेडता फेडता दु:शासन थकून गेला. सभामंडपात नाना प्रकारच्या रंगाच्या शालु पैठण्यांचा ढिगचा ढिग पडळा. परंतु द्रौपदीच्या अंगावर पुन्हा दिव्य वस्त्र कायमचे कायम. असे शेपन्नास नव्हे तर पुरे नऊशे नव्वाणऊ वस्त्रे तिथे सतीच्या अंगावर प्रगट झाले. शेवटी भगवंताने द्रौपदीस आपला दिव्य पितांबर नेसविला आणि 'या वस्त्रास हात लावलास तर सर्व दुर्जनांचा संहार आजच करीन.' असे म्हणून सुदर्शन घेतले. तेव्हा कोटी विजा चमकल्यासारखे होऊन सर्व कौरव घाबरले. दु:शासन तर धापा टाकीत टाकीत त्या वस्त्रांच्या ढिगात कोठे गुंडालळा गेला तेही दिसले नाही.

पूर्वी भगवान श्रीकृष्णाने सुभद्रा, द्रौपदी यांच्या ठायी आपल्याविषयी असलेल्या प्रेमभावाची परीक्षा पाहावी म्हणून सहजच ऊस खाण्याचे निमित्त करून बोट कापले. त्यातून रक्ताची धार लागली. ते बांधण्याकरीता सुभद्राने इकडेतिकडे वस्त्राची शोधाशोध केली पण तिला फडके दिसेना. द्रौपदीच्या लक्षात हा प्रकार येताच तिने आपल्या भर्जरी शालुचा पदर फाडून ताबडतोब श्रीकृष्णाच्या बोटाला बांधले. त्या चिंधीस आडवे उभे असे एकूण नवशे नव्वाणऊ धागे होते. त्या एकेका धाग्याचे एकेक वस्त्र पुरवून भगवंताने सतीची लाज राखली. तो अपूर्व प्रकार पाहून भीष्म म्हणाला 'दुर्योधन त्या सतीची विटंबना आत तरी बंद कर. तिचा सहाय्यकर्ता प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवान आहे हे लक्षात ठेव. ती रागावून जर शाप देईल तर तुझा नाश व्हायला मुळीच वेळ लागणार नाही. भीष्माचे भाषण ऐकून व तो अपूर्व प्रकार चमत्कार पाहून दुर्योधनाच्या मनात भीति उत्पन्न झाली व त्याने द्रौपदीला सोडून देण्यास सांगितले. आपले साहाय्य करण्यास हृषिकेशी आला आहे अशी खात्री होताच द्रौपदीची

भीति पार नाहीशी होऊन तिला धैर्य प्राप्त झाले व ती रागाने म्हणली 'दुर्योधना धर्मराजाने तुला वचन दिल्यामुळे माझा नाईलाज झाला आहे नाहीपेक्षा तुला शाप देऊन चांगलीच शिक्षा दिली असती. तुला आपल्या द्युतकर्माचा फार अभिमान झाला आहे. पण त्या खेळातील नैपुण्य जर तुला दाखवायचे असेल तर ते मला दाखीव.' हे द्रौपदीचे भाषण ऐकून दुर्योधन तिच्याबरोबर मोठ्या अभिमानाने खेळायला बसला. आपल्या कपटी फाशाने आपण तिला सहज जिंकू असा त्यास भरवसा होता. त्याने तिला स्वत:लाच पणास लावावयास सांगितले. द्रौपदीला तेच इष्ट होते त्यामुळे ती जिंकली व तिने स्वत:ला दुर्योधनाच्या दास्यातून सोडवून घेतले. मग दुर्योधनाने दुसरा डाव पांडवांचा लावला तोही डाव तिने जिंकला व पांडवांची सुटका करून घेतली. दुर्योधन पुढे ईर्षेने तिच्याबरोबर आणखी खेळणार होता पण शकुनीने त्यास उठविले तो म्हणाला 'दुर्योधना ही कपटी स्त्री आहे हिच्याबरोबर तू खेळू लागलास तर जेवढे जिंकले आहे तेवढे सारे गमावशील.' शकुनीचे म्हणणे खरे वाटून दुर्योधनाने डाव संपविला. ( श्लोक ४०४-४२० )

सभेत हा प्रकार चालला असतां धृतराष्ट्राच्या राजवाड्याच्या मागच्या बाजूला कावळे, गाढवे आदिकरून प्राणी येऊन अपशकुन करू लागले. आकाशातून रक्ताची वृष्टी सुरु झाली. ती अमंगळ चिन्हे पाहून गांधारी भरसभेत रडत आली. तिने प्रथम द्रौपदी व पांडव यास पोटाशी धरून दुर्योधनादिकांची पुष्कळ निर्भत्सना केली. गांधारीच्या मागून धृतराष्ट्रानेही तसेच नाटक केले. त्याने द्रौपदीला म्हटले - 'तू आमच्या वंशाची केवळ किर्ती आहेस. आम्ही अंध अज्ञान आहोत. तुझ्या दिव्यत्वाला आम्ही जाणू शकलो नाही. झाल्या गोष्टीची आम्हास क्षमा कर व तुझे अमृतोपम मधूर वचन सिंचन कर.' द्रौपदी म्हणाली, 'मामांजी मी आपली सून असून ही विपरीत गोष्ट काय करता. झाल्या गोष्टीच्या मुळाशी केवळ आसुरी अहंकार आहे. पण आमच्या कर्मात जसे लिहिलेले असेल ते प्राक्तन भोगणे प्राप्त आहे. त्याचा दोष आम्ही कोणाला देणार नाही. मी आपली कुलवधू पंडू महाराजांची सून आणि सर्वसमर्थ अशा पाच पांडवांची पत्नि आहे. पवित्र अशा क्षत्रीय धर्माची बंधने माझ्या पतींनी व मी पालन केलेली आहेत. आज माझे स्वामी व मी आपल्या बंधनातून मुक्त होन राज्यवैभवाचा त्याग करून भगवंताच्या भक्तिकरितां वनात जात आहोत. आपण सर्वांनी सुखाने राज्याचा उपभोग घ्यावा. ज्या भगवंताने अखंड वस्त्र पुरवून

आज या सभेत जात असलेली माझी लाज राखली त्या दीनदयाळू भगवंताच्या सान्निध्यात आमचे नष्टचर्य संपवावे अशी इच्छा धरून आम्ही आपणा सर्वसज्जन गुरुजन वरिष्ठांकडून आशिर्वादाची अपेक्षा करते.' असे म्हणून द्रौपदी स्वस्थ उभी राहिली नंतर दुर्योधन धर्माला म्हणाला - 'धर्मा द्युतात हरल्याप्रमाणे तुम्ही बारावर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगण्यासाठी गेले पाहिजे. तेव्हा धर्म म्हणाला - तुझे म्हणणे सत्य आहे. ठरल्याप्रमाणे वनवासाला जाण्यास आम्ही कबूल आहोत.' असे बोलून धर्म आपल्या सर्व परिवारासह घराच्या बाहेर पडला. कुंती, अभिमन्यु व सुभद्रा यांस त्याने विदुराच्या घरी पाठवून दिले आणि तो स्वत: भीम, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी यांना बरोबर घेऊन वनवासाला इंद्रप्रस्थाबाहेर पडला. तेव्हा धौम्य गुरुही त्यांच्या बरोबर अरण्यात जाण्यासाठी निघाले. (श्लोक ४२१-४३३)

पांडवांच्या वनवासाची हकिकत विदुराला समजताच तो क्षणाचाही विलंब न करता इंद्रप्रस्थी आला व धर्मादिंकाना सद्य अंत:करणाने भेटला व भीष्मास म्हणाला, 'भीष्मा, दुर्योधनाने हे अत्यंत अनुचित कार्य केले आहे. याकरितां तू त्यास दोन उपदेशाच्या गोष्टी सांगून धर्माचे राज्य वगैरे त्याला परत देवीव.' तेव्हा भीष्म म्हणाला, 'विदुरा, दुर्योधन हा राजमदाने अत्यंत उन्मत्त झाला आहे. तो ऐकेन असे मला वाटत नाही. उलट तो माझा उपहास मात्र करील.' भीष्माने सांगितलेली खरी स्थिती असल्यामुळे विदुराने त्याबाबतीत विशेष आग्रह धरला नाही. मग भीष्म, द्रोण व विदूर असे पांडवांना निरोप देण्यासाठी नगराबाहेर गेले. त्यावेळी सर्वांचे अंत:करण गलबलून आले, डोळे अश्रूंनी भरून आले. भीष्म द्रोणादिक म्हणाले, 'धर्मा, तुम्हा पांडवांची अशी स्थिती पाहण्याचा आम्हावर प्रसंग आला तस्मात् आमचा धि:कार असो असे करूं नये म्हणून दुर्योधनाला सांगण्याचा आम्ही पुष्कळ प्रयत्न केला पण त्यांत यश न येण्याची चिन्हे दिसल्यामुळे आम्ही तो नाद सोडून दिला.' तेव्हा धर्म म्हणाला, 'महाराज यात दुर्योधनाचा कांही दोष नाही. हा सर्व आमच्या कर्माचा खेळ आहे. असो, जर कर्मरेशा अशी असेल त्यावेळी सर्व गोष्टी घडून येणारच.' याप्रमाणे शांतवृत्तीने सर्वांचे समाधान करून धौम्यगुरुसह पांडव वनवासात निघून गेले. त्यावेळी सर्व लोक दु:खी झाले, पण दुर्योधनाला स्वर्ग अवघा दोन बोटे उरला असा आनंद झाला. त्याचे ते कृत्य गांधारी व धृतराष्ट्र यांना मात्र मुळीच पसंत पडले नाही. त्यांनी त्याची पुष्कळ निर्भत्सना केली, पण दुर्योधनाच्या मनावर त्याचा काही एक परिणाम झाला नाही.

पांडव वनात जाऊ लागताच सर्व हस्तिनापुरची व इंद्रप्रस्थाची प्रजा मोठ्या दुःखाने त्यांना भेटण्यास आली व 'आम्ही तुमची प्रजा आहोत, जिकडे तुम्ही जाल तिकडे आम्ही येतो. येथे राहण्याची आमची मुळीच इच्छा नाही.' असे बोलून सर्व लोक वियोग दुःखाने रडू लागले. त्यांचे समाधान करून भीष्म, द्रोणाचार्य, विदूर तुमचे संरक्षण करतील, असे म्हणून मोठ्या कष्टाने त्यांना परत केले. कांही ब्राह्मण मात्र आग्रह धरून त्यांच्या जवळ राहू लागले. पण धर्म म्हणाला, 'येथे तुम्हाला अतोनात कष्ट होतील तरी तुम्ही मला या संकटात घालू नका.' असे सांगून त्यांना सुध्दा परत केले. श्रीकृष्णास पांडवांच्या वनवासाची हकिकत समजली. ते पांडवांना भेटण्यासाठी काम्यकवनांत आले. त्याला पाहून सर्वांचे डोळे पाण्याने भरून आले. पांडवांनी द्यूतक्रिडेपासूनची सर्व हकिकत कृष्णाला सांगितली. ती ऐकून कृष्णाला फार वाईट वाटले. द्रौपदी फारच गहिवरून गेली. ती म्हणाली, - 'कृष्णा या आपल्या बहिणीची लाज तू राखलीस. नाहीतर माझ्या विटंबनेस पारावार राहिला नव्हता. कौरवांनी कपटाने आम्हास जिंकल्यामुळे हा अरण्यवास आम्हाला घडला. माझी पाचही मुलें माहेरी पाठवून दिली. त्यांचा वियोग मला सहन होत नाही. कृष्णा, त्या दुःशासनाने मला भरसभेत केस धरून ओढून नेले. कर्ण वाटेल ते बोलला आणि दुर्योधनाने करू नये अशी विटंबना केली. त्या गोटींची आठवण झाली म्हणजे माझ्या जीवाची तळमळ होते. त्यांना केल्या कर्माचे प्रायश्चित मिळाल्यावाचून मला समाधान वाटावयाचे नाही. ही माझी इच्छा पूर्ण करण्यास तुझ्यावाचून कोणी समर्थ नाही.' हे द्रौपदीचे भाषण ऐकून श्रीकृष्णाने आश्वासन देऊन तिच्या मनास शांत केले. कांही दिवस ते तेथेच त्यांच्या समवेत राहिले. श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून त्यांनी अरण्यात देवसभा भरविली. कन्दमुळे, फुलेंफळांचा प्रसाद करून सर्व देवदेवतांचे पूजन अर्चन करून त्यांचे साहाय्य मिळावे म्हणून त्यांनी उपासना सुरु केल्या. सद्गुरु व्यास येऊन त्यांना धर्मोपदेश करीत. एकदा व्यासांनी धर्मास सांगितले, 'धर्मा तुला कौरवांची जी भीति वाटते. ती निष्कारण आहे. तुझे बंधू अत्यंत पराक्रमी असून त्यांच्या हातून सर्व दुष्टांचे हनन होणार आहे. अर्जुन हा खरा नर असून श्रीकृष्ण नारायण आहे. ही नरनारायणाची जोडी महापुरुषोत्तमाने दुष्टांच्या संहारासाठी निर्माण केली आहे. तेव्हा त्याच्या पराक्रमाविषयी तूं मुळीच शंका घेऊ नकोस. आता अर्जुनास विशेष शस्त्रास्त्र प्राप्तीकरितां कैलासास पाठव व मी तुला योगविद्या शिकवितो त्याचाही तू अभ्यास करीत जा.' असे म्हणून त्यांनी धर्माला योगविद्या शिकविली अर्जुनाने कैलासास जाऊन तपश्चर्येने शंकरास प्रसन्न करून त्यांचेकडून पाशुपतास्त्र व तसेच

अनेक अस्त्रांची प्राप्ती करून घेतली. तेथून इंद्र त्याला स्वर्गात घेऊन गेले. तेथे त्याचा विशेष सत्कार करून आपले वज्र वगैरे त्याला दिले व अनेक नृत्यगायन कला शिकविल्या. एकदा उर्वशीने त्याच्यावर अनुरक्त होऊन आपली इच्छा पूर्ण करण्याची विनंती केली. तेव्हा अर्जुनाने तिला सांगितले तू माझी माता आहेस. असे अनुचित वर्तन माझेकडून कदापि होणार नाही. उर्वशीने त्याला शाप दिला 'एक वर्षभर तू नपुंसक राहाशील.' इंद्राला हे वर्तमान समजताच त्याने अर्जुनास धन्यवाद दिला व हा शाप तुला अज्ञातवासात उपयोगी पडेल असे सांगून त्याचा योग्य सत्कार करून पांडवाकडे पाठवून दिले. अर्जुन परत आल्याचे वर्तमान समजताच श्रीकृष्ण द्वारकेहून त्याच्या भेटीस आले. ते प्रथम द्रौपदीजवळ जाऊन भोजन मागू लागले. आश्रमात कंदमुळावाचून काहीही नव्हते ती श्रीकृष्णाला म्हणाली - 'कृष्णा मी तुला भोजनास काय द्यावे याची मला मोठी काळजी पडली आहे. तू माझा खरा पाठीराखा भाऊ असल्यामुळे खरी स्थिती तुला सांगावयास हरकत नाही. मी आपला सारा आश्रम शोधला पण तुला खाण्यास योग्य अशी एकही वस्तू मला सापडली नाही. त्यामुळे मला फार वाईट वाटते. ही गृहस्थिती सांगतांना मरणप्राय दुःख होते परंतु ती तुला म्हणून सांगितली आहे, पण देवा आमची अशी स्थिती असल्यामुळे कोणीही अतिथी आमच्या दारात आला असता फार वाईट वाटते. अतिथीला विन्मुख घालविणे हा गृहस्थाचा धर्म नसल्यामुळे काही तरी कंदमुळे फळे त्यांच्या पदरात घालून त्यांना मार्गस्थ करते पण अधिक काही करता येत नाही. या साठी सर्वास अन्नदान देऊन तृप्त करता येईल असे काही तरी साधन करून द्यावे.' द्रौपदीचे हे भाषण ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, 'द्रौपदी मी तुला एक सूर्योपासनेचा मंत्र सांगतो. त्या मंत्राच्या योगाने सूर्य तुला प्रसन्न होऊन तुझी इच्छा पूर्ण करील. असे म्हणून द्रौपदीला एक सूर्याचा मंत्र सांगितला. त्या मंत्राने विधिपूर्वक सूर्याची स्तुति करताच सूर्य द्रौपदीसमोर प्रकट झाला व तिला एक स्थाली देऊन म्हणाला - 'द्रौपदी मनात आणशील तितक्या पात्रांचे व तू जे इच्छिशील ते अन्न ह्या स्थालीपासून तयार होत जाईल. मात्र तुझे भोजन होऊन तू एकदां स्थाली विसळून पालथी घातलीस म्हणजे मात्र सूर्योदयापर्यंत अन्न मिळणार नाही.' त्या स्थालीच्या प्रभावाने द्रौपदीने सर्वांना भोजन घालून तृप्त केले. कोणी अतिथी, भिक्षुक, वगैरे सर्व तृप्त होऊन जात. ते पाहून द्रौपदीला समाधान वाटले. ती कृष्णाला म्हणाली, - 'देवा तुझ्या कृपेने सर्व कांही इच्छा पूर्ण होतात. या वनवासात देखिल आमची कीर्ति होत आहे, ही तुझीच कृपा होय.'

पांडव काम्यक वनात आल्यावर त्यांचा द्वेष करणारे कांही चोर वगैरे दुष्ट लोकांनी कौरवांना ह्या स्थितीची हकिकत सांगितली. कौरवांनी पांडवांचे सत्वहरण करण्यासाठी ठरविले कीं, द्रौपदी जेऊन तिने स्थाली पालथी घातली म्हणजे दुर्वासऋर्षींना त्यांच्या साठ हजार शिष्यासह पांडवाकडे पाठवावे म्हणजे पांडव सत्वापासून सहज ढळतील व दुर्वासांच्या शापाने दग्ध होतील अनायासे आपला कार्यभाग सिध्द होईल. (श्लोक ४३४-४४४)

एके दिवशी दुर्योधनाकडे दुर्वास ऋषीची स्वारी आली दुर्योधनाने त्यांस आपले घरी बरेच दिवस ठेवून घेतले व त्यांची त्याने एकनिष्ठपणाने सेवा केली. नेहमी त्यांच्या तोंडून निघालेला शब्द झेलण्यास तो अगदी तत्पर असे. यामुळे दुर्वास प्रसन्न होऊन त्यास म्हणाले, - दुर्योधना तुला कांही वरदान मागावयाचे असेल ते माग? त्यावेळी दुर्योधनाने असाध्य असे इंद्रपद मागता तरी ते मिळाले असते. तसेच पांडवांचा- वारंवार पराजय करण्याकरितां एखादी शक्ति मागता तरीही त्यास मिळाली असती. परंतु दुर्योधनाला पांडवांच्या द्वेषाखेरीज दुसरे काहीच सुचत नव्हते तो म्हणाला, 'धर्मराजाला सूर्याने एक थाळी दिली आहे. तिजपासून त्यास पाहिजे तितके अन्न मिळते. परंतु ती एक वेळ धुऊन पालथी ठेविली म्हणजे पुन्हा सूर्यदर्शनावाचून तिजपासून अन्न मिळत नाही. तरी संध्याकाळच्या वेळी तुम्ही पुष्कळ ऋषीसह जाऊन धर्माजवळ भोजन मागावे. आणि तुम्हास भोजन न मिळाल्यास तुम्ही शाप देऊन पांडवास भस्म करावे.

दुर्वासांनी ती गोष्ट मान्य करून तो रात्री साठ सहस्र शिष्यासह धर्माच्या आश्रमात गेला व धर्मास म्हणाला, 'आम्हा सर्वांचे प्राण भुकेने कासावीस झाले आहेत तरी लवकर भोजन दे.' दुर्वासाच्या तोंडचे ते शब्द ऐकताच धर्माची पाचावर धारण बसली. त्याने मुख म्लान करून द्रौपदीकडे पाहिले. तिलाही ह्या एवढ्या सर्व ऋषीसमुदायास ह्यावेळी भोजन कोठून द्यावे अशी मोठीच काळजी पडली. तरी पण ईश्वरावर हवाला ठेवून तिने धर्मराजास सांगितले कीं सर्व ऋर्षींना स्नान करून येण्यास सांगावे. तोपर्यंत पात्रांची तयारी करते.' धर्माने ऋषीस तसे सांगितल्यावर दुर्वास आदि करून सर्वऋषि स्नानास गेले. नंतर द्रौपदीने श्रीकृष्ण परमात्म्याचा धावा आरंभिला. ती म्हणाली - 'हे मेघःश्यामा, हे आत्माराम, हे श्रीकृष्णा, मुरारे! यावेळी हे संकट निवारण करण्यास तुझ्यावाचून कोणीही समर्थ नाही. हे गोविंदा तू त्वरीत ये आणि आमच्या सत्वाचे संरक्षण कर. नाहीतर पांडव सत्त्वासाठी प्राणत्याग करतील.

प्रभो, हे सर्व तुला माहीत आहेच.' याप्रमाणे द्रौपदीने अंत:करण पूर्वक धावा करताच तो श्रीकृष्णाच्या कर्णरन्ध्रात शिरला. त्यावेळी द्वारकेत श्रीकृष्ण जेवणाच्या तयारीत असून समोर नुकतेच रूख्मिणीने पंचपक्वानाचे ताट आणून ठेविले होते. परंतु द्रौपदीचा धावा ऐकून तो ताबडतोब द्वैत वनात येऊन पोहोचला. त्याने द्रौपदीजवळ अगोदर मला काही खायला दे मग तुझे काय ते काम सांग असे म्हटले. ते ऐकून ती म्हणाली, 'कृष्णा, साठ सहस्त्र बटूसह दुर्वास येथे भोजनास आला असून तू संकटातून मला वाचवशील म्हणून तुझे स्मरण केले. तो तूच अगोदर कांही खावयास दे म्हणतो तर आता मी काय करावे? तेव्हा तो म्हणाला - 'चल तुझी थाळी तरी मला दाखीव' ती म्हणाली, 'ती तर मी केव्हाच धुवून पालथी ठेवली आहे.' पण भगवंतलीला विचित्र. तो कोठला ऐकावयाचा? त्याने थाळी आणवून न्याहाळून पाहताच तिला चिकटलेले भाजीचे पान तिला दाखविले. ते भाजीचे पान खाताच कृष्णाची क्षुधा शांत झाली व त्याने ढेकर दिला. साक्षात् जगन्नाथ तृप्त झाल्यावर मग अन्यलोकांची तृप्ति होण्यास अवकाश किती लागणार? दुर्वासऋषि जेथे स्नानासाठी गेले होते तेथे कृष्णाने मायावी पांडव द्रौपदी निर्माण करून त्यांच्या हातून साठ सहस्त्र ऋषिंना भोजन देऊन तृप्त केले. दुर्वासादि ऋषिंनी तृप्त होऊन पांडवास आशिर्वाद दिल्यावर मायावी पांडव व द्रौपदी अदृश्य झाली. इतक्यात खरा सहदेव तेथे येऊन दुर्वासादि ऋषींना सत्वर भोजनास येण्याविषयी प्रार्थना करू लागला. तेव्हा अंतर्दृष्टीने खरा प्रकार ओळखून दुर्वास सहदेवास म्हणाला - 'आम्ही जेऊन तृप्त झालो आहोत. आमचा धर्मास असा आशिर्वाद सांग कीं तुझे सर्व शत्रू नाश पावतील व द्रौपदीसह तुम्हा पांडवांचे संकट श्रीकृष्ण दूर करील.' असे म्हणून दुर्वास शिष्य समुदायासह निघून गेला. सहदेव परत आल्यावर श्रीकृष्णानेच सर्व घडलेले वर्तमान स्वत:च सांगितले, मी तुमचे सर्व संकटामध्ये असेच रक्षण करीन असे वचन देऊन तो द्वारकेस गेला. (श्लोक ४४५-४६६)

पांडवांना आपल्या वैभवाचे दर्शन घडवून त्यांना ठार मारावे अशा विचाराने दुर्योधनाने घोष यात्रेचे निमित्त केले. भीष्म, द्रोण वगैरे गुरूजनांना सोबत न घेता बाकीच्या सैन्यास घेऊन तो द्वैत वनापाशी येऊन पाहोचला. ही गोष्ट चित्रसेन गंधर्वाला समजताच तो पांडवाच्या रक्षणार्थ धावून आला. रस्त्यातच कौरवांची व चित्रसेनाची गाठ पडली. मोठी लढाई होऊन चित्रसेनाने दुर्योधनाचा पराभव केला व त्याला पकडून तो नेऊ लागला. सर्व सैन्य इकडेतिकडे पळून गेले. काहींनी पांडवाकडे

घेऊन सर्व वृत्तान्त धर्माला सांगितला. धर्माने आपल्या सर्व भावांना आज्ञा करून दुर्योधनाला सोडवून आणण्यास सांगितले. पांडव आपापली शस्त्रे घेऊन चित्रसेनावर चालून गेले, पण चित्रसेनाने पांडवांची भेट घेऊन कौरवांच्या कपटकारस्थानाची माहिती दिली. परंतु तरीही ते आमचे भाऊ आहेत. त्यांना सोडून द्या अशी धर्माने चित्रसेनाला आज्ञा दिली. ते मान्य करून चित्रसेनाने दुर्योधनाला सोडून दिले. परंतु त्याची चांगलीच निर्भत्सना केली. दुर्योधनाचा अपमान झाल्याने तो अधिकच द्वेषाने जळफळू लागला पण त्याला कांहीही करता येत नव्हते. त्याने घरी जाऊन त्याचा मेहुणा जयद्रथ याला द्रौपदीची विटंबना करण्यास सुचविले.

एकदा जयद्रथाने पांडव आश्रमात नाही अशी संधी पाहून तो तिथे गेला. द्रौपदी नुकतीच स्नान करून बाहेर उभी होती. त्याने द्रौपदीस पाहिल्यावर त्याच्या मनात तिच्याविषयी वाईट वासना निर्माण झाली. त्याने द्रौपदीला आपल्या दूताकरवी निरोप पाठवून तिची मनधरणी करण्याचा प्रयत्न केला. परंतु द्रौपदीने त्याची निंदा करताच त्याने तिला जबरदस्तीने रथात ओढून घेतले आणि तो वेगाने निघून गेला. ही गोष्ट पांडवांना समजताच ते रागाने लाल झाले. त्यांनी जयद्रथाच्या सैन्याला गाठून त्याचा पराभव तर केलाच पण भीमाने जयद्रथाच्या दूतास जागच्या जागी ठार मारले नंतर त्याने जयद्रथाकडे मोर्चा वळविला पण मध्येच धर्माने भीमाला अडविले. धर्म म्हणाला, 'भीमा, जयद्रथाचा वध झाला तर आपलीच चुलतबहीण विधवा होईल तरी तू हे कृत्य करू नकोस.' हे ऐकून भीमाने त्यास द्रौपदीची क्षमा मागण्यास सांगितले. जयद्रथाने द्रौपदीला साष्टांग नमस्कार घातला. नंतर जयद्रथाच्या डोक्याचे पाच पाट काढून सर्वांनी त्याची खूपच विटंबना केली व त्याला हाकलून दिले.

अशा रीतीने पांडवांनी बारावर्षेपर्यंत अरण्यात अत्यंत हलाखीचे दिवस काढले. तरीपण ते वृत्तीने समाधानी व सत्वशील असल्याने ते अत्यंत आनंदी होते. भगवान श्रीकृष्णाची त्यांच्यावर कृपाछाया होती. वेदमूर्ति सद्‌गुरु व्यासमुनीचे त्यांना आध्यत्मिक बळ होते. स्वत: अपार कष्ट सहन करून खडतर धर्माचरणाचे तपोबल त्यांचेजवळ होते. सत्यधर्माचे आचरण करून ते क्षमाशील उदार अंत:करणाचे होते, कौरवांनी अतोनात त्यांचा छळ केला, प्राणांतिक दु:ख दिले पण पांडव रतिभर सुध्दां विकृत मार्गाला गेले नाही. त्यांच्या सत्वधर्मपालनाचा आम्रवृक्ष आता चांगला फोफावला असून फळला फुलला होता. परब्रह्मपरमात्मस्वरूप श्रीकृष्ण भगवंताच्या सान्निध्यात

राहून सद्‌गुरुसेवा रूपी आम्रफळ त्यांनी संपादन केले होते. अपरिमित धैर्य धारण करून पुढे येणाऱ्या प्रसंगाकडे नीट लक्ष देऊन ते दक्षतेने वागत असत. धर्मराजाच्या मनात सदैव सात्विक भाव उद्‌भवत असे कीं युध्द न करता आपले राज्य आपल्याला मिळविता आले पाहिजे पण कौरवांचे तसे कोणतेच सद्वर्तन अथवा त्यांना अनुकूल असे आचरण नसल्याने भीम व अर्जुन यांनी निरनिराळ्या साधना करून आत्मबल व शस्त्रास्त्रबल प्राप्त करून घेतले. भगवान श्रीकृष्ण व व्यासांच्या अनुमतिप्रमाणे त्यांना निश्चित समजले होते कीं युध्दप्रसंग अढळ आहे. युध्द केल्याशिवाय आपणाला राज्य मिळू शकणार नाही म्हणून त्यांनी निरनिराळ्या राजांना आपल्या बाजूने वळविण्याचा प्रयत्न चालूच ठेवला. त्यांची प्रवृत्ति सात्विक व बाजू सत्याची असल्याने अनेक राजांनी त्यांना तसे अनुमोदन दिले होते. पण आता त्यांना बारा वर्षे वनवासात पूर्ण झाली होती. महत्वाचे तेरावे वर्ष त्यांना अज्ञातवासाचे घालवायचे होते त्यासाठी त्यांनी सद्‌गुरु वेदव्यास व श्रीकृष्णाचा सल्ला घेतला. ( श्लोक ४६७-४७९ )

बारा वर्षे पूर्ण झाल्यावर आता पांडवांचा अज्ञातवास सुरु होणार म्हणून त्यांना भेटण्यासाठी श्रीकृष्ण त्यांच्याकडे आला. धर्म म्हणाला - 'श्रीकृष्णा आता अज्ञातवासाचे एक वर्ष आम्हाला कंठावयाचे आहे. तरी आम्हास अज्ञातवासात कोणी ओळखणार नाही. अशाकरितां आम्ही कोठे व कसे राहावे ते सांग. धर्मास श्रीकृष्ण म्हणाला, 'धर्मा, तुम्ही सर्व जण विराट देशात विराट राजाच्या आश्रयाला जाऊन राहा. तो तुम्हाला जरी ओळखील तरीपण त्याबद्दल तुम्ही काळजी करूं नका. मार्गात तुम्हाला यमधर्म भेटेल तो तुम्हाला मार्गदर्शन करील.' श्रीकृष्णाचा व काम्यकवनांतील ऋषींचा आशिर्वाद घेऊन पांडव विराट देशाच्या मार्गाला लागले. तापीनदीच्या काठी आल्यावर त्यांची व यमधर्माची गाठ पडली. तेव्हा सर्व पांडवांनी त्याला साष्टांग नमस्कार करून आपले वनवासाचे कष्ट सांगितले. त्यांची हृदयद्रावक हकिकत ऐकून यमधर्म म्हणाला - 'युधिष्ठिरा लवकरच तुमचे नष्टचर्य संपेल. श्रीकृष्णाच्या कृपेने व सल्ल्याप्रमाणे वागून तुम्ही गतवैभव प्राप्त कराल. पण आता तुमची व माझी भेट झाली आहे तेव्हा तुम्ही माझ्याजवळ कांही वरदान मागावे अशी माझी इच्छा आहे.' धर्म म्हणाला, 'महाराज तुमची कृपा असल्यास आमचे भाग्य थोर म्हणावयाचे आता आम्हाला एकवर्ष अज्ञातवासात काढावयाचे आहे यासाठी आम्ही कोणास ओळखू येणार नाही अशी आमची रूपे पालटून टाका.' ते ऐकून यमाला किंचीत खेद झाला. तो म्हणाला, 'धर्मा माझी भेट झाली असून तुम्ही माझ्याजवळ अगदी अल्प मागितले.

असो या प्रसंगी तुम्हास याच गोष्टीची आवश्यकता आहे. तेव्हा तुमची इच्छा मी पूर्ण करतो.' असे म्हणून यमाने द्रौपदीसह सर्वांच्या मस्तकावर हात ठेवून त्यांची पूर्वरूपे अगदी बदलून टाकली. मग यमाने धर्माला कंकभट, भीमाला बल्लव, अर्जुनाला बृहन्नडा, नकुलाला विजयवंत, सहदेवाला जयंत व द्रौपदीला सैरंध्री अशी नावे ठेवून त्यांना निरनिराळे व्यवसाय करायला सांगितले. सैरंध्रीने राणीची वेणीफणी करावी, बृहन्नडेने नृत्य गायन शिकवावे, बल्लवाने स्वयंपाक करावा, जयंताने गुरेगाई वगैरेंना सांभाळावे, विजयवंतने अश्वपारख करावी. कंकभटाने राजाला संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न करावा याप्रमाणे त्यांना व्यवहार सांगितले. याप्रमाणे पांडवांना निरनिराळी रूपे प्राप्त होताच ते तेथून विराट्नगराजवळ आले. तेथील घोर अरण्यात त्यांनी शमीच्या एका झाडावर आपली शस्त्रास्त्रे सर्परूपाने लपवून ठेवली व ते नगरात निघून गेले. त्या त्यांच्या शस्त्रास्त्रांचे व तेथील भूमीचे संरक्षण करण्याकरिता भगवान श्रीकृष्णाने एका अक्राळ विक्राळ सिंहाला निर्माण केले. तीच कुंवारीका भूमी म्हणजे कुवारिका क्षेत्र नांवाचे कलियुगातील प्राधान्यभूत तीर्थक्षेत्र आहे. या कुंवारिका भूमीचा स्वामी सद्गुरुब्रह्मा जोपर्यंत येत नाही तोपर्यंत तुझी मुक्तता होणार नाही. सद्गुरुब्रह्मा प्रगट लीला करीत आल्यानंतर येथे वास्तव्य करण्याच्या उद्देशाने येऊन धनुष्यबाणाच्या योगाने, तुझा उजवा कान छेदून तो बाण पाताळात निघून जाईल. तेव्हा तुझी मुक्तता होईल. असे भगवान श्रीकृष्णांनी त्याला आश्वासन दिले. इकडे पांडव नगरीत येऊन विराट् राजाला भेटले. विराटाने त्यांचा सत्कार करून विचारपूस केली. तेव्हा कंकभटाने पांडवांची वनवासापर्यंतची सर्व हकिकत विराटाला सांगून म्हणाला, 'राजा विराटा, त्या पांडवाचे आम्ही सेवक आहोत. मी पांडवांचा पुरोहित आहे. हा बल्लव स्वयंपाकाचे काम करीत असे. ही बृहन्नडा नृत्यगायन शिकवीत असे. ही सैरंध्री द्रौपदीची वेणी फणी करीत असे. हा विजय चांगला अश्वपरीक्षक आहे. तसाच हा जयंत पशुंची खिल्लारे चांगल्या रीतीने सांभाळतो. याप्रमाणे पांडवांजवळ कामे करून आम्ही आपले उदरभरण करीत होतो. परंतु त्यांना वनवास व अज्ञातवास प्राप्त झाल्यामुळे त्यांनी आम्हास आपणाकडे जाण्यास सांगितले. ते म्हणाले विराटाचा व आमचा चांगला स्नेह आहे. तुम्ही त्यांच्याच आश्रयाला जाऊन राहा. राजा विराटा पांडवांनी सांगितल्याप्रमाणे आम्ही आपल्या आश्रयाला आलो आहोत.' कंकभटाचे भाषण ऐकून विराटाने मोठा संतोष दर्शविला. तो म्हणाला, 'कंकभटा तू व तुझे साथीदार माझ्या घरी निश्चिंत राहा. पांडवांचा व माझा स्नेह असल्यामुळे तुम्हां सर्वांचे संरक्षण करणे माझे कर्तव्य आहे. तुम्ही जी कामे पांडवाकडे करीत होता. तीच माझ्या येथे करून सुखाने राहा.'

असे सांगून त्याने त्या सर्वांना ती कामे नेमून दिली व त्यांच्या राहाण्याची वगैरे सर्व व्यवस्था केली. (श्लोक ४८०-४९४)

दिवसामागून दिवस जात होते. एकदा सुदेष्णा व सैरंध्री गप्पा गोष्टी करीत बसल्या होत्या. इतक्यात कीचक तेथे आला. कीचक हा सुदेष्णेचा भाऊ. सैरंध्रीला पाहून त्याच्या मनात तिच्याविषयी पापवासना निर्माण झाली. कीचक म्हणाला, 'हिला माझी पत्नि होण्यास सांग.' सैरंध्रीने हे ऐकताच रागाने निघून गेली. तो स्वत: सैरंध्रीची मन धरणी करू लागला. पण सैरंध्रीने त्याला साफरीतीने झटकले. कीचकाने बहिणीस सांगितले - 'जर सैरंध्री माझी झाली नाही तर मला जगण्यात अर्थ वाटणार नाही.' सुदेष्णेने सैरंध्रीला सांगितले. सैरंध्री म्हणाली, 'मी गंधर्व पत्नि आहे. जे माझ्यावर पापी नजर ठेवतील त्याला गंधर्व ठार मारतील. त्या गंधर्वाशिवाय इतर सर्वजण मला पित्यासमान आहेत.' सुदेष्णेला काय करावे ते सुचेना. असेच काही दिवस लोटले. एकेदिवशी तिने सैरंध्रीला जेवणाचे ताट घेऊन कीचकाकडे जाण्यास सांगितले. सैरंध्रीने नकार दिला परंतु ती दासी असल्याने तिला किचकाकडे जावे लागले. ती रस्त्याने जात असतांना सूर्याची प्रार्थना करीत जाऊ लागली. प्रसन्न होऊन सूर्याने तिच्या सोबत एक राक्षस गुप्त रीतीने पाठविला. सैरंध्रीने किचकापुढे जेवणाचे ताट ठेवले इतक्यात कीचकाने तिचा हात धरून जवळ ओढण्याचा प्रयत्न केला. सैरंध्रीने हिसका देऊन हात सोडवून घेतला. तोच गुप्त राक्षसाने कीचकाच्या कमरेत लाथ मारून त्याला आडवे पाडले. सैरंध्री वेगाने तेथून निघाली आणि विराटाच्या सभेत येऊन दाखल झाली. तिच्या मागोमाग कीचकही सभेत आला. त्याने भर सभेत सैरंध्रीला लाथ मारली. इतक्यात गुप्त राक्षसाने एका फटक्यात कीचकाला खाली पाडून बेशुध्द केले. सैरंध्रीने राजाला त्याच्या देखत हा प्रकार घडल्याबद्दल बोल लावला. बल्लवाला हे सर्व पाहून अत्यंत चीड आली. तो पुढे सरसावणार तोच कंकाने त्याला खून करून शांत केले. द्रौपदीचीही वेगळ्या शब्दात त्याने समजूत घातली. मध्यरात्रीच्या वेळी सैरंध्री बल्लवाजवळ गेली आणि रडू लागली. बल्लवाने तिला शांत केले. तो म्हणाला, 'तू गोड गोड बोलून उद्या रात्री त्याला नृत्यशाळेत येण्याचे सांग, मग मी पाहून घेतो. सैरंध्री निघून गेली व पुढच्या तयारीस लागली. दुसऱ्या दिवशी कीचकाने सैरंध्रीकडे जाऊन तिची क्षमा मागितली व तिच्याशी लग्न करण्याची इच्छा व्यक्त केली. सैरंध्रीने कीचकास थोडीशी गोड बोलून लालूच दाखवून रात्री नृत्यशाळेत येण्यास सांगितले. तेथे त्याची इच्छा पूर्ण होईल असे

त्याला आश्वासन दिले. कीचकही ते ऐकून अगदी हुरळून गेला. विराटाने कीचकाची झाल्या प्रकाराबद्दल कान उघाडणी केली होती. परंतु कीचक अगदीच ताळतंत्र सोडून वागू लागला. रात्री बल्लव आपले काम आटोपून नृत्यशाळेत जाऊन अंधारात एका कोपऱ्यात दडून बसला. सर्वत्र अंधार झाल्यावर कीचक हलकेच नृत्यशाळेत आला. बारीक आवाजात बल्लवाने हाक मारून जवळ बोलाविले. मदांध झालेल्या कीचकाला फारच आनंद झाला. त्याने सैरंध्रीच बोलावते आहे असे समजून तिला मिठी मारण्यासाठी हात पुढे केले. त्याचवेळी बल्लवाने त्याचा हात ओढून त्याला खाली पाडले आणि दोघात चांगलेच मुष्टीयुध्द झाले. त्यात बल्लवाने कीचकास ठार मारले आणि तेथे लिहून ठेविले - 'कीचकास मी मारले.' ही वार्ता वाऱ्यासारखी सर्वत्र पसरली. सैरंध्रीच्या गंधर्वपतीने कीचकास ठार मारले असे जो तो म्हणू लागला. ही वार्ता कीचकाच्या शंभर भावांना समजताच तेही धावत आले. ही वार्ता बल्लवाला कळताच त्याने वेषांतर करून तो स्मशानात गेला. त्याने तेथे जाऊन सर्व कीचकबंधूना यमसदनास पाठविले व सैरंध्रीला सोडवून आणले. सर्व मारले गेल्यावर विराटाला हे समजले त्याला आश्चर्य वाटले व दुःख झाले. त्याने सुदेष्णेला याबाबत समज दिली. सुदेष्णेने सैरंध्रीला ताबडतोब देशाबाहेर जाण्यास सांगितले. परंतु तिने आणखी तेरा दिवस ठेऊन घेण्याची विनंति केली. ती म्हणाली, 'माझे गंधर्वपति तुमच्याबद्दल भले चिंतीत असतात. ते पुढेमागे नक्की तुमच्या उपयोगात पडतील.'

कीचकवधाचे वृत्त हस्तिनापुरास जाताच दुर्योधनादि कौरवांना पांडवांचा संशय आला व त्यांना ओळखून काढल्यास आणखी बारा वर्षे त्यांना वनवासात पाठवू असे ठरवून त्यांनी जीमुत नावाच्या मल्लाला विराट राजाकडे पाठविण्याचे ठरविले. तो म्हणाला, 'जीमुत मल्ला तू आपल्या बऱ्याचशा मल्ल साथीदारांना घेऊन विराट राजाकडे जा व त्याला मल्लयुध्दांकरितां पाचारण कर. तेथे भीम असल्यास तो तुझ्याबरोबर युध्द केल्यावाचून राहणार नाही. त्या युध्दात तुझा पराजय होत आहे असे दिसून आल्यास कीर (हरलो) असे म्हणून परत ये. तू जय मिळवून आल्यास तुझा मी गौरव करीन आणि अपजय मिळवून आलास तरी गौरव करीन कारण पांडवांना शोधण्याचे फार मोठे काम त्या द्वारे होईल! हे ऐकून जीमुताला मोठा संतोष वाटला व हे काम खात्रीने करून येतो. असे म्हणून शेकडो मल्लांना बरोबर घेऊन तो विराटाकडे आला. त्याच्या पायात एक मोठा तोडा असून त्याला पाच बाहुल्या बांधलेल्या होत्या. विराटाने विचारल्यावरून त्याने सांगितले हे पांच पांडव

असून मी त्यांना पायात घातले आहेत.' तेव्हा कंकभट त्याला म्हणाला, 'अरे जीमुता, पांडवांना पाहिले नाहीस तोपर्यंत मात्र ही वटवट चालेल. हल्ली ते नष्टचर्यामुळे अज्ञातवासात आहेत ही संधी साधून तू त्यांची नाचक्की करीत आहेस. परंतु हा तुझा अधमपणा आहे.' यावर विराटही म्हणाला, 'अरे आज जर कीचक जीवंत असता तर त्याने देखिल तुला चांगला लोळविला असतां मग पांडवांची गोष्ट ती कशाला.' मग कंकभट म्हणाला, 'महाराज आपण बल्लाला आज्ञा केल्यास तो या जीमुताबरोबर युध्द करील.' विराटाने बल्लवाला ताबडतोब बोलाविले. तो आपल्या सर्व सवंगडयासह पाकशाळेतून पोळपाट लाटणे, चाटू वगैरे घेऊन सभेत आला. त्यास पाहून सर्वसभा हसू लागली. जीमुत तर बल्लवाचा फारच उपहास करू लागला. परंतु विराटाला बल्लवाचा पराक्रम माहित असल्याने त्याची योग्य संभावना केली व जीमुताबद्दल माहिती देवून त्याच्याशी मल्लयुध्द करण्याची आज्ञा केली. बल्लवास खूप आनंद झाला व तो म्हणाला, 'महाराज मला मलयुध्दाची मुळीच माहिती नाही पण आम्ही पांडवांचे अन्न बरेच दिवस खाल्लेले आहे. त्यांची निंदा करण्याऱ्या या दुर्जनास योग्य शिक्षा करणे हा आमचाही धर्म आहे आपल्या आज्ञेप्रमाणे मी तयार आहे.' असे म्हणून दोघे मल्लयुध्दास तयार झाले. जीमुत म्हणाला - 'मल्लयुध्दाच्या कला विकला काय आहेत ते तुला माहित आहे कां.' तेव्हा भीम म्हणाला, - 'मला कळा विकळा माहित नाहीत. कणिक कशी मळायची ते मात्र मी जाणतो. तू आपल्या कळाविकळा मला दाखव व मी तुला कणिक कशी कुटतात ते दाखवितो.' असे म्हणून भीम एकदम जीमुताच्या अंगाला बिलगला. दोघेही नवनागसहस्त्रबली होते. दोघांचे भीषण मल्लयुध्द झाले. शेवटी भीमाच्या बुक्क्यांनी जीमुत घायाळ झाला तो म्हणाला आता थोडा विसावा घेऊ आणि नंतर पुन: आरंभ करू. भीम म्हणाला, 'जीमुता मी अडाणी आहे. तुझ्यासारखा शिकलेला मल्ल नाही. मला विसावा तिसावा का चाळीसावा हे काहीच माहीत नाही. कणिक चांगली नरम झाली की नाही तेच मला समजते.' असे म्हणून भीमाने त्याला जोराने लाथ मारताच तो आकाशात उडून घीरट्या घेत घेत खाली पडला व पडताबरोबर मरण पावला. ताबडतोबत कौरव दूतांनी सर्व संदेश हस्तिनापुरास पाठविला. इकडे विराटाने बल्लवाचा पराक्रम पाहून त्याचा जयजयकार करून वस्त्रालंकारांनी सत्कार केला. सैरंध्रीने पंचारती घेऊन बल्लवास ओवाळून धन्यवाद दिला. (श्लोक ५१५-५२२)

पांडवांना अज्ञातवासातच असतांना शोधून काढावे म्हणून दुर्योधनाने जंग जंग पछाडले. रानोमाळी व सर्व राज्यात गुप्तदूत हेर पाठविले पण त्यांचा पत्ता लागेना. विराटाच्या राज्यात कोणीतरी आचाऱ्याने जीमुत नावाच्या महाबलाढ्य पहेलवानास ठार मारले इतकेच नव्हे तर सर्व कीचकांनाही ठार केले ही गोष्ट त्यांच्या कानावर गेली. त्यामुळे दुर्योधन अगदीच बावरून गेला व तितकाच तो घाबरलाही होता. त्याने खूपविचार करून आपल्या सर्व लोकांची सभा बोलाविली. विचारविनिमय चालू असतांना पांडव कोठे असतील यावर वादविवाद झाला. भीमाच्या पराक्रमामुळे पांडव विराटनगरीतच असावेत असा सर्वांचा सूर निघाला. सर्वानुमते विराटावर स्वारी करण्याचे ठरले. त्यातून पांडव जर दृष्टीस पडले तर पुन्हा वनवासास पाठवू असा विचार करून सुशर्मा यास दक्षिणेकडून तीस हजार सैन्य देऊन विराटाचा गौळीवाडा लुटण्यासाठी पाठविले. सुशर्म्याने आपले काम फत्ते करून गौळीवाड्यातील गायी पळवून नेल्या. गोपाळांनी ही गोष्ट विराटाच्या कानावर घातली. विराट आपले सर्व सैन्य घेऊन सुशर्म्यावर चालून गेला. त्यांचे तुंबळ युध्द झाले. त्यात सुशर्म्याने विराटास पराभूत करून मूर्च्छित केले. नेमके त्याचवेळी धर्माने भीमास विराटाच्या सहाय्यार्थ पाठविले. भीमाने अतुल पराक्रम करून सुशर्म्यास पकडून आणले 'मी विराटाचा दास आहे' असे त्याच्याकडून वदवून घेतले. भीमाचे उपकार कसे फेडावे हेच त्याला उमजेना. इकडे उत्तरेकडील बाजूने कौरवांनी हल्ला केला व गाई पळविल्या राजवाड्यात विराटाचा पुत्र उत्तर हा एकटाच होता. त्याचे बाहु फुरफुरु लागले. परंतु सैन्य सर्व विराटाच्या बरोबर गेले व सारथी कोणी नसल्याने त्याचा इलाज चालेना. सैरंध्री म्हणाली, 'अरे बृहन्नडेने पूर्वी अर्जुनाचे सारथ्य केले होते. तिला तू आपला सारथी बनव.' हे ऐकून उत्तराला फार आनंद झाला. त्याने बृहन्नडेला रथ सज्ज करण्यास सांगितले. बृहन्नडेने कौरवांच्या सैन्यासमोर रथ आणून उभा केला. कौरवांचा अफाट सेनासागर पाहून उत्तराचे पाय लटपटा कापू लागले. त्याने रथ माघारी फिरविण्यास बृहन्नडेला सांगितले. पण ती ऐकेना. ती म्हणाली, 'अरे क्षत्रियांनी रणात मरावे पण भिऊन पळू नये. बृहन्नडेने रथ मागे फिरविण्याचे नाकारले. तेव्हा उत्तर रथातून उडी मारून पळू लागला. त्याच्या मागे बृहन्नडा पळू लागली. हा प्रकार पाहून द्रोणाने सर्व जाणले तेव्हा त्यांनी हा नक्की अर्जुन आहे हे लगेच ओळखले. इकडे अर्जुनाने शमीच्या झाडावरील आपली शस्त्रास्त्रे काढली. उत्तराला आश्चर्य वाटले 'ही कुणाची शस्त्रे' असे त्याने विचारल्यावरून अर्जुनाने आपली खरी हकिकत त्याला सांगितली. सत्यस्थिती समजल्यावर उत्तराने अर्जुनाची क्षमा मागितली. त्याला

अधिक बळ आले. अर्जुनाने स्त्रिवेष टाकून दिला. सरोवरात स्नान करून तो शु. वेर्भूत झाला. अर्जुनासाठी इंद्राने स्वर्गातून रथ पाठविला. अर्जुन सज्ज होऊन रथात बसला. उत्तर सारथ्य करू लागला. अर्जुनाने मारूतीचे स्मरण करताच तो लगेच रथावर असलेल्या ध्वजावर येऊन बसला.

इकडे कौरवांना दुश्चिन्हे जाणवू लागली. भीष्मद्रोणांनी अर्जुनास येत असलेला पाहून त्याच्या शौर्याची स्तुति केली. पण त्यायोगे कर्ण एकदम प्रक्षुब्ध झाला व ब्राह्मण म्हणून त्याने भीष्मद्रोणांचा उपहास केला. दुर्योधनाने पांडवांची तेरा वर्षे भरली की नाही याचा तपास केला. तेव्हा भीष्मांनी दिवस मोजून तेरा वर्षे पूर्ण होवून गेली असल्याचे त्याला सांगितले. त्यांनी दुर्योधनास उपदेश केला. पांडवांना सन्मानाने आणण्यास सांगितले. परंतु दुर्योधनाने या सुचनेस स्पष्ट नकार दिला. दुर्योधन गायी घेऊन जाऊ लागला. अर्जुनाने त्याचा पाठलाग सुरु केला. विकर्ण व चित्रसेन यांना त्याने केव्हाच यमसदनास पाठविले. कर्णाला बेशुध्द केले. दुर्योधन स्वत: अर्जुनाबरोबर युध्द करू लागला. पण एकाच बाणात अर्जुनाने त्याला सुध्दा मूर्च्छित केले. ते पाहून सारे कौरव सैन्य पळू लागले. तेवढ्यात अर्जुनाने मोहिनी अस्त्र टाकून सर्वांना गुंगवून टाकले. कृपाचार्य द्रोण, भीष्म, अश्वत्थामा यांना वगळून इतर कौरव वीरांच्या डोक्याचे अर्जुनाने पाट काढले. अर्धमीशा कापून टाकल्या व दुर्योधन, कर्णादि वीरांची वस्त्रे सोडून पूर्ण नग्न केले. सर्वांना विद्रूप केले. विराटाकडे दूत पाठवून उत्तराने विजय मिळविला आहे असे कळविले. अर्जुनाने आपल्या गुरुजनांना नमस्कार करून तो विराटनगरीकडे परत फिरला. वाटेत शमीच्या वृक्षावर शस्त्रे ठेवून बृहन्नडेचा पोषाख करून उत्तरासह नगरात आला. बऱ्याच वेळाने दुर्योधन वगैरे वीर शुध्दिवर आले व आपण नग्न आहोत व आपली अपमानास्पद स्थिती पाहून जो तो लज्जित झाला. त्यांना एकमेकाशी बोलण्याचीही लाज वाटू लागली. याप्रमाणे दुर्योधनाचे सात अक्षौहिणी सैन्य विटंबनेची विवंचना करीत आहे तोच सुशर्माही त्याच स्थितीत आपल्या चार अक्षौहिणी सैन्यासह दुर्योधनाला येऊन मिळाला. त्यांची ती विटंबना पाहून दुर्योधन म्हणाला, 'सुशर्म्या तुझी ही अशी दुर्दशा कां झाली? तेव्हा त्याने घडलेली सर्व हकिकत सांगितली. तो म्हणाला, - 'दुर्योधना तू सांगितल्याप्रमाणे मी गायी तर पळविल्या होत्याच पण विराटराजालाही ध्वजस्तंभाला बांधून हस्तिनापुरात आणित होतो. इतक्यात त्या राजाच्या पदरच्या बल्लव नावाच्या स्वयंपाक्याने आम्हाला गाठून आमची सर्व प्रकारे दुर्दशा केली व शेवटी आमची अशी विटंबना करून

घालवून दिले. ही हकिकत ऐकून भीष्म म्हणाले - 'जो बल्लव तोच भीम होय आणि आता गेला तो पार्थ होय. त्यांचे नष्टचर्य संपल्याबरोबर ते साहजिकच प्रगट झाले. असे म्हणून भीष्मांनी आपले अर्धे वस्त्र फाडून दुर्योधनास नेसायला दिले. बाकीच्या लोकांनी भिल्लभणंगांच्या अंगावरील फाटकी तुटकी वस्त्रे होती तीच बलात्काराने घेऊन त्यांच्या लंगोट्या तयार केल्या व त्यावर कसेबसे अब्रुचे संरक्षण करून ते हस्तिनापुरास परत आले. परंतु त्याच्या मनातील पांडवांना कपटाने मारण्याचे विष मात्र कमी झाले नाही. विदूर, भीष्म, द्रोण, कृप, यांनी दुर्योधनाला सांगितले - 'दुर्योधना, पांडव स्वत: चांगले पराक्रमी असून सर्व लोकांना ते प्रिय झालेले आहेत. विराट, द्रुपद, देवेन्द्र, गंधर्व, नाग वगैरे राजांचे त्यांना चांगले साह्य आहे. श्रीकृष्ण भगवान तर त्यांचे यत्किंचीतही उणे पडू देत नाही. अशा पांडवाबरोबर वैर करण्यापेक्षा स्नेह करण्यात अधिक फायदा आहे. यासाठी तू त्यांची समजूत कर व त्यांना त्यांचे इंद्रप्रस्थांचे राज्य दे. पूर्वी पणात ठरल्याप्रमाणे ते राज्य तुला परत दिलेच पाहिजे. तेव्हा ते त्यांनी घेऊन घेण्यापेक्षा तूच त्यांना दिलेस म्हणजे तुझा लौकिक होऊन त्यांचेही प्रेम संपादता येईल.' याप्रमाणे दुर्योधनाला सर्वांनी उपदेश केला परंतु तो त्याला मान्य झाला नाही. पांडवांना काहीच द्यावयाचे नाही असा त्याने स्पष्ट जबाब दिला तेव्हा सर्वांचा निरूपाय झाला.

इकडे विराट नगरात उत्तराने अतुल पराक्रम करून विजय खेचून आणला याचा अभिमान विराटाला वाटला. पण कंक म्हणाला, 'बृहन्नडा बरोबर असतांना कौरवांचा पराभव उत्तरच काय पण एखादे लहान पोर सुध्दा करील.' कंकाचे उद्‌गार ऐकून राजाला अतिशय राग आला व रागाच्या भरात त्याने हातातला फासा कंकाला फेकून मारला तो नेमका त्याच्या डोक्याला लागला. खोक पडली. त्याचवेळी जवळ असलेल्या सैरंध्रीने ताबडतोब एक भांडे घेऊन कंकापुढे धरले. त्यामुळे कंकाच्या जखमेतून वाहणारे रक्त जमिनीवर पडले नाही. कंकाचे रक्त जमिनीवर पडते तर सर्व विराट नगरीचा नाश ओढवला असता. एवढ्यात उत्तरही तेथे आला. झालेला प्रकार त्याच्या लक्षात येताच त्याने वडिलांना कंकभटाची क्षमा मागण्यास सांगितले आणि रणांगणांवर झालेला सर्व वृत्तांत राजाला कथन केला. त्याने सांगितलें की, 'ज्या शूर माणसाने मला युध्दात सहाय्य केले तो अर्जुन आहे.' त्याचदिवशी पांडवांनी सकाळी लवकर उठून स्नाने करून उत्तमोत्तम वस्त्रालंकार परिधान केले. त्यांना पूर्वीची स्वरूपे प्राप्त झाली. उत्तराने पांडवांचे स्वागत करून त्यांना मानाने दरबारात स्थान

दिले. झाली गोष्ट विराटाला समजल्यावर त्याला फार दुःख झाले. आपण पांडवांना सेवकाप्रमाणे वागविले म्हणून त्याने पांडवांची क्षमा मागितली. आपली मुलगी उत्तरा ही अर्जुनपुत्र अभिमन्युला देण्याचा विचार प्रदर्शित केला. शेवटी सर्व राजे लोकांना निमंत्रणे गेली आणि उपलव्य येथे उत्तरा व अभिमन्यु यांचा विवाह झाला. त्यानिमित्ताने पांडवांची बरीच मित्रमंडळी जमा झाली होती म्हणून आतापुढे काय करावे अशी चर्चा सुरु झाली. सर्वानुमते कौरवाकडे एक मुत्सद्दी शिष्टाईसाठी पाठवावा असे ठरले. इकडे दुर्योधनाने मात्र युध्दाचा पवित्रा घेतला. त्याने देशोदेशीच्या राजांना मदतीसाठी निमंत्रणे पाठविली. पुष्कळ सैन्य जमविले. कृष्णाचे सहाय्य मिळावे म्हणून द्वारकेस गेला. अर्जुनही त्याच उद्देशाने त्याच वेळेस कृष्णाकडे गेला. दुर्योधनाने कृष्णाच्या सैन्याची मागणी केली व अर्जुनाने श्रीकृष्णाची स्विकृति केली. दुर्योधनाकडे शिष्टाई करण्यांकरितां गेलेला दूत हात हलवित परत आला. धृतराष्ट्राने पांडवांचे मन पाहण्यासाठी संजयास पांडवाकडे पाठविले. धर्माने अर्धराज्याची सुध्दा मागणी सोडली व अविस्थळ, वृकस्थळ जयंत, वारणावत आणि इंद्रप्रस्थ ही पाच गावे कौरवांनी आम्हास द्यावीत असा निरोप संजयाबरोबर पाठविला. संजय हस्तिनापुरास परत आला व धर्माची स्तुति करून त्याच्यावर अन्याय करू नका असा सल्ला दिला. परंतु यामुळे धृतराष्ट्रास राग आला. विदूर, संजय व इतर वरिष्ठ मंडळींनी दुर्योधनास बराच उपदेश करून युध्दापासून परावृत्त होण्याचा सल्ला दिला पण ते सर्व प्रयत्न फुकट गेले. (श्लोक ५२३-५४२)

युधिष्ठिराने खूप विचार करून अखेर श्रीकृष्णास शिष्टाई करण्यास विनंती केली. इतर भावांना ती गोष्ट आवडली नाही. द्रौपदी तर संतापून म्हणाली, 'कृष्णा, भरसभेत हे केस ओढून दुर्योधन, दुःशासनाने माझी अब्रु घेतली त्याला शासन झाल्याशिवाय मी केस बांधणार नाही. तेरा वर्षे मी हे केस मोकळे ठेवले आहेत. तेव्हा विचार करून शिष्टाईस जा.' परंतु धर्माने पूर्ण विचार करून सात्यकीला बरोबर देऊन कृष्णास हस्तिनापुरास पाठविले. कृष्ण हस्तिनापुरी आल्याचे समजल्याबरोबर भीष्मद्रोणांनी कृष्णास सन्मानाने आणले. धर्माने सर्वांना नमस्कार सांगितल्याचे त्याने सांगितले. दुसरे दिवशी कौरवांची सभा भरली. श्रीकृष्णास त्यांनी आदराने मानाचे स्थान दिले. कृष्णाने धृतराष्ट्रास सांगितले, धृतराष्ट्र युध्द टाळून तुम्ही पांडवांना सन्मानाने बोलवा. त्यांचे हक्काचे अर्धेराज्य आहे ते तुम्ही त्यांना द्या. पांडव महाबलाढ्य आहेत. परंतु सत्यापासून व धर्मनीतीपासून ते किंचीतही ढळलेले नाहीत. त्याचप्रमाणे पुढेही ढळणार नाहीत. तेव्हा दोन्ही तुल्यबळ शक्तिंनी युध्द न करता होणारा संहार टाळावा असे माझे स्वतःचे मत आहे.' असे कृष्णाने सांगितले.

धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, कृप यांनी कृष्णाच्या या विनंतीस मान्यता दर्शविली परंतु लगेच दुर्योधन कडाडला 'तुम्ही सर्व जण पांडवांच्या सामर्थ्याला भीत आहांत किंवा त्यांचेच हितचिंतक आहात आणि मला दोष देत आहांत. या सर्व प्रकाराला पांडवच जबाबदार आहेत. तेच द्यूत खेळून द्यूतात हरले आणि वनवासात गेले. त्यात माझा काय दोष. मी अगदी अखेरचे सांगतो. अर्धे राज्य तर मी देणार नाहीच तसेच पाच गावेच काय पण सुईच्या अग्राएवढी भूमीही मी त्यांना देणार नाही.' कृष्णाला दुर्योधनाच्या या उर्मटपणाचा राग आला. तो म्हणाला, 'मूढ माणसा, तू कपट करून द्यूतात पांडवांचा पराभव केलास, भर सभेत द्रौपदीची विटंबना केलीस, भीमावर विषप्रयोग करून त्याला मारण्याचा प्रयत्न केलास, पांडवांना लाक्षागृहात जाळण्याची इच्छा धरलीस. तुझ्या अपराधांची यादी काही थोडी होणार नाही. आणि आता तर तू थोरामोठ्यांचेही ऐकण्यास तयार नाहीस? एवढे श्रीकृष्ण बोलत आहे तोच दुःशासन गर्जुन उठला व म्हणाला - 'दुर्योधना ही सर्व मंडळी एक होऊन तुला पकडतील. आता आपण फक्त चौघे जणच उरलो आहोत. मी, तू, कर्ण व शकुनि. चल या सभेत थांबण्यात काही अर्थ नाही. शेवटी ते चौघेही भर सभेतून उठून गेले. विदूराने गांधारीला विनंती करून दुर्योधनाला बोलावून घेतले ती म्हणाली, 'दुर्योधना, श्रीकृष्ण सांगतो आहे ते खरे आहे. आता विनाकारण संहाराला कारणीभूत होऊ नकोस.' परंतु दुर्योधन कोणाचेच ऐकण्यास तयार नव्हता. तो कृष्णालाच पकडून ठेवावे असा विचार करीत होता. इकडे ही गोष्ट सात्यकीला समजली. त्याने त्वरेने कृतवर्म्याला निरोप देऊन सेना सज्ज करण्यास सांगितले. अखेर ही गुप्त बातमी बाहेर फुटली. सर्वांना समजली तेव्हा कृष्णाने दुर्योधनाला बजावले कीं 'दुर्योधना मी कोण आहे हे तू ओळखले नाहीस.' इतके म्हणून त्याने विश्वरूप प्रकट केले. आकाश पाताळापर्यंत पसरलेले स्वरूप पाहताच धृतराष्ट्रालाही तेवढ्यापुरती दिव्य दृष्टी प्राप्त झाली.

विश्वरूप दर्शन दिल्यावर श्रीकृष्ण तेथून त्वरेने निघाला. जातांना एवढेच म्हणाला - 'तुझा नाश अटळ आहे. पांडवाकडे काडीचाही दोष नाही.' कृष्णाला वेशीपर्यंत पोहोचविण्यासाठी सर्वजण गेले. फक्त दुर्योधन, दुःशासन व शकुनी गेले नाहीत. श्रीकृष्णाने शेवटी सर्वांचा निरोप घेतला व एकट्या कर्णास रथात बसवून आपल्याबरोबर घेतले. रथात कृष्ण कर्णाला म्हणाला, 'तू कुंतीचा कौमार्यावस्थेत सूर्यापासून झालेला मुलगा आहेस.' तू जर पांडवाकडे आलास तर पांडव तुझ्या आज्ञेत राहातील व

द्रौपदी तुझी सेवा करील. मी सुध्दां तुला मदत करीन.' हे ऐकून कर्ण कृष्णाला म्हणाला 'देवा, तू पृथ्वीवरील सर्व पापी लोकांचा पांडवांच्या हातून नाश करणार आहेस. परंतु माझ्या सांगण्यावरून दुर्योधनाने युध्दाची तयारी केली आणि मी त्याचा विश्वासघात करणार नाही.' ही गोष्ट संजयाकडून कुंतीला कळली. तीही कर्णाला गंगेवर भेटली. तीने सुध्दा कर्णास पांडवाकडे येण्याचा आग्रह केला. पण कर्ण ऐकेना. शेवटी त्याने एकटच्या अर्जुनावाचून मी बाकीच्या पांडवावर शस्त्र उचलणार नाही असे वचन दिले. कृष्णाने पांडवास झालेली गोष्ट सांगितली आणि कृष्णाला दुर्योधनाने बांधण्याचा प्रयत्न केला हे कळताच पांडव चिडले व त्यांनी युध्दांची तयारी केली. इकडे कौरवांनी सुध्दां तयारी केली. कुरु क्षेत्राजवळ त्यांनी युध्दाचे स्थान ठरवून आसपास तंबू उभारले. (श्लोक ५४३-५५६)

शिष्टाई असफल झाल्यामुळे श्रीकृष्ण पांडवाकडे येऊन म्हणाले, 'पांडवहो, सुईच्या अग्रावर राहील एवढी सुध्दां मृत्तिका तुम्हाला देण्यास ते तयार नाहीत. आता तुम्हास जर आपले राज्य घ्यावयाचे असेल तर युध्दावाचून दुसरा उपाय नाही.' तेव्हा पांडव म्हणाले, 'भगवंता आपल्याच गोत्रजांचा वध कसा करावा. तसे करण्याने पाप नाही कां लागणार? व त्यामुळे नरक प्राप्त होईल त्याचे काय?' तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, 'क्षत्रीयांचा धर्म म्हणजे युध्दात जो येईल मग तो कोणीही असो त्याच्याबरोबर युध्द करावयाचे. या धर्माचे आचरण केले नाही तर नरकप्राप्ति होते शिवाय युध्द न करण्याने तुमची सर्व जगात अपकिर्ती होईल. हा विचार तुमच्या मनात येता कामा नये. आता तुम्हाला युध्द करावयाचे नसेल. राज्य मिळवायचे नसेल तर फिरून आपला वनवास पत्करा कसा! कारण वेळ आली असता दुर्दैव्याला कुबुध्दि सुचून तो आपल्या हितास वंचित होतो. त्या प्रमाणे तुमचे असेल तर ते चुकणार कसे?' श्रीकृष्णाचे भाषण ऐकून भीम आवेशाने म्हणाला, 'असा जर कमीपणा येत आहे तर युध्द करून आम्ही आपले राज्य परत घ्यावे व कौरवांना युध्दात मारलेच पाहिजे. याशिवाय त्यांनी वेळोवेळी केलेले आमचे अपकार व अपमान स्मरणातून जाणार नाहीत. देवा तू आमचा पाठीराखा व योग्य मार्गदर्शक गुरु आहेस. आजपर्यंत प्रत्येक संकटातून तू आमचे रक्षण केले आहेस. तुझ्या कृपेने मी कौरवांचा एका क्षणात नि:पात करीन.' भीमाचे बोलणे ऐकून अर्जुन म्हणाला, 'देवा आमचे सर्वस्वी संरक्षक कृपाधन साह्यकारी तुच आहेस. तू निर्वाणीचा बंधू आहेस व भक्तजनांचा प्रतिपाळ करणारा तुच आहेस. यासाठी आमच्यावर कोणत्याही तऱ्हेचा दोष न येता आमचे

हित कर अशी तुझ्या चरणी आमची विनंती आहे.' श्रीकृष्ण म्हणाले, 'तुम्हावर कोणत्याही रीतीने दोष येऊ नये म्हणूनच मी संधी घडवून आणण्यासाठी गेलो होतो. परंतु कौरव राजमदाने धुंद झाल्यामुळे त्यांना माझे बोलणे पसंत पडले नाही. आता तुमच्यावर कोणत्याही प्रकारचा दोष वा बोल राहिला नाही. तुम्ही कुरुक्षेत्री चला तेथे उत्तम मान्याची जागा आहे ती आपण आधी पाहू.'

श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून व वेदव्यासांनी काढून दिलेल्या शुभ मुर्हूतावर तेथून निघून कुरुक्षेत्रास आले. उत्तम जागा शोधून त्यांनी तेथे तळ दिला आणि विजयस्तंभ रोवून मोठा उत्सव केला. पांडव कुरुक्षेत्राकडे गेलेले पाहून दुर्योधनादि त्यांचा पाठलाग करीत कुरुक्षेत्रास आले. पांडवांनी उत्तम जागा साधलेली पाहून दुर्योधन मनात दचकला व भीष्माजवळ जाऊन म्लान वदनाने त्याने त्यांचा विचार घेतला तेव्हा भिष्माने सांगितले. 'भिऊ नको, दहा दिवसात मी पांडवांचा नि:पात करीन नाहीतर रणांगणात देह ठेवीन. मी पडल्यावर द्रोणाचार्य तुमचे पाच दिवस संरक्षण करील व पांडवांचा निश्चयाने नाश करील. त्याच्या हातूनही पांडव वाचले तर कर्ण त्यांचा दोन दिवसात नाश करील व तुमचे संरक्षण करील. त्याच्या हातून पांडव नच मेले तर शल्य एका दिवसात त्यांचा नाश करील. त्याच्या हातून पांडव वाचले तर मग तुम्ही बलरामाला बोलवा म्हणजे तो आमच्या पाठीमागे पांडवांचा नाश करून तुमचे संरक्षण करील.' भीष्माचे हे बोलणे सर्वांना पसंत पडून सर्वांनी त्यांचा जय जयकार केला.

इकडे पांडवाकडे धर्मादिक श्रकृष्णासह वर्तमान विचार करीत होते. तेव्हा भीम म्हणाला, 'देवा माझा बब्रु नावाचा एक बलवान पुत्र पाताळात आहे. त्यास युध्दाकरीतां बोलावू कां? श्रीकृष्णाने संमति दिली. लगेच भीमाने गौरी प्रसादाने प्रभावतीला सर्व वृत्तान्त कळवून बब्रुस बोलाविले. त्याने श्रीकृष्णाला व सर्वांना वंदन केले. श्रीकृष्णांनी त्याच्या जवळ तीनच बाण पाहून त्यास विचारले, 'अरे तुझ्याजवळ तर तीनच बाण दिसताहेत. तूं युध्द कसे करशील. बब्रु म्हणाला, 'देवा, लोक तरी कितीक आहे. मी ह्या तीन बाणांनी पृथ्वी वरील काय पण त्रैलोक्यातील लोकांचा नाश करीन.' असे त्याचे बोलणे ऐकून श्रीकृष्णालाही आश्चर्य वाटले. त्यांनी म्हटले, 'या तुझ्या बोलण्याची कांहीतरी प्रचिती दाखविल्या खेरीज आम्हाला पटणार नाही. ते ऐकून बब्रुने एक बाण घेऊन तो शेंदुराने भरला व आकाशात जाऊन तेथून खाली फेकला, आणि श्रीकृष्णाजवळ येऊन म्हणाला, 'ज्याच्या शरीराच्या ज्या भागावर प्रहार झाला असतां मृत्यु येईल त्याच्या त्या भागावर शेंदुर लावला

आहे पहा.' श्रीकृष्णाने आपल्या पायाचा तळवा पाहिला त्यास शेंदुर लागल्याचे त्यांना आढळून आले. तेव्हा श्रीकृष्णास चिंता उत्पन्न झाली. ते म्हणाले, 'न जाणो हा सैन्यात असला आणि त्याने कांही चमत्कार करून आपल्या लोकांचा उत्साह भंग केला तर सर्वत्र अनर्थ उडेल. त्या पेक्षा हा आपल्या सैन्यात नसलेला बरा.' असा विचार करून श्रीकृष्ण त्यास म्हणाले, 'बब्रु तूं कोणास साह्य करणार?' बब्रु म्हणाला, 'जे दुर्बल असतील किंवा ज्यांचा पक्ष खालावला असेल त्यास मी साह्य करीन.' बब्रुचे भाषण ऐकून श्रीकृष्ण मनात म्हणाले याचे मतही आपणास अनुकुल नाही. या युध्दात कौरव हरणार व यांना हा साह्य करील तर त्याचा परिणाम ठीक होणार नाही. याकरितां कोणत्याही उपायाने याचा नाशच केला पाहिजे असा विचार करून त्यास शिबीरात पाठविले व बब्रुचा मृत्यू कोणाच्या हातून आहे याचा विचार करून पाहिला तेव्हा भीमाच्या हातून त्याचा मृत्यू असल्याचे श्रीकृष्णास आढळले. रात्रीच्या वेळी भीमाजवळ येऊन श्रीकृष्णांनी सांगितले की, रात्र अंधारी आहे कौरव महाकपटी आहेत तेव्हा त्यांनी रात्रीस येऊन आपला रणस्तंभ नेऊ नये अथवा बदलवू नये यासाठी तू त्या स्तंभाजवळ रात्रभर बसून त्याचे रक्षण कर व जो कोणी येईल त्याचा नाश कर.' भीम आपली गदा घेऊन तेथे जाऊन बसला. इकडे श्रीकृष्णाने बब्रुला बोलावून सांगितले - 'उद्या सूर्योदयापासूनच युध्दाची धुमश्चकी सुरु होईल त्यावेळी रणस्तंभाची पूजा स्वस्थपणे करता येणार नाही त्या करिता पूजा साहित्य घेऊन तू रणस्तंभाजवळ जा व त्याची पूजा करून ये.' श्रीकृष्णाच्या आज्ञेप्रमाणे बब्रु तेथे गेला. इतक्यात भीमाला रणस्तंभापाशी कोणी आल्याची चाहूल लागली. त्याबरोबर त्याने गदाघाताने स्तंभाजवळील इसमास घायाळ केले. तो कोण असावा हे भीमास अंधारामुळे कळले नाही. भीमाच्या गदेचा प्रहार मस्तकावर झाल्यामुळे बब्रु विव्हळीत होऊन जमीनीवर पडला. त्याच्या विव्हळण्याच्या शब्दावरून भीमाने हा बब्रुच असल्याचे ओळखले. घाबऱ्या घाबऱ्या त्याच्याजवळ धावत जाऊन व घटका अर्धघटकेत मरणार असे पाहून भीम मोठ्याने हंबरडा फोडून आक्रोश करू लागला. हे वर्तमान धर्मराजास कळताच ते सर्वजण तेथे धावत गेले. सर्व जण आक्रोश करू लागले. ते पाहून श्रीकृष्णांनी त्यांचे सांत्वन करून म्हणाले. बब्रुच्या पाक्तनात जसे होते तसे घडून आले. आता त्याबद्दल शोक करून काय उपयोग? आता पुढे दृष्टी द्या. तुम्ही शोक करीत बसलात हे कौरवांना समजल्यास ते तुम्हास हसतील. याकरितां आपल्या शिबीरात चला. बब्रु गदाघाताने अगदी विव्हळ झाला होता. तशा अवस्थेत तो श्रीकृष्णाला म्हणाला, 'देवा या युध्दात कोणाचा जय

अपजय होतो ते पाहाण्याची माझी इच्छा राहिली आहे. याकरिता कृपा करून हे युध्द मला अवलोकन करता येईल असे करा म्हणजे माझी इच्छा पूर्ण होईल व मी आनंदाने प्राण सोडीन.' बभ्रुची इच्छा ऐकून श्रीकृष्णास दया आली त्यांनी त्याला संतोषाने युध्द समाप्ती पर्यंत क्षुधातृषेची बाधा न होता जगशील असा वर दिला. नंतर आपट्याच्या झाडावर जागा करून तेथे त्याला निजविले. तेथूनच तो युध्द प्रसंग पाहू लागला. ( श्लोक ५५७-५६६ )

दुसऱ्या दिवशी सूर्योदयी दोनही सैन्ये रणांगणावर आली त्यावेळी जिकडे तिकडे शंख दुदुंभी वगैरे रणवाद्यांचा गजर सुरु झाला व वीर उत्साहजनक होऊन सेनापतीच्या आज्ञेची वाट पाहू लागले. कौरव सैन्यात भीष्म सर्वांच्या पुढे होता. त्याच्यामागे शकुनि, सौबळ, विंद, कैकेय, शल्य, कृत्तवर्मा, बृहद्वच इ. मोठमोठे राजे आपापल्या सैन्यासह उभे होते. मध्यभागी दुर्योधन छत्रचामर मंडित गजावर बसला होता. भीष्मांनी सर्व वीरास उद्देशून समयोचित भाषण करून क्षात्रधर्माची जाणीव सर्वांना करून दिली. नंतर भीष्माने आपल्या सैन्यात मनुष्याच्या शरीराप्रमाणे मानुषव्यूह रचला. तो अपरंपार कौरवाचा सर्व सैन्यरूप समुद्र पाहून धर्म, अर्जुन, भीम आपल्या सैन्याची कशारीतीने रचना करावी याचा विचार करू लागले. शेवटी भीमाने सुचविलेला सिंहव्यूह रचला गेला. पांडव सैन्यात सर्व रथात अर्जुनाचा रथ अधिक शोभत होता. त्या रथावर ध्वजस्तंभावर हनुमान बसला होता व सारथी प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवान होता. पांडवाकडे भीम मुख्य होता व कौरवांकडे भीष्म मुख्य होता. त्या सर्वांकडे पाहून जणूं देव दैत्यच प्रगट झाले आहे असे वाटे. कौरवांचा तो व्यूह व भीष्म त्यांचा मुख्य हे पाहून धर्म अर्जुनाला म्हणाला - 'अर्जुना कौरवांची एकंदर तयारी पाहून आपल्याला जय मिळेल याविषयी शंका वाटते. दुस्तर रणक्षेत्रातून आपण सुरक्षित कसे पार पडू याची मोठी काळजी वाटते.' धर्माचे भाषण ऐकून अर्जुन म्हणाला - 'महाराज जरी कौरवांचे सैन्य अधिक आहे किंवा त्यांत जरी रथी महारथी वीर पुष्कळ आहेत तरी मी प्रतिज्ञेने सांगतो की आपल्या वीरांची योग्यता त्यांच्यापेक्षाही अधिक आहे. आणि त्यांच्या साह्याने आपलाच जय होणार हे निश्चित आहे. दोन्ही सैन्याची तयारी झाल्यावर श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाले - 'अर्जुना, पलिकडे सोन्याच्या रथात बसलेला हजारो राजे ज्याचे संरक्षण करीत आहेत असा तो भीष्म पाहिलास काय? तो पहा मृगाकडे जसा सिंह टवकारून पाहतो, त्याचप्रमाणे तो आपणाकडे क्रुध्द दृष्टीने पहात आहे. या सर्व राजांना मारून भीष्मास मारीले पाहिजे तरच आपणास

जय मिळेल. अर्जुनाने आपले धनुष्य सज्ज केले व श्रीकृष्णास म्हटले, 'श्रीकृष्णा, आपला रथ दोन्ही सैन्याच्या मध्ये ने म्हणजे युध्दाला कोणकोणते राजे आले आहेत ते मी पाहतो.' दोन्ही सैन्याच्या मध्ये श्रीकृष्णाने रथ नेऊन उभा करताच अर्जुनास आपले आजे, चुलते, पुतणे, मामा, सासरे, मित्र, गुरु वगैरे आप्तजन समोर युध्दाकरिता उभे असलेले दिसले. आपल्या प्राणाची पर्वा न करता युध्दास उभे राहिलेल्या त्यांना पाहून अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला - 'देवा या सगळ्या आप्तेष्टांना युध्दास तयार झालेले पाहून माझ्या शरीरात तिडका मारू लागल्या आहेत. मुखाला कोरड पडली आहे. डोळ्यापुढे अंधारी येत आहे आणि हातात धनुष्य धरण्याची शक्ति राहिली नाही. हे आचार्यादिक सर्व आप्त लोक आपला नाश करण्याला जरी तयार झाले आहेत तरी यांना मारण्यास मला धैर्य होत नाही. त्रैलोक्याचे राज्य देण्यास जरी कोणी कबूल करील तरी देखिल मी हे कृत्य करणार नाही. दुर्योधनादिकांना मारून आम्हाला काय आनंद होणार आहे. उलट पापांचा डोंगर मात्र आपल्या मस्तकावर होईल. हे कौरव लोभाने कुलक्षयास प्रवृत्त झालेत कारण त्यांची सदसद्विवेक बुध्दि नष्ट झाली परंतु आम्ही समजून उमजून या पापास प्रवृत्त होणार नाही.' असे बोलून अर्जुनाने धनुष्यबाण टाकून दिला आणि रथाच्या खालच्या बाजूस बसून शोक करू लागला. तेव्हां श्रीकृष्णाने अर्जुनाच्या या भ्याडपणाची निर्भत्सना करून पुष्कळ समजाविले. कृष्ण म्हणाला - 'या जगाचा कर्ता हर्ता पालनकर्ता मीच आहे. निमित्ताला मात्र तू आहेस. तुला निमित्त करून हे सर्व कार्य मलाच घडवून आणायचे आहे. हे अर्जुना तुझ्यामध्ये देह व आत्मा असे दोन प्रकार आहेत. त्यापैकी आत्मा सर्वव्यापी, आदिअंतरहित, चिद्रूप असा आहे व तोच तूं आहेस. देह कांही तू नव्हेस. आत्मा जन्मास येत नाही व म्हणून कधी मरतही नाही. तो अज, नित्य, अपक्षयरहित, वृध्दिरहित आहे. शरीरास जरी ठार मारले तरी तो आत्मा मारला जात नाही. सिध्दी व असिध्दी यांच्याबद्दल समत्व ठेवून योगस्थ होऊन व आसक्ति सोडून सर्व क्रिया कर. तू आपली सर्व कर्मे ब्रह्मार्पण कर म्हणजे तू ब्रह्म होशिल. तू सर्व संकल्पाचा त्याग कर व कर्मफल त्याग रूप संन्यास योगाने आपले चित्त निरामय करून मुक्त हो. तू आपले सर्व अर्थ ईश्वराला अर्पण करून ईश्वरात्मा हो. सर्व प्रकारचे संकल्प विषयांचे विचार शांत झाल्यावर कोणत्याही पदार्थाच्या अस्तित्वाची कल्पना संपल्यावर जे अनुभवाला येते ते 'ब्रह्म' होय. त्या ब्रह्माची प्राप्ति करून घेण्याकरिता चित्तवृत्ति ब्रह्माकार करण्याचा जो उद्योग त्याला 'ज्ञान' असे म्हणतात. ब्रह्माकार वृत्ती होण्यास अनुकुल अशी जी एकाकार चित्तवृत्तीची धारा तिला 'योग' असे म्हणतात. सर्व

जगत् व मी ब्रह्म आहे असे समजून जगत् व अहं याचा बोध करणे हे ब्रह्मार्पण होय. सर्व द्वैतजात केवल ईश्वरमात्र आहे अशा दृढ भावनेमुळे द्वैताचा अनुभव न घेणे हे ईश्वरार्पण होय. केलेल्या कर्माच्या फलांचा त्याग, फलाबद्दल आस्था न बाळगणे हाच संन्यास होय. सर्व विषयांचे संकल्प विचार सोडून देणे यालाच अनासक्ति असे म्हणतात. हे अर्जुना! तू आपले मन माझ्या ठिकाणी लाव. माझीच भक्ति कर. माझेच पूजन कर व मलाच नमस्कार कर. अशा रीतीने तू मत्परायण होऊन आपले स्वकर्म कर ते अत्यंत श्रेयस्कर आहे. ते तुझा धर्म, यश, राज्य, स्वर्ग वगैरे सर्वांच्या अभ्युदयाला व तुझ्या चित्तशुध्दीद्वारा आत्मसुखालाही कारण होईल. म्हणून हे स्वधर्मरूप युध्द करून त्यात विजयी हो. हे अर्जुना, सामान्य व परम अशी माझी दोन रूपे आहेत. हस्तपादादि अवयवांनी युक्त, शंख, चक्र, गदा, पद्मधारी असे रूप माझे सामान्य होय. आदि अंतरहित एक अनामय असे जे माझे दुसरे रूप आहे ते परमरूप होय. त्यास ब्रह्म, आत्मा इ. शब्दांनी बोधिले जाते. अर्जुना जोपर्यंत तुला ज्ञान झालेले नाही तोपर्यंत तू चतुर्भुजाकार सामान्य रूपाचे पूजन करीत जा. ही पूजा करीत असतांना तुला ज्ञान उत्पन्न झाले म्हणजे तू माझे परमश्रेष्ठ अनादि अनंत रूप ओळखशील. मग तुला पुन्हा जन्म मरणाची पीडा होणार नाही. ज्यांना अहंकार नाही, अज्ञान नाही, आसक्ति नाही, जे नित्य आत्म्यामध्ये निश्चल आहेत, जे सुखदुःखादि द्वन्दापासून मुक्त झालेले आहेत, असे ज्ञानी पुरुष त्या अव्ययपदाला जातात. ज्या पुरुषाचे सर्व उद्योग, इच्छा व संकल्प यांनी रहित असतात, ज्यांची कर्मे ज्ञानाग्नीने दग्ध झालेली आहेत. त्याला ज्ञानीलोक पंडित असे म्हणतात. अर्जुना, तूं सुखदुःखादि द्वंद्वरहित होत्साता आत्मस्वरूपी नित्य रहा. योगक्षेमाची पर्वा न करता निरंतर तू धैर्यवान होऊन रहा व जे प्राप्त होईल त्याचा स्विकार करून पृथ्वीचे राज्य कर. विंध्याद्री पर्वताचे तुकडे तुकडे होवोत किंवा प्रलयकाळाचे वारे वहावयास लागोत, बुध्दिमान पुरुषाने गुरु व शास्त्र यांनी सांगितलेला मार्ग सोडून देऊ नये. आपल्या अज्ञानपणामुळे वासना उत्पन्न होतात पण त्याच वासना आत्मज्ञानाच्या अभ्यासाने विलयास जातात. सांप्रत युध्द करून अधर्माच्या उच्छेदाला उद्युक्त हो हे तुझे कर्तव्य होय.' अशा प्रकारचा दिव्यज्ञानोपदेश करून भगवंतांनी अर्जुनास युध्द करण्यासाठी तयार केले. याप्रमाणे श्रीकृष्णाने गीतोपदेश करून कर्मयोगाला म्हणजे युध्दाला सुरुवात केली. एवढ्यात धर्मराजाने आपल्या शिरावरील मुकुट उतरवून व शस्त्र रथात ठेवून स्वत: रथाच्या खाली उतरला व पायीच चालत जाऊन कौरवांच्या दळात शिरला. ते पाहून बाकीचे पांडव सुध्दां धर्माचे अनुकरण करून त्याच्याबरोबर

चालू लागले. भगवान श्रीकृष्णावाचून दोन्ही दळातील लोक आश्चर्यचकित झाले. दुर्योधन, शकुनि आदि तर पांडवांचा उपहास करू लागले व आपापसात म्हणू लागले. 'आपले सामर्थ्य व सैन्यबळ पाहून पांडव आपणास शरण येत आहेत.' थोड्याच वेळात धर्मराजा भावासमवेत भीष्मद्रोणाजवळ जाऊन पोहोचले व दोनही हात जोडून नमस्कार केला व म्हणाला, 'पितामह, दैवदुर्विलासाने आपणासारख्या व गुरुद्रोण, कृप आदि पूजनीय महात्म्यांची सेवा करण्याच्या ऐवजी तुमच्यासमोर युध्द करण्यांचा प्रसंग आम्हावर आला, त्याबद्दल आम्हास क्षमा करावी व या बालकांना आशिर्वाद द्यावा.' धर्मराजाचे ते कळवळ्याचे उद्‌गार ऐकून सर्व सुजनांच्या डोळ्यांत पाणी आले. साश्रुनयनानं भीष्म, द्रोण , कृपाचार्यांनी पांडवांना यशस्वी व्हाल असा आशिर्वाद दिला. पांडव परत आपल्या दळात येऊन भगवंताला मनोमन नमन व प्रार्थना करून आपापल्या रथावर आरूढ झाले व मग रणशिंग फुंकून युध्दाला सुरुवात झाली. (श्लोक ५६७-५७७)

महाभयंकर असे महाभारत युध्द सुरु झाले. पुष्कळ सैनिक मारले गेले. अभिमन्यूचे युध्दकौशल्य पाहून दोन्हीकडील वीरांनी माना डोलावल्या. भीष्म आणि विराट पुत्र श्वेत यांचे मोठे युध्द होऊन त्यामध्ये भीष्माने त्याला मारले. कौरवांना त्यामुळे आनंद झाला. त्यानंतर संध्याकाळी लढाई बंद झाली. दुसरे दिवशी युध्दांत भीष्माने पांडवांचे खूप सैन्य मारले. भीष्मअर्जुनाची मोठी लढाई झाली. भीमाने कलिंग देशाचा केतुमंत राजा व त्याची मुले वगैरे खूप सैन्य ठार मारले. त्यावेळी पांडवांची सरशी होऊन युध्द थांबले. तिसरे दिवशी अर्जुनाने कौरवांचे खूप सैन्य मारले तेव्हा भीष्म कृष्णास म्हणाला कीं, 'हातात शस्त्र धरणार नाही अशी तू प्रतिज्ञा केली होतीस ती मी खोटी करीन.' असे म्हणून त्याने इतके मोठे युध्द केले की पांडव सैन्यातून रक्ताचे पाट वाहू लागले. भीष्माने अर्जुनाला बाणांनी जर्जर केले. त्यामुळे अर्जुन मूर्च्छित होऊन जमिनीवर पडला. हे पाहून कृष्णाने रथातून खाली उडी टाकली व हातात चक्र घेऊन भीष्माच्या अंगावर धावला. तेव्हा भीष्म म्हणाला, 'देवा हाती शस्त्र धरणार नाही अशी तुझी प्रतिज्ञा यावेळी खोटी ठरली. आता माझा वध करून मला मोक्ष मिळवून दे.' एवढ्यात अर्जुन तेथे आला व त्याने कृष्णाला रथावर नेले. तो म्हणाला, 'देवा तू माझ्या हातून कौरवांचा नाश करीव.' त्यानंतर अर्जुन, भीम, सात्यकी, अभिमन्यु, घटोत्कच, धृष्टद्युम्न यांनी कौरवांचे पुष्कळ सैन्य ठार केले. सहाव्या दिवशी अर्जुन भीष्म यांचे फार मोठे युध्द झाले. युध्दात सात्यकीचे

दहाही पुत्र मारले गेले. हे पाहून भीम कौरवसैन्यात शिरला व त्याचे सैन्य मारू लागला. त्याचवेळी अर्जुनाच्या रथावरील मारूतीचे रूप भयंकर दिसू लागले. ते पाहून कौरवसैन्य घाबरून गेले. अर्जुन कौरव सैन्यातील पुष्कळ सैन्य मारू लागला. नंतर अश्वत्थामा अर्जुनाबरोबर युध्द करू लागला. पण तो टिकाव धरू शकला नाही. दुर्योधन सैन्य घेऊन पांडव सैन्यावर चालून आला. त्याचवेळी त्याच्या अंगावर द्रौपदीचे पाचही मुलें चालून गेले. बरोबरचे सर्व सैन्य मेल्यामुळे दुर्योधन पळून गेला. सूर्य मावळल्यामुळे युध्द थांबले.

सातवे दिवशी भीम दुर्योधनाला म्हणाला, 'आम्ही नपुंसक बायका आहोत की वीर आहोत हे तुला दाखवितो असे म्हणून भीमाने त्याच्या रथाचे घोडे व सारथी यांना ठार केले आणि दुर्योधनाला बेशुध्द केले. आठव्या दिवशी युध्दाच्या सुरुवातीला भीष्माने सुभानू नावाचा राजा व पुष्कळ वीर ठार केले. इतके दिवस युध्द होवून यावे तसे यश न आल्यामुळे दुर्योधन खिन्न मनाने भीष्माकडे जाऊन म्हणाला, 'आजपर्यंत आपण एकहि पांडव मारला नाही. आपण पांडवांचे पक्षपाती आहोत. कर्णाकडून असे झाले नसते.' हे ऐकून भीष्माला राग आला. तो म्हणाला तुला उद्याच युध्द चमत्कार दाखवीन.' त्याने बोलल्याप्रमाणे दुसरे दिवशी घनघोर युध्द केले. भीष्म कोणालाही आटोपेना. शेवटी सूर्यास्त झाल्यामुळे सर्वजण आपापल्या तंबूत गेले. दहावे दिवशी शिखंडीला पुढे करून अर्जुनाने भीष्माला रथातून खाली पाडले भीष्म प्राण सोडणार होता पण दक्षिणायन असल्यामुळे त्याने प्राण सोडले नाहीत. तो इच्छामरणी होता. उत्तरायण लागेपर्यंत तो तसाच शरपंजरी पडून राहिला.

अकरावे दिवशी द्रोणाचार्य कौरवांचा सेनापती झाला. अर्जुनाने घनघोर युध्द करून भगदत्तास ठार मारले. त्याचप्रमाणे त्याने वृषकेतु व अचळ या दोघा भावांना ठार मारले. नंतर सूर्यास्त होऊन युध्द बंद झाले. बाराव्या दिवशी द्रोणाने चक्रव्यूह रचला आणि पांडवांनी सुवर्णव्यूह रचून युध्द चालू केले. अभिमन्यु धर्माची आज्ञा घेऊन पुढे सरकला. त्याने द्रोणाचार्य व इतर वीरांना फार त्रासवून सोडले. मग अभिमन्यु युध्द करीत त्या व्युहात शिरला. तेथे त्याने खूप विरांना रक्त स्नान घालून ठार केले. ते पाहून सर्वांना वाटले कीं हा जणू कांही अर्जुनच आहे. अभिमन्यु युध्द करीत असतां बेशुध्द पडला. तेवढ्यात दुःशासनाने त्याच्या डोक्यावर गदा मारली. अभिमन्यु मरण पावला व त्या स्थितीत जयद्रथाने त्याला लाथ मारली. त्यामुळे सगळीकडे 'हे धर्मयुध्द नव्हे' अशा गर्जना होऊ लागल्या. कौरवांनी अधर्माने युध्द

केले व अभिमन्युला अन्यायाने मारले हे पांडवांना कळले. हे अर्जुनाला कळताच त्याने प्रतिज्ञा केली. 'उद्या सूर्यास्तापूर्वी मी जयद्रथाला मारीन आणि त्याप्रमाणे झाले नाही तर मी अग्नीत जळून मरेल.' दूताकडून ही वार्ता कौरवांना समजली तेव्हा कर्ण, कृपाचार्य, अश्वत्थामा इ. महान योध्दे जयद्रथाच्या मदतीला जातील असे दुर्योधनाने सांगितले. दुसऱ्या दिवशी जयद्रथ अर्जुनाच्या समोरच आला नाही. मात्र सूर्यास्त होण्याला थोडा वेळ आहे हे समजताच कृष्णाने आपले सुदर्शन चक्र सूर्याला आड धरले. त्यामुळे सूर्यास्त झाला असे सर्वांना वाटले. अर्जुनाची दृष्टि एक सारखी जयद्रथावरच होती. सूर्यास्त झाल्यामुळे जयद्रथ समोर आला. तेवढ्यात कृष्णाने चक्र बाजूला केले व सूर्य दिसू लागला. तेव्हा कृष्ण अर्जुनाला म्हणाला, 'हा पहा सूर्य आणि हा पहा जयद्रथ.' ते ऐकून अर्जुनाने एकाच बाणाने जयद्रथाचे डोकें उडविले. हे शिर ज्याच्या हाती पडेल त्याला तत्काल मरण येईल असे भविष्य कृष्णाने अर्जुनास सांगितले म्हणून अर्जुनाने दुसरा बाण सोडून ते शिर त्याचा बाप सिंधुराजा याच्या हातात पाडले. त्यामुळे तो सुध्दा मरण पावला. याप्रमाणे अर्जुन आनंदाने परत फिरला. पण कौरवांची तोंडे काळी पडली. सूर्य मावळला तरी रात्री युध्द चालूच होते. द्रोण व दुर्योधन हे दोघे आपापसात अर्जुनाविषयी भांडत होते. त्यावेळी घटोत्कचाचा मुलगा अंजपर्वा हा अनेक वीरांना मारू लागला. ते पाहून कर्णाने त्याचे डोके एका बाणाने उडविले. या युध्दात पांडवांचे अनेक चांगले वीर मारले गेले. हे वृत्त घटोत्कचास समजल्यावर तो हजारो राक्षस बरोबर घेऊन कौरवावर चालून गेला. तेव्हा दुर्योधन व कर्ण यांनी उपाय म्हणून इंद्राने दिलेली शक्ति घटोत्कचाच्या अंगावर टाकली. ती शक्ति आपल्या अंगावर येत आहे हे पाहून पांडवांचे हित साधण्यासाठी स्वेच्छेने मरण पत्करून पांडवांचे दळ सोडून कौरव सैन्याकडे धावला. त्याच्या शरीराखाली असंख्य कौरव मारले गेले. याप्रमाणे पुत्रपौत्र मेल्यामुळे पांडवांना फार दुःख झाले. इतके होईपर्यंत चांगले उजाडले होते. द्रोणाचार्य आणि धर्मराजा यांचे चांगलेच युध्द जुंपले. द्रोण धर्माला आटोपेना शेवटी पांडवांचा सेनापति धृष्टद्युम्न याने कृष्णाच्या मदतीने त्याला ठार मारले. हे वृत्त अश्वत्थाम्याला कळल्यावर त्याने पांडवाबरोबर युध्द करण्यास सुरुवात केली. परंतु अर्जुनाने त्याला पळवून लावले. अश्वत्थामा तेथून निघाला व गंगेच्या कांठी तपश्चर्येला बसला आणि वरप्रभावे पृथ्वी निष्पांडवी करण्याचा त्याने निश्चय केला. त्याचवेळी त्याला व्यासांनी भेटून सांगितले कीं, 'तू व्यर्थ श्रम घेऊ नकोस कारण कोणताही देव तुला तसा वर देणार नाही. उलट युध्द टाकून पळाला असे दूषण मात्र लावून घेशील. जा आणि युध्द कर व पराक्रम कर.' ते ऐकून अश्वत्थामा पुन्हा सैन्यामध्ये आला.

द्रोणाचा नाश झाला म्हणून दुर्योधनाने कर्णाला सेनापति नेमले. त्याला सेनापति नेमण्याआधी त्याच्याकडून दुर्योधनाने पुष्कळ दानधर्म करविला. कर्ण रथात बसून निघाला. सर्वांचा निरोप घेऊन तो युध्दाला तयार झाला कर्णाने पांडवांचे फार मोठे वीर मारले नंतर धर्माबरोबर युध्द करू लागला. कर्णाने धर्माला पकडून त्याच्या गळ्यात धनुष्य टाकले व त्याला ठार मारणार तोच त्याला कुंतीची 'आठवण होऊन वचन आठवले व त्याप्रमाणे त्याने धर्माला सोडून दिले. अर्जुनाने कर्णाचा मुलगा वृषसेन याला ठार मारले. त्यावेळी कर्णाला राग येऊन अर्जुनावर त्याने शरवृष्टि केली. दु:शासनही त्याला मदत करू लागला. हे पाहून भीमाला त्याच्या प्रतिज्ञेची आठवण झाली व भीमाचे आणि दु:शासनाचे भयंकर मल्ल युध्द झाले. भीमाने त्याला खाली पाडले व गर्जना करीत म्हणाला, 'दुर्योधन, कर्ण, शकुनि हो, सभेमध्ये द्रौपदीची चेष्टा करायला ज्यांनी प्रोत्साहन दिले त्या दुष्ट दु:शासनाचा तुमच्या समोर वध करून मी आपली प्रतिज्ञा पूर्ण करतो.' असे म्हणून भीमाने गदाघाताने त्याला छिन्नभिन्न केला. त्याच्या रक्ताने माखलेल्या हातांनी त्याने द्रौपदीची वेणी घालून आपली प्रतिज्ञा पूर्ण केली.

कर्णाच्या मारामुळे पांडव सैन्य जर्जर होवून गेले ते पाहून कृष्णाने अर्जुनाचा रथ कर्णाच्या दिशेला फिरविला दोघे वीर समोरासमोर येताच मोठ्या आवेशाने युध्द करू लागले. नंतर एका बाणावर गुप्तरूपाने तक्षकपुत्र बसला होता तो बाण कर्णाने हातात घेतला. त्या बाणाच्या तेजाने सगळीकडे दिव्य प्रकाश पडू लागला. सर्वांचे डोळे दिपून गेले. तो बाण कर्णाने अर्जुनाच्या कंठावर नेम धरून सोडला. त्यामुळे अर्जुन मरणार असे कृष्णाला वाटले व त्यामुळे त्याने आपला रथ पृथ्वीत दडपला. त्यामुळे अर्जुनाच्या कंठावरचा नेम चुकून मुकुटावर गेला व मुकुटाचे शतश: तुकडे झाले. नंतर कृष्णाने अर्जुनाचा रथ कर्णाच्या रथाशी आणून भिडविला. त्यावेळी कर्णाच्या रथाची चाके जमिनीत जाऊ लागली. 'तुझ्या रथाची चाके जमिनीत जातील त्यावेळी तुझा अंत:काल आहे.' असा शाप एका ब्राह्मणाने कर्णाला दिला होता. तो शाप आठवून आपले आयुष्य संपले असे कर्णाला वाटले. शिवाय परशुरामाच्या शापामुळे त्यास कोणतेच अस्त्र मंत्र आठवेनासे झाले. तो रथाची चाके वर काढण्यासाठी खाली उतरला. त्याचवेळी अर्जुनाने शिवदत्त बाण काढून कर्णाचे शिर उडविले. कर्णवधानंतर अर्जुन व कृष्ण आपापले शंख वाजवीत आनंदाने माघारी फिरले.

कर्णवधामुळे दुर्योधनाला फारच दु:ख झाले. त्याचे सारे अवसान खचले. नंतर शल्याला आपला सेनापति नेमून दुर्योधन युध्द करू लागला. शल्याने व्यूह रचून दुर्योधनाला उभे केले. उजवीकडे कृपाचार्य, मागच्या बाजूला अश्वत्थामा असे उभे करून अग्रभागी आपण उभा राहिला. असे असतांना सुध्दा अर्जुनाने व भीमाने व्यूह तोडून हजारो सैन्य ठार केले. धर्मराजा व शल्य यांचे निकराचे युध्द होऊन त्यांत शल्य मरण पावला. कौरवांचा नाश झाला. त्यांचे सर्व वीर मारले गेले व पांडवांचे सैन्यही बरेचसे मारले गेले. कौरवसैन्य वाट फुटेल तिकडे पळू लागले. नंतर भीमाने आपल्या गदेने त्या सर्वांचा नाश केला. हा सर्व वृत्तांत ऐकून व पाहून दुर्योधन पळू लागला. आता आपल्याला कोणीही पाठीराखा नाही हे समजून तो दडण्याचा विचार करू लागला. इकडे पांडव फारच सैन्य मारू लागले. शेवटी दुर्योधन संधी साधून गुप्त रीतीने द्वैपायन डोहात लपून बसण्याकरिता गेला. इकडे पांडव व त्यांचे हेर दुर्योधनाला शोधत होते. कृतवर्मा, कृप व अवत्थामा हेही त्याला शोधत डोहाजवळ आले. त्यांनी दुर्योधनाला हाक मारून म्हटले - 'आता लपून कशाला बसतोस? पांडव सैन्य घेऊन येत आहेत. आपण आता त्यांच्याशी लढाई करू.' हे पांडवांच्या एका हेराने ऐकले व भीमाला जाऊन सांगितले. मग पांडव लगेच तेथे आले त्यांची चाहूल लागताच वरील तिघे पळून गेले. फक्त दुर्योधन एकटाच राहिला.

धर्मराज डोहाजवळ गेले व म्हणाले, 'दुर्योधना आता लपून बसण्यात काय अर्थ आहे. इतके दिवस अनितीने वागलास. त्याचे आता प्रायश्चित घे.' दुर्योधन भीतीयुक्त स्वरात त्यास म्हणाला, 'धर्मराजा, मला काही नको. सर्व राज्य तुझ्या स्वाधीन करून मी अरण्यात जातो. धर्मराज म्हणाले, 'दुर्योधना, आम्हाला नपुंसक म्हणून तू मुद्दाम डिवचलेस, तुझ्यामुळे आमचा आजपर्यंत नाश झाला. याचे प्रायश्चित न देता आता तुला मोकळा कसा सोडू? चल ये बाहेर. दुर्योधन म्हणाला, 'ठीक आहे तर, मी बाहेर येतो पण सर्वांनी माझ्यावर एकदम प्रहार करू नका.' धर्मराजा म्हणाला, 'बाहेर ये आणि तुझ्या इच्छेला येईल त्याच्याशी युध्द कर.' दुर्योधन बाहेर आला. तेव्हा सात्यकी व धृष्टद्युम्न त्याला पाहून कुचेष्टेने हसू लागले. ते पाहून दुर्योधनाला वाईट वाटले. तो म्हणाला - 'राजा मी एकटा आहे. एकाबरोबर अनेकांनी युध्द करू नये ही नीती आहे.' अर्जुन म्हणाला अभिमन्युशी लढतांना तुझ्या लक्षात ही गोष्ट कशी आली नाही.' इतक्यात दुर्योधन गदा घेऊन पुढे आला. भीमही पुढे आला. एक मोठी गर्जना करीत भीम म्हणाला, 'अरे अंधपुत्रा, आतापर्यंत

जो नाश झाला तो सर्व तुझ्यामुळेच झाला. तेव्हा आता तुझा नाश करून हा रणयज्ञ पुरा करतो.' एवढ्यात तीर्थयात्रा करीत असलेला बलराम तेथे आला. सर्वांनी त्याला नमस्कार केला. तेव्हा तो म्हणाला, 'तुम्ही येथे युध्द करू नका. जवळच 'स्यमंतपंचक' तीर्थक्षेत्र आहे तेथे युध्द करा. तेथे मरणाराला मोक्ष मिळतो. हे ऐकून ते त्याठिकाणी गेले व युध्द करू लागले. दुर्योधन भीमाच्या अंगावर उडी घेण्याच्या बेतात असतांनाच भीमाने गदेने त्याची मांडी फोडली. त्याक्षणी दुर्योधन खाली पडला. नंतर भीमाने त्याला लाथा मारून बेजार केले व द्रौपदी वस्त्रहरणाच्या वेळेची आठवण करून दिली व प्रतिज्ञा पूर्ण केली.' धर्मराजा भीमाला म्हणाला, 'हे तुझे करणे अयोग्य आहे.' बलराम म्हणाला, 'मूर्खा कमरेखाली कोठेही गदेचा प्रहार करू नये असे असतां तू मांडीवर प्रहार करून धर्म सोडून युध्द केलेस. तेव्हा आता तूही मरणास तयार हो असे म्हणून तो भीमाच्या अंगावर धावला. तेव्हा श्रीकृष्णाने मध्ये येऊन त्याला समजावित म्हणाला - 'द्रौपदीला मांडी उघडी करून दुर्योधनाने दाखविली तसेच तुझी मांडी फुटून तू मरण पावशील.' असा मैत्रेयऋषींचा सुध्दा शाप दुर्योधनास होता त्याप्रमाणे झाले.' अशी त्याची समजूत घालून द्वारकेस पाठविले. भीमाने दुर्योधनाची मांडी फोडली होती. त्यामुळे तो निपचित पडला होता. पण अजून जिवंत होता. त्या स्थितीतही तो कृष्णाची नालस्ती करीत होता. त्यादिवशी कृष्णाने अर्जुनाला अक्षयभाता व गांडीवधनुष्य घेऊन आपल्या आधी रथाखाली उतरण्यास सांगितले. मग कृष्ण उतरला इतक्यात मारूती कृष्णाला नमस्कार करून रामेश्वराला निघून गेला. अर्जुन खाली उतरताच कृष्णाने रथाचे घोडे सोडले. त्याबरोबर रथ जळून भस्म झाला. पांडवांना आश्चर्य वाटले म्हणून त्यांनी कृष्णाला त्याविषयी विचारता त्याने सांगितले कर्ण, द्रोण, भीष्म यांनी जी अनेक तीव्र शस्त्रे व अस्त्रे टाकली होती ती मी आतापर्यंत दाबून ठेवली होती. पण आता दुष्टांचा नाश होताच ती शक्ति मी दूर केली तेव्हा ती अस्त्रे एकदम प्रज्वलित झाली व रथ जळाला. नंतर दुर्योधनाच्या संपत्तिची योग्य ती व्यवस्था त्यांनी लावली.

नंतर कृष्ण हस्तिनापूरास आला व गांधारी आणि धृतराष्ट्र यांना भेटला. त्यांची त्याने समजूत घातली व तो म्हणाला, 'आता दुःख करण्यात काय हशिल आहे. तू म्हणत होतास तसेच झाले. जिकडे धर्म तिकडे जय! तू महापतिव्रता आहेस. पांडवांना आपली मुले समज. धर्म राजाला तुमच्याबद्दल दुःख वाटते.' तो इतके सांगत होता एवढ्यात व्यास आले त्यांनी पण त्या दोघांची समजूत घातली. दुर्योधन

धुळीतच पडला होता. अश्वत्थामा, कृप व कृतवर्मा त्याला तशा स्थितीत भेटले. त्याला भडभडून आले. आपल्या पश्चात आईवडिलांचे कसे होईल? या दुःखाने तो विव्हळत पडला होता. तो म्हणाला, 'या स्थितीबद्दलही मला दुःख होत नाही. पांडवापैकी एकही मेला नाही हे पाहून मला वाईट वाटते.' अश्वत्थाम्याने प्रतिज्ञापूर्वक पांडवांना ठार मारण्याचे त्याला आश्वासन दिले. त्याने लगेच अश्वत्थाम्यास सेनापति नेमले. मध्यरात्रीच्या सुमारास पांडव श्रीकृष्ण व सात्यकी कांही महत्वाच्या विचाराकरितां शिबीराच्या लांब गेलेले होते अशावेळी अश्वत्थामा चोरासारखा त्यांच्या शिबीरात घुसला. अर्जुनाने शिबीर रक्षणाकरितां ठेवलेल्या रूद्राला सुध्दां न जुमानता तलवार घेऊन तो आत गेला. बाहेर कृपाचार्य व कृतवर्मा यांना त्याने रक्षणार्थ उभे केले. आत त्याने धृष्टद्युम्न, उत्तमौजा, युधामन्यू व पांडवांची पाचही मुलें झोपेत असतां मारून टाकली. कोलाहल ऐकून जे जागी झाले ते बाहेर पळण्याचा प्रयत्न करू लागले. त्यांना कृतकृपांनी यमसदनास पाठविले. एकही सैनिक वीर योध्दां त्यांनी शिल्लक ठेवला नाही. घोर क्रंदन करून ते तिघे दुर्योधनाकडे गेले व त्यास सर्व हकिकत सांगून पांडवांची शिरे कापून आणल्याचे दुर्योधनास सांगितले. दुर्योधनाने भीमाचे शिर मागताच अश्वत्थाम्याने ते दिले. त्याने जमिनीवर ते आपटताच त्याचे चूर्ण झाले. दुर्योधन हताश होऊन म्हणाला, 'खरे पांडव तर अजून जिवंतच आहेत. ही तर त्याच्या मुलांची शिरे आहेत. दुर्योधन दुःख करू लागला व देवाचे नामस्मरण करू लागला. भगवंतांनी बुध्द रूपाने प्रगट होऊन दुर्योधनास दर्शन दिले. दुर्योधनाची प्राणज्योति निघून बुध्द भगवंताच्या शरीरात प्रविष्ट झाली. युगांतराचे ठायी दैत्य शंखासुरास दिलेले वचन भगवंतांनी पूर्ण केले. भगवंताच्या अवतारपात्राच्या प्रणालिकेनुसार दुर्योधनास केवळ दर्शन देऊन मौनधारी बुध्द देवांनी त्याची आत्मज्योति आत्मस्वरूपात विलीन करून घेतली. दुर्योधन निमाला. येथूनच भगवंताच्या नवव्या बुध्द अवताराचा वारा सुरु झाला. सद्भक्त पांडवांच्या उध्दाराकरिता धावून आलेले योगेश्वर भगवान श्रीकृष्ण हेच ते भगवान बुध्द होय.

इकडे जान्हवीच्या तीरावर असलेल्या धृष्टद्युम्नाच्या एका सारथ्याने अश्वत्थाम्याचे हे अघोरकृत्य पांडवांना जाऊन सांगितले. आपल्या वंशाचा नाश झाला हे ऐकून पांडवांना अतिशय दुःख झाले. ते सर्व शिबीराकडे आले. उपलव्याने द्रौपदी, सुभद्रा यांना आणले. त्यांना फारच शोक झाला. द्रौपदी म्हणाली माझ्या मुलांना रणागणांवर मरण आले असते तर त्यांचे काही सार्थक झाले असे वाटले असते. अश्वत्थाम्याचा

शिरच्छेद करा नाहीतर मी सुध्दा प्राणार्पण करीन. भीमअर्जुन अश्वत्थाम्याचा शोध करू लागले. भीमाला पाहून अश्वत्थामा व्यासांच्या मागे लपला. त्या आधीच भीम तेथे येऊन पोहोचला. आता भीम आपल्या अंगावर येतो असे वाटताच त्याने 'पांडवांचा नाश होवो' असे म्हणून मंत्र जपून ब्रह्मास्त्र फेकले. इतक्यात अर्जुन व धर्म तेथे गेले. जे अस्त्र अश्वत्थाम्याने सोडले होते ते त्याला व अर्जुनाला द्रोणांनी दिलेले होते व अगदी निर्वाणीच्या पण योग्य वेळेलाच वापर करण्यास सांगितले होते. अश्वत्थाम्याने सोडलेल्या अस्त्राचा नाश होण्यासाठी अर्जुनाला ते अस्त्र सोडावे लागले. दोन्ही अस्त्रांची झटापट होताच गगनात ज्वाळांचा डोंब उसळला. आता जगाचा नाश होतो की काय असे सर्वांना वाटले. व्यास व कृष्ण यांनी दोघांना अस्त्र आवरण्यास सांगितले. अर्जुनाने लगेच आपले अस्त्र आवरले. पण अश्वत्थाम्याचे पुण्य कमी पडल्याने त्याला ते आवरेना. अर्जुनाने त्यापासून पांडवांचे रक्षण केले पण उत्तरेच्या गर्भाला मात्र इजा पोहोचली. त्यावेळी कृष्णाला फार राग आला व तो अश्वत्थाम्यास म्हणाला, 'तू बालहत्या करतोस म्हणून तू तीन हजार वर्षे पिशाच्च योनीत वावरशील. तू दुबळा होऊन हाल भोगशील. तुला सत्पुरुष भेटणार नाही. द्रोणाच्या पोटी येऊन तू सगळीकडे दुष्किर्ती मिळविलीस. मी उत्तरेच्या पोटी येणाऱ्या पुत्राचे रक्षण करीन. तिला जो मुलगा होईल तो कृपाचार्याकडे शिक्षण घेईल व वडील आणि आजोबाप्रमाणे साठ वर्षे राज्य करील. तुझा वध करणे हेच काम आता उरले आहे पण तू द्रोणाचार्यांचा म्हणजे गुरुचा मुलगा व शिवाय तुझ्याजवळ आता शस्त्र नाही, तेव्हा तुझ्या डोक्यावरील हा मणी काढून अर्जुनाला दे व ओढवलेल्या मरणापासून दूर हो.' व्यास व नारदांनी सुध्दां तेच सांगितले. तो ऐकेना. शेवटी अर्जुनाने बाण मारून मणी काढून घेतला. कृष्णाने द्रौपदीला मणि दाखविला व तिचे सांत्वन केले. उत्तरेच्या पोटात असलेल्या गर्भाचे ब्रह्मास्त्रापासून रक्षण करण्याकरिता कृष्णाने करंगळी एवढे रूप घेऊन पोटात प्रवेश करून सुदर्शनाने ते अस्त्र काढले व गर्भाचे रक्षण केले. जन्मत:च तो मुलगा आपला रक्षक कोठे आहे म्हणून प्रत्येकाच्या तोंडाकडे परिक्षापूर्वक पाहू लागला म्हणून त्याचे नाव परिक्षित असे ठेवले. (श्लोक ५७८-५९७)

महाभारत युध्दात पांडवाकडून सर्व कौरवांचा कुळ संहार झाला. अठरा अक्षौहिणी सैन्य मारले गेले. विजयी होऊन पांडव शिबीरात आल्यावर नागरिकांनी मोठा उत्सव केला. तेव्हा अर्जुनाच्या मनात गर्व उत्पन्न झाला. तो म्हणाला, - 'कौरवांचे अकरा

अक्षौहिणी सैन्य माझ्याच सामर्थ्याने नष्ट झाले. माझ्यामुळेच धर्माला राज्यप्राप्ति झाली. यास्तव मीच खरोखर धन्य आहे.' अर्जुनाची गर्वोक्ति ऐकल्यावर भीमाने आपली गदा सरसावली. तो म्हणाला, 'अरे अर्जुना स्वत:च्या पराक्रमाची काय बढाई करतोस. अरे खरा विजय तर या माझ्या गदेने मिळविला. तुला खोटे वाटत असेल तर विचार कृष्णाला तो नि:पक्षपणाने खरे काय ते सांगेल.' श्रीकृष्णांनी सांगितलें तुमच्या दोघाचा विचार मला कळला. तरी आपण बर्बरीक जवळ याचा खुलासा करू. मग ते सर्व रथात बसून रणभूमीवर बब्रुजवळ आले व कृष्णाने बब्रुला विचारले, 'अरे बाळा, या रणात खरोखर पराक्रम कोणी केला ते पूर्वजांच्या पुण्येकरून तुला कळले काय? कळले असेल तर सांग.' हे ऐकून बब्रु म्हणाला, 'मी असत्य सांगावयाचा नाही. या रणात अर्जुनाच्या गांडीवापुढे आणि भीमाच्या गदेपुढे अशी एक अलौकिक शक्ति युध्द करीत होती की तिला एका बाजूस एक मुख चार हात आणि दुसऱ्या बाजूस पांच शिरे दहा हात असलेली 'हरि आणि हर' शक्ति युध्द करीत होती. तिला श्रीकृष्णाचे सुदर्शन चक्र व हनुमंताचे पुच्छ साहय़ करीत होते. त्याच शक्तिने सर्व सैन्याचा नाश केलेला मी पाहिला. कृष्णा आता माझी इच्छा पूर्ण झाली, तू आता आपले दातृत्व सांभाळ मी आता जातो.' त्याने असे म्हणताच कृष्णाने त्याच्या शरीरातून जीव काढून घेतले व बब्रु ते शरीर सोडून परलोकी गेला. मग त्याचे उत्तरकार्य करून अर्जुन भीम कृष्णासह परत जात असता वाटेत एक गजघंटा होती, ती उचल म्हणून कृष्णाने अर्जुनाला सांगितले. अर्जुनाने ती उचलली असता तिच्या खाली बसलेली लावी पक्षिण (तितिर पक्षिण) उडून गेली. अर्जुनाने आत पाहिले तो त्या पक्षिणीची चार पिले आत दिसली. हा चमत्कार पाहून अर्जुनाला आश्चर्य वाटले आणि तो कृष्णाला म्हणाला - 'देवा एवढ्या युध्दात ही तितिरपक्षिण आपल्या अंड्यासहित जिवंत कशी राहिली? कृष्णाने उत्तर दिले, 'अर्जुना, तुला सर्व माहित असून कां बरे वेड पांघरतोस? ही पक्षिण वाचावी म्हणून तिच्यावर ही हत्तीची घंटा मुद्दाम ठेविली होती. बराच वेळ झाल्यामुळे ती व पिले गुदमरून मरतील यासाठी ती उचल म्हणून तुला सांगितले. अर्जुना त्याचप्रकारे अठरा अक्षौहिणी सैन्याचा नाश झाला असता मी तुम्हाला वाचविले. युध्द आटोपल्याबरोबर मदन आदि करून यादवांना द्वारकेस पाठवून तुम्हाला दुर्योधनाच्या शिबीरात घेऊन गेलो. अर्जुना युध्दाच्या आरंभी विश्वरूप दाखवून सर्व सैन्याला मारून टाकल्याचे तुला सांगितलेच आहे. तुला मी निमित्तमात्र केले. माझे व्यक्तिव्यक्त गुण मोठ्या ज्ञानी लोकांनाही कळत नाही.' (श्लोक ५९८-६०८)

अठरा दिवस चाललेल्या या युध्दातून कौरवाकडील कृतवर्मा, कृपाचार्य व अश्वत्थामा हे तिघे, पांडवाकडील कृष्ण, सात्यकी व पाच पांडव हे सातजण असे एकूण फक्त दहाजण जिवंत राहिले. हे ऐकून धृतराष्ट्र व गांधारी यांना भयंकर दुःख झाले. गांधारी म्हणाली, 'लढाईपूर्वी मला एक चमत्कारिक स्वप्न पडले होते. काळे लुगडे नेसून एका विधवा स्त्रीने मी राजमंदिरात बसले असतांना माझी ओटी भरली व माझ्या सुनांच्या कपाळाचे कुंकु पुसले. हे वाईट स्वप्न दुर्योधनाला कळविले होते पण त्याने ऐकले नाही. माझ्या पापीणीच्या हातून पूर्वी काय अघोर कृत्य घडले असावे म्हणून ही वेळ माझ्यावर आली.' असे म्हणून ती दोघे शोक सागरात बुडाली. तेथे व्यासऋषि आले. धृतराष्ट्राला ते म्हणाले, 'राजा शोक करण्यात काय अर्थ आहे. संसारात सुख नाही. जन्माला आल्यावर कांहीतरी कृतकृत्य केले पाहिजे नाही तर गर्भवासाचे दुःख पुन्हा नशिबी आहेच. प्रत्येक प्राणिमात्र मातेच्या मलमूत्रात नऊ महिने असतो. जन्माला आल्यावर अल्पशा सुखाबरोबर त्याला अनेक दुःखे भोगावी लागतात. तारूण्य प्राप्त होताच तो अभिमानाने ताठ वागतो. मातापिता व गुरु यांना कवडीसमान वागवून पत्नीच्या शब्दात असतो. मात्र म्हातारपण येताच मातापित्याला अनुभवावयाला लावलेले एकेकाळचे दिवस त्यालाही अनुभवावे लागतात तेव्हा हे राजा बालपण, तारूण्य व वृध्दापकाळ या कशातही सुख नाही. तेव्हा आता तुझे उरलेले आयुष्य तू ईश्वर चिंतनात घालव. पांडवांना तुझे पुत्र समज. ते तुमचा तिरस्कार करणार नाहीत. आणि आता आपल्या मुलांचे क्रियाकर्म कर.' संजय आणि विदूर यांनी धृतराष्ट्राला हेच सांगितले. तेव्हा नाईलाजाने त्यांनी सर्वांचे म्हणणे मान्य केले व ते क्रियाकर्म करण्यास निघून गेले. अतिशय दुःखाने धृतराष्ट्राला मूर्च्छा आली. सावध झाल्यावर तो पुन्हा पुन्हा शोक करू लागला. तेव्हा विदूर म्हणाला, 'हे राजा, सर्व जग हे नाशिवंत आहे. तेव्हा पुत्राबद्दलचा चाललेला हा तुझा शोक आवर. 'करणी तसे फल' या नियमाने झाले ते योग्य आहे. तेव्हा आता खेद करूं नकोस.' नंतर ते सर्व सामुग्री घेऊन क्रिया कर्म करण्यासाठी गेले. धृतराष्ट्र, संजय, विदूर, गांधारी व तिच्या सुना कुंती, द्रौपदी, सुभद्रा, उत्तरा, द्रोणपत्नि कृपि, कर्णस्त्रिया, धारातिर्थी पडलेल्या क्षत्रीयांच्या बायका, माता, बहिणी सर्व रणक्षेत्री आले. नंतर पांडव, सात्यकी, कृपाचार्य आले. गंगातीरी सर्वांची भेट झाली. धर्माने धृतराष्ट्राला आदरपूर्वक नमस्कार केला. पांडव, कुंति यांची तेथे चौदा वर्षानंतर प्रथम भेट झाली. द्रौपदी, सुभद्रा व कुंतीला भेटले. धृतराष्ट्राच्या सर्वसुना व शूरपत्न्यांनी रणक्षेत्रावर दुःखाने आकांत केला. भीष्म शरपंजरी पडले होते. तेथे जाऊन सर्वांनी नमस्कार केला. गांधारीने ते सर्व पाहून उद्वेगाने कृष्णाला म्हटले कीं, - कृष्णा आमच्या वंशाचा हा नाश होण्यास तू कारणीभूत आहेस. पांडवांच्या पाठीशी राहून तू हा नाश ओढवलास तेव्हा तुझ्याही कुळाचा नाश होईल. तेव्हा कृष्ण म्हणाला - 'तुझा हा शाप मला हितकारकच आहे.'

नंतर धृतराष्ट्राने आपल्या शंभर पुत्रांचे, धर्माने आपल्या पुत्रादिकांचे दहन व उत्तरक्रिया केली. कर्णाच्या प्रेताला कोणी अग्नि द्यावा असा प्रश्न पडला. तेव्हा कुंतीचे मातृप्रेम जागृत झाले. तिने रडत सर्व हकिकत धर्मास सांगितली. ते ऐकून धर्मास फार दुःख झाले. कर्ण हा माझा भाऊ आहे हे जर मला ठाऊक असते तर मी त्याला बंधुप्रेमाने वागविले असते. हा एवढा नाशही झाला नसता. बायकांची जातच कपटी असते. असे म्हणून येथून पुढे बायकांच्या मनांत कोणतीच गुप्त गोष्ट राहाणार नाही असा त्याने शाप दिला व कर्णाची उत्तरक्रिया केली. उत्तरक्रिया झाल्यानंतर सर्व आपल्या शिबीरात गेले. धर्म व कुंती मात्र गंगातीरावर महिनाभर राहिली. तेथे धर्माला भेटण्यासाठी धौम्य, दुर्वास, विश्वामित्र, भृगु, अत्री, कश्यप इ. अनेक ऋषी आले. त्यांची पूजा करून धर्म म्हणाला, 'माझ्या हातून कौरव, गुरु, पितामह, आप्तमित्र व थोरला भाऊ कर्ण यांचा नाश झाला आहे. आग लागो त्या राज्याला व क्षत्रीय धर्माला, ज्यायोगे मी सर्वस्वी पापसागरात बुडालो. मला राज्य नको.' शेवटी व्यासांनी त्यास सांगितले, 'धर्मा, तुला राज्यकारभार पाहिलाच पाहिजे. राजाशिवाय पृथ्वी तशी ठेवू नये. याबाबतीत तुला शरशय्येवर पडलेल्या भीष्मपितामह योग्य नीतीपाठ देतील.' मग धर्माला राज्याभिषेक केला. कृष्णाने पांचजन्य शंखाने त्याच्यावर जलसिंचन केले. मग धर्म म्हणाला, 'मुख्य राजा धृतराष्ट्र याच्या मताने वागावे. भिमसेनास मी युवराज्याभिषेक केला आहे. धृतराष्ट्राच्या सांगण्याप्रमाणे पांडव वागत. भगवान श्रीकृष्ण पांडवांना भीष्माकडे घेऊन गेले. शरपंजरी पडल्या पडल्याच भीष्मांनी धर्मराजास राजनीति, गृहस्थधर्म, भक्तिमार्ग, आत्मज्ञान वगैरे सर्व ज्ञानाचा उपदेश केला व उत्तरायण लागताच त्याने निजधामात प्रयाण केले. देवांनी त्याच्यावर पुष्पवृष्टी केली. दुंदुभी वाजविल्या. ऋषींनी व श्रीकृष्णाने धन्य धन्य म्हणून त्याची स्तुति केली. श्रीकृष्णांनी सर्व राजचिन्हासह भीष्माचे दहन केले. मग तेरा दिवस तेथे राहून सर्व परतले. श्रीकृष्ण व पांडव हस्तिनापुरास आले. थोड्या दिवसांनी श्रीकृष्ण द्वारकेला आले.

आपले सर्व आप्तेष्ट गुरु मित्र बंधू रणांगणांत आपल्याकडून मारले गेले याचे दुःख धर्माला वारंवार होत होते. तेच तेच पुन्हा आठवून धर्माला रडू कोसळे ते पाहून कुंती सुध्दा वारंवार चिंतातूर होई. भीम, अर्जुन भावाची यथामति समज घालीत व क्षात्रधर्मात हा दोष नाही वगैरे सांगून त्याला शांत करण्याचा प्रयत्न करीत पण सर्व व्यर्थ. या दुःखाने व्यथीत झालेल्या कुंतीने एकदा व्यासाला धर्माच्या चित्तास शांति मिळावी म्हणून काय करावे असे विचारल्यावरून व्यासांनी धर्माची

भेट घेतली धर्माने त्यांची पूजा केली व आपले दु:ख प्रगट केले. तो म्हणाला, 'मला येथे राहावत नाही. तेव्हा आपण भीमाला राज्य द्या. मला तपोवनात जाऊ द्या.' हे ऐकून व्यास म्हणाले, 'धर्मा, तू अश्वमेध यज्ञ कर. म्हणजे तुला शांति लाभेल आणि पितृगण परलोकी तृप्त होतील.' धर्म म्हणाला - 'पण माझ्याजवळ तो यज्ञ करण्याइतकी संपत्ती नाही. या युध्दामुळे पृथ्वीवरील सर्व राजांचा नाश झाला. त्यामुळे त्यांच्या मुलाजवळ द्रव्य मागण्यास मला योग्य वाटत नाही. प्रजेला त्रास देऊन पैसा उकळून यज्ञ करणे योग्य नाही.' व्यासांनी सांगितले - 'पूर्वी मरूत राजाने मोठा यज्ञ केला, तेव्हा त्याने ब्राह्मणांना खूप संपत्ती वाटली की त्यांना ती नेता आली नाही त्यांनी ती तेथेच टाकली ते द्रव्य अजून तेथेच आहे. ते तू घेऊन ये. धर्म म्हणाला - 'मी असा वागलो तर सर्व ब्राह्मण माझी कुचेष्टा करतील. व्यास म्हणाले, - 'धर्मा अश्वमेध करणे हे साधे नाही. त्याकरीता वीस हजार ब्राह्मण बोलावून अनुष्ठानास बसले पाहिजे. शिवाय प्रत्येक ब्राह्मणाला सव्वामण सोने, एक पायली रत्ने, एक हत्ती व घोडा वस्त्रालंकाराने सजवून दिले पाहिजे व एक वर्ष व्रत पाळले पाहिजे. या यज्ञासाठी श्यामकर्ण घोडा पाहिजे.' धर्मराजाने ऋषींच्या, पंडिताच्या व भावांच्या संमतीने अश्वमेघ करण्याचे ठरविले. भगवान श्रीकृष्णास संदेश पाठवून बोलावून घेतले. श्रीकृष्ण भगवंतांनी धर्मराजाची समज करतांना सांगितले, 'धर्म राजा तू हा अश्वमेध यज्ञ करीत आहेस हे चांगले आहे पण माझे स्वत:चे मत मी तुला सांगतो की अशा यज्ञांनी मन:शांति होईलच हे निश्चित नाही. तूं मनाने मानून घेतले, मुळात दोष नाहीच कारण क्षत्रनीति सांगते की रणक्षेत्रात जे अधर्माला प्रवृत्त झालेले आहेत. त्यास साहय्य करणारे कोणीही जरी असले तरी त्यांचा नाश करणे हे कर्तव्य आहे. त्यात दोष नाही, पाप कर्म किंवा हिंसा नाही. म्हणून मुळात नसलेल्या दोषांच्या निवारणार्थ प्रायश्चित घेऊन व्यर्थ भटकणे योग्य नाही. सांप्रत जगत् परिस्थिती पाहता तुला हा यज्ञ करणे उचित नाही. पण तुझी इच्छा मला मोडवत नाही. तू शामकर्ण सोडलास तुझे रक्षण करणे माझे कर्तव्य आहे.' असे म्हणून श्रीकृष्ण अश्वमेध यज्ञ कार्यास उद्युक्त झाले. श्रीकृष्णाच्या साहय्याने पांडवांनी संपूर्ण पृथ्वीवर श्यामकर्ण फिरवून दिग्वीजय मिळविला यज्ञाची सांगता पूर्ण होऊन यथासमय त्याची पूर्णाहुति झाली. सर्वत्र आनंदी आनंद झाला. यज्ञ झाल्यावर सर्व राजांचा आदर सत्कार केला. ब्राह्मणांना भोजन व यथोचित दानधर्म केला.

इतक्यात तेथे एक मुंगुस येऊन धर्माला म्हणाला, 'राजा, मागे एका यज्ञकुंडात मी लोळल्यामुळे व तेथील प्रसाद ग्रहण केल्यामुळे माझे अर्धांग सुवर्णाचे झाले आहे. राहिलेले अर्धांग सुध्दां सुवर्णाचे व्हावे म्हणून येथे आलो. पण सुवर्णमय होत नाही म्हणून तुझा यज्ञ असफल आहे. तो यथासांग झाला नाही.' मग धर्मराजा मुंगुसाला म्हणाला - 'या यज्ञप्रसंगी श्रीकृष्ण व वेदव्यास असतांना माझा यज्ञ यथासांग झाला नाही व असफळ झाला असे तू म्हणतोस तरी कसे?' ते ऐकून मुंगुस म्हणाला - 'कुरुक्षेत्रामध्ये शांतिरूप नावाचा एक ब्राह्मण मोठा धर्मशील होता. त्याची सत्यवती स्त्री, सुशील नामक पुत्र व सुशीला नावाची सून हे सुध्दा त्याच्याप्रमाणे सत्वशील होती. शांतिरूप दररोज साळीच्या शेतात जाऊन जमिनीवर पडलेले धान्याचे दाणे वेचून आणी व त्याजवर ती चौघे निर्वाह करीत. असे चालले असतां एकदां दुष्काळ पडून जिकडे तिकडे अन्नाची टंचाई झाली. ब्राह्मणांचा दाणे वेचून आणण्याचा क्रम चालूच होता. पण दुष्काळामुळे रोज पुरेसे दाणे न मिळता पाच सात दिवसात मिळून एखाद्या, दिवसाची सरासरी गुजराण होई. यात जे कांही असे त्याचे देव पितरांना भाग देऊन अतिथी भिक्षुकाला देऊन जे शिल्लक राहील त्यावर ती चारही जण निर्वाह करीत. अशा रितीने कांही दिवस चालले असता त्यांनी एकदा चारशेर धान्य जमविले व त्याचे पीठ दळून त्याचे चार रोडगे भाजले. तेव्हा त्यांचे सत्व पाहण्यासाठी श्रीविष्णू ब्राह्मणरूपाने त्याच्याजवळ गेला. शांतिरूपाने त्याचा सत्कार करून आपल्या वाटणीचा एक रोडगा त्यास दिला. अतिथीने तो खाऊन टाकला पण त्याची भूक शांत झाली नाही. तेव्हा सत्यवतीने तिचा भाग त्याला दिला, तरीही त्याची तृप्तता झाली नाही म्हणून पुत्राने व शेवटी सुनेनेही आपापले भाग अतीथीला अर्पण केले. ते खाऊन वर पाण्याचा घोट घेतल्यावर मात्र त्याचे समाधान झाले. तेव्हा त्या चौघांनीही अतिथी तृप्त झाला असे पाहून आनंद व्यक्त केला व त्याला नमस्कार केला. हे त्यांचे सत्व पाहून विष्णु प्रसन्न झाला व त्यांना आपले खरे रूप दाखवून विमानात बसवून वैकुंठास घेऊन गेला. ते गेल्यावर त्यांनी आचवतांना चूळ टाकली होती तेथे जाऊन मी लोळलो. तेथे पाणी थोडेसेच उरले होते. परंतु तेवढ्यानेही माझ्या शरीराला जितका स्पर्श झाला तितकाच शरीराचा भाग सुवर्णमय झाला व बाकीचा तसाच राहिला. तोही सुवर्णमय करावा अशा बुध्दिने मी या धर्म राजाच्या यज्ञातील अन्नरसात येऊन लोळलो. परंतु माझे शरीर तसेच राहिले. अर्थात हा यज्ञ फुकट आहे.' मुंगुसाचा हा वृत्तान्त ऐकून सर्व प्रकार श्रीकृष्णाने मनात जाणला व तेथे जमिनीवर त्याने पाय धुतले. त्या पाण्यात मुंगुस

जाऊन पुन्हा लोळले. त्याबरोबर त्याचे उरलेले शरीरही सुवर्णाचे झाले. इतक्यात मुंगुसाचे रूप गुप्त होऊन त्याचा तेजस्वी पुरुष झाला व इंद्रादि देवांनी त्याला विमानात बसवून स्वर्गात घेऊन गेले.

आपण केलेला एवढा मोठा यज्ञाचा खटाटोप व्यर्थ गेला. असे जाणून धर्म राजा अधिकच उद्विग्न झाला. व्यास व श्रीकृष्ण यांनी त्यास बराच उपदेश केला पण त्याची अस्वस्थता कमी होईना. त्यांनी धर्माला सांगितले - 'राजा आता लवकरच कलियुगाला सुरुवात होईल. तू स्वस्थचित्ताने राहून उत्तम रीतीने राज्यकारभार कर व ईशचिंतन कर.' श्रीकृष्णाने सांगितले, 'मी आता द्वारकेस जातो. वृध्दापकाळामुळे वरचेवर भेट होणे अशक्य आहे. कुशलक्षेम कळवीत जा.' असे सांगून तो व व्यास निघून गेले. ते ऐकून पांडवांना दु:ख झाले. एवढे युध्द करून विजय संपादून राज्यप्राप्ति झाली तरी पण पांडवांना शांति नव्हती. काय केले असता आपले चित्त स्थिर होईल असा धर्मराजा सारखा विचार करीत असे. त्याची उदासिनता पाहून सर्वजण चिंता करीत. कुंतीला ते दु:ख पाहवेना. कौरवस्त्रियांचा आक्रोश, धृतराष्ट्र, गांधारीचा शोक व कर्णाचे निधन यामुळे स्वत: कुंती शोक करीत बसे. अशाप्रकारे कांही काळ लोटल्यावर कुंतीने धर्मास काहीतरी धर्मकृत्य कर म्हणून सांगितले. पंडितांना बोलावून विचारता त्यांनी 'यज्ञाशिवाय मन:शांतीचा अन्य मार्ग नाही. यज्ञकार्यात अन्न वस्त्रे द्रव्य दान करून पुरोहित व याचितांना संतुष्ट केल्यास त्यांच्या आशिर्वादाने मन:शांति लाभेल.' असा सल्ला दिला. त्यानुसार धर्मराजाने आणखी दुसरा यज्ञ करण्याचे उभारून द्वारकेस संदेश पाठविला. अनेक देशांचे राजे, ब्राह्मण, पंडित, पुरोहित येऊन त्यांनी यज्ञाची मांडणी केली. द्वारकेहून श्रीकृष्ण येण्याऐवजी त्यांचाच दु:खद समाचार आला. (श्लोक ६०८-६२१)

एकदा विश्वामित्र व नारदमुनि द्वारकेस जाऊन एका उपवनात बसून ज्ञानचर्चा करीत होते. इतक्यात कृष्णाचे मुलगे तेथे खेळण्यासाठी आले. त्यांनी सांबाला स्त्रीवेष देऊन पोटावर वस्त्रे गुंडाळून सजविले होते आणि ऋषीजवळ जाऊन या स्त्रीला काय मूल होईल म्हणून थट्टेने विचारले. परंतु त्यांचे कपट पाहून विश्वामित्राला राग आला आणि तो म्हणाला, 'याच्यापासून एक मुसळ होऊन ते तुमच्या संपूर्ण कुळाचा संहार करील.' असा शाप देऊन ऋषि तेथून निघून गेले. मुलांनी कृष्णाला हे वर्तमान कळविले तेव्हा तो म्हणाला - 'ऋषीवाक्य कधीही खोटे व्हायचे नाही.' त्यांनी सांबाचे गुंढाळेलेले वस्त्र सोडताच त्यांतून मुसळ बाहेर पडले. त्याचा उग्रसेन

आदि यादवांनी घासून चूर केला व उरलेला तुकडा समुद्रात टाकून दिला. तो तुकडा एका मासळीने गिळला. ती एका व्याधाच्या जाळ्यात अडकली. त्याने तिला चिरल्यानंतर तिच्या पोटातून तो पोलादी लोखंडाचा तुकडा निघाला. त्या व्याधाने त्याचे आपल्या बाणाचे टोक घडविले. मुसळ घासून झालेल्या चुराचे समुद्रतिरावर भाल्यासारख्या तीक्ष्ण पात्याचे गवत उगवले. इकडे द्वारकेत जिकडे तिकडे डांगोरा पिटवून मद्यपान बंद करविले. मद्यपान करील त्याला सुळी द्यावयाचे असे ठरविल्यामुळे द्वारकेत कोणी मद्य पीइनासा झाला. याप्रमाणे सर्व यादव मोठ्या सावधगिरीने राहात असता त्यांचा दुष्ट काळ येऊन ठेपला व त्याप्रमाणे उत्पात व अनेक दुश्चिन्हे होऊ लागली. उंदीर स्त्रीपुरुषाचे केस तोडू लागले. कावळे घुबडासारखे ओरडू लागले. पांढऱ्या व तांबड्या पायांचे पक्षी यादवांच्या घरावर बसू लागले. गाईंना गाढवे होऊ लागली. यादवही एकमेकांचा अपमान करून पापाचारी झाले. एकट्या राम-कृष्णांनी मात्र कोणाची अवज्ञा केली नाही. मात्र हे सर्व प्रकार पाहून 'भारत युध्दात कुरूंचा क्षय झाला तसा यादवांचा क्षय होणार' असा गांधारीचा शाप त्यांना आठवला. मग कृष्णाने एकेदिवशी पर्वणी पाहून सर्वांना प्रभास क्षेत्राजवळ स्नानास जाण्यास सांगितले. त्याप्रमाणे सर्वजण स्त्रिया व मुलाबाळांना बरोबर घेऊन प्रभास तीर्थावर गेले. इकडे भगवान श्रीकृष्ण उध्दवास बरोबर घेवून दूर निघून गेले. तेथे त्यांनी उध्दवास संपूर्ण भागवत धर्माचे - मुक्तिप्रद नेणारे आत्मज्ञान उपदेशिले.

श्रीकृष्ण म्हणाले - 'उध्दवा, जगत् हा सगळा मायेचा खेळ आहे. मृत्युलोकी इतकेदिवस मी सहवास केल्यामुळे मला साहजिक या मर्त्यलोकाविषयी प्रेम उत्पन्न झाले आणि म्हणून या लोकास सोडतांना वाईट वाटते आहे. या मृत्यूलोकाचे जिवीत अत्यंत क्षणभंगूर आहे हे मी पूर्ण जाणून आहे. वीज चमकते आणि नाहिशी होते, त्याप्रमाणे या लोकाची स्थिती आहे. जोपर्यंत या शरीरात आत्मा असतो तोपर्यंतच या शरीराची शोभा. आत्म्याने या शरीरास सोडल्यावर या शरीराची योग्यता मृत्तिकेपेक्षाही कमी होते. प्राणोत्क्रमणाच्या समयी ऐकू येण्याची शक्ति दिशा हरण करतात. नेत्रांतील दृश्यशक्ति सूर्य हरण करतो. दातांची शक्ति वरूण नाहिशी करतो. जठराग्नि जिव्हेची शक्ति नाहीशी करतो. पाणी हे रक्ताला आकर्षण करून घेते. वायु स्नायूला निश्चेष्ट करितो. शरीरातील तत्व आकाशात जाते. शरीर मृत्तिकेत मिसळले आणि आत्मा मात्र तसाच कायम राहातो. तो पुन्हा दुसरा देह धारण करतो. त्यास मृत्यू नाही. तो चिरंजीव आहे व त्यासच मुक्ति आहे. मृत्यूलोक हा बिकट खराच पण मुक्तिचे

साधन याच लोकी सुलभ आहे. यालोकी ज्ञानदृष्टी ही कमी असून मायेचा प्रभाव अधिक असल्याने भोगप्रवृत्ति जास्त आहे. या जगात कित्येक किडे असे आहेत की ते स्वत:च कोश तयार करून त्यात आपणास कोंडून घेतात आणि जेव्हा ज्ञानदृष्टी प्राप्त होते तेव्हा ते त्या कोशातून उडून जातात, म्हणजे कोशातून उडून जाण्याची त्यांना शाक्ति असते. पंख असतात. पण कोशाच्या बाहेर पडण्याची त्यांना बुध्दिच होत नाही. त्याप्रमाणे प्रत्येक मनुष्य मायेच्या बंधनात गुरफटून गेलेला असतो. ही बंधने तोडण्यासाठी ज्ञान हे अवश्य पाहिजे. ज्ञान व उपासना ही आत्म्याच्या उन्नतीची यालोकाची मुख्य साधने आहेत. त्यात भक्ति ही अवश्य आहे. भक्तीनेच ज्ञानप्राप्ति होते. भक्ति न करता एकदम ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करणे हा वेडेपणा होय. कर्म, भक्ति व ज्ञान हेच या लोकाचे अनुष्ठान होय. आत्म्याच्या उन्नतिसाठी भक्ति हेच सोपे साधन आहे. ईश्वराचे नांव ऐकावयाचे ही भक्तिची पहिली पायरी. ईश्वराचे भजन, त्याचे स्मरण, पादसेवन, वंदन, अर्चन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन म्हणजे समर्पण ह्या अशा पुढच्या पायऱ्या आहेत. उध्दवा तू ज्ञाता आहेस. तुला सर्व काही समजते अधिक सांगावयास नको. मी आता वैकुंठी जाणार आहे. तेव्हा तू येथे न थांबता बद्रिकाश्रमी जाऊन आपल्या आयुष्याचा चांगल्या रीतीने विनियोग कर. जातांना व्यासांना माझा संदेश सांगून पाठवून दे.' कृष्णाने उध्दवास असे सांगितल्यावर त्यास भडभडून आले. त्याने कृष्णाच्या पायावर मस्तक ठेवले. मोठ्या जड अंत:करणाने उध्दवाने भगवंताचा निरोप व आशिर्वाद घेतला. प्रथम तो व्यासांच्या आश्रमात जाऊन श्रीकृष्णांचा संदेश त्यांना कळविला व बद्रिकाश्रमी निघून गेला.

इकडे प्रभास तीर्थावर आल्यावर यादवांनी श्रीकृष्ण आपल्यात नाही असे पाहून यथेच्छ मद्यपान व मांसभक्षण केले व उन्मत्त होऊन एकमेकांचे उणेदुणे काढून भांडू लागले. शेवटी त्यांचे भांडण विकोपाला गेले ते आपापसात लढू लागले. कित्त्येकांनी समुद्रतीरावर उगवलेले ते तीक्ष्णपात्यांचे गवत उपटून मारायला सुरुवात करताच त्याचे मुसळासारखे शस्त्र होऊन त्यायोगे यांदवांचा संहार होऊ लागला. इतक्यात श्रीकृष्णही तेथे आले. त्यांनी यादवांना निवारण्याचा बराच प्रयत्न केला पण कोणी ऐकेना. म्हणून श्रीकृष्णानेही तेथील गवताचे शस्त्र घेऊन बराच संहार केला. श्रीकृष्णांनी दारूकाला सांगितले कीं 'तू पांडवाकडे जाऊन यादवांचा क्षय झाल्याचे त्यांना कळव व अर्जुनाला येथे पाठविण्यास धर्मराजाला सांग.' दारूक हस्तिनापुरास निघून गेला. श्रीकृष्णांनी सर्व स्त्रियांना सुरक्षित ठिकाणी पोहोचते केले व अर्जुन येथे येऊन स्त्रियांना घेऊन

जाईपर्यंत तुम्ही यांचे रक्षण करा असे तेथील लोकांना सांगितले. श्रीकृष्णांनी म्हटले मी बलरामाबरोबर वनात जाऊन तप करणार आहे. आता या द्वारकानगरीकडे मला काही पाहवत नाही असे म्हणून द्वारकानगरी त्यांनी समुद्रात बुडवून टाकली. श्रीकृष्णाचे अप्रिय शब्द ऐकून व अघोर कृत्य पाहून सर्व स्त्रिया भयभीत होऊन आकांत करू लागल्या. त्यांना श्रीकृष्णाने आश्वासन दिले की लवकरच अर्जुन येथे येऊन तुमचे दु:ख निवारण करील. असे सांगून तो वनात गेला. तेथे बलराम आसनावर बसून योगधारणा करीत होता. त्यावेळी त्याच्या मुखातून एक सहस्त्र फणांचा श्वेतनाग बाहेर पडला. कृष्णाने त्याच्याकडे पाहताच तो समुद्रात निघून गेला. तेथे अनेक नाग त्याची स्तुति करू लागले.

उध्दवाद्वारे श्रीकृष्णांचा संदेश व्यासांना कळताच अंतर्ज्ञानाने जाणून 'अंत:काळचे समयी आपणास श्रीकृष्ण बोलवीत आहे पण ते शेवटचे दृश्य आपणास पाहवणार नाही म्हणून अनुष्ठान संपल्यावर येतो.' असे व्यासांनी कळविले. इकडे धर्मराजाचीही तीच स्थिती झाली. त्यांनी पार्थास बोलावून सांगितले कीं, 'अर्जुना, कृष्णाने निजधामास जाण्याची तयारी केलेली आहे व शेवटी तुला भेटावे अशी त्यांची इच्छा आहे, तर तू जा पण आता देवाशी लांबूनच भाषण कर कारण त्यांच्या शरीरास स्पर्श केलास तर तुझी सर्व शक्ति क्षीण होईल असे पार्थास सुचित करून धर्मराजाने त्यास पाठविले.

यादवांच्या संहारातून अनिरूध्द पुत्र वज्रनाभ हा मात्र जिवंत राहिला. हा सर्व अनर्थ पाहून श्रीकृष्णास फारच दु:ख झाले. भालुका तीर्थावर जाऊन तो एका पिंपळाच्या वृक्षाखाली शोकाकुल होऊन योगनिद्रेत मग्न झाला असतां शिकार करीत असलेल्या व्याधास कृष्णाच्या पायावरील पद्म हरणाच्या डोळ्याप्रमाणे भासले व त्याने माशाच्या पोटात सापडलेल्या लोखंडाच्या टोकाचा बाण पायाचा नेम धरून कृष्णाच्या अंगावर सोडला. बाण बरोबर लागू पडताच तो व्याध शिकारीच्या आशेने जवळ आला व पाहतो तो आपल्या बाणाने श्रीकृष्ण घायाळ झाला असून विव्हळत पडला आहे असे त्यास दिसले. तो प्रकार पाहून व्याधाला अत्यंत दु:ख झाले व तो कृष्णाजवळ क्षमा मागू लागला. तेव्हा श्रीकृष्ण म्हणाला, 'व्याधा ह्यात तुझा कांही अपराध नाही. तुझ्या पूर्वजन्मात तुला मी अशाच रीतीने मारले होते. त्या कर्माचे फळ योग्य असेच मला मिळाले. मृत्यूलोक ही कर्मभूमी आहे. येथे कर्म भोगल्यावाचून सुटका नाही. आता मी सुखाने आपले प्राणोत्क्रमण करीन.' श्रीकृष्ण भगवान असे

म्हणत आहेत तोच अर्जुन तेथे आला. त्यास पाहताच कृष्णाला समाधान वाटले व ते त्यास म्हणाले, 'अर्जुना बरा वेळेवर आलास. प्राणोत्क्रमणसमयी गंगोदक मुखात पडावी अशी इच्छा आहे.' कृष्णाची ती इच्छा पाहून पार्थाने लागलीच भूमी बाण मारून गंगा वर आणली व एका पात्रात गंगोदक घालून ते पात्र अर्जुनाने श्रीकृष्णाच्या हातात दिले. श्रीकृष्णाचा स्पर्श होताच अर्जुनाची सर्वशक्ति नाहीशी झाली. श्रीकृष्ण परमात्म्यांनी गंगोदक प्राशन केले व देह ठेवला. नंतर अर्जुनाने सर्व और्ध्वदेहिक कर्मे अनिरूध्दपुत्र वज्रनाभ याचेकडून करविली. मग त्यास व स्त्रियास घेऊन तो प्रभासाहून मथुरेस आला. मथुरेस येत असता वाटेत चोरांनी (काबांनी) अर्जुनास लुटले. स्त्रियांचे अपहरण केले. चोर अर्जुनावर चालून आले तेव्हा त्याने आपल्या गांडीव धनुष्यास हात घातला पण ते धनुष्य त्यास त्यावेळी उचलले देखिल गेले नाही मग चालविण्याची गोष्ट कुठली. एवढा मोठा वीर पण शक्ति नाहीशी झाल्यामुळे त्याला त्यावेळी चोरांनी खुशाल लुटले. मथुरेला आल्यावर अर्जुनाने अनिरूध्दाचा मुलगा वज्रनाभ याला तेथील सिंहासनावर बसवून त्याच्या नावाने राज्यकारभार चालविला. भगवान कृष्ण या देहाने वैकुंठात गेले व रूक्मिणीने प्राणत्याग केला असे श्रीमत्‌भागवतात म्हटलेले आहे. पण श्रीकृष्णाच्या देहापासूनच पुढे बुध्दअवताराचा विस्तार झालेला आहे.

अर्जुन नंतर व्यासांच्या आश्रमात गेला तेव्हा व्यासांनी त्याला कुशलवृत्त विचारले पण तो व्यग्रचित्त असल्यामुळे काहीच न बोलता खिन्न वदनाने उभा राहिला तेव्हा त्यास व्यास म्हणाले, 'अरे तू असा खिन्न कां? काय तुझ्या हातून कोणी नपुंसक, स्त्री किंवा ब्राह्मण यांची हत्या झाली की काय?' अर्जुनाने उत्तर दिले, 'माझा प्रिय सखा कृष्ण स्वर्गास गेला व प्रभास तीर्थावर सर्व यादवांचा क्षय झाला. माझे बाण व अस्त्रे फुकट जाऊन माझ्याबरोबर असलेल्या स्त्रियास भिल्लांनी लुटले म्हणून आता हा प्राण ठेवावा असे मला वाटत नाही.' अर्जुनाचे हे भाषण ऐकून व्यासांनी त्याला सांगितले 'अरे हे सर्व ब्रह्मशापामुळे झाले. कृष्ण व तू मिळून भूमीचा भार हरण करून गोब्राह्मणावर उपकार केलेत परंतु पुढचा प्रकार हा सर्व काळाचा खेळ आहे त्याबद्दल शोक करून काय उपयोग? तसेच तुझ्यासारख्याला आत्मघात करणे अनुचित आहे.' व्यासाने याप्रमाणे समाधान केल्यावर तो हस्तिनापुरास परत येऊन धर्मादिकास भेटला. नंतर सर्वांनी जमून विचार केला की आता द्वापारयुग संपून कलियुग सुरु झाले तरी या कलियुगात आपणाला राज्य करणे मुष्किल आहे म्हणून आपल्या हातून झालेल्या गोत्रहत्येबद्दल एखादा शांतियज्ञ करून त्यात पितृगण,

आप्त, मित्र, गुरु बंधु वगैरेचे श्राध्द आदि करून मोठा यज्ञ करावा. ब्राह्मणांना यथेच्छ दानधर्म करून पाप निवृत्त व्हावे व निर्मळ निश्चळ मनाने हरि संकिर्तन करून या देहाचा त्याग करावा असा त्यांनी विचार केला व त्याप्रमाणे यज्ञानुष्ठानाकरिता देशोदेशीचे विद्वान पंडित निष्णात ब्राह्मणांना आमंत्रण देऊन बोलाविले. समयपरिवर्तनामुळे व ज्ञानाहंकरामुळे व कालप्रभावामुळे ब्राह्मणांच्या वृत्तीत बराच विकृतपणा आला होता. त्यांनी धर्मराजाला सांगितले, 'राजा आम्ही यज्ञ करतो पण आम्हाला मनईच्छित दानधर्म केल्यासच प्रसन्न होऊन आशिर्वाद देऊ. त्यायोगे तुमच्या शिरावर असलेले कुळगोत्र हत्येचे पातक निवारण होईल पण मागच्या अनुभवावरून तू मध्यंतरीच हा यज्ञ सोडून उठून गेल्यास त्याचा दोष आमच्यावर नाही. कारण मागच्या वेळेस एका मुंगुसाने येऊन यज्ञ यथासांग नाही असा दोष लाविला होता. तसाच आता यावेळेस कोणी एखादा नास्तिक कापालिक चांडाळ येईल आणि हा यज्ञ भंग करील त्यायोगे वाद विवाद होण्याचा संभव आहे तर तसे होऊ नये म्हणून त्याचे संरक्षण चांगल्याप्रकारे व्हावे. अर्जुन हा हतबल झालेला आहे म्हणून भीमाला द्वारपाल म्हणून ठेवावे. बाकीच्या भावांनी यज्ञदीक्षा घ्यावी. अनुष्ठाण पूर्ण झाल्याशिवाय मध्येच उठू नये. आमच्या सांगितल्याप्रमाणे वागाल तर तुमचे सर्व पातक निवारण होईल. कुळगोत्र हत्तेचे पातक जाऊन सर्व पितृगणास आप्त इष्टमित्र बंधू वगैरेना शांतिलाभ व तुम्हालासुध्दां मन:शांतिचा लाभ होईल.' अशा प्रकारे आश्वासन व सुचना देऊन पंडितांनी यज्ञाला सुरुवात केली.

इकडे प्रभास क्षेत्रावर भालुका तीर्थात ज्याठिकाणी भगवान श्रीकृष्णांनी प्राण सोडला तिथे अर्जुनाने श्रीकृष्णाच्या प्रेतास अग्निसंस्कार केला व तर्पण करून अर्जुन तेथून पुढील व्यवस्था करण्यास निघून गेला. ते श्रीकृष्णाचे कलेवर पूर्णपणे जळाले नाही. युगपरिवर्तनाने त्यात पृथ्वीतत्व अधिक झाले अग्नीतत्व क्षीण झाले म्हणून हातापायाची बोटे, नाक, कान, केस वगैरे नाजुक अवयव फक्त जळाले. शरीरावर ठिकठिकाणी अग्नीचे चटके बसले अशा प्रकारे अपूर्ण जळालेले हे कलेवर कोणाचे असावे असा विचार तेथे आलेल्या काही गुराख्यांनी केला. पण त्यांनी परत ते प्रेत जाळण्याचा प्रयत्न न करता समुद्रात फेकून दिले. पूर्व समुद्रावरील एक मोठा जलचर मासा समुद्र पर्यटन करीत करीत तेथे भटकत असतांना ते प्रेत त्याच्या दृष्टीस पडले व त्याने ते आपल्या वास्तव्य स्थानावर न्यावे या उद्देशाने मुखात पकडून दक्षिण भारताला वळसा घालून पूर्व समुद्रात वोडस्यापीठ म्हणून जगन्नाथपुरीच्या

जवळपास घेऊन आला. पुरीला त्यावेळेस वीरपाल नावाचा राजा राज्य करीत असताना त्याला काही कर्मदोषामुळे ब्रह्महत्येचे महापातक लागले होते, ते निवारण व्हावे म्हणून त्याने भगवंताची मनोमन प्रार्थना केली. ईश्वरकृपेने त्याला दृष्टान्त घडला कीं, 'तू समुद्रतीरावर जाऊन एका जलचराच्या मुखात असलेले कलेवर सोडवून ते घरी आण व एकवीस दिवस पर्यंत सुरक्षित पेटीत पुरुन ठेव. एकवीस दिवसानंतर स्नानादिक करून पवित्र होऊन ती पेटी उघड व आत असलेल्या त्या कलेवराचे दर्शन घे म्हणजे तू दोषमुक्त होशील.' याप्रमाणे दृष्टान्त झाल्यावर राजाने सागरतटावर जाऊन प्रतिक्षा करू लागला. एवढ्यात त्याला दुरुन एक मोठा जलचर मुखात एक कलेवर घेऊन येत असलेला दिसला. राजाने ताबडतोब बाण मारून जलचराचा नाश केला व त्याच्या मुखातून कलेवर काढून घेऊन घरी आणले व सुरक्षित पेटी तयार करून तीत ते ठेवले. पंधरा दिवसानंतर राजाने अधीर होऊन कुतुहलवश पेटी उघडून पाहिली तो यात त्या कलेवराच्या हातापायांना बोटांचे अंकुर फूटत असून नाक व कान यांच्याठिकाणी सुध्दां तसेच अंकूर फुटत आहेत; कलेवर सजीवन होऊन अग्नीचे चटके लागलेल्या भागातून रक्त पू गळत आहे असे ते स्वरूप पाहून राजा मनात ओशाळला. भगवंताच्या आज्ञेप्रमाणे आपण पूर्ण मुदतहि न होऊ देता अधीरतेने मध्यंतरीच उघडून पाहिले म्हणून त्यास पश्चाताप झाला. त्या कलेवराधिष्ठित भगवंताच्या दर्शनाने राजाचे पातक दूर झाले व तो पूर्ण सुखी आनंदी झाला. तेथून ते भगवंताचे स्वरूप त्याच रूपाने हस्तिनापुरात पांडवांच्या यज्ञद्वारी येऊन उभे राहिले तोच बुध्द अवतार होय. वीरपाल राजाने जगन्नाथपुरीला त्याच स्वरूपमूर्तीची स्थापना केली म्हणून तेथील मूर्तीला हात पाय नाक कान नाहीत. भगवंताचे दर्शन त्याला ज्या स्वरूपातून घडले त्याच स्वरूपाची तिथे स्थापना केलेली आहे.

अशाप्रकारे येथे कृष्ण अवतार संपूर्ण होऊन भगवंतानी त्याच आपल्या देहामध्ये धारण केलेला असा नववा बुध्द अवतार प्रगट केला. निजधामाला प्रयाण करते समयी भगवंतानी विचार केला की, कृष्ण रूप धारण करून आपण जे अवतार कार्य केले ते बहुतांशी पूर्ण झाले पण त्यातील शेवटचा भाग पांडवांचा उध्दार अजून राहिलेला आहे. आपल्या पश्चात कलियुगाच्या प्रवाहात आपले प्रेमळ भाविक भोळे सद्भक्त वाहून जाऊ नयेत म्हणून वेळीच त्यांना येथून काढून मुक्तिमार्गावर आणून सोडावे यासाठी त्यांनी आपल्या पूर्वीच्याच शरीराचा उपयोग करून त्यात आणखीही विकृति घडवून आणली व पांडवांना सत्यधर्माचा उपदेश करण्यासाठी त्यांच्या

यज्ञद्वारी गेले. पांडवांचा तो शेवटचा यज्ञ चाललेला होता. कुळगोत्र हत्येचे पातक निवारण व्हावे. म्हणून ते अनुष्ठान मांडलेले पाहून भगवंताला आश्चर्य वाटले. प्रत्यक्ष श्रीकृष्ण, वेदमूर्ति व्यास ज्या यज्ञात उपस्थित होते तो सुध्दा सफळ झाला नाही. मग आता श्रीकृष्णही नाही, व्यासही नाहीत व अनेक थोर कीर्तिचे ऋषिमुनि सुध्दां नाहीत मग हा यज्ञ कसा बरे सफळ होऊ शकेल? हा प्रयत्न करून पापनिवृत्ति करण्याचा कीतीही आयास केला तरी काय उपयोग? मनस्थैर्य, आत्मबल शुचिर्भूतपणा, अहिंसा, सत्य असल्याशिवाय यज्ञाचे श्रेय मिळत नाही आणि यज्ञाचे श्रेय म्हणजे काही मुक्ति नव्हे, तर ऐहिक व पारलौकिक सुखाची प्राप्ती या पलिकडे यज्ञाचे श्रेय नाही. केवल कर्मकांडामुळे मुक्तिलाभ नाही. मुक्तीलाभासाठी ज्या साधनांची आवश्यकता आहे त्यांचे योग्य मार्गदर्शन आपल्या सद्भक्तांना करावे या उद्देशाने भगवंताने हा नववा बुध्द अवतार धारण केला. (श्लोक ६२२-६५४)

।। इति श्री कृष्ण अवतार समाप्त ।।

।। ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु ।।

ॐ श्री बुध्द अवतार

नवव्या श्री बुध्द अवतारात सद्भक्त पांडवांना
दिव्य ज्ञानोपदेश देऊन मूळ स्वरूपाचे दर्शन देतांना
ॐ श्री विष्णु भगवान

अहिंसा परम धर्म स्थापवा कलियुगनो मर्म समजाववा ।
स्वामी श्रीहरी बुध्द रूपे आव्या मानव मात्रने उगारवा ॥

॥ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नमः ॥

# ॥ नवम श्री बुध्द अवतार प्रारंभ ॥

## "प्रास्ताविक निवेदन" :-

बुध्द अवताराचे कृत्य पुराणांतरी जे वर्णिलेले आहे ते इतर अवतार कृत्याहून अगदी निराळ्या प्रकारचे आहे. इतर मत्स्य, कूर्म, वराह, नृसिंह वगैरे अवतार हे पृथ्वीवरील पापांचा भार हलका करून गोब्राह्मणांना छळणाऱ्या दुष्ट राक्षसांचा उच्छेद करण्यासाठी झाले. परंतु बुध्दावतारासंबंधी लिहितांना श्रीमद्भागवतकार लिहितात की बुध्दावतार हा देवांच्या शत्रूंना मोह पाडण्यासाठी झाला.

ततःकलौ संप्रवृत्ते संमोहाय सुरद्विषाम्।
बुध्दो नाम्नांऽजनसुतः कीकटेषु भविष्यति॥

'आर्यविद्यासुधाकर' नामक ग्रंथात बुध्दावतारासंबंधाने म्हटले आहे,--

नीचानामसतां विमोहजननं श्रोताध्वनिंदामिषात्।
भूतहिंसन मुख्यधर्ममतनोत्सर्वज्ञ एषः प्रभुः॥

नीच व असज्जन यांच्या बुध्दीस मोह म्ह. भ्रांति उत्पन्न करण्यासाठी श्रुतिमार्गांच्या निंदामिषाने बुध्दावताराने मुख्यत्वे करून अहिंसा धर्मांचा प्रसार केला.प्रसिध्द गीतगोविंद काव्याचा कर्ता जयदेव याने तर म्हटले आहे कीं,--

निन्दसि यज्ञविधेरहह श्रुतिजातं सदयहृदयकर्शित।
पशुघातं केशवधृत बुध्द शरीरं। जय जगदीश हरे॥

विष्णुपुराणात तृतीय अंश १७ व १८ अध्यायात बुध्द अवताराला 'मायामोह' असे नाव दिले आहे, आणि त्याने विष्णुच्या शरीरापासून निर्माण झाल्यानंतर नर्मदेच्यातिरी जाऊन तेथे तपश्चर्या करीत असलेल्या दैत्यांना संदेहजनक वाक्यांनी श्रुत्युक्त धर्मापासून पराङ्मुख करून अर्हत धर्माचा उपदेश केला आणि तुम्हाला निर्वाण पाहिजे असेल तर पशुयज्ञांचा त्याग करा आणि हे जग विज्ञानमय करून सोडा. या जगाला कोणाचाही आधार नाही हे निश्चयेकरून जाणा वगैरे सांगितले अशा प्रकारे बुध्दावताराचे कार्य वर्णिले आहे. साहित्यदर्पणकार भट्टविश्वनाथ यांनी दशावतारासंबंधाने लिहितांना प्रत्येक अवताराचे अल्प वर्णन केले आहे ते असे की,--

यस्यालीयत शल्कसीम्नि जलधिः पृष्ठे जगन्मंडलं
दंष्ट्रायां धरणी नखे दितीसुताधीशः पदे रोदसी।
क्रोधे क्षत्रगणः शरे दशमुखः पाणौ प्रलंबासुरः
ध्याने विश्वमसावधार्मिकुलं कस्मैचिदस्मै नमः॥

यात लोकांना भ्रांति पाडण्याचे नाव नाही तर उलट ध्यानाच्या योगाने सगळ्या विश्वावर प्रभुत्व स्थापित करण्याचा उल्लेख करून गौरव केला आहे. बुध्दाच्या चरित्राचे विशेषत्व म्हणजे हठयोगादिकांच्या योगाने नव्हे तर ध्यानाच्या योगाने दिव्यज्ञानाची प्राप्ति त्याने करून घेतली व जगाचा उध्दार केला यात आहे. आणि हे त्याच्या चरित्रातले रहस्य भट्ट विश्वनाथ यांनी एका शब्दात मोठ्या खुबीने सांगितले आहे. दुसऱ्या एका कवीने म्हटले आहे--

वेदा येन समुद्धृता वसुमती पृष्ठे धृताप्युध्दता
दैत्येशो नखरैर्हतः फणिपतेर्लोकं बलिः प्रापितः।
क्ष्माक्षत्राजगती दशास्यरहिता माता कृता रोहिणी
हिंसा दोषवती धराप्ययवनापायात्स नारायणः॥

यात बुध्द अवताराचे कार्य हिंसानिषेध याचा स्पष्ट उल्लेख आहे. हे ब्राह्मणधर्मी ग्रंथकारांचे उल्लेख झाले आता बौध्द ग्रंथकार यासंबंधाने काय म्हणतात ते पाहू. बौध्द ग्रंथकार त्याला प्रत्यक्ष देवाचा अवतार समजत नाहीत पण शाक्य गौतमाने दिव्यज्ञान व पवित्र आचरण यांच्या योगाने मनुष्य जातीस दुर्लभ अशी देवाइतकी किंबहुना अधिक उच्च पदवी प्राप्त करून घेतली असे ते समजतात आणि म्हणूनच भक्तिशतक नामक बौध्द ग्रंथात पुढीलप्रमाणे श्लोक आढळतो.

ब्रह्माऽविद्याभिभूतो दुरधिगममहामाययालिंगितोऽसौ
विष्णूरागातिरेकान्निज वपुषि धृता पार्वती शंकरेण।
वीताऽविद्यो विमायो जगति स भगवान्वीतरागो मुर्नीद्रः
कः सेव्यो बुध्दिमद्भिर्वदत खलु हिमे भ्रातरस्तेषु मुक्त्यै॥

ब्रह्मदेव अविद्येने अभिभूत झालेले, विष्णु महामायेच्या आलिंगनामुळे मूढ झालेले, शंकर आसक्तिमुळे पार्वतीस आपल्या देहावरधारण करून बसलेले. पण महामुनिबुध्द मात्र अविद्या माया आणि आसक्ति यापासून सर्वतोपरी दूर आहेत. तेव्हा मुक्तिलाभ करून घेणारांनी कोणाला शरण जावे ते बंधु हो तुम्हीच सांगा. 'अवदान कल्पलता' नामक ग्रंथात प्रसिध्द करून काश्मिरी कवी क्षेमेन्द्र लिहितो--

हसति सकल लोकालोक सर्गाय् भानु: परममृतवृष्ट्यै पूर्णतामेति चन्द्र:।
इयति जगति पूज्यं जन्म गृण्हाति कश्चित् विपुल कुशल सेतु: सत्त्वसन्तारणाय॥

सगळ्या जगाला प्रकाश देण्यासाठीच सूर्य उदय पावतो. परम अमृताचा वर्षाव करण्यासाठीच चन्द्र पूर्णत्व पावतो. त्याप्रमाणे जगातल्या यच्च्यावत प्राण्यांना उध्दाराचे साधन प्राप्त करून देण्यासाठी जगात बुध्दासारखे पूज्य महात्मे उत्पन्न होतात. त्याचप्रमाणे--

शक्रवायुवरूणादय: सुरा: विक्रियां मुनिवराश्च यत्कृते।
यान्ति ततस्मरसुखं तृणायते यस्य कस्य न स विस्मयास्पदम्॥

इंद्र वरूण वायु प्रभृति देव व मुख्य मुनिगण सुध्दां ज्या कामवासनेने लटपटून जातात, त्या कामवासनेला तृणवत् तुच्छ मानणारा बुध्द कोणाच्या विस्मयाला प्राप्त होत नाही? असेच बुध्दाला अत्युच्चपदी अढळ बसविणारे उल्लेख 'ललितविस्तर,'' अश्वघोषरचित बुध्दचरित', 'लंकावतार सूत्र' वगैरे संस्कृत बौध्दग्रंथात आणि 'महावंस,' 'महावग्ग' वगैरे पाली ग्रंथात आढळतात. यावरून निष्पक्षपाति मनाने जर कोणी निष्कर्ष काढू लागला तर तो असाच काढील की बुध्द हा पुरूष अलौकिक, सदाचरणी, पवित्र मनाचा, दिव्यज्ञानी आणि जगाच्या उध्दारार्थ अवतीर्ण झाला होता. त्याची मते श्रुतिप्रतिपादीत धर्म मार्गाहून भिन्न असतील आणि म्हणून ब्राह्मणधर्मी ग्रंथकारांची मने त्याच्या शिकवणीमुळे दुखविली जाणे व त्यामुळे त्या ग्रंथाकारांच्या ग्रंथात प्रसंग विशेषी त्याच्याविषयी कटुक्ति आढळणे साहजिक आहे. तथापि त्याच्या आचरणाची छाप ब्राह्मण ग्रंथकारांच्या मनावरही इतकी विलक्षण बसली होती की त्यांच्याने त्याच्याविषयी योग्य आदर व्यक्त केल्यावाचून राहवेना आणि म्हणून त्यांनी बुध्दाला विष्णुच्या अवतारात गणले पण त्याच्या मतांच्या विचित्रपणामुळे असुरांना मोह पाडण्याचा उद्देश त्याच्या अवताराला चिकटवून त्यांनी आपल्या मनाचे समाधान करून घेतले असा काढलेला निष्कर्ष इतिहासाच्या दृष्टीनेही चुकीचा ठरणार नाही. कारण बुध्दाने लोकांच्या श्रुतिप्रणित धर्मावर आघात करून त्यांची मने जरी अत्यंत क्षुब्ध केली तरी ती क्षुब्धता चिरकाल राहिली नाही व बुध्दाविषयी किंवा त्यांच्या शिष्याविषयी दीर्घद्वेष ब्राह्मणधर्मी लोकांनी ठेविला नाही. कालांतराने मनाची क्षुब्धता निघून जाऊन शांततेने विचार करण्याची वेळ येताच व गौतमाच्या अंगचे लोकोत्तर गुण त्यांच्या हृदयमंदिरात उज्वल प्रकाश पाडू लागताच त्यांनी आपले शिर त्याच्यापुढे वाकवून गौतमासारख्या जगाच्या उध्दारार्थ देह कष्टविणाऱ्या महात्म्याला योग्य असा मान दिला.बौध्द धर्माचा छळ करून त्याला ब्राह्मणांनी हिंदुस्थानातून घालवून दिले असा जो लोकप्रवाद आहे त्याला इतिहासात काही आधार नाही.एखाद् दुसऱ्या राजाने जरी बौध्दांचा छळ केला तरी तो कांही नियम होत नाही. तो अपवादच म्हटला पाहिजे. (बौध्द पर्व प्रकरण १)

यज्ञयागादिकांना महत्व देणाऱ्या वैदिक ब्राह्मणांनी बुध्दांचा फार छळ केला. अशी समजूत आहे पण ती निराधार आहे. बुध्दाच्या कालापर्यंत सुध्दां मध्यदेशामध्ये यज्ञयागाला फारसे महत्व राहिले नव्हते आणि जे कांही थोडेबहुत यज्ञ होत असत त्यांना अतिशय खर्च येत असल्यामुळे ते सामान्य लोकांच्या आटोक्याबाहेरचे होते. बुध्द चारही वर्णाला समान मानतो. हाच काय तो त्याच्यावर ब्राह्मणांचा मुख्य आरोप होता. तो वाटेल तेथे भिक्षाग्रहण करतो, चांडाल आणि ब्राह्मण या सर्वांना आपल्या संघात समानत्वाने वागवितो व येणेकरून परंपरागत आलेला वर्णभेद मोडू पाहतो याबद्दल कित्येक वर्णाभिमानी ब्राह्मणांच्या पोटात दुखत असे. पण त्यांच्याकडून शिव्याशापाखेरीज बुध्दांचे म्हणण्यासारखे अहीत झाले नाही. बुध्दाला चांडाल वगैरे शब्दांनी सबंधून त्याच्याशी भांडण करावयाला सिध्द झालेले कित्येक ब्राह्मण त्यांचे शिष्य झाले.

बुध्द अवताराबद्दल पुराणांतरी कथाकल्पतरू स्तबक २ अध्याय १७ यात हकिकत येते ती अशी एकदां पाताळात सर्व राक्षस मिळून त्यांनी शुक्राचार्याला असा प्रश्न केला कीं आम्हा दैत्यांचे राज्य सर्व भूमंडळावर होऊन इंद्रादि देव आम्ही जिंकावेत यासाठी काय केले पाहिजे ते सांगा. तेव्हा शुक्राचार्य म्हणाले, 'जो एक लक्ष यज्ञ करील तो अमरावतीचा इंद्र होईल. या यज्ञासाठी हत्ती, उंट, अनेक मनुष्य व ऋषींची आवश्यकता आहे. शिवाय सर्वप्रकारची यज्ञसामग्रीही पाहिजे. यथासांग हे यज्ञ तुम्ही केल्यास तुम्ही प्रबळ होऊन तुमचे राज्य अढळ होईल आणि देव निर्बळ होऊन त्या सर्वांचे तेज व पुण्य तुम्हास प्राप्त होईल.' या प्रमाणे शुक्राचार्यांनी सांगितल्यावर राक्षसांनी यज्ञासाठी लागणारे साहित्य मिळविले. तरंगजा नदीचे काठी भव्य मंडप घातला. ऋत्विज नेमून अश्वमेधाचे पध्दतीने सुमुहूर्तावर त्यांनी यज्ञ आरंभ केला. वेदमंत्रांच्या घोषांनी, घृत, मेद वगैरे द्रव्यांच्या आहुती त्यांनी यज्ञकुंडात टाकण्यास सुरूवात केली. हा प्रकार नारदास विदीत होताच तो देवेन्द्राकडे गेला व त्याने पाताळात राक्षसांनी आरंभिलेल्या यज्ञाची हकीकत देवेंद्राला संगितली. ती हकिकत ऐकून देवेन्द्र व सर्व देव भयभीत झाले व त्यांनी श्रीहरीची करूणा भाकण्यास आरंभ केला. देवांची प्रार्थना ऐकून भगवान व्दारकाधीश गरूडावर बसून अमरावतीस आले. आपल्या करूणारवाची हाक ऐकून भगवान आले असे पाहून सर्व देवांना आनंद झाला व त्यांनी नारायणास वंदन केले. मग श्रीकृष्णभगवान देवांना म्हणाले- देव हो त्या असुरांची पुण्यसामग्री यज्ञामुळे बरीच वाढली आहे. त्यांच्याबरोबर तुम्ही

युध्द केल्यास तुम्हास जय प्राप्त होणार नाही. यावेळी युक्तिनेच कार्यभाग साधला पाहिजे. बळीचा नाश जसा युक्तीनेच केला त्याप्रमाणे या वेळी मी बुध्द अवतार धारण करून त्यास प्रतिबंध करतो. तुम्ही सर्व मजबरोबर पाताळात चला.'

विष्णुने याप्रमाणे सर्वांना सांगितल्यावर तो आपणाबरोबर सर्व देवांना घेऊन पाताळात तरंगजेच्या काठी आला. तेथे आल्यावर सर्व देव वस्त्रे काढून नग्न झाले. विष्णुने पायांत पुष्पांच्या पादुका घातल्या व गवत किंवा पाणी याला पाय न लावता ते हळूहळू अत्यंत काळजीने पाऊले टाकीत टाकीत चालू लागले. मोरांच्या पिसांचा कुंचा तयार करून त्याने हाती घेतला व पुढील भूमी अगोदर झटकावी व नंतर पाऊल टाकावीत अशाक्रमाने भगवान विष्णू राक्षसांच्या यज्ञमंडपाकडे येऊ लागला. आकाशातील अद्दष्ट रेणु हेही जीव धारण करणारे आहेत तेव्हा त्यांचा शरीरस्पर्शाने नाश होऊ नये म्हणून मोरांच्या पिसांनी त्यांनी आपले शरीरही झाकून घेतले होते बरोबर देवांना शिष्य म्हणून घेतले होते. तेही सर्व हिंसाभयास्तव मोरांची पीसे गुडांळून आले होते याप्रमाणे हा मेळावा मोरांच्या पिसांनी रस्ता झाडीत यज्ञमंडपात आला. तो दिगंबर अवस्थेतील परमहंसाचा मेळा यज्ञमंडपात येताच राक्षसांना मोठे आश्चर्य वाटले. ते त्या दिगंबररूप भगवंतास म्हणाले 'हे परमहंसा, या दर्भासनावर बैस आणि तू कोण आहेस? हा मोरांच्या पिसांचा कुंचा अंगाभोवती कां फिरवीत आहेस. पायात पुष्पांच्या पादुका कां घातल्या आहेत? ते सर्व आम्हास सांग.' तेव्हा भगवान दर्भासनाचा अनादर करून म्हणाले, 'आकाशात अनंत जीव आहेत. ते डोळयास अगोचर आहेत.त्या जीवांची हिंसा होऊ नये म्हणून या जीवजंतुंना या पिसाऱ्याने शरीरापासून मी दूर करतो. तसेच भूमीवरही अनंत सूक्ष्म प्राणी आहेत त्यांचीही प्राणहानी होऊ नये म्हणून पायात मी पुष्पांच्या पादुका घातल्या आहेत.' असे सांगून भगवंताने मोराच्या पिसाऱ्याने जमिन झाडली व तो खाली बसला. नंतर पाणी गाळून घेऊन त्या पाण्याने त्याने आचमन केले व दैत्यांना म्हणाला 'असूर हो, हा तुम्ही कसला होम करीत आहात व याची फलश्रुति काय आहे ते मला सांगा.' तेव्हा दैत्यगुरू शुक्राचार्य म्हणाला 'याला याग असे म्हणतात. वेदांच्या श्रुतीप्रमाणे हा आम्ही करीत आहोत. यात पशूंच्या मासांचे हवन केल्यास ते अन्नदान देवांना पावते आणि मग देवलोकीचे सिंहासन सहज प्राप्त होते.' हे ऐकून भगवंताने आपले डोळे झाकले व दीर्घश्वास सोडून म्हणाला 'अहो हा तर तुम्ही मोठा अनर्थ करीत आहांत. जीवहत्येविषयी नुसते बोलण्याने देखिल नरकप्राप्ती

होते मग प्रत्यक्ष हिंसा केल्याने किती अधःपात होईल? जो प्राणी हिंसा करतो तो सहस्त्र जन्म मासा होऊन त्या अपराधाची फळे भोगतो किंवा पतंग होऊन दिव्यावर पडतो आणि पुनः पुनः त्याला नरकयातना भोगाव्या लागतात. तेव्हा तुम्ही हा याग करून पुण्य जोडावयाच्या ऐवजी पाप मात्र संपादन करीत आहांत कोणाकडून न कळत जरी हिंसा झाली तरी त्याला सुध्दां प्रायश्चित नाही मग जाणून बुजून हिंसा करणारांना तर त्यातून सुटावयाला कांहीच मार्ग नाही असे भयंकर पापकर्म जोडून घेतल्यावर तुम्हाला स्वर्गाचे राज्य मिळणे शक्यच नाही. असो झाले ते झाले. आता तरी हा याग बंद करा आणि पुढे प्राणीहिंसा करूं नका नाहीतर स्वर्गाचे सिंहासन तर प्राप्त होणार नाहीच, पण भयंकर नरकाचे अधिकारी मात्र व्हाल. 'यत्र जिव शीवस्तत्र' असे वचन आहे. तेव्हा सर्व प्राणिमात्र शीवस्वरूप आहेत त्यांचा वध करणे हे निश्चयानेनरकाची साम्रगी आहे. शरीर हे एक कमळ असून त्या कमलामध्ये आत्मा हा दिव्याप्रमाणे आहे. आत्मा हा अविनाशी आहे, हे खरे, परंतु शरीराच्या नाशाने त्यालाही त्रास होतो म्हणून हिंसा करणारास नरकप्राप्त होतो. राक्षस हो, तुम्ही ह्या शुक्राचार्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून हा यज्ञ करीत आहांत परंतु हे भयंकर पाप असून ते या शुक्राचार्याच्या अज्ञानपणामुळे तुम्ही जोडून घेत आहांत. त्यांच्या सांगण्यावरून तुम्ही आपला कुळाचार कुळधर्म सोडून देऊन भलतेच कृत्य करीत आहात. तुम्ही राक्षस महापराक्रमी असता तुम्हास असा यज्ञयाग करण्याची काय आवश्यकता आहे. तुम्ही युध्द कराल तर तेव्हांच स्वर्ग मिळावाल.' भगवंताचे ते बोलणे राक्षसांना खरे वाटले. त्यांनी तो यज्ञ बंद केला व त्या नविन श्रावक धर्माची दीक्षा त्या परमहंसस्वरूपी भगवंताकडून घेतली. त्या श्रावक धर्माचे अहिंसा हे मुख्य तत्व असून त्यांच्या अरिहंत वगैरे चोवीस देवता आहेत आणि त्यांच्या चौदा शाखा आहेत. याप्रमाणे भगवंताने राक्षसांना श्रावक धर्माची दीक्षा देऊन त्या यागसमयी देवावर आलेले संकट निवारण केले. त्या संकटाचे निवारण भगवंतांनी बुध्दिने म्हणजे युध्द वगैरे न करता बुध्दिचातुर्याने केले म्हणून त्या अवतारास बुध्द (ज्ञानी) अवतार म्हणतात. भगवंताचा हा बुध्द अवतार पुराणकाळातील असून द्वापारयुगाच्या अंती व कलियुगाच्या सुरूवातीस अशा या संधीकालात झाला आहे. गौतमबुध्द हा ऐतिहासिक काळातील सुमारे दोन हजार वर्षापूर्वी झालेला असून तो त्याच बुध्द मार्गाचे अनुसरण करणारा महातपस्वी, तेजस्वी सिध्द पुरूष असल्याने अवतारमालिकेत त्याची गणना केली जाते. बुध्दलीला सार संग्रहात बोधीसत्वाच्या कथेत सांगितले आहे की--

हजारो वर्षापूर्वी या जंबुद्विपात अमर नावांच्या संपन्न नगरात सुमेध नावांचा एक कोट्याधीश ब्राह्मण राहत असे. तो जरी थोर कुलामध्ये जन्मला होता तरी आयत्या पीठावर रेषा ओढणाऱ्या आळशी मनुष्याप्रमाणे त्याने आपले तारूण्य व्यर्थ न घालविता, वेद आणि शास्त्रे यामध्ये पारंगतता संपादिली होती. सुमेध ब्राम्हणाला कोणत्याही प्रकारे प्रपंचामध्ये कमतरता नव्हती. वडिलोपार्जित धन दौलतीचा तो उपभोग घेत होता आणि विद्वत्ते संबंधाने सर्व लोकात त्याची ख्याती होती. तथापि जन्म, जरा व्याधि इ. नैसर्गिक दु:खांच्या चिंतनाने संसारामध्ये त्याचे चित्त रमेनासे झाले. 'माझ्या संपत्तीपैकी माझ्या बरोबर येणारे काय आहे ?' माझी कीर्ति माझ्या बरोबर येईल काय? इ. विचारांनी सुमेधाच्या मनामध्ये काहूर माजवून दिले. तेव्हा तो आपणाशीच उद्गाराला-- 'या अत्यंत दु:ख कारक प्रपंचापासून मुक्त अशी एक सुखकारक अवस्था असलीच पाहिजे की ज्या स्थीतीप्रत गेला असता प्राणी जन्म, जरा, व्याधी आणि मरण या पासून मुक्त होईल.' या प्रमाणे विचार करून सुमेधाने मुक्तीचा मार्ग शोधण्याचा निश्चय केला त्या काळच्या वहिवाटी प्रमाणे सुमेधाने आपली सर्व मालमत्ता याचकांना वाटून दिली व तो हिमालय पर्वतावर निघून गेला. तेथे धम्मक नावाच्या एका टेकडीवर त्याने आपली पर्णशाळा बांधून त्या पणेशाळेजवळ एक सुंदर चक्रम केला. या ठिकाणी काही काळ घालविल्यावर सुमेध तापसाचे वैराग्य इतके तिव्र झाले की त्याला या पर्णकुटिकेचा सुध्दा कंटाळा आला. तो त्या पर्णकुटिकेचा सुध्दा त्याग करून एका झाडाखाली राहू लागला व कंदमुळ फलादिकांच्या आहारावर उपजीविका करू लागला. त्याने खडतर तपश्चर्या आरंभिली. वैराग्याच्या आणि अभ्यासाच्या जोरावर सुमेध पंडिताने योगाच्या सर्व पायऱ्या आक्रमण केल्या. तो समाधी सुखामध्ये निमग्न होऊन गेला.

त्या समयी जंबुद्विपामध्ये दीपंकर नावाचा बुध्द उत्पन्न झाला. तो जिकडे तिकडे आपल्या धर्माचा प्रसार करू लागला. ध्यानसुखामध्ये गढून गेल्यामुळे सुमेधाला हिमालय पर्वतावर दीपंकर बुध्दाच्या धर्माची वार्तादेखिल ऐकू आली नाही. एके दिवशी योगबलाने आकाशातून संचार करीत असतां हिमालयाच्या पायथ्याशी असलेल्या नगरामधील लोक अत्यंत उत्सुकतेने जिकडे तिकडे रस्ते साफ करीत असलेले त्याने पाहिले. तेव्हा त्याला मोठे कौतुक वाटून तो आकाशातून खाली उतरला आणि एवढी तयारी कशासाठी चालविली आहे याची त्याने चौकशी केली. त्या लोकांपैकी एकजण म्हणाला, 'वा:! तापस महाराज तुम्ही या प्रदेशात रहात असून दीपंकर बुध्दाची तुम्हाला माहिती

नसावी हे मोठे आश्चर्य होय. दीपंकर बुध्द आपल्या भीक्षुवर्गासह आमच्या शहराच्या नजिक येऊन ठेपले आहेत व आज दुपारी भीक्षाग्रहण करण्यासाठी ते या शहरात येणार आहेत. त्यांचा बहुमान करण्यासाठी ही सर्व तयारी चालली आहे.' हे ऐकुन सुमेध म्हणाला,- 'या जगतामध्ये बुध्द हा शब्द देखील ऐकू येणे कठिण आहे. मग प्रत्यक्ष बुध्दाचे दर्शन होणे किती कठिण आहे हे सांगायलाच नको. जन हो तुम्ही हा जो रस्ता साफ करीत आहात त्यापैकी कांही भाग माझ्या स्वाधीन करा मी ही बुध्दाच्या सेवेचा वाटेकरी होऊ इच्छितो.' तेव्हा त्या लोकांनी साफ करण्यासाठी कांही जागा सुमेधाला नेमून दिली.

सुमेधाला नेमून दिलेली सर्व जागा परिशुध्द झाली होती. परंतु रस्त्यावर एका लहानशा डबक्यामध्यें चिखल साचला होता. ते डबके भरून काढण्यात सुमेध तापस गुंतला असतांनाच भगवान दीपंकरबुध्द त्या ठिकाणी आपल्या भिक्षुसंघासहवर्तमान उपवनातून येते झाले. आता ते डबके भरून काढण्यास मुळीच अवकाश राहिला नाही. तेव्हा सुमेध बुध्दांच्या पायाला चिंखल लागू नये या उद्देशाने त्या डबक्यावर पालथा पडला. इतक्यात दीपंकर त्याच्या डोक्याजवळ येऊन उभे राहिले आणि आपल्या भिक्षुसंघाकडे वळून म्हणाले, 'भिक्षुहो, येथे पालथा पडलेल्या या तापसाला तुम्ही पाहात आहांत काय? हजारो वर्षानंतर कपिलवस्तु नगरीत शुध्दोधन राजाच्या मायादेवी नांवाच्या राणीच्या उदरी जन्म घेऊन मोठ्या प्रयत्नाने बुध्दत्व संपादून हा लक्षावधि लोकांचा उध्दार करणार आहे. मोग्गलायन व सारिपुत्र हे दोघे त्याचे अग्रशिष्य होतील आणि त्याच्या भिक्षुणी संघात खेमा व उप्पलवण्णा या दोन भिक्षूणी मुख्य होतील.' हे बुध्द वाक्य ऐकून तेथे जमलेल्या मनुष्यांना आणि देवतांना अत्यंत आनंद झाला.

दीपंकर बुध्द कांही अंतरावर गेल्यावर सुमेध तापस उठून मांडीवर मांडी घालून बसला व आपणाशीच म्हणाला, 'भगवान बुध्दांनी भविष्यत्काळी मी बुध्द होणार असे भविष्य कथन केले आहे. तथापि बुध्दत्व हे सामान्य मनुष्याला साध्य होण्यासारखे नाही. अनेक जन्मामध्यें लोकहितासाठी परावधीचा प्रयत्न केला तरच बुध्दत्व प्राप्त होईल. परंतु आत्मपरहित साधणारे परमोत्कृष्ट असे कोणते गुण असावे बरे.' सुक्ष्म विचाराअंति सुमेध पंडिताला सर्व लोकहितकारक असे खाली दिलेले दहा गुण पारमिता आढळले.

१) दान, २) शील ३) नैष्कर्म्य, ४) प्रज्ञा ५) वीर्य,
६) शांति, ७) सत्य, ८) अधिष्ठान, ९) मैत्री, १०) उपेक्षा

सुमेध म्हणाला, 'मला जर बुध्दत्व प्राप्त व्हावयाचे आहे तर मी या दहा पारमितांचा अभ्यास केला पाहिजे. पण तो एका जन्मात साध्य होईल काय? नाही, अनेक जन्माच्या अभ्यासानेच या दहा पारमिता मला साध्य होतील. परंतु इतर लाभापेक्षा बुध्दत्वच मला प्रिय असल्यामुळे यापुढे मी प्रतिजन्मी पारमितांचाच अभ्यास करीन. सुमेध तापसाने ज्यावेळी बुध्दत्व संपादण्याचा दृढ निश्चय केला. त्यावेळेपासून त्याला बुध्द अथवा बोधिसत्व ही संज्ञा प्राप्त झाली. अशाप्रकारे दहा पारमितांचा अभ्यास करीत असता शेवटचा अवतार म्हणजे गौतम बुध्द होय आणि त्याचा प्रथम अवतार म्हणजे पौराणिक बुध्द म्हणून पांडवांच्या यज्ञद्वारी ज्या भगवंताने बुध्द स्वरूप धारण केले व पांडवांना दिव्यज्ञानाचा उपदेश केला तो प्रथम बुध्द अवतार होय. भगवान श्रीकृष्णानेच हे स्वरूप धारण करून अवतार पात्राची व कार्याची पूर्तता केलेली आहे.

असदेवेदमित्यादाविदमेव श्रुतं ततः ज्ञान ज्ञेयाऽऽत्मकं सर्वं जगद्भ्रांति प्रकल्पितम्।

भगवान श्रीहरीच्या नवव्या बुध्द अवताराचे वर्णन परमपूज्य सद्गुरू इमामशाह महाराज सद्भक्तांना सांगत आहेत कीं, हे मुनिवर गण हो! तुम्ही एकाग्र चित्ताने श्रवण करा. बुध्द अवताराचे स्वरूप दिसायला अगदी कुरुप असे होते. तोंड पक्षाच्या चोचीसारखे विद्रूप, हातपाय वाकडे झालेले, मलीन वस्त्र परिधान केलेले बटबटीत डोळयाचे, कुबड निघालेले असे ते अष्टवक्र स्वरूप पाहून कोणालाही त्या विषयी घृणाच उत्पन्न होईल अशा प्रकारच्या त्या विद्रूपतेत आणखी भर म्हणजे त्याच्या सर्वांगातून दुर्गंधी रक्तपूवाचा प्रवाह वाहत आहे असे ते मलीनरूप, हातात पलाशदंड घेऊन तोही कसाबसा टेकीत टेकीत व त्यावर आपल्या अमंगल देहाचा कसातरी भार सहन करीत करीत ते पांडवांच्या यज्ञद्वारी येऊन उभे राहिले. ते विकट स्वरूप पाहून कोणीही त्याच्याजवळ उभे राहू शकणार नाही अशा प्रकारचे ते स्वरूप होते. भगवंताने सद्भक्त पांडवांच्या उध्दाराचा उज्वल हेतु मनात धारण करून हे बुध्द रूप प्रकाशित केलेले होते. आपल्या बुध्दिबळाचा अवलंब करून पांडवांना संसारासक्तीतून मुक्त करायचे होते. म्हणून त्यांनी उभारलेला मोठा यज्ञयाग बंद करावा व खऱ्या मुक्तिमार्गाचा त्यांना उपदेश करण्यासाठी ते आलेले होते.

महाभारत युध्द संपल्यानंतर व अश्वमेध यज्ञ संपल्यानंतर भगवान श्रीकृष्ण निजधामाला गेले. वेदमूर्ति व्यास आदि सर्व ऋषीमुनि कलीप्रभावामुळे गुप्त होऊन गेले. अश्वमेध असफळ झाल्यामुळे आता पुढे काय करावे असा प्रश्न धर्मराजापुढे उपस्थित झाला. त्यामुळे मधून मधून भीष्म, द्रोण व कर्ण वगैरेची आठवण होऊन, विनाकारण त्यांना आपण मारून पापाचे भागिदार झालो असे वाटे. एकदा धर्मराजा अर्जुनाला म्हणाला, 'पार्था मला त्रैलोक्याचेही राज्य नको आहे मग या एका लोकाची कथा काय? मी आता अरण्यात जाऊन राहीन अथवा तीर्थयात्रा करून बांधवांच्या वधाच्या पापाबद्दल पायश्चित करीन. पूर्वजापासून परंपरेने आलेले हे राज्य मी तुला देतो. तू आता या आपल्या पृथ्वीचा सांभाळ कर. बांधवांच्या रक्ताने माखलेली ही भूमी मला नको. मी आपल्या आत्म्याचे सार्थक करणार.' इतके बोलून धर्मराजा स्तब्ध बसला. तेव्हा अर्जुन म्हणाला, 'हे धर्मराजा! त्वां राज्याचा असा त्याग केला असता लोक तुझी निंदा करतील. राज्य त्यागिल्यास तुला दरिद्री, पतित अधर्मी समजून तुझ्याशी कोणी संसर्ग करणार नाहीत. अरे राज्याच्या योगानेच धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चारही पुरुषार्थ साध्य होतात. द्रव्य नाही तर प्राणी अमंगल होय, असे जाणून मोठमोठ्यांनीही राज्याचा स्विकार केला. दिलीप, अंबरीष, मांधाता, हरिश्चन्द्र इ. अनेक महात्म्यांनी राज्य केले आहे. यास्तव राज्यत्यागाचा विचार तू सोडून दे.' अर्जुनाप्रमाणेच भीमाचेही मत पडले. तो म्हणाला, – 'राज्यहिन क्षत्रीयाला अमंगल म्हणतात. हे धर्मा राज्याचा त्याग केलास तर तू इहपर अशा लोकास अंतरशील. ब्राह्मणादिवर्णांना सर्व आश्रमात गृहस्थाश्रम उत्तम होय. त्याच्या योगाने दोन्ही लोकांची प्राप्ती होते. त्याच्यावाचून सर्व व्यर्थ आहे.' भीमानंतर नकुल सहदेवही धर्माला प्रेमाने म्हणाले – ' ज्येष्ठबंधो, राज्य करूनच कीर्ती मिळेल. चारी पुरुषार्थही राज्यानेच साधतात यास्तव राज्याचा स्विकारच योग्य होय.' द्रौपदी म्हणाली, 'पतिराज, आपण वनात असतांना नेहमी म्हणत असत की युध्द करून राज्य प्राप्त झाल्यावर मी यज्ञयाग दानधर्म करीन. सर्व विषयांचा यथेच्छ उपभोग घेईन. सोयऱ्यांचे प्रतिपालन करीन. ते सर्व विचार आता व्यर्थ गेले काय? एकदा जनक राजाने राज्य टाकून भिक्षावृत्ती स्विकारली तेव्हा त्याच्या स्त्रिया त्याला म्हणाल्या, ''महाराज, आपण राज्य, स्त्रिया व पुत्र यांना सोडून भिक्षा मागू लागला तर यात काय पुरुषार्थ जोडलात? गृहस्थाश्रमात राहिल्याने चारही आश्रमाची सार्थकता होते. भिकाऱ्याच्या हातून कृमिकिटकांनां तरी अन्न मिळेल काय? हे ऐकून धर्म म्हणाला, 'राज्योपभोगाने कर्माची गति व जन्ममरणाने सुख दुःख ही का टळणार आहेत? सर्वसंगपरित्याग

करून अरण्यात योगाभ्यास केल्यास अंत:करण निर्मळ होऊन आत्मप्राप्ति होते व आत्मप्राप्तीत संसारापासून पूर्ण निवृत्ति होते म्हणूनतर विषयाचा त्याग करून बुद्धिवान लोक वनाचा आश्रय करतात.' धर्माचे वचन ऐकून सभेस बसलेले मान्यवर ब्राह्मण पंडित म्हणाले, 'युधिष्ठिरा, इंद्रपद म्हणतात ते कांही यज्ञाहून निराळे नाही सायुज्यादि मुक्तीही यज्ञावाचून प्राप्त होत नाही असे असून यज्ञ तर राजदंड धारण करणाऱ्या गृहस्थाश्रम्यालाच साध्य आहे. तस्मात महाराज, आपण राजदंडाचा अथवा गृहस्थाश्रमाचा त्याग न करता यज्ञ करा म्हणजे तुमच्या हातून घडलेल्या दोषांचे परिमार्जन होऊन तुमच्या चित्तास शांति लाभेल.' (श्लोक १-१४)

ब्राह्मण पंडितांनी धर्म राजाला सांगितले - 'महाराज आपला श्रुतिधर्म आपल्याला स्पष्ट रितीने सांगत आहे कीं, आपलाइष्ट हेतू परिपूर्ण होण्यासाठी शुध्द भाव निर्मल चित्त व शुचिर्भूततेने युक्त यथासांग यज्ञ होमहवन याग करावा. संपूर्ण यज्ञ कर्माचे ज्ञाते विद्वान ब्राह्मणांना पूजाअर्चा करून त्यांना मन इच्छित पंचपक्वान्नाचे भोजन द्यावे. प्रत्येकास सुवर्णपात्रात भोजन देऊन ते पात्र दक्षिणेसह दान करावे. रत्न माणिक्य मोती, सुवर्ण वगैरेच्या रूपाने मनइच्छित दक्षिणा देऊन त्यांना संतुष्ट करावे, वस्त्र अलंकार भूषणे वगैरे दान करून ब्राह्मणास प्रसन्न केल्यास त्यांच्या अंतरात्म्यापासून मिळालेल्या आशिर्वादाने व पुण्यलाभाने तुमचा सर्वकर्मदोष व कुळगोत्रहत्येचे पातक निवारण होईल.' राजा युधिष्ठिराच्या मनात कुळगोत्रहत्येची गोष्ट काटद्याप्रमाणे बोचत होती, व तो कर्मविपाक दूर व्हावा यासाठी आतूर झालेला होता. पंडितांचे वचन शिरोधार्य मानून त्याने ताबडतोब यज्ञकार्याची उभारणी केली. भीमाला सर्वत्र पाठवून ब्राह्मणांना निमंत्रणे पाठवून यज्ञकार्यार्थ बोलावून आणले. घरोघर उत्सव मंगल गायन सुरु झाले. धर्मराजाचे मन अतिशय हळवे व कनवाळू असल्याने क्षणोक्षणी त्याच्या चित्ताव प्राणिमात्राविषयी दया प्रेमभाव उत्पन्न होई व मृतात्म्यांचे गुण आठवून शोकातूर होई. त्याची ही अवस्था पाहून सहदेव त्याला म्हणला - 'दादा यज्ञकार्यासारखे मंगल कार्य करीत असता तूं असा शोकातूर व चिंतातूर कां होतोस? मन शुध्द करून विकाररहित करून दृढ श्रध्दा भावाने केलेले कोणतेही कार्य सफल होते. यासाठी शोक व मोह टाक आणि दृढधैर्याने उभारलेले कार्य तडीस ने.' लहान भावाचे वचन ऐकून धर्मराजा आनंदला. त्याने अवभृत स्नान करून यज्ञवेदीजवळ भद्रासन मांडून आपल्या सर्व बंधुसह, सती द्रौपदीसह यज्ञकार्यास सिध्द झाला. भीमाने सर्वत्र फिरून चारही वेदांचे ब्राह्मण - ऋत्वीज बोलाविले. ब्राह्मण आले पण त्यात

बरेचसे क्रियाचारहीन अशुध्द वृत्तीचे व अल्पज्ञ होते. कलियुगाचा प्रहर सुरु झाल्याने काळमहिमा जाणून धर्माने तिकडे विशेष लक्ष दिले नाही. यज्ञ सुरु झाला. धर्मराजाने ब्राह्मणांना संतुष्ट करण्यासाठी त्यांच्या मनइच्छेप्रमाणे सुवर्णपात्रात पक्वांनांचे जेवण देऊन मनइच्छित दक्षिणा वस्त्र अलंकार व सुवर्णमुद्रिका नित्य देण्याचा क्रम सुरु केला. अन्नपाण्याचा तर तेथे प्रवाहच वाहात होता. धर्मराजाने भीमास आज्ञा केली की 'कोणीही अतिथी भिक्षुक गोरगरीब दरिद्री अपंग आला तरी त्याला ज्या वस्तूंची गरज असेल ते त्यांना देऊन संतुष्ट करावे कोणालाही विन्मुख पाठवू नको. आपल्या द्वारातून एक जरी अतिथी भिक्षुक अथवा प्राणी विन्मुख गेला तरी यज्ञाचे श्रेय मिळणार नाही. यासाठी काळजीपूर्वक लक्ष देऊन त्यांची सेवा पूजा व देखभाल कर.' (श्लोक १५-२८)

धर्मराजाने भीमास तशी सुचना देताच ब्राह्मण पंडित धर्मराजास म्हणाले - 'धर्मराजा तू खरोखर धर्माचा अवतार आहेस. तुझ्या ब्रीदाप्रमाणे तू वागशील यात तिळमात्र शंका नाही. कोणीही अतिथी भिक्षुक भिकाऱ्यांना अन्न, वस्त्र, द्रव्य दान करून सर्वांना तू संतुष्ट कर पण तुझा हा यज्ञ भंग करण्यासाठी एक चांडाळ येईल असे आमचे भविष्य सांगत आहे. त्या चांडाळास मात्र मध्ये येऊ द्यायचे नाही. तो जर आत यज्ञवेदीजवळ आला तर यज्ञभंग होईल व तुझा हा एवढा मोठा समारंभ - पापनिवृत्तीचा खटाटोप व्यर्थ जाईल. आतापर्यंत खर्च केलेल्या द्रव्याचे श्रेय मिळणार नाही. त्यासाठी उत्तम आणि हुशार बलवान असा द्वारपाल नेमून यज्ञाचे रक्षण करावे. पंडितांच्या वचनाला भुलून धर्म राजाने भीमाला बोलावून सर्व हकिकत सांगितली व 'कोणीही भलाबुरा अतिथी भिक्षुक येईल त्याला उत्तम प्रकारे शोधूनच आत सोड. कोणी एखादा नास्तिक, चांडाळ संशयास्पद तुला वाटल्यास त्याची परस्पर बाहेरूनच बोळवण कर. अशा प्रकारे भीमाला सुचवून द्वाररक्षक नेमले व मग पंडित स्वस्थ चित्ताने मोठमोठ्याने वेदमंत्रघोष करून यज्ञ करू लागले. बाहेर जमलेल्या अतिथी भिक्षुकांना अन्नदान, वस्त्रदान, द्रव्यदान, भूमीदान, गोदान वगैरे करीत असता भीम प्रत्येक व्यक्तिकडे चौकस दृष्टीने पाहून जशी ज्याला आवश्यकता असेल ते त्याला देऊन संतुष्ट करीत असता एकाएकी भीमाची नजर एका ओंगळ घाणेरड्या भिक्षुकाकडे गेली. त्याचे हातपाय वाकडेतिकडे झालेले चोचीसारखे मुख, अंगातून दुर्गंधियुक्त रक्तप्रवाह वहात आहे अशाप्रकारचे ते विकट स्वरूप पाहून भीम स्तंभीत झाला. हातात दंड घेतलेल्या त्या अष्टावक्र कुरुप ध्यानाकडे कुतुहलाने पाहात असलेल्या

भीमास आश्चर्य वाटत होते की जरी त्याचा देह कुरुप होता, दुर्गंध युक्त होता तरी त्याच्या मुखावर असे काही विलक्षण तेज पसरलेले होते की भीमाने त्याच्याकडे पाहवले जात नव्हते. त्याच्या डोळ्यात ब्रह्मज्ञानाची जी अपरिमित चमक होती ती अवर्णनीय होती. तो मुखातून अस्पष्ट व संदिग्ध असा कांहीतरी उच्चारकरीत होता ते लक्षपूर्वक ऐकून भीम मनात त्या शब्दांची जुळवणी करून तो काय म्हणत असावा याचा अंदाज करीत होता. तो म्हणत होता 'काळाचा महिमा अगाध आहे. काळपुरुषाची क्रिडा अखंड अव्याहत चालू आहे.कालचक्र सतत फिरत आहे. त्याने श्रीकृष्णासारख्या अपरिमित ज्ञानी महात्म्यास सुध्दा ग्रासण्यास कमी केले नाही तेथे आपल्यासारख्या हीनदीन दुर्बलांची काय कथा. आणि आता तर साक्षात् कलिकालच प्रगट झालेला आहे. या कलिकाळाच्या घोर संधीत ब्राह्मण सुध्दां आपले कर्तव्य आणि क्रियाचरण विसरून गेलेले आहेत. अवतारपात्राची सुध्दां त्यांना शुध्द राहिली नाही. ईश्वराच्या अवताराची सुध्दा ते घोर अवहेलना करायला लागले आहेत हे पाहून मनाला विषण्णता वाटते.' त्याच्या मुखातले हे शब्द ऐकून भीम त्यास म्हणाला, --( श्लोक २९-४५ )

भीम म्हणाला - 'हे अतिथी अभ्यागता, कोणालाही जाणता अजाणता दोष देणे योग्य नाही. जो शुध्द निर्मल सत्य व पवित्र क्रियाचरण करतो तो खरा धर्मी होय. तुझ्या शरीरात असा कोणता जीवात्मा बसलेला आहे की तो या विकृत देहात सुख मानून रमलेला आहे. तुझ्या देहाची अशी अवस्था होण्याचे कारण तरी काय असावे? असे कोणते दोषयुक्त पापकर्म तुझ्या हातून घडले असावे कीं त्यायोगे तुला अशा विकृत देहाची प्राप्ति झाली! तुला अशा दुर्गंधीयुक्त देहात राहावेसे तरी कसे वाटते!' बुध्द म्हणाला, 'भीमा, तुला माझ्या शरीराशी कर्तव्य काय आहे? अरे देह उत्तम किंवा वाईट मिळणे हे कांही कोणाच्या हातचे आहे काय? आपण आपल्या चांगल्या सुदृढ देहाचा कीतीही अहंकार बाळगला तरी त्यात कोणत्याकाळी काय विकृती होईल हे कांही सांगता येते कां? म्हणून माझ्या शरीराच्या विकृतिकडे न पाहता तू आपल्या अतीथीसत्काराचे कर्तव्य कर्म कर. मी फार भुकेलेला आहे. कित्येक दिवसापासून मी उपवाशी आहे. युधिष्ठिराने मोठा यज्ञसमारंभ उभारला असून तो सर्वांना तृप्त करून सर्वांची मनोकामना पूर्ण करतो असे मी ऐकले म्हणून मोठी आशा करून येथे आलेलो आहे. भीमा, मी एक दुर्बल प्राणी आहे. थोडेसे जे कांही मिळेल त्या अन्नाने पोट भरावे व धर्मनिष्ठ अशा पुण्यापावन धर्म राजाचे दर्शन घेऊन डोळ्यांचे सार्थक करावे आणि यज्ञाठिकाणी चाललेला मंत्र घोष ऐकून

श्रवणेन्द्रियांची तृप्ति करावी व या सर्वांच्या योगे या मानव देहाचे सार्थक करावे व त्याचा हा दोष धुवावा हा माझा उद्देश आहे. म्हणून भीमा तू मला आज धर्मराजाजवळ जाऊ दे! मागच्या अनंत जन्मांचा जो काही पुण्यांश वाचला असेल तो आज मला प्राप्त झाला म्हणून या यज्ञात येण्याचे कर्म माझ्याकडून घडले, नाहीतर आणखी कित्येक दिवस या दुर्गंधी खोपडीतच खिचपत पडावे लागले असते.' असे म्हणत तो आत जाऊ लागला. भीमाला त्या विकट स्वरूपाकडे पाहताच आधीच घृणा आलेली होती. आता तर तो धर्मराजाजवळ जाण्याची भाषा करीत आहे व जातही आहे हे पाहून भीम चिडला. तो म्हणाला, 'अरे चांडाळा, मी या यज्ञमंडपाच्या द्वारी द्वारपाल म्हणून जो बसला आहे ते उगीच काय? तू चांडाल आहेस तुला यज्ञवेदीजवळ बसलेल्या धर्मराजाजवळ जाता येणार नाही. आणि आता भोजनवेळ निघून गेलेली असल्याने अतिथी अभ्यागतांच्या पंक्तित सुध्दा तुला बसता येणार नाही. तुला काय वस्तू पाहिजे असेल अन्न, वस्त्र, सुवर्ण, गाय, हत्ती घोडा, वाहन, घर, शेतजमीन वगैरे जे काही पाहिजे असेल ते माग म्हणजे तुला मी देतो. ते घेऊन तू ताबडतोब मुकाट्याने येथून चालता हो. येथे एक क्षणभर देखील थांबू नकोस. तुझी जी इच्छा असेल ते मला सांग म्हणजे ताबडतोब ती मी पूर्ण करीन.' बुध्द म्हणाला, 'शाबास भीमा, तू अतिथी सत्कार तर चांगला करतोस आणि म्हणूनच तुला मुद्दाम या कामासाठी धर्मराजाने नेमलेले आहे. अरे बाबा, तू माझ्यावर रागावू नकोस. तुला घृणा व क्रोध येणे साहजिकच आहे. पण हा तुझा दोष नाही अथवा माझा अपराध नाही. हा केवळ या गलित देहाचा प्रताप आहे. भीमा हा देह दुर्बल आहे. मला तुझ्या अन्नाची, वस्त्राची, हत्तीघोडे, सुवर्णरथाची, घरदार, जमीन वगैरेची कशाचीही गरज नाही. माझा देह अन्नाच्या अभावी भुकेला असेल पण मला त्याची गरज नाही मला फक्त धर्मराजाचे दर्शन घ्यायचे आहे. भीमा तुला या माझ्या देहाचा तिरस्कार वाटत असेल पण तोच तुझा संदेह फेडण्यासाठी, तुझ्या शंकाकुशंकांचे निरसन करून समाधान करण्यासाठी मी आलेलो आहे. मी ऐकलेले आहे की धर्मराज हा सत्यवादी सत्वशील आहे. तो साऱ्यांची मनोकामना पूर्ण करतो. कोणालाही विन्मुख पाठवत नाही, कोणीही अतीथी अभ्यागत आल्यास त्याची उत्तमप्रकारे सेवा पूजा करून, दर्शन घेऊन संतुष्ट करतो असा त्याचा कीर्तिरव मी ऐकलेला आहे. पण इथे तर बाबा तुझी सत्ता दिसते. मला याची मुळीच कल्पना नव्हती, नाहीतर मी आलोच नसतो. धर्मराजाचे दर्शन घ्यावे याच एकमेव शुभहेतुने आलो होतो. पण तू मला मध्येच अडविले. तू हाकून लावशील तर

परत जाईन पण माझ्या मनातली इच्छा वासना तशीच राहून जाईल आणि ती पूर्ण होण्याकरिता आणखी कोणते खडतर जन्म घेऊन खस्ता खाव्या लागतील. याचा नियम नाही.या सर्व गोष्टीस कारण म्हणजे तूच. याकरितां मुकाट्याने मला आत जाऊं दे. अडवू नको.' अशा प्रकारे बुध्दाने भीमास बऱ्याच उपायाने समजाविले पण भीम ऐकेना. त्याला त्याचे ओंगळ किळसवाणे स्वरूप पाहावत नव्हते. हे कुरुप ध्यान शक्य तेवढ्या लवकर येथून निघून जाईल तेवढे बरे याकरिता भीम त्याला खडसावू लागला. (श्लोक ४६-६१)

भीम म्हणाला, - 'अरे चांडाळा तुला आंत यज्ञामध्ये जाता येणार नाही. मी तुला आत जाऊ देणार नाही. धर्मराजा पवित्र आणि शुचिर्भूत होऊन यज्ञास बसलेला आहे. सर्व ब्राह्मण निर्मल शुध्द पवित्र होऊन वेदोक्त मंत्र तंत्रोपायाने युक्त यज्ञविधी यथाशास्त्र सांगत आहे. तेथे तुझ्यासारख्या या कुरुप अशुध्द अमंगल चांडाळाचे तोंडतरी कोणी पाहिल कां? 'बुध्द म्हणाला, 'अरे भीमा तुझी काहीतरी भूल होत आहे. चांडाळ म्हणून आज तू माझी अवहेलना करीत आहेस पण खरे चांडाळ कोण हे जर तुला सांगितले तर तुझ्या आश्चर्यास पारावार राहणार नाही. आज तुझा यज्ञ करणारे जे ब्राह्मण आहेत ते तर मला अशुध्दच दिसत आहेत. पावित्र्य, सत्य आणि आदर्श तत्व असल्याशिवाय कोणतेही कार्य पूर्णपणे सिध्दीस जात नाही. आज तुझ्या या यज्ञास आलेले सगळे ब्राह्मण निस्वार्थबुध्दीने कार्य करीत आहेत काय? निष्काम बुध्दि ठेवून केलेली कोणतेही कार्य सहज सफल होत असतात. या तुमच्या यज्ञात निष्काम कर्माचा कांही तरी अंशभूत भाग आहे कां? पापनिवृत्ति करीता करीत असलेल्या या यज्ञांनी तुमचा कर्मविपाक नाहीसा होईल कां? हा जो ब्राह्मण वर्ग येथे जमलेला आहे त्यांच्यापैकी एकतरी ब्राह्मण परमेश्वराच्या नवव्या बुध्द अवताराचा उपासक वा उपदेशक आहे कां? निदान बुध्द हा ईश्वरी अवतार आहे एवढी तरी बुध्द अवतारावर त्यांची श्रध्दाभक्ति आहे काय? अरे भीमा आणखी तुला काय सांगावे पण हे ब्राह्मण चौथ्या अथर्ववेदाला पूज्य मानतात काय? निदान अथर्ववेदाचे तत्व काय आहे हे तरी त्यांना समजले आहे काय? भीमा आंत जाऊन तू ब्राह्मणांना या साऱ्या गोष्टी विचारून आधी आपल्या मनाची खात्री करून घे आणि खरोखरच तुला यात सत्य, पावित्र्य आणि आदर्शता दिसली तर यज्ञ केल्याचे श्रेय तुम्हाला प्राप्त होईल. आपल्या स्वत:च्या स्वार्थाकरीता शास्त्र वचनात ढवळाढवळ करून आपल्यास अनुकुल असा त्याचा वापर करून घेणे व मोक्ष मुक्तीची कोणतीही

शुध्द न गणता ऐहिक आणि लौकिक सुखाकरिता झटणे हेच केवळ कर्तव्य मानणारे ब्राह्मण हा तुझा यज्ञ करण्यास तत्पर झालेले आहेत. केवळ स्वार्थाकरिता आणि स्वत:च्या उपजिविकेकरीतां उभारलेल्या या तुमच्या यज्ञात कांही तथ्य नाही, कारण येथे केवळ शुष्क वेदमंत्राचा पाठ होत आहे. ज्या विधीचा महिमा निघून गेलेला आहे असा अनावश्यक कर्माचा भार तुमच्या शिरावर लादून उभारलेले हे तुमचे यज्ञकर्म केवळ निष्फळ आहे. जे नारायणाच्या अवतारपात्रातच भेद मानतात, द्वैत मानतात, त्यांच्या चित्तात इतर प्राणिमात्राविषयी अभेदद्दष्टी असणेच शक्य नाही. मग वेदान्ताचे तत्वज्ञान लोकांना दाखवून उपदेशून काय अर्थ? या ब्राह्मणवर्गातून कालप्रभावाने ब्रह्मतत्वच निघून केलेले आहे. ते नाममात्र ब्राह्मण राहिले आहे. केवळ शुष्कवेदान्त ज्ञानचर्चेने अद्वैताची प्राप्ती होत नाही व या अभावी सम्यक् दर्शन मुळीच होणार नाही. जोपर्यंत सम्यक्‌दर्शन नाही तोपर्यंत जीवात्म्याचे जन्ममरणाचे फेरे मिटत नाही व जीवात्मा सद्‌गतीस मोक्षगतीस जाऊच शकत नाही. आता यापुढे केवळ वंशपरंपरेने ब्राह्मण वर्ग सुरु राहील. त्यांच्यात वेदमंत्र अथवा वेदान्त ज्ञानमार्ग यांचा अभाव राहील. स्वार्थाकरिता ते निरनिराळे व्यवसाय करायला लागतील. अत्यंत नीचकर्म करतांना सुध्दां त्यांना लाजलज्जा मुळीच वाटणार नाही. ते महालंपट, कपटी, निर्लज्ज, चांडाळ होतील. तीर्थक्षेत्रावर धार्मिक भोळ्या भाविक जनतेला लुबाडून लोभ व स्वार्थ साधतील. लोक सुध्दां तशा क्षेत्रावर जाऊन केवळ पाणी आणि पाषाणाचीच पूजा बांधतील. तीर्थक्षेत्राचे महात्म्य पूजाअर्चेचा विधी व तीर्थयात्रेची फलश्रुति वगैरे महत्वाच्या गोष्टीकडे पूर्णदुर्लक्ष करतील. केवळ यात्रेच्या थोतांडाला प्राधान्य येईल. हे भीमा या ब्राह्मणांनी तुमचा हा यज्ञ केवळ स्वार्थाकरितां, जिव्हालौल्याकरितां उभारलेला असून यात सत्यधर्माला तिलांजली देऊन केवळ स्वार्थ व लोभ साधलेला आहे. (श्लोक ६२-७९)

भीम म्हणाला, 'अरे चांडाळ, आमच्या यज्ञाची आणि तो करणाऱ्या ऋत्वीजांची निंदा करणारा असा तू कोण एवढा वेदवेत्ता ब्रह्मदेव लागून गेला आहेस. एवढे आचारवंत ब्राह्मण क्षत्रीय मोठमोठे महर्षि राजर्षि या यज्ञमंडपात उपस्थित असतांना व सर्वजण मंत्रघोष-यज्ञविधी सथासांग करीत असतांना, त्यांना कांहीही शंका कुशंका नसतांना तुलाच कसे त्यांचे व्यंग समजते. आचारवंत अशा ब्राह्मण क्षत्रीयांना तूं चांडाळ म्हणून संबोधत आहेस ते मला सहन होणार नाही. तुला आताच्या आता येथून हाकून द्यायला हवे आहे. मला असे वाटते, ब्राह्मणांनी सांगितलेला चांडाळ तो तूच असावास. तुला यज्ञात जाऊ दिले तर विनाकारण वाद उपस्थित करून

तूं यज्ञभंग करशील. याकरितां तुला मध्ये मी जाऊ देणार नाही. तेथे उत्तम आचारवंत ब्राह्मण उपस्थित आहेत ते तुज चांडाळाचे मुख सुध्दां पाहणार नाही. ते ऐकून बुध्द म्हणाला, 'भीमा, शांत हो, विकारांच्या आहारी जाऊ नकोस. मी दोन शब्द तुला सांगतो ते नीट शांतपणे ऐकून घे. भीमा, आपला सनातन धर्म सत्यरूप अधिष्ठानावर स्थित असून वेद प्रामाण्य हा त्याचा मुख्य आधार आहे. सत् तत्व पालनाशिवाय कोणी पवित्र शुध्द होत नाही. दान, दया, तपश्चर्या आणि शुचिर्भूतता असल्याशिवाय कोणतेही शुभकार्य सिध्दीप्रद होत नाही. कर्तव्यपालनाबरोबर ब्रह्मज्ञान संपादन व पालन करावयास हवे आहे. आज आपला हा उच्चवर्ग त्रिकाळ संध्या करतो,कित्त्येक करीतही नाही पण चौथी संध्या जी मुक्तीची आहे. तिचे पालन मात्र होत नाही. जीवात्म्याला जन्ममरणाच्याच खाड्यात अडकवून टाकणारे कर्म त्यांच्याकडून होत आहे. पण मुक्त करण्याचा जो खरा मार्ग आहे. तो मात्र त्यांच्याकडून होत नाही, म्हणून ते त्या मार्गाची व त्या मार्गदर्शकाची निंदा करतात. हे स्वत:च्या नाशाबरोबर तुमच्या सारख्या भाविक भोळ्या जनतेची फसवणूक आहे. आणि भीमा मी तुला सांगतो की असे कर्म करणारे चांडाळ समजावेत. द्वापारयुगापर्यंत भगवंताचे आठ अवतार पूर्ण झालेले आहे. वेदत्रयीच्या योगाने केवळ कर्म उपासना व भक्ति ही साधने जोडता येतात. सांप्रतच्या नवव्या बुध्दअवताराचे हल्ली अवतार कार्य चालू असून तोच मी या रूपाने तुझ्यासमोर उभा आहे. माझी आणि माझ्या अवतार कार्याची हा ब्राह्मण वर्ग खंडना निर्भत्सना करतो, कारण माझे प्रमुख कार्य म्हणजे निष्क्रिय आणि पशुहिंसात्मक असे हे यज्ञयाग बंद करणे हे आहे. मनुष्याच्या चित्तात्त सर्व प्राणिमात्राविष्यी प्रेम हवे आहे. पशुबली दिल्याने संतुष्ट होणाऱ्या देवता आसुरी म्हणजे निकृष्ट होत पण या पशुंना मारून आमची पूजा केल्यासच आम्ही प्रसन्न होऊ असे वचन कोणत्याच श्रुतिस्मृतिवेद ग्रंथामध्ये नाही.तसे असते तर त्याच श्रुति स्मृतींनी आपणाला अहिंसा धर्माचा उपदेश केला नसता. पण सांप्रतच्या काळात पशुहिंसात्मक हे जे ग्रंथ मंत्रविधीयुक्त कर्म सुरु झालेले आहेत हे केवळ स्वार्थी, लोभी, दंभी आणि लालची विप्रांनी सुरु केलेले आहेत. भीमा, ही माझी वाचा त्रिकालाबाधित सत्य आहे. तू ताबडतोब माझी तृषा तृप्त करून येथून जाऊ दे. विनाकारण येथे तिष्ठत उभा राहू देऊ नकोस. म्यां अपंग दुर्बलाला दान देऊन इच्छा तृप्त केल्यास तुमचा यज्ञ सफळ होईल. तुम्हाला ह्या कर्माची कटकट शिल्लक राहणार नाही. माझी इच्छा एकच आहे ती म्हणजे धर्मराजाचे दर्शन घ्यावे हीच होय. (श्लोक ८०-९२)

बुध्दाचे वचन ऐकून भीमाला आश्चर्य वाटले. तो मनात चिंतन करूं लागला की याचे बोलण्यावरून हा कोणीतरी अवतारी पुरुष असावा. याचा देह बाहेरून दिसायला अगदी कुरुप आणि गलिच्छ आहे. पण वाणी मात्र वैकुंठपति श्रीकृष्णाच्या वाणीप्रमाणे तेजस्वी आणि अमृतोपम आहे. भीम हात जोडून त्याला म्हणाला, ' हे योगिश्वरा, मी अज्ञानपणाने तुला चांडाळ म्हणून संबोधिले पण ती माझी चूक मला समजून आली. तुझ्या वाणीवरून तू कोणीतरी अधिकारी योगी पुरुष असावा असे मला आता समजून आले. हे योगेश्वरा माझ्या मनात एक शंका उद्भवली आहे ती अशी की क्षत्रीय लोकात चांडाळ कोण समजावे. कोणत्या आचरणाचे क्षत्रीय चांडाळ जाणावे ते तू मला संक्षेपाने सांग. बुध्द म्हणाला,' भीमा क्षत्रीय कुळात चांडाळ कोण हे मी तुला सांगतो ते ऐक. क्षत्रीय वर्ण समाजाने देशरक्षणाकरितां समाजहीताकरितां आणि संरक्षणाकरितां निर्माण केलेला आहे. मानव कल्याणाच्या मार्गात शेतीवाडी, व्यवसाय, पशुपालन, व्यापारउद्योगधंदा वगैरे बाबतीत कोण्या व्यक्तीने, समाजाने, देशाने बाधा आणल्यास व समाजघातक प्रवृत्ति निर्माण करून अशांतता पसरविल्यास क्षत्रियांनी त्याविरूध्द योग्य ते शासन स्विकारून समाजाची वा व्यक्तीच्या जीवनाची घडी नीट बसवावी यासाठी क्षत्रीयवर्ग निर्माण केला आहे. जीवप्राणी मात्राविषयीं मनात दयाभाव ठेवून त्यांच्या कल्याणाची उन्नतीची व सौख्य प्राप्ती करवून देण्याची जबाबदारी शिरावर घेऊन त्याप्रमाणे जो झटतो तो खरा वीरपुरुष क्षत्रीय होय. याउलट ज्याच्या चित्तात दयाभाव नाही प्राणिमात्राविषयी आत्मियता नाही. सदैव शस्त्रसज्ज असून जीव हिंसा करण्यास जो मागेपुढे पहात नाही. जो गाय वासरांची ताटातूट करून त्यांना पळवून नेतो. दुसऱ्यावर गुप्त हल्ला करून त्यांचे कपडेलत्ते, धन, भांडी वगैरे लुटतात ते क्षत्रीय चांडाळ समजावेत. जे मनामध्ये अतिअभिमान करतात, आपले भाऊबंध, आप्तइष्टमित्र यांचा भलेपणा उत्कर्ष उन्नति ज्यांना सहन होत नाही, त्यांचे वर्चस्व पाहून ज्यांच्या मनात त्यांच्याविषयी द्वेष मत्सर व इर्षा उत्पन्न होऊन त्यांचा अध:पात अवनती कशा प्रकारे होईल याविषयी जे खटपट करतात, ते अधम नीच चांडाळ समजावे. जे पाषाणहृदयी कठोर क्षत्रीय अतिथी, अभ्यागत बांधवांना दुष्टबुध्दीने त्रास देतात. मनुष्यहत्या करतांना ज्यांच्या चित्तात किंचीतही करूणा येत नाही, वेदवचन, सत्यवचन लोपविणारे ते क्षत्रीय चांडाल समजावे. जे क्रोधाविष्ट होऊन मूकपशुंना चरण्यासाठी सोडलेल्या कुरणांना जंगलांना जाळून भस्म करतात; केवळ मौजेकरिता शिकार खेळतात व निष्पाप निरागस प्राण्यास मारतात व आपण करतो ही जीवहिंसा आहे असे किंचीतही मनात आणत नाहीत; स्वत:च्या जिभेच्या लालचेने, जीवहिंसा करून मद्यमांस सेवन करतात अशा उन्मत्त

झालेल्या मानवपशुंच्या चित्तात ब्रह्मज्ञान कोठून उद्भवणार. अशा लोकांनी जरी ब्रह्मज्ञान संपादन करऱ्याचा प्रयत्न केला तरी खडकावर पेरलेल्या बीजाप्रमाणे ते निरर्थक होईल रूजणार नाही व जे अतिकुडकपटी, विराषधी आणि समाजघातकी असतील त्या क्षत्रीयांना हे भीमा तू चांडाल समज. अशा लोकांनी आत्मशुध्दि करीता बाहद्याचरण कितीही शुध्द पवित्र ठेवण्याचा आव आणला आणि केवळ लौकिकाकरीतां कितीही तीर्थयात्रा केल्या तरी ते जीवात्मे पावन होऊ शकणार नाही. युगधर्मानुसार अवतारपात्राची भक्ति न करणारे कधीही पावन होत नाही. (श्लोक ९३-१०६)

बुध्द म्हणाला - 'भीमा, या संपूर्ण अवनीतलावर तरून जाण्याचा सहज सुलभ व सोपा मार्ग म्हणजे युगधर्मानुसार सतपंथाचे क्रियाचरण पालन करणे होय. बारावर्षाच्या वनवासात तुम्ही स्वत: आचरण केलेला मुक्तिमार्ग तोच सतपंथ होय. या मार्गप्रणालीनुसार ईश्वराच्या निर्गुण निराकारस्वरूपाचे ज्योतिस्वरूपातून ध्यान केले जाते. कारण आत्मा स्वयं ज्योतिस्वरूप प्रकाशमान चैतन्यमय आहे. म्हणून त्याच स्वरूपाच्या माध्यमातून त्याचे ध्यान करावे. ॐ प्रणवब्रह्माचा उच्चार व सतत नामस्मरण करावे. विश्वाच्या उत्पत्ति स्थिती संहाराच्या मुळाशी असलेले प्रणवब्रह्म हे एकमेव आद्यतत्व असून निर्गुणनिराकारातून सगुण साकारात येणाऱ्या आदिनारायणाचा तो बीजमंत्र आहे. ॐ हा आदिनारायण तर ज्योति हे आद्यशक्तीदेवीचे प्रतिक असून धर्मरूपी अधिष्ठानावर स्थित असलेला कलश हे ब्राह्मांडाचे स्वरूप आहे. दान, दया, तपश्चर्या, शुचिर्भूतता या मूलभूत पायावर उभारलेली ब्रह्मांडाची मूर्ति म्हणजेच हा कलश होय. या कलशात मंत्रोपचाराने तीर्थजल भरून त्यात विश्व ब्रह्मांडातील संपूर्ण सृष्टीचक्र चालविणाऱ्या देवदेवतांचे आवाहन करून अधिष्ठान प्रस्थापित करायचे असते. विश्वात आपला प्राण हा वायु, जल, तेज, व अन्नरुप असल्याने त्या पदार्थांनी युक्त मंत्रोपचाराने हविर्भाग रूपाने म्हणजे अर्ध्य, पाद्य, नैवेद्य रूपाने त्या सर्व देव देवतांचे पूजन अर्चन करावे. सद्भक्तांनी त्यांच्या वास्त्यव्यांनी निर्माण झालेल्या तीर्थजलांचे प्राशन करून कृपाशिर्वाद रूप प्रसाद सेवन करावा. यथामति, यथाशक्ति स्वयंज्योति स्वरूपात आद्यशक्तिमातेच्या प्रतिकातून ध्यान केन्द्रित करून आत्मज्योतिरूप परब्रह्माची साक्षात्कार रूपाने प्राप्ती करावी व त्या स्वरूपात आपल्या साऱ्या चित्तवृत्ती लय करण्याचा प्रयत्न करावा अशा प्रकारचा हा सतपंथ घटपाट कलश पूजा विधीचा महिमा आहे. पूर्व जन्मातील अनेक पुण्यकर्मफलांची जोडी असल्याशिवाय हा मुक्तिमार्ग लाभत नाही. एकतर मानवदेहाचा लाभ, दुर्लभ, त्यात सत्पुरुषांचा संग, ज्ञानी प्रेमी भक्तांचा संग, अत्यंत दुर्लभ असतो आणि दैवयोगाने दोनही गोष्टीचा लाभ घडलाच

तर मुक्तिमार्गाचा लाभ हा अत्यंत दुर्लभ आहे. यासाठी हे सद्भक्तांनो तुमच्या पूर्व पूर्ण पुण्याच्या बळाने तुम्हाला जो सन्मार्ग लाभला होता तो व्यर्थ दवडू नका. तुम्ही आता शेवटच्या प्रहरात मुक्तिलाभ करून घ्या. ज्या सद्भाग्यवान जीवात्म्यांना हा मुक्तिमार्ग लाभून त्याप्रमाणे न वागता त्याचा महिमा न जाणणाऱ्या अभागी अनधिकारी जीवात्म्यांना अज्ञानांध म्हणायला पाहिजे. तसे जीवात्मे कधीही पावन होत नाहीत. सतपंथ मार्गियांच्या घरी जन्म झाला असून अथवा ज्यांनी सतपंथ मार्गाची दीक्षा घेतलेली आहे, पण त्याप्रमाणे जो वागत नाही, सद्गुरुंचे वेद वचनामृत जो सेवन करीत नाही त्याउलट जो चोरी, हिसा, लंपटपणा आणि दंभीपणाने वागतो; लोभ, मद, अहकार आणि खोटच्या प्रतिष्ठेच्या आहारी जाऊन भूतभक्ति अथवा निकृष्ट देवतांच्या उपासनेच्या नादी लागतो; तसेच तामसी राजसी भक्तिच्या नादी लागतो तो मूर्ख पापी कपटी जीवात्मा कोणत्याही उपायांनी पावन होत नाही. ज्यांनी हा सतपंथ मुक्तिमार्ग स्विकारला असून नित्यपूजा अर्चेला जो जात नाही, सद्गुरु चरणामृत प्राशन करीत नाही; गुरुमुखातील उपदेशामृत श्रवण करीत नाही; गतगंगेत येऊन गतगंगेची सेवा करीत नाही. मुखी अथवा गुरु गतगंगेची निंदा करतो. दान दसवंत करीत नाही, केलेल्या अपराधांची माफी मागत नाही, गुरु गतगंगेला कलश-ज्योतीला प्रणाम करीत नाही, स्वकष्टाची सचोटीची संपत्ति न जोडता बेईमानीच्या, चोरीच्या, दंभाने लोकांना फसवून लुबाडलेल्या संपत्तिवर आपला निर्वाह करतो असा पापी चांडाळ कधीही पावन होत नाही.' बुध्दाच्या मुखातील हे वचन ऐकून भीम आश्चर्यचकित झाला. तो विचार करू लागला, आगमनिगम ज्ञान सांगणारा त्रिकालदर्शी हा कोणीतरी अवतारी पुरुषच असावा त्याने काया तर कुरुप धारण केलेली आहे, पण वाणी मात्र अमृतोपम आहे. दिव्यज्ञान बुध्दि संपन्न असा हा महात्मा असावा तरी कोण आणि आमच्या उध्दाराची कळकळ याला लागण्याची आवश्यकता तरी कां बरे असेल. अशी एकसारखी जीज्ञासा भीमाला लागली. तो पुढे म्हणाला, (श्लोक १०७-११७)

भीम म्हणाला, 'हे देवा दीनदयाळा माझी एक गोष्ट जाणून घेण्याची इच्छा आहे ती आपण सांगण्याची कृपा करावी. महाजन ज़ातीत म्हणजे वैश्य, व्यापारी, शेठ, सावकार यांच्यात चांडाळ कोण समजावेत हे मला संक्षपाने सांगावे.' बुध्द म्हणाला, 'हे भीमा महाजन वैश्य, चंडाळ कोण समजावे ते मी तुला सांगतो. महाजन म्हणजे समाजातील उच्चभ्रू लोक. शेतीवाडी, व्यापार वगैरे करून धनधान्य संपन्न, अन्न, वस्त्र,निवारा यांनी समृध्द असून समाजात जे विशेष माननीय शिष्ट असतात ते.

हे लोक समाजातील प्रतिष्ठासंपन्न असल्याने सर्वसामान्य लोक त्यांचे अनुसरण करण्याचा प्रयत्न करतात. स्मृतीत म्हटलेले आहे की, 'महाजनो येन गत: स पन्था:' प्रतिष्ठित लोक ज्याप्रमाणे आचरण करतात त्याप्रमाणे समाजातील सर्व सामान्य लोक वागत असतात. थोडक्यात महाजन हे समाजाचे अध्वर्यु असतात. आता अशा प्रतिष्ठेचे जे लोक असतात ते जर मनात भल्यामोठ्या अभिमानाने वागतील, दांडी तोलतांना आपले दिल साफ राखणार नाही, व्यापार करतांना आपला इमान सत्यनिष्ठा ठाम राखणार नाहीत, जे माल खरेदी करतांना दिडदांडी तोलाने मोजतील आणि माल विक्री करतांना प्रमाणापेक्षां कमी देतील अशा प्रकारचा बेईमानपणा कपटीपणा करतील व शिवाय अहंकाराने दर्पाने 'मीच मोठा सचोटीचा व्यापारी आहे, सत्य वचन पालन करणे हे माझे ब्रीद आहे.' वगैरे वगैरे दर्पाने भ्रामकवाणी बोलतो व लोकांना फसवितो, माल घेतांना अगदीच कमी भावात व विकतांना फारच जास्त भावाने विकतो धान्यात सळभेसळ करतो, व्यवहारात भ्रष्टाचारपणा करतो, लोकांची मने दुखवून त्यांना लुबाडतो. सावकारी धंदा करून व्याज, सवाई, दिढी, दुपटीची रक्कम वसूल करतो. बेईमानीपणाने कपटाने लोकांच्या ठेवी घेऊन त्यांचा विश्वास घात करतो. खोटे दस्तऐवज, खोटे करारनामे, बक्षीसपत्रके वगैरे करून लोकांना दिवासाढवळ्या लुबाडतो. असा सफेदठग, लुच्चा चोर प्रतिष्ठित म्हणवला जाणारा महाजन चांडाल समजावा. गोरगरीबाबद्दल ज्याच्या चित्तात दया नाही, केलेल्या अपराधाबद्दल कोणत्याही प्रकारचा पश्चाताप नाही, गुन्हा करून सुध्दां नाकबूल होतो, क्षमेचा अंश सुध्दा ज्याच्या चित्तात दिसत नाही त्याला चांडाल समजावे.

भीम म्हणाला, 'हे दीनदयाळू योगिश्वरा मनुष्यजातीत चांडाळ कोण समजावा, कोणते कर्म केले असता मनुष्य चांडाळ गणला जातो हा माझ्या मनातील संशय दूर करावा.' बुध्द म्हणाला - 'ऐक हे भीमा, मनुष्य प्राण्यामध्ये कोणास चांडाळ समजावे ते मी तुला सांगतो. ज्याच्या चित्तात दया, धर्म, प्रेमभाव आणि क्षमावृत्ति नाही ते जीवात्मे निश्चिंत मनाने झोपून फक्त स्वत:चाच पिंड पोषण करण्यातच आपला सर्व वेळ खर्च करतात, जे कोणी कुपुत्र आईबापांच्या विरूध्द लढून त्यांचा छळ करतात ते पापी दुष्ट कृतघ्न चांडाळ सर्वांच्या आधी नरकात जातील. परप्राणि मारून म्हणजे जीवहिंसा करून स्वत:चे पोट भरतील जे दुष्ट परस्त्रीसंग अथवा अभिलाषा करतील, दुसऱ्याची धनसंपत्ति वस्तू ऐवज लुटून चोरीने बळजबरीने दुष्टपणाने अन्यायाने आपले पोट भरतील ते दुष्ट नीच पापी चांडाल नरकात जातील. पुरुष एक असून

जो दोन स्त्रिया करतो, एका स्त्रीवर प्रीत करतो आणि दुसरीचा छळ करतो, एक सुखी असते तर दुसरीचा आत्मा दुःखाने कळकळतो तिच्या त्या दुःखाने तो पापी चांडाळ मनुष्य कधीच मोक्षगतिला जात नाही. तो चांडाळ निश्चयाने नरकात जातो. त्याचे पूर्वज कधीच पवित्र होत नाही. जो कोणी मनुष्य आपल्या मुलीने ठेव म्हणून ठेवलेले अथवा स्वेच्छेने ठेवलेले कन्येचे द्रव्य हडप करून मुलीस विषप्रयोग करून मारतो अथवा अन्य कारणाने तिचा नाश करतो, विश्वासघात करतो तो पापी चांडाळ समजावा. आमंत्रण न देतांना सुध्दां जे दुसऱ्यांच्या घरी जेवायला जातील, तिथे जाऊन खोटे बोलून खोटी प्रशंसा वाहवा करून गोड धोड मेजवान्या झोडतील, जीव्हास्वादाकरितां जीवहिंसा करून मद्यमांस भक्षण करतील पण त्याचा कोणताही विधीनिषेध न पाळता, अन्नदोष न मानता निःशंकमनाने अभक्ष्य भक्षण व अपेयपान करतील, कोर्ट कचेरीत अथवा पंचाजवळ खोटी साक्ष देतील, दुसऱ्यावर आळ घेतील असे पापी दुष्ट नीच मनुष्ये चांडाळ समजावेत.' (श्लोक ११८-१३७)

जे सद्गुरु ब्रह्माचे उपासक व शिष्य आहेत, त्यांच्याकडून सदैव परमार्थच घडेल ते अन्य कोणत्याच स्वार्थी कर्मात आनंद मानणार नाही. त्यांचे ध्येय म्हणजे कैवल्यज्ञान प्राप्ती व त्यानुसार आचरण करणे हेच असेल, अशा हरीभक्तांचे उपजीविकेचे साधन जो नष्ट करील म्हणजे तशा सद्भक्तांच्या धनसंपत्तिचा अपहार जे करतील त्यांना चांडाळ समजावे. ज्या महात्म्यांनी स्वतः अपरिमित कष्ट उचलून सद्भक्तांना ज्ञानोपदेश केलाः सद्भक्ताकडून निरनिराळ्या साधना करवून श्रीहरीचीप्राप्ती साक्षात्कार रूपाने करवून त्या महात्म्यांचे हे अमौलिक उपकार न मानता त्यांच्याशी जे प्रापंचिक बुध्दीने वागतात त्यांच्या अलौकिक दिव्यत्वास न जाणता एखाद्या सामान्य प्रापंचिक व्यक्तिप्रमाणे त्यांना मानणे हे दोषमूलक आहे. ज्याने एखाद्या महात्म्याकडून धर्मदीक्षा घेतली आणि त्यांच्या वचनानुसार न वागता अन्यमार्गाप्रमाणे वागतो तो पापी चांडाळ जीवात्मा नरकसाधन जोडतो. लौकिक व्यवहारात आपल्याला जे ज्ञान शिकवितात ते शिक्षक असतात; त्यांचे मार्गदर्शन घेतल्याशिवाय आपल्याला व्यावहारीक ज्ञान होऊ शकत नाही. तसेच मोक्षमार्गासारख्या अलौकिक ज्ञान मार्गात जे मार्गदर्शक असतात ते गुरु असतात. जे गुरु आपणास अक्षर ब्रह्मतत्वाचे ज्ञान देऊन व तशा प्रकारच्या साधना आपल्याकडून करवून मुक्तिप्रत घेऊन जातात त्यांचे दिव्यत्व अलौकिकत्व आपण जाणून त्यांची सेवा करावयास हवी. ते न करता जो जीवात्मा आपल्या लौकिकांकरितां त्यांना सोडून जातो अथवा त्याची अवहेलना करतो तो दुष्ट पापी

नीच चांडाळ समजावा. जो जीवात्मा स्वार्थासाठी लालचेने खोटी शपथ घेतो, जो मनुष्य दुसऱ्यांची निंदा, चुगली चहाडी, व्देष मत्सर करतो, तो महाचांडाळ जाणावा. तसा मनुष्य समाजात दुसऱ्यांचे जीवन बिघडविण्याचा प्रयत्न करतो पण त्यायोगे त्याच्या स्वत:च्याच जीवनात अनंत हाल अपेष्टा त्याला भोगाव्या लागतात.

भीम म्हणाला - 'हे देवा दीनदयाळा चतुष्पाद प्राण्यात आणि पक्ष्यांच्या जातीत चांडाळ कोणास समजावे. हे कृपा करून आपण मला सांगावे.' बुध्द म्हणाले, 'हे भीमसेना पशुपक्ष्यात तसे पाहिले तर कोणीही चांडाळ नाही. कारण ती योनी म्हणजे भोगयोनी आहे. मनुष्य जन्मात केलेल्या शुभाशुभ कर्माचे फल भोगण्याचे फक्त त्यांना कर्तव्य असते. नविन क्रियमाणाची भरत्यांना करता येत नाही. त्या पशुपक्षांना जी उच्च अथवा नीच योनी मिळालेली असते. त्यावरून त्यांना उत्तम अथवा अधम म्हणून हिनविण्यात अर्थ नाही. हा सर्व त्यांच्या पूर्वसुकृताचा गुणदोष होय. पण चतुष्पादामध्ये श्वान, गाढव व कोल्हा यांना चांडाळ गणले जाते आणि पक्ष्यामद्ये कावळा हा चांडाळ गणला जातो. याला कारण केवळ एकच आहे की ती पशुपक्ष्यातील तीर्यक् योनी असून त्यांचे ओरडणे अथवा हालचाली अशुभसुचक असतात. लोक त्यांना अपशकुनकारक मानतात. म्हणूनच ते चांडाळ गणले जातात. पण ईश्वरी प्रेरणेने तशा प्राण्यांना शुभाशुभ घडणाऱ्या गोष्टींची सर्वांच्या आधी जाणीव होते म्हणून ते तसे ओरडून लोकांना जागृतीची सूचना देतात. ( श्लोक १३८-१४६ )

भीम म्हणाला, 'हे योगीश्वरा, दीनदयाळा स्त्रीजातीत चांडाळी प्रमाणे नीच कोणाला समजावे?' बुध्द म्हणाला, 'भीमा स्त्रीजातीत चांडाळ कोण ते मी तुला सांगतो. जी स्त्री विवाहीत असून परपुरुषाबरोबर रमते परपुरुषांच्या संगतीत राहून घरच्या पुरुषावर जी प्रेम करीत नाही. ज्या पुरुषाशी चारचौघात लग्न झाले त्याला कस्पटाप्रमाणे मानून, भांडून, वितुष्टपणा करून त्याग करते अथवा त्याच्या घरी असून सुध्दां त्याच्याकडे मुळीच लक्ष न देता परपुरुषाबरोबर रमते आणि ती एक सोडून दोन चार अनेक परपुरुषाशी अनैतिक व्यवहार करते ती स्त्री महापातकी पतिता कुलटा चांडाळी समजावी. जी स्त्री घरातील कामकाज धंदा करायचा सोडून रिकामटेकडेपणाने घरोघर भटकत असते व इतरांच्या उखाड्यापाखाड्या काढून भांडणे लावीत असते. घरच्या लोकांचे कांहीही न ऐकता त्यांच्यावर नित्य उठल्या बसल्या संताप करते ती स्त्री चांडाळी समजावी. जी स्त्री सासु सासऱ्यांची लाज मर्यादा पाळत नाही, त्यांची बेअदबी व अवहेलना करते, अद्वातद्वा बोलून मान खंडना करते, त्यांच्या

दु:खदप्रसंगी आजारपणाची कोणतीही काळजी घेत नाही, वृध्दापकाळात त्यांच्यावर कधीही कनवाळू होत नाही. जी स्त्री नणंद जेठाणी अथवा देराणी यांच्याशी विषाक्त विवाद करते; नित्य त्यांच्याशी भांडणतंटे करते, खोटे बोलून त्यांच्यावर निरनिराळे आळ आरोप लावून त्यांना दुखविते भांडते वितुष्ठता करते हे भीमा स्त्री जातीत ती चांडाळी समजावी. जी स्त्री तसे घोर पापकर्म करतांना कोणतीही शंकाकुशंका मनात बाळगत नाही, अशा प्रकारे कुळशील मर्यादा वगैरेचा आचारविचार लोप करून जी स्त्री समाजात उजळ माथ्याने वावरण्याचा प्रयत्न करते ती महापातकी चांडाळी समजावी. जी स्त्री आपल्या पतीची सेवा करीत नाही. मुलाबाळांची देखभाल योग्यसंगोपन करीत नाही. पतीच्या, मुलाबाळांच्या सुखसोयीकडे पालनपोषण आरोग्य याकडे केवळ आळशीपणाने दुर्लक्ष करते, कुडकपटाचे आचरण करून नवरा आपल्या मुठीत राहील अथवा तो आपल्या सांगितल्याप्रमाणेच वागेल केवळ आपल्याच भोवती घोटाळत राहावा यासाठी निरनिराळे प्रयोग करील, उत्तम प्रकारची व्रते वैकल्ये न करता घरात कोणत्याही प्रकारची शांती राहणार नाही अशा प्रकारे कुडकपट पापाचरण करील, घरातील व्यक्तीवर निरनिराळे आळ आरोप घेऊन घरात सदैव असंतुष्टता अस्थैर्य निर्माण करील ती स्त्री चांडाळ समजावी. व्रतवैकल्ये उपवास अनुष्ठान पूजा अर्चा इ. साधने घरात सौख्य शांती आनंद लाभ व्हावा यासाठी करायची असतात आणि ही सारी जबाबदारी स्त्रियांनी सांभाळायची असते, पुरुषांनी या कामात सहयोगी होऊन दोघांच्या सहकार्याने घरात, समाजात सुस्थिती निर्माण करावी. ( श्लोक १४७-१६० )

भीम म्हणाला, 'हे योगेश्वरा हात जोडून माझी तुला एक विनंती आहे की माझ्या मनात एका गोष्टीबद्दल शंका आहे की कोणत्या कर्माचरणाने मनुष्य मध्यम चांडाळ गणला जाईल. कृपा करून ते मला सांगावे.' बुध्द म्हणाला, 'भीमा जे लोक हरीभक्ति पूजाअर्चा करतात पण त्यात सत्याचा किंवा पुण्याचा अंश नसतो, त्यांच्या द्वारातून अतिथी अभ्यागत निराश होऊन विन्मुख परत जातात, ज्याच्या चित्तात जीवप्राणिमात्राविषयी दयाभाव, प्रेमभाव नाही नीतिनियमांचे पालन नाही, वैदिक शुध्द क्रियाचरण नाही अशा लोकांनी कितीही वेळ घंटी वाजवून पूजा अर्चा केली तरी त्याचा काही उपयोग नाही. दान, दया, तपाचरण, पावित्र्य याकरिता तर पूजा अर्चा करावयाची. हे जो आचरण करीत नाही तो महामध्यम चांडाळ समजावा. जे व्याज

सवाई दीढी वगैरे घेऊन कर्ज देतात, ते महामध्यम चांडाळ जाणावे. एखादा मनुष्य परमेश्वराची भक्ति, देवपूजा अर्चा, व्रतविधी, उपवास जपतप तीर्थयात्रा करीतअसला तर त्याला हीनवून अथवा नास्तिकतेने त्याचा बुध्दिभेद करून त्या मार्गापासून त्याला परावृत्त करतो; दानधर्म पुण्यकर्म करणाऱ्या व्यक्तीस आडवा येऊन अडथळा आणतो, तो पापी मनुष्य महाकृतघ्न अधम चांडाळ समजावा. तशा मनुष्याने बाहेर धार्मिकपणाचा कितीही आव आणला तरी तो अंतरकपटी महादंभी अधम समजावा. जे कोणी गाय, बैल, म्हैस, घोडा, शेळी वगैरे पशु पालन करून त्यांच्या चाऱ्यापाण्याची शुध्द बाळगणार नाहीत ते मूक प्राणी निमुटपणे भुक तहान सहन करतात कारण वाचेच्या अभावी ते दु:ख त्यांना सहन करावे लागते पण त्यांच्या हृदयाची कळकळ, त्यांची आत्मिक तळमळ तशा मनुष्यास कधीच सुख लाभू देत नाही. पशुपक्षीआदि मूक प्राण्यांची हृदयातली वेदना जो जाणत नाही, तो मनुष्य महामध्यम चांडाळ समजावा. ऋषीचे व्रत धारण करणारे मुखी, पूजा अर्चा करणारे आचार्य गुरु वगैरेनी दुनियादारीच्या सामजिक कार्यापासून खानपानापासून अलिप्त राहावे नाहीतर पावित्र्य पाळले जात नाही, शुचिर्भूततेचे नियम पाळले गेले नाही तर केलेल्या पूजा अर्चा उत्तरकार्यादि पिंडदान वगैरे विधी पूर्णपणे सफल होत नाही. व तसे झाले म्हणजे लोक ज्ञानाची धर्माची, कर्मभक्ति उपासना मार्गाची निंदा करतात, अवहेलना करतात, यासाठी ऋषीमुनि मुखीआचार्यांनी हे नियम अवश्य पाळावयास हवे. जे ते पाळणार नाहीत व जे भ्रष्टाचार करतील अथवा भ्रष्टाचारास प्रवृत्त करतील ते महामध्यम चांडाळ समजावेत. जे दुसऱ्यांच्या ठेवी वगैरे स्विकारून मागाहून बेईमानपणाने विश्वासघात करून, त्या हडप करून, गरीब प्रजेला त्रास देतील, अपेयपान अभक्ष्य भक्षणकरून दुर्व्यसनी बनतील, असत्य बोलून असत्याचरण करतील, हीनदीन गरीब दुर्बलांना पीडतील ते पापी अधम नीच जीव महामध्यम चांडाळ समजावेत. (श्लोक १६१-१७६)

जो ऋषिवर मुनिवर राजगृहातील अन्न ग्रहण करतो तो राजसी वृत्तीचा होतो. हा अन्नाचा आश्रयदोष आहे. राजा, वेश्या आणि चांडाल यांच्या घरील अन्न आश्रय दोषाने दूषित झालेले असते. ते सेवन केल्याने बुध्दीत हिनत्व येते. ब्राह्मणाच्या घरातील अन्नाचा सुध्दा अपहार करू नये कारण ते त्यांनी भिक्षुकी वृत्तीने मिळविलेले असते. क्रियाकर्मांतराचे ठिकाणचे अन्न, वृध्दि सुतकाचे घरातील व रजस्वलाधर्म ज्या घरात पाळला जात नाही. त्याघरचे अन्न ग्रहण करू नये कारण तशा प्रकारचे

अन्न सेवन केल्याने हीनत्व येते. शुचिर्भूतता पावित्र्य राहात नाही व त्या दोषामुळे त्यांनी केलेले शुभकार्य पूजा विधी हे फलदायी होत नाही. जो जीवात्मा गळफास लावून, विहीर नदी तलावात उडी घेऊन, विष प्राशन करून, विद्युतशक्ति, वाहने वगैरेच्या खाली पडून अनेक प्रकाराने आत्महत्या करतो अथवा दुसऱ्याचा घात करतो तो महा अधम पापी चांडाळ समजावा. जो मनुष्य स्वत:चे राक्षसी हेतु व आसुरी आकांक्षा साध्य करून घेण्यासाठी निरनिराळे अघोरी प्रयोग करतो, जारण मारण वशिकरण पिशाच्च साधना करतो व त्यायोगे दुसऱ्यांना वेदना देऊन पीडा करून स्वत:चा लाभ करवून घेतो, जी स्त्री गर्भपात करून भ्रुणहत्या व बालहत्या करते. अनैतिक संबंध ठेवून पापाचरण करते ती महाअधम चांडाळी समजावी. जे धर्मी असून -गुरुकडून दीक्षा घेऊन त्या वचनाप्रमाणे आचरण करीत नाही. कोणत्याही प्रकारची जीवीत्वाची काळजी अथवा चिंता न करता, निश्चिंत मनाने झोपेते आयुष्य कंठतात, काही कर्म करायचेच झाल्यास कुड कपट पापाचरण करून त्यात आयुष्य घालवितात. सत्कृत्य नाही, दयाभाव नाही,दानधर्म नाही, परोपकार प्रेमभाव नाही, गतगंगेत जाऊन सेवा प्रवृत्ती नाही, कृतकर्माचा पश्चाताप नाही, दशांश सुकृत दान करीत नाहीत, दुनियेच्या नाच गायन छंद स्वच्छंद आहारविहारात सुख मानून त्यातच मग्न राहतात. ज्याच्या मुखातून एकदाही शुध्द अंत:करणापासून श्री हरीचे नाव नाही. मुखातून सदैव अद्वातद्वा वचन शिवीगाळीचा निंदा कुचेष्टेचा प्रवाह वाहात असतो असा नीच हलकट मनुष्य महा अधम चांडाळ समजावा. पाच महिन्याच्या गर्भवती स्त्रीशी जो मनुष्य संगम-संभोग करतो तो पशुपेक्षा ही नीच हलकट नरपशु समजावा. बकरी, कोंबडी वगैरे पशुपक्ष्यांचे पालन जो मनुष्य केवळ मांस भक्षणाकरितां करतो तो पापी चांडाळ महा अधम समजावा. आदरभाव, सत्कार ज्या ठिकाणी लाभत नाही अशा ठिकाणी सुध्दां विना आमंत्रणाने जो जेवणास जातो; कर्ज काढून ते परत करण्याची तजवीज काळजी जो करीत नाही. उधार उसनवार घेतलेले पैसे वस्तू वगैरे बेईमान पणाने परत न करता यथेच्छ स्वत: वापरतो तो मुक्कर पापी जीवात्मा, तसेच कोणत्याही प्रकारचा अपराध नसतांना जो मनुष्य स्वस्त्रीचा त्याग करतो, जे माता अथवा पिता आपल्या स्वार्थाकरिता किंवा अन्य पापयुक्त कर्माकरिता आपल्या मुलामुलींना विकतात व त्यावर आपला उदरनिर्वाह करतात ते पापी अधमाधम चांडाळ पापच भक्षण करतात त्या पापात्म्यांना कधीच सद्गती लाभत नाही.

(श्लोक १७७-१८८)

भीम म्हणाला - 'स्वामी माझ्या मनातली एक आंतरीक खळबळ मी आपणास विचारतो कीं, मनुष्यजातीत उत्तम कोणास म्हणावे? कोणते कर्म केल्यानंतर मनुष्य उत्तम गणला जातो ते मला संक्षेपाने सांगावे.' बुध्द भगवान म्हणाले 'हे भीमा, उत्तम मनुष्याचे लक्षण मी तुला सांगतो. तू शांत चित्ताने श्रवण कर. ज्या मनुष्यास सद्गुरु ब्रह्माची प्राप्ती झाली त्याचे आवागमनाचे फेरे मिटतात. मानवजन्मात येऊन मानवाने आपले जन्माचे सार्थक करून घेण्यास आत्मज्ञान प्राप्ती करावी. शास्त्र वचन पठन -वाचन करतांना मन शांत स्थिर करून गुरु-संत-महात्मा यांचेकडून ज्ञान श्रवण करावे. जे आपल्याला आपल्या आत्मस्थितीची जाणीव करून देणारे असतात अशा ब्रह्मस्वरूपी सद्गुरु महाराजांची सेवा करून त्यांच्या वचनाप्रमाणे वागून त्यांची कृपा संपादन करावी. मनुष्याने स्वकष्टाने सचोटीने उपार्जित केलेल्या धनसंपत्तीतून दशांश म्हणून दहावा भाग तशा गुरुंना अथवा त्यांनी धर्मप्रचारार्थ चालविलेल्या धामात-मंदीरात-आश्रमात अर्पण करावा. त्याठिकाणी चाललेल्या सदाव्रत, देवतार्चन, सत्संग ग्रंथज्ञान प्रचार, धर्मशाळा, दवाखाने, अनाथालये, वाचनालये वगैरे कार्यात त्या रकमेचा सदुपयोग करावा. जे नित्य नियमीतपणे गतगंगेत म्ह. सत्संगात येऊन गुरु संत सद्भक्तांच्या मुखातून ज्ञानचर्चा श्रवण करतात, ब्रह्मदर्शी अशा महात्म्यांच्या मुखातून ऐकलेले ज्ञान आपल्या चित्तात साठवून त्यायोगे आपले मन निर्मल पवित्र करतात आणि अशा शुध्द अंत:करणाने परमेश्वर भक्ती, ज्ञान ध्यान, सेवा जो करतो तो मनुष्य जातीत उत्तम समजावा. जो दयावंत क्षमावंत असतो जीव प्राणिमात्राविषयी ज्याच्या हृदयात करूणा असते, मुखीच्या चाळीस क्रिया ज्याच्या आचरणात आहेत, ज्याच्या चित्तात दुसऱ्या कोणाविषयीही हेवा, ईर्षा, द्वेष, मत्सर, विषाक्त बुध्दि नाही तो मनुष्य जातीत उत्तम जाणावा. कामक्रोध आणि स्वाद ज्याने जिंकलेला आहे, पंचविषय म्हणजे शब्द स्पर्श रूप रस गंध यांच्याबाबत ज्याने संयम बाळगला आहे हे पंचविषय मनुष्याला गृहस्थाला संपूर्ण सोडायचे नसतात तर संयमीतपणे त्यांचा उपभोग घ्यायचा असतो. या पंचविषयातही जिभेचा स्वाद आणि जननेंद्रियांचे भोग हे विशेषत: मनुष्याने सांभाळायचे असतात, कारण सर्व अनर्थास मूळ तेच असतात. या पंचेन्द्रियांचा भेद जाणून जो मनुष्य सदाचरण करतो तो उत्तम जाणावा. गुरु सद्गुरु, मार्गदर्शक संतमहात्म्यांचे वचन शिरसावंद्य मानून त्यांच्या वचनाप्रमाणे वागण्याचा प्रयत्न करावा. त्यांचे वचन म्ह. सद्धर्माचे पालन होय.भोंदू गुरुपासून शक्यतो सावध राहावे. सत्य, प्रेम, अहिंसा, क्षमा, परोपकार व यथालाभ संतोष, योगाचरण, तपाचरण हे सन्मार्गाचे तत्व होय. या तत्वाप्रमाणे यथामति वागण्याचा प्रयत्न करतो तो मनुष्य

उत्तम जाणावा. गुरु मार्गदर्शनाने व ज्ञानध्यानाने ज्याची वृत्ति सम झाली आहे. सदाचरणाने व निष्काम कर्माचरणाने जो जिवात्मा जीवन्मुक्त झाला आहे, आपले स्वत:चे दुखदु:ख फक्त जो ईश्वरासच विदीत करतो, इतर लोकासमोर उघड करून आपले दैन्य दाखवित नाही; ज्याचे परमेश्वरस्मरण व स्वरूपानुसंधान सदैव चालू असते त्यात कधीही कशानेही खंड पडत नाही तो मनुष्य उत्तम समजावा. जो आपल्या मातापित्याची भक्तिभावाने सेवा करतो, त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानतो कारण मातापिता हे आद्यदैवत आहे. आपल्या धर्म संस्कृतीत माता पिता गुरु अतिथी हे दैवत मानलेले आहेत कारण ते प्रत्यक्ष प्रगट चालते बोलते दैवत असून आपल्याला सन्मार्गाची दिशा दाखवून त्याप्रमाणे वाटचाल करायला लावून इच्छित स्थळी उन्नतिकडे घेऊन जाणारे असतात म्हणून त्यांच्याशी त्याच पूज्यभावाने वागून सेवा करावी. आपल्या मनातून कुडकपटकाढून टाकायला हवे आहे कोणताही व्यवहार सरळबुध्दिने समजावून घेण्याचा प्रयत्न करावा. आपल्या मनात कोणाविषयीही द्वेष मत्सर कुडकपट ठेवू नये; निर्मळ शुध्द व पवित्र मनाने सर्वांशी वागण्याचा प्रयत्न करावा. सर्व कुंटुंब परिवाराचा भार शिरावर घेण्याचे धैर्य बाळगून उत्तम प्रकारे जबाबदारी स्विकारावी. कुंटूबांचे कल्याण, उत्कर्ष, उन्नति कशी होईल, कुटुंबातील लोकाकडून सदाचरण कसे होईल याची काळजी घ्यावी. कुटुंबाप्रमाणे गुरु गतगंगेची उन्नति, विकास, भक्तिमार्गाची जोपासना, ज्ञान कर्म भक्ति योगाचे आचरण वगैरे गोष्टींचे मार्गदर्शन करून सेवा करावी. हे सर्व कर्म निर्धाराने धैर्याने करण्याची जो जबाबदारी घेतो; स्वत: भगवान विष्णुची आदिनारायण सत्‌चित्‌आनंद स्वरूप भगवंताची उपासना करतो. परपीडा जाणून ती निवारण करण्याचा प्रयत्न करतो, स्वत: अपार दु:ख कष्टतर भोग भोगून अन्य जीवप्राण्यांना सुखी ठेवण्याचा कायावाचामनाने प्रयत्न करतो. तो मनुष्य सर्वश्रेष्ठ जाणावा. ज्याच्या संपर्कात येवून लोक सुखी व आनंदीत होतात, सर्वत्र ज्याचे यशोगान होते, रतिभर सुध्दां अवगुण ज्याचे मनात राहात नाही, वाचेने, कायेने, मनाने आणि दृष्टीने जो निर्मल पवित्र निरागस आहे. स्वजातीत परजातीत ज्याचे गुण गाईले जातात; दया, धर्म, कुशलक्षेम जो जीवात्मा असतो तो मनुष्य रूपाने परमात्माच जाणावा. प्रत्येक मनुष्याने यथामति, यथाशक्ति या प्रमाणे वागण्याचा प्रयत्न करून मानव जन्माचे सार्थक करावे. (श्लोक १८९-२०८)

भीम म्हणाला, 'हे देव दयाळु योगेश्वरा, आपण मनुष्य जातीत उत्तम कोण याचे दिग्दर्शन केले. आता माझ्या मनाची सदिच्छा स्त्री जातीत उत्तम कोण हे जाणून घेण्याची आहे. तरी कृपा करून ते मला तू सांग.' बुध्द म्हणाला, 'हे

जिज्ञासु भीमा, स्त्री ही कांही मानव समाजाहून वेगळी नाही. ती मानवच आहे म्हणून मनुष्य जातीत जेवढे सद्गुण तेवढे स्त्रीत हवेच आहेत, त्या शिवाय पूर्णत्व येण्यासाठी आणखी काही गुण सांभाळावे लागतात. स्त्रीने स्वत:च्या पुरुषाच्या म्ह. पतीच्या सेवेत राहावयास हवे आहे. जी स्त्री पतिसेवा करून श्रीहरीची भक्ति करीते व सद्गुरु महाराजांनी सद्भक्तांने पालन करावयाचे क्रियाचरणाचे सर्व अथवा कमीत कमी चाळीस नियमांचे पालन करते, जी स्त्री दानशील, दयाशील आणि क्षमाशील आहे ती स्त्री जगद्वंद्य अशी सती जाणावी, ज्या स्त्रीचे हृदय निर्मल पवित्र अशा आत्मज्ञानाने युक्त आहे व जी सासु सासऱ्याची उत्तम सेवाचाकरी देखभाल लक्षपूर्वक करते त्यांना मान सन्मानाने वागवते, कोणी तिला टाकून जरी बोलले तरी ते त्यांचे अज्ञान आहे असे जाणून क्रोधवश होत नाही. लहानमुलाप्रमाणे जिची निरागस वृत्ती आहे. सदैव नम्रदृष्टी, नम्रवाणी, लीनता, हसतपण अधोमुख असते, कोणाला अद्वातद्वा बोलत नाही. अशा वृत्तीची जी स्त्री असते ती उत्तम जाणावी. घरातील व्यक्तीची सेवा करून म्हं. सासुसासऱ्यांच्या सेवेत राहून त्यांची शिकवण शिरोधार्थ मानणे, पतीच्या आज्ञेत राहून तन मन प्राणपणाने त्याची सेवाकरणे, जेठ, दीर, नणंद, जेठाणी, देराणी वगैरे घरातील इतर व्यक्तीशी प्रेमाने सलोख्याने, नम्रतेने व अदबीने वागणे,घरातील व आपल्या स्वत:च्या मुलांचे चांगले संगोपन करणे, त्यांचे योग्य लालनपालन करून वळण, शिस्त, उत्तम शिकवण देणे, मुलांना धार्मिक शुरत्व विरत्वाच्या कथा सांगून त्यांच्या मनावर चांगले संस्कार करणे. शक्य असल्यास ध्यान, स्मरण, योगाभ्यासाचे प्राथमिक मार्गदर्शन करणे वगैरे ही सर्व जबाबदारी प्रथम मातेची असते. मातेने आपल्या संततीस जीवरसाबरोबर थोडेथोडे ज्ञानामृत पाजल्यास ती संतती यशस्वी बलवान व सुसंस्कारी होते. संतति शक्य तेवढी कमी असून उत्तम धडधाकट व संस्कारक्षम असल्यास घराचा, गावाचा,देशाचा उध्दार करण्यास पात्र असते. जी माता हे सर्व कार्य घडवून आणते ती स्त्री जातीत उत्तम जाणावी. जी स्त्री परमेश्वर स्मरण ध्यान सेवेशिवाय एक ग्रास देखिल ग्रहण करीत नाही, जिच्या द्वारावरूनअतिथी अभ्यागत भिक्षुक, भिकारी अन्नाशिवाय विन्मुख जात नाही, घरात विपुलता जरी नसली तरी घासभर अन्न व घोटभर पाणी तरी सद्भावनेने द्यावे. जी स्त्री कोणत्याही व्यवहारात सत्यपालन करते, सत्यवंती व दानधर्म करणारी स्त्री जातीत उत्तम जाणावी. दान, दया, सत्यपालन व शुचिर्भूतता हे स्त्रीचे खरे अलंकार व सौंदर्य प्रसाधने आहेत. याच अलंकारांनी स्त्री सौभाग्यदायी, सौंदर्यशाली आणि शालीन गणली जाते. बाह्य सौंदर्य, प्रसाधनांचा फक्त उपयोग करून स्त्री नटल्यास ती रूपगर्विता होऊन देहपूजा

करणारी व लोकांच्या नजरा आकृष्ट करून भुलविणारी विवशी होते. स्त्री ही उत्तम गुणांनीच शोभून दिसते. जीस्त्रीआपले स्वत;चे सुखदु:ख केवळ श्रीहरीलाच कथन करून तो ठेविल त्यात समाधान मानते. जीवनात कित्त्येक वेळेला असे घडते कीं स्त्री सुखी समाधानी आनंदी असल्यास तिचा द्वेष, निंदा, तिरस्कार करणारे व्यर्थ त्रास देण्याचा प्रयत्न करतात. स्त्री दु:खी, कष्टी, चिंताग्रस्त असल्यास घरात अशांतता उद्वेग वगैरे उभ्दवतात म्हणूनआपले सुख दु:ख केवळ श्रीहरीला निवेदन करावे. सुखात हुरळून जाऊ नये, दु:खात पिचून जाऊ नये. दोनही वेळा धैर्यधारण करून भगवंताची सेवा करावी. स्त्रीने गृहकृत्ये सांभाळून व्रत वैकल्ये उपवास तप करावे, गतगंगेची सेवाचाकरी करून पूजाअर्चा करावी. गृहकृत्ये सांभाळून राहिलेला वेळ गप्पागोष्टी निंदा चहाडी चुगली आळस निद्रा याकडे न घालवता सत्संगात खर्च करावा. सत्संगाशिवाय आत्मोन्नतीचे ज्ञान होत नाही. केवळ संसार करण्याकरिताच स्त्री सृष्टी निर्माण झालेली नाही. केवळ पति, मातापिता, सासुसासरे, पुत्र हे स्त्रीचे तारक नसतात. आपला आत्मविकास व आत्मोध्दार स्त्रीला स्वत:च करायचा असतो. ऐहिक सुख कुटुंबातील लोक देऊ शकतील पण परमार्थाची वाटचाल मात्र तिला स्वत:च करायची असते. त्यासाठी ज्ञान असणे आवश्यक आहे. ते ज्ञान सत्संगाशिवाय होत नाही म्हणून सत्संग व गतगंगेची सेवा करून आत्मोन्नती करणारी स्त्री सर्वात उत्तम श्रेष्ठ जाणावी. (श्लोक २०९-२२४)

श्रीबुध्द भगवान म्हणाले, 'हे भीमा आता तुला मी कलियुगातील सर्व वर्णाच्या लोकांच्या स्थितीचे वर्णन सांगतो ते तू ऐक. कलियुगात विशिष्ट असा कोणताच वर्ण राहणार नाही. चार मुख्य वर्ण अठरा जातीचे लोक या सर्वांचा एकंकार होईल. सर्व वर्णात ब्राह्मण हा श्रेष्ठ आणि धर्मनिष्ठ ज्ञानवान गणला जातो. कारण सर्व मानव जातीला व्यावहारिक, सामाजिक, धार्मिक ज्ञान दान करण्याचे त्याचे कार्य आहे असे आपले वेदशास्त्रे पुराणे सांगतात आणि म्हणून अध्ययन व अध्यापनाचे कार्य करण्यासाठी आणि धर्मविधी पुजापाठ श्राध्दतर्पण क्रियाकर्मान्तर वगैरे करण्याची जबाबदारी ब्राह्मणांची आहे त्यामुळे ब्राह्मण वर्णाला श्रेष्ठत्व आहे आणि इतर वर्णातील लोकांनी पूजाअर्चा करवून दान धर्म करणे, अन्नवस्त्र घर शेत वगैरे दान करून ब्राह्मणांना उपजिविकेचे साधन उपलब्ध करून देणे हे त्यांचे कर्तव्य आहे. आता या कलियुगातील ब्राह्मण कसे असतील याचे वर्णन भगवान बुध्द करीत आहेत. कलियुगात ब्राह्मण धर्महीन होतील. धर्म संस्कृतीचे ज्ञान त्यांचे लोप पावेल ते वेदांचा

अभ्यास करणे सोडून देतील. नित्य आळशीपणाने राहून तात्पुरता पौराणिक पुजाविधीचा फक्त अभ्यास करून पोट भरण्याचे साधन म्हणून फक्त त्याचा उपयोग करतील, शुद्रांची सेवाचाकरी करायला लागतील. संध्या तर्पण, ब्रह्मार्पण, वासुदेव, विश्वेदेव वगैरे सर्व सोडून देतील. छळकपट चेटक नाटक आदि निषिध्द कर्मे करतील. कलियुगातील ब्राह्मण केवळ राजाची मर्जी संपादन करण्या करितां त्यांचा परिग्रह घेऊन त्यांच्यावर अनुग्रह करतील आणि त्यांची सारी पातकराशी आपल्या शिरावर घेतील. स्वधर्माचरण संध्या वगैरे सर्व सोडून सेवकांच्या घरी शुद्र नोकरादिकांच्या घरी जाऊन आहारविहार करतील. दुसऱ्यांच्या घरी कार्यप्रयोजनाच्या निमित्ताने जाऊन त्यांच्या पंक्तित सहभागी होतील, शुद्रादिकांच्या घरी जाऊन वेदपठन करतील. स्वधर्मआचरण सोडून देतील. सर्व प्रकारचा भ्रष्टाचार करायला लागून कोणतेही पावित्र्य ठेवणार नाहीत. स्वत: चोरी चहाडी लावालावी वगैरे करून अधर्माचरण करतील. स्वत:चे भान हरपून शुद्राच्या घरच्या पशुंचे पालन करतील. लालसा लोभ स्वार्थ यांच्या योगे शुद्रांचे घरी नोकरी चाकरी करून पोट भरतील. स्वत:च्या घरी असलेल्या जनावरांच्या पालनपोषणाकडे दुर्लक्ष करतील. शुद्रांच्या बालकांचे लालनपालन संगोपन करतील व स्वत:च्या बालकाकडे दुर्लक्ष करतील. त्यांची संतती लोभी, लालसी, दंभी, कपटी होईल. अधर्माचरण करण्यास प्रवृत्त करतील. आपल्या अंगच्या हुशारीचा दुसऱ्यामध्ये भांडणे लावण्याच्या, द्वेष, मत्सर, तिरस्कार, अहंकार करण्याच्या कामी उपयोग करतील. दुसऱ्यांच्याच घरी अनेक पुरोहित जाऊन आपापसात वादविवाद करून भांडणे उपस्थित करतील. शुद्रांच्या घरी जाऊन श्राध्द तर्पण वैगरे विधी करतील पण सर्वभ्रष्टाचार, अविधीपूर्वक पूजा अर्चा करतील आणि लोभाने दान दक्षिणा वगैरे उपटतील. आणि ते शुद्र सुध्दां अहंकाराने दर्पाने ब्राह्मणांना मारण्यास कमी करणार नाहीत. स्वार्थाकरीता व लोभाकरीतां शुद्रांच्या घरी जाऊन ब्राह्मणवर्गाचे लोक दळणकांडण स्वयंपाक वगैरे करतील व केवळ पोट भरण्याच्या आशेने त्यांची सेवाचाकरी करतील.स्वत: गाढवांच्या प्रमाणे भार वहन करतील. व मनात तर मोठा अहंकार धारण करतील. शुद्रांच्या घरी अथवा कार्यप्रयोजनाच्या वेळी स्वयंपाकी म्हणून जाऊन मोठ्या प्रेमाने आवडीने निरनिराळ्या प्रकारची स्वयंपाक सिध्दी करतील. प्रथम शूद्रांना वाढून त्यांची तृप्तता झाल्यावर शिल्लक राहिलेल्या अन्नावर ते उपजीविका करतील. घरात ज्याप्रमाणे अन्य दासदासी परिवार असतो तो घरातील लोकांची सेवाचाकरी करून मिळेल ते अन्न गिळून मिळेल तो उष्टा जुना पुराणा कपडा घेऊन व मिळेल तो मोबदला पैसा घेऊन उपजीविका करतात त्याप्रमाणे ब्राह्मणवर्गाची स्थिती होईल. समाजामध्ये त्यांना दासदासींच्या

पलिकडे मान मिळणार नाही. एखादा विद्वान जरी असला तरी त्याला कोणीही पूज्य मानणार नाही. राजा जशा प्रकारचा होईल तशा प्रकारची त्याची प्रजा होईल. राजा आणि प्रजा दुष्ट कर्मांच्या आचरणाने नरकगती प्राप्त करतील. कोणीही दान, धर्म शुध्द क्रियाचरण, नीतिनियम पालन करणार नाही. धर्म, पूजाअर्चा, व्रत वगैरे केवळ स्वादापुरते, लालचेने पालन करतील. धर्माचे सत्य स्वरूप लोपून विकृत स्वरूपाचे पालन होईल. धर्म संस्थापक व प्रवर्तक अशा महात्म्यांच्या चारित्र्याचे पालन होणार नाही. पण त्यांच्या नावाखाली धर्माचे विडंबन दंभाचरण करायला लागतील. ब्राह्मणवर्ग केवळ भिक्षेकरीतां अन्नाकरीतां घरोघर भटकून आशिर्वाद देण्याचा बहाणा करतील. त्या आशिर्वादात कोणतेही तथ्य राहणार नाही. कारण त्यात लक्ष फक्त अन्नात राहील, आशिर्वादात नाही. भगवंताला विसरून जाऊन कोरडा आशिर्वाद केवळ पोपटपंचीप्रमाणे करतील. कन्येच्या विवाह कार्यात अतोनात द्रव्य खर्च होईल. कन्यादानाबराबेर द्रव्य,आंदण, अलंकार, कपडे वगैरेंचा अफाट खर्च वधुपित्याला करावा लागेल. त्यातही बराच छळ कपटाचा व्यवहार होईल व त्यामुळे भांडणे उद्भवून वधुवरांचे संसार उध्वस्त होतील. राजांचे राजेपण नष्ट होईल संस्थानिकांची संस्थाने मोडकळीस येऊन नष्ट होतील. गज, रथ, घोडदळे नष्ट होतील. त्यांच्या उपजीविकेची साधने शेती वगैरे सर्व भार त्यांना सोडून द्यावा लागेल. वादविवाद भांडणे युध्द उपस्थित करतील. अशाप्रकारे कलियुगात ब्राह्मणांची स्थिती होईल व ती समाजघातक अशी होऊन सर्वधर्म संस्कृति लोप पावेल. वेदाध्ययन, स्वधर्माचरण, सत्कर्माचरण हे सर्व लोपले जाईल. हे भीमा तुला आणखी काही विचारावयाचे असेल तर विचार मी तुला सर्व कांही सांगतो. ( श्लोक २२५-२५० )

भीम म्हणाला, 'हे स्वामी आपण बुध्दिचे व ज्ञानाचे सागर आहात. आपण मला कलियुगातील क्षत्रीयांच्या स्थितीचे वर्णन करावे.' बुध्द म्हणाले, 'हे भीमसेन राजा क्षत्रीय वर्गाचे कर्तव्य प्रजेचे रक्षण करणे, अधर्म्यांचे दंडण सत्कर्म्यांचे पालन संरक्षण करणे होय. प्रजेच्या धनमाल पशुधन प्राणिमात्रांचे संरक्षण करण्याचे कर्तव्य आहे. देशसेवा करून परकीयापासून देशाचे रक्षण करणे, वेळीप्रसंगी युध्द झाल्यास स्वप्राणार्पण करून देखिल देशाचे व देशवासियांचे रक्षण करणे हे क्षत्रियांचे कर्तव्य असते. गोब्राह्मण प्रतिपालन हे क्षत्रियांचे कर्तव्य आहे. कलियुगातील क्षत्रीय हे अन्यायाने चोरी करून लोकांच्या गार्यींचे अपहरण करतील आणि म्लेंच्छ लोक त्यांना सोडवून आणतील, शोधून आणतील. ब्राह्मण अथवा स्त्रीया यांना अधर्माने कुडकपट करून

अन्यायाने लुटतील, त्यांच्याशी दुर्व्यवहार गैरव्यवहार, दुराचार करतील. स्त्रीयांच्या दागदागिन्यांचा अपहार करतील. चोरी करतील. मद्यमांसादिकांचा मादक आहार करतील. घरातून धर्माचरणाचे अधिष्ठान राहाणार नाही. आचार विचार व्यवहार सर्व अधर्माचा होईल. लोभाने स्वार्थाने प्रेरीत होऊन शुद्रांची सेवा करतील आणि शिरखपपणाने दुर्व्यसनी होऊन स्वामीला मालकाला शस्त्राने मारतील, खून करतील. क्षत्रीय फारच आळशी होऊन कोणतेही काम करणार नाहीत. सर्व बाबतीत आयतोबे आळशी होऊन लाचलुचपत घेऊन त्यावर उपजीविका करतील. सर्व राज्ययंत्रणा शासनपध्दतीत सुध्दां आमुलाग्र बदल होईल लाचलुचपत, भ्रष्टाचार स्वार्थी दंभी अशा प्रकारचे शासनकर्ते पुढारी होतील आणि सर्व प्रजेला दुःख देतील पीडतील. गोब्राह्मण शुद्र आणि स्त्रिया या दुर्बल घटकांचे रक्षण करणे सोडून त्यांच्या जीविताचे मालमत्तेचे द्रव्यांचे अपहरण करतील. नींदास्पद कामे करतील. कुपात्र व्यक्तिला चोरी लुटमार सट्टे, पत्ते, जुगार करणाऱ्या व्यक्तिंना वा तसे अनैतिक व्यवसाय ज्याठिकाणी चालले असतील अशाठिकाणी सढळ हाताने मदत दानधर्म करून तशा अडच्यांना प्रोत्साहन देतील आणि सत्पात्र व्यक्तींना मारून पिटून हाकून लावतील. कुपात्रांचा सुळसुळाट होईल. अहंकार दर्प व कुव्यसनाधीन होऊन बागबगीचे उध्वस्त करतील. तीर्थयात्रा यांची धामे ओस पडतील. निशाचर - निशाबाज होऊन उन्मत्तपणाने पुरे आणि गावेच्या गावे जाळून उध्वस्त करतील. जीवप्राणिमात्रांचे घात नाश संहार करतील. आणि कृतकर्मांची पापकर्मांची नरकफळे भोगतील. हे भीमसेन राजा, दुस्तर अशा कलियुगात सत्कर्म करून समाजसेवा प्राणिमात्रांची उन्नति संरक्षण करणारे फारच क्वचित राहतील बाकी तर कालप्रवाहाच्या गतीत सापडून सर्वनाशास प्रवृत्त होतील. अशाप्रकारची ही क्षत्रीयवर्गाची स्थिती मी तुला सांगितली, आणखी काही विचारायचे असल्यास सागं, तुझ्या साऱ्या शंकाकुशंकाचे निरसन करण्यासाठी मी तत्पर आहे. (श्लोक २५१-२६३)

भीम म्हणाला - 'हे स्वामी बुध्द भगवंता, कलियुगातील महाजन वैश्यांची स्थिती कशा प्रकारची होईल याबद्दल आपण मला संक्षेपाने सांगावे.' बुध्द भगवान म्हणाले, 'हे भीमसेना कलियुगातील महाजन वैश्यांची स्थिती मी तुला सांगतो ते तू श्रवण कर. वैश्यलोक गाई वगैरे जनावरांचा विक्रय करतील. कुडकपटाने व्यापार करतील. व्यापार धंदा वगैरे सर्व भ्रष्टाचाराने करतील. काळाबाजार करून धन संपत्ती जमवतील. व्यापारात आणि व्यवहारात सचोटी पाळणार नाही. सर्वत्र अन्याय अनाचार चालेल. कलियुगातील शूद्रवर्णाचे लोक अतिअहंकारी, दांभिक होतील. स्वतः कसलेही

ज्ञान नसता मोठमोठ्या वरिष्ठ पदावर जाऊन बसतील. परमेश्वराची सेवा नियम धर्म आचार सर्व सोडून देतील. दानधर्म करतील पण त्यात अहंकार गर्व आणि जाहिरातबाजीच जास्त असेल. केवळ नावलौकिकाकरता दानधर्म केला जाईल. जिथे तसा प्रकार नसेल त्याठिकाणी कोणी दानधर्मच करणार नाही. तीर्थक्षेत्रावर सहभोजन वनभोजन अथवा मेजवान्या एवढेच महत्व राहील. दानधर्म अथवा गोरगरीबांना अन्नदान वगैरे काहीही दिले जाणार नाही. हरिनामाचा गजर मोठमोठ्याने करतील पण तो केवळ आक्रोशच राहील. अंत:करणाच्या तळमळीपासून कोणी नामस्मरण करणार नाहीत. हरिनाम मोठमोठ्याने दांभिकतेने, दिखाऊपणाने घेतील पण माल मोजतांना कमी देतील, बेईमानीपणा करतील, एकमेकांची निंदा करतील, स्वार्थाकरिता वरवरून प्रेमभाव दाखवतील, अशा प्रकारचा आचारधर्म वैश्यवाणी महाजन यांचा राहील. कुलवधूस्त्रिया कुळकलंकिनी बनतील व कुलशील धर्माचा भ्रष्टाचार करतील. जिच्याशी लग्न विवाह झाला त्या कुलीन स्त्रियांना सोडून देतील व परस्त्रिबरोबर व्यभिचार करून त्यांच्याबरोबर घरदार मांडतील, गल्लीमध्ये रस्त्यात नांगरून जमिनी काढतील. त्यांची मशागत करतील आणि त्यात भाजीपाला अन्नधान्य फळझाडे वगैरे लावून उत्पन्न काढतील रस्त्यात एखाद्या ठिकाणी आखाड्याच्या जागेवर कसाईखाने उघडतील व तिथे अतोनात जीवहिंसा होईल. ठिकठिकाणी मद्यमांसाहाराचे, सट्टे रेसीस, पत्त्यांचे असे अड्डे होतील वअतोनात धनाची तिथे उलाढाल होईल. सदैव पापाचरणात ते गढले जातील लोकांचा अतिशय आवभाव सत्कार करतील पण ध्येय फक्त त्यांचा पैसा उपटण्याचेच राहील. घराच्या बाहेर अंगणात रमण्याखेळण्यासाठी खाण्यापिण्यासाठी उत्तम प्रकारच्या सुखसोयीच्या झोपडीसारख्या कुटीर बांधतील, घर निरनिराळ्या वस्तूंनी शृंगारतील. (श्लोक २६४-२७९)

उत्तम प्रकारची उपजाऊ सुपीक जमीन नापेर जमिनीच्या भावाने विकून नापेर जमिनीला भरपूर किंमत देऊन विकत घेतील. ज्या जमिनीत एक दाणासुध्दां उगवणार नाही अशा जमिनीला सुध्दां विपुल किंमत येईल. त्यातही कुडकपट, वशिलेबाजी, लाचलुचपत, दलाली काळाबाजर वगैरे होऊन वादविवाद भांडणे उपस्थित होतील. ब्राह्मणाला कोणी त्यांची वृत्ति (सिधासामुग्री) वगैरे देणार नाहीत. पण वेश्यांना मोठ मोठ्या जमिनी घरेदारे दान करतील. चांगले हिरवेगार वृक्ष तोडून वनेउपवने उध्वस्त करून तिथे मोठमोठी घरे मंदिरे कारखाने वस्तीगृहे तयार करतील. बांधकाम, वास्तुशिल्पांना जास्त प्राधान्य देतील. चुनेगच्ची महाल बांधून त्यालाउत्तमोत्तम प्रकारची रंग कामे करून सुशोभीत व नयनमनोहर अशी घरे सजवितील. दगडी पक्क्या विटा

वापरून घरे चांगली मजबूत करतील तऱ्हेतऱ्हेचे सज्जे गच्च्या वगैरे करून व मोठमोठ्या उत्तमोत्तम कलाकुसरी नक्षीकाम केलेल्या खिडक्या गवाक्षे वगैरे बांधून चांगली सजावट करतील. तशा सजावटीतच अतोनात द्रव्य खर्च करतील वैदिक धर्माचरण क्रिया आचार धर्म वगैरे सोडून देतील व खोटे चमत्कार दंभाचरण असत्याचरणालाच व त्याद्वारे पापाचरणाला अतिशय महत्व देऊन दानपुण्य धर्माचरण लोप पावेल. त्यांचे पूर्वज दानकर्म पुण्यकर्माच्या अभावी पींडसुध्दा ग्रहण करणार नाहीत. पिता पुत्री यांच्यामधील पवित्र नाते जाऊन अनाचार विवेकशून्य आचरण व पशुतुल्य व्यवहार करतील. ब्राह्मणलोक सुध्दा मूर्खपणाने अजाणतेपणाने अथर्ववेदाची निंदा करतील व त्या वेदाच्या आज्ञेप्रमाणे जे वागतील त्यांची सुध्दा ते निंदा, द्वेष, मत्सर, तिरस्कार करतील. म्हणूनच भीमा या अशा भ्रष्ट ब्राह्मणांचा निषेध केला जातो. ते वेद व अवतारांचा भेद जाणू शकत नाही. भूतकाळाचेच फक्त ते महात्म्य वर्णन करतात वर्तमानकाळाकडे दुर्लक्ष करतात आणि भविष्यकाळाची शुध्द बाळगत नाही. अशाप्रकारचा हा ब्राह्मणवर्गाचा फंद आहे. ज्याच्या अस्तित्वाने हा वर्ग उदयास आला त्या वेदविहीत मार्गाचीच ते विटंबना करूं लागले. ज्याप्रमाणे एखादा कुपुत्र आपल्या सुस्थितीत सुध्दा आपल्या मातापित्याची दुरावस्था विटंबना करतो छळतो तशी ही गती होय. लोक ब्राह्मणवर्ग हा श्रेष्ठ वर्णाचा म्हणून त्याला पूज्य मानतील. त्याची लाज घरात पाळली जाईल पण तोच ब्राह्मण घरी गेल्यानंतर वेश्येची सेवा आपल्या हाताने करील अशा प्रकारच्या दुःखद घटना या दुस्तर कलियुगात घडतील. घरात मुलीबहिणी वगैरे संबंध राहील पण तसा उदात्तभाव प्रेम, सलोखा राहणार नाही. हुंडा वा अन्यान्य देवघेवाणीच्या कारणाने पीडले गेलेले लोक मुली अथवा बहिणीबद्दल काय प्रेमभाव ठेवतील हे सांगायलाच नको! कलियुगात चारही वर्णाच्या लोकांची स्थिती ही अशाप्रकारची अत्यंत दुःखद होईल. तरीहे भीमा माझे तुम्हाला कळकळीने सांगणे आहे की बाबारे! तुम्ही या कलियुगातजोपर्यंत आहेत तोपर्यंत कोणालाही पीडू नका. कलियुगाचा महिमा अगाध आहे. त्याच्या स्थितीचे वर्णन कितीही केले तरी काळाकोळसा कितीही उगाळला घासला तरी काळाच असणार तशा प्रकारचे हे कलियुग आहे. ( श्लोक २८०-२९७ )

भीम म्हणाला, 'हे स्वामी बुध्द भगवंता, छल, कपट असत्य, दंभाचरणाने भरलेल्या या कलियुगाचा महिमा काय आहे हे आपण मला सांगावे म्हणजे तशा गोष्टी पासून सावध राहून जीवन निर्वाह सुलभ करता येईल. हे स्वामीन् मी तुला अनन्यरीतीने खऱ्या अंतःकरणापासून शरण आलेलो आहे.' श्रीबुध्द म्हणाले हे भीमा

मी तुला या कलियुगाच्या स्थितीचे सविस्तर व सत्यतेने वर्णन करून सांगतो ते तू ऐक व विचार करून त्याप्रमाणे वाग, मी तुला या कलियुगातून तरून जाण्यास जो मार्ग अथवा उपाय सांगेन त्याचा अवलंब केल्यास सहज तरून जाता येईल पण त्या आधी या कलियुगस्थितीचे वर्णन ऐक. या कलियुगात कल्पवृक्षे फळे देणार नाहीत म्हणजे ज्या आपल्या इच्छित मनोकामना आहेत त्या परिपूर्ण होऊ शकणार नाहीत. क्रोध, विरोध, शोक, संताप अहंकार दुष्टभाव दुर्वर्तन यांच्यामुळे सकामकर्माची सुध्दां उत्तम फले मिळणार नाहीत. गाई, म्हशी वगैरे प्राणी अत्यंत अल्प दुध देणारे होतील. तलाव विहीरी सरोवरे हे सर्व आटले जाऊन एखाद्या डबक्याप्रमाणे, कुंडाप्रमाणे दिसायला लागतील, पृथ्वीवर अत्यंत अल्प प्रमाणात धान्याची निपज होईल व ते धान्य जनतेला पुरणारही नाही आणि म्हणून जीवप्राणीमात्रांच्या मांसावर लोक निर्वाह करतील. पुरक अन्न म्हणून त्याचावापर सर्रास केला जाईल. मानव तसेच अन्य जीवप्राणिमात्रांचे आयुष्य अगदीच अल्प होईल. जो ईश्वर वा धर्मावर श्रध्दा न ठेवणारा, अपवित्र राहणारा जप तप पराङ्मुख, मंगल कार्यांचा त्याग करणारा, मदिरापान आदि दुष्कर्मात आसक्त झालेला आणि पूर्वकर्मदोषामुळे मनुष्य अल्पायुषि होऊन, अकाली मृत्यूवश, आत्मघातकी, अपघाताने मरणारा होईल. मुलगा आपल्या स्वत:च्या पित्याला मातेला खायला अन्नसुध्दां देणार नाही. मातापित्यापेक्षा धनावर अधिक प्रेम करतील. ज्या मातापित्यापासून धन मिळण्याची शक्यता असेल तो पर्यंत त्यांच्याकडे लक्ष्यदेतील व ते एकदाचे ताब्यात मिळाल्यावर अथवा मिळण्याची आशा खुंटल्यावर त्यांच्याकडे ढुंकूनही पाहणार नाही. मुलगा आईबापाचे भरण पोषण करणार नाही. त्याची अवहेलना विटंबना करतील व घरातील व्यवहार सर्वसूत्र सासुसासऱ्याच्या हवाली करतील. बंधुपरिवार शत्रुप्रमाणे मानतील पण घरात सासू व साल्यांचा मानसन्मान होईल. घरात स्वत:ची मुलगी अथवा बहिण वस्त्राभरणांनी विन्मुख राहील पण सालीचा सर्व प्रकारचा सासुरवास स्वत:च्या खर्चाने सजवितील. मुलगी अथवा बहिणीच्या कोणत्याच आशा आकांक्षा पूर्ण करणार नाहीत त्यांना काहीही मानाचे प्रेमाचे शब्द बोलून आनंदीत करणार नाहीत पण सासू साल्या यांची सर्वतोपरी सरबराई उत्तम रीतीने करतील. कलियुगात कुलीन घरंदाज कुलवधूसुध्दां कुलाचार सदाचार सोडून देतील, सासु सासऱ्यांना प्रेमाने अदबीने वागविणार नाही. त्यांची हेळसांड करतील घरात लहानजावा, मोठ्या जावा, नणंदा वगैरेशी वैरत्वाने शत्रुत्वाने वागतील. एवढेच नव्हे तर स्वत:च्या वराला सुध्दां शत्रु समजून त्याच्याशी तशा वर्तन करतील. स्त्री आपल्या भ्रताराचे वचन पालन करणार नाही. त्याच्यावर अनेकानेक दोषारोप करून ती आपल्या आईबापाजवळ त्याचे गाऱ्हाणे करून वितंडवाद भांडणे उपस्थित करून

कोर्टकचेरी दावे फटके वगैरे करवून शिक्षा भोगविण्यास कारणीभूत होईल. घरात पत्नीपेक्षा अथवा पतिपेक्षा धनालाच अधिक महत्व दिले जाईल. धन असेल तर एकमेक एकमेकावर प्रेम करण्याचे नाटक करून सलोख्याने वागण्याचा आव आणतील नाही तर घरात नेहमी भांडणे तळतळाट होईल. स्त्रिया घरातील वडिलधाऱ्या व्यक्तिंना सुध्दां मर्मघातक बोलून बेअदबी करतील. त्यांचा मानसन्मान करणार नाहीत.

(श्लोक २९८-३१२)

कलियुगात राजा प्रजेला अतिशय पिडेल, त्रास देईल, महादु:खाने सर्व प्रजा गांजली जाईल. मनाप्रमाणे कायदे कानून बनवून प्रजेला थोडयाशा क्षुल्लक कारणाने सुध्दां प्राणांतिक दंड देतील. अन्यायाने प्रजेवर डोईजड कर बसवतील व ते कर भरू शकले नाही म्हणजे त्यांची उपजीविकेची साधनेच नष्ट करतील आणि प्रजा सुध्दां स्वार्थवश होऊन घेतलेली कर्जे परत करणार नाहीत. अशाप्रकारे राजा व प्रजासुध्दा अति् कष्टी दंभी कपटी होतील. तीर्थक्षेत्रांचा सर्व महिमा निघून जाईल व तीर्थांचे माहात्म्य वगैरे सर्व गप्पा आहेत, कल्पित कादंबऱ्या आहेत असेच लोक मानायला लागतील. तीर्थयात्रा एक धार्मिक, श्रद्धिष्ठ बाब न समजता सुखचैन आराम व निसर्ग सौंदर्यांचे क्षेत्र समजून सर्व प्रकारच्या भोगांच्या सुखसोयी तिथे निर्माण करून प्रजेला लुटतील आणि अशा रीतीने जिकडे तिकडे दु:खद दावानल पेटतील. उत्कापात, नक्षत्रपात, धरणीकंप, ज्वालामुखी, वादळे, चक्रीवादळे, अतिवृष्टी, महापूर, रोगांच्यासाथी, महायुध्दे, अणुयुध्दे वगैरेमुळे जगतातील जीवप्राणिमात्र गांजले जातील. अणुयुध्दामुळे प्रचंड आगी लागतील दावानल पेटून अरण्य जंगले वने उपवने, अन्नधान्यांची शेते उध्वस्त होतील. वातावरण अत्यंत दूषित होऊन विषाक्त होईल. निरनिराळे रोग, आजार, साथी उद्‌भवून मनुष्यहानी प्राणिमात्रांची हानी होईल. माणसा माणसात अथवा स्त्रीपुरुषात कोणत्याही प्रकारचा प्रेमभाव स्नेहार्द्रता राहणार नाही कारण कृत्रिम बीजधारणा केली जाईल. स्त्रीला संतती निर्माण करण्याचे एक यंत्र एवढीच किंमत राहील. प्रेमळपणा आपुलकी व सौजन्यता राहणार नाही. असत्याचरण दंभीपणा करून धनप्राप्ती करण्याचे आणि कोणतेही शुद्रातिशुद्र कार्यात सुध्दा लाच लुचपत खाणे हेच ध्येय होईल. तराजु काटे वगैरे सर्व खोटे तोलले जातील म्हणजे वस्तू देताघेतांना असत्याचरण काळाबाजार चालेल. काळापैसा जनतेजवळ अतिशय बोकाळेल आणि त्याचा परिणाम दुर्व्यवहार, अनाचार, भ्रष्टाचार, अनिती, अन्याय दुर्व्यसन, व्यभिचार वगैरे दुर्वर्तनाला उत येईल. मग वकील, वेश्या आणि डॉक्टर यांची पैशांनी घरे भरतील. अशा

प्रकारचा अन्याय सर्वत्र पसरून वेदशास्त्रपुराण, कथाकीर्तन, पोथी, सत्संग वगैरे सर्व लोपले जातील. बाह्य अवडंबराने जरी काही ठिकाणी दिसलेतरी त्यात कोणतेही तथ्य राहणार नाही, वरपांगी राहील, संकरीत अन्न, अभक्ष्याभक्ष, अनेकानेक प्रकारची पेये आणि स्वैराचार वगैरे मुळे मनुष्याचे आयुष्यमान अगदीच अल्प होईल. वयाच्या बाराव्या वर्षापासून मनुष्याला तारूण्य प्राप्त होईल आणि पंचवीसाव्या वर्षीच वृध्दापकाळ येईल. नऊ वर्षाची मुलगी तारूण्यात पदार्पण करून गर्भधारण करील व प्रसूतिकाळी अत्यंत हालअपेष्टा भोगेल. ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य सर्व वर्ण व्यवस्था नष्ट होईल व सर्व वर्ण संकर होईल. मानवामध्ये जातीभेद वर्णभेद आश्रमभेद वगैरे कांहीही राहणार नाही. सर्व जगातील मानवजात ही एकच गणली जाईल व त्यामुळे लग्नपध्दती बंद पडेल व अती हुंडा अथवा धन संपत्तिच्या व्यापामुळे विवाह कार्य बंद होऊन कृत्रीम बीज धारणा संतती निर्माणामुळे कोणत्याच धार्मिक विधीला महत्व राहणार नाही. स्त्रीपुत्र, कन्या, पितामाता, पतिपत्नी, असा निकटचा संबंध सुध्दां लोप पावेल. वेदपुराणे उपनिषदे शास्त्रे वगैरे सर्वधार्मिक वाङ्मय लोप पावेल ते सर्व इतिहास जमा होईल. नितीनियमांच्या मनासारख्या सुधारीतआवृत्या होऊन दंभ, लोभ, कपट हिंसा, व्यभिचार अखाद्य अपेय विचार वगैरे बाबतीत कोणताही विधीनिषेध राहणार नाही. स्वैराचार वाढेल व आपण जे कर्तव्य करतो तोच धर्म आणि ते नियम असे लोक मानायला लागतील. सत्संग देव मंदिरे म्हणजे कुंटणखाने समजून ते उध्वस्त करतील सिनेमागृहे, वेश्यागृहे, ऐशाराम भोगनिवास हेच खरे जीवनातील सुखोपधामे म्हणजे मंदीरे गणली जातील.

देवी, देवदेवता, संतमहंत, गुरु वगैरे ह्या सर्व भावना लोप पावून नाटक, चेटक, मोहिनी विद्या आणि त्यात काम करणारे नटनटी कलाकार यांनाच देवतातुल्य समजून त्यांची उपासना करायला लागतील. विज्ञानाला अतिशय महत्व येईल. यंत्रतंत्र विज्ञान व व्यापार याच्या पलिकडे शिक्षणक्षेत्र राहणार नाही. निरनिराळ्या कला लोप पावून स्थापत्य वास्तू कलांनाच फक्त प्राधान्य राहील. मोठमोठे कारखाने, प्रयोगशाळा, रसायनशाळा आणि औद्योगिक वसाहती निर्माण होऊन चांगली जमीन त्याकरितां उपयोगात आणतील. मोठमोठी धरणे, रस्ते, पाट, कालवे वगैरेनी बरीच जमीन पडीत राहील. अन्नधान्याचा तुटवडा भासेल. जमीन अगदीच नापेर होईल. तीतून अन्नधान्याची निर्मिती होणार नाही. उन्हाळ्यात हिवाळा आणि हिवाळ्यात उन्हाळा आणि बारामाही पावसाळा अशा प्रकारचे ऋतु परिवर्तन होईल आणि अशा ऋतुपरिवर्तनाने जमीन मशागत न होता नापेर होईल. नंतर तीत काही पेरले तरी

उगवणार नाही. निरनिराळी रासायनिक खते, दूषित वातावरण वगैरेमुळे पीक उगवणार नाही, गवतही उगवणार नाही, चाऱ्यांच्या अभावाने गुराढोरांचे हालहाल होऊन त्यांच्यावर मनुष्याला उपजिविका करावी लागेल. धान्याची सर्व मुळ बीजे नष्ट होतील नवीन नवीन संकरीत तयार करतील. लोकांना समुद्रातील जलचरावर उदरनिर्वाह व पाण्याचा वापर करावा लागेल. शिजविलेले अन्न बाजारात विक्री होईल. अतिशय महाग भावाने विकले जाईल. चांगले श्रीमंत लोकच फक्त ते घेऊ शकतील. गरीबांना मिळणार नाही म्हणून चोऱ्या, लुटमार व धार्डीचे प्रमाण अतिशय वाढून लोक आपल्या गरजा पुऱ्या करतील अशाप्रकारची दुस्तर परिस्थिती या कलियुगात येईल. पृथ्वीवर जिकडे तिकडे धरणीकंप, ज्वालामुखी, अतिवृष्टी, अनावृष्टी, महापूर रोगांच्या साथी, महायुध्दे, अणुयुध्दे वगैरे होऊन जीवप्राणिमात्रांचा अगणित संहार होईल. खंडभंग होऊन देश व राज्ये नष्ट होतील. त्याच्या सीमा राहणार नाहीत. युध्दांचे मुळ सीमा व इतर व्यापारी संबंध राहतील. म्हणून त्या सीमाच नष्ट केल्या जातील व अखंड पृथ्वी, अखंड देश राज्ये होतील, म्हणजे निरनिराळ्या राज्यांची देशांची खंडांची नावे नष्ट होतील. वसलेली गावे, पुरे, नगरे अन्नदुर्भिक्ष, पाण्याचा अभाव, प्रचंड आगी, बॉम्बस्फोट वगैरे निरिनिराळ्या कारणांनी उध्वस्त उजाड होतील. व्यवसाय धंदा व्यापाराकरिता पृथ्वीच्या पाठीवर लोक कोणीही कोठेही निघून जाऊन सोयीस्कर ठिकाणी वस्ती करतील. पुण्यमार्ग ओस पडेल, पुण्यपापाचा विवेकविचार राहणार नाही. स्त्रिया, मुलेमुली, वडिलधाऱ्या व्यक्तिंच्या आज्ञा पाळणार नाही. शिक्षणामुळे स्वैराचार वाढून अनैतिकता, लैगिंकता जास्त बोकाळेल. गर्भपात, भृणहत्या, बालहत्या, यांचा विधीनिषेध राहणार नाही. पशुपेक्षाही निकृष्ट असे मानवी जीवन होईल ( श्लोक ३१३-३२९ )

अवनीतलावर सर्वत्र अशांतता, दारिद्र्यता पसरेल. लोक श्रीहीन, निस्तेज, दरिद्री कंगाल, रोगग्रस्त, भिकार आचरणाचे होतील. घरोघर कलह, क्लेश, चिंता, वितंडवाद घडतील. अपमृत्यू, आत्महत्येचे प्रकार, रोगराई, यांच्यामुळे मृत्यूंचे प्रमाण वाढेल व सर्वत्र शोकग्रस्त, भयग्रस्त वातावरण निर्माण होईल. लोक द्यूतक्रिडा, निरनिराळ्या प्रकारचे सट्टे, पत्ते, रेस, लॉटरी वगैरे अनेकानेक खेळ खेळून व्यापार करतील. तो सर्व व्यवहार काळ्या पैशांचा राहील. देशात अशा प्रकारचा पापाचा, अन्यायाचा अनीतिचा पैसा वाढला म्हणजे देश विनाशाप्रत अधोगतीस जाईल. देशातले मोठमोठे कार्यकर्ते पुढारी शासनकर्तेच असे पापी दुराचारी होऊन काळ्या पैशाचे लाचलुचपत अफरातफर वगैरे मार्गाचे धडे लोकांना शिकवितील व त्यायोगे संपूर्ण राज्ययंत्रणा विनाश पावेल विलयास जाईल. पैशांच्या लोभाने स्वार्थांध होऊन कन्याविक्रय करतील.

आपल्या स्वत:च्या मुलीबहिर्णीना, क्लब अथवा नाट्यशाळेत पाठवून उजळमाथ्याने व्यभिचाराला लावतील. तशा घराण्यातले लोक प्रतिष्ठित गणले जातील. सून आपल्या सासऱ्यास काहीही न जुमानता त्याला शिवीगाळ करील. त्याची मर्यादा पाळणार नाही. वनस्पतीला फळेच येणार नाहीत. औषधी वनस्पतींचे गुण निघून जातील. पृथ्वीवर जो अत्यंत बलवान मनुष्य असेल तो दुसऱ्यांच्या धनसंपत्तीचा अपहार करेल, चोरी, लुटमार, अन्याय, खून, दरोडेखोरी करून दुसऱ्यांची मालमत्ता हडप करेल. लोक स्वत:च्या विवाहीत स्त्रीचा त्याग करून परस्त्रीयांशी गैरव्यवहार, विनयभंग, व्यभिचार करतील. शिष्य गुरुची आज्ञा पाळणार नाही. गुरु ज्ञानोपदेश करतील त्याचा विकृत अर्थ घेऊन शिष्य विपरीत वागतील. गुरु ज्ञानाच्या उपदेशाखाली व्यभिचार व अखाद्य अपेयाचा सर्रास वापर करून पावित्र्य पाळणार नाही. साधुसज्जन सत्पुरुषांच्या बैठकीत चुकून बसणार नाही. पण रात्रंदिवस कुसंगतीत राहतील. संत महात्मे, आचारधर्म, नीतिनियमांचा व उन्नतजीवनाचा धर्मोपदेश करतील तेथे कोणीही फिरकणार नाही पण जेथे छलकपट चालेल धर्माच्या नावाखाली उघडानागडा, अन्यायाचा नंगानाच चालेल त्यांच्या पाठीमागे सर्व पृथ्वी - सर्वजनता वेड्यासारखी फिरेल. वैदिक आचार धर्मकृत्ये लोप पावतील. लोक प्रांजलपणे ब्राह्मणांना पूजाविधीबद्दल काही विचारणारही नाहीत व ब्राह्मणही त्यांना प्रांजलपणे तशी सल्ला देणार नाही. कलियुगात सर्वात अधिक महत्व भगत भक्तिणीला दिले जाईल. भूतपिशाच्चे निरनिराळ्या देवदेवतांची नावे सांगून गचाळ नीच अपवित्र अशा व्यक्तिच्या अंगात येऊन, नाचून घुमुन लोकांची गाऱ्हाणे सांगतील. भूतयोनी अदृश्य असल्याने भूत व वर्तमान काळातील साऱ्या घटना जाणण्यास समर्थ असते पण आगम भविष्य मात्र त्यांना एक अंशानेही समजत नाही. भोळ्याभाबड्या व रोगग्रस्त, आपत्तिविपत्तिग्रस्त, पीडलेल्या व्यक्तिंना भूतकाळातील घटना सांगून प्रभावीत करून, निरनिराळे मार्ग सांगून भगत व भक्तिणी निरनिराळ्या देवीदेवतांच्या रूपाने स्वत:च्या भजनी लावून यथेच्छ लुटतील. अनेकानेक कुड कपट, दंभ छल पाडून त्यांच्या भजनी लागलेल्यांचे शिरमुंडन करून पैसा, धनसंपत्ति, भांडीकुंडी, वस्त्रे आभूषणे, लुबाडतील. कित्येक लोक विरसाधना (बिरकंगन), पिशाच्च साधना (मनकवळे) प्रेत साधना मुंजासाधना साध्य करतील व अंधश्रध्दाळू भाविक भोळ्या जीवात्म्यांना छळकपटाने भुलवितील. कांही औषध पाण्याची योजना करून असाध्य रोग निवारण करतील अथवा तसे भासवितील, कित्येक लोक कज्जल प्रयोग अथवा मोहिनी शक्तीचे निरनिराळे प्रयोग करून स्त्रिया व मुलें व माणसांना वश करतील त्यांना यथेच्छ लुबाडून त्यांचा आपल्या खाजगी कामाकरितां उपयोग करून घेऊन

वेळेवर त्यांचा घातही करतील अथवा विकृत करून - विटंबना करून सोडून देतील. अशाप्रकारच्या गारूड्यांना कलियुगात उत येईल व लोक खऱ्या देवाला सत्यधर्माला सोडून देऊन तशा असत्याचरणाला भाळले जातील व त्यामार्गाला प्राधान्य देतील. नाच तमाशा, नाटकेचेटके, नजरबंद या कृत्यांना दिवसेंदिवस जास्त महत्व येईल, नटनट्या तमाशातील स्त्रिया, नृत्य करणारे हिजडे, वगैरेना मनोरंजन करणारे कलकार म्हणून डोक्यावर घेतील पण खरा मार्ग दाखवून मानवीजीवनाची उन्नती व उध्दरागती करविणाऱ्या साधु सत्पुरुष संत महात्म्याला दोष देऊन मारपिट करतील. वेदशास्त्र नीतीचा मार्ग कोणाला आवडणार नाही, नाटक, तमाशे, मेळे, नंगानाच वगैरे पाहण्याकरिता लोकांची गर्दी आवरणार नाही, पोलिसबंदोबस्त करूनही लोक आटोक्यात येणार नाहीत पण कथाकिर्तन प्रचन भजन अशा ठिकाणी बंदोबस्तासाठी गरजच पडणार नाही. कारण श्रोते भाड्याने सुध्दा मिळणार नाहीत. भुवा (भगत) क्षेत्रपाल, शक्तिदेवता (ज्यांना भग आणि मदिरेचा नैवद्य चालतो अशा अघोरी देवता) मातंगीभूत आदि निकृष्ट प्रेतगण यांची उपासना, सेवा पूजा साधना करणारे लोक हे अत्यंत नीच हीन आचरणाचे व अपवित्र गलिच्छ असून वरील साधनांचा उपयोग करून ते लोकांना लुबाडतील. ढोंग, दंभ, छळ कपटाने लोकांची मने आकृष्ट करतील, चांगले डोळस ज्ञानी लोकही आंधळे बनून त्यांची उपासना भक्ति करायला लागतील! भगवान बुध्द म्हणाले, 'हे भीमा अशा प्रकारचा हा कलियुगाचा महिमा अत्यंत भयानक विकराळ आहे. ते सांगता ऐकता अंगावर शहारे येतात. यासाठी हे भीमा माणसाचे मन कितीही जरी अस्थिर व चंचल असले तरी सद्‌विचार व वैराग्ययुक्त भावनेचा जर त्याला अंकुश लावला तर ते स्थिर व सद्‌विचारी करता येते. त्याचा अभ्यास करून कलियुगाच्या विकराळ अशा कालप्रवाहातून आपल्याला आत्मोन्नति करता येईल.' (श्लोक ३३०-३४७)

भीम म्हणाला, 'हे स्वामी माझी आपणाजवळ विनंती आहे कीं आपण माझ्या मनातील संशय दूर करावे.' भीम अशी विनंती करीत आहे तोच भगवान बुध्द म्हणाले, 'हे भीमा अजून कलियुगस्थितीचे वर्णन ऐक नंतर तुला ज्या कांही शंका असतील त्या विचार. या कलियुगात वृक्षतोड अतिशय होईल. वड, पिंपळासारखे वृक्ष सुध्दां तोडून टाकतील. नास्तिकता आणि म्लेंच्छाचार भ्रष्टाचार होईल. तुळशी, गाय, ब्राह्मण यांच्याबद्दल पूज्यभावना मुळीच राहणार नाही. जे कोणी त्यांची सेवा पूजा वंदन करणारे असतील ते सुध्दां कुडकपटाने घेरले जातील. लोक धंदा, व्यापार,

शेतीसाठी कर्ज घेतील पण सुखचैनीकरिता त्याचा विनियोग करतील आणि ते परत करण्याचे नावही घेणार नाही. कलियुगात सर्वच विपरीत गति होईल. वेश्या रूपजीवी स्त्रिया अत्यंत शीलवान होतील, ज्याची सेवा करतील त्याच्याशीच एकनिष्ठपणाने वागू लागतील, पण सत्वशील, गुणवान, शीलवान म्हणविणाऱ्या कुळातील कित्येक स्त्रिया निर्लज्ज, कुटिल भ्रष्ट आचरणाच्या होतील, त्या आपल्या कुळशील गुणाला दूषण लावतील. जगतात सोन्याचांदीतांब्यांचे नाणे बंद होऊन शिशाचे, ॲल्युमिनियम वा त्यापेक्षांही निकृष्ट धातूंचे निकेल सारख्या लोखंडी धातूचे नाणे चालतील. कागदाचे नाणे जास्त प्रचारात येईल. तलाव, सरोवर मोठमोठ्या नद्या सुकल्या जातील व तशा ठिकाणी लोक शेती करून अन्नधान्ये, कन्दमुळे, फळे, भाजीपाला वगैरेंची लागवड करतील. सत्यवान, शीलवान, धर्मप्रवृत्तीचा मनुष्य संत सत्पुरुष हे अत्यंत दु:खित होतील. अन्यलोक त्यांना त्रासवून गांजवून उपद्रव करतील व त्राही त्राही करायला लावतील आणि कुडकपटी लालची पापी काळ्याबाजारवाले दुर्व्यसनी अत्यंत सुखी दिसतील आणि समाजात असे चित्र पाहिल्यानंतर लोक दुष्प्रवृत्तिकडेच वळतील आणि सर्वांच्या आधी नरकात जाऊन बसतील. धर्मद्रोही, जातीभ्रष्ट, अन्यायी, मुक्कर, देशबुडवे, दिवाळखोर, पापी, चोर, काळाबाजार करणारे अशांच्या घरी आचारपालन, पूजाअर्चा, वगैरे होतांना दिसेल पण उत्तम वर्णाच्या लोकांच्या घरी जे कुलवान, शीलवान, धर्मभीरू असतील त्यांच्या घरातून पूजाअर्चा नित्यपाठ धर्मआचारपालन वगैरे व्यवहार नष्ट झालेले दिसतील. वेश्या वर्गावर लोकांची अतिशय प्रीती वाढत जाईल. वेश्याव्यवसाय अतिप्रमाणात होईल आणि बहुतांश लोक धूर्त गारूड्यांना निरनिराळे चमत्कार करून लोकांना फसविणाऱ्यांनाच जास्त मानायला लागतील. आपापसात कोणताही प्रेमभाव सलोखा परोपकार बुध्दि राहणार नाही. घनदाट स्नेह्यांच्या मनात सुध्दां कल्प किल्मिष प्रवेश करून कलह, द्वेष, मत्सर, दु:ख घडवून आणील अशा प्रकारचे अतिशय दुस्तर कठिण असे हे कलियुग आहे. स्त्रिया, तरूणी, उपवरमुली, वेश्येप्रमाणे कलावंतीणीप्रमाणे सर्व लोकांच्या समोर - प्रेक्षकांसमोर नाचतील व आपल्या अंगच्या कलाकौशल्याचे प्रदर्शन देहाचे प्रदर्शन मांडतील. अंत्यजाजवळ उत्तम कुळवान धनवान मनुष्य अन्न मागेल. निरनिराळ्या पार्ट्या, लाचलुचपत अंत्यजापासूनही उत्तम वरिष्ठ अधिकारी घ्यायला कमी करणार नाहीत. सर्व लोक विद्यावंत होतील. शाळा, विद्यालये, महाविद्यालये, प्रशिक्षणे यांचा सुळसुळाट होईल, निरनिराळे धंदे व्यवसाय, व्यापार, कारखाने वगैरे क्षेत्रात आमुलाग्र बदल होईल पण सर्वांचे मुळ पैसा उकाळण्याचे राहील; सचोटी, इमानदारी वा कर्तव्यनिष्ठा, जबाबदारी वगैरे कोणीही सांभाळणार

नाही. वकील, वैद्य वगैरे क्षेत्रात सुध्दां सचोटी राहणार नाही. रोगनिदान न करताच विनापरिणामी औषधोपचार करून रूग्णांकडून पैसे उपटतील. न्यायदान सचोटीचे राहणार नाही. जो अधिक पैसा देईल त्याच्या बाजूने न्याय मिळेल. ज्योतिष, भविष्यकथन, कुडबुडे ज्योतिषी वगैरे सर्व तथाकथीत होतील. ज्योतिष शास्त्राचा खगोलाचा भेद न जाणता अथवा त्याचे नियम अपवाद वगैरे न जाणता आपल्या मनाच्या हुशारीने वागतील व कथन केलेले भविष्य सर्व खोटे पडेल. अशाप्रकारे सर्वक्षेत्रात लोक विद्यासंपन्न अति हुशार प्रगतिशील असूनही वृथा स्वार्थ, भ्रष्टाचार,दंभ अहंकाराने व मानपानाच्या भूताने पछाडले जाऊन मूढ, मूर्ख आणि पापी बनतील अशा प्रकारचा हा कलिकाळाचा महिमा आहे. भीमा हे तू जाण आणि या गोष्टीचा नीट सूक्ष्मरीतीने विचार कर. (श्लोक ३४८-३६३)

कलियुग स्थितीचे वर्णन करतांना भगवान बुध्द पुढे म्हणाले, 'भांडखोर स्त्रिया आणि दुर्व्यसनी पापी पुरुष नित्य उठून भांडण करतील व त्याचा तो तमाशा - असत्याचरणाचा झगडा ऐकण्याकरिता लोक एकत्र जमतील. जे लोक स्वकष्टाने सचोटीने अन्न, धन मिळवून सुखासमाधानाने जीवन जगू पाहतील, त्यांचे अन्नही आणि धनही राजकर्ते पुरुष अन्यायाने बळजोरीने लुटतील अथवा दंड, कर वगैरेच्या रूपाने लोकांना लुबाडतील. शेतीकरिता खर्चासाठी लोक कर्ज काढतील, उत्पन्नांच्या अभावी कर्जे फिटणार नाहीत मग शेतांचा, घरादाराचा लिलाव काढून त्या कर्जाची वसुल केली जाईल. ज्यांच्याजवळ जमीन घरे वगैरे नसतील त्यांना स्वत:चे मुलं मुली विकून कर्ज भरावे लागेल. अशा प्रकारे गुलामांचा व्यापार सुरु होईल. लोक खोटे बोलून चोरी करून अन्यायाने बळजोरीने धनसंपत्ति जोडून लाचलुचपत देऊन अन्यायाची कामे करतील. कित्त्येक लाच खाऊन सुध्दा कुडकपट करून लुबाडतील. अशाप्रकारे सर्व व्यवहार खोटेपणाने दंभाचे चोरी हिंसा अनीतीचे होतील. जो सुपात्र असेल, ज्याला ज्या वस्तूंची अन्नवस्त्र निवारा धन वगैरेची अत्यंत जरूरी असेल व तो कोणापुढे हात पसरील तर त्याला लोक मारून पिटून अर्धमेला करून घालवून देतील पण जो कुपात्र आहे दुर्व्यसनी, दुराचारी, पापी, अत्याचारी, विषयांध, क्रोधी असेल त्याला सत्यात्मा, धर्मात्मा, मानून घरात बोलावून मानसन्मानाने पूजाअर्चा करून त्याचे चरण धुऊन प्राशन करतील अशाप्रकारची या कलियुगातील मानवांची विपरीत मति होईल. जेव्हा मातापिता आपल्याबालकाला विकतील तेव्हा मुलगा सुध्दां आपल्या पित्याचा शिरच्छेद करण्यास मागेपुढे पाहणार नाही. याचा अर्थच असा की मातापिता,

पुत्र, पतिपत्नि, कन्या, भगिनी वगैरे सर्व आप्तसंबंध नष्ट होतील, हेतभाव प्रेम, आत्मियता राहणार नाही. सत्यज्ञान उपदेश सल्ला कोणाला पटणार नाही. त्याची अवहेलना विटंबना करतील. पण दंभी कपटी स्वार्थी दुराचारी असत्य सल्लादेतील ते मात्र शिरोधार्य मानून त्याप्रमाणे वागतील व शेवटी फसतील. पुत्र असून आईबापांना अत्यंत हाल अपेष्टा भोगाव्या लागतील. जावई व सासू यांचा अनैतिक संबंध होऊन अनाचाराची प्रजा होईल, लैंगिकता व अपवित्रता सर्वत्र पसरेल जो जास्तीत जास्त चांगले खोटे बोलेल तोच श्रेष्ठ मान्यवर गणला जाईल. अशाप्रकारचा संभावित ढोंगी ठग समाजाचा गावाचा व देशाचा पुढारी होऊन सर्वांना लयाला घेऊन जाईल. मोठमोठ्या धार्मिक संस्था, शैक्षणिक संस्था, आरोग्यवर्धक संस्था, सहकारी व्यापार धंद्याच्या संस्था वगैरे सर्वक्षेत्रात अशा संभावीत ढगांची संख्या भरपूर प्रमाणात होवून जनतेला पीडण्या लुटण्याचे शोषणाचे कार्य करतील. आपले कुल, शील, जात, धर्म, स्थान, कर्तव्य वगैरे सर्व एका बाजूला गुंढाळून ठेवून वाटेल तसा अनाचार, दंभाचार, करतील. दुर्व्यसनी, स्वार्थांध होऊन नित्य कुडकपटाने व्यग्र असे समाज घातक, मानवघातक, कामे करतील. अंमली पदार्थ, मदिरा प्राशन करून भान हरपून पशुप्रमाणे आचरण, खाणे पिणे नाचणे, कुदणे वाटेल ते भक्षण करणे व पशुवत क्रिडा करणे यात मग्न होतील व शेवटी रोगग्रस्त होऊन अत्यंत हालअपेष्टा भोगतील पाणी न गाळताच वापरतील अतिथी अभ्यागत हितचिंतक आप्त मित्र वगैरेना मारून पिटून हाकून देतील पण समाजातले ठग, चोर, डाकू, अन्यायी, कुडकपटी, व्यभिचारी, यांना घरी बोलावून मोठा सत्कार करून मेजवान्या पाटर्या उडवतील व नंगानाच करतील. विवाहीत स्त्रीवर मुळीच प्रेम करणार नाहीत. पण परस्त्रीयांना घरात आणून प्रणय करून प्रेम करतील पण तोही स्वार्थापुरताच. बुध्द भगवान म्हणाले हे भीमा असे हे कलियुगाचे असत्याचरण होईल, त्याचे वर्णन करता करताच मला बोलण्याची सुध्दा लाज वाटते इतके ते दुर्गुणी आहे. तू हे ऐकून विचार कर आणि या कुडकपटी कलियुगात राहावे किंवा नाही हेआपल्या मनात पूर्ण विचारांती ठरव. (श्लोक ३६४-३७८)

हे भीमसेना या कलियुगात सर्वच क्षेत्रात व्यवसायात कुड कपटाचरण चालेल. कलियुगाचे साम्राज्यच कपटी आहे. राजा कपटी, त्याचा प्रधान, त्याचे सर्व पदाधिकारी व सर्व प्रजासुध्दा तशाच स्वरूपाची दंभी असत्याचरणी होईल. चोर साठेबाज आणि दगलबाजाचा सुळसुळाट होईल. तीर्थक्षेत्रे देवद्वार, मंदीरे, वगैरे ठिकाणी सुध्दा कुडकपटाचरण, दंभाचरण चालेल, लोकांना लुबाडण्याचा धंदा सर्रास सुरु होईल, सत्याचरण लोप पावेल,त्यांचे धर्माचरण, कर्माचरण सर्वच असत्य दंभी कपटी स्वार्थी राहील. घरातील

पितापुत्रांचे आचरण असत्य होइल, कन्या मातांचे आचरण भ्रष्ट होईल. आप्त इष्ट मित्र भाऊबंद वगैरे सर्व संबंध तुटतील. काळाबाजार, काळा पैसा व अधर्माची धनसंपत्ति, जुळवून देवमंदीर, धर्मशाळा, अन्नसत्र, सदाव्रते, अनाथालये, औषधालये, विद्यापीठे वगैरे सर्वच क्षेत्रात दंभाचरण असत्याचरण घुसून सर्व प्रजा नागविली जाईल. त्यांचे मनोरथ खोटे, त्यांची कामे खोटी, त्यांचे लक्ष खोटे, साध्य खोटे, मार्ग खोटे, देवसेवेची भावना खोटी, व्यापार खोटा संपूर्ण आचरण खोटे राहील. खरोखर या कलियुगात आपले सत्व सांभाळणे फार कठिण आहे. सत्वपालन करण्याचे मनुष्याच्या मनात कितीही जरी आले तरी बाह्याचारामुळे तो मनुष्य घसरला जाईल व कळत नकळत तो सुध्दां त्या दंभाचरणात गुरफटला जाईल. अशा या दंभी कपटी कुडाचरणी कलियुगात आपले मन दृढ स्थिर निश्चल पवित्र आणि सत्यान्वेषी होऊन हे भीमा सत्यधर्माप्रमाणे वागणारे जे असतील त्यांचा उत्कर्ष उन्नतीच होईल. तशा सद्भक्तांनांच सद्गुरुंची प्राप्ती होईल, सद्गुरुंच्या कृपाप्रसादानेच श्रीहरी नारायणाची भक्ति करून जीवात्मा मुक्त होतो. जो सद्भक्त पंचेन्द्रिये दमन करून शब्दस्पर्शादि पंचविषय जिंकतो म्हणजे त्या विषयांच्या आहारी न जाता त्यांचा परिमित रीतीने आसक्ति रहित उपभोग घेतो तो गृहस्थ जीवंतपणी वैकुंठपदाचे सर्व ऐश्वर्य भोगतो त्याकरितां हे सद्भक्त पांडवांनो तुम्ही पंचेन्द्रिय दमन करून मन निर्मल करा. हे कलियुग अत्यंत पापमय आहे, त्यात सर्वत्र पापाचरण व्याप्त झालेले आहे. मनुष्याचे मन फिरविणारे असे हे कलियुगाचे गुण आहेत. या संपूर्ण जगताला धारण करणारा असा जो सत्यधर्म आहे त्याचे क्रियाचरण करणाऱ्याला सुध्दां ढळविणारे, त्याची सत्वपरिक्षा घेणारे व निर्धारापासून ढळविणारे हे कलियुग आहे. हे राजा भीमा अशा या पापपरिमल व्याप्त कलियुगात राज्य करण्याचा मोह तुम्ही करूं नका. राज्याची आसक्ति बाळगूं नका. जोपर्यंत कळिकाळाचा पूर्ण प्रहर येत नाही म्हणजे खऱ्या अर्थाने कलियुगाला सुरुवात होत नाही तोपर्यंत राज्यकारभार आटोपता घेऊन त्यातून निवृत्त होण्याचा प्रयत्न करा. राज्याची पुढची तजवीज करून परिक्षीतावर त्याची धुरा सोपवून तुम्ही हिमालयात प्रस्थान करा. हिमालयात जाऊन योगसाधना करून परमेश्वर प्राप्ती व सायुज्य मुक्ति हेच ध्येय बाळगून त्याचे श्रेय संपादण्याचा प्रयत्न करा.' (श्लोक ३७९-३९२)

बुध्द भगवान भीमाला म्हणाले, 'हे भीमा मी तुला सत्य वचन जे आहे तेच सांगितलेले आहे. तू धर्म राजाजवळ जाऊन त्याला ही सर्व हकिकत जी तुला मी सांगितली ती कथन कर आणि कांही शंकाकुशंका असल्यास मी त्याचे निरसन करीन. हे भीमा मी तुला सत्यवचन सांगतो ते युधिष्ठिराला सांग. असे कितीही

जरी यज्ञ केले तरी त्यांच्यामुळे कर्मदोष टळत नाही उलट नविन कर्मे बांधली जातात, कर्मदोष केवळ एकाच उपायाने टळू शकतात. तो म्हणजे महात्मा सद्गुरुंच्या आशिर्वादाने व त्यांनी उपदेशिलेल्या आत्मज्ञानाच्या श्रवण मनन निदिध्यासनाच्या योगाने आत्मचिंतन करून आत्मौपम्य बुध्दीचा अवलंब केल्यानेच पापपरिमल दोष निवारण होतो. हृदयशुध्द होते. त्यात निर्मल ज्ञानाचा उदय होऊन मनुष्य कर्मदोषापासून निर्लिप्त होतो. यासाठी युधिष्ठिर इथे आला अथवा मी तिथे गेलो तर त्याला हे सर्व सांगता येईल नाहीतर शेवटपर्यंत तुम्हाला पश्चाताप करावा लागेल.' बुध्दाचे हे वचन ऐकून भीम मनात चिंता करू लागला. काय निर्णय करावा हे त्याला समजत नव्हते. भीमाला पूर्णपणे खात्री झालेली होती की हा दिसायला जरी अमंगल असला तरी त्याची वाणी अमृतोपम हितोपदेशाचीच आहे. प्रत्यक्ष त्रिभुवनाचा स्वामी श्रीकृष्ण भगवंताचीच ही वाणी आहे आणि त्या दयाळू कृपाळू भगवंताची आम्हापांडवावर पंडू वंशजावर सदैव कृपा आहे. त्याच्या कृपाछत्रानेच महाघोर भयानक अशा कुरुक्षेत्रावर आम्ही पांडव जिवंत राहून विजयी होऊ शकलो. प्रत्येक वेळोवेळी जी जी कांही संकटे, प्रसंग आमच्यावर आलेत त्या सर्वांमधून त्याच दयाळू भगवंताने आम्हाला सुरक्षित ठेवले आहे. आमच्याकरिता तो स्वत: आपले पद सुध्दा विसरला एवढा त्रिभुवनाचा स्वामी पण आमच्यावर त्याची कृपा म्हणून त्याने अर्जुनाचे घोडे हाकले. तोच हा जगज्जीवन आज आमच्या हिताचा उपदेश करण्यासाठी घरी चालत आलेला आहे व आमच्या उध्दाराची केवढी ही तळमळ त्याला लागलेली आहे. खरोखर धन्य होय आमचे भाग्य. प्रत्यक्ष गंगा आमच्या घरीच अवतरली. हे योगेश्वरा मी तुला एक विनंती करतो की मी ही सर्व हकिकत धर्मराजाजवळ जाऊन सांगतो तोपर्यंत तू इथे थांब. युधिष्ठिराने माझ्यावर जी जबाबदारी टाकलेली आहे ती निभावण्यासाठी मला त्याच्या आज्ञेचे पालन करावेच लागणार पण आपण सांगता तो हितोपदेश त्यापेक्षाही महत्वाचा आहे. पण मी वचनाने बांधला गेलेलो असल्याने आपणाला यज्ञामध्ये एकदम जाऊ देणे योग्य नाही मी आधी धर्मराजाची आज्ञा घेतो. त्याची इच्छा असल्यास ते इथे येतील अथवा मला परवानगी मिळाल्यास मी तुम्हाला आत घेऊन जाईल. तोपर्यंत दोनचार घटिका याठिकाणीच बसावे. अशी माझी हात जोडून नम्र विनंती आहे. मी इथे येण्याच्या आत जर तुम्ही बाहेर निघून गेलात अथवा यज्ञस्थानाजवळ आलात तर तुम्हाला धर्मराजाची आण आहे.' अशाप्रकारे बुध्दाला आण बध्द केल्यावर भीम ताबडतोब लगबगीने यज्ञवेदीजवळ गेला. ब्राम्हण मोठमोठ्याने मंत्रघोष करून आहुत्या टाकीत होते. धर्मराजाने भीमास लगबगीने येतांना पाहताच आश्चर्य वाटले

व स्वत:सही नकलत तो एकदम उभाच राहिला. बाकीचे सर्व पांडव व ब्राह्मण सुध्दां विस्मयात पडले. काय झाले असावे भीम धावत कां आला धर्मराजा एकदम उठून उभा कां राहिला. याचे सर्वांनाच कोडे पडले व जो तो त्या दोघांकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहू लागला एवढ्यात भीम जवळ आला व हात जोडून धर्मराजास म्हणाला. (श्लोक ३९३-४०७)

धावत पळत आलेल्या भीमास धर्मराजा म्हणाला, 'अरे भीमसेना एवढ्या लगबगीने का आलास? कांही नवलवृत्तविशेष आहे काय? तेव्हा भीम म्हणला, 'हो! विशेष आहे म्हणून तर आपणास विदीत करण्यास आलो आहे. आपल्या यज्ञमंडपाच्या द्वारी एक अतिथी अभ्यागत आलेला आहे.' धर्मराजा म्हणाला, 'मग त्यात काय विशेष. त्याची सेवा चाकरी करून त्याच्या इच्छेस अनुकूल पडेल ते त्यास दान देऊन संतुष्ट कर.' भीम म्हणला, 'महाराज ते तर माझे कर्तव्यच आहे. आपण मला नेमून दिल्याप्रमाणे ते काम तर मी उत्तम रीतीने करीत आहे पण हा अभ्यागत कांही वेगळ्याचं प्रकारचा आहे. तो सर्व प्रकारचे आगम निगम ज्ञान कथन करीत असून आपणास एक संदेश पोहोचविण्यासाठी त्याने मला आपणाजवळ पाठविलेले आहे.' धर्मराजा आश्चर्यचकित झाला. चारही भाऊ यज्ञवेदीपासून उठून भीमाला घेऊन एकांतात गेले व तिथे भीम त्यांना सांगू लागला की 'अलौकिक अशा त्या परमहंस परिव्राजकाने सांगितले आहे कीं हे पांडवांनो आता कलियुगाला सुरुवात होत असल्याने तुम्ही यज्ञ बंद करून हिमालयात प्रस्थान करा. राज्योपभोगाचा मोह करू नका. कुलगोत्रहत्या, बंधुहत्या, वगैरे हे सर्व तुम्ही मनाने मानलेले पातक आहे ते मन शुध्द, पवित्र योग साधना केल्यानेच निवारण होईल. अशा यज्ञ यागांनी होणार नाही. अतिशय भयानक व दुस्तर अशी ही कलियुगाची स्थिती आहे. त्यात सत्यधर्माने वागणे तुम्हाला अतिशय कठिण पडेल. अशाप्रकारे त्या अलौकिक दिव्य पुरुषाने मला सांगितले आहे.' हे ऐकून चारही भाऊ विचारू लागले हा अभ्यागत कोण बरे असावा? भीमा तू त्याला त्याचा परिचय नाही का विचारलास?' तेव्हा भीम म्हणाला, 'बंधुनो त्याचा परिचय वगैरे कांही नाही, तो परमहंस आहे, दिसायला अगदी कुरुप अमंगळ आहे. त्याचा देह अत्यंत विकृत आहे, तोंड पक्ष्याच्या चोचीसारखे पुढे आलेले, हातपाय वाकडेतिकडे कुबड निघालेले असे हे अष्टावक्र स्वरूप असून अतिशय दुर्गंध त्याच्या शरीराचा येतो की त्याच्याजवळ उभे सुध्दा राहाता येत नाही अशाप्रकारचा गलिच्छ मलीन त्याचा देह आहे पण मुखातून हिरेमाणिक रत्न मोलांचा एकेक शब्द निघतो की त्याचे मोलच करता येत नाही. अशाप्रकारची अलौकिक

दिव्य अमृतवाणी त्याची आहे. चौदा भुवनातल्या साऱ्या घटना जाणून तो सांगतो. प्रत्यक्ष वैकुंठपति भगवान श्रीकृष्णाच जणू काय या बुध्द रूपाने अवतरलेला आहे, असेच मला वाटते. त्याने मला एवढ्या गोष्टी सांगितल्या विचारल्या पण माझ्याने उत्तर कांही देता आले नाही. प्रत्यक्ष भगवंताचाच तो अवतार असावा व आपणास मार्गदर्शन करण्याकरिताच तो आलेला असावा असे मला निश्चित वाटते.'

(श्लोक ४०८-४२१)

भीम म्हणाला, 'बंधुनो, मी त्याची सर्वतोपरी विचारपूस केली पण तो अन्न घेत नाही, दान घेत नाही, हत्तीघोडा, वाहन, धनसंपत्ति, घर, शेत, गाई वगैरे काहीही घेत नाही. तो म्हणतो हे सर्व घेऊन मी काय करू? कोठे आणि कोणाकरिता ठेवू, मला यातील कांहीही नको. मी असे ऐकले आहे की धर्मराजा पुण्यशील सत्यवादी असून अतिथी अभ्यागताचे दर्शन घेऊन सत्कार करतो. त्याने मला असाही संदेश सांगितला आहे की या यज्ञामुळे तुमचे पातक निवारण होणार नाही.आता कलियुगात अथर्ववेदाला प्राधान्य असल्याने युगधर्मानुसार प्रचलित असलेल्या पूजा अर्चेने आणि ज्ञान ध्यान साधनेनेच पातक निवृत्ती होईल. हे अथर्ववेदाचे मुख्य तत्वच ब्राह्मण विसरलेले आहेत. आणि केवळ जात्यहंकाराने प्रेरीत होऊन भ्रमात पडलेले आहेत व त्यांनीच अठरा जातीच्या लोकांना म्हणजे सर्व मानव प्राणिमात्राला संभ्रमात टाकलेले आहे. माझ्या या स्वरूपाला चांडाळ समजून माझी ते अवज्ञा करीत आहे. माझ्या अवतारपात्राला ते जाणत नाही. माझ्या दिव्य अशा जन्म व कर्माच्या तत्वाला न जाणता अथवा माझ्या स्वरूपज्ञानाची पूर्ण जाणीव न घेता माझी निंदा करतात, अवज्ञा करतात त्याहून दुसरे चांडाळ अन्य कोण असणार? आणि खरोखर हे धर्मराजा परमेश्वराच्या अवतारास न जाणता त्याचे वचन न मानता आपली खरोखरच फसगत झालेली आहे. ब्राह्मणांच्या वचनास प्राधान्य देऊन आपण यज्ञ आरंभिला पण एक असफळ झाला हा दुसरा उभारला तोही तडीस जातो किंवा नाही याची शंकाच आहे. त्यापेक्षा त्या बुध्द भगवंताच्या वचनाप्रमाणे वागून आपण मुक्त का होऊ नये? असे माझे प्रांजळ मत आहे.' भीमाचे वचन ऐकून चारही जण आश्चर्यचकित झाले. धर्मराजा तर चिंतेने व्याकुळ झाला. केविलवाण्या नजरेने सहदेवाकडे बघून धर्मराजा म्हणाला, 'हे भ्रात्या सहदेवा, ज्योतिष पाहून तू मला सत्य सांग हा अलौकिक दिव्य पुरुष कोण असावा बरे? सहदेवाने लागलीच ग्रहगतीचे गणित करून भविष्य कथन केले तो म्हणाला, 'धर्मराजा माझे ज्योतिष सांगते की हा खरोखरच अलौकिक दिव्य पुरुष आहे. प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवंतांनीच

हा नववा बुध्दअवतार धारण केलेला आहे. भगवान श्रीकृष्णांनी आपल्या उध्दारांचे अपूर्ण राहिलेले कार्य जाणून ते पूर्ण करण्यासाठी हे रूप धारण केलेले आहे. हे राजा, भगवंताची आपणावर अपरिमित असीम कृपा आहे. अनंत यज्ञ करूनही भगवंताची प्राप्ति होणे दुरापास्त असते. पण कृपाळू अशा भगवंतांनी आपल्या उध्दाराकरिता केवढे हे श्रम घेतलेले आहे. सोडावा हा यज्ञ आणि या यज्ञात खरोखरच काही त्राण राहिलेला नाही. पातक निवारण होऊन भगवंताच्या प्राप्तीकरीतां करायच्या यज्ञापेक्षा प्रत्यक्ष भगवान द्वारी उभा असून त्याचे दर्शन न घेतले तर आपणास खचित पश्चाताप करण्याची पाळी येईल. यासाठी बंधूनो असा प्रसंग वारंवार उपस्थित होत नाही. आपण सारे त्या भगवंताच्या दर्शनास जाऊ. ही ब्राह्मण मंडळी भान विसरलेले आहेत. आपणास त्यांनी सांगितले होते की हा यज्ञ भंग करण्यासाठी एक चांडाळ येईल, तो चांडाळ दुसरा तिसरा कोणी नसून प्रत्यक्ष भगवंताचा बुध्द अवतारच आहे. हे ब्राह्मण त्या अवताराचे स्वरूप न जाणता त्याची अवहेलना करू लागले. सत्य धर्म जाणणारे वेद पारंगत सकळ विद्यावंत असूनही केवळ स्थार्थाकरीता ते खोटे बोलू लागले. वेदांताचा पोकळ आव आणून बाष्कळ गप्पा करायला लागले, यज्ञयाग होम हवन हे कर्मकांडच केवळ मोक्षाचे साधन असे लोकांना सांगून सत्यधर्मापासून त्यांना परावृत्त करू लागले. प्रत्यक्ष श्रीकृष्णाच्या अमृतोपम उपदेशास न जुमानता श्रुतिस्मृति पुराणांचा आधार घेऊन सद्भक्तांची मुक्तिमार्गाची वाटचाल बंद करून कर्मकांडाच्या व ऐहिक सौख्यदायक देवदेवतांच्या उपासनेच्या नादात लावून दिशाभुल करू लागले. अवतार पात्राचा निषेध करू लागले. बुध्द अवतार हा नास्तिक, चार्वाक, चांडाळ असे म्हणून त्यांची अवहेलना करू लागले तरी हे बंधूनो माझी आपणास अशी विनंती आहे की या यज्ञाचा त्याग करून भगवंताचे द्वारावरील अभ्यागताचे पाय धरावे त्यात आपले श्रेय आहे. जीवनाचे सार्थक आहे. (श्लोक ४२२-४३६)

युधिष्ठिर व सर्व पांडवांचा निर्धार झालेला पाहून ब्राह्मण पुढे आले व त्यांना अडवून म्हणाले - 'युधिष्ठिरा, यज्ञ अपूर्ण सोडून तुम्ही कोठे जात आहांत? यामुळे यज्ञाचे श्रेय लाभणार नाही. आपला सनातन मार्ग सोडून आपण हे विपरीत काय करीत आहात. अनादि काळापासून चालत आलेला यज्ञयागाचा सर्वश्रेष्ठ असा मार्ग आहे. त्यामुळे पापनिवृत्ति होऊन पितृगण देवगण प्रसन्न होतात व आपल्या त्रिविध तापाची शांति होते. अशा प्रकारचा सर्वोत्कृष्ट मार्ग सोडून तुम्ही त्या नास्तिक बुध्दाचे पाय धरण्यास जात आहात हे तुम्हास शोभत नाही. त्याची यज्ञयागात आस्था नाही.

ब्राह्मणाविषयी पूज्य बुध्दि नाही. सनातन काळापासून चालत आलेल्या आपल्या आर्यसंस्कृतीला जो पूज्य मानत नाही व स्वमतानुसार बुध्दि वादाचा स्विकार करून बुद्धिबळाने लोकांना आकर्षित करून भुलवितो अशा मलीन आचरणाच्या गलिच्छ देहाच्या आणि छलबुध्दीच्या चार्वाकाला शरण जात आहात हे योग्य नाही व यामुळे तुमचा कार्यभाग होणार नाही.' ब्राह्मणांचे वचन ऐकून युधिष्ठिर संभ्रमात पडला. काय करावे हे त्याला मुळीच सुचेनासे झाले. ब्राह्मणाच्या म्हणण्याप्रमाणे तो खरोखरच बुध्दिभ्रंश करणारा असला, तर आपली त्रिशंकुसारखी गती होईल म्हणून चिंतातूर होऊन तो विचार करू लागला. एवढ्यात सहदेव म्हणाला, 'ज्येष्ठ भ्राता तू चिंता करू नकोस. मी आपणास सत्य विचार सांगतो त्याप्रमाणे करू या. आज आपण या ब्रह्मवृंदांचे वचनाप्रमाणे वागलो तर पश्चात्ताप करण्याची पाळी आपणावर येईल. प्रत्यक्ष भगवंताचे दर्शन घेण्याचे सोडून दगडाधोंड्यात ईश्वरत्व शोधण्यातच व त्याची पूजाअर्चा बांधण्यात काय अर्थ आहे. ज्या भगवंताने ही सृष्टी, आकाश, जल, वायु, चन्द्र, सूर्य, चारखाणी, चौर्यायशी लक्ष जीवयोनी निर्माण केलेल्या आहेत,' ज्याने अष्टकुळ पर्वत, नवकुळ नाग, अठराभार वनस्पती, नक्षत्र, राशी, नवग्रह, तारामंडल रचलेले आहे, ज्याने नऊशेनव्वाणव पवित्र नद्या, सरोवरे, तळी, समुद्र, सप्तसागर निर्माण केलेले आहे. हे सर्व निर्माण करण्यास व नष्ट करण्यासही ज्याला कोणत्याही प्रकारचा वेळ लागत नाही तो जगत्स्त्रष्टा जगन्नियंता भगवंत आपल्या यज्ञद्वारी येऊन उभा राहिलेला आहे. त्या भगवंताने ह्या जगत्कार्यासाठी धारण केलेल्या अवतारापैकी हा नववा बुध्द अवतार आहे. आज हे ब्राह्मण त्याला चांडाळ म्हणून समजत आहेत. पण तो वस्तुत: ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य, शुद्र, म्लेंच्छ, चांडाळ वगैरे जातीभेद वर्णभेद विरहीत आहे. सर्व जगत् त्यानेच निर्माण केलेले असून त्यात रमणाराही तोच आणि साक्षिभूतही तोच आहे. आपण ज्या प्रेमभाव श्रध्देने हा यज्ञ करीत आहोत त्याचेच फळ आपल्याला लाभलेले आहे ते असे की त्या भक्तिबळाने भगवंताने आपल्यावर कृपाकरून दर्शन दिले आहे व आपल्या उध्दाराचा हेतू धरून प्रत्यक्ष आपल्या द्वारी आलेले आहेत. आपले सदैव अव्याहत कल्याण व्हावे आपली जन्मजन्मान्तराची भ्रमन्ति मिटावी या करिता केवढी तळमळ त्या भगवंतास आहे. खरोखर आज आपण धन्य झालो आपला जन्म कृतार्थ झाला.' (श्लोक ४३७-४५१)

पांडवांचा तिकडे एकांतात विचारविनिमय चाललेला असतांना ब्राह्मण इकडे यज्ञवेदीजवळ आपापसात चर्चा करू लागले. असा कोण बरे भिक्षु आला असावा यज्ञद्वारावर! खरोखर धर्मराजा भाविक आणि भोळा आहे. कदाचित युक्ति प्रयुक्तिने त्याला कोणी भुलविल्यास तो यज्ञही सोडून देईल व यज्ञ अपूर्ण राहिल्यास आपणही दोषी ठरू आणि आपला दानदक्षिणेचा लाभ सुध्दां जाईल. यापेक्षा त्याची समज घालून आपण आपले कार्यभाग उरकून घ्यावे असा विचार करून ते धर्मराजाला व पांडवांना बोलावू लागले. तेव्हा भीम म्हणाला, 'धर्मराजा त्या अभ्यागताने मला मुद्दाम तुझी आज्ञा घेण्यासाठी पाठविले आहे की, तुमचा यज्ञ जाणून मी आलेलो आहे, एक तर मला यज्ञवेदीजवळ जाऊ द्यावे अथवा धर्मराजाला बोलावून येथे घेऊन यावे. माझी एकमेव इच्छा धर्मराजाचे दर्शन घेण्याची आहे तेच एक दान मला हवे आहे. दुसऱ्या कशाचीच मला इच्छा नाही.' धर्मराजा म्हणाला, 'भीमा मला पूर्ण विचारांति समजून आले आहे की तो सामान्य अतिथी नाही. प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवंतानेच ते रूपधारण केले असून आपणावर त्याची पूर्ण कृपादृष्टी आहे. भीमा तू ताबडतोब परत जा आणि त्या अभ्यागताला थोपवून ठेव. अत्यंत आदर प्रेमभावाने त्याची सेवा पूजा कर जे मागेल ते त्याच्यासमोर हजर कर. त्याच्या सेवेत कोणतीही उणीव पडू देऊ नकोस आणि दोनही हात जोडून माझी नम्र विनंती त्याला कळव की क्षणाचाही विलंब न करता धर्मराजा आपल्या सेवेत दाखल होत आहे. आपण नाराज होऊ नका. त्यांच्या मिलनाविषयी माझ्या मनात अत्यंत आदर आहे. मी लवकरच आपल्या सेवेस येतो. भीमा ताबडतोब जाऊन हा संदेश तू त्या बुध्द देवांना सांग उशीर करशील तर ते निघून जातील. असा संदेश भीमाजवळ देऊन धर्मराजा यज्ञवेदीजवळ ब्राह्मणाकडे गेला. वेदमंत्रांचा उच्चार करीतच ब्राह्मणांनी धर्मराजास विचारले, 'राजा तू स्थिरबुध्दीचा संयमी वृत्तीचा असूनही ही चंचलता तुझ्या मनात कां आली. यज्ञ अपूर्ण टाकून तू कोठे निघालास? तुला यज्ञाचे महात्म्य अथवा विधीनिषेध माहीत नाही कां?' धर्मराजा म्हणाला, 'यज्ञेश्वर पंडितांनो ब्रह्मवृंदहो! मला यज्ञाचा महात्म्य विधीनियम सारे काही माहित आहे व माझे मनही चंचल नाही पण यज्ञ द्वारावर एक अतिथी असा आलेला आहे की तो फक्त माझ्या दर्शनाचेच दान मागत आहे. त्याचा देह दुर्बल आहे पण वाणी ब्रह्मज्ञानाची आहे. आत्मज्ञानाचा द्रष्टा असा अलौकिक दिव्य पुरुष केवळ धर्मराजाच्या दर्शनाची कामना मनात करून आलेला असल्यावर त्याच्या सेवेस हजर होणे माझे कर्तव्य आहे व त्यासाठी आपण मला तेथे जाण्याची अनुज्ञा द्यावी.' पंडीत म्हणाले, 'राजा आम्हाला

हे समजत नाही की आज आपल्या बुध्दीत हा भ्रंश कां झाला? तू सत्यवादी आहेस, धर्मवेत्ता आहेस, आज हा यज्ञ अपूर्ण सोडून बाहेर जात आहेस हे तुला शोभत नाही. कोणताही विधी पूर्ण होण्याच्या आधीच सोडून देणे व दुसऱ्याच्या पाठीस लागणे हे शहाण्या माणसाचे कर्तव्य नाही. हा यज्ञ पूर्ण होऊ दे मग तुला वाटेल त्या अतीथीच्या सेवेस लाग.' पंडितांचे म्हणणे राजाला आवडले नाही कारण ते युक्त नव्हते. म्हणून राजा पंडितांना म्हणाला, ब्रह्मवृंद हो माझ्या मनात आपल्या विषयी तीळभरही दुष्टबुध्दी नाही. आपण मला सदैव वंदनीय व पूज्य आहात. आपणा सर्वांची आम्हावर सदैव कृपादृष्टी आहे हे आमचे भाग्यच थोर असे आम्ही समजतो. आपण उभारलेल्या यज्ञाची अवज्ञा उपेक्षा करून आम्ही जात आहोत असाही आमचा हेतू नाही पण केवळ एकच भावना आम्ही उराशी बाळगतो की ज्या भगवंताने अपार कृपा करून आजपर्यंत आमचे वेळोवेळी कठीण प्रसंगातून रक्षण केले तो आमचा हितकर्ता, साह्यकर्ता प्रेमळ कृपाळू भक्तोध्दारक करूणाकर प्रभू आमच्या द्वारावर उभा आहे त्याचे दर्शन घेण्यास जाण्याची आम्हास आपली अनुज्ञा असावी. आपण आज्ञा दिल्यास उत्तमच. आपण आम्हास कृपा करून अडवू नका.' पंडीत म्हणाले, 'राजा धर्मा तसे करणे तुला उचित नाही. ही धर्माची अवज्ञा आहे.' धर्मराजाचा नाईलाज झाला पण अर्जुन सहदेवादि इतर भावांनी मात्र स्पष्ट सांगितले 'जे धर्मयुक्त आहे नीतियुक्त आहे तेच आम्ही करीत आहो. आम्ही त्या अभ्यागताच्या दर्शनास जाऊच हे निश्चित.' हे वचन ऐकतांच पंडितांना रागआला व दुर्मुख होऊन ते बाजूस जाऊन आणखी विचार करू लागले. (४५२-४६७)

पांडवांचा निर्धार पाहून पंडीत लोक चिंतातूर झाले. त्यांना समजून आले की आता हे यज्ञ सोडून गेल्याशिवाय राहणार नाही. आणि बुध्दाला मिळाल्यानंतर यज्ञ बंद झाल्याशिवाय राहणार नाही. त्यापेक्षा कोणत्याही उपायाने यांच्या चित्तात बुध्दाविषयी अनास्था उत्पन्न होईल असे करावे, असे ठरवून ते धर्मराजाला म्हणाले, 'राजा, तुमची इच्छाच आहे तर भलेही त्या अभ्यागताचे दर्शनास जा पण आम्ही सांगतो ती गोष्ट चित्तात धारण करा. प्रथम तुम्ही सर्वांनी गंगाजलाने स्नान करावे, नंतर यज्ञद्वारापर्यंतची संपूर्ण जमीन तीर्थजलाने सींचन करावी. (सडा संमार्जन करावे) त्यावर पवित्र पायघडीवस्त्र टाकून अंगावर गंगाजल शिंपडत जावे. तुमच्या पाठोपाठ ब्राह्मण मंत्रपाठ म्हणत चालतील अशा प्रकारे या विधीने चालत जाऊन तुम्ही त्या बुध्दापर्यंत जावे पण त्यापासून लांबच राहून बोलावे त्याच्याजवळ जाऊ नका, कारण तो

अमंगळ आहे, चांडाळ आहे तुमच्या सारख्या सत्यवादी परमपवित्र व पुण्यश्लोक राजांनी तशा चांडाळाचे म्लेंच्छाचे मुख पाहणे अगदी अयोग्य आहे. जो वेदांची निंदा करतो, वैदिक यज्ञयागाची अवज्ञा करतो, ब्राह्मणांची अवहेलना करतो त्याला तुम्ही अवतार समजून पूजा करण्याकरिता जात आहात हे अगदी अनुचित आहे पण तुमचा हा राजहट्ट आहे. त्याला आमचा नाईलाज आहे. तेवढ्यासाठी निदान एक काम करा कीं तुमच्या डोळ्यावर गळीच्या रंगाचे काळे सात पडदे बांधा ज्यायोगे त्या चांडाळाचे मुखावलोकन तुम्हाला घडू शकणार नाही. आणि तो खरोखरच भगवताचा अवतार असला तर ते काळे पडदे बदलून पांढरे होतील कारण शुक्लवर्ण भंगवंताच्या समोर काळावर्ण राहात नाही तो उजळून निघतो. तरीही हे राजा आमची तुम्हाला विंनती आहे की त्या दुष्टदेही अभ्यागताजवळ जाऊ नये. तो फार दुर्मुख आहे. असे आम्ही एकले आहे.' धर्मराजा म्हणाला, 'विद्वत्जनहो, आपली आज्ञा शिरसावंद्य आहे. आपल्या आज्ञेप्रमाणे आम्ही गंगोदकाने स्नान करून, मार्ग पवित्र करून, मंत्रघोषाने युक्त होऊन डोळ्यावर गळीचे सात पडदे सुध्दां बांधतो पण द्वारी आलेल्या अभ्यागताला भेटून त्याचा योग्य असा आदरभाव सत्कार करणे हे आमचे कर्तव्य आहे ते आम्हाला करायलाच हवे व ते करण्यास आपण आम्हाला अनुमती द्यावी. (श्लोक ४६८-४८१)

धर्मराजाने ब्राह्मण पंडितांच्या आज्ञेप्रमाणे करण्याचे ठरविले. गंगोदकाने स्नान करून ज्यामार्गाने त्यांना यज्ञद्वारावर जायचे होते त्यावर त्यांनी गंगोदक शिंपडले. डोळयावर काळे सात पडदे बांधले व पायघडी वस्त्रावरून ते चालू लागले. त्यांच्या पाठोपाठ ब्राह्मण मंत्रपाठ म्हणू लागले. पंडितांच्या वचनावर श्रध्दा ठेवून त्यांची अवज्ञा होऊ नये म्हणून राजाने हे सर्व करण्यास दुर्लक्ष केले नाही आणि ब्राह्मणांच्या कपटबुध्दीकडे त्याने लक्षसुध्दां दिले नाही. अतिशय श्रध्देने भक्तिभावाने धर्मराजा व त्याचे इतर तीन भाऊ ब्राह्मणसंघाबरोबर मंत्रघोष ऐकत ऐकत यज्ञद्वाराजवळ येऊन पोहोचले. यज्ञद्वारावर उभा असलेल्या भीमाने त्या सर्व संघाकडे बघताच ब्राह्मणांचे कपट त्यास समजून आले. आपल्या भावांनी डोळ्यावर बांधलेले काळे पडदे बघून भीमाला ब्राह्मणांचा फार राग आला. रागातिशयाने डोळे गरगरा फिरवीत भीम गरजला 'अरे कपटी पंडितांनो तुम्ही ब्राह्मण असून अशा हीनबुध्दिचे आहात पण तुम्हास असे वागल्यामुळे शाप मिळेल तेव्हा मात्र पश्चाताप करण्याची पाळी येईल. धर्मराजा भाविक भोळा म्हणून तुम्ही त्याची ही अशी धींड काढली पण लक्षात असू द्या हेच तुमचे कर्म तुम्हास भिक्षा मागण्यास कारणीभूत होईल.' धर्मराजाला आपल्याकडे

येत असलेला पाहून बुध्द भगवान पुढे झाले. ते म्हणाले, 'पृथ्वीपते धर्मराजा हे पडदे डोळ्यावर बांधून तोंड लपवीत आणि अंगावर पाणी शिंपडीत येण्याचेकाय कारण घडले. तुमच्या मनात कांही संशय शंकाकुशंका आहे काय? एकदा डोळे उघडून पहा म्हणजे तुम्हाला ब्राह्मणांचे कपट समजून येईल. तुमच्या डोळ्यांवर बांधलेले पडदे तर नकली आहेत ते केव्हाच निघून जातील - फाटून जातील पण तुमच्या मनावर चिकटलेला संशयाचा पडदा मात्र सहजासहजी निघणार नाही. आणि तोच पडदा दूर करून शुध्द सात्विक पवित्र अशा 'माझे' दर्शन करवून देण्यासाठीच मी आलेलो आहे. त्यासाठी हे सद्भक्तांनो आता पुरे करा हे सारे पंडितांचे पोरखेळ. एखाद्या अजाण मुलाला बुजगावणे दाखवावे तसे या पंडितांनी तुम्हास बुजगावणे दाखवून लुबाडलेले आहे. त्याचा परिणाम त्यांना लवकरच दिसून येईल पण आता तुम्ही मी सांगतो त्याप्रमाणे करण्यास तयार व्हा.' धर्म राजा म्हणाला, 'स्वामीन आम्ही पतीत आहोत. पापी कुळगोत्र गुरुजनहत्या करणारे दुष्ट आहोत. कुरुक्षेत्रावर हजारो निरपराध गरीब जनतेचा बळी पाडणारे आम्ही खुनी हिंसाखोर अपराधी आहोत. केवळ राज्यसुखाच्या आशेने अनेकांचा संसार उध्वस्त होण्यास आम्ही कारणीभूत झालेलो आहोत. म्हणून अशा पापी लोकांचे दर्शन आपणास घडू नये म्हणून तोंड लपवीत हे पडदे बांधले, गंगोदकाने प्रक्षोपन करून शुध्द पवित्र होण्याचा प्रयत्न केला. आता स्वामी आमची उध्दाराची दिशा आपणच. आपण आमचे सुकाणू होऊन आमची जीवननौका पैलतिराला लावा एवढे पदर पसरून आपणापुढे भीक मागतो.' अत्यंत सद्‌गदीत कंठाने धर्मराजाने केलेली विनंती ऐकून बुध्द भगवंताने आपल्या अमृतमय कृपादृष्टीने त्यांच्याकडे पाहताच सातही काळे पडदे पांढरे होऊन एकामागून एकअसे खाली गळून पडले. पांडवांना तर आश्चर्य वाटलेच पण सर्व ब्राह्मणांना भयमिश्रीत आश्चर्य वाटले. त्यांची भीतीने गाळण उडाली. मंत्र तोंडातल्या तोंडातच जिरले, खाली माना घालून ते तेथून पळ काढू लागले. इकडे पांडवांच्या डोळ्यावरील झापड निघताच त्यांना बुध्द भगवंताचे दर्शन घडले. निर्निमेष नजरेने धर्मराजा त्यांच्याकडे पाहून अत्यंत करूणेने त्यांना विनवू लागला. (श्लोक ४८२-५००)

ब्राह्मणांनी बुध्दाच्या त्या विकृत स्वरूपाकडे बघताच नाके मुरडली. तोंड कडवट करून नाके झाकून ते 'अरेरे काय हा चांडाळ येथे उभा आहे. असे म्हणत तेथून पळाले आणि धर्मराजा व पांडवांना दोष देत निघून गेले. त्यांना निषेध करीत जातांना पाहून सहदेव म्हणाला, 'अहो ब्रह्मवृंद हो तुमची अशी दुःखकारक दुस्थिती

कां झाली, तुम्ही पळून कोठे जात आहांत. भगवंतांच्या अवतारपात्राची ज्यांना शुध्द नाही आणि जे अवतारालाच जाणत नाहीत ते कधीच सुखी होत नाही. त्यांच्या चित्तात समाधान नसल्याने समृध्दता होत नाही व त्यांना पोट भरण्यासाठी मुठभर भिक्षेकरीता दारोदार भटकावे लागते. यासाठी ब्रह्मवृंद हो आपण या भगवंताच्या मलीन स्वरूपाचा निषेध करूं नका. हे मलीनत्व भगवंतांच्या स्वरूपाची जाणीव करवून घेण्याची, श्रध्दा व भक्तीची कसोटी आहे. परीक्षा आहे. हे बाह्य कवच आहे, खरे अंतरंग स्वरूप नाही. तुम्ही त्या ब्रह्मस्वरूपीचे अंतरंग ज्ञानदृष्टीने शोधाल तर तुम्हाला आपल्या ब्राह्मणत्वाचा वृथा अभिमान कळून येईल.'

मुख चंचुप्रमाणे, हातपाय वाकडेतिकडे, दुर्बल व गलिच्छ देह धारण केलेल्या भगवंतास उभे असलेले पाहून धर्मराजाने खाली दंडवत पडून त्यांना साष्टांग प्रणाम केला. सर्व पांडवांनी परमेश्वरचरणी मस्तक नमवून हात जोडून नमस्कार केला. अत्यंत करूणार्द्रतेने ते- कळवळून भगवंतास म्हणाले, 'हे करूणाकर स्वामी आज खरोखर आमचे कुळ धन्य धन्य झाले. आज आमच्या घरी अंगण पवित्र करणारे अभ्यागत येऊन आम्हाला पावन केले.' धर्मराजा आपल्या भावांना म्हणाला, 'प्रेमी बंधूंनो, आपल्या घराला, कुळगोत्राला वंशाला आणि आपल्याला सुध्दां पावन करण्यासाठी पतीतपावन त्रिभुवननाथ आपल्या घरी आलेले आहेत. त्यांची सेवा पूजा आणि योग्य आदर सत्कार आपण करायला हवा. सर्व प्रकारचा आळस सोडून लज्जेचा आणि मानबढाईचा त्याग करून अत्यंत लीनतेने नम्रतेने भगवंताला शरण जाऊन त्याची आज्ञा शिरसावंद्य मानू आणि या परमपावन चरणांची सेवा करू या.' असे म्हणून धर्मराजाने बुध्द भगवंतांच्या चरणांची धूळ मस्तकी धारण करून अत्यंत गद्‌गद्‌वाणीने विनवू लागला. भगवान बुध्द म्हणाले, 'राजा युधिष्ठिरा आणि सद्भक्त पांडवांनो धन्य आहे तुमच्या वंशाची, मातापित्याची आणि तुमचीही. ज्याचे माता पितरेच पवित्र, तपस्वी आणि तेजस्वी आहेत, त्यांनाकोणत्याही प्रकारचे दुष्कर्म लागत नाही, मातापित्याने आपल्या संततीवर जशा प्रकारचे संस्कार केलेले असतात, तशा प्रकारची त्यांची संतती होत असते. वस्तुतः तुमचे मातापिता पवित्र उज्वल कीर्तीचे सत्प्रवृत्ति आणि धार्मिक आहेत. तुम्ही सुध्दां तशाच गुणांचे आहात. तुमच्याकडून कधीही धर्ममर्यादांचे उल्लंघन झालेले नाही. तुमचा हा ज्येष्ठ भ्राता प्रत्यक्ष धर्माचा अवतार धर्मराजाच आहे असे असून या कर्मगतीच्या भवचक्रात कसे बरे अडकले हेच मला समजत नाही. तुम्ही सर्व तत्वज्ञ धर्मज्ञ असता आणि प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवंतांनी

आपणास नीतीनियम क्रियाचरण, सत्यधर्माचरणाचे पाठ दिलेले असता तुम्ही ह्या यज्ञरूपी कर्मकांडांच्या फेऱ्यात कसे बरे गोवले गेलात. हे सद्भक्तांनो सद्गुरूंचे भगवंताचे वचन उल्लंघून तुम्ही यज्ञयागादिकांच्या फेऱ्यात पडलात म्हणून तुम्हाला गुरुद्रोहाचा दोष घडलेला आहे. गुरुद्रोहाचे पातक यज्ञयागादिकाच्या कोणत्याही उपायांनी नष्ट होत नाही. कोट्यावधी यज्ञ केल्याने सुध्दा तो दोष मिटू शकत नाही. आपल्या शरीरात एखाद्या अवयवात काही दोष न मिटता दुसरेच अन्यान्य विकार उद्भवतात तद्वत गुरुद्रोहाचे पातक निवारण्यासाठी करायचा धर्मविधी सोडून या कर्मकांडाच्या नादी लागून आत्मवंचना करीत आहांत हे योग्य नाही. पंडितांनी त्यांच्या स्वार्थासाठी भुलवून तुम्हास हे कार्य करण्यास प्रवृत्त केले पण त्यामुळे तुमचा भवरोग न मिटता उलट जन्ममरणाच्या फेऱ्यांची साधन सामुग्री मात्र वाढत आहे तरी हे सद्भक्तांनो भवरोग मिटविण्याचा योग्य मार्ग तुम्ही जाणून घ्या, तुमच्या हातून घडलेल्या गुरुद्रोहाच्या पातकाचा दोष मिटवा म्हणजे तुम्ही सुखी आणि अमर व्हाल. (श्लोक ५०१-५१६)

भगवान बुध्ददेवांच्या मुखातील वाणी ऐकून धर्मराजाचे हृदय सद्गदित झाले. तो म्हणाला, 'हे तात, आम्ही आपली मुलं आहोत आपण आमचे मातापिता गुरु अभ्यागत आहात पुत्र कर्तव्य विसरला तर त्याला क्षमा करून योग्य अशा सन्मार्गाला लावणे पित्याचे कर्तव्य असते. आम्ही आपले अज्ञ बालक आहोत. आम्हाला क्षमा करा. आपण आम्हाला सन्मार्गाचे दर्शन घडवा.' बुध्द भगवान म्हणाले, 'राजा माझा राग तेव्हाच शांत झाला आपण सत्यवचन कथन केले तेव्हा तुम्हाला सत्य मार्गाचे दर्शन घडविण्याकरीताच मी आलेलो आहे. माझे भक्त मला विसरून माझ्या प्राप्तिकरीतां अन्य मार्गाला लागलेले पाहून माझे हृदय कळवळले व वैकुंठधामात जायचे सोडून मी याच देहाने आलेलो आहे. अत्यंत हर्षित होऊन धर्मराजा भगवान बुध्दाचे चरण धरून विनंती करू लागला. तो म्हणाला, 'हे नरहरी स्वामी दिनवत्सल दातार! केवढे आमचे भाग्य थोर. त्रिभुवनपती कृपाळू होऊन आमच्या रक्षणाकरिता घरी धावत आला. आमचे याच जन्माचे काय पण अनंत युगातील अनंत जन्मांचे पातक दूर झाले, आज जगन्नियंत्या जगदीशाचे दर्शन आम्हाला झाले. आम्ही कृतार्थ झालो. आज आमचा यज्ञ खऱ्या अर्थाने परिपूर्ण झाला. ज्यांच्या प्राप्तिकरिता एवढा यत्न करून यज्ञ उभारला तो आमचा स्वामी जगन्नाथ आमच्या घरीच प्रत्यक्ष प्रगट होऊन चालत आलेला आहे, आज तो यज्ञ सफल झाला, आम्ही धन्य झालो. बुध्द भगवान म्हणाले, 'प्रेमी सद्भक्त पांडवांनो यज्ञ करण्याविषयींच्या तुमच्या विचारांना

परावृत्त करून सुध्दां तुम्ही त्याचे अनुष्ठान मांडले कारण या यज्ञादिकांनी संतुष्ट होणाऱ्या देवता तुमच्या फक्त ऐहिक कामना पुरवू शकतील, तेही मी ज्याचा अंशभूत अवतार आहे त्याच्याच प्रेरणेने - कृपेने. अन्यथा त्यादेवता सुध्दा परतंत्रच आहेत. मग मुक्तिसुखाच्या लाभात त्या देवता मुळीच कार्य करू शकत नाही. कारण त्यांची तेवढी पात्रता तपश्चर्या, ओज, शक्ति नाही. मुक्तिलाभ तर परब्रह्म परमेश्वराच्याच कृपेने होत असतो. म्हणून तुम्ही हे यज्ञयाग वगैरे उभारून जन्ममृत्युच्या फेऱ्यात आणखीच गुरफटलेले आहेत. त्यासाठी या यज्ञादिकांचा त्याग करा आणि आता आपला शेवटचा मुक्तिपंथ स्विकारा. जेथे गेल्यानंतर जीवात्मा कधीच परत येऊ शकत नाही. अशा त्या कैवल्यधाम प्राप्तीच्या मार्गाचे अवलंबन करा. भगवान श्रीकृष्णांनी म्हणजे मीच तुम्हाला पूर्वी सांगितले होते, पण या ब्राह्मणांच्या लाघवी भाषेने आणि पापक्षालन होऊन मधूर अशा स्वर्गीय सुखप्राप्तीच्या प्रलोभनाला तुम्ही बळी पडलेले आहात. त्याचा त्याग करा.' युधिष्ठिर् व चारही भावांनी नम्रतेने हात जोडून भगवानुबध्दांचे वचन शिरोधार्य मानले. एवढ्यात माताकुंती, सती द्रौपदी, सुभद्रा आदि आपल्या सुनासह व दासीसह हातात पंचारती व पूजा साहित्य घेऊन तेथे आली. मातेला आणि सर्व स्त्रियांना भगवंताच्या दर्शनास आलेले पाहून सर्वांना आनंद झाला. धर्मराजाने अभ्यागताला उच्चासनावर बसवून पादप्रक्षालन केले व ते चरणोदक सर्वांनी शिरोधार्थ मानून सेवन केले. नंतर धर्मराजाने शोडषोपचाराने गंधाक्षतांनीयुक्त पूजा अर्चा करून पुष्पहार व पुष्पांजली वाहिली. माताकुंतीने भगवंताची आरती ओवाळिली व नंतर सर्वांनी दंडवत साष्टांग प्रणाम करून हात जोडून बुध्द भगवंतासमोर उभे राहिले. माता कुंती म्हणाली - 'हे भगवंता आज या डोळ्यांना आपले स्वरूप दर्शन घडले, आम्ही धन्य झालो, आमच्या या वंशावर आपली प्रथम पासूनच कृपा दृष्टी आहे. हे आमचे महद्भाग्य आहे आम्ही आपले दास हीनदीन पामर सेवक आहोत. आपल्या वचनाचे उल्लंघन करून आम्ही मोठे पाप रचलेले आहे. संसारदु:ख दावानलाने होरपळलले आम्ही अज्ञ पामर जीव सुखाच्या आणि पापनिवृत्तिच्या साधनासाठी धडपडलो. पण आपल्या सदुपदेशाकडे दुर्लक्ष केले म्हणून चुकलेल्या आपल्या या दासांना 'सत्' मार्गावर आणण्यासाठी आपणास हे परिश्रम घ्यावे लागले. हे स्वामी आमच्या हातून आपले वचन मोडल्याचा अक्षम्य अपराध घडलेला आहे. आपण सांगाल ते प्रायश्चित घ्यायला आम्ही तयार आहोत. तरी कृपा करून आपण आम्हाला मार्गदर्शन करावे अशी आमची नम्र विनंती आहे. (श्लोक ५१७-५३३)

पांडव बुध्द भगवंताला म्हणाले, 'हे स्वामी आम्हां दासावर आपली सदैव कृपादृष्टी आहे. म्हणून हे धरणीधर, दीनदयाळु भगवंता आमचा उध्दार करण्यासाठी स्वत: आपण आमच्या यज्ञद्वारी आलेला आहात. आम्ही आपले हीनदीन दास पामर सेवक आहोत आपण कृत अपराधांची क्षमा करणारे दयाळु आहांत. हे आपले बालक मार्ग चुकलेले आहेत, यांना सद्धर्माचा उपदेश करावा व आम्हाला ज्यायोगे मुक्ति मिळेल तो मार्ग कथन करावा. आपले वचन आम्ही शिरोधार्य मानूं.' भगवान बुध्द म्हणाले 'आज्ञाधारक सद्भक्त हो, तुम्हाला खरोखर या ब्राह्मणांनी भुलविले हा सुध्दां काळाचाच महिमा आहे. कर्म आणि ज्ञान या विषयीच्या तत्वज्ञानाबाबतीत विद्वानामध्येच मोठमोठे तट पडलेले अलग अलग असे वाडे विभाग पडलेले आहेत. त्यांना त्यांनी दर्शन असे नाव दिलेले असून मुख्य असे सहा दर्शन विद्वांनांनी मान्य केलेले आहेत. त्यात प्रत्येकाने आपापल्या मतांच्या तत्वज्ञानाचे विश्लेषण केलेले आहे. उपदर्शने बरेचसे आहेत आणि या मतमतांतरामुळे सामान्य सद्भक्त घोटाळ्यात पडून निश्चित सत्यदर्शन कोणते याबाबतीत तो साशंक होतो व मग निश्चितमार्ग न मिळाल्याने तो पूर्णत्वास जाऊ शकत नाही. जे सत् अविनाशी परब्रह्म तत्व आहे ते या षड्दर्शनाहूनही पर असे आहे ते जाणण्यासाठी गुरुची आणि सत्शास्त्रज्ञानाची अत्यंत आवश्यकता आहे आणि ज्यांनी स्वानुभूतीने सत्त्वाची प्राप्ती करवून घेतली आहे, त्याच सत्गुरुंच्या सेवेने व कृपेने सद्भक्तास मुक्तिचा लाभ होतो यासाठी हे सद्भक्तांनो असे मार्गदर्शक सद्गुरु कोण? ब्राह्मण कोण? आणि योगी कोण? याबद्दल मी तुम्हाला थोडक्यात सांगतो ते तुम्ही ऐका. ब्राह्मण त्यालाच समजावे ब्रह्म जाणून ब्रह्मक्रियांचे आचरण करतो. सत्य,प्रेम अहिंसा, परोपकार आणि इंद्रियनिग्रह यांचे पूर्णपणे पालन करून शास्त्र व गुरु यांचेकडून आत्मज्ञान ग्रहण करून त्याप्रमाणे आचरण करतो तो आत्मज्ञानी - आत्मानुभवीच खरा ब्राह्मण होय. ज्याला ब्रह्मस्वरूपी सद्गुरुची प्राप्ती होऊन त्यांच्या सत्संगतीत राहून ज्ञानप्राप्ती केली त्याचे सर्व कर्मदोष निवारण होतात असे कर्मदग्ध झालेले संस्कारी जीवात्मे खरे ब्राह्मण समजावे. जे युगधर्मानुसार प्रचलित असलेल्या अवतार पात्राची जाणीव करून प्रेमपूर्वक मनोमन भक्ति करतात. जे युगधर्मानुसार आचरण करून वेदगत गायत्रीमंत्राचा उच्चार विचार व साधना करतात ते खरे ब्रह्मवंशी ब्राह्मण जाणावे. सद्गुरुंशी ज्ञानदृष्टीने तन्मय होऊन त्यांच्या सान्निध्यांत राहून अथवा त्यांच्या वचनावर दृढश्रध्दा ठेवून जे आत्मतत्वप्राप्तीची साधना करतात ते या कलियुगात ब्राह्मण समजावे. योगी तेच जाणावे जे वेदधर्मानुसार योगमार्गाचे आचरण करतात. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा ध्यान व समाधि या अष्टांग योग

साधनेने जो आत्मतत्वाचा साक्षात्कार घडवितो तो संसारी मनुष्य सुध्दां योगी जाणावा. ज्याची सुरता लक्ष सदैव श्रीहरीकडे असून आपला सर्व उद्योगधंदा कामकाज कर्म यथास्थित रितीने निर्लिप्तपणे आचरण करतो तो खरा योगी समजावा. हे सद्भक्त पांडवांनो अशाप्रकारे मी तुम्हाला हा जो खरा सत्यमार्ग सांगितला तो यथार्थ रितीने जाणून आपल्या चित्तात हा उपदेश रूजवा म्हणजे तुम्हाला समजून येईल की मी दुसरा तिसरा कोणी नसून जो राम तोच कृष्ण व तोच मी बुध्द आहे, आणि माझा हा उपदेश हाच गुरु तोच मुखी आणि तोच सत्यधर्म आहे. गुरुमुखातून या योगधर्माची विशेष माहिती जाणून समजावून घ्या व अथर्ववेदाच्या कर्मकांडानुसार म्हणजे सत्पंथ यज्ञ वेदविधीनुसार आपले सर्व कर्मदोष निवारण करून शुध्द मुक्त व्हा. ही अमुल्य संधी आता अनायासे तुमच्या पूर्ण पूण्योदयाने चालत आलेली आहे. आता तरी ती व्यर्थ दवडू नका.' तेव्हा धर्मराजा म्हणाला, 'हे स्वामीन् आमची एक विनंती कानी धारण करा. ज्यायोगाने कर्ममुक्त होऊन आम्ही शुध्द निर्लिप्त आत्मदर्शन करू शकू व मुक्तिप्रत जावू शकू. असा मार्ग आम्हास आपण दाखवावा. आम्ही आपणास अनन्यशरण आलेलो आहे. आम्ही आपले दास आहोत. आमच्यावर कृपा करा.' अशी विनंती ऐकून भगवान बुध्दाला त्यांचा फार कळवळा आला. ते पांडवांना म्हणाले, 'फळाची आशा न ठेवता जो कर्माचे आचरण करतो, पण ते कर्म मी करतो असे मात्र मानीत नाही, ज्याला आत्मस्वरूपाशिवाय दुसरे काही दिसत नाही तोच ज्ञानी पुरुष होय. त्या ज्ञानी पुरुषाला कोणतेही कर्तव्य शिल्लक राहिलेले नसते. ज्ञानरूप अग्नीत सर्वकर्म जाळून टाकून तो स्वयं परब्रह्म बनतो. तो नेहमी आनंदात मग्न झालेला असतो. त्याची स्थिती सर्व भेदातीत अशी झालेली असते. अहंकारातसुध्दा आशेची ओवाळणी करून तो ब्रह्मस्वरूपाची अधिकाधिक गोडी घेतो. तो जे जे इष्ट यज्ञ करतो त्यातील होम द्रव्ये मंत्र ही सर्व आत्मस्वरूपच आहे असे समजतो. ज्यांनी गुरुवाक्य रूपी अग्नीत मनासह अज्ञानाचे हवन केलेले आहे त्यांनीच योगाग्निचे यजन करावे याला दैवयज्ञ असे म्हणतात. आता जे ब्रह्माग्नीचे ठिकाणी स्वकर्माने ईश्वराराधन करतात, त्यांचे विषयी वर्णन ऐक. हे लोक आत्मरूपी अग्नीमध्ये होम करणारेअसतात ते कायिक, वाचिक, मानसिक या मंत्रांनी व पवित्र इंद्रियरूपी द्रव्यांनी हवन करतात. धर्मराजा अशा प्रकारे कोणी आपल्या दोषांचे क्षालन केले आणि हृदयरूपी अरणीवर विचाररूपी मंथ्याने धैर्याचा भार देऊन शांति रज्जूने घुसळून गुरवाक्यरूपी मंत्राने मंथन केले तर ज्ञानाग्नि प्रज्वलित होतो. त्यावेळी ऋध्दिसिध्दीचा मोह हाच उत्पन्न झालेला धूर नाहीसा होऊन सूक्ष्म अशी ठिणगी उत्पन्न होते.

त्या अग्नीला शमदमादि शुष्क काष्टांचे इंधन घातले व वासनारूपी समिधांना अनेक प्रकारचे मोह रूपी तूप लावून त्या जाळल्या, मग जीवरूप दिक्षीताने इंद्रियरूपी प्रदीप्त झालेल्या अग्नीत कर्मेन्द्रियांची आहुती दिली आणि शेवटी प्राणकर्म ह्याच स्त्रुवा नावाच्या यज्ञपात्रासह पूर्णाहुती दिल्यावर ऐक्यबोध हे अवभृत स्नान घडते. अशा नाना प्रकारच्या यज्ञक्रिया आहेत. परंतु त्याची फलप्राप्ति एकच आहे हे जे योग आहेत त्यापैकी एकाला द्रव्ययज्ञ, एकाला तपोयज्ञ, एकाला अष्टांगयोग यज्ञ असे म्हणतात. ज्यामध्ये शब्दाने शब्दाचा होम केला जातो त्यास वाग्यज्ञ म्हणतात आणि ज्या मध्ये ज्ञानाने ब्रह्मप्राप्ती होते, त्यास ज्ञानयज्ञ म्हणतात. हे सर्व यज्ञ बिकट असून आचरण्यास फार कठीण आहेत. परंतु ज्याने इंद्रिये जिंकली आहेत त्यास मात्र अधिकारपरत्वे ते प्राप्त करून घेता येतील. हे सर्व यज्ञ कर्मापासून उत्पन्न झाले आहेत हे जाणले असता कर्माची बाधा होणार नाही. यज्ञाचे मूळ वेदांतज्ञान हे आहे. द्रव्यादि यज्ञ आहेत पण सूर्यापुढे जसे तारकांचे तेज लोप पावते तशी ते ज्ञान यज्ञाची बरोबरी करू शकत नाही. असे हे ज्ञान जर तुम्हाला प्राप्त व्हावे असे वाटत असेल तर तुम्ही ब्रह्मज्ञान संपन्न अशा सद्‌गुरुला शरण जा. त्यांची काया वाचा मनाने गर्वरहित होऊन सर्व प्रकारे सेवा करा. म्हणजे तुमच्या केवढ्याही जरी पातकांच्या राशी असल्या तरी तुमचा उध्दार होण्यास वेळ लागणार नाही. (श्लोक ५३४-५५१)

बुध्द भगवान म्हणाले - 'हे युधिष्ठिरा मी तुम्हाला सांगतो ती गोष्ट नीट लक्षपूर्वक ऐका. आता द्वापारयुग संपून कलियुगाला सुरुवात झालेली आहे आणि सर्व देवऋषि मुनि वगैरे गुप्त झालेले आहेत. कलियुगाच्या पापी प्रभावाने त्यांना प्रगट रूपाने राहाता येणार नाही. तुम्हाला सुध्दां या कलियुगात राज्यकारभार सांभाळणे अति कठीण होईल, कारण सत्यधर्माप्रमाणे वागणे मुष्किलीचे होईल. यासाठी तुम्ही सुध्दा येथून प्रयाण करावे. तुम्ही महाभारत युध्द करून अठरा अक्षौणी सैन्यासह दुर्योधनादि कौरवांचा संहार केलेला आहे. त्यांच्या मरणाचा पातकाचा भार आपल्या शिरावर आहे असे तुम्ही मनाने मानलेले आहे. त्याचा निवाडा झालाच पाहिजे नाहीतर तुमच्या मनास तो कायमचा डाग लागेल व अंत:काली तुम्हाला ते दु:ख भोगावे लागेल. यासाठी तुम्हाला प्रायश्चित घ्यावे लागेल.' तेव्हां युधिष्ठिर हात जोडून कळवळून म्हणाला, 'हे स्वामी, आपण सांगाल ते प्रायश्चित स्विकारून आम्ही दोषमुक्त होऊ तरी दया करून आम्हाला उपाय सुचवावा.' भगवान बुध्द म्हणाले

'प्रायश्चित असे आहे की या यज्ञाची सांगता करून राज्याचा त्याग करावा. व हिमालयात जाऊन संन्यास स्विकारून योगसाधना करावी. पंचेन्द्रिये दमन करून मन वासनारहित करावे हेच या कर्मदोषाचे प्रायश्चित आहे. हे सुचविण्याकरीतां आणि योगमार्गाचे आचरण कसे करावे याची पुन्हा जाणीव देण्यासाठी मी आलेलो आहे. माझे सद्भक्त माझ्या पाठीमागे युगपरिवर्तनाच्या फेऱ्यात राहू नयेत व नवीन कर्मे संचित होऊन त्याच्या जन्ममृत्यूला कारणीभूत होऊ नयेत म्हणून मला हा अवतार धारण करावा लागला.' भगवंताचे वचन ऐकून भीम म्हणाला, 'हे दीनवत्सल दयाळु भगवंता हा युगपरीवर्तनाचा भेद आधीच आम्हाला कां नाही सांगितला. द्वापारयुग संपून कलियुग लागेल व कलिचा महिमा अशाप्रकारचा राहील याची जाणीव जर आम्हाला आपण दिली असती तर कशाला आम्ही युध्द केले असते. कुरुक्षेत्रावर एवढे मोठे रणक्रंदन करून अठरा अक्षौणी सैन्य मारले गेले, भाऊबंद वगैरे सर्वांना मारून आम्ही राज्य जिंकले आणि आज आपण सांगत आहांत की या राज्याचा त्याग करून संन्यास घ्या, हे आपण आधी कां सांगितले नाही. आमचा दानशूर भाऊ कर्ण, विद्यावंत कलापूर्ण दुर्योधन, गुरुद्रोण, भीष्मपितामह, आमच्या वंशाचा सत्यप्रतिज्ञ पोलादी पुरुष दुःशासन, भगदंत वगैरे अनेकानेक शुरवीर पुरुष यांच्या मरणास आम्हीच कारणीभूत झालो या सर्वांना मारून आम्ही राज्य जिंकले पण लाभ काय. आज आपण सांगत आहांत की हे सर्व सोडून वल्कल नेसून हिमालयात जा व योगसाधना करून काळाच्या स्वाधीन व्हा हे स्वामीन एवढ्या साठीच का आम्हाला हे युध्द करावयाला लाविले. तसे जर आम्हाला आधीच सुचविले असते तर हा एवढा मोठा पातकांचा डोंगर आम्ही का रचला असता. आम्ही युध्द केलेच नसते..' भीमाचे ते रोषयुक्त भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला, 'भीमा शांत हो, अरे आपण कर्म केले आणि भगवंताला का म्हणून दोष द्यायचा. भगवंतासमोर असे रोषयुक्त भाषण करणे तुला शोभत नाही. आपल्या नशिबात प्रारब्धकर्मात जी फळे लिहीली आहेत ती आपणास मिळाली आहेत कारण कर्मलेख म्हणजे विधीलिखित कोणालाही टाळता येणे शक्यच नाही. ते टाळणे योग्य ही नाही ते भोगणेच इष्ट असते. पुढील जन्म मरणांची नांदी मोडून काढायला, कर्म भोगून संपवायला हवे अथवा कर्मदग्ध करून टाकायला हवे आहे. भगवान श्रीकृष्णांनीही आपणाला हेच सांगितले होते पण ते वचन उल्लंघून आपण अनावश्यक कर्म जंजाळात अडकलो, आता आपले पूर्व पुण्य थोर म्हणून भगवंतांनी आपल्या उध्दाराकरितां आणखी हा

नविन जन्म धारण केला. आता हे भगवान बुध्द जे सांगतील ते निश्चयाने करावे त्यात कोणतीही शंकाकुशंका, खोट, अविश्वास आणता कामा नये. हे स्वामी बुध्द नारायणा आपण आम्हाला या कलियुगाचे महिमान सांगावे. त्याचे ग्राह्य त्याज्य असे जे धर्मविधी नियम तत्व असतील ते आपण आम्हाला कथन करावे व योग्य असे मार्गदर्शन करून या अज्ञ पतीत अबोध बालकांना सद्बोध करावा. अशा प्रकारे दोनही हात जोडून केलेली विनंती ऐकून भगवान बुध्दांनी त्यांच्यावर कृपादृष्टी केली ते म्हणाले, 'राजा धर्मा! तू खरोखर धर्ममूर्तीच आहेस कलियुगाचे सारे महिमान मी भीमसेनाला सांगितले. तुमची सुध्दा ते आगम श्रवण करण्याची इच्छा आहे तर मी तुम्हाला कथन करतो ते ऐका. (श्लोक ५५२-५७८)

जो सत्य वचनकथन आणि पालन करतो तोच खरा ब्राह्मण होय. अशा ब्रह्मवंशी कुळात भगवंताचा अथवा सद्भक्त महात्म्याचा प्रत्यक्ष प्रगट अवतार होतो. ज्याला त्या अवतार स्वरूपाचे दर्शन झाले. त्या संत महात्म्याचा संग घडला त्याच्या जन्माचे सार्थक होते. महान अशा ब्रह्मस्वरूपी महात्म्याच्या संगाने सद्भक्त योगी होतो. योगमार्गाच्या आठही अंगांचे पालन करून व संसार उत्तम प्रकारे साध्य करून जो समाधी अवस्थेपर्यंत प्रयाण करतो तो या कलियुगात महान योगी आणि ब्रह्मपदाचा अधिकारी होतो. केवळ जानवे म्हणजे सूत्र अंगावर धारण केल्याने मनुष्य ब्राह्मण होत नाही तर ब्रह्मक्रिया पालनानेच मनुष्य खरा ब्राह्मण होतो. जो पूर्ण भाग्यवंत असतो त्यासच हा ब्रह्मबोध होत असतो. त्यासच सत्गुरु ब्रह्माची प्राप्ती होऊन मुक्तिलाभ घडतो. त्याचे गर्भवासाचे फेरे मिटतात. हे धर्मराजा सर्वपूजेहून ही अशा ब्रह्मस्वरूपी योग्याची पूजा ही सर्वश्रेष्ठ पूजा होय. त्याची बरोबरी कोणताच यज्ञ करू शकणार नाही. आता हे धर्मराजा योगी ब्राह्मण कोणाला म्हणावे त्याची पात्रता काय असते आणि त्यास कोणत्या साधना कराव्या लागतात याबद्दल मी तुला ज्ञान सांगतो ते ऐक. विहीत कर्मे करून फलाची जो अपेक्षा करीत नाही तो कर्मयोगी आणि ज्याच्या अंत:करणात ब्रह्मभाव जागृत झाला आहे व ज्याला सर्व विश्वात एका ब्रह्माशिवाय काही दिसत नाही, असा पुरुष देहाभिमान व फलाची इच्छा सोडून कर्मे करीत असतो. तो श्रेष्ठ संन्यासी होय. जे लोक नित्य नैमित्तिक कर्मे बंधनकारक म्हणून सोडतात आणि योगाची हातोटी न साधल्याने दुसरी कर्मे मागे लावून घेतात, त्यांची मात्र कुचंबणा होते.

गृहस्थाश्रमाची योग्य कर्मे केली असता आत्मसुख सहजच प्राप्त होईल. संकल्प नाहीसे होणे हेच खरे योगाचे सार आहे. आता योग्याची लक्षणे काय आहेत पहा - प्रथमत: यम नियम पालन करणे हा योगाचा पाया आहे. त्यानंतर आसन, प्राणायाम करणे, नंतर प्रत्याहार म्हणजे इंद्रिये विषयापासून परावृत्त करणे, ही जागा फार धोक्याची आहे. मोठमोठ्या बुध्दिवानाची बुध्दि याठिकाणी लटपटते. परंतु निराश होण्याचे कारण नाही. नित्याच्या सवयीने व निश्चयाच्या बळावर ही गोष्ट हळू हळू साध्य करता येते. ध्यान उत्तम जमले तर चित्तवृत्ति दताकार होते. येथे मनाची धाव बंद होते व साधक ब्रह्माशी एकरूप होतो. याठिकाणी योगी समाधीच्या स्थिर पातळीवर येतो. ही स्थिती ज्याची त्यानेच मिळवावी लागते. उलट देहाभिमान ठेवल्याने मनुष्य आपणच आपला घात करून घेतो. त्याची स्थिती नळीवर बसलेल्या पोपटाप्रमाणे होते. पोपट नळीवर बसला म्हणजे त्याच्या वजनाने नळी फिरते तो उलट होतो व त्यास असे वाटते की जर आपण पाय सोडले तर खाली खोल पडू व मरू या भीतीने तो नळी घट्ट धरून ठेवतो व जखडला जातो. वास्तविक देवाने दिलेल्या पंखांचा उपयोग करून तो सहज उडून जाऊ शकतो. त्याप्रमाणे वस्तुत: जीव ब्रह्मरूप असूनही देहाभिमानामुळे संसारात अडकतो. म्हणून जो देहाभिमान धरीत नाही, तोच खरा आत्मज्ञानी होय. अशा पुरुषास शीत-उष्ण, सुख-दु:ख, मान-अपमान, शुभ-अशुभ या गोष्टी क्लेशदायक वाटत नाहीत. शत्रु-मित्र, परिचित-अपरिचित असा भेदभाव नष्ट झाल्यामुळे सर्व विश्व म्हणजे मीच आहे असे तो समजतो. या विश्वात परब्रह्मावाचून कांही नाही असा अनुभव ज्यास आला तो समबुध्दि प्राप्त झालेला आहे असे जाणावे. द्वैताचा नायनाट करणारी हीच ती ब्रह्मविद्या आहे. भगवान श्रीकृष्णांनी तुम्हास हा साऱ्या ब्रह्मविद्येचा उपदेश केलेला असून सुध्दां कालप्रवाहामुळे तुमच्या चित्तास विस्मृति झाली व ही ब्रह्मत्वप्राप्तीची विद्या-मार्ग सोडून तुम्ही अन्य उपायाकडे वळलात म्हणून अव्यक्त असूनही मला हे सगुण साकार रूप धारण करावे लागले. तरी हे सद्भक्तांनो आता मी तुम्हाला ही ब्रह्मविद्या कशी संपादन करावी त्याचा अभ्यास - साधना सांगतो.

प्रथम योगाभ्यासास योग्य असे स्थान निवडावे. ते स्थान निसर्गरम्य असावे. जवळपास संत सज्जनांची वस्ती असावी. दाट फळझाडे असावीत. विपुल पाण्याचे सुंदर झरे तेथे बारा महिने वहात असावेत. हंस, मोर वगैरे पक्ष्यांचे ते निवासस्थान असावे. थोडक्यात म्हणजे नास्तिकास अथवा विषयलंपटास सुध्दा सर्वस्व सोडून तेथे जाऊन राहावे असे वाटावे. अशा ठिकाणी प्रथम दर्भासन अंथरावे. त्यावर मृगचर्म

अथवा कांबळ अंथरून त्याच्यावर पाठीचा कणा ताठ ठेऊन एकाग्र चित्ताने इंद्रिये व मन स्थिर करून बसावे व सद्गुरुंचे स्मरण करावे, असा नित्य थोडा वेळ अभ्यास करावा. हा अभ्यास चांगल्या अधिकारी योगाभ्यासी गुरुच्या सान्निध्यांत राहून करावा. तशा गुरुची प्राप्ती होणे हे आपल्याच योग्यतेवर अवलंबून आहे. ही योग्यता कांही बाजारात मिळणारी सवंग वस्तू नाही ती प्राप्त होण्यासाठी विरक्तपणा देहाची विहीत कर्मे नियमाने करणे व वासनेचा परित्याग करणे या गोष्टी आवश्यक आहेत. रसना प्रथम जिंकली पाहिजे. विषयांचे सेवन मर्यादीत असावे लागते. इंद्रियांचा कोंडमारा न करता त्यांच्यावर विजय मिळविला पाहिजे, साधकाने आहार मर्यादित ठेवावा. झोप बेताची घ्यावी. बोलणे चालणे जाग्रण वगैरे सर्वच बाबतीच मर्यादितपणा राखला पाहिजे. मन नेहमी समाधानी ठेवावे व इंद्रियांना नियमीतपणाचे वळण लावावे म्हणजे अभ्यासाचे कष्ट न होता मनुष्यास योग साध्य होतो.

इंद्रियांना जिंकण्यासाठी प्रथम आसन स्थिर करण्यास शिकावे. शरीर स्थिर झाल्यानंतर मनही आपोआपच स्थिर होते. विषयांच्या मागे धावण्याचे सोडून ते अंतर्मुख होते आणि त्याचवेळी आत्मस्वरूपाचे दर्शन होते. अशारीतीने एकदा जीवशीवांची एकरूपता झाली म्हणजे योगी महासुखात निमग्न होतो. त्याचे देहभान हरपते. अशा अप्रतिम सुखाची गोडी लागल्यानंतर त्याला बाह्य विषयांची आठवणही होत नाही. मनुष्य सुखासाठी ज्ञान मिळवितो. परंतु याठिकाणी तो मूर्तिमंत सुखमयच बनून जातो. यासाठी सर्व विषयांना उत्पन्न करणारा जो संकल्प तो अगोदर प्रयत्नपूर्वक नाहीसा केला पाहिजे. वासनाक्षय झाला कि बुध्दि बलवान व तेजस्वी होते व ती मनाला अनुभवाच्या मार्गावरून हळूहळू नेऊन आत्ममंदीरात स्थिर करते. मनुष्याने मनात असा निश्चय करावा की अमुक एक नियम मी अखंड चालू ठेवीन. मग तो नियम कितीही लहान असो. त्याच्या सातत्याने अखंड शक्ति निर्माण होते. ती अवखळ मनाला स्थिर करते आणि मन स्थिर झाल्याबरोबर त्याला आत्मस्वरूपाचे दर्शन घडते. मग साधकाच्या दृष्टीने सर्व विश्व चैतन्यमनय होते. द्वैतभाव नाहीसा होतो. साऱ्या विश्वात मीच ओतप्रोत भरून राहिलो आहे. वस्त्रात ज्याप्रमाणे तंतू किंवा मातीच्या घागरीत ज्याप्रमाणे मृत्तिका अंतर्बाह्य व्यापून असते तसे माझ्या ठिकाणी सर्व जग व जगात सर्वत्र मीच आहे अशी जो समदृष्टी ठेवतो त्याला आत्मदर्शन होऊन अखंड सुखाची प्राप्ती होते.

ह्या साऱ्या गोष्टी साध्य होण्यास स्थिर मनाची अत्यंत आवश्यकता आहे. पण मन हे बुध्दीस नेहमी छळीत असते व ते कधीही स्वस्थ बसू देत नाही. हे चंचल मन आवरण्यासाठी एक सोपा उपाय आहे. यम-नियमांचे योग्य वळण लावून मन स्थिर करता येते. मनाचा एक गुण फार चांगला आहे. त्याला कोणत्याही गोष्टीची एकदा सवय लागली आणि त्याची गोडी त्याने चाखली म्हणजे ती गोष्ट सोडावयास मन तयार होत नाही म्हणून मोठ्या कौशल्याने त्याला आत्मसुखाची गोडी लावावी लागते. मनाचे नियमन करण्यासाठी हे योगशास्त्र अत्यंत उपयुक्त आहे. त्याच्याच बळावर पंचमहाभूते स्वाधिन होत असतात. जो मनुष्य श्रध्दापूर्वक मोक्षासाठी प्रयत्न करीत आहे पण योगाचे त्याला काही एक ज्ञान नाही; विषयापासून परावृत्त झाला आहे पण आत्मस्वरूपाच्या गावाला मात्र पोहोचलेला नाही असा श्रध्दाशील मनुष्य एकदम मोक्षाला पोहोचत नाही ही गोष्ट खरी. त्याचा काही काल स्वर्गसुखाचा उपभोग घेण्यामध्ये निघून जातो. तेथून तो मृत्युलोकी पुन्हा जन्म घेतो. पूर्वसुकृतामुळे तो अत्यंत धर्मशील व नीतिमान कुलात जन्म घेतो. त्याचे आचरण धर्मशास्त्राप्रमाणे असते. सुविचारांचा नंदादीप त्याचे हृदयात सतत तेवत असतो. ईश्वरावाचून तो कोणत्याही गोष्टींचे चिंतन करीत नाही. त्या योगाच्या ठिकाणी बालपणीच आत्मज्ञान स्फुरण पावते. त्याच्या अंगी सर्वज्ञता बाणते. सर्वविद्या व शास्त्रे तो पाठ म्हणतो. अशा या जन्माची देवसुध्दां इच्छा करतात. पायाळू मनुष्यास जसे अंजन घातल्याशिवायही गुप्त ठिकाणचे धन दिसते तसे मोठेमोठे गूढ सिध्दांत तो योगभ्रष्ट पुरुष गुरुच्या आदेशाशिवाय सोडवितो. कोणत्याही अभ्यासाशिवाय त्याला समाधि लागू शकते. असा पुरुष म्हणजे मूर्तिमंत योगभ्यासच किंवा वैराग्याची मूर्तीच होय. तो दिसण्यात सामान्य असला तरी त्याचा महिमा अलौकिक असतो. अशी ही ब्राह्मी स्थिती ज्याला प्राप्त होते तो हजारो जन्मांचा अनुभव घेऊन आत्मसिध्दीच्या पैलतीराला पोहोचलेला असतो. बुध्दीला प्रकाशित करणारी जी ब्रह्मवस्तू तिच्या अमर्याद सुखाचा तो अनुभव घेतो. त्याचे शब्दाने वर्णन करता येत नाही. ज्या सुखासाठी कर्मठ, ज्ञानी, तपस्वी जन्मभर धडपड करीत असतात. ती शेवटची गति, जी ब्राह्मी स्थिती त्याला प्राप्त झालेली असते तो सर्व लोकवंदनीय होतो, सर्व संशयाचा क्षय झाल्यामुळे खऱ्या मोक्षाचे व स्वानंदाचे सुख तो अनुभवीत असतो म्हणून हे पांडवांनो तुम्ही योगी व्हा. योगी म्हणजे सामान्य पुरुष नव्हे. तो पुण्यात्मा देवांचाही देव किंवा माझा ईश्वराचा दुसरा प्राणच समज. त्याच्या व माझ्या अधात्म प्रेमाला जगात कोणतीच उपमा सापडण्यासारखी नाही.' (श्लोक ५७९-५८६)

भगवान बुध्द म्हणाले, 'हे धर्मराजा मी तुम्हाला योगाभ्यास कसा करावा, त्यापासून काय लाभ घडतो याबद्दल माहिती दिली, आता हा योगाभ्यास करणाराचे लक्षण कशाप्रकारचे असते, योगाभ्यासाचा लाभ ज्याला झाला त्याची स्थिती कशाप्रकारची असते ते तुम्हाला थोडक्यात सांगतो. ब्राह्मी स्थितीत पोहोचलेला मनुष्य 'प्राणा' प्रमाणे सर्वांचे जीवन असून सर्वांमध्ये आत व बाहेर असून सर्वांहून अलिप्त असा असतो. 'प्राण' हे पहिले ब्रह्म आहे. दुसरे ब्रह्म 'जल' याला म्हटले आहे. जल स्वत: निर्मळ असून दुसऱ्यांना निर्मळ करते. ब्राह्मीस्थितीत गेलेला मनुष्य सुध्दा जलाप्रमाणेच निर्मळचित्त असतो. तिसरे ब्रह्म अग्नीला म्हटले आहे. अग्नीच्या ठायी सुगंध - निर्गंध, ओले कोरडे असा द्वैत भेद नाही. कोणत्याही वस्तुला स्वाहा करून भस्म करणे हा अग्नीचा गुण आहे. तद्वत ब्रह्म अवस्था प्राप्त झालेल्याने द्वैतभेदाचे भस्म करून शुध्दाद्वैत तत्वाचा अवलंब केला पाहिजे. चौथे ब्रह्म तेज होय. स्वयंप्रकाशित असून दुसऱ्यांना तेजस्वितता प्राप्त करवून देणे हा तेजाचा गुण होय. ज्ञानी मनुष्याने स्वत: संपादन व आत्मसात केलेल्या ज्ञानाचा दीपस्तंभरूप होऊन अज्ञजनास तेजस्वी अशा सनातन देवयान मार्गाकडे घेऊन जाण्याचा प्रयत्न करावा. पाचवे ब्रह्म पृथ्वी होय. सर्वांचे धारणपोषण करणे व अन्याय्यावरही उदार बुध्दिने क्षमा करणे हा पृथ्वीचा विशेष गुण आहे. जीवन्मुक्त मनुष्याची सुध्दां अशीच अवस्था व्हावयास हवी. क्षमावृत्ति धारण करून जगतातील व्यवहाराकडे व संबंधाकडे दग्धवस्त्राप्रमाणे पहावयास हवे आहे. अहंभावशून्य व्हायला हवे आहे. अशाप्रकारे जो ब्रह्माची उपासना ध्यान सेवा करतो तो ब्रह्ममयच होऊन जातो त्याकरिता दुसरे वेगळे अस्तित्वच राहात नाही. ही ब्राह्मीस्थिती प्राप्त झाल्यानंतर त्या जीवात्म्याला कोणतेही शुभ अशुभ कर्मे बंधनकारक राहात नाहीत पण जोपर्यंत जीवात्मा या साधनांचा अभ्यास करीत असतो तो पर्यंत त्याने या कर्माकर्मण्यतेकडे बारकाईने लक्ष दिले पाहिजे. कारण तसे त्याने लक्ष न दिले व इंद्रियांच्या आहारी जाऊन विकृत कर्माकडे वळल्यास या योगमार्गापासून तर भ्रष्ट नष्ट होईलच पण त्याला वज्रलेप जडून त्या सर्व कर्माचे भोग भोगावेच लागतील. त्याशिवाय त्याची सुटका होणार नाही. आत्मवस्तूला पूर्णपणे ओळखणे हेच ज्ञान होय. प्रपंच करीत असता भगवंताची जाणीव ठेवणे हे विज्ञान आणि अज्ञान म्हणजे प्रपंचच सत्य आहे असे मानणे होय. परंतु जेव्हा अज्ञान व विज्ञान नाहिसे होऊन आत्मवस्तूच सर्वत्र भरून राहिली आहे असे अनुभवाला येते तेव्हा देहाचे खोटेपण प्रत्ययाला येते. सत्यज्ञान झालेल्या योग्याची दृष्टी प्रपंचावर माघारी येतच नाही. परंतु ज्ञानार्जनाची इच्छा बाळगणारा हजारात एखादा व अशा हजारो

यत्न करणाऱ्यामध्ये आत्मज्ञानी होणारा एखादाच असतो. आत्मज्ञान सर्वविद्यामध्यें श्रेष्ठ, गुप्ततेचे अग्रणी, परमपवित्र, जन्ममृत्यूपासून सोडविणारे स्वयंसिध्द व जे नित्य आपल्याजवळ आहे, पण आपण त्याला पारखे झालो आहोत. गुरुकृपेने ते उदयाला आले असे वाटते पण ते सदैव उदीतच असते. गाईच्या त्वचेच्या आंत पवित्र आणि गोड दूध असते पण त्याचा त्याग करून गोचिड रक्तच सेवन करते. एकाच चिखलात बेडूक व कमळ असते परंतु भ्रमर कमळाचे परागसेवन करतो. आणि बेडकाच्या वाट्याला चिखलच येतो. त्याप्रमाणे हृदयमंदीरात सर्व सुख देणाराआत्माराम तिष्ठत असतांना भ्रांत जीव विषयसुखाकडेच धावतात. मृगजळ पाहून तोंडातील अमृत थुंकून टाकणे अथवा वाटेत शिंपला सापडला म्हणून गळ्यात बांधलेला परीस तोडून टाकणे अशा सारखी संसारी जीवांची कृति असते.'

भगवान बुध्द पांडवांना उपदेश करतांना सांगतात 'हे सद्भक्तांनो हे जग म्हणजे भगवंताच्या अव्यक्त रुपाचेच व्यक्त स्वरूप आहे. ज्याप्रमाणे दूध विरजले म्हणजे त्यालाच दही असे म्हणतात. अथवा बीजाचाच वृक्ष होतो त्याप्रमाणे एकट्या भगवंताचाच विस्तार म्हणजे हे जग आहे, ज्याप्रमाणे पाण्यापासून फेस निर्माण होतो. परंतु फेसामध्ये पाणी दिसत नाही. त्याप्रमाणे ईश्वरापासून सर्व भूतमात्र निर्माण होतात परंतु त्यामध्ये ईश्वर प्रगट दिसत नाही. संकल्पामुळे ईश्वर व भूते यांच्यात अंध:काराची भींत उभी राहते. एरवी संशयनिवृत्ति झाली म्हणजे मनुष्य ज्याप्रमाणे माळेला साप म्हणत नाही, त्याप्रमाणे ईश्वर व प्राणिमात्र अखंडितच असतात. वस्तुत: सूर्य आणि त्याची प्रभा ही भिन्न नाहीत त्याप्रमाणे सर्व प्राणी व ईश्वर एकरूपच आहे. तो भूतमात्रापासून वेगळा नाही हाच त्याचा ऐश्वर्ययोग आहे. प्रकृतीत सर्व सृष्टी उत्पन्न करण्यास जबाबदार आहे. ही दोन प्रकारांनी नटलेली आहे. एक परा व दुसरी अपरा. अपरा म्हणजे अष्टधा प्रकृति आणि परा म्हणजे जीवस्वरूप. कल्पांती हे जग प्रकृतिजन्य मायेत विलीन होते व कल्पारंभी ईश्वराच्या अधिष्ठानावरच भूतमात्रे उत्पन होतात. ईश्वर प्रकृतिला धारण करतो. तो विश्वाच्या उत्पत्तीला निमित्तमात्र आहे. तात्पर्य भूतमात्र ईश्वरात आहे पण ईश्वर त्याच्यात नाही. अशा अमानुष असणाऱ्या ईश्वराला अज्ञानी लोक मनुष्य समजतात. या नाशिवंत देहामध्ये त्या अविनाशीला पाहणाऱ्याला तो कसा दिसणार? प्रकृतिच्या या विकृत स्वरूपालाच ईश्वर असे समजणाऱ्यांची फसगत होते. तो स्वयंसिध्द असतांना त्याच्या मूर्ती घडवितात. तो मनुष्य आहे असे मानून या लोकांची सर्व जन्मकर्मे त्याला लागू करतात. असे हे त्यांचे विपरीत ज्ञान

आहे. संतमहात्म्यांची स्थिती यापेक्षा फार निराळी असते. त्यांच्या पवित्र अंत:करणात मी ईश्वर सदैव वास करतो, ते वैराग्यसंपन्न व श्रध्दावान असतात. त्यांचे रूपाने मूर्तिमंत धर्मच भूतली नांदत असतो. शांतिपरिपूर्ण त्यांचे अंत:करण असते. ते नीतिमानही असून भगवंताच्या भक्तिपुढे मुक्तिलाही तुच्छ लेखतात. हे दैवी संपत्तीने युक्त असे महात्मे होत. ते ईश्वरस्वरूप होऊन अखंड त्याची सेवा करतात. तेच खरे योगी, यति, संत, महात्मा सद्‌गुरु होत. ते नाम संकीर्तन करू लागले म्हणजे ईश्वरी नामघोषाने या भूतलावर वैकुंठ निर्माण करतात. स्वत:ला विसरून जाऊन प्रेमाने नाचतात. अशा तऱ्हेने सत्पुरुष हे विश्वाचे दु:ख नाहीसे करतात. ते सूर्याप्रमाणे प्रकाशमान असतात पण त्याच्याप्रमाणे ताप देणारे नसतात. ते अमृतावाचून अमरत्व देतात. ते ईश्वराचे गुण संकीर्तन करू लागले म्हणजे स्थल काल विसरून देहातीत होतात. जात, भाषा, धर्म, वर्ण, देश यांच्या अभिमानात न राहता सर्वांचा दर्प ते हरण करतात. त्यांनी मन ताब्यात ठेवल्यामुळे पंचप्राण आपोआप त्यांचे मुठीत येतात. त्यामुळे यम नियमांचे आचरण निसर्गत:च घडते. वज्रासन घालून जो प्राणायाम साधावयाचा तो आपोआप साधतो. अशी अवस्था प्राप्त झाल्यावर कुंडलीनीची शक्ति जागृत होते. तिला मन व प्राणवायु सहाय्य होऊन सतरावी जी जीवनकला ती प्राप्त होते. इंद्रिये अंतर्मुख झाल्यामुळे आपोआपच विकार थांबतात. विकार थांबले की पंच महाभूतांची सत्ता संपुष्टात येते व आत्मानुभवाचा साधकाला अनुभव येतो. हे सद्‌भक्तांनो ईश्वराच्या भजनाचे हे रहस्य आहे. तो सर्व चराचरात भरलेला आहे हे ते अनुभवतात व त्यामुळे ते भेदातीत झालेले असतात.'

भगवान बुध्द म्हणाले, 'हे सद्भक्त पांडवांनो वेदगत वेळेनुसार सध्दर्माप्रमाणे वागून जीवात्म्याने आपल्या जन्माचे सार्थक करावे. सत्यज्ञान शोधून व निष्काम कर्मयोगाचरणाने वागून जो जीवात्मा सद्‌गुरुंचे ज्ञानानुसंधान करतो, तो योगी जाणावा संसार निरिच्छपणे करून आपल्या सर्व कामना ईश्वरचरणी वाहतो यम नियमादिकांचे आचरण करून सदाचार संपन्न जो असतो तो खरा यति योगी जीवन्मुक्त सद्भक्त संत होय. हे सद्भक्तांनो आता तुम्ही हे सर्व यज्ञयागादि काम्य कर्म सोडून या निर्वाणपदाचे अनुंसधान करा. आयुष्याच्या सायंसंधीकाळात लोकेषणा, धनेषणा, राज्येषणा या सर्व आसनावासनांचा क्षय करून एकमेव भगवंताशी आपल्या चित्ताचा लय लावा. पुढील कलियुग अत्यंत दुस्तर आहे. त्यात ज्ञानसाधना, ध्यानसाधना व लययोग साध्य होणे फार दुरापास्त आहे, म्हणून तुम्ही आताच या सर्व ऐहिक सुखोपभोगांचा

त्याग करा आणि पारमार्थिक सौख्य शांतीच्या व आत्मप्राप्तीच्या सुखाकरितां हिमालयात जाऊन निवांतपणे ध्यानयोग साध्य करून त्या परमात्म्याच्या अचिंत्य, अतर्क्य, मायोपाधिरहित अशा निर्मळ निष्कलंक निरंजन स्वरूपाशी तद्रूप होऊन राहा. हाच माझा तुम्हाला अंतीम संदेश आहे. ( श्लोक ५८७-६०० )

राजा युधिष्ठिर दोनही हात जोडून अत्यंत लीनतेने भगवान बुध्दाला म्हणाला, 'हे स्वामीन् दयाळू दातार! आमची मुक्ति कोणत्या उपायाने होईल ते कृपा करून मला सांगा.' तेव्हा बुध्द भगवान म्हणाले, 'धर्मराजा, मी सांगतो ते वचन सत्य मानून त्याप्रमाणे वाग. आता द्वापारयुग संपून कलियुगाला सुरुवात होत आहे. कलियुगातील पापाचरणाच्या भीतीने सर्व देव आणि ऋषीवर गुप्त होऊन राहिलेले आहेत. या कलियुगात कोणाचेही मन स्थिर राहणार नाही. कारण, साडेएकोणावीस विसवा पापकर्माचा प्रवाह वाहील म्हणजे शंभर कर्मात साडेसत्याण्णवु कर्मे पापकर्म राहील आणि बाकी अडीच कर्मेच फक्त पुण्यकर्म राहतील. अशा प्रकारची अत्यंत दु:सह स्थिती या कलियुगात राहील.' युधिष्ठिर म्हणाला, 'हे बुध्द स्वामी अशाप्रकारचे जर कलियुग आहे तर या कलियुगाचा संसार कसा चालेल. या कलियुगातील लोकव्यवहार कशाप्रकारचे राहतील ते आपण मला सांगावे. या कलियुगात राजा कशाप्रकारचा होईल, प्रधान कशाप्रकारचे असतील? आणि प्रजा कशा प्रकारची असेल? वेदवेत्ते शास्त्री पुराणिक कशाप्रकारचे होतील आणि श्रोते कशा स्वरूपाचे असतील? रणसंग्रामात कशाप्रकारचे योध्दे असतील आणि युध्द कशाप्रकारचे होतील? या कलियुगात योगी, यति, ब्राह्मण कशाप्रकारचे होतील व दानधर्म कर्म कशाप्रकारचे होतील? हे सर्व मला सांगण्याची कृपा करावी. कलियुगात वृष्टी कशाप्रकारची होईल? जमीनीत कशाप्रकारचा पाक येईल? हे सुध्दां सागावे.' तेव्हा बुध्द भगवान म्हणाले, 'हे राजा युधिष्ठिरा, या कलियुगात सर्वच कर्मे विपरीत असे घडतील. अत्यंत अल्प अशी वृष्टि होईल आणि पृथ्वीत अन्नधान्य अत्यंत अल्प प्रमाणात होईल. ग्रहगतीच्या फेऱ्यामुळे आणि कलियुगातील असत्याचरणामुळे पृथ्वी अगदी नापेर होईल. अन्नधान्याची समृध्दता मुळीच राहणार नाही. प्रजा, पशुपक्षी यांची संख्या विपुल प्रमाणात होईल आणि त्यामुळे अन्नधान्याचा अतिशय तुटवडा भासेल. म्हणून लोक तृणधान्ये झाडपाला यावरच निर्वाह करतील. मांशासनाचा प्रकार अत्यंत वाढेल. समुद्रातील जलचर प्राण्यावर उपजिविका करतील. अन्नधान्य व संपत्तिची अल्पता असल्याने दानकर्म, धर्म वगैरे लोप पावल्यासारखे होतील. त्यागवृत्ति कमी होईल आणि स्वार्थीवृत्ति बळावेल. लक्षावधी लोकामधून

एखादा दानवंत होईल. दानकर्म करतांना सुध्दा मोठेपणा बडेजाव करतील. कोट्यावधी लोकातून एखादा खरा योगी यति होईल. हजारो लोकामधून एखादा योध्दा होईल व तशा हजारो योध्द्यामधून एखादाच शूरवीर धीट खरा युध्दकला शास्त्रविशारद होईल. राज्यकर्ते लोभी, स्वार्थी, ऐषआरामी आणि लाचखाऊ होतील. प्रधानसुध्दा तशाच प्रकारचे लंपटी, कपटी आणि आपमतलबी होऊन प्रजेला लुटतील. प्रजेच्या धनमाल जीवीताचे रक्षण करण्याची जबाबदारी विसरून त्यांची धनसंपत्ति आपल्या डाच्यात कशी येईल हेच ध्येय बाळगून प्रजेला लुटतील. प्रजेतील स्त्रीयांचे शीलसंरक्षण करण्याचे सोडून त्यांची बेअब्रु करून शीलभ्रष्ट करतील. अशाप्रकारचे राज्यकर्ते व प्रजासुध्दां तशाच प्रकारची चोर, दंभी, स्वार्थी, लंपट, धुतारी अशी होईल. सत्‌शास्त्रे पुराणे लोप पावतील. राजांच्या कथा कादंबऱ्या कपोलकल्पित साहित्याला विशेष प्राधान्य येईल. लोभी पंडित, शास्त्री स्वत:चे महात्म्य वाढविण्याकरीता तशा प्रकारच्या कथा पुराणांचा अर्थ लावून श्रोत्यांना स्वत:च्या भजनी लावतील. श्रोतेसुध्दां मतलबी, दंभी, कपटी आणि लंपट होतील आणि अशारीतीने या कलियुगात 'लोभी गुरुने लंपट चेला। दोनोका नरकमे ठेलंठेला॥' अशा प्रकारची परिस्थिती येईल. जे खरे सद्‌गुरु युगगुरु धर्मप्रवर्तक गुरु असतील, स्वत: ब्राह्मीस्थितीत राहून सद्भक्तांना खरोखर आत्मोन्नतीचा उपदेश देऊन त्याप्रमाणे जे आचरण करतील अशा सद्‌गुरुंच्या व सद्‌भक्तांच्या पुण्यप्रतापाने सृष्टीचक्र चालू शकेल अन्यथा विनाशकाल, आपदस्थिती, धरणीकंप, अनावृष्टी, अतिवृष्टी, भयानक आगी, रोगराई, अपघातीमृत्यू यांचे प्रमाण जास्त वाढून प्रजा त्रस्त होईल. (श्लोक ६०१-६१९)

राजा युधिष्ठिर बुध्द भगवंतास म्हणाला, 'हे स्वामी बुध्दनाथ माझ्या मनाचा एक संशय दूर करावा. या कलियुगात प्राधान्यभूत आणि मुक्तिदायक तीर्थ कोणते असावे बरे? तसेच दानकर्म करण्यास योग्य सत्पात्र कोण समजावा? हे भगवंता अतिशय श्रेष्ठ ऐहिक आणि पारलौकिक सौख्य शांतिदायक व्रत कोणते करावे आणि जप, पूजा, ध्यान, स्मरण करण्यास योग्य अशी दिशा कोणती असावी? या कलियुगात कोणत्या तत्वाच्या आश्रयाने धर्म राहील? पापकर्माचा ऱ्हास कोणत्या कर्माचरणाने होईल? या कलियुगात धर्माचे स्वरूप काय असेल कोणती वाणी श्रवण केल्याने श्रेय लाभेल? दान करण्याचे स्वरूप विधी पात्रापात्र विचार कशा प्रकारचा असेल ते सर्व आपण मला सांगण्याची कृपा करावी.' भगवान बुध्द म्हणाले, 'हे राजा धर्मा, तू विचारलेल्या साऱ्या प्रश्नांची उत्तरे मी तुला देतो तुम्ही एकाग्रचित्ताने श्रवण

करा. या कलियुगात अतिश्रेष्ठ आणि परमपावक अशी अनेक तीर्थे आहेत. मुख्यतीर्थे अष्टोत्तरशत म्हणजे १०८ अत्यंत महत्वाची आहेत. तिथे स्नान केल्याने, त्या तीर्थक्षेत्रांचे दर्शन केल्याने जीवात्म्याचा सारा पापपरिमल धुतला जातो. अशाप्रकारची ती तीर्थे आहेत. पण सद्‌गुरुचरणी त्या साऱ्या तीर्थांचा महिमा आहे कारण त्यांचे वास्तव्य सद्‌गुरुचरणी आहे. अशा सद्‌गुरुंच्या वास्तव्याठायी एकत्र येऊन जी गतगंगा, त्यांची सेवा पूजा अर्चा करते, ज्ञान श्रवण करते, अध्यात्मज्ञानाची चर्चा व आचरण ज्याठिकाणी होते ते गतगंगातीर्थ या कलियुगात विशेष प्राधान्यभूत व मुक्तिदायक आहे यासच सत्संग असे म्हणतात, अशा गतगंगेच्या ठायी सत्संगाठिकाणी केलेले दान हेच सत्पात्री आहे. त्या सद्‌गुरु महात्म्यांच्या धामावर चाललेले अन्नसत्र, गोरगरीब, अपंग, अनाथ, पीडीत लोकांची होत असलेली सेवा, धर्मशाळा, अनाथालये, दवाखाने, ग्रंथालये संकटग्रस्त लोकांना केली जाणारी मदत वगैरे अनेकानेक कार्यासाठी लागणारी धनसंपत्ति अन्नवस्त्र, वगैरे करिता मदत करणे - दान करणे हेच खरे सत्पात्री दान आहे म्हणून ही कार्ये ज्या महात्म्यांच्या हातून होत आहे - त्यांच्या संस्थेतून होत आहे. अशा सद्‌गुरु महात्म्यांना दानधर्म करणे अत्यंत श्रेयस्कर आहे. जिथे दान केलेल्या धनसंपत्तिचा - अन्नवस्त्र द्रव्याचा दुरुपयोग होतो, अनाठायी त्यांचा वापर केला जातो, अशा अपात्र ठिकाणी दानधर्म करून कांहीही लाभ नाही. जो पात्र दिलेल्या दानकर्माचा योग्य सदुपयोग करील त्यालाच दानकर्म करावे. या कलियुगात ऐहिक व पारलौकिक सौख्यशांति प्राप्तिसाठी शास्त्रात बरीच व्रते सांगितलेली आहेत, पण ज्या व्रताच्या आचरणाने मनुष्यास श्रेयप्राप्ति होते असे युगतीथीचे व्रताचरण करावे. कलियुगाची युगतीथी शुक्रवारचे चन्द्रदर्शन हे आहे म्हणून त्या व्रताच्या आचरणाने मनुष्यास पारमार्थिक लाभ होतो. जपपूजा, ध्यान करण्यास श्रेयस्कर पश्चिमदिशा युगधर्मानुसार महत्वाची मानलेली आहे. दान, दया, तपश्चर्या आणि शुचिर्भूतता या चारही अंगाने असलेल्या धर्माचे आचरण कलियुगात केवळ दया या एका तत्वाने सुध्दां होऊ शकेल. भूतजीवप्राणिमात्रावर दया करणे, आत्मौपम्यबुध्दीने वागणे हेअत्यंत महत्वाचे व अत्यावश्यक आहे. नित्यनित्य गतगंगेत जाऊन सत्संगात राहून कृतकर्माचा पापपरिमल धुवून काढणे अगत्याचे आहे. क्षमा म्हणजे दुःख सहन करणे हीच एक कसोटी आहे. संसारात ही कसोटी सहन करणे हे तप आहे. म्हणून उदार बुध्दिने जीवप्राणिमात्रावर दया करून क्षमा मागावी. क्रोधयुक्तवाणीचा अवलंब केल्यास कोणतीही कार्यसिध्दि होणार नाही. म्हणून मृदू व सत्यवाणीचा अवलंब करावा. ऐकणाऱ्याला आनंद व संतोष देणारे सत्यकल्याणकारक, ज्या भाषणाने अज्ञान नाहीसे होऊन आत्मप्राप्तीचा

मार्ग सापडतो, ज्यांचा ऐकणाऱ्याला वीट येत नाही. असे भाषण हे वाचीकतप होय. दुसरा बोलल्याशिवाय जो आपल्या वाचेला शीण देत नाही, व्यर्थ वेळ न दवडता ईश्वर स्मरण, वेदाध्ययन यांत जो वाणीचा उपयोग करतो त्यासच वाचिक तप म्हणतात. दानाचेही असेच आहे. स्वकष्टाने व सन्मार्गाने मिळवलेले धन पुण्यक्षेत्री अथवा पर्वकाळी एखाद्या विद्वान सदाचारी व सत्पात्र महात्म्यास आदरपूर्वक दिले असतां ते सात्विक दान होय. ज्याच्याकडून परतफेड होणार नाही त्यालाच दान करणे व मी दाता हा याचक असा भाव न ठेवता संतोषाने जे दान दिले जाते त्याला सात्विक दान म्हणतात. एखाद्याची ठेवलेली ठेव जशी त्याला परत देऊन आपण उतराई होतो त्याप्रमाणे फलेच्छा न ठेवतादान करणे याला सात्विक दान म्हणतात. परंतु दूध मिळेल या इच्छेने गाईला चारणे किंवा आहेरावर दृष्टी ठेवून नातलगांना लग्नकार्याचे आमंत्रण देणे किंवा लाच घेऊन मग दुसऱ्याचे काम करणे, त्याचप्रमाणे लोकात आपली वाखाणणी व्हावी अशा इच्छेने जे दान करतात त्याला राजसदान म्हणतात. नगराचा चव्हाटा, अपवित्र वस्ती असलेल्या जागा किंवा अरण्ये अशा ठिकाणी एकत्र जमून जुगारी, वेश्या, भाट किंवा तमासगीर लोक यांना जे लोक रात्री चोरी करून आणलेले धन मोठ्या उदारपणाने बहाल करतात, त्यांच्या त्या दानाला तामसदान म्हणतात किंवा कदाचित सत्पात्र मनुष्यास दिले तरी त्याची मानखंडना करून व अपशब्द बोलून आढ्यतेने जे दान दिले जाते ते तामसदान होय. वेदमंत्रांनी युक्त केलेले व स्विकारलेले दान देणाऱ्याला अथवा घेणाऱ्याला बंधनकारक राहत नाही. यासाठी दानकर्मे, यज्ञ पूजाअर्चादि कर्मे, तपकर्मे वगैरे सर्व वेदमंत्रोच्चाराने युक्त ब्रह्मार्पण करून करावे.'

युधिष्ठिर म्हणाला, 'हे बुध्दनाथ भगवान चार युगापैकी कलियुग हे शेवटी आलेले आहे. या कलियुगाची स्थिती कशी बरे असू शकेल. त्याचे आचारधर्म पुण्यपापकर्माचे व्यवहार कशाप्रकारचे होतील, हे सर्व आपण मला सांगावे.' तेव्हा भगवानबुध्द युधिष्ठिरास म्हणाले, --(श्लोक ६२०-६३४)

बुध्द भगवान म्हणाले, 'हे राजा युधिष्ठिरा चारही युगात हे कलियुग शेवटचे आहे. यापुढे पाचवे युगही नाही व सर्व प्राणिमात्र सृष्टीचा अंत आहे म्हणून हे कलियुग अत्यंत महत्वाचे व मोलाचे आहे. यात जीवात्म्याच्या साऱ्या कृतकर्माच्या भोगांचा परिपाक होईल. पापकर्म अथवा पुण्यकर्माचा निवाडा होऊन तत्काळ त्याची फळे जीवात्म्याला भोगावी लागतील. या कलियुगात पापी आणि धर्मी, देव आणि

दानव, सूर - असूर एकाच ठिकाणी कर्मे करतील, एकाच क्षेत्रात ते आपापल्या गुणकर्मानुसार कर्मे करतील पण प्रत्येकाची मति - बुध्दि भिन्न असल्याने त्यांना लागलीच आपापल्या कृतकर्मांची फळे बरी अथवा वाईट भोगावी लागतील. या हाती काम त्या हाती दाम अशा प्रकारची कर्मभोगांची स्थिती या कलियुगात विनाविलंब भोगावी लागेल. त्यात पापी बुडतील व धर्माचरण करणारे पुण्यात्मा हे उध्दरले जातील. सत्ययुगात एक हजार वेळेस केलेल्या दानकर्माचे एकदा फळ मिळत असे. पण या कलियुगात एकदा निरिच्छ बुध्दिने केलेल्या दानकर्माचे फळ सवालाख पटीने प्राप्त होते. म्हणजे सत्ययुगापेक्षा कित्येक पटीने हे कलियुग मुमुक्षु जीवात्म्यास लाभदायी आहे. सत्ययुगात एक हजार वर्षेपर्यंत केलेल्या तपश्चर्येचे फल या कलियुगात एकाच दिवसात केलेल्या तपश्चर्येने प्राप्त होते. एका पुण्यकर्माचे अनंत पटीने फळ प्राप्त होत असल्यानेच बाकीच्या तीनही युगात होऊन गेलेले जीवात्मे या कलियुगात जन्मास येण्याची आशा बाळगतात म्हणून कलियुगाच्या अंतसमयी अनंत करोडी जीवात्म्यांना सद्गती - मोक्षगती लाभेल. या कलियुगात मुख्य प्राधान्यभूत असे अथर्ववेदाचे महात्म्य अवर्णनीय आहे. त्रिवेदाच्या - वेदत्रयींच्या कर्मकांडामुळे मनुष्याचे मन स्थिर राहू शकणार नाही. कारण केवळ ऐहिक सुखोपभोगाकरिता केल्या जाणाऱ्या यज्ञयाग पूजाअर्चादि कर्मामुळे मनुष्याचे जीवनास पूर्णत्व येत नाही तर ते मिळवूनही शेवटचा जो पुरुषार्थ-मोक्ष-संपादन करणे हे अत्यंत महत्वाचे व अंतीम ध्येय आहे. अथर्ववेदातील गूढ अशा ब्रह्मविद्येच्या अभ्यासाशिवाय ते साध्य होत नाही म्हणून अथर्ववेद हा वेदत्रयीचा कळसआहे. त्याशिवाय मोक्षमंदीरास पूर्णत्व येणार नाही. हे धर्मराज हे कलियुग जरी कितीही कठीण दुस्तर असले तरी अत्यंत महत्वाचे व उपयुक्त आहे. यात कृतकर्माचा योग्य तोच व योग्य त्याच काळी निवाडा होतो व सत्याचे फळ हे मिळतेच. सत्याची नाव कलियुगाच्या पाप प्रवाहात अतिशय डोलायमान होते पण शेवटी पैलतीराला जाऊन पोहोचतेच. अशा प्रकारचे हे कलियुग अत्यंत श्रेष्ठआहे. यात राजा-प्रजांचे व्यवहार संबंध अत्यंत कठिण दुस्तर राहतील. भूतभक्तिला आणि दांभिकपणाला अतिशय प्राधान्य येईल. ज्याप्रमाणे एखाद्या आईवडिलांचा दुष्ट कुपुत्र असतो तो बंडखोरपणाने आईवडिलांना त्रास देतो त्याप्रमाणे अधर्मी ढोंगी दंभी लोक खऱ्या ईश्वराला सोडून दंभपणाने लोकांना लुटून स्वत:च्याच भजनी लावून बुडवितील व ते स्वत: तर कायमचेच नरकागारात खिचपत पडतील. (श्लोक ६३५-६४६)

कलियुगात ब्राह्मण शुष्क वेदपठण करतील. त्या वेदपठणाचा काहीही उपयोग-लाभ होणार नाही. आपापसातील फुटीर मतभेदामुळे एकमेकांचा द्वेष निंदा तिरस्कार करून उच्चनीच असे भेद पाडतील. अथर्ववेदाला निकृष्ट मानून त्याचा निषेध, अवहेलना,

तिरस्कार करतील. अथर्ववेदाचे महत्व जाणणार नाहीत. धनसंपत्तीच्या लालसेने म्हणजे केवळ दक्षिणा लाभाच्या उद्देशानेच वैदिक कर्मकांड यज्ञयाग केले जातील. त्यात शुध्दाशुध्दतेचा, पावित्र्याचा विचार केला जाणार नाही. ग्रहगती शुभाशुभफळ वगैरे गौण मानले जाईल व धार्मिक खुळ्या भावना समजून शुध्दाशुध्दतेचा विचार डावलून कर्मे करतील. तशी कर्मे यशस्वी न होता विपरीत परिणाम घडवून आणतील. आणि त्यामुळे लोकांच्या धार्मिक भावना श्रध्दा कमी होतील. सर्वक्षेत्रात बुध्दीवादाला अधिक प्राधान्य येईल. युगधर्मानुसार युगगुरु अथवा युगप्रवर्तक सद्गुरुला शुध्दबुध्दीने कोणी मानणार नाही. दहाव्या अवताराचे अवतार कार्याबद्दल आणि अवताराबद्दल लोकात भ्रम पसरवितील म्हणून सत्य वस्तुस्थितीबद्दल असंबध्दता होईल. कलियुगामध्ये पशुंची संख्या विपुल प्रमाणात होईल त्यांच्या पालनपोषण संगोपनास योग्य अशी कुरणे जंगले नसल्यामुळे चारापाण्याच्या अभावी पशुंची संख्या कमी करावी लागेल. पर्यायाने पशुहिंसेला उत येईल व मांशासनास दोष गणला जाणार नाही. धर्माने गाई पूज्य मानल्या जातील पण त्यांची सुध्दां हिंसा होईल. लोकांच्या मनात कोणत्याहीप्रकारचा दयाभाव प्रेमभाव राहाणार नाही. विश्वासघात तर पदोपदी करतील. लोभस्वार्थाकरितां एकमेकांचे बळी पाडण्यास ही कमी करणार नाही हिंसकवृत्ति अतिशय बळावेल. असल्या कृत्यामुळेच ह्या कलियुगास सर्वात निकृष्ट चांडाळाप्रमाणे गणलेले आहे. अशा या कलियुगात विष्णुभगवंतास अथवा त्याच्या अवतारपात्रास जो जाणणार नाही तो सुध्दां चांडाळच जाणावा. भगवानविष्णुच्या अथवा त्याच्या अवताराच्या उपासनेशिवाय कोणत्याही कुळाला, वंशाला, घराण्याला प्राधान्य नाही कारण विष्णुची भक्ति ही सत्वाधिक्य गुणयुक्त असल्याने सत्वांश गुणाशिवाय ब्राह्मणाला महत्व नाही. जो ब्रह्मा विष्णुची महेशाची निंदा करील तो चांडाळ समजावा. ब्रह्मा हा सद्गुरुरुपाने, विष्णु हा अवताररूपाने आणि महेश हा ईश्वररूपाने या जगात आपापल्या योगमायेच्या अंशभूत स्वरूपाने जगत्कार्य करीत असतात. त्यांचे हे कर्म रहस्य न जाणता त्यांची जो निंदा करतो तो चांडाळ समजावा. अथर्ववेद हा या कलियुगाचा प्राधान्यभूत वेद आहे. या कलियुगात भगवान विष्णु मलिनरूप धारण करून अवतार कार्य करणार आहे. या कलियुगात कोणत्याही एकाच वंशाला, कुळाला, घराण्याला, जातीला, वर्णाला प्राधान्य राहाणार नाही. सर्वांच्या कूळमर्यादा वगैरे नष्ट होतील. सर्व मानवांची जात वर्ण एकच गणले जाईल आणि म्हणून स्वतःच्या अवताररूपाने भगवान विष्णु जगतास एकतेचा हा नीतीपाठ देतील. आद्यनारायणाने या कलियुगाला दिलेल्या वरदानानुसार कलियुग हे सर्वश्रेष्ठ गणले जाईल. तीनयुगामध्ये वर्ण जात वंश भेद मानले जात,

परंपरागत ते भेद पाळले गेले पण कलियुगात वर्ण जात कुळ वंशाचा अभिमान मानवाच्या उन्नतीस आड येऊ लागतील. म्हणून भगवान विष्णु एका सामान्य मलीन घराण्याचा आश्रय घेऊन मानव जातीच्या एकाकाराची धुरा स्वत: वाहतील. अठरा पगड जाती चार वर्ण एक होतील आणि त्यांच्या या एकाकारास जो जुमानणार नाही त्याचा विध्वंस केला जाईल आणि नंतर भगवान निकलंकी नारायण अथर्ववेदातील ब्रह्मविद्येचा सर्वत्र प्रसार करून मानवांच्या अध्यात्मिक शक्तिची वृध्दी करून आत्मोन्नति घडवितील. अशाप्रकारचा तो अशरणाशरण भगवान (जो कोणालाही शरण जात नाही पण सर्व भूतप्राणिजात ज्याला अनन्यभावे शरण येतात तो आदिनारायण) या कलियुगात अनंत लीला करील. यासाठी हे सद्भक्त पांडवांनो तुम्ही सुध्दां या अथर्ववेदी ब्रह्मविद्येचा अभ्यास करा, आचरण करा आणि आपल्या जीवात्म्याचा लय त्या अगम्य अगोचर परमात्म्याच्या स्वरूपात करा. अशा अथर्ववेदी ब्रह्मविद्यासंपन्न ब्राह्मणाच्या घराचा आश्रय घेऊन भगवान अवतार धारण करतील तो कोणाच्याही घरी बालक रूपाने जन्माला येणार नाही. तर स्वत: स्वयंसिध्द प्रगट होईल. कलियुगात त्याचीच भक्ति प्राधान्यभूत राहील. जे त्याची भक्ति करतील ते या कलियुगात ब्राह्मणाप्रमाणे पूज्य गणले जातील. (श्लोक ६४७-६५९)

जे भक्तजनांची निंदा करतील, साधुसंतमहात्म्यांची अवहेलना तिरस्कार करतील त्यांचे ते पापकर्म कोणत्याही उपायाने मिटू शकणार नाही. ज्या भक्ताने केवळ एकमेव ईश्वरावर आपला दृढविश्वास ठेवून त्यालाच आपले तनमनधन प्राण अति प्रेमादराने अर्पण केले, ज्याचा प्रीयप्रेमास्पद तो भगवंतच असतो तो कोणाचीही निंदा करीत नाही, मत्सर द्वेषभाव तिरस्कार हा त्याच्या गावीही नसतो. सर्वभूत प्राणिमात्रावर तो अखंड प्रेमाची वृष्टी करतो, मनुष्यरूपात तो एक चालता बोलता ईश्वर समजावे दगडाच्या मूर्तित ईश्वरत्व कल्पून मानावे लागते पण तशा सद्भक्तांच्या हृदयात ईश्वर सातत्याने अखंडीत रितीने बसलेला असतो. सतपंथाचे पालन आचरण करणाऱ्या मुमुक्षुची सुध्दां हीच स्थिती असते. देवांचे गुण म्ह. दैवी संपदेचे गुण ज्याचे अंगी बाणलेले असतात ते खरे सत्पंथी होत. ते दैवी संपत्तीचे गुण असत -

१) पहिला गुण म्हणजे अभय हा होय. जो सर्व जग आत्मस्वरूपात पाहतो त्याला संसाराचे भय कोठून असणार? आपली जगाविषयी अद्वैत भावना झाल्यावर भयाचे नावही ऐकू येत नाही. २) दुसरा गुण शुध्दबुध्दि हा होय. ज्याप्रमाणे गंगेचे पाणी सदैव निर्मळ असते. त्याप्रमाणे ज्याची बुध्दि निर्मल असते, संकल्प विकल्प

हे दोन्ही ज्याठिकाणी निर्माण होत नाहीत. रजोगुण व तमोगुण हे नाहीसे होऊन आत्मचिंतनाची आवड ज्याबुध्दीला लागली आहे ती शुध्दबुध्दि होय. ३) योग म्हणजे चित्तवृत्ति स्थिर करणे. यालाच ज्ञानयोग असे म्हणतात. ४) आपला शत्रु जरी असला तरी तो जर संकटात असेल तर त्यासही मदत करणे हे खरे दान होय. वृक्ष ज्याप्रमाणे आपली पाने फुले, फळे, छाया यापैकी काहीही जाणाऱ्या वाटसरूपासून लपवून ठेवीत नाही. त्याप्रमाणे कायावाचा मनाने व संपत्ति प्रसंगानुसार हवे ते देऊन दमलेल्याचे समाधान करणे यालाच खरे दान म्हणतात. ५) इंद्रिये ताब्यात ठेवणे याला दम असे म्हणतात. हा दैवी संपत्तीचा पाचवा गुण आहे. ६) यापासून खरे वैराग्य प्राप्त होते. ७) ब्राह्मणापासून तो स्त्रियापर्यंत सर्वांनी आपापल्या अधिकारानुसार जे जे धर्म असतील ते ते यथाशास्त्र पाळावेत परंतु त्यात फलाशा ठेवू नये. यालाच यज्ञ म्हणतात. ८) आपले मुख पाहता यावे म्हणून ज्याप्रमाणे आरसाआपण वरचेवर पुसून स्वच्छ ठेवतो त्याप्रमाणे ईश्वराचे स्वरूप कळावे म्हणून नेहमी वेदाभ्यास करणे व त्याची स्तुति स्तोत्रे गाणे याला स्वाध्याय म्हणतात. ९) ब्राह्मणांनी वेदातील ब्रह्मसूत्रे व ईश्वराचे नाव हेच वरचेवर म्हणावे. धूप अग्नीवर पडून त्याचा नाश होतो, पण तो सर्वांना सुगंध देतो त्याप्रमाणे आत्मस्वरूपाची प्राप्ति होण्यासाठी प्राण इंद्रिये व शरीर झिजविणे याला तप असे म्हणतात. १०) सर्व प्राणिमात्राशी सौजन्याने वागणे याला आर्जव असे म्हणतात. ११) जगाच्या सुखासाठी कार्य करीत राहणे, काया वाचा मनाने कोणासही न दुखविणे यालाच अहिंसा म्हणतात. १२) सत्यमधूर व हितकारक असे जे भाषण ते सत्य बोलणे होय. ते तीक्ष्ण असूनही ते शीतल आहे. किंवा खाल्ले असता तत्क्षणी रोगाचा नाश करील आणि जीभेसही कडू लागणार नाही असे औषध, अथवा मऊपणा पाहिला असता डोळ्यातील बुबुळावर घासले तरीही खूपत नाही व कठोरपण पाहू गेले असता पर्वताचा कडाही फोडून बाहेर पडते असे पाणी, तर यांच्याप्रमाणे संशय निवृत्ति करण्यात तीक्ष्ण परंतु ऐकले असता मधुर असे जे भाषण ते सत्य भाषण होय. १३) काळजाला घरे पाडणारे कठोर असे बोलणे ऐकूनही ज्याला क्रोध येत नाही त्या स्थितीला अक्रोध म्हणतात. राखेमद्ये तूप ओतले असता जसा अग्नि पेटत नाही तसा ज्या अक्षरांनी काम व क्रोध उत्पन्न होतो त्याचा उच्चार केला असताही ज्याला क्रोध येत नाही त्याला अक्रोधत्व म्हणतात. १४) झोपेचा त्याग केला असता स्वप्नांचा त्याग जसा आपोआप होतो, अथवा धनाचा त्याग केला असता विषयोपभोगाचा त्याग आपोआप होतो त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष देहच मी या अहंकाराचा त्याग करून सर्व संसाराचा त्याग

करतात त्यालाच खरा त्याग असे म्हणतात. १५) यापुढील गुण म्हणजे परमशांती. आत्मवस्तुशी एकरूपता जेव्हा होते तेव्हा अंत:करणात खरे शांतीचे राज्य सुरु होते. १६) कोणत्याही दु:खी कष्टी जीवाला त्याच्या दोषापासून मुक्त करून दोष घालविण्यास मदत करणे म्हणजे अपैशून्य होय. १७) पौर्णिमेचा चंद्र हा शीतलता देण्यात लहान थोर असा भेदभाव न करता ज्याप्रमाणे सर्वांना सारखाच देतो त्याप्रमाणे दु:खितांचे दु:ख हरण करतेवेळी हा उत्तम हा अधम असा भेद दयार्द्र अंत:करणाचा मनुष्य करीत नाही, त्या गुणासच दया असे म्हणतात. वाहणारे पाणी ज्याप्रमाणे वाटेत येणारा खळगा भरून टाकल्याशिवाय पुढे जात नाही तसा आपल्या समोरील नमलेल्या मनुष्याला संतोषित केल्याशिवाय जो राहात नाही व दुसऱ्यांचे सुख पाहून ज्याला समाधान वाटते तो खरा दयाळू मनुष्य होय. १८) कोणत्याही विषयांची ओढ उत्पन्न न होणे याला अलोलूपत्व असे म्हणतात. १९) जलचरांना पाणी, पक्ष्यांना आकाश किंवा लहान बाळाला आईचे प्रेम जसे सुखकर वाटते तसे जगातील भूतमात्रांच्या विषयी ज्याला प्रेम वाटते त्या गुणास मार्दव असे म्हणतात. २०) सुंदर मनुष्यास कोड उत्पन्न झाले किंवा संभावीत मनुष्यावर आळ आला असता त्यांना ज्याप्रमाणे लज्जेने प्राणसंकट वाटते त्याप्रमाणे दु:खद चिन्हांनी युक्त असलेले शरीर धारण करणे साधूंना लज्जास्पद वाटते. या गुणास ऱ्ही असे म्हणतात. २१) मन व प्राण यांच्या संयमनाने चंचलता नाहीशी होते तेव्हा देहाला व मनाला स्थिरत्व येते, त्याला अचापल्य म्हणतात. २२) ईश्वरप्राप्तीकरीतां ज्ञानमार्गाचे मनापासून आचरण करणे याला शारीरिक तेज असे म्हणतात. सहनशीलता असूनही तिचा गर्व न होणे याला क्षमा असे म्हणतात. २३) अध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशी सर्व प्रकारची संकटे सहन करणे या गुणास धृति असे म्हणतात. २४) शरीर व मन पवित्र व शुध्द ठेवणे यालाच शौच असे म्हणतात. २५) गंगेचे पाणी समुद्राकडे जातांना सहज तीरावरील वृक्षांचे पोषण करते व स्नान करणाराचे पाप व ताप नाहिसे करते त्याप्रमाणे स्वार्थ स्वाधिन असतांना दुसऱ्यांनाही जे सुख देतात त्यांच्या या गुणास अद्रोहत्व असे म्हणतात. २६) लोकांनी मान दिला असता जो संकोचित होतो त्याच्या त्या गुणास अमानित्व म्हणतात. असे हे दैवी संपत्तीचे गुण आहेत मनुष्यजातीत उच्चनीच असा जन्माने कोणीही नाही. ज्याचे त्याचे उत्तम अधम कर्मानुसार व बुध्दिनुसार तो मनुष्य उत्तम वा अधम होत असतो. परमेश्वराची सहस्त्र नावे आहेत. कोणत्याही नावाने हाक मारली तरी ती त्यालाच उद्देशून असणार म्हणून त्याच्या ठायी उत्कृष्ट निकृष्ट असा भेद नाही. मनुष्याने सदैव उत्तम बुध्दीचा वापर करून उत्तम कर्मे

करून उत्तम होण्याचा प्रयत्न करावा. पंचविषयांचे ज्ञान संपादून पंचेन्द्रिये दमन करून सत्यवचन व सेवा वृत्तीचे अवलंबन करावे. सत्संगात नित्यनित्य राहून गतगंगेत कृतकर्माचे निवेदन करून कर्मदोष टाळावा म्हणजे त्या जीवात्म्यास यमयातना भोगण्याची वेळच येणार नाही. परमेश्वराचे सहस्त्रनाम न जाणता वृथाभिमानाने जे लोक अमुकच नाम श्रेष्ठ अमूक कनिष्ठ असा भेद करतात ते कितीही प्रकांड पंडित असले तरी मिथ्या समजावेत. अशा भेदबुध्दी मानवाचे मुखावलोकन सुध्दा करू नये. त्याचे मुखावलोकन दुषित जाणावे संत महात्मे सत्पुरुष अशा द्वेषी मत्सरी मनुष्यास शापभ्रष्ट करतात, त्याचा निषेध करतात. मनुष्य जन्मात येऊन मानवाच्या उन्नतीचे ज्ञान जो मिळवीत नाही, मानवता धर्माप्रमाणे वागण्याचा व वागविण्याचा जे प्रयत्न करीत नाहीत त्यांचा मानव जन्म व्यर्थ जाणावा. पशुपक्ष्यादिकांच्या जन्मापेक्षाही तशा अकर्मण्य मनुष्याचा जन्म धि:कारास पात्र समजावा. ज्या मनुष्याने स्वप्रयत्नाने सत्शास्त्रांचा अभ्यास करून वा सतगुरु महात्म्याकडून आत्मोन्नतीचे ज्ञान संपादन करून स्वत:ची अध्यात्मिक प्रगती केलेली आहे. त्यांच्यावर समाजाचे ऋण असते ते म्हणजे मानवमात्राला संपादन केलेल्या ज्ञानाचा उपदेश करून समाज जागृति करावी. स्वत:च्या आदर्शाने समाजपुरुषास दीपवून ज्ञानज्योतीचा प्रकाश करावा हे करतांना जो संकोच करील अथवा संकुचित वृत्तीने ज्ञानदान करील त्याच्या शिरावरील हे ऋण उतरणार नाही म्हणून सत्ज्ञान आपण संपादन करावे व लोकांना त्याचा उपदेश करून ज्ञान संपन्न करावे. (श्लोक ६६०-६६९)

'जे परमेश्वराच्या दरबारात म्हणजे मंदीर पूजागृह वगैरे ठिकाणी केवळ प्रसाद मिळण्याच्या आशेने जातात ते हीन प्रवृत्तीचे जाणावे. ज्यांनी कुळाशिलाची मर्यादा सोडलेली आहे तेच हीनदीन लोक पोट भरण्याच्या आशेने मंदीर, पूजागृहे, सदाव्रते वगैरे ठिकाणी धाव घेतात. प्रसाद मिळायचाच असेल तर आणि सदाव्रतात जेवावयाचे असेल तर आधी त्या भगवंताच्या धामावर भेटवस्तू, प्रसादाकरिता वस्तू, पदार्थ, द्रव्य, अन्नधान्य अर्पण करा. कांहीही अर्पण केल्याशिवाय प्रसाद घेणे अथवा जेवण करणे म्हणजे भगवंताचा कृतघ्नी जाणावा तो पापी समजावा. परमेश्वराच्या दरबारात मंदीर देवघरात चोरी करणे महान पातक आहे. तेथील वस्तू जरी लोकांनी दिलेल्या असल्या तरी भगवंताला भेट म्हणून अर्पण केलेल्या असतात म्हणजे भगवंताच्या अथवा मंदीराच्याच असतात. त्या वस्तूवर कुदृष्टी ठेवून चोरणे पळविणे किंवा स्वत: उपभोग घेणे हे महान पापमूलक आहे. तशा व्यक्तीचे रोम रोम दु:ख व्याधी पीडा भोगतील. प्रसाद वाटतांना जे तोंड पाहून कमी अधिक भाग विभाग करतील ते

सुध्दा पापकर्माचे अधिकारी होतील. ऋषिश्राप अत्यंत दुस्तर असतो पण तो सुध्दां उ:शापाने मिटू शकेल पण परमेश्वर दरबारात केलेली चोरी अन्याय, व्यभिचार, भ्रष्टाचार, बेईमानीपणा याची फळे भोगल्याशिवाय सुटकाच नाही. ह्या कर्मदोषांची फळे पिढ्यान पिढ्या वंश परंपरागत भोगावी लागतात. जो मनुष्य धर्मावरील श्रध्दा कमी करील त्याचे पातक त्याच्याच शिरावर येऊन पडेल. केवळ ऐहिक लाभाकडे दृष्टी ठेवून धर्माचरण करीत असला आणि त्या त्याच्या आकांक्षा पूर्ण होत नसल्या म्हणजे मनुष्याची धर्माकडे अनास्था होते, पण ही त्याच्या मनाची संकुचित भावना होय. दृढश्रध्देने धर्माचरण केल्यासच मनुष्याची ऐहिक व पारमार्थिक उन्नती होत असते. याकरिता हे सद्भक्तांनो प्रथम तुम्ही सद्धर्माचे ज्ञान संपादन करा. अज्ञानपणात राहू नका. मनुष्य जन्मात येऊन धर्माचे ज्ञान नसणे पापमूलक आहे. पशूंना पशुधर्माचे ज्ञान असते. आहार, निद्रा, भय, मैथुन न शिकविताही निसर्गता पशूपक्षी जीवप्राणीमात्रांना असते, त्याप्रमाणे मानवाला मानवता धर्माचे ज्ञान व आचरण अत्यावश्यक आहे. अज्ञानासारखे दुसरे कोणतेही पाप नाही. भगवंताच्या दरबारात प्रसादाची अथवा अन्नधनाची चोरी करणारा मनुष्य मनुष्य म्हणण्यासही लायक नाही. तसा मनुष्य बिनधोक नरकात जाईल. त्याला कोणी रस्त्याने अडविणारसुध्दा नाही. अन्यायाने बळजोरीने बेईमानपणाने मुक्कर बनून जो अन्न खाईल त्याला ब्रह्महत्येचे पातक लागेल. खाल्लेल्या अन्नकणाइतकी वर्षे तो अपार यमयातना भोगील. स्वत:च्या मुखाने न मागता जो प्रसाद मिळतो तोच खरा प्रसाद होय. जे खरे ऋषिवर असतात ते स्वत:च्या मुखाने कधीच प्रसाद मागत नसतात. परमेश्वराच्या दरबारात आल्यानंतर प्रसाद हा न मागताच मिळतो पण जीवात्म्याची तशी श्रध्दा असावी. प्रसाद वस्तूरूपाने, अन्नरूपाने, जरी नाही मिळाला तरी संत महात्म्यांचा भगवंताचा कृपा प्रसाद अयाचितास सुध्दां मिळतच असतो. ती दृढश्रध्दा नसली आणिप्रसादाची याचना केली तर त्यास प्रसाद मिळेल पण त्याची भावना वासना केवळ प्रसादापुरतीच आहे असे गणले जावून निरिच्छ बुध्दीने केलेल्या भक्तिपासून तो दुरावतो म्हणून कोणतीही कामना मनात न बाळगता भगवंताचे स्मरण चिंतन ध्यान करा. परमेश्वराच्या दरबारात जाऊन विन्मुख राहणे म्हणजे त्याची भक्ति, पूजा, अर्चा, ध्यान, चिंतन, स्मरण न करणे, ज्ञानचर्चा न ऐकणे सत्संग न करणे वगैरे अशा अकर्मण्यतेत राहणे अत्यंत अनर्थमूलक पाप मूलक आहे. त्यासाठी हे सद्भक्तांनो तुम्ही ज्ञान मिळवा. अज्ञानपणात राहू नका केवळ अंधश्रध्देची कास धरू नका. जो मनुष्य आत्मज्ञान संपादन करून त्याप्रमाणे आचरण करतो तो भगवंताला अत्यंत प्रिय असतो जे भक्त सर्व इंद्रियासह आपले चित्त

ईश्वराला अर्पण करून रात्रंदिवस त्याचे भजन करतात तेच परमयोगी होत. मन व बुध्दि ईश्वराला अर्पण केल्यावर देहाभिमान आपोआप नाहीसा होतो व भगवंताची प्राप्ती सहज होते. चोवीस तासातून दहावा भाग तरी अथवा क्षणभर जरी आपले लक्ष्य भगवंताकडे लावले तरी मुक्ति मिळेल. अभ्यासाने दुष्कर गोष्टी सुध्दा साध्य करता येतात. पण कदाचित ही गोष्ट जमण्यासारखी नसली तर प्रपंचात राहून इंद्रियांना न कोंडता विषयांचा उपभोग घ्यावा पण मन वाचा आणि शरीर यांच्याकडून जो जो व्यापार घडेल तो तो मी करतो असे म्हणू नका. तर अभिमान सोडून सर्व कर्मे मला अर्पण करा. म्हणजे सहजगत्या तुम्ही मुक्त व्हाल. कर्ताकरविता विश्वचालक परमात्मा आहे अशी धारणा ठेवा! अथवा हे ही जमत नसेल तर कर्मे करून सोडून द्या. त्यांच्या फळाची अभिलाषा धरू नका. भाजलेले बी जसे पेरले असता उगवत नाही त्याप्रमाणे निरिच्छ बुध्दीने केलेल्या कर्मामुळे पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. अभ्यासापेक्षा ज्ञान हे श्रेष्ठ आहे. ज्ञानापेक्षा ध्यान हे वरच्या पायरीचे आणि कर्मफलांचा त्याग हा त्याहीपेक्षा श्रेष्ठ आहे. सर्वात श्रेष्ठतम गोष्ट जर कोणती असेल तर ती म्हणजे आत्मानुभव होय. त्याच्या प्राप्तिमुळे अखंड आनंदाचा लाभ मानवास होतो. इतर विषयांचे आनंद नष्ट होणारे असतात व ते नित्य मिळवावे लागतात परंतु ब्रह्मानंद ही अशी गोष्ट आहे की जी एकदाच मिळविण्यासाठी कष्ट पडतात पण मिळाल्यानंतर पुन्हा यातायात करावी लागत नाही. तसेच तो आनंद कोणी काढूनही घेऊ शकत नाही. खरा सद्भक्त कोणाही प्राण्याचा द्वेष करीत नाही. त्याच्या ठिकाणी आपपर उच्चनीच अशी कल्पना नसते. गाईची तहान भागवावी आणि वाघाला विष होऊन मारावे असा भेदभाव ज्याप्रमाणे पाण्याजवळ नसतो त्याप्रमाणे सर्व प्राणीमात्रांशी तो मित्रभाव ठेवतो. तो क्षमेने संपन्न असतो. समुद्र ज्याप्रमाणे सदैव जलाने परिपूर्ण असतो त्याप्रमाणे तो नित्य संतुष्ट असतो. मन व बुध्दि ईश्वरासच अर्पण करून त्याच्याच भजनानंदात तो रंगून गेलेला असतो असा भक्त भगवंताला प्राणापेक्षाही प्रिय असतो. चंद्राप्रमाणे जो सर्व भूतप्राणिमात्रांना समान मानतो, जो निंदेने रागावत नाही अथवा स्तुतीने प्रसन्न होत नाही जो लाभ झाला असता संतोष व हानी झाली असता उद्वेग मानीत नाही असा जो सद्भक्त तो परमवंदनीय जाणावा. तसे सद्भक्त तीर्थांना सुध्दा पावन करतात. त्यांच्या संरक्षणासाठी स्वतः निर्गुण निराकार ईश्वर सगुण साकार होऊन धावत येतो. हे सद्भक्तांनो तुमच्या भक्तिबलानेच मला येथे खेचून आणले. तुम्ही मला अत्यंत प्रिय आहांत.' (श्लोक ६७०-६८९)

भगवान बुध्द पांडवास म्हणाले, 'हे सद्भक्तांनो मी तुमच्या हिताचा आत्मकल्याणाचा मार्ग तुम्हाला सांगितला त्याप्रमाणे वागून आत्मकल्याण करून घ्या. आता माझे अवतार कार्य संपुष्टात आले मला माझ्या स्थानी गेलेच पाहिजे. आता तुम्ही मला रजा द्या आणि सुखाने व आपल्या सद्बुध्दीने कर्तव्य कर्म करा.' तेव्हा पांडव म्हणाले, 'हे स्वामी आपण असे विपरित का बोलत आहांत. आम्ही आपले दास सेवक आहोत. तुम्ही आमचे स्वामी प्रेमळ पिता आहात. सन्मार्गदर्शक सद्‌गुरु आहात. आम्ही तुम्हाला रजा देणारे कोण आहोत. तुम्हाला रजा देऊन मग आम्ही मागे शिल्लक राहून काय करू. तुमच्या शिवाय आम्हाला इथे राहाताच येणार नाही हे नाथ आजपर्यंत या दासांनी आपली चरण सेवा केली. हे चरण आजपर्यंत आम्ही आमच्या हृदयात धारण केले. आज यांचा वियोग आम्हाला सहन होणार नाही. हे सद्‌गुरुनाथ माऊली आम्हाला सोडून आपण जाऊ नका. हे अविनाशी युगगुरु जर आपणाला जायचेच असेल तर आम्हालाही आपल्या बरोबर घ्या. कृपा करा हे जगन्नाथा! तुमच्या शिवाय एक क्षणभरही आम्ही इथे राहणार नाही.' भगवान बुध्द म्हणाले, 'हे सद्भक्तांनो मला सुध्दा तुमच्या सारख्या सद्भक्ताशिवाय राहावेसे वाटत नाही पण जगतकार्य करण्याकरिता योगमायेची आड घेऊन जे कार्य मी करीत असतो त्याला माझ्याच हाताने बाधा आणू शकत नाही. मी तुमच्या हृदयात गुप्तरूपाने नित्यनिरंतर आहे पण प्रगट साकार रूपाने अधिक वेळ मला राहता येणार नाही. तुम्हाला अजून बरेच कार्य करायचे आहे. एवढ्या मोठ्या भारतवर्षाच्या राज्याची धुरा तुमच्या शिरावर आहे. ती जबाबदारी पार पाडून अथवा दुसऱ्या कोण्या योग्य व्यक्तिवर त्याचा भार सोपवून तुम्हाला माझे अनुसरण करता येईल. या कपटी आणि दुराचारी कलियुगात राहण्यापेक्षा तुम्हाला राज्याचा त्याग करणेच श्रेयस्कर होईल. हे धर्मराजा या कलियुगात प्रगट रूपाने राहता येणार नाही.' युधिष्ठिर म्हणाला, 'हे भगवंता मग तुमच्या शिवाय हे जगतचक्र कसे बरे चालू शकेल? आपल्या अस्तिवाशिवाय ह्या जगताचा कोणताच व्यवहार होऊ शकणार नाही, जग सारे प्रलयाप्रत जाईल.' तेव्हा भगवान बुध्द म्हणाले, 'हे धर्मराजा तुझे म्हणणे अगदी योग्य आहे पण मी या कलियुगात प्रगट सगुण साकार रूपाने राहू शकणार नाही. सद्भक्तांच्या हृदयात गुप्तरूपाने अखंडीतपणे राहील. सद्भक्त संत सत्पुरुष सद्‌गुरु महात्मे माझ्याच अंशाने परीपूर्ण राहतील. मीच त्यांच्या रूपाने या जगातातील अज्ञ जीवात्म्यांना ज्ञानप्रकाश देईन. तसे पाहिले तर हे सारे जग माझ्याच अंशापासून झालेल्या योगमायेने निर्माण केले. त्यातील अणुरेणुमध्ये चैतन्य प्रकाश रूपाने माझेच आस्तित्व आहे.

पण मायेच्या उपाधीभेदाने प्राणिमात्रांच्या ठायी अविद्येचे आवरण पसरलेले असते. म्हणून जीवात्मा मला न जाणता आपले स्वतंत्र अस्तित्व कल्पून अहंभावनेने कर्म करतो व जन्म मरणास व नाना प्रकारच्या वासनात्मक भोगयोनीस प्राप्त होतो. वस्तुत: मी प्रत्येकाच्या हृदयात चैतन्यरूपाने आस्तित्वात असतो. ज्याप्रमाणे फुलामद्ये सुगंध असतो जीवप्राणिमात्रात प्राणरूपाने मीच वावरतो. त्याचप्रमाणे संपूर्ण विश्वब्रह्माडांत सुक्ष्म रूपाने मी व्याप्त आहे, हे जे जाणतात त्यांच्या जवळ मी प्रत्यक्ष प्रगट असतो. ( श्लोक ६९०-७०१ )

धर्मराजा भगवंतास म्हणाले, 'हे स्वामी तुम्ही प्रगट रूप केव्हा आणि कोठे धारण कराल याची जाणिव आम्हाला द्यावी.' तेव्हा बुध्द भगवान म्हणाले, 'हे राजा युधिष्ठिरा मी तुम्हाला माझ्या प्रगट वास्तव्याचे स्थान सांगतो ते तुम्ही नीट लक्षपूर्वक श्रवण करा. सहस्त्रद्विप अथवा श्वेतद्वीप हे माझे शेषशायी नारायणाचे मुख्य वास्तव्य स्थान आहे. त्याठिकाणी म्हणजे उत्तर ध्रुव प्रदेशात एक हजार बेटांचा द्रिप समुह आहे. तेथे मनुष्यवस्ती नाही केवळ बर्फ सर्वदूर पसरलेला आहे. हा आर्किटीक महासागराचा उत्तरभाग म्हणजे बर्फाच्छादित प्रदेश आहे. येथे शेषशायी नारायणाचे मुख्य वास्तव्यस्थान असून आर्यांचे मूळ उगमस्थान आहे. असे ब्रह्मवैवर्तपुराण, विष्णुपुराण, ब्रह्मपुराण वगैरे ग्रंथात वर्णन आहे. यालाच सहस्त्रद्विप अथवा श्वेतद्विप म्हणतात. या स्थानाहूनच मी या कलियुगाच्या शेवटच्या प्रहरात निकलंकी नारायण नावाने प्रगट होऊन अवतार धारण करीन. माझे वाहन जो शेष आहे तो श्वेत अश्व होईल व त्यावर आरूढ होऊन श्वेत द्विपामधून मी जंबुद्विप भरतखंडात कुवारीका क्षेत्रावर येण्यासाठी प्रयाण करीन. माझी अवताराची कळा सद्‌गुरु ब्रह्माजवळ राहील. सद्‌गुरु ब्रह्मा हे कलियुगात इमामशाह या नांवाने प्रगट होतील. हे जगताला आपल्या ब्रह्मकळेचा परिचय देतील आणि कुवारीका भूमीत आपले आसन प्रगट करतील. ही कुवारीका भूमी साबरमती नदी तिरावर असेल या साबरमतीला कलियुगात गंगेचे महत्व येईल. तेथे सद्‌गुरु ब्रह्मा आपली दिव्य अमरज्योत प्रगट करतील.हे सद्‌गुरुब्रह्मा म्हणजे इमामशाह महाराज ब्रह्मा, विष्णु आणि महेश या तीनही देवांच्या कळेने युक्त असलेल्या गुरु दत्तात्रेयाप्रमाणे ब्रह्माचे अंशभूत असतील. युगधर्मानुसार त्यांच्या तपोबलाने ते ब्रह्मस्वरूपी सन्मार्गदर्शक असे युगगुरु होतील आणि या जगताला सत्‌रूप दिव्य ज्ञानाचा प्रकाश दाखवून मुक्तिमार्गाला घेऊन जाणारे असे दीपस्तंभ रूप होतील. तरी हे सद्भक्तांनो या कलियुगातील अगम्य आणि अतिगुह्य असा हा आगमभेद मी तुम्हाला सांगितला तो तुम्ही सत्य जाणा. तेव्हां पांडवांनी श्रीहरीला साष्टांग प्रणाम केला व हात जोडून ते बुध्द भगवंताला अनन्यभावाने विनवू लागले.( श्लोक ७०२-७१४ )

बुध्द भगवान म्हणाले, 'हे राजा धर्मा, माझे नित्य वास्तव्याचे स्थान आता मी तुला सांगतो ते ऐक. जेथे एकांतात पूर्जेअर्चेकरिता व ध्यान नामस्मरण सेवा करण्याकरिता गतगंगा एकत्रीत येते म्हणजे सद्भक्तगण सामुहिक पूजेकरितां एकांतात एकत्रित येतात, एकचित्ताने एकाग्र मनाने परमेश्वराचे ध्यान स्मरण चिंतन करतात. वैदिक विधीनुसार कलशपूजादि पूजाविधी करतात. सद्गुरु महाराजांचे चरणामृत प्राशन करतात व त्यांच्या शिक्षापत्रीनुसार नित्यनियमाने वाचन पठण करून आचरणात आणण्याचा प्रयत्न करतात. त्याठिकाणी माझे वास्तव्य असते. जे गृहस्थाश्रमधर्म पाळून ब्रह्मक्रिया पालन करतात. ब्रह्ममूहूर्तावर उठून सद्गुरुंची पूजा ध्यान स्मरण सेवा करतात. सत्शास्त्रांचे वाचन पठन स्वाध्याय करतात व महात्मा पुरुषाकडून ज्ञान संपादन करण्याचा प्रयत्न करतात त्याठिकाणी माझे प्रगट वास्तव्य असते. जे विष्णुभक्त वैष्णव दयावान आहे. अखिलभूत प्राणिमात्रांच्याविषयी ज्याच्या चित्तात दयाभाव, प्रेमभाव आहे. आत्मौपम्यबुध्दि आहे, धर्मतत्वाचे आचरण करतांना जो किंचीतही आळस अथवा अश्रध्दा बाळगत नाही, त्याच्या घरी माझे नित्य निरंतर वास्तव्य आहे असे तू समज. जो ज्ञानी असून नित्य ध्यानी असतो, गुरुंच्या आज्ञा पालन करणारा असा सद्भक्त असतो, आपले सारे सुखदुःख आपल्या हृदयस्थ परमेश्वराला सांगतो, सुख प्राप्त झाले असता आनंदाने हरखून जात नाही, दुःख निवारण करण्यासाठी दुसऱ्या कोणाजवळही रडगाणे गात नाही, मनात संयम सहनशीलता बाळगतो तो सत्यतेने वागणारा, बोलणारा आहे, यथालाभ संतोषी आहे, जो अक्रोधी क्षमा शीलवान आहे हे राजा तशांच्या घरी माझे नित्य निरंतरचे वास्तव्य असते. संसाराचा गाडा सुरळीत चालावा म्हणून व सचोटीच्या मार्गाने स्वकष्टाने धनसंपत्ति पैसा मिळविण्यासाठी जो निरनिराळे उद्योगधंदे करतो पण लक्ष्य मात्र सदैव माझ्याकडे स्थिर ठेवतो, नम्रशालीन दृष्टी ठेवून सर्वांसमोर हसतमुखाने अवलोकन करतो. शत्रु असो मित्र असो वैरी असो अथवा हितचिंतक असो सर्वांशी नम्रतेने हसतमुख व प्रांजळपणाने बोलतो, कोणाविषयी ही निष्कारण द्वेष तिरस्कार भेदभाव मत्सर क्रोध बाळगत नाही असा सद्भक्त मला प्राणाहूनही प्रिय वाटतो. राजा मी नित्यनिरंतर त्याच्या घरीच वास्तव्य करून राहतो. जे धनवान आहे गुणवान रूप यौवन संपन्न आहे पण त्याविषयी कोणत्याही प्रकारचा गर्व ज्याच्याजवळ नाही, उलट आपल्याकडून कोणाचेही कल्याण झाल्यास उत्तमच पण अकल्याण मात्र कोणाचेही होऊ नये असे जे चिंतीत असतात. जे कुडकपट असत्याचरण

दंभाचरण यांचा त्याग करतात, व्यभिचार भ्रष्टाचार परस्त्री अवलोकन टाळतात, निर्धाराने कायावाचा मनाने शुध्द पवित्र राहण्याचा प्रयत्न करतात परधन धुळीसमान व परस्त्री मातेसमान मानून मनाने सुध्दां त्याच्या उपभोगाविषयी उदासिन असतात. हे राजा ते सद्भक्त माझ्या कंठातील माळेप्रमाणे मला अत्यंत प्रिय असतात. अशाप्रकारे हे माझी वास्तव्यस्थाने मी तुम्हाला सांगितली. कलियुगात अशारीतीने मी गुप्त होऊन राहीन. सद्भक्त पांडवांनी अत्यंत सद्‌गदित होऊन नम्रतेने भगवंतास प्रणाम केला व ते भगवंतास म्हणाले, - ( श्लोक ७१५-७३० )

युधिष्ठिर भगवंतास हात जोडून नम्रपणाने म्हणाला, 'हे स्वामी आपले गुप्त आणि प्रगट वास्तव्याचे स्थान आता आम्हाला पूर्णपणे समजले. आता आमच्यावर कृपा करा आणि येथेच आपण कायमचे वास्तव्य करा. आपल्या सान्निध्यात राहून मोक्ष साध्य करावा, आपला वियोग कधीही आम्हाला घडू नये अशीआमची आपल्या चरणाजवळ नम्र विनंती आहे.' भगवान बुध्द म्हणाले, 'राजा अरे मी आत्मज्ञान रूपाने सतत तुमच्या जवळच आहे. तुम्हाला मोक्षगतीचे योगाभ्यासाचे ज्ञान शिकविले त्यानुसार साधना करण्याकरिता व जीवीताचे अंतीम ध्येय साध्य करून घेण्याकरितां हा राज्य कारभाराचा गाडा कोणावरही सोपवून हिमालयात या. तिथे आपली भेट होईलच. हे सद्भक्तांनो तुम्ही आपल्या मनात दृढ विश्वास ठेवा. ज्यावेळेस ज्याठिकाणी तुम्ही माझे स्मरण कराल तेथे धावत येऊन मी तुम्हाला साह्य करीन पण हा मोक्षमार्ग निष्काम कर्मयोग मार्ग तुम्ही स्वत: अवलंबिल्याशिवाय साध्य होणार नाही म्हणून हिमालयात जा व तपस्या साधना करा. आता मला जाण्याची आज्ञा द्या. कारण माझे कर्तव्य संपले. उशीर न करता मला येथून जाण्याची परवानगी द्या. भगवंताचे वचन ऐकून धर्मराजा मनात विचार करू लागला.भगवंताचे वचन तर मला शिरसावंद्य आहे पण आपले भाऊ, सती द्रौपदी, माता कुंती यांना मान्य आहे किंवा नाही, त्यांची संमती अजून आपण घेतली नाही. त्यांची संमती न घेता मला आपल्या कृत्यामुळे केवढा त्रास सहन करावा लागला व आतापर्यंतच्या या सर्व खटाटोपाला आपणच कारणीभूत झालो, आता यापुढे तरी आपल्याकडून तसे होऊ नये व या आपल्या आज्ञाधारक भावांना, पत्नीला त्रास होऊ नये म्हणून त्यांची संमती मिळावी यासाठी धर्मराजा त्यांना म्हणाला, 'हे माझ्या प्राणप्रिय बंधूनो, तुमची नि:सीम श्रध्दा माझ्यावर आहे व आज्ञा आणि मर्यादा पालन करणारे तुम्ही आहात म्हणून माझ्या हातून विपरीत कांही होऊ नये व ज्यात आपल्या सर्वांचे

कल्याण होईल अशा गोष्टीबद्दल मला तुमची संमती हवी आहे. माझे तर पूर्ण ठाम मत आहे की आपणास आपले अंतिम ध्येय मुक्तिपद गाठण्यासाठी काहीतरी वाटचाल करावी लागणार आहे. आपल्या या अभ्यागताने हिमालयात जाण्याची जी आज्ञा केलेली आहे त्याबद्दल तुम्हा सर्वांची एकदिलाने संमती हवी आहे. तुमची संमती असल्यास मी एकट्याने जाण्याचा पक्का निश्चय केलेला आहे. तरी हे सहदेवा, तुझी काय इच्छा आहे. संसारसागराच्या मध्यात आपली ही जीवननौका येऊन भंगली आहे. आपण सुखाने हा भवसागर तरून पैलतीर मोक्षपदाला जावे किवा पोहत येऊन ऐलतीरावरील भवदु:ख भोगावे असे तुला वाटते. जे योग्य व सत्य असेल त्याचा सारासार विचार करून सांग.' तेव्हा सहदेव म्हणाला, 'हे भ्राता आजच हे असे विपरीत मला कां म्हणून विचारता? आजपर्यंत आम्ही सर्व आपली आज्ञा शिरसावंद्य मानत आलो आणि आज अशी शंका आपल्यामनात कशी बरे उद्‌भवली. जर तुम्हाला आमच्या मतीत बुध्दीत काही विपरीतपणा भासत असेल तर ह्या सती द्रौपदीला विचारा, माझ्यापेक्षा ती सती योग्य असे सांगू शकेल. नंतर धर्मराजाने सती द्रौपदीकडे वळून तोच प्रश्न तिला विचारला. दोनही हात जोडून प्रणाम करून अत्यंत विनम्र भावाने द्रौपदी म्हणाली, 'हे स्वामीनाथ, जगदुध्दारक अशा यदुपतिनाथाने आपणास जी आज्ञा केलेली आहे ती आपण शिरसावंद्य मानली पाहिजे. आपण आपला अपराध मान्य करून त्याची क्षमा याचना करण्यासाठी व त्या बुध्द भगवंताने दिलेले प्रायश्चित योग्य मानून ताबडतोब तो निर्णय अंमलात आणावा अशी आमची नम्र विनंती आणि सदिच्छा आहे. (श्लोक ७३१-७४४)

सती द्रौपदी धर्मराजास म्हणाली, 'हे नाथा! आपण आपल्या शिरावरील पापकर्माचा दोष उतरविण्यासाठी यज्ञ उभारला पण विपरीत काळातून पार उतरून नेण्यासाठी भगवान स्वत: सगुण साकार रूप धारण करून आपल्या रक्षणासाठी आले हा आपणावर त्यांचा केवढा मोठा उपकार मानावा बरे? त्यांच्या वचनाप्रमाणे मागे आपण वागलो नाही. त्यांचे वचन उल्लंघून ह्या कर्मकांडास प्रवृत्त झालो म्हणून वचनभंग केल्याचा दोष आपणाकडून घडला आहे आता ते देतील ते प्रायश्चित स्विकारून आपण त्या दोषातून मुक्त होऊ. आपल्याला पावन करण्यासाठी ते आलेले आहेत. हा बुध्द भगवान दुसरा तिसरा कोणी नसून प्रत्यक्ष आपला प्राणसखा रक्षणकर्ता आणि हितकर्ता असा भगवान श्रीकृष्ण आहे. प्रेम मैत्री सख्य म्हणून ज्या जगदीश्वराने अर्जुनाचे सारथ्य केले व अपार सेना सागतरातून महान विश्व विख्यात अशा महायोध्दयांना मारून जिंकून विजयश्री प्राप्त करवून दिली, आपल्या जीवनरथाचे असेच सारथ्य

करून आपणाला भवसागरातून पार नेण्याकरिता व या भवसागरातली अनंत अडचणी संकटे दुःखरूपी मोठमोठे अडथळे दूर सारून पैलतिराकडे घेऊन जाणारा असा भक्तवत्सल दीनदयाळु स्वामी आहे. कौरवसभेत जातअसलेली आमची लज्जा अब्रु त्याने अनंत वस्त्रे पुरवून रक्षिली. वनवासात दुर्वासऋषीने घेतलेल्या कसोटीत साहय्य करून ऋषीश्रापापासून व जळत्या चितेपासून आमचे त्याने रक्षण केले. सर्वऋषींना देवदुर्लभ भोजन देऊन तृप्त केले अशा प्रकारचा महासामर्थ्यवान व आमचा संरक्षणकर्ता साहय्यकर्ता असा हा आपला प्राण सखा आहे. आपले पूर्वपुण्यबलवत्तर आहे म्हणून त्रिभुवनपती श्रीहरी आपला कर्मदोष निवारण्यासाठी घरी चालत आलेला आहे. अजंपाजापाचा उपदेश करून आपले कर्मजंजाळ मिटवणारा असा जगत्कर्ता सृजनहार आपल्यावर कृपाळू होऊन आलेला आहे. त्याची कोणत्याही प्रकारे शंकाकुशंका न धरता तर्ककुतर्क न करता यांची आपण शोडषोपचारे पूजा करू या. सन्मार्गदर्शक जगदुध्दारक असे हे श्री श्रीगुरुचरण आता कधीही सोडू नये. सदैव याच चरणांची सेवा आपल्याकडून घडावी म्हणून आपल्या हृदयसिंहासनावर यांचीच स्थापना करून सेवा पूजा जप ध्यान करावे. त्यांचा उपदेश हृदयी धरावा. प्रेमाने पंचपक्वानाचे भोजन घालून तृप्त करावे. तरच आपला गृहस्थ धर्मही सफल होईल आणि कोट्यावधी यज्ञ केल्याचे श्रेय आपणास लाभेल.' सती द्रौपदीची विनवणी ऐकून धर्मराजा सद्‌गदित झाला. आपल्या राणीला शतशः धन्यवाद देऊन तो तेथून बुध्द भगवंता जवळ आला. अतिशय दृढतेने त्याने भगवंताचे चरण प्रक्षालन केले. भगवंतानी त्यास वर उठवून आपल्या हृदयांशी लावले व प्रेमाने त्याला म्हणाले, 'राजा धर्मा प्रत्यक्ष धर्ममूर्ति तू आहेस. तुला सत्यधर्माची शिकवण देण्याचे प्रयोजनच नाही. कारण तो तुझ्या हृदयात कायमचा विलसत आहे. पण लोकसंग्रहाकरिता तुम्ही हे व्रत पाळत आहात. त्यात तुम्ही सफळ व्हाल. आता उर्वरीत आयुष्य ईशचिंतनात घालवा व जीवीताचे साफल्य करा. बरे तर आता मी जातो आपली भेट हिमालयात होईल.' असे म्हणून भगवान बुध्द जाण्यास सिध्द झाले तोच धर्मराजा करूणार्द्रतेने म्हणाला, स्वामी माता कुंती आणि सती द्रौपदी आपल्या दर्शनास येत आहे. त्यांची इच्छा पूर्ण करावी. आमच्या घरी भोजन करून तृप्त झाल्याशिवाय आपण जाऊ नये अशी आमची आपणास आग्रहाची विनंती आहे. ( श्लोक ७४५-७५६ )

भगवान बुध्दांचा आणि युधिष्ठिरांचा वार्तालाप चालू असतांनाच कुंतीमाता त्याठिकाणी पंचपक्वान्नांची थाळी घेवून आली आणि हात जोडून भगवंताला भोजन करण्यासाठी विनवू लागली. पाचही भावांनी भगवंताला अतिशय आग्रह केला. कुंती माता आणि

सती द्रौपदी म्हणाल्या हे स्वामी तुम्ही त्रिभुवनप्रतिपालक आहात संपूर्ण विश्वाचे चालक उध्दारक आहात. संपूर्ण जगताचे पोषण करणारे असे आपण आहात त्या आपणाला आम्ही भोजन ते काय देऊ शकणार? आम्ही असमर्थ आहोत. आपण सर्व समर्थ आहांत पण अल्पज्ञ व अपराधी अशा आम्हां बालकावर कृपादृष्टी करा. आपल्या कृपाकटाक्षाने आंधळा पाहू शकतो, मूका बोलू लागतो आणि पांगळा पर्वतशिखर सुध्दा चढून जाण्यास समर्थ होतो. तरी हे भगवंता आपण आता हा प्रसाद ग्रहण करावा व आमच्यावर कृपादृष्टी करून आमचा कर्मजंजाळ निवारण करावा. भगवान बुध्द म्हणाले, हे सद्भक्तांनो मी तर नित्य तृप्त आहे. पण तुम्हा सर्वांच्या आग्रहास्तव भोजन करीन परंतु त्या आधी आपण कामदूर्गा गायीची पूजा करावी. माझ्यासमोर आणि या सर्व पंडितासमक्ष आपण कामधेनुचे पूजन करावे. जे सकळ मनोकामना पूर्ण करणारे असे आहे. तेव्हा पांडवांनी पंडितांची विनंती करून यज्ञस्थानावर आले व कामदूर्गेच्या पूजनाकरिता मंत्रोपचाराने यज्ञकुंडात आहुति टाकली. मोठमोठ्याने मंत्रघोष होऊन यज्ञज्वाला गगनात भिडली. संपूर्ण वातावरण होमधूमाने व्याप्त झाले. पंडितांनी चारही वेदांच्या गायत्रीचा मंत्रजप करून स्वर्गधेनु कामदुर्गा प्रगट व्हावी म्हणून मंत्रोच्चार केला तो काय आश्चर्य! अनंत विद्युल्लता झळकाव्या त्याप्रमाणे किंवा अंधाऱ्या रात्री ताऱ्यांचा लखलखाट व्हावा त्याप्रमाणे आकाशात सर्वत्र तेज पसरले व धुराचा पडदा दुभंगून स्वर्गीय कामधेनू पांडवांच्या यज्ञ मंडपात उतरली. काय त्या दुर्गेचे स्वरूप वर्णन करावे. केवळ तेजाचा पुतळाच अशी ती शुभ्र गोमाता पाहून सर्वांचे डोळे दिपले सर्वांनी अत्यंत नम्रतेने त्या गोमातेला प्रणाम केला. सती द्रौपदीने मणिरत्न माणिक्यांचे आभूषण तिच्या गळ्यात शिंगात पायात घालून मोत्यांच्या झालरी तिच्या पाठीवर घातल्या. पानफुलफलांनी तिचे शोडशोपचारे पूजन केले. पंचारतीने ओवाळून आरती केली. सर्वांनी मुक्तकंठाने कामदूर्गेची स्तुति पूजा केली. गोपूजनांनी शेवटची आहुति यज्ञकुंडात टाकताच यज्ञज्वाळा गगनात पोहोचली व आकाशातून सुरभीवर पुष्पवृष्टी झाली. सर्वांनी सुरभी कामदूर्गेचा आणि बुध्द भगवंताचा जयजयकार केला. कामधेनुने सर्वांकडे आपल्या स्नेहस्निग्ध आणि मातेच्या ममत्वाने पाहून कृपाशिर्वाद दिला ती धर्मराजास म्हणाली, 'हे युधिष्ठिरा आज तुमचे हे अपूर्व गोपूजन पाहून मी संतुष्ट झाले. आज या काळाला अनुरुप असे सुरभीपूजन यज्ञ करून तुम्ही स्वत: कृतार्थ झालात. तुमचे सारे दोष लयास गेले. तुमचे सारे संकल्प इच्छा कामना पूर्ण होतील. माझ्या तनमन प्राणात जो गोविंद प्रभू व्यापला आहे तोच तुमचा प्राणसखा त्राता भक्तवत्सल दयाळू प्रेमळ सखा आज बुध्द रूप धारण करून

तुमच्या उध्दारार्थ येथे तुमच्या जवळ आलेला आहे. त्याच्या मार्गदर्शनानुसार वागा त्यांत तुमचे कल्याण आहे.' प्रेमळ कृपाशिर्वाद देऊन कामधेनू गुप्त झाली. धर्मराजाने याचकांना अपार गोदान करून तृप्त केले. सर्व पंडितांना अगणित दक्षिणा, अपार गोदान, द्रव्यदान, गृहदान, भूमीदान देऊन संतुष्ट केले. सर्व याचक पंडित पांडवांना धन्यवाद देऊ लागले व म्हणाले, 'धन्य धन्य हा पांडवांचा वंश आजपर्यंत कोणीही असा गोयज्ञ केला नाही. अशाप्रकारचा अपूर्व अद्‌भूत गोयज्ञ करून पांडव कृतार्थ झाले. ( श्लोक ७५७-७७४ )

भगवान बुध्द म्हणाले हे सद्‌भक्तांनो तुमचा हा अद्‌भूत गोयज्ञ पाहून आणि भावभक्ति प्रेम पुण्यप्रताप पाहून मला खरोखरच धन्यता वाटली. सद्‌भक्तांनो जीवनाच्या साफल्याची पात्रता तुम्ही संपादिली आहे आता माझे अवतार कार्य संपुष्टात आले आहे. आपण हा जो यज्ञ उभारलेला होता तोही आता सिध्दीस गेलेला आहे असे निश्चयाने समजा. आता फक्त त्याची पूर्णाहुति राहिली आहे. स्वर्गीय मंगलवाद्ये वाजली म्हणजे ती पूर्णाहुति सुध्दा आटोपेल व तुम्ही कृतकृत्य व्हाल. धर्मराजा म्हणाला - 'स्वामी आपल्या आज्ञेप्रमाणे आपल्या या दासांनी गोपूजन गोदान केलेले आहे. आता आपण प्रसाद स्विकारावा अशी आमची विनंती आहे.' बुध्द भगवान म्हणाले. 'तुमची विनंती मी शिरसावंद्य मानतो पण तुम्ही माझ्या बरोबरच बसून भोजन करावे.' धर्मराजाने भगवंताला सांगितले - 'स्वामी आपण आज आमचे अतिथी आहांत. अतिथी अभ्यागताला तृप्त केल्यानंतर शेष प्रसाद गृहस्थाने घ्यावा असा गृहस्थधर्म आहे.' बुध्द भगवान म्हणाले, 'ते ठिक आहे पण माझी आज अशी इच्छा आहे की आपण सर्व सहभोजन करू या. आज या ठिकाणी आपण स्वामी-सेवक भाव सोडून एक स्वभावाने वागायल हवे आहे. तुमच्या चित्ताच्या ठायी मी अपराधी, मी पापी, मी दोषी असे कोणतेच किल्मिष राहू नये तरच तुमचा हा यज्ञ सफळ होईल म्हणून आपण सहभोजन करावे. ताबडतोब पांडवांनी सुध्दां भगवंताबरोबर प्रसाद ग्रहण करण्याचे योजले. पांडव आणि बुध्द भगवान एकाच पंक्तित बसून भोजन करताच आकाशात अदृश्यरूपाने घंटानाद, मृदंग, भेरी, झांज, वीणा इ. दशनाद सुरु झाला. तो अनहद नाद ऐकून पांडव अत्यंत आनंदीत झाले. उत्स्फूर्त अंत:करणाने त्यांनी भगवंतचरणी मस्तक टेकून अभिवादन केले. त्या अनहद नादामधून ध्वनी प्रगट झाला. 'हे सद्भक्त पांडव हो आज तुमचा यज्ञ सफल झाला. आज पांडव वंश पृथ्वीवर धन्य झाला. बुध्द भगवंताबरोबर सहभोजन करून आणि

अद्भूतपूर्व गोयज्ञ व गोदान करून आज तुम्ही खऱ्या अर्थाने योगी झाला आहात. आता उर्वरीत आयुष्य तुम्ही माझ्या चिंतन ध्यान सेवेत घालवून लवकर मला येऊन मिळाल. माझ्यापर्यंत येऊन पोहोचण्याचे बळ शक्ति मी तुम्हाला अर्पण करतो.' असे म्हणून भगवंताची ती दिव्य अमृतवाणी लय पावली. दिव्य वाणी ऐकून हर्षोत्फुल्ल अंत:करणाने ते पांडव बुध्द भगवंताला नमस्कार करतात तो त्या ठिकाणी बुध्द भगवंताचे पूर्वीचे रूप पालटून दिव्य अलौकिक तेजस्वी अशा तेजाने झळकणारे भगवान श्रीकृष्ण त्यांच्या समोर मंद स्नेहस्निग्ध हास्य करीत आपल्या प्रेमळ भक्तांना निरखित आहेत असे त्यांना दिसले. अत्यंत सद्‌गदित होऊन धर्मराजादि पांडवांनी भगवंताचे चरणांचे चुंबन घेऊन आपल्या प्रेमाश्रुंगंगेने त्यांचे चरण प्रक्षालन केले. सती द्रौपदी, माता कुंती सुध्दा आपल्या नातवाला परिक्षिताला बरोबर घेऊन भगवंताला नमस्कार करू लागल्या. भगवंतांनी सर्वांना प्रेमाने निरखीत व परिक्षिताच्या शिरावर आपला वरदहस्त ठेवीत अत्यंत स्नेहार्द्रतेने म्हणाले. सद्भक्तांनो तुमच्या भक्तिप्रताप बलाने मला वैकुंठातून खेचून आणले. आज तुमचा यज्ञही सफळ झाला आणि तुम्ही कृतकृत्य झालात. आज अवनीतलावर पांडव वंश धन्य झाला. आता तुम्ही या परिक्षिताला राज्याभिषेक करा आणि तुम्ही राजसंन्यास घेऊन हिमालयात प्रस्थान करा. तुमच्या शिरावर आणखी एक मोठी जबाबदारी नेमलेली आहे. नऊ कोटी जीवात्मे तुमची तेथे वाट पहात आहेत. तुमच्या पुण्यप्रतापाने त्यांचा उध्दार व्हायचा आहे. मत्स्य अवतारात तुम्ही तळपाताळातील भूतलदेशात मत्स्य राजाच्या घरी पाचही पुत्र रूपाने अवतरले असतां मत्स्य भगवंतांनी तुम्हाला दिलेले वरदान सफळ झाले. तुम्ही मागून घेतलेल्या वरदानाप्रमाणे अपार कसोटी सहन करून पूर्णत्वाचा पल्ला गाठला पण आता त्याचा शेवटचा महत्वाचा दुवा साधायचा राहिला तो साध्य झाला म्हणजे तुम्ही पूर्णत्वात विलीन व्हाल यासाठी तुम्हाला हिमालयात जाऊन साधना करून अपार कष्ट सोसून वाटचाल करायची आहे. तुम्ही सिध्द व्हा आणि पुढील कार्यास तत्पर व्हा. भगवंताचे वचन ऐकून पांडव, द्रौपदी व माता कुंती म्हणाले, 'हे अनंत विश्वनायका तू अनाथांचा नाथ आहेस. आमच्या कल्याणासाठी तू हे केवढे परिश्रम केलेस. आपला कृपाशिर्वाद असल्यावर कोणतेही महान कष्ट सोसून कार्य सिध्द करण्यास आम्ही तयार आहोत. आपली कृपादृष्टी सतत आमच्यावर राहावी हीच आमची विनंती वासना व कामना होय. (श्लोक ७७५-७८७)

बुध्द भगवंतानी पांडवांना आशिर्वाद दिला व सांगितले, 'हे सद्भक्तांनो तुम्ही मुळीच काळजी करू नका. तुमच्या साऱ्या मनोकामना पूर्ण होतील. तुमचे सर्व सद्हेतु सफल होतील. तुमच्या कीर्तिरवाने सारे त्रिभुवन दुमदुमेल. जीवनाच्या अंतीम क्षणापर्यंत सतत केलेल्या भक्ति, कर्म, ज्ञान, ध्यान, योगाभ्यास व सतत अध्यासाने तुम्ही मुक्त व्हाल. बुध्द भगवंताची वाणी ऐकून पांडव सद्गदीत झाले. त्यांनी भगवंताला हस्तिनापुरात येण्याचा व आतिथ्य स्विकारण्याचा अत्यंत आग्रह केला. त्यांच्या विनंतीस मान देऊन भगवंतांनी संमति दिली. त्यांनी अपार मनगणति दक्षिणा देऊन देशोदेशीच्या आमंत्रीत ब्राह्मण पुरोहितांना निरोप दिला. सर्वजण संतुष्ट होऊन पांडवांचा व बुध्द भगवंताचा जयजयकार करीत स्वस्थानी परतले. जे हरिवंशी ब्राह्मण होते ते भगवंताच्या बरोबरच राहिले. पांडव हस्तिनापुरास भगवंताला आणि त्यांच्या सहवासात राहिलेल्या सद्भक्तांना घेऊन आले. नित्य त्यांच्या सत्संगात राहून ज्ञानचर्चा योग साधनाभ्यास करू लागले. एक महिनाभर त्यांच्या सान्निध्यांत राहून भगवंतांनी त्यांना संपूर्ण योगशास्त्राचे ज्ञान शिकविले व तशा साधना करून पारंगत केले. नंतर भगवंतांनी जाण्यास निरोप मागितला. भगवान म्हणाले, - 'हे सद्भक्तांनो आता माझे अवतारकार्य संपल्यामुळे मी माझ्या स्थानावर म्हणजे पश्चिमेकडील सहस्त्रद्विपात जातो. पुन्हा कलियुगात मला परत यायचे आहे: कलियुगाच्या शेवटच्या प्रहरात सद्गुरु ब्रह्मा ठिकठिकाणी प्रगट होऊन अथर्ववेदी आत्मज्ञानाच्या प्रचाराने जनजागृती करतील. आत्मज्ञानसंपन्न सद्भक्त अजंपाजापयुक्त माझे निष्कलंकी नारायण नामाने भजनपूजन ध्यान संकीर्तन करतील. त्यांना माझे ज्योतीस्वरूपातून सतत दर्शन होईल. जो कधीही असत्यवचन आपल्या मुखातून काढत नाही. ज्याची वाणी विचार व आचरण नेहमी सत्याचाच अवलंब करते त्यालाच या कलियुगात माझे दर्शन होईल. तोच अमरपदास पोहोचेल. मी तर आता पश्चिम दिशेस सहस्त्रद्विपात - श्वेतद्विपात जात आहे. तेथून मी निष्कलंकी नारायण अवतार धारण करून जंबुद्विप भरतखंडात कुवारीकाक्षेत्रात येईल. हे सद्भक्तांनो अशाप्रकारचे हे माझे आगम्यभविष्य आहे. ते सद्गुरु महाराज कलियुगात प्रगट करतीलच.' पांडवांनी भगवंताचे चरणी साष्टांग दंडवत घालून विनंती केली - 'हे पुराण पुरुष पुरुषोत्तमा आताआम्ही तुमच्या आज्ञेनुसार हिमालयात जाऊन आपण शिकविल्याप्रमाणे साधना करू आपण वैकुंठपति त्रिभुवननाथ आहात. आपल्या चरणकमलात आमचे मनरूपी भृंग सदैव स्थित राहो अशी आमची विनंती आहे. दया करून आम्हाला आपल्या चरणाची सेवा सतत घडेल असा कृपाशिर्वाद द्यावा आम्हाला मुक्ति नको. ज्याठिकाणी तुम्ही प्रगट सगुण साकार रूप धारण कराल त्याचठिकाणी येऊन आमच्याकडून

अखंड सेवा घडावी हीच आमची अभिप्सा आपण पुरवावी.' अशाप्रकारे विनंती करीत करीत ते भगवंताला निरोप देण्यासाठी त्यांच्या पाठोपाठ जाऊ लागले. भगवंतांनी प्रेमभराने मागे वळून पाहून पांडवांना म्हणाले, 'हे सद्भक्तांनो तुम्ही आता माघारे वळा. मी सांगितल्याप्रमाणे राज्याची धुरा परिक्षितावर सोपवून हिमालयात जाण्यास सिध्द व्हा. तेथे मी तुमची वाट बघतो. नऊ कोटी जीवात्मे तुमची तेथे वाट पाहात आहे. त्यांच्या उध्दाराची जबाबदारी तुमच्या शिरावर आहे. ते कार्य पूर्णत्वास नेल्यावर तुमची आशा सफल होईल. हे सद्भक्त पांडव हो तुम्ही हे वचन सत्यजाणा व राजपाटाचा त्याग करून पुढील वाटचाल करा मी आता आपली रजा घेतो. पुन्हा आपली भेट हिमालयात.' असे म्हणून भगवानबुध्द जलदगतीने जाऊ लागले. त्यांचा विरह सहन न झाल्याने धर्मराजास मूर्च्छा आली. सर्वजण धर्मराजास सावरू लागले. थोडच्यावेळाने शुध्दिवर आल्यावर धर्मराजा भगवंताच्या नांवाने शोक करू लागला. आपल्या जीवनातील एकेक प्रसंग आठवून व सर्व प्रसंगातून भगवंतांनी आपणास कसे वाचविले हे सांगत जाऊन धर्मराजा शोक सागरात बुडून गेला. तशीच अवस्था सर्वभावांची सुध्दां झाली. घरात द्रौपदी कुंतीमाता व इतर राजस्त्रिया यांची सुध्दां तशीच अवस्था झाली. ज्याप्रमाणे आपला प्राण कुडी सोडून निघून जातो व शरीर प्रेतवत राहाते अगदी तशीच अवस्था सद्भक्त पांडवांची झाली. भगवंताचा विरह त्यांना मुळीच सहन होत नव्हता. ते वारंवार भगवंताला विनवून म्हणू लागले. 'हे भगवंता आम्हाला एकटे सोडून तुम्ही कसे निघून गेला? कां आमचा त्याग केला? आम्हाला आपल्या सोबत घेऊन चला.' (श्लोक ७८८-८०४)

पांडवांचा अतिशय प्रेमाचा निरोप घेऊन भगवान जेव्हा जाऊ लागले त्यावेळेस अडसष्ट तीर्थे तेथे भगवंताजवळ आले व त्यांनी भगवान बुध्दांच्या चरणी साष्टांग दंडवत घातला. भगवंतांनी थांबून त्यांना येण्याचे कारण विचारले. तेव्हा सर्व तीर्थात श्रेष्ठ अशा गंगेने हात जोडून भगवंताची स्तुति केली. गंगा म्हणाली, 'हे पुराणपुरुष पुरुषोत्तमा, हे पतीत पावना, सकल मांगल्याचा आणि शुचिर्भूततेचा परमनिधान असा तू आहेस या जगतात वेळोवेळी निरनिराळ्या रूप नाव गुणाने अवतार धारण करून तू जगत्कार्य सुरळीत चालवितोस. तूच श्रीकृष्ण, तूच श्रीराम, तूच नियंता, तूच भवतारक भगवान आहेस. तुझ्याच आश्रयाने आम्ही राहात असतो. आम्ही अडसष्ठ तीर्थे असून तुझ्याच सत्तेने आमच्यावर आलेली जबाबदारी पत्करीत आहोत. तुझ्या इच्छेशिवाय किंवा कृपादृष्टीशिवाय आम्ही क्षणभरही अस्तित्वात राहू शकणार नाही.

तुझ्या प्रगट वास्तव्याने वारंवार होणाऱ्या पदस्पर्शाने संगाने आम्ही परम पावन होत होतो पण सांप्रत कलियुगात आपण सर्व देव, ऋषि व मुनि संत, महात्मे गुप्त होत असल्याने आम्ही कोणाच्या आश्रयाने राहावे. अत्यंत दुस्तर व पापी अशा या कलियुगात स्वामी आमच्याने राहवले जाणार नाही. भगवंता आपण जर प्रगट सगुण साकार रूपाने राहात असाल तर आम्ही आमच्या वास्तव्य स्थानावर जाऊ नाही तर आता माघारे न जाता आपल्याच सान्निध्यात जिथे आपण जाल तिथे आम्ही सुध्दां येतो.' भगवान बुध्द म्हणाले, 'हे परमपावक तीर्थांनो मला या युगात प्रगटरूपाने राहाता येत नाही. तुम्ही आपला हट्ट सोडा माझ्याबरोबर सुध्दा येता येणार नाही. कारण मी जंबुद्विपाच्या पश्चिमेकडील श्वेतद्विपात माझ्या मुळ स्थानावर गुप्तरूपाने वास्तव्य करीन आणि कलियुगाच्या शेवटच्या प्रहरात निकलंकी नारायण रूपाने प्रगट होईल त्यावेळेस सर्व देवदेवता आणि सद्भक्त मानव प्राण्यांच्या रूपाने प्रगट होतील. सर्व तीर्थांनी भगवंताची प्रार्थना केली की हे भगवंता या कलियुगात लोक अधर्मास प्रवृत्त होतील. जीवहिंसा कुडकपट, असत्याचरण करतील, लोभ लाचलुचपतीने स्वार्थाने बरबटलेले अशी कामे करतील, लोकांना लुबाडून अनेकानेक कूकर्म करून धनसंपत्ति जुळवून त्या संपत्तीतून दान कर्म, आमची पूजा अर्चा करतील व त्यांच्या कृतकर्माचा भार आमच्यावर सोपवतील. आमच्या शिरावर त्यायोगे पातकांचे डोंगर उभारले जातील व त्याखाली आम्ही भंगले जाऊ म्हणून या महापापी कलियुगात आम्ही तुमच्याशिवाय राहणार नाही.'

बुध्द भगवान म्हणाले, हे तीर्थांनो तुमचा गुणधर्म किंवा तुमची अगाध शक्ति आहे की जो कोणी जीवात्मा शुध्द अंत:करणाने सद्भाव हेतुने तुमच्यात स्नान करील तुमची सेवा, पूजा, तप, ध्यान करील त्याचे पाप परिमल धुऊन शुध्द शुचिभूर्त करणे ही तुमच्या अंगची शक्ति आहे. तुमची उत्पत्ति सद्गुरु ब्रह्मापासून - ब्रह्मदेवापासून झालेली आहे. त्यांच्या तेजस्वी पदस्पर्शाने, संगाने तुमचे सारे पापपरिमल धुतले जातात. या ब्रह्मस्वरूपी अशा संत महंत सद्भक्त सद्गुरूंच्या परमविशुध्द पावनकारी जीवनकलेत तुम्ही सतत वास्तव्य करा. तुमचा देह, तुमचे स्थान, स्थले वगैरे तेथल्या तेथेच जरी असले तरी तुमचीमहति - तुमचा महिमा - तुमचा प्राण सद्गुरु ब्रह्माचे ठायी राहील. तेथेच तुम्ही वास्तव्य करावे. त्या सद्गुरु ब्रह्माचे प्रगट वास्तव्य स्थान कलियुगात भरतखंडातील जंबुद्रिपात कुवारीका क्षेत्रावर साबरमती नदीतिरावर इमामपुरी नगरीत राहील. कलियुगाच्या शेवटच्या प्रहरात इमामाशाह यानावाने सद्गुरुब्रह्मा सगुण साकार

रूप धारण करतील. व अपार लीलाचरित्र करून लोकांना सध्दर्माचा सतपंथाचा उपदेश करतील. त्याठिकाणी त्यांच्या कलेत जाऊन तुम्ही वास्तव्य करा. म्हणजे तुमच्या ठायी साचलेला सारा पापपरिमल नष्ट होत जाईल. बुध्द भगवंताने तीर्थांना हा भेद सांगताच त्यांनी त्या दिशेकडे वळून प्रणाम केला व भगवंताची विनंती केली की हे नारायणा आपण सांगितलेले सारे रहस्य जाणून त्यानुसार आमचा प्राण आता सद्‌गुरु ब्रह्माचेच ठायी बसेल आणि म्हणूनच सद्‌गुरुंच्या चरणी अडसष्ट तीर्थांचा महिमा वसलेला आहे. सद्‌गुरु सद्‌भक्त किंवा सत्साधक हे साऱ्या तीर्थांनाही पावन करणारे असतात. कारण त्या तीर्थांची संपूर्ण जीवनकला त्या महात्म्यांच्याच ठायी वास्तव्य करते. सर्व तीर्थांना अशाप्रकारे वास्तव्य स्थान दर्शवून त्यांना कृपाशिर्वाद देऊन भगवान बुध्द पुढे जाऊ लागले. इकडे सर्व तीर्थे सद्‌गुरु ब्रह्माच्या धामाचा शोध घेत घेत त्यांच्या आश्रयाला आले. (श्लोक ८०५-८३७)

अडसष्ठ तीर्थांना निरोप देऊन भगवान बुध्द जाऊ लागले तोच तेथे आपल्या भूतगणासह भैरव आला व सर्वजण भगवंताची विनंती करू लागले. ते म्हणाले, हे स्वामीनाथ जगत्पिता, जगदीश्वरा आमच्यावर कृपादृष्टी करावी. आपण निघून गेलात तर आमचा प्रतिपाळ कोण करील. हे स्वामी जगन्नियंता तुझ्या आश्रयाने राहून आम्ही क्रीडा करीत होतो. तुझा आधारच जर निघून गेला तर आम्ही तेथे राहून काय करू? आम्हाला सुध्दां आपणाजवळ येण्याची कृपादृष्टी करावी.' तेव्हा भगवान बुध्द म्हणाले, 'हे भैरवभूतगणहो तुम्हाला उदास होण्याचे कारण नाही, तुम्हाला तर आता कलियुगात अत्यंत उन्नतीचा उत्कर्षाचा काळ आहे. असा सुंदर काळ, सुंदर जगत् व त्यातील जीवात्मे सोडून तुम्हाला आणखी दुसरीकडे जाण्याची गरज नाही. मद्य मांस तामस असा तुमचाआहार काम क्रोध लोभ हे तुमचे आश्रय घर आणि विहारस्थाने, अशा विहारांना या कलियुगात कोणतीही उणीव नाही. असे सुंदर नंदनवन सोडून तुम्ही कोठे जात आहात. अन्यत्र कोठेही जाऊ नका. इथे मृत्युलोकातच राहा. या कलियुगातील सन्मार्ग विसरलेली माणसे तुम्हाला शरण येऊन तुमची पूजा अर्चा करतील.' तेव्हा भूत भैरव आनंदीत झाले व म्हणाले, 'मग स्वामी आमचे निवास्थान कोणते बरे असेल? आम्ही कोठे वास्तव्य करावे? ज्याठिकाणी सांगाल तेथे आम्ही वास्तव्य करू.' बुध्द भगवान म्हणाले हे भैरवभूत गण हो, आज अडसष्ठ तीर्थाचे घर खाली झालेले आहे. त्याठिकाणी तुम्ही जाऊन वास्तव्य करावे. तीर्थांची कळा सद्‌गुरु ब्रह्मात गेल्याने त्यांची स्थाने खाली पडलेली आहेत. तेथे तुम्ही रहावे. त्याठिकाणी जसजसे तुम्ही चरित्र करून लोकांना भजवून घ्याल

त्याप्रमाणे लोक तुम्हाला मानतील व तुम्हाला भजतील. या कलियुगातील लोक अज्ञानपणाने व भोळेपणाने पापक्षालननासाठी व सौख्यप्राप्तीसाठी तुम्हालाच जास्त मानतील व भक्ति करतील आणि तुम्ही सुध्दां त्यांच्या अज्ञानाचा व भोळेपणाचा फायदा घेऊन त्यांना चांगलेच तुमच्या भजनी लावाल. लोक देवदेवता समजून तुमचीच उपासना करतील. कृतकर्माचे पापक्षालननासाठी आणि ऐहिक सौख्य शांतीच्या लाभासाठी तुम्ही त्या लोकांना जे मार्ग सांगाल ते मोठ्या उत्साहाने करून मद्यमांसाचा नैवेद्य, पशुपक्षांचे बली देवून ते लोक तुमची मोठ्या भक्तिभावाने सेवा पूजा भक्ती उपासना करतील. यासाठी तुम्ही त्याठिकाणी वास्तव्य करा. अशाप्रकारे त्या बुध्द भगवंतांनी भूतभैरवांना स्थान दर्शवून आशिर्वाद देताच ते सर्व आनंदाने टाळ. पिटून नाचू लागले. (या कलियुगात संपूर्ण भूमंडलात हे भैरवभूत व्याप्त होऊन गाफील (अज्ञ) बेईमानी विकारी जीवात्म्यांना पीडून खात आहे. लोक दंभीपणाने, बडेजावाने व कित्त्येक वेळेला अंधश्रध्देने प्रेरीत होऊन देवी देवदेवता यांच्यारूपानेभूत भैरवाकडून लुबाडले जात आहेत. भगत भक्तिर्णींचा सुळसुळाट होऊन व मोठमोठ्या देवी देवतांच्या नावांचा जयजयकार करून स्वत: भूतगण त्यालोकांना स्वत:च्या नांदी लावीत आहेत पण अज्ञानी लोकांना कितीही ज्ञानोपदेश केला तरी त्यांचे डोळे उघडत नाहीत. कलियुगात वेदविधीशिवाय जी कांही पूजा आहे ती सर्व पूजा भूतभैरवच स्विकारून घेतात. त्याचे फल जीवात्म्यांना मिळू शकत नाही कारण ती पूजा इच्छित व खऱ्या देवदेवतेपर्यंत पोहचत नाही मध्येच त्या पूजेचे अपहरण भूत भैरव करीत असतात. यासाठी जीवात्म्यांनी वेदशास्त्र वचनानुसार खऱ्या ब्रह्मस्वरूपी सद्गुरुला जाणून त्यांची मनोमन सेवा चाकरी करावी. त्यांच्या वचनावर दृढश्रध्दा ठेवून त्याप्रमाणे ज्ञान व ध्यान साधना करावी. युगधर्मानुसार शुध्द पवित्र सत्यधर्माचे आचरण, भगवान निष्कलंकी नारायणाचे अजंपाजापातून नामस्मरण, ज्योति स्वरूपातून ध्यान व प्रणवब्रह्म ॐ स्वरूपाने चिंतन करावे. तेथे भूतांचा प्रवेश नसतो. म्हणून त्या पूजेचे इच्छित फळ साधकास प्राप्त होते हा संसार हे जगत् कुडकपटाने व्याप्त झालेले आहे म्हणून परमेश्वरभक्ति आपणही सोडून द्यावी असे नाही, उलट कुडकपटाचा त्याग करून निर्मल शुध्द व प्रेमळ अंत:करणाने आंतरिक तळमळीने आपल्या जीवाच्या उध्दारांकरिता व आपल्या संपर्कात येणाऱ्या जीवात्म्यांच्या कल्याणाकरितां भूतभक्तिचा - अंधश्रध्देचा त्याग करून शुध्दभक्तिचा अवलंब करावा.) भैरव भूतांना त्यांच्या वास्तव्याची निश्चित दिशा मार्ग दाखवून बुध्द भगवान अंतर्धान पावले. भगवान बुध्द अवताराचे कार्य येथे पूर्ण झाले. उर्वरीत आयुष्य त्यांनी ध्यान चिंतन स्मरणात घालवून आपल्या अवताराचे विसर्जन केले. (श्लोक ८३८-८५९)

भगवंताची अवतार लीला अतर्क्य अचिन्त्य आहे. एक सव्वा प्रहराप्रमाणे अत्यंत अल्पकाळात भगवंताने आपले अवतार कार्य संपविले. बुध्द भगवंतांनी पांडवांना पात्र जाणून आगमअगम्य भविष्य कथन करून त्यांचा राज्यावरील मोह कमी करण्यास उपदेश केला. जीवनभर संसार कार्यात रत राहिले त्यांत ऐहिक सुखाकरितां कामनिक (सकाम) कर्म केले. पारलौकिक सुखाकरितां निष्काम कर्मे जरी केली तरी अंतीम ध्येय मोक्षपद गाठण्याकरिता ज्या कांही साधना कराव्या लागतात यांचा उपदेश बुध्द भगवंतानी केलेला आहे. वैदिक सनातन धर्मप्रणालीनुसार मन:संयम व इंद्रियनिग्रह ह्याच त्या साधना होत. भगवान श्रीकृष्णांनी महाभारत युध्दाच्या वेळी अर्जुनास केलेला ज्ञानोपदेश त्यांच्या चित्तावर दृढपणे ठसावा म्हणून भगवंतांनी द्वापारयुगाच्या अंती बुध्द अवतार धारण करून पांडवांना हा सद्बोध दिलेला आहे. पांडवांच्यानंतर राज्यस्थिती समाजस्थिती व धर्मस्थिती नीट सुरक्षित राहावी त्यात विकृत्या येऊ नयेत म्हणून बुध्द भगवंतानी हा मार्ग शोधलेला होता. त्यांच्या धर्ममतांच्या प्रभावाने बराच काळपर्यंत कलियुगातील अनाचाराला आळा बसला. पांडवानंतर परिक्षीत व त्यानंतर जनमेजय राजापर्यंत कलीचा तेवढा उपद्रव नव्हता. त्यानंतरच्या काळात कलीचा प्रादुर्भाव विशेष जोमाने सुरु झाला.

बुध्द भगवंताची लौकिक दृष्टीने माता रेणुका, पिता सिंहराज होते, शक्ति हंसादेवी आणि गुरु हंसराज होते. क्षेत्र कुरुक्षेत्र असून तिथेच दुर्योधनाला आपल्या मूळ स्वरूपात दर्शन देवून त्याचा आपल्या स्वरूपात लय केला होता. स्थान हीमपुरी अथवा जगन्नाथपुरी असून तेथून प्रगट होऊन म्हणजे भगवान श्रीकृष्णाच्या अपूर्ण जळालेल्या कलेवरात प्रवेश करून ज्ञानोपदेश करण्यासाठी पांडवांच्या यज्ञद्वारी इंद्रप्रस्थास आलेला होता. तेथून भगवान बुध्द भरतखंडात सर्वत्र भटकून बुध्द मतांचा, सत्य प्रेम अहिंसा करूणा वगैरे मानवी कल्याणकारक गुणांचा प्रचार व प्रसार केलेला आहे.

बुध्द भगवंताच्या उपदेशाने प्रभावीत झालेले पांडव त्याच दिवसापासून ध्यान चिंतन स्मरणाच्या साधनेस लागले त्यांनी यज्ञ तर आटोपलेलाच होता. राज्याची घडी नीट बसावी म्हणून निरनिराळ्या ठिकाणी वेगवेगळे उपराज्ये स्थापून मांडलिक राजांची योजना केली खुद्द हस्तिनापुराच्या राज्यकारभारासाठी निरनिराळे अधिकारी नेमले व प्रत्येकाच्या खात्यांची विभागणी करून स्वत:च्या शिरावरील जबाबदाऱ्या कमी केल्या नगराच्या बाहेरील राज्योद्यानात - वेलुवनात जाऊन साधनाभ्यास सुरु केला. केसांनी

आपले सारे अंग झाकून घेतले. व्रते उपावस करून तपश्चर्या करू लागले. निराहार निरंकार उपवास करून देह झिजवू लागले. देहाच्या सर्व विलासांचा त्याग केला अशाप्रकारे आहारविहारावर नियंत्रण ठेवून इंद्रिये दमन करून मन:संयम पाळू लागले. कामाव्यतिरिक्त वाचेवर नियंत्रण केले. तपस्या साधना व ईश्वर चिंतन ध्यान स्मरणात वेळ घालवू लागले. काही काळ गेल्यानंतर भगवंतांनी सद्गुरुंच्या रूपाने येऊन त्यांना सांगितले, 'हे सद्भक्तांनो आता तुमचा काळ जवळ येत चाललेल्या आहे. परिक्षिताला राज्याभिषेक करून त्याच्यावर राज्य कारभाराची जबाबदारी टाका. तो अत्यंत कुशलतेने, न्यायाने व सावधानतेने राज्य करील. स्वत: तो धार्मिक आहे आणि तुमचे सुसंस्कार त्याचेवर असल्याने तुम्ही त्याबाबतीत चिंता करूं नका. आता तुम्ही राजसंन्यास घेऊन हिमालयात जा. उर्वरीत आयुष्य त्याठिकाणी घालवा. हिमालयात देहाची कसोटी सहन करून ईश्वर चिंतन करा. काळप्रवाहाने तुमचा देह पतन पावल्यानंतर तेजस्वी अजरअमर अशा देहाची तुम्हाला प्राप्ती होईल व तुम्ही मुक्तिला जाल.' युधिष्ठिर म्हणाला स्वामी तुम्ही तर मागे वरदान देतांना म्हणाला होता कीं या देहानेच मी तुला स्वर्गलोकी नेईन, ते वचन कसे काय पूर्ण होईल. ते आपण मला सांगावे.' श्रीहरी म्हणाले, 'हे धर्मराजा तुला दिलेले वचन पूर्णच होईल तू मुळीच चिंता करू नकोस व अधिर पण होऊ नकोस.' हात जोडून युधिष्ठिर म्हणाला, 'हे स्वामीन् या दासाने आपणासमोर आगळिक केली याबद्दल तुम्ही मला क्षमा करा. आमची एकच विनंती आहे, आम्ही वाटेल ते संकट दु:ख कष्ट सहन करू पण आपल्या कृपादृष्टीचे बळ आमच्यापाशी हवे आहे. एक क्षणभर सुध्दा तुझे स्मरण चिंतनावाचून व्यर्थ जाणार नाही असा आशिर्वाद आम्हाला द्यावा. श्रीहरीने त्यांना पूर्ण प्रेमाने स्नेहार्द्रतेने आलिंगन देऊन वरदहस्त शिरावर ठेवून आशिर्वाद दिला व गुप्त झाले. (श्लोक ८६०-८७२)

नंतर धर्मराजाने आपल्या तेजस्वी सुंदर अशा नातवाला परिक्षिताला जवळ बोलाविले, प्रेमाने त्याच्या शिरावरून हात फिरविला व स्नेहार्द्रतेने कुरवाळून त्याला आपल्या हृदयाशी लावून मस्तक अवघ्राण केले. धर्मराजा परिक्षिताला म्हणाला - 'बाळा मी तुझ्या हिताच्या दोन गोष्टी सांगतो तू लक्षपूर्वक ऐक. बाळा हळू हळू आमचा काळ जवळ येत असल्याने व राज्याची धुरा सांभाळण्यास तू योग्य असल्याने तुझ्यावर राज्यसुत्र व घरसुत्र सोपवून राजसंन्यास घेण्याचा विचार आहे. आपल्या प्रजेचे प्रेमाने पालन संरक्षण करणे हे राजाचे प्रमुख कर्तव्य आहे. सद्गुरु महाराज व्यासदेव तुला मधून मधून कर्तव्यकर्माचा, राज्य कारभाराचा, अध्यात्मज्ञानाचा उपदेश करतीलच पण

तो सर्व उपदेश नीट लक्षपूर्वक ऐकून ज्ञानोपासना कर. सदैव उत्तम लोकांच्या संगतीत राहावे. उत्तम प्रकारची, धर्माला अनुरुप लोकहिताची, समाज धारणेची व प्रजाजनांच्या उत्कर्ष उन्नतीची कर्मे करावी. कुसंगती व दुर्व्यसने यापासून दूर राहावे. एकपत्निव्रताने राहून कामविकार संयमीत ठेवावा. ती शक्ति धर्म व अर्थ या इतर पुरुषार्थाकडे लावून ऐहिक, पारलौकिक उन्नती साधावी, आपल्या बरोबर सन्मार्गाने इतर प्रजाजनांना सुध्दा घेऊन चालण्याचा प्रयत्न करावा. सतमार्गाचेच अवलंबन करावे, सत्यसंगच सर्व संकटातून व भवसागरातून तारून नेणारा असतो. त्या सत्संगाचा व ज्ञान श्रवणाचा मार्ग तू स्विकार. धर्म मार्गाचा व नीतिनियम पालनाचा आळस कधीही करू नये सदैव मर्यादित राहून नामस्मरण जप, पूजा, ध्यान, सेवेत आपले आयुष्य वेचावे. धर्ममर्यादेचे उल्लंघन ज्या वेळेस तुझ्याकडून होईल तोच क्षण तुझ्या नाशास कारणीभूत होईल. जो पर्यंत तू धर्म न्यायनितीप्रमाणे राज्य करून स्वत: वागशील तो पर्यंत कलियुग तुझ्या राज्यात धुमाकूळ घालणार नाही. पण त्यामार्गाचे उल्लंघन होताच कलियुगाच्या साम्राज्याचा प्रभाव प्रगट होईल. अतिशय दुस्तर पापी असे हे कलियुग आहे. या कलियुगात सत्यवादी लोकांना राहाता येणे फार कष्टाचे होईल. बालक कोणतीच आज्ञा पालन करणार नाही. स्त्रिया आपल्या मुलांना विकतील पुरुषांना सुध्दा हातोहात बनवतील (सहज लीलेने अजाणता विकतील) वर्ण अवर्ण कोणीही मानणार नाही. सर्व प्रकारचा वर्णसंकर होईल. सर्वजण आपापला कुळधर्म आचार सोडून देतील. ब्रह्मज्ञान शिकून वाचिक ज्ञान संपन्न होऊन लोकांना त्याचा उपदेश करतील पण स्वत: कांहीही आचरण करणार नाही. ब्रह्मदशा अथवा ब्राह्मी अवस्था कशी असते याचे मर्म न जाणता केवळ वाचीक ज्ञान पंडित होतील. शुभ गोष्टीला अशुभ समजून त्याचा सर्रास वापर करतील आणि हेच धर्मतत्व समजून त्याचा प्रचार करतील. धर्मतत्व पूर्णपणे न जाणता पुण्य समजून पापाचरणासच लोकांना प्रवृत्त करतील, पुण्यकर्मे खंडीत होतील. लोकामध्ये अंधश्रध्दा पसरवून धर्मकर्मापासून परावृत्त करतील, स्वत:च्या स्वार्था करिता व जीभेच्या स्वादाकरिता कोणत्याही प्रकारची दया हृदयात न बाळगता जीव हिंसा करतील, लोकांना लुबाडतील. लोभी राजे लोक वा पुढारी प्रजेला लुबाडतील. लांडी लबाडीचे व्यवहार करून परिवाराला फसवतील. माता आपल्या स्वार्थाकरीतां मुलींना अनर्थमार्गाला लावतील. त्यांचा विक्रय करतील. मुलींच्या द्रव्याचे अपहरण आईबाप करतील, असे अनेक अनाचाराचे कर्म या कलियुगात घडतील जे सांगतांना व ऐकतांना लाज वाटते. अशा प्रकारचे निंदास्पद कर्म लोक करायला लागतील.

भावाने प्रेमाने-मानसन्मानाने जेवण करणार नाहीत पण मागाहून अपमानाने बेशरमपणाने जेवण करतील आमंत्रण दिलेले नसता सुध्दा जेवावयास जातील. येथेच्छ मद्य प्राशन करून निशायुक्त भोजन करतील, गुरु मुखी संत महात्म्यांचे सत्यवचन न मानता असत्यवादी वाचाळ पंडितांच्या सल्ल्याने वागतील. धर्माचे देवपूजा अर्चेचे मर्म न जाणता देवळात मंदिरात मोठमोठ्या धार्मिक स्थळी तीर्थक्षेत्रावर जाऊन मिथ्याचार करतील धार्मिकता म्हणून नव्हे केवळ शोक म्हणून मजामौज म्हणून तीर्थयात्रा करतील. हे बाळा परिक्षिता सत्यवचन भाकिल्यास लोकांना त्रास भोगावा लागेल पण असत्याचार, भ्रष्टाचार करणारास मात्र लोक डोक्यावर घेऊन नाचतील. नीच व उंच वगैरे जातीय भेद न राहता सर्व एकाकार होईल. सुपात्र याचकाला दान देणार नाहीत पण दंभी, दुराचारी लोकांचे पाय पुजून त्यांना दान कर्म करतील. कृपात्राची पूजा करायला लागतील. अशा प्रकारचा कलि प्रताप आहे. श्रीहरीला न मानता शून्यच परमेश्वर समजतील शून्यवादाला प्राधान्य देतील. राजांची सेवाचाकरी करणारा गौलाच राजा होईल आणि असाधू लोकांची पूजा होईल. खोटे बोलणाराला अधिक मानसन्मान मिळेल तशा व्यक्तिंचिच जास्त वाखाणणी होईल. पंचांच्या मताला किंमत न राहता 'हम करे सो कानून' अशा आढ्यतेने दादागिरीने लोक वागायला लागतील त्याला राजा सुध्दां प्रतिबंध घालू शकणार नाही. हे या कलियुगाचे वर्तमान आहे. गायींना पूज्य पवित्र मानणार नाहीत इतर सामान्य पशुप्रमाणे त्यांचा विक्रय व हिंसा होईल. कन्या विक्रय होईल. उत्तम कुलवान स्त्रिया दासवर्गाबरोबर भ्रष्टाचार करतील. राजे अथवा संस्थानिक, सत्ताधारी पुढारी दासी वर्गाशी अनैतिक संबंध-प्रेमचाळे-विनयभंग करतील. अशा प्रकारे अत्यंत विपरीत असे कर्म कलियुगात प्राधान्यभूत होतील. बांधवाबरोबर नित्य झगडे होत जातील. असहकारता वाढेल, मोठमोठे धार्मिक सामाजिक कार्ये बंद पडतील. बाळा परिक्षिता, अशा या पापी कलियुगात आम्हाला राहायचे नाही. आमची आता अवस्थाही झालेली आहे, आम्ही वानप्रस्थ स्विकारून हिमालयात जाऊन तपस्या करूं. तू निर्मल चित्ताने धर्माचरण करून ह्या राज्याचा कारभार पहा. आपले सारे मंत्रीगण पुरोहीत वर्ग तुला योग्य ते सहकार्य करतील.' परिक्षित म्हणाला, 'हे तात अत्यंत पापी अशा या कलियुगात मी तरी कसा बरे राहू शकेल? मी सुध्दा तुमच्या सोबत येतो. आपणास सोडून मला राहता येणार नाही. मी सुध्दा सोबत येण्याचा निश्चय केलेला आहे.' धर्मराजा म्हणाला, 'बाळा अजून तू कोवळ्या वयाचा बालक आहेस, तुला अजून धर्म, राज्यशासन, सामाजिक ज्ञान संपादन करून चार पुरुषार्थाची प्राप्ति करायची आहे. तुझ्या जीवनाचा सर्वांगीण विकास व्हायचा आहे. गृहस्थाश्रमाची जबाबदारी उचलायची आहे, धर्मऋण, पितृऋण

व समाजऋण हे फिटल्याशिवाय मानव जीवनास पूर्णता नाही म्हणून तू ह्या सर्व जबाबदाऱ्या सांभाळ. आम्ही या साऱ्या ऋणातून मुक्त झालो म्हणून आता शेवटचा आश्रम गाठण्यास हिमालयात जातो.' असे समजावून त्यांनी परिक्षिताला राज्याभिषेक केला. ( श्लोक ८७३-८९१ )

## सद्भक्त पांडवांचे स्वर्गारोहण पर्व

यादवांचा क्षय झाला आणि कलियुग सुरु झाले. भगवान कृष्णाच्या पाठोपाठ बुध्द अवतार होऊन तोही अंतर्धान पावला त्याने केलेल्या उपदेशानुसार पांडवांनी प्रयाण करण्याचा विचार केला. धर्म म्हणाला 'अर्जुना आपले वैभव अनुकूल काळाने प्राप्त झाले होते पण आता विपरीत काळ आला आहे. आता योगमार्गाचे अवलंबन करणे इष्ट आहे. आपले आराध्य दैवत सन्मार्गदर्शक प्रिय सखा असलेल्या भगवान गोपालकृष्णाचे व बलरामाचे स्मरण म्हणून आधी त्यांचे श्राध्द करावे नंतर पुढील निरवानिरव करावी असे मला वाटते.' धर्मराज्याच्या सुचनेनुसार द्रौपदी, भीम, अर्जुन नकुल व सहदेव द्वारकेला आले. तेथे त्यांनी मार्कंडेय, भारद्वाज, याज्ञवल्क्य वगैरे ऋषींचे पूजन करून वस्त्रे, भूषणे, अश्व, गज, गायी इ. ची दाने केली. बलरामादि सर्व यादवांची श्राध्दे केली. मग पांडवांनी नैष्ठिक यज्ञ करून समुद्रात स्मार्ताग्नि टाकला. तेव्हा मूर्तिमंत अग्निनारायण त्यांच्या दृष्टीस पडला. त्याने अर्जुनाला सांगितले की मी तुझ्या कृपेने सर्व खांडव वनाचे भक्षण केले होते. आता गांडीव इथेच ठेवून पुढे जा. हे ऐकताच अर्जुनाने अक्षय भात्यासह गांडीव वरूणासाठी जलात टाकले तेव्हा मोठा भीषण शब्द होऊन अग्नि अंतर्धान पावला नंतर पांडव पश्चिमेकडे समुद्रतीरावर आले. तेथे समुद्रात बुडालेल्या द्वारकेला पाहून त्यांनी तिला नमस्कार केला व गहिवरून ते परत उत्तरेकडे वळले. माघारे हस्तिनापुरास परत आल्यावर त्यांनी परिक्षिताच्या राज्याभिषेकाचा समारंभ केला.

बलरामादिकांची श्राध्द कार्ये आटोपून विपूल दानधर्म करून पांडव हस्तिनापुराला परत आले. भगवान श्रीकृष्ण अंतर्धान झाल्याने आता पांडवांना अतिशय उदासवाणे वाटत होते. त्यांना कशातच रस वाटत नव्हता. रात्रंदिवस विचार करून त्यांची मस्तके सून्न झालेली होती. युधिष्ठिर चिंतासागरात पडला होता. अखेर त्यांनी एके दिवशी सकाळी आपल्या राजप्रतिनिधींना बोलावून त्यांची सभा घेतली व आपले सारे मंतव्य त्यांच्यासमोर विदीत केले. कोणालाही मनापासून पांडवासारख्या सद्भक्तांचा

त्याग करणे योग्य वाटत नव्हते. त्यांच्यासारखे योग्य शासक, ममताळु राजे अन्य कोणी मिळणार नव्हते पण पांडवांनी राज्य सोडून वनात जाण्याचे निक्षून सांगितल्याने सभासदांचा नाईलाज झाला. एक उत्तम मुहूर्ताचा दिवस ठरवून त्यांनी राज्यातील प्रमुख सभासद अमीर उमराव, शेठ्ठी वश्रेष्ठी वगैरे सर्वांना आमंत्रीत केले. ठरलेल्या वेळेवर सर्वजण उपस्थित झाले. मुख्य सिंहासन मोकळे सोडून बाजूला पांडव, कुंतीमाता, सती द्रौपदीसह बसले. सर्व राजपुरोहितांनी परिक्षिताला मंगलस्नान घालून उंची वस्त्रे परिधान करून राज्याभिषेक करवून उच्च सिंहासनावर बसविले. नवनवीन उंची वस्त्रे परिधान करून सर्व प्रजाजन या नवीन युवराज्याभिषेकास उपस्थित झाले. सर्वांनी परिक्षिताचा जयजयकार केला. धर्मराजा, सद्गुरु व्यासमुनि यांच्या सल्ल्याने मंत्रीमंडळ व राज्यप्रतिनिधी नेमले गेले व राज्यकारभाराच्या सर्व खात्यांची विभागणी केली जाऊन मुख्य शास्ता म्हणून परिक्षिताजवळ राजदंड देऊन त्याच्या नावाची सर्वत्र द्वाही फिरविली. सर्वांनी अत्यंत प्रेमाने आनंदाने त्याचा स्विकार करून जयजयकार केला. सर्वत्र उत्सव साजरा करण्यात आला. गुढ्यातोरणे मंडप उभारून दुंदुभीनाद, ढोल, भेरी, सनया वगैरे वाद्ये वाजवून सर्व प्रजेने दीपोत्सव उजवून नवीन राजाचे स्वागत केले. धर्मराजाने प्रसंगोपात भाषण करून सर्वप्रजेला एकदिलाने प्रेमाने सलोख्याने व धर्मनीतीप्रमाणे वागण्याचे व नवीन राजाला सहकार्य करण्यास आवाहन केले व राजाला सुध्दा योग्य न्यायनीतीप्रमाणे प्रजापालन संरक्षण व विकास करण्याचे आवाहन केले. परीक्षिताने आपल्या पितामहांच्या आज्ञेनुसार प्रजाहितदक्ष राहण्याचे आश्वासन दिले. सर्व प्रजेने आपल्या अत्यंत आवडत्या प्रिय शुरवीर व धर्मरत राजा परिक्षिताचे मनोमन कल्याण चिंतून आशिर्वाद दिले. धर्मराजाने त्याच्या शिरावर ध्वजा छत्र धारण करून त्यांच्याकडून अपार असा दानधर्म करविला. अतिथी, अभ्यागत, याचक व संपूर्ण प्रजाजन यांना अन्न, वस्त्र, भूमी, अश्व, गज, गायी यथोचित दानधर्म करून सर्वांना संतोषीत केले. अशा रितीने राज्याची सर्व सूत्रे त्याच्याजवळ सुपूर्द करून धर्मराजा व बाकीचे पांडव आपल्या शिरावरील जबाबदारीतून मुक्त झाले. सर्वांना आनंदीआनंद झाला, सर्व प्रजाजनांना क्षणभर सुखाचा तर क्षणात दुःखाचा उमाळा येऊ लागला. नवीन राजा पांडवांचा नातू धर्मनीतिवान व सुसंस्कारी असल्याने त्यांना आनंद होत होता पण ज्यांनी सारे आयुष्य धर्मरत राहून प्रजाजनांच्या हिताकडेच लक्ष दिले, पुत्रवत आपल्या प्रजेचे पालन संरक्षण संगोपन केले ते महावीर आज राज्य सोडून आपणा सर्वावरून आपले कृपाछत्र काढून वनात जातील म्हणून त्यांना दुःखाचा उमाळा येत होता. ते वारंवार हात जोडून पांडवांना न जाण्याबद्दल विनवीत

होते. पांडवांची सुध्दां तशीच अवस्था झाली होती. ज्या प्रजेने आपल्यावर अत्यंत प्रेम केले, आपल्या शासनकाळात वेळोवेळी हालअपेष्टा सहन करून निमुटपणे त्रास सहन केला व कोणताही अवमान न करता सहकार्य केले अशा आज्ञाधारक, निरागस प्रेमळ प्रजेला सोडून जाणे योग्य वाटत नव्हते पण या प्रजेला योग्य शास्ता पुन्हा मिळू शकेल ते पुन्हा आनंदीत होऊ शकतील पण आपण! आता निघून गेलेली घडी पुन्हा आपणाला मिळू शकणार नाही म्हणून मोठ्या कष्टाने दुःखाचा उमाळा दाबून त्यांनी दुसऱ्या दिवशी उजाडताच अरण्यवास पत्करण्याचे ठरविले. (श्लोक ८९२-९१०)

दुसऱ्या दिवशी सकाळी सूर्योदयाच्या आधीच धर्मराजाने उठून प्रातःस्नानसंध्या वगैरे सर्व आटोपून सर्व भावांना व सती द्रौपदीला बोलाविले. मनोमन परमेश्वराचे ध्यान करून धर्मराजा भीमास म्हणाला, 'भीमा मी तुला एक गोष्ट सांगतो नीट लक्ष्यपूर्वक ऐक. मनात कोणत्याही प्रकारचे किल्मिष ठेवू नकोस. तुझ्यासारखा महाबलवान पूर्णपणे शक्तिसामर्थ्यवान दुसरा कोणीही नाही. संपूर्ण त्रिभुवनात शक्तिशाली म्हणून तुझी किर्ती आहे. मल्लविद्येत निष्णात आणि अत्यंत पराक्रमी असा तू महावीर आहेस. माझी अशी इच्छा आहे की तू धर्म न्यायनीतीप्रमाणे वागून राजकुमार परिक्षिताला राज्य शासनास मदत कर मी हिमाचलात जाऊन भगवंताच्या आज्ञेचे पालन करतो, ज्याठिकाणी नन्दकुमार आहेत अशा त्यांच्या धामात त्यांच्या चरणाजवळ जाण्याचा माझा निर्धार आहे. माझी तुला अशी विनंती आहे की आपले तीन भाऊ व सती द्रौपदी यांचे सहकार्याने उत्तम प्रकारे राज्यकारभार करा. धर्म न्यायाप्रमाणे वागून प्रजेचे उत्तम रितीने पालन कर. राज्यशासनाबरोबर घरीच निवांतपणाने बसून भगवान श्रीहरीचे भजनपूजन स्मरण कर. हीनदीन लोकांना यथेच्छ दानधर्म करून त्यांचा आशिर्वाद घे. सर्वजण मिळून मातेची सेवा करा व तिचा स्नेहस्निग्ध आशिर्वाद घ्या. मुखातून सदैव सत्यवचन वदावे. मन शुध्द निर्मळ पवित्र ठेवावे कोणत्याही प्रकारच्या धर्म मर्यादांचे उल्लंघन न करता हस्तिनापुराचे राज्य कर.' एवढे सांगून धर्मराजा स्तब्ध झाला. मग भीमसेन म्हणाला, 'हे भ्रात ही खोटी गोष्ट तुम्ही मला कां सागतात. मला राज्याचा कांहीही मोह नाही. मी तर तुमच्याबरोबरच येईल. हे भ्राता, तुम्हाला भगवंतांनी ज्याप्रमाणे कलियुगाची स्थिती सांगून योगसाधना करण्यासाठी हिमालयात जाण्यास सांगितले तसेच आम्हाला सुध्दां सांगितले आहे. तुम्हाला सोडून एकक्षणभरही

मी राहू शकणार नाही. हे पितृतुल्य बंधू जिथे आपले हे चरण जातील त्याचेच मी अनुसरण करीन विनाकारण राज्याचा मोह घालून मला आपल्या वियोगाचे दुःख देऊ नका. एकवचन मी तुम्हाला निक्षून सांगतो. तुम्हाला सोडून मी हस्तिनापुरास राहिलो तर श्रीहरीची आण आहे. (श्लोक ९११-९२८)

नंतर धर्मराजा अर्जुनाला म्हणाला, 'हे पार्थां तू हस्तिनापुरात राहून येथील राज्य कर. अंतःकरणापासून श्रीहरीची सेवा कर. प्रजेचे उत्तमरितीने पानल कर. माता कुंतीची सेवा करून संतुष्ट कर. धनुर्विद्येत तू प्रविण आहेस. तुझ्यासारखा धीरवीर पराक्रमी पुरुष अन्य कोणीही नाही. गोविंदाचा तू परमसखा आहेस. तुझे प्रेम भगवंतावर एवढे होते म्हणून त्यांनी तुझे सारथ्य सुध्दा केले अशी भगवंताची प्रिती तुजवर आहे. म्हणून माझे म्हणणे तू आपल्या हृदयात धारण कर ' धर्मराजाचे वचन ऐकून अर्जुन म्हणाला, 'हे सुहृद बंधु माझ्यासमोर राज्याचे नावसुध्दां घेऊ नका. मला माझ्या त्या प्रेम सुहृद भगवंताच्याच दर्शनाची फक्त ओढ लागली आहे. त्याच्या दर्शनाशिवाय इतर राज्यसुखोपभोग सर्व व्यर्थ आहे. ते मला नको. मी आईची शपथ घेऊन सांगतो की मी तुमच्याशिवाय मागे एकटा राहू शकणार नाही. जिथे आपण जाल तिथे मी येईल अशी माझी प्रतिज्ञा आहे.' नंतर धर्मराजा नकुलाला म्हणाला, 'हे भ्रात्या नकुला, माझी विनंती तू तरी अमान्य करू नकोस. तू मातेचा अत्यंत लाडका आहेस. आईची तुझ्यावर विशेष ममता आहे म्हणून आईची सेवा करण्यासाठी तू घरी राहा हस्तिनापुरचे राज्य बाळ परिक्षीत करील तू नुसता त्याची देखभाल करीत जा आणि श्रीहरीभजन नामस्मरण कर.' नकुल म्हणाला, हे पितृतुल्य बंधु, तू अशी विपरीत गोष्ट मला सांगू नकोस आजपर्यंत आम्ही आपला शब्द कधीही व्यर्थ जाऊ दिला नाही कारण प्रत्यक्ष धर्मवाणीच आपल्या मुखातून प्रगट होते. पण आज आपण हे काय आरंभीलेले आहे. आम्हाला विपरीत अशी आज्ञा का देत आहात हेच मला समजत नाही. माझ्या हृदयात तुझ्या सान्निध्याशिवाय अन्य विचार नाही. तुझीच शपथ घेऊन मी सांगतो तुला सोडून मी मागे राहणार नाही. मी सुध्दां तुमच्याबरोबर येईन.' (श्लोक९२९-९४१)

राजा युधिष्ठिर सहदेवाला म्हणाला, 'सहदेवा, तू सर्वांमध्ये धाकटा आणि आईचा अतिशय प्रिय आहेस. तू तरी माझे वचन ऐक आणि या राज्याचे उत्तम रितीने परिपालन कर. घरात अत्यंत पतिव्रता अशी द्रौपदी आहे. गज, रथ, दास, दासी, सुवर्णभंडार वगैरे सर्वांची विपुलता आहे. परिक्षितासारखा अत्यंत सुशील सद्‌गुणी असा नातू तुझ्या सेवेस अत्यंत तत्पर राहील. वृध्द मातेची सेवा करता येईल आणि

हे सर्व करून भगवान श्री अविनाशीचे भजन पूजन स्मरणसुध्दां घरी बसून तुला करता येईल म्हणून तू घरीच राहा.' धर्मराजाचे वचन ऐकून सहदेव म्हणाला, 'हे भ्रात्या तू माझा अत्यंत प्रेमळ, हितकर्ता, तत्त्ववेत्ता असा वडील बंधू आहेस. सर्व जगतात एक अत्यंत सालस बुध्दीचा निर्मळ चित्ताचा, सर्वांचे हित चिंतणारा साधु सत्पुरुष तू आहेस. असे असतांना तू मला हा विपरीत उपदेश का म्हणून करतोस माझ्या मताने तर हे राज्य करणे म्हणजे हलाहलपान करण्याप्रमाणे आहे, अतिशय कठिण काम आहे. आता नुकतेच रणक्रंदन होऊन जगताचा झालेला अपरिमीत संहार पाहून व जगातील त्रस्थ झालेल्या व हालाहाल झालेल्या जीवात्म्याची स्थिती पाहून कोणता शासनकर्ता या शासनकार्यात सुख मानेल. मला हे राज्यही नको व आपण मला तसा कोणताच मोह टाकू नका. ते सर्व व्यर्थ होईल. मला फक्त आपल्या सान्निध्यात राहून सेवेची संधी द्यावी. म्हणजे परमनिधान अशा श्रीकृष्ण भगवंताची प्राप्ती होईल. त्या भगवंताचीच आण घेऊन मी तुम्हाला निर्धाराने सांगतो मला राज्य करायचे नाही आपलेच अनुसरण करायचे आहे.'

चारही भावांनी धर्मराजाचे म्हणणे अमान्य केले. सर्वांना असेच वाटत होते की धर्मराजाच्या सहवासात राहून जी भगवत्प्राप्ती होईल ती येथे राज्यशासन करून मुळीच करता येणे शक्य नाही. धर्मसुध्दां हे जाणून होता पण केवळ वडीलभावाचे कर्तव्य म्हणून तो ही सर्व परिक्षा पहात होता. शेवटी त्याने महानपवित्र पतिव्रता द्रौपदीला बोलावून आणले व तिला म्हणाला 'हे सती मी तुला एक गोष्ट सांगतो ती तू ऐक. तुझी सासू माताकुंताजी अत्यंत वृध्द झालेली आहे. तू सून आहेस म्हणून वृध्द सासुची सेवा करणे हे तुझे कर्तव्य आहे. गंगा यमुना रेवा प्रमाणे सतीस्त्रियांचे पावित्र्य आहे. एवढेच काय पण सासुसासऱ्यांची सेवा करणारी सती स्त्री नद्यांना सुध्दां पवित्र करते. वृध्दापकाळात सासुसासऱ्यांना जी दुःख देते ती स्त्री कित्येक वर्षेपर्यंत रौरव नरकात खितपत पडते म्हणून तू तरी घरी राहून सासुची सेवा कर व वैकुंठाचे सौख्य प्राप्त करवून घे. बाल अभिमन्युचा मुलगा परिक्षित अजून अल्पज्ञ आहे त्याला राज्यसिंहासनावर बसविला आहे. आम्ही हिमालयात जात आहोत तू राज्यशासन व व्यवहारशास्त्रात निष्णातआहेस. म्हणून तू परिक्षिताचे संगोपन चांगले करून त्याला उत्तम रीतीने सज्ञान करशील अशी आमची खात्री असल्याने तुझ्यावर हा सारा भार सोपवून जात आहोत. घरी राहूनच बालकाचे संगोपनही

तुला करता येईल व तुझा प्रेमळ प्रेमास्पद प्राणसखा अशा श्रीकृष्ण परमात्म्याचे भजनसुध्दां करता येईल म्हणून तू येथेच रहा. आम्ही हिमालयात जाण्याची तयारी करतो. (श्लोक ९४२-९६०)

युधिष्ठिराचे वचन ऐकून सती द्रौपदी म्हणाली, 'हे स्वामीनाथ हात जोडून मी आपणास विनंती करते कीं स्त्रीचा धर्म असा आहे की पति जिथे असेल तेथे त्याची सेवा करणे. मेघाशिवाय ज्याप्रमाणे विद्युल्लता राहात नाही त्याप्रमाणे पतिव्रता स्त्री पतीला सोडून राहूच शकत नाही. जी स्त्री पतीला सोडून राहाते तिच्या शिरावर कल्पान्ताचे पातक येऊन पडते. स्त्रीचे तीर्थक्षेत्र पति हेच होय. पतिसेवा हेच स्त्रीचे तप आहे. पति हा स्त्रीला प्रत्यक्ष नारायण केदारनाथ आहे. त्याची सेवा सोडून जी स्त्री अन्यत्र भटकते. ती व्यभिचारिणी होय. पतिसेवा करणारी स्त्रीच सती जाणावी. हे कृपाळू स्वामीनाथ, माझ्या हातून असा कोणता अन्याय घडला. विनाअपराध मला कां सोडून जात आहात. जी स्त्री आपल्या पतीचे शब्द उल्लंघन करते, मर्यादा सोडून वागते ती अपराधी जाणावी. आज पर्यंत मी आपली एकही आज्ञा मोडली नाही पण आता दिलेली ही विपरीत आज्ञा पालन करण्याचे माझ्याने सहन होऊ शकणार नाही. नाथ आपल्याशिवाय माझा प्राण एक क्षणभरही जिवंत राहू शकणार नाही. आपण मला असे विपरीत वचन सांगू नका आणि आपण जर मला सोडून जाल तर स्त्रीविरहीत अशा आपणास पाहून तो माझा प्राणबंधु सुहृदसखा श्रीकृष्णभगवान आपणास दोष नाही कां देणार! आपला विरह माझ्याकडून सहन केला जाणार नाही आणि शिवाय स्त्री हत्येचा दोषसुध्दां आपणास लागेल! स्वामीनाथ! मी अबला आहे. आपणापुढे पदर पसरून मी विनंती करते की मला सोडून जाऊ नका. आपणाशिवाय माझे पंचप्राण तळमळतील व हा देह काळाच्या स्वाधीन करून निघून जातील. हे कलियुग अत्यंत विपरीत असे आहे, यात राहाता येणे अत्यंत दुस्तर आहे. ज्या कलियुगाच्या भयाने आपण हे जग सोडून जात आहांत त्या या भयानक काळात मला लोटून जाऊ नका. आपल्या पाठोपाठ आपल्या चरणांचे अनुसरण करीत आपल्या सेवेकरिता येऊ देण्याची कृपा करावी. आज आपणास सोडून हस्तिनापुरात जर मी राहिले तर माझ्या माहेर आणि सासर दोनही कुळाला कलंक लागेल. माझ्या या कृत्याने इहलोक आणि परलोक दोन्ही मला अंतरतील. स्वामीनाथ! मी माझ्या परमप्रेमास्पद गोविंदाची शपथ घेऊन सांगते की मी आपणास

सोडून घरी राहणार नाही. आपण मला सोबत येण्याची परवानगी द्यावी. नाहीतर आपल्या प्रस्थानाच्या आधीच हा प्राण निघून जाईल.' द्रौपदीचा कळवळा पाहून पांचही भावांची हृदये द्रवली त्यांनी सतीला बरोबर घेण्याचे ठरवले व त्या सहाही जणांनी हिमालयात जाण्याचा पक्का निश्चय करून माताकुंतीच्या महालात प्रवेश केला. (श्लोक ९६१-९७८)

हिमालयात जाण्याचा दृढनिश्चय करून सहाही जण माता कुंतीच्या महालात आले. सर्वांनी मातेला नम्र अभिवादन करून चरणसेवा केली. सर्व दासदासी परिवार भयाकुल होऊन स्तब्ध राहून आश्चर्यचकित झाले. कोणीही कांहीही बोलत नव्हते. पण एकमेकाकडे पाहून दुःखाने निश्वास टाकीत. त्यांची मोठी चमत्कारिक परिस्थिती झालेली होती. माताकुंतीने पाचही जणांना जवळ बसवून आशिर्वाद दिला. द्रौपदीने माता कुंतीला नमस्कार करून तिच्या चरणाजवळ ठाण मांडले. मातेने प्रेमाने तिच्या मस्तकावरून हांत फिरवून कुरवाळले व म्हणाली, 'बाळे तो जगदीश तुम्हा सर्वांवर कृपा करून सुखात ठेवो. माझा तुम्हाला हाच आशिर्वाद आहे.' धर्मराजा म्हणाला, 'आई तुझी आम्हावर अशीच कृपादृष्टी राहो. हे माते आतापर्यंत तू अपार कष्ट सोसून आम्हाला सुखात ठेवण्यासाठी अतोनात खटपट केली. कल्पान्तापर्यंत हे उपकार फिटू नये. जन्मोजन्मी याच चरणांची सेवा आमच्याकडून घडावी अशी आमची परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. आता आमच्यावर एक कृपा दृष्टी कर. आम्ही धर्मनियम (प्रतिज्ञा) करून हिमालयात जात आहोत. तू आम्हाला आशिर्वाद आणि परवानगी दे. बाळ परिक्षिताचे परिपालन करून सर्वावर अशीच स्नेहदृष्टी ठेव. युधिष्ठिराचे हे वचन ऐकून माता कुंती म्हणाली, 'बाळांनो आज तुम्ही हे आरंभिले आहे तरी काय! मला सोडून आज तुम्ही कोठे जात आहात? तुमच्याशिवाय हे वैभव धनसंपत्ति याचा उपभोग घेऊन मला काय करायचे आहे? हा घरसंसार हे राज्यसूत्र याचा मला काय उपयोग? आता या वृध्दापकाळात माझा त्याग करून तुम्ही कोठे आणि कां जात आहात? माझे जीवन शून्यवत करून तुम्ही पाचही भाऊ व ही सती द्रौपदी माझी प्रेमळ सून तुम्ही सर्वजण कां म्हणून जात आहांत? तुमच्या जाण्याने शून्य झालेल्या घरात प्रेतवत् झालेल्या या चार भिंतीत मी एक क्षणभरही राहणार नाही. मी तुमच्या सोबत येते. बाळांनो मला सोडून जाऊ नका.' युधिष्ठिर म्हणाला, 'हे माते तू ही गोष्ट करू नकोस. भगवंताच्या आज्ञेप्रमाणे आम्हाला तर जायचेच आहे, पण तू आमच्यावर कृपा कर आणि प्रेमाने आम्हाला जाण्याची परवानगी दे. वृध्दापकामुळे

तुझ्याने चालविले जाणार नाही. बर्फमय प्रदेशातील अतिशय थंडीमुळे तुझ्याने तग धरवणार नाही. शिवाय वाघ, सिंह, अस्वल, लांडगे वगैरे हिंसक पशूंची भीति मार्गाने फार आहे. वानर, कोल्हे, चित्ते, वनगाई, म्हशी, रेडे वगैरे उपद्रवी प्राण्यांपासून त्रास होईल म्हणून हे माते तूं आमच्याबरोबर न येता घरीच सुखाने भगवंताचे भजनपूजन स्मरण करीत राहा. बाळ परिक्षिताच्या हातून पूजन अर्चन दानधर्म करीत राहा. योग्य वयाचा झाल्यावर त्याला अनुरुप अशा वधूशी त्याचे लग्न करून सन्मार्गाला लाव. त्याच्याकडून अपार दानधर्म, पुण्यकृत्ये, सत्कार्ये करायला लाव. हे माते आमचे संगोपन करतांना तुला अपारकष्ट सोसावे लागले पण आता राज्य निष्कंटक झाल्याने परिक्षिताचे परिपालन करतांना तुला त्रास होणार नाही. आता तू आम्हाला मुक्त हृदयाने परवानगी दे.( श्लोक ९७९-९९३ )

युधिष्ठिराचे वचन ऐकून माता कुंती म्हणाली, 'बाळांनो, हा परिक्षीत बालक अजून अल्पज्ञ आहे. त्याचे योग्य असे संगोपन तुमच्याशिवाय दुसरे कोण करू शकणार आहे. तुमच्या जाण्याने हे राज्य, हा बालक पोरका नाही कां होणार! मी वृध्द काय करू शकणार आहे. बाळांनो आज तुम्ही मला सोडून जाल तर आजच माझ्या आंधळ्याचा आधार मोडून पडेल. वृध्दापकाळात मुलाबाळांच्या आधाराने जीवन कंठायचे असते. म्हणून वृध्द मातापिता अपार कष्ट सोसून आपल्या अपत्यांचे संगोपन लालनपालन करतात. आज मी तुमच्या पश्चात कोणाच्या तोंडाकडे पाहू. कोण मला आई म्हणून प्रेमळ हाक मारेल. 'आई' या प्रेमळ हाकेत माता साऱ्या जन्माचे दुःख विरसते. माझ्या प्रकृतीची आहारविहाराची कोण देखभाल करील. माझ्या अंतरीचे सुख:दुख बाळांनो मी कोणाला सांगू. खरोखर पूर्व जन्मात मी अगणित पापे केलेली असतील म्हणूनच आज देवाने व दैवाने मला हे अपरिमित दुःख दिले. वृध्दापकाळात मुलांनी सोडून जाणे यापरिस आणखी दुसरे कोणते दुःख कठिण असणार. बाळांनो माझ्या हृदयात हे दुःख मावत नाही. आता पुत्राशिवाय हा देह जिवंत ठेवून काय करू. माझा प्राण तडफड करीत आहे. हृदयाचे कवच फाडून हा प्राण उडून जाण्याचा प्रयत्न करीत आहे. अरेरे, ईश्वरा कसा हा विपरीत काळ तू माझ्यावर आणलास. पुत्राशिवाय कोणी पाणी देत नाही. पुत्राशिवाय अन्न विषतुल्य होते. पुत्राशिवाय कोणी वस्त्र पुरवीत नाही. पुत्रासारखे अन्य कोणतेच धन श्रेष्ठ नाही. पुत्राशिवाय मातेचा संसार सर्व उध्वस्थ होतो. पुत्राशिवाय स्त्रीला लोक अद्वातद्वा बोलून शिवीगाळ करतात. पुत्राशिवाय कोणी त्या स्त्रीचे तोंड पाहात नाही. पुत्राशिवाय त्या स्त्रिला सर्व संसार बुडालेला असतो. पुत्राशिवाय मोक्ष मिळत नाही. पुत्राशिवाय धर्मानुसंधान

साधत नाही. पुत्राशिवाय भाऊबंदात मान राहात नाही. पुत्रविरहीताला महापापी गणतात. पुत्राशिवाय माहेरात स्त्रीला मान नसतो. पुत्राशिवाय सासरवासात मानसन्मान नसतो. पुत्राशिवाय कुटुंबाचे पालनपोषण व उन्नती होत नाही. पुत्राशिवाय घर अथवा वास्तव्यस्थान स्मशानाप्रमाणे उध्वस्त वाटते. पुत्राशिवाय आई या अमृततुल्य शब्दाला काय अर्थ. पुत्राशिवाय स्त्रियांना साजशृंगाराचे काय प्राधान्य. पुत्राशिवाय आई सुखी होत नाही. पुत्राशिवाय स्त्रिचे जीवन शून्यवत आहे. म्हणून हे बाळांनो आता मला निश्चित वाटते की या वृध्दापकाळात पुत्रविरहाचे दु:ख सहन करण्यापेक्षा जीवन समाप्त करवून मरणाच्या स्वाधिन झालेले बरे. हे प्रभू मला एवढे दीर्घआयुष्य देऊन तुला काय लाभले? जीवनभर दु:खाचे डोंगर उल्लंघन करण्यापलिकडे माझ्या जीवनांत काय बरे सुखाची प्राप्ती झाली. जीवनाच्या शेवटच्या क्षणी पुत्रविरहाचे दु:ख भोगण्यासाठीच का प्रभु मला जिवंत ठेवले. मला आता हे जीवन अगदी असह्य झालेले आहे. माझ्याने आता अधिक काळपर्यंत हे पुत्रविरहाचे दु:ख सहन होणार नाही. हे जगदीश्वरा, दुर्योधनाशी द्युत खेळून प्राप्त झालेल्या वनवासाचे दु:ख माझी बाळे परत येतील आणि पुढे सुखाचे दिवस येतील या एकमेव आशेवर मी सहन केले पण आता गेलेले माझे पुत्र परत कधीच या डोळ्यांना दिसणार नाहीत. आज या पुत्रविरहाचे दु:ख मी कोणत्या आशेवर सहन करू. बारा वर्षाचे ते विरहदु:ख कसे तरी सहन करता आले पण आताचे चिरविरहाचे दु;ख सहन करण्याची शक्ति आता माझ्यात नाही. बालक परिक्षिताला उघड्यावर सोडून जात आहात, हे पुत्रांनो ही कल्पनाच मला सहन होत नाही हे दिनानाथ, दिनबंधु, भक्तवत्सल प्राणसख्या भगवंता आता माझी सारी गात्रे शिथील झाली. सहनशक्ति आटली आणि माझी प्राणशक्तिसुध्दां क्षीण झाली. बुध्दि लयाला गेली. इच्छाशक्ती मावळली. मला जीवंत ठेवण्यात आता अर्थ नाही. ज्या या अभागिणीला जन्म देऊन तू जगतात आणलेस त्या मला आता क्षणाचाही विलंब न करता येथून घेऊन जा. तुझ्या इच्छाशक्तिपुढे कोणाचेही बळ चालत नाही. बाळांनो ज्या काळपुरुषाने तुम्हाला जन्मालाघातले, त्यानेच तुम्हाला येथून जाण्याचे आवाहन केले आहे. त्याच्या सत्तेत कोणीही ढवळाढवळ करण्यास समर्थ नाही. त्याच्या इच्छेनुसारच तुम्हाला मला सर्वांना वागले पाहिजे. भीष्म, द्रोण, भगवान कृष्ण, बलराम यांना सुध्दां काळपुरुषासमोर सामोरे जावे लागते. मग आपली काय गति मी तुम्हाला तुमच्या मार्गात अडथळा आणू शकत नाही. आजपर्यंत जो दु:खाचा महासागर पार परीत आले, त्याच भवसागरातून माझी जीवन नौका यथास्थित पार पडेल. तुम्ही चिंता करू नका. मात्र मागे कोणतीही इच्छा आसक्ति ठेवू नका.

माझा तुम्हाला आशिर्वाद आहे. सतत तुमच्या पाठीशी सत्प्रेरणा रूपाने मी राहीन.' मातेचा आशिर्वाद आणि आज्ञा शिरसावंद्य मानून सहाही जण तिच्या चरणी लागले. क्षणानंतर या परम कृपाळू धैर्यशाली धीरवीर मातेच्या चरणाला आपण अंतरू हे जाणून सर्वांना दुःखाचे उमाळे आले. सर्वांच्या नयनातून प्रेमाश्रु धारा वाहू लागल्या. मातेने सर्वांना जवळ घेऊन प्रेमाने कुरवाळले. प्रेमभराने द्रौपदीला हृदयाशी लावून तिच्या मस्तकावरून आपला प्रेमळ स्नेहस्निग्ध वरदहस्त फिरविला.( श्लोक ९९४-१०१७ )

ती रात्र पांडव व सती द्रौपदीने मातेच्याच महालात घालविली. रात्रभर मातेने सर्वांना अमुल्य उपदेश केला. परमेश्वर स्मरण, जप, पूजा, ध्यान वगैरे संबंधी चर्चा केली. कलियुगाची स्थिती, भगवंताच्या अवतारलीलांचे वर्णन ऐकून सर्वांची हृदये भगवतप्रेमाने भरून आली. नंतर धर्मराजा आपल्या भावांना व सतीला उद्देशून म्हणाला, 'हे प्रेमळ बंधुंनो आपण सर्वजण दृढनिश्चय करून हिमालयात जाण्याचे ठरविले आहे. आपल्या प्रस्थानाचा मुहूर्त उद्या सकाळीच असल्याने सर्वांनी आपापल्या तयारीने तत्पर राहावे. निश्चयात शिथीलता आणू नये.' रात्रभर भगवंताच्या चिंतन स्मरणात वेळ कसा निघून गेला हे सुध्दा समजले नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी ब्रह्ममुहूर्तावर उठून सर्वांनी प्रातर्विधी स्नान संध्या देवतार्चन पितृतर्पण स्मरण चिंतन ध्यान करून यथेच्छ दानधर्म केला. याचक अतिथी भिक्षुक वगैरेंना दानधर्म करून संतुष्ट केले. नंतर अल्पाहार करून धर्मराजाने सर्व भावांना व सतीद्रौपदीला आपल्या मंदीरात बोलाविले. आज आपले त्राते शास्ते आणि पितृतुल्य राज्यकर्ते आपणास सोडून हिमालयात प्रस्थान करतील हे विदीत झाल्याने सारी प्रजा व राज्यप्रतिनीधी राज महालात आधीच येऊन बसलेले होते. सर्वांच्या मुखावर भयमिश्रीत शोकाची छाया दाटलेली होती. सती द्रौपदीने धर्मराजाच्या महालात जाऊन तेथे जमलेल्या आपल्या पाचही पतींच्या चरणी नमस्कार केला. सर्वांनी आनन्दकंद भगवान जगदीशाचे स्मरण केले नंतर धर्मराज सर्वांना म्हणाला, 'प्रेमळ बंधुंनो! हे सती शिरोमणी! मी तुम्हाला दोन हिताच्या गोष्टी सांगतो त्या तुम्ही एकाग्र चित्ताने ऐका. आज आपणास हे सर्व राज्य, प्रेमळ प्रजा, आप्त, इष्टमित्र यांना सोडून प्रस्थान करायचे आहे. परत कधीच यायचे नाही. कुडी सोडून गेलेला प्राण परत फिरून त्याच कुडीत येत नाही. त्याप्रमाणे हे नगर, हे राज्य व हे सर्व प्रजाजन सोडून आपणास आत्मलाभार्थ योगसाधन करण्यास जायचे आहे, अरण्यात जातांना शस्त्रास्त्रे, राजवस्त्रे, अलंकार

वगैरे सर्वांचा त्याग करा. मनात दृढ वैराग्य धारण करा. दृढनिश्चयाने मार्गक्रमण करा. मनात कोणत्याही प्रकारची चिंता करू नका. एकमेव भगवंताचे चिंतन स्मरण मनात करा. तपस्व्यांचा वेश धारण करा. वल्कलवस्त्रे नेसून केसांचा बुचडा बांधून भस्मचर्चित अंग करून हातात दंड व कमंडलू धारण करा. सोबत एक पैसा सुध्दा घ्यायचा नाही. रस्त्याने सुखसोयी प्राप्त व्हाव्या अशी इच्छा सुध्दा करूं नका. कोणत्याही वस्तूत आसक्ति, व्यक्तित ममत्व बाळगू नका. निशस्त्र, नि:संग, निरासक्त होऊन मार्गक्रमण करा, हृदयात श्रीहरीचे ध्यान करा तोच खरा आपला सहाय्यकर्ता, हितकर्ता, शास्ता त्राता आहे. आजपर्यंत अगणित भक्तांचा त्याने उध्दार केलेला आहे. आपल्या आत्म्याचा सुध्दा उध्दार करणारा तोच एकमेव श्रीहरी आहे म्हणून त्याच्याच स्मरण चिंतन संगतीत आपणास आपले इच्छित स्थल व इच्छित ध्येय गाठायचे आहे म्हणून आता सर्वांनी तत्पर व्हावे असे सांगून पाचही भावांनी व सती द्रौपदीने आपल्या अंगावरील उंची वस्त्रे, आभुषणे, शस्त्रे वगैरे सर्व उतरवून वल्कलवस्त्रे धारण करून तपस्वीवेष धारण करून राजमहालात आले. सर्व प्रजेने तत्काळ उठून सर्वांना अभिवादन केले. धर्मराजाने राजप्रतिनिधींना निवेदन केले. सर्व प्रजाजन दु:ख सागरात बुडून गेले. कोणास काय बोलावे हेच सुचत नव्हते. अखेर धर्मराजाने सर्व प्रजाजनांना प्रणाम करून अखेरचा निरोप मागितला. तो म्हणाला, 'प्रेमळ सुहृद प्रजाजनहो आपण सर्वांनी खऱ्या हृदयापासून आमच्यावर निरागस प्रेम केलेले आहे.त्याचे उतराई आम्ही होऊ शकणार नाही. आता आपला राजा परिक्षीत आहे. तो आपल्या सर्वांच्या सुखदु:खाची चिंता वाहिल. त्याच्या आज्ञेत राहून तुम्ही सुखी व्हाल. आपापल्या कुलधर्माच्या आचरणाने शक्तीसंपन्न व्हा. तुम्हा सर्वांचे संरक्षण करण्यास तो समर्थ आहे त्याला तुम्ही तन, मन, धनाने सहाय्य करा. आमच्या हातून कांही अन्याय, आततायीपणा,निष्ठूरपणा वगैरे काही दोष घडला असल्यास क्षमा करा आणि आम्हास येथून जाण्याची परवानगी द्या असे म्हणून पाचही पांडव व सती द्रौपदी वनप्रस्थानास सिध्द होऊन जाऊ लागले. (श्लोक १०१८-१०३२)

पांडव द्रौपदीसह राजवाड्यातून बाहेर पडले. सर्व प्रजाजनांना अतोनात दु:ख झाले. सर्वांची हृदये गहीवरून आली अत्यंत कळकळीने सर्व नगरवासी त्यांना न जाण्याबद्दल विनवू लागले. नगरातील सारे लोक ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य, शूद्र, चारही वर्णाचे लोक, भाट, चारण, माळी, तांबोळी, तेली, कुंभार, लोणार, घांची, मोची, सुतार, विणकर, शिंपी, कसार, कुणबी, अय्यर गंधर्व, गढवी वगैरे अठरा वर्णाचे

लोक अपार शोक करू लागले व पांडवांना न जाण्याबद्दल विनवूं लागले. पांडवांच्या पाठोपाठ रडत दु:ख शोक करीत नगरातील लोक जाऊ लागले. गायी, कुत्रे, हत्ती, घोडे वगैरे प्राणीसुध्दां शोकाकुल होऊन तडफड करू लागले. त्यांच्या नयनातून एकसारखे अश्रुप्रवाह सुरु झाले. पिंजऱ्यातील पोपट, मैना, झाडावरील कोकिळा, चिमण्या, कबुतरे, मोर वगैरे पक्षी सुध्दां दु:खातिशयाने अश्रु ढाळीत गप्प बसले. नगरातील स्त्रीपुरुष वृध्द लहानमुले पांडवांना आडवे येऊन त्यांना न जाण्याकरिता अडवू लागले पण निर्धार केलेल्या पांडवांनी सर्वांना धीर देऊन सांत्वन करून समजावून बाजूला केले व आपला मार्ग आक्रमूं लागले. सर्वांच्या नेत्रातून एकसारख्या गंगायमुना वाहात होत्या. जयश्रीकृष्ण जय श्रीकृष्ण म्हणत म्हणत लोकांची वंदना स्विकारीत व सर्वांना नम्र भावाने अभिवादन करीत पांडव श्रीबुध्दाचे नामस्मरण करीत पुढे जात होते व श्रीजगदीश आपणा सर्वांचे रक्षण करील, त्याचे तुम्ही स्मरण करा असा उपदेश करीत धर्मराजा पुढे व त्याच्या पाठोपाठ चार भाऊ, सती द्रौपदी असे जाऊ लागले. सर्व प्रजाजनांनी धर्मराजास विनविले कीं हे स्वामीनाथ तुम्ही आम्हालासोडून जाऊ नका. जिथे आपण जाल तिथे आम्ही सुध्दां येऊ. तुमच्या सत्संगतीत वनात सुध्दां आम्ही राहू. आमचा त्याग करू नका असे म्हणून सर्व जण रडू लागले व वारंवार विनवू लागले. शेवटी एक योजनभर गेल्यानंतर धर्मराजाने मागे वळून आपल्या प्रेमळ प्रजेकडे करूणार्द्र दृष्टीने पाहिले. परिक्षीताला जवळ घेऊन त्याच्या मस्तकावरून हात फिरवीत धर्मराजा म्हणाला, 'बाळा परिक्षीता असा शोकाकुल होऊन धैर्य सोडू नकोस. प्रिय बाळा, आपल्या साऱ्या रयतेला मागे वळवून तू सुखाने, आनंदाने घरी जा. बाळा सदैव नीतिनियमांचे पालन करून प्रजेला आनंदात सुखात ठेव. धार्मिक सत्कृत्ये, दानधर्म, पूजाअर्चा, करीत जा सदैव सत्यमार्गाचे सत्पंथाचे अनुसरण कर. काळधर्मानुसार अथर्ववेदाचे तत्व परिशिलन कर. ''अयमात्मब्रह्म'' म्हणजे सर्व जीवप्राणिमात्रामध्ये एकमेव ब्रह्मतत्व, आत्मतत्व, चैतन्यरूपाने व्यापलेले आहे. या तत्वानुसार सर्वांशी आत्मयतेने वाग. आणि अशा आचरणाने शेवटी तू सुध्दां अविनाशी पुराणपुरुष अशा परब्रह्मात विलय पावशिल. जा बाळा मन घट्ट व स्थिर कर. प्रारब्ध कर्मानुसार प्राप्त झालेले भोग प्रत्येकालाच भोगावे लागतात. राजा असो वा रंक असो, स्वामी असो वा सेवक, स्त्री असो वा पुत्र. प्रत्येकाला पूर्व संचितानुसार कर्मभोग भोगून निवृत्त व्हायचे आहे. धर्ममर्यादाचे कधीही उल्लंघन करू नकोस. कलिकाळ तुला अडवू शकणार नाही. आपल्या स्वकर्तृत्व प्रयत्नाने आपल्या पूर्वजाप्रमाणे यश श्री आणि किर्तीच्या तेजाने तळपशील असा आमचा तुला आशिर्वाद आहे. आता विलंब

न करता या प्रेमळ प्रजेला परत घेऊन जा व गुण्यागोविंदाने सुखाने राहा.' असा आशिर्वाद देऊन पांडवांनी परिक्षीताला व सर्व प्रजाजनांना नगरात परत पाठविले. मोठ्या जड अंत:करणाने आपल्या शासनकर्त्या पितृतुल्य राजांचे, सद्भक्त पांडवांचे, भक्तिमतिसति द्रौपदी मातेचे गुणगान करीत, त्यांच्या जीवनातील अनेकानेक प्रसंगांचे स्मरण करीत करीत, माघारी फिरून पाहात पाहात सर्व प्रजा माघारी वळली. परिक्षीताला त्यांनी आता आपला श्रेष्ठतम केन्द्रबिंदु मानून त्याच्या व अन्य प्रजाजनांच्या हिताकरीता सर्वजण आपुलकीने व हिरीरीने झटून राज्यहित करू लागले. इकडे पांडव सर्व प्रजाजनांना मागे वळवून एकटेच पुढच्या मार्गाला लागले. परमेश्वराचे सतत चिंतन, अपार प्रेमाने त्याच्या लीलाचरित्राचे गुणगान करीत करीत ते आणखी एकदोन योजन पुढे गेले. (श्लोक १०३३-१०५५)

पांडव आता निर्धाराने व कायमचे वनवासात गेले. फिरून आतां त्यांचे दर्शन होणार नाही. म्हणून राजा, प्रजा सर्व अतिदु:खात होते. पशु-पक्षी सुध्दा आपल्या त्या अन्नदात्या, रक्षणकर्त्या, सर्वहितदक्ष राजांच्या विरहदु:खाने चारापाणी अन्न घेत नव्हते. चराचर सृष्टीला सद्भक्त पांडवांचा वियोग सहन होत नव्हता, वायु स्तब्ध होता, झाडे तटस्थ होती. आकाश मेघांनी व्यापून कुंद झाले होते. सूर्य दिसेनासा झाला होता. हत्ती, घोडे, गायी, श्वान वगैरे कोणीही चारापाण्याला तोंड सुध्दा लावत नव्हते. पिंजऱ्यातील पोपट-मैना, मुक्तकंठाने गाणारी कोकिळ, मोर वगैरे सर्व उदास होऊन बसले होते. पांडव ज्या मार्गाने गेले त्या दिशेकडे तोंड करून केविलवाण्या नजरेने जणूं त्यांचा शोध घेत होते. बालक स्तनपानसुध्दां करीत नव्हते. सर्वांच्या हृदयात एकच शोकदायी घटना घर करून राहीली. हस्तिनापूर शहरएवढे रहदारीने गजबजलेले पण आज सारे काही थंडावले होते. सर्व व्यवहार आटले होते. आपल्या देहाची पर्वा न करता योगसाधना करून मुक्त होण्याकरीता पांडव हिमालयात जात होते. इकडे कलियुगाला सुरुवात झाली होती. त्यामुळे सत् तत्व पांडवांच्या पाठोपाठ निघून जाऊ लागले आणि कलियुगाच्या असत्याचरणाला सुरुवात होऊ लागलेली होती. या कलियुगाच्या असत्याचरणाचे मुख्य स्थान म्हणजे जिव्हा आणि जननेंद्रिये होत. जीव्हा आणि जननेंद्रियांचा संयम ज्यांनी पाळला ते जीवात्मे हा भवसागर सहज सुलभतेने तरून जातात मनाच्या योगाने इंद्रिय संयमीत झाल्याशिवाय पापनिवृत्ति होत नाही. पापनिवृत्ती झाल्याशिवाय जीवात्मा शुध्द पवित्र होत नाही. पवित्र झाल्याशिवाय संतोष होत नाही. संतोष प्राप्त झाल्याशिवाय भाव उत्पन्न होत नाही. भाव दृढ झाल्याशिवाय भक्ति होत नाही. भक्तिची परमसीमा म्हणजेच मुक्ति, मुक्तिलाभ

म्हणजेच अमरत्व प्राप्ती होय. अमर झाल्याशिवाय कोणी देवपदाला जाऊ शकत नाही. देवपणा अंगी रुजल्याशिवाय अंनतत्वाचे दर्शन साक्षात्कार होत नाही. ज्याला आत्मतत्वाचे दर्शन घडले या जगात मानव जन्मात तो जीवात्मा धन्य होय. श्रीसद्गुरु महाराज ही अमरवाणी सद्भक्तांना उपदेशितात हे ऋषिवरांनो मुनिवरांनो तुम्ही एकाग्रतेने शांतचित्ताने श्रवण करा व त्यानुसार आपली जीवननौका या ज्ञानसागरात सद्गुरु नावाड्याच्या साहाय्याने पार घेऊन चला. हा कलिकाळ जसजसा पूर्ण होईल तसतसे मानवी आयुष्य घटत जाईल. स्त्री आपल्या पुरुषांच्या मर्यादा पाळणार नाहीत. माता आपल्या पुत्राशी झगडण्यास सिध्द होईल. माता पुत्राची व पुत्र मातेची हत्या करतील अशी कुळे कायमची दुःखसागरात पडतील. कशानेही त्यांचा उध्दार होणार नाही. पुत्र आपल्या पित्याला हुसकून लावतील अथवा जीवे मारतील. आकाशातून वृष्टी होईल पण जलहिन म्हणजे अत्यल्प, अनाठायी व अकाली होईल किंवा अतिवृष्टी होईल. जमिनीवर अग्नीचा वर्षाव अकल्पित रीतीने होईल. राजा बेईमानी, वचनभ्रष्ट होईल दिलेले वचन पाळणार नाही. सकाळी कांहीच नियम करील तर संध्याकाळ पर्यंत त्या नियमांचा भंग करील. नीतिनियम कायदे यांचे आपल्या फायद्यानुसार बदल करतील. वेळ काळ पाहून स्वार्थ साधण्याकरीतां जो तो धडपड करेल व स्वार्थाकरितां एकमेकांचे जीव हरण करणारे काळ बनतील. ईमान श्रध्दा, निष्ठा कोणी स्थिर राखणार नाही. काळचक्राप्रमाणे लोकांचे निष्ठाचक्र विपरीत फिरेल. कृतकर्मांचा लेखा कर्मभोग प्रत्येकाला भोगावा लागेल. एकेक अपराध शंभर शंभर वेळा तपासला व भोगविला जाईल. कलियुगाच्या अंतसमयी नीतिधर्म नियम अत्यंत अल्प प्रमाणात पाळले जातील. जे त्यांचे पालन करतील त्यांना अतोनात यातना सहन कराव्या लागतील आणि त्या यातनेमुळे कित्येक आपला नियमधर्मच सोडून देतील. सद्गुरु सांगतात पण हे ऋषिवर मुनिवर हो जो खरा सतपंथी असेल तो जीवनाची अनन्वीत कसोटी सहन करून ईमान श्रध्दा भक्ति निष्ठा कायम स्थिर राखून सत्य धर्माचेच पालन करील आणि मन ईच्छित मोक्ष फल प्राप्त करून घेईल.

या कलिची माया कशाप्रकारची अनर्थकारी आहे याविषयी पुराणांतरी सांगितले आहे की परिक्षीताला राज्य दिल्यावर त्याची व्यवस्था करण्यासाठी पांडवांना सात दिवस तेथे राहावे लागले. परंतु कलियुगास सुरुवात झालेली असल्यामुळे सर्व पदार्थ अपवित्र झालेले पाहून त्यांनी तेथे अन्नोदक मात्र घेतले नाही. तथापि कलियुगाचा थोडा तरी वारा त्यांना लागलाच. राज्याची व्यवस्था झाल्यावर क्षुधार्त होऊन ते

वनात चालू लागले असतां कलीने विचार केला कीं या पांडवांनी माझा अपमान केला आहे. त्यांनी माझा अवतार जो दुर्योधन त्याला सहपरिवार ठार करून त्याचे राज्य घेतले व आता मी स्पर्श करीन म्हणून उपवासव्रत स्विकारून तसेच चालले आहेत तरी यांचा सूड आता घेऊ असे म्हणून नदीच्या तीरावर त्याने एक मायावी मळा रचिला. तो पाहून धर्माला फार भूक लागलेली असल्यामुळे तो त्यात शिरला. तेथे चिबडे पुष्कळ होती. परंतु राखणवाला मात्र तेथे कोणी दिसेना. तेव्हा ही फळे फुकट कशी घ्यावीत. असा विचार करून धर्माने आपली सोन्याची अंगठी तेथे ठेवून त्यांतील सहा चिबडे तोडून घेतली. इतक्यात कलि म्हाताऱ्या माळणीच्या रूपाने तेथे आला व फळे तोडलेली पाहून तिने मोठा आकान्त सुरु केला. तेव्हा धर्म तिला म्हणाला, 'बाई माळणी, आम्ही कोणाची वस्तू द्रव्य दिल्याशिवाय घेत नसतो. या फळाचे मोल म्हणून ती पहा तेथे अंगठी ठेविली आहे ती घे. हे ऐकून कलीने अधिकच आकान्त केला तो म्हणाला, 'तू धर्म खरा नव्हेस. तू माझ्या बाळांचा वध केलास.' हे ऐकून धर्म झोळीत पाहू लागला तो तीत मुलांची कापलेली शिरे दिसली. ते पाहून त्याने जमिनीवर अंग टाकले इतक्यात हा आरडाओरडा ऐकून भीम व अर्जुन तेथे आले तो 'याने माझ्या बाळांना मारले असे म्हणून माळीण अधिक ओरडू लागली. भीमाने विचार करून पाहिले तो ही खरी माळणी नसून कलि आहे असे त्याला समजले मग त्याने चार तडाखे देऊन तिला उभी केल्यावर कलीने माळणीचे रूप टाकून आपले खरे रूप धरले. इतक्यात तेथील मळा वगैरे सर्व नाहिसे झाले नंतर कलि धर्माच्या पाया पडू लागला. धर्म म्हणाला, आज आपण फळे खाल्ली नाहीत त्यामुळे मोठाच अनर्थ टळला. असे म्हणून कलीला जावयास आज्ञा देऊन पांडव पुढे चालू लागले. (श्लोक १०५६-१०७७)

एक दोन योजन आणखी पुढे चालत गेल्यानंतर धर्मराजाने एक सुरम्य जागा पाहून क्षणिक विश्रांतीसाठी एका शिळेवर जाऊन बसला. बाकीच्या भावांनी सुध्दां त्याचेच अनुसरण करून त्याच्यासमोर जाऊन बसले. सती द्रौपदी सुध्दां त्यांच्याजवळच पण थोडी आड बाजूस जाऊन बसली. धर्मराजाच्या मुखावर कृतकर्माची प्रसन्नता होती. तो आपल्या भावांना व द्रौपदीला म्हणाला, 'हे कृतनिश्चयी बंधुनो, प्रेममूर्ति द्रौपदी, तुम्हा सर्वांना मी एक अत्यंत महत्वाची आणि पुढे सदैव आपले कल्याण करणारी गोष्ट सांगतो. ती तुम्ही निर्धाराने श्रवण करा. आता आपल्याला अत्यंत बिकट अशा अरण्यातून क्रूर, हिंस्त्र, श्वापदांच्या वस्तीतून, खाचखडगे, दऱ्या टेकड्या,

काटेरी वृक्ष, टोकदारदगड, दलदलीच्या जागा पार करून नदीनाले ओलांडून थेटहिमालयात जायचे आहे. गावे शहरे लोकवस्त्या चुकवून निर्जन भागातून प्रवास करून शेवटी हिमालयातून बर्फाच्छादित प्रदेशातून हिमशिखरे, हिमनद्या, हिमवृष्टी मधून चालत जाऊन आपले ध्येय गाठायचे आहे. तेथे विघ्नांचा तोटा नाही. अपार अगणित संकटांना दु:खाना तोंड द्यावे लागेल. रस्त्याने चालतांना कोणत्याही प्रकारचे असत्याचरण आपल्या हातून घडता कामा नये. कोणतेही कर्म करतांना हंस क्षीर न्यायाने वागून युक्त कर्माचे आचरण करावे. कृतकर्माची लाई उतरवून म्हणजे मागच्या सर्व कर्म बंधातून मुक्त होऊन आपण घरातून निघालो आहोत. आता नविन कर्मबंधाच्या फेऱ्यात पडू नये. सर्वांनी मौन व्रत धारण करून चालावे, हृदयात धैर्य आणि परमेश्वराचे नामस्मरण धारण करावे. माया, ममत्व, अहंकार मी पणाचा गर्व सर्व सोडून द्यावा. केवळ एकमेव भगवंताचे ध्यान स्मरण करावे. जगतातील मिथ्या वस्तूमात्रावर प्रेम न करता त्या भगवंतावर फक्त जीवापाड प्रेम करा. काम, क्रोध, मोह, मत्सर यांचा मनापासून त्याग करा. आपले मन या विकारांनी व्यापणार नाही याचीअंत:करणापासून काळजी घ्या. सर्वांनी सुख ऐषआराम, षडरसभोजन, मिष्ठान्न आणि उंची किंमती रेशमी वस्त्रांचा त्याग करावा. त्यांची आशा इच्छा कामना सुध्दां करू नये. आणि मी या साऱ्या गोष्टींचा त्याग केला असा अभिमान सुध्दां बाळगू नये. अशारीतीने बांधवांनो आपण सर्वजण वागल्यास प्रत्यक्ष भगवंताची आपणास प्राप्ती होईल. आईबाप, बहिणभाऊ, पत्निपति, पुत्रकन्या वगैरे हा सर्व परिवार संसार आता मागे टाकावा आपण घरसंसार, महाल, राज्यसिंहासन वगैरे सर्वांचा यथायोग्य यथाकाल उपभोग घेतला आता त्याची आसक्ति मनापासून सोडून द्यायला हवी. जी सुखे उपभोगली ती सुध्दां नाशवंत आणि जी दु:खे भोगली ती सुध्दां नाशिवंतच आहेत. आज आपणास त्या सुखदु:खाचा काय उपयोग आहे. ते सर्व व्यर्थच होत. कुटुंब परिवार संसार वगैरे सर्व व्यवहार असत्य स्वप्नतुल्य व्यर्थ आहे. ऋणानुबंधांच्या योगाने बांधला गेलेल्या या संसारबंधात कोणी ऋण घेण्यासाठी तर कोणी ऋण देण्यासाठी येत असतात. कोणी या संसारात हरला जातो तर कोणी जिंकतो या संसारात येऊन कोणी आत्मज्ञान संपादितो तो संसार मिथ्याकरून निघून जातो. कोणी संसारालाच सत्य मानून आत्मज्ञानापासून वंचित राहतो. तो मिथ्या माया मोहात बध्द होऊन संसार तीरच गाठतो. म्हणून माझ्या सुहृद प्रेमळ बंधुनो आपण या मिथ्यामायेचा व्यवहार समजावून घेऊन, तिचा त्याग करून आत्मलाभासाठी खडतर कसोटी सहन करण्यास सिध्ध झाले पाहिजे. ज्या योगाभ्यासाने आपणास आपल्या इच्छित स्थळी मुक्तिपदाला जाता येईल. त्याच

मार्गाचा आपण आता निश्चय आणि निर्धार करून प्रयत्न करू या. भगवान श्रीकृष्णांनी आपणास पूर्वीच या कर्मफलत्याग योगमार्गाचा उपदेश देऊन मोक्षरूप पुरुषार्थ संपादण्यास सांगितले. हे मोक्षपद प्राप्त करणे अति खडतर आहे पण एकदाचे यामार्गाचे अनुसरण केले म्हणजे निर्धाराने पुढे गेले पाहिजे. परमेश्वर आपणा सर्वांना ते बळ देवो हीच त्याच्याचरणी नम्र प्रार्थना. ( श्लोक १०७८-१०९४ )

वस्तुस्थितीची जाणीव भावांना आणि पत्नीला देऊन धर्मराजा स्तब्ध झाला. आपल्या वडिलधाऱ्या भ्रात्याची वाणी ऐकून सर्वजण सद्‌गदीत झाले. सर्वांची हृदये ईश्वरी प्रेमाने गहिवरून आली. ईश्वर नामाचे स्मरण करीत करीत ते पुढे जाऊ लागले. पुढे पाचही जण आणि त्यांच्या मागून सती द्रौपदी असे ते सहाही जण निर्मल, निरिच्छ, निरामय बुध्दिने चालू लागले. कोणीही काहीही न बोलता केवळ भगवंताचे स्मरण करीत चालू लागले. मार्गाने चालतांना जेथे नदी जलाशये, तीर्थस्थाने येत तेथे स्नान,- संध्या तर्पण करीत. ईष्ट देवदेवतांचे पूजन अर्चन करून वनफळांचा नैवेद्य अर्पण करून फलोपहार करीत. जेथे फळ उपलब्ध नसेत तेथे कंदमुळे अथवा केवळ जलपान करूनच उदरनिर्वाह करीत. अशाप्रकारे मुक्काम दर मुक्काम करीत बरेच दिवस चालत जाऊन ते हिमालयाच्या नजिक पोहोचले. घनदाट अरण्यातून दुर्धर वाट चढून पर्वत शिखरे ओलांडून नदी नाले पार करीत करीत ते गंगातीरावार जाऊन पोहोचले. गंगादर्शन होताच सर्वांना फार आनंद झाला. सर्वांनी स्नान वगैरे करून पूर्वजांच्या, भाऊबंदाच्या, मृतात्म्यांच्या नांवाने पींडदान श्राध्द कर्म केले. भगवान श्रीकृष्ण व बुध्द यांचे स्मरण होऊन त्यांना प्रेमभाव दाटून आला. त्यांच्या अवतारलीलांचे स्मरण करीत करीत ते अत्यंत गहीवरून आले. गंगातीरावर असलेल्या भद्रेश्वर - शंभु - महादेवाच्या प्रसादलिंगाचे भक्तिभावाने कुंकुमचंदन, धूप यांनी पूजन केले. विविध प्रकारच्या कमलपुष्पांनी अर्चना केली. भक्तिभावाने नमस्कार करून त्यांनी निरीच्छ भावाने पूजा केली व क्षणभर तेथील शिवालयात विश्रांती घेतली. (-श्लोक १०९५-११०७ )

धर्मराजा म्हणाला बा अर्जुना, हे भीमसेना, माद्रीनंदन नकुळ सहदेवा, हे सती पांचाळी तुम्ही माझी एक हिताची गोष्ट ऐका. तुम्ही सर्वजण अतिशय धीरवीर बलवान आहांत, शूर पराक्रमी आहांत, पण हा हिमालय जो आपल्यापुढे उत्तुंग अपार आणि दुर्धर आहे. तो अति थंडी, शितवायु, घनदाट अरण्ये, हिंस्त्रपशु, निशाचर, ब्रह्मराक्षस, संमंध, अतिशय बलवान सामर्थ्यशाली असूर दैत्यांनी व्यापलेला आहे. पदोपदी आपल्यावर

विपत्ति आपत्ति येण्याचा संभव आहे. वाघ, सिंह, राक्षस, क्रूर, वनचर गाढवे, रानटी मृगे, रेडे, बाजससाणा, गिधाड वगैरे क्रूर पक्षी यांचा तर सर्वत्र सुळसुळाट आहे. दिसताबरोबर प्राण घेणारे अशी ती श्वापदे आहेत त्यांच्यापासून वाचणे फार दुर्घट आहे. म्हणून तुम्ही सारे जण या सुंदर शिवालयात आनंदाने सुखोपभोगात राहा. काळ येईपर्यंत तुम्ही माझ्याबरोबर येऊन विनाकारण रखडू नका.' धर्मराजाचे भाषण ऐकून भीम म्हणाला, 'अहो महाराज धर्मराज, भोगविलासाचे सुख भोगायचे असते आम्हाला तर एवढे राज्य सोडून का आलो असतो आम्ही! क्रूर, श्वापद, राक्षसांची भीती आम्हाला दाखविता ती संकटे आपणास प्राप्त होणार नाहीत कां? आम्ही धीर वीर, सामर्थ्यवान आहोत त्याची चिंता तुम्ही करू नका. पदोपदी संकटे आली तरी ती आम्ही निवारण करूं. तुमचे हे चरण सोडून अन्य दुसरीकडे आम्हास कां ढकलीत आहांत. जीथे आपले चरण जातील तिथे आम्ही येऊ. हा आमचा निर्धार आहे. संकटाने आम्ही खचणार नाही किंवा तुम्हाला खचविणार नाही. म्हणून तुम्ही आम्हाला वारंवार ही विपरीत गोष्ट सांगू नका.' धर्मराजा म्हणाला, 'भीमा अरे तुमच्या धीरविरत्व पराक्रमावर का माझा भरवसा नाही? बंधुंनो माझी पूर्ण खात्री आहे आपण कोणत्याही संकटातून मुक्त होऊ शकू पण माझी चिंता फार वेगळी आहे. संकटातून मुक्त होण्यास तुम्ही पराक्रम कराल पण त्यायोगे वृथा जीवहानी होईल. विनाकारण आपल्या रक्षणाकरितां श्वापदे राक्षसादि जीव प्राणिमात्र मारले जातील. ह्या हिंसेचे पातक आणखी आपल्या शिरवार चढेल. ज्या पातकाच्या निवृत्तीकरिता आपणास येथे येणे प्राप्त झाले त्यात आणखी ही नविन भर पडेल. व आपला कर्मभोग अधिकाधिक वाढत जाईल. आपल्या या जपतपादि योगसाधनेचा कांहीही उपयोग होणार नाही. म्हणून तुम्हा सर्वांना माझे हे निवेदन आहे की तुम्हाला जर माझेच बरोबर यायचे असेल तर काम आणि क्रोध आग्नि मोह हे सोडायला पाहिजे. क्रोध हा असा महान शत्रु आहे की तो जप, तप, धर्म, व्रत, नियम वगैरे सर्वांवर पाणी फिरवितो. बंधुप्रेमात विरोध घडवून आणतो, म्हणून बंधूंनो तसा प्रसंग आल्यास, कोणी त्या विकारांच्या आहारी गेल्यास होणाऱ्या अनर्थास पारावर राहणार नाही. यासाठी माझ्या सोबतच यायचे असेल तर काम क्रोध आणि मोह हे विकार सोडण्याचा निर्धार करा. प्रतिज्ञा करा. कोणताही दुर्धर प्रसंग आला तरी मागे फिरायचे नाही हा निश्चय करा.' (श्लोक ११०८-१११९)

नियम धारण करून व पक्का निश्चय करून पांडव पुढे चालू लागले. अरण्यातून नदीतीराने जाता जाता ते हरिद्वारला येऊन पाहोचले. हरिद्वारच्या पूर्व बाजूस गंगातीरावर ऋषिमुनीच्या वास्तव्य भूमीवर आल्यावर ते थोडावेळ थांबले. तेथील पंच सरोवर कुंडात स्नान संध्या पूर्वज तर्पण वगैरे केल्यावर श्रीहरीची हरेश्वराची पूजाअर्चा केली. नंतर ते सहाही जण तेथून निघून पूर्व व उत्तरेकडे चालू लागले. ऋषीकेशच्या मार्गाला लागून ते थोडे पुढे म्हणजे सात योजन चालून आल्यावर त्यांना हिमालयाच्या उंचच उंच रांगा दिसल्या. सुवर्णाप्रमाणे व चांदीप्रमाणे चकाकणाऱ्या त्या माळा पाहून त्यांच्या मनाला फार आनंद झाला. हळू हळू ते उत्साहाने एकेक शिखर चढू लागले. तो काय आश्चर्य! वर चढून गेल्यावर त्यांना सुंदर वनश्रीने युक्त असे दहा योजन लांब पांच योजन रूंद असे पठार लागले. तेथे गणगंधर्वांची वस्ती असून ते सदैव नृत्य गायन करीत, टाळ, वीणा, शंख, भेरी वगैरे वाद्यांचा ध्वनी करीत तान आलापाने रागरागिणीचे सुस्वर गायन करीत असलेले दिसले. ते अत्यंत रमणीय स्थान पाहून व तो दिव्यनाद ऐकून पांडव हरकीत झाले. तेथील वृक्ष सदैव पान, फुल, फळ मोहोराने सदैव डवरलेले, त्यांचा सुगंध घ्राणेन्द्रियाला धुंद करणारा, जवळच गंगेचा सतत खळाळणारा जलप्रवाह मधून मधून त्याला मिळणारे लहान मोठ्या झऱ्यांचा मंजूळ मधुर झुळझुळ असा ध्वनी कर्णेन्द्रियाला तृप्त करीत होता. ते स्वर्गीय निसर्गसौंदर्य नयनांना उत्तेजीत करीत होते. अशा त्या स्वर्गीय वातावरणात स्नानध्यान करून निर्भयतेने आनंदाने विचरत असताच त्यांच्यासमोर एक संकट उभे राहिले. त्यांच्या धीरवीरत्वाची कसोटी पाहण्याचा प्रसंग उपस्थित झाला. (श्लोक ११२०-११३१)

त्या अप्सरांचे लावण्य पाहून पांडव दिङ्मूढ झाले. आश्चर्यचकित होऊन किंकर्तव्यमूढ झालेले पांडव मनोमन भगवंताची आराधना करून या संकटातून पार पाडण्याबद्दल विनवू लागले. त्या सर्व अप्सरा षोडशवर्षीय अतिशय सुंदर आणि सुकुमार कन्या होत्या. कित्त्येकजणी वाद्य वाजवीत होत्या, कित्त्येक गायन करीत होत्या तर कित्त्येक नृत्यकरीत होत्या. त्यांनी निरनिराळ्या रंगाचे तऱ्हे तऱ्हेची वस्त्रे परिधान केली होती. कंचुक्या, रंगीबेरंगी, नवरंगी धारण केलेले होते. कपाळावर कस्तूरी चंदन कुंकवाचे टिळे लाविले असून भांगात गुलाल भरलेला, केसांचा सुंदर अंबाडा बांधलेला, सुगंधी पुष्पांनी विभुषीत केलेली वेषभूषा केशरचना यांनी त्यांच्या सौदर्यांत अधिक भर घातलेली होती. अशाप्रकारे सर्वतऱ्हेच्या साजशृंगाराने नटलेल्या त्या युवती निरनिराळे हावभाव करून आपले उदर, उरोज, मुख दाखवून पांडवांना भुलवू लागल्या. त्यांच्यासमोर

नृत्यगायन राग तान आलाप गाऊन हावभाव करून नमस्कार करण्याच्या उदेश्याने पांडवांना स्पर्श करू लागल्या. ते पाहून पांडव त्राही त्राही करून भगवंताची आर्ततेने लज्जा रक्षणार्थ प्रार्थना करू लागले. इकडे अप्सरांच्या नाचणेबागडणे, तिरप्या नजरेने पाहणे, हसणे, विनोदी बोलणे, थट्टामस्करी करणे, अंग मोडून आळस देणे, एकमेकांना कवटाळून आलिंगन देणे, वस्त्र उतरून अंग प्रत्यांग दाखविणे वगैरे कामोत्तेजक क्रिडा चालल्या होत्या. ते पाहून पांडव अत्यंत चिंताक्रान्त झाले, मनोमन भगवंताची आराधना करून म्हणाले, हे भगवंता काय तू हे दुर्धरविघ्न आमच्यासमोर उपस्थित केले आता आणखी कोणता उत्पात ओढवतो. कोणास ठाऊक! वाटत होते आम्हास की आपणास निर्विघ्नपणे वैकुंठास जाता येईल पण काय आमचे हे दुर्दैव! अजून हे दुर्भाग्य आमचा पिच्छा सोडीत नाही. असे म्हणून धर्म राजा दोन्ही हातांनी आपले मस्तक बडवू लागले पाच जणांनी आपल्या हातांनी तोंडे झाकून घेतली सती द्रौपदी ह्या विघ्नाची भीषणता जाणून अत्यंत दु:खीत होऊन आर्ततेने भगवंताची प्रार्थना करू लागली. इतक्यात त्या अप्सरा पुढे येऊन पांडवांना म्हणाल्या, 'अहो, प्राणनाथ अहो स्वामी, आमचे भाग्य केवढे थोर की आपण पाचही जण इथे चालत आलेला आहात. त्या जगदीश्वराने आमच्यावर ही केवढी मोठी कृपा केलेली आहे. अनंतजन्मांचे पुण्य आज आमचे सफळ झाले. घरबसल्या सुंदर वर भगवंताने आमच्याकरितां पाठविले म्हणून तुम्ही आमच्या सेवेचा स्विकार करून आमची लाज राखा. आपण आमचे आतिथ्य अंगिकारून कृपा करा.' अप्सरांचे ते लाडिक हावभाव, कामूक चलिंत्र पाहून पांडव अधिकच चिंतातूर झाले. काही अप्सरा धिटाईने पुढे होऊन पांडव वारत असताही आपल्या हातातील रानवेलींनी गुंफलेल्या माळा, सुगंधी फुले, वगैरे लावलेल्या सुंदर पंख्यांनी वारा घालू लागल्या. पांडवांना मोहिनी घालण्यासाठी त्यांना धुंद व कामुक बनविण्यासाठी निरनिराळ्या फुलापासून तयार केलेले सुवासिक तेले अत्तरे वगैरे लावण्यास पुढे झाल्या. कित्त्येक टाळ्या वाजवून त्यांचे लक्ष्य आपल्याकडे वेधु लागल्या. हसून बोलून नयनबाण सोडून आपले प्रेमव्यक्त करू लागल्या. कित्त्येक चुवाचंदन, उटी लावण्याकरीता पुढे सरसावल्या. चरणावर चरण ठेवून पाय उचकवून त्यांना पुष्पहार घालण्यास सिध्द झाल्या. कुंकू, गुलाल, सिंधूर, यांचे लेपन करण्यास पुढे आल्या. कित्त्येकांनी माणिक मोत्यांचे हार ताटात घालून, अगर धूप कापूर आणून त्यांच्या आरत्या उतारण्यास सिध्द झाल्या. कित्त्येकांनी त्यांनाबसण्यासाठी सुखासने आणली. पाय धुण्यास जलपात्रे आणली. अशाप्रकारे निरनिराळ्या सेवोपचारांनी त्यांना संतुष्ट करण्यास त्या सर्वजणी सिध्द झाल्या. त्यांचे रूप, सौंदर्य, लावण्य अलौकिक होते. बत्तीस लक्षणांनी युक्त अशा त्या सौंदर्यखाणी होत्या. त्याच्याकडून होतील

तेवढे हावभाव करून पांडवांना रिझविण्याचा त्या प्रयत्न करीत होत्या. पण त्या त्यांच्या हावभावांनी नटण्यामुरडण्याने पांडव भुलणारे नव्हते. काम विकारावर ज्यांनी विजय मिळविला आहे, इंद्रियसंयमन ज्यांचे दृढ आहे.त्यांच्यापुढे प्रत्यक्ष रति जरी उभी राहिली तरी ते ढळू शकत नाहीत. पांडव आपल्या मार्गावर दृढ स्थिर होते. अप्सरांच्या कोणत्याच कृत्याला ते भाळले नव्हते. शेवटी अप्सरा म्हणाल्या हे दिनानाथ आम्ही अबला आहोत. आमच्यावर कृपा करा. आमच्या मंदीरात चला आणि आमच्या आतिथ्याचा स्विकार करून आम्हाला कृतकृत्य करा. आम्ही मनाने वाचेने कर्माने तुम्हाला वरलेले आहे. आपणास सोडून आम्ही कोठेही जाणार नाही. आपणही आम्हाला सोडून त्यागून जाऊ नका. आमच्या इच्छा कामना पूर्ण करा. आम्हाला व्यर्थ जाळू नका. आमच्या सेवेचा स्विकार करा. (श्लोक ११३२-११४६)

धर्मराजा आणि चारही भाऊ म्हणाले, 'हे सुंदरींनो, तुम्ही विनाकारण आमचा मार्ग अडवू नका. कांही अन्य काम असल्यास आमच्याकडून साह्य होण्यासारखे असल्यास अवश्य करूं पण तुम्ही केवळ मायीक प्रापंचिक विचाराने प्रवृत्त झाला असाल तर आमच्यापासून दूर व्हा. आमच्या वाटेला सुध्दां येऊ नका, आम्ही तुमच्या मंदिरात येणार नाही, स्नान ध्यान, संध्यापूजा, जपतप हे सारे धुळीला मिळविण्यासाठी का तुम्ही आम्हाला मोहात टाकीत आहांत. ही तुमची प्रीति केवळ फसवी नटवी आहे. आम्ही सर्व प्रकारचे राजवैभव, सुखोपभोग, ऐहिक सुखसिध्दी सोडून आज या बनात जे आलेलो आहोत ते या अशा फसव्या मिथ्या नाशिवंत मायेवर प्रेम करण्यासाठी काय? अशी तुमची समज असेल व तुमचा तसा दांडगा विश्वास असेल तर तो मिथ्या आहे, ते सर्व सोडून द्या. परस्त्रीशी एक क्षणभर सुध्दां प्रेमाच्या गोष्टी करूं नये, त्यांच्याजवळ क्षणभर सुध्दां उभे राहू नये. त्यांचा मायावी पाश महाभयंकर असतो, वैकुंठपदापासून ढळविणारा आणि लोकामध्ये दुष्कीर्तिचा व्याप करणारा असा परस्त्रियांचा संग असतो. परस्त्री ही विषाची वेल असते. साध्या वेली सुध्दां वृक्षाला जखडून टाकतात मग या विषारी वेली तर त्याला जीवेच मारतील यात शंका ती कसली. परस्त्रीच्या संसर्गाने संपूर्ण पुण्य क्षय होते एवढेच नव्हेतर मागील सात जन्मात केलेल्या सत्कृत्यांचा सुध्दा नाश होतो, असे शास्त्रवचन आहे शास्त्रपुराणात अशी कित्येक ऋषीमुनि महात्म्यांची चरित्रे सांगितलेली आहेत. की जे परस्त्री संगतीत रमले त्यांच्या साऱ्या पुण्याचा क्षय झाला, स्नान ध्यान तपश्चर्या व्रत पूजा नियम धर्म कीतीही जरी पाळले तरी केवळ एक क्षणभराच्या परस्त्री संगाने त्या सर्वांचे पुण्यफल नष्ट भ्रष्ट होते व तो जीवात्मा नरकयातना भोगतो.

म्हणून हे देवांगनांनो तुम्ही आमचा मार्ग सोडा आम्हाला पुढे जाउ द्या अडवुं नका. असे म्हणून पाचही जण व सहावी द्रौपदी पुढे जाऊ लागले. अप्सरांचा विरस झाला त्यांच्या रोमरोमी काम व्यापला होता. मोहांध होऊन त्या पुढे झाल्या व त्यांनी धर्मराजाला आलिंगन दिले. धर्मराजा हात जोडुन अप्सरांना म्हणाला, 'हे मातांनो तुम्ही आम्हाला माता कुंतीप्रमाणे पूज्य आहात आम्ही तुमची मूल आहोत मातांनी आपल्या मुलांशी असे गैरवर्तन करू नये धर्मराज्याच्या मुखातून हे शब्द निघताच लाजेने शरमेने चुर झालेल्या त्या अप्सरा निराश होऊन परतल्या व पांडवांना धन्यवाद देऊन आपापल्या स्थानी निघुन गेल्या पांडव आपल्या मार्गाने पुढे चालु लागले. ज्याचे मन पवित्र निर्मल आहे त्याचेच आचरण शुध्द असते तो सुलभतेने भवसागर तरून जातो. अप्सरानी पांडवांना चळविण्याचा-ढळविण्याचा बराचसा खोटा उपाय करून पाहिला पण ते आपल्या दृढनिश्चयापासुन मुळीसुध्दां ढळले नाही निर्धाराने पांडवांचे (सत्‌तत्व) याठीकाणी प्रगट झाले. त्यांच्या सत्वाची परिक्षा घेतली गेली पण त्या सत्वपरिक्षेत पांडव अढळ निर्धाराने तेजाळून निघाले. सत्यधर्माच्या पालनाचे बळ त्याच्या जवळ असल्याने वाटेत जरी विध्न उपस्थित झाले तरी त्यांच्या रक्षणकर्ता, साहाय्यकर्ता भगवान यदुनाथ श्रीकृष्ण त्यांचा पाठीराखा होता. सदैव ते त्याच्याच भक्तीत तल्लीन राहून पुढे जात होते. (श्लोक ११४७-११५७)

शस्त्रास्त्रांचा त्याग केलेले सर्वभाऊ व सहावी द्रौपदी सती अतीशय दृढतेने ईश्वरप्राप्तीच्या दिव्य प्रेमभावाने पुढिल मार्ग चालू लागले. अतिशय आनंदाने उत्साह भरीत अंत:करणाने पुढे जाताच अत्यंत शित वायुने त्यांना तडाखे द्यायला सुरवात केली. निमुटपणे ते अति थंडिच्या सोसाट्याच्या वाऱ्याचा मार सहन करीत करीत व अनंत संकटांना तोंड देत देत ते पुढे जाऊ लागले. एके काळचे राजपुरूष राज्यसुखाच्या वैभवाचा-अश्व, गज, रथ, लक्ष्मी, अधिकार वगैरे सर्वांचा त्याग करून मुक्तिलाभार्थ एकटे वनात अनंत कष्ट सहन करीत पायदळ चालत होते. पण कोणत्याही प्रकारचा विषाद अंत:करणात न ठेवता सर्वांची अंत:करणे प्रभुच्या प्रेमाने केवळ संपृप्त झालेली होती. बारा योजन चालून गेल्यावर त्यांना अपशकून होऊ लागले. सोसाट्याच्या थंडगार वाऱ्याने तर गारठले होतेच पण त्याबरोबर उडणाऱ्या धुळीने डोळे भरले, डोळे चोळून चोळून लाल झाले. राजा धर्माचा डावा डोळा फडफडू लागला. आता भावी अनामिक संकटाने राजाच्या हृदयात धडधड सुरु झाली. समोरून कुत्रे जोरजोराने भुंकून रडू लागले. कोल्हे इकडून तिकडे पळत जाऊन रडू ओरडू लागले. हरणे आडवी येऊन खाली खोल दऱ्यात उतरू लागले. राजाचे डावे अंग थरथरू लागले. आकाश वादळाने भुरकटले या दुश्चिन्हांनी राजाचे मन हादरले. मोठे भयानक संकट

ओढवण्याची ही सुचनाच होती. कोरड्या शुष्क लाकडावर बसून कावळे, गिधाडे भयानक कर्कश शब्द काढून ओरडू लागले. रोड झालेले कोल्हे लांडगे उजवीकडून जाऊ लागले. रानमांजरे आडवे येऊन भटकू लागले. दिवस असूनसुध्दां आकाशातून तारे निखडून उत्कापात होऊ लागले. हे सारे उत्पात बघून सर्वांची हृदये हादरली गेली. सहाही जण चिंतातूर झाले पण एकही मौनव्रताचा भंग न करता पुढे जात होते तोच एक चित्ता त्यांच्या बाजूने पळत आला.त्याचा मार्ग चुकवू लागले. तोपर्वताच्या टेकडीप्रमाणे वेटोळे केलेला एक महाभयंकर परोड दुसऱ्या बाजूने बसलेला दिसला. हे सारे अपशकून भयंकर संकटाची जाणिव करवून देणारे होते. सर्वजण अत्यंत कळकळीने भगवान गरूडध्वज नारायणाची आराधना करून येणाऱ्या संकटाला धैर्याने तोंड देण्यास साहाय्य करण्याची प्रार्थना करीत होते. त्या पर्वतात एक मोठे मेघपूर नावाचे नगर वसलेले होते. मेघनाद नावाचा असूर राजा तेथे राज्य करीत होता. बऱ्याच मोठ्या संख्येने दैत्य त्याठिकाणी राहात होते. मेघनादाच्या पदरी भयंकर अक्राळविक्राळ असे सेनापति होते. त्यांचे सैन्यदळ सुध्दां तसेच भयानक व अतिशय मोठे होते. एकेका सैनिकाकडे उंट,गाढवे, कुत्रे आणि कोल्हे वगैरे अगणित पशुधन होते. प्रत्येकाजवळ गदा, भाले, त्रिशुळ, तोमर वगैरे शस्त्र असून अपार अशी जीवहिंसा ते करीत.त्यांचा आहार म्हणजे मनुष्य, पक्षी, अजगर, गाढव, वाघ, कोल्हे, चित्ते, वानरे, ससे वगैरे जे प्राणि मिळतील त्यांची शिकार करून त्यावर निर्वाह करायचा. अशाप्रकारचे ते पापी दैत्य त्या मेघपूर नगरात राहत होते. चार योजन विस्तीर्ण असे ते नगर चारही बाजूंच्या पर्वत श्रेणीच्या कोटात बसलेले होते तेथील घरे अतिशय भव्य उंच व दगडांनी बांधलेली होती. अतिशय सुरक्षीत जागेत सुरक्षित रीतीने बसलेल्या त्या मेघपूर नावाच्या पापी नगराचा राजा मेघनाद सुखाने राज्यकारभार करीत होता. त्या नगराच्या शेजारून पांचही जण पांडव सती द्रौपदीसह जात होते. नुकत्याच घडलेल्या अपशकुनामुळे अजून त्यांची अंत:करणे धडधडत होती. आपल्यापुढे कांहीतरी भयानक संकट कोसळेल याची त्यांना जाणिव झाली होती पण निश्चित स्वरूपाने काय घडेल हे समजत नव्हते. पण प्राप्त परिस्थितीस धैर्याने तोंड देण्यास सिध्द असावे म्हणून ते बळ मिळविण्यासाठी अत्यंत करूणार्द्रतेने भगवंताची आराधना करीत होते. (श्लोक ११५८-११७१)

पांडव द्रौपदीसह मेघपूर नगराजवळून जात असता इकडे नगरात एक घटना घडली. नारदऋषी राक्षस मेघनादाच्या राजमंदीरात आले. मेघनादाने निरखून पाहून हे नारदमुनीच आहेत असे जाणून सभेमध्ये उठून उभे राहीले. संर्वांनी उठून त्यांना

अभिवादन केले मान सन्मानाने त्यांना आसन दिले. नारदऋषींचे चरण प्रक्षालन करून चरणोदक मस्तकी धारण केले. षोडशोपचारे पूजाअर्चा करून मेघनाद हात जोडून म्हणाला, 'ऋषीराज अहोभाग्य आमचे की आपले चरण आमच्या राजमंदीरात लागले आम्ही परमकृतार्थ झालो. अनंतजन्मांचे पुण्य आज उदयास आले, आम्हाला पावण करण्यासाठीच आपले आगमन झालेले आहे याची आम्हाला पुर्ण खात्री आहे. तर या दासास काही हिताच्या दोन गोष्टी सांगून उपकृत करावे. आपण त्रिभुवनात संचार करणारे आहांत, कांही भलीबुरी वार्ता असल्यास सांगण्याची कृपा करावी. आता निश्चित आपणास काहीतरी ऐकावयास मिळेल म्हणून सर्वराक्षस सभा तटस्थ होऊन नारदमुनीकडे एकटक पाहु लागले. नारदमुनी आपल्या धीरगंभीर वाणीने म्हणाले, 'राजा मेघनादा तुझ्या शौर्यवीर्य धैर्याचे काय वर्णन करावे, अत्यंत बलवान पराक्रमी असे हे तुझे सभासद मोठे बलशाली रणवीर आहेत. असे साहाय्यकर्ते तुला मिळाल्याने तू सुखी आणि धन्य झाला आहेस. स्वत: तुही काही कमी पराक्रमी नाहीस. अत्यंत शुध्द बुध्दिने तुझ्या हिताची पराक्रमाची व यशोदायी गोष्ट तुला मी सांगतो ती तू श्रवण कर. सुखदानव हा तुझा मामा पूर्वी या वनात आनंदाने राज्य करीत असता अर्जुन नावाच्या हस्तिनापुरच्या राजाने त्याला विनाकारण युध्द करून मारले हे तुला माहित नाही कां ? मेघनाद म्हणाला हो तर मला पूर्ण समजते त्या अर्जुनाने भयंकर युध्द करून माझ्या मामाला मारले होते. काय त्या अर्जुनाचा पराक्रम वर्णन करावा तो एकटा असून आणि माझा मामाही काही कमी पराक्रमी नव्हता. शिवाय अगणित असे त्यांचे वीर सैनिक होते. पण एकट्या अर्जुनाने त्या सर्वांना जेरीस आणून माझ्या मामाला तर जीवानिशी मारले हे मला पक्के लक्षात आहे. नारद म्हणाले, 'अरे नुसते लक्षात ठेवून काय करायचे तुझ्या अंगी शौर्य आहे हाती शस्त्रास्त्रे आहेत. अगणित तुझे सैन्यबळ आहे हे सर्व असुन तुला साधी गोष्ट कळत नाही अरे तो अर्जून कितीही पराक्रमी असला तरी तुझ्या बळापुढे त्याचे काय चालणार आहे. तुझ्या मामाचे वैर तू त्या अर्जुनाचाच काय पण त्या पांडवांचा नाश करून वसुल कर. तरच तुझ्या मामाला शांति मिळेल असे त्यानेच मला तुजप्रत सुचवायला सांगितले आहे. या उपरतुझी मर्जी. तुझे तुझ्या मामावर अंतरातून प्रेम असेल आणि त्याच्या तळमळणाऱ्या अंतरात्म्यास सौख्यशांति मिळावी अशी तुझी इच्छा असल्यास मी सांगतो त्याप्रमाणे कर.' मेघनाद म्हणाला, 'हे ऋषीमहाराज आपण सांगता हे पूर्ण सत्य आहे. आणि माझ्या हिताचेही आहे पण आता त्या गोष्टीस बरेच दिवस झाले आणि हस्तिनापूरला जाऊन त्यांच्याशी युध्द करणे अत्यंत त्रासाचे आहे. एवढ्या लांब जाऊन त्यांच्याशी युध्द करणे कांही शक्य वाटत नाही.

नारद म्हणाला, 'अरे वेडच्या तुला हस्तिनापुरला जाण्याचीच काय गरज. अरे तुझे भाग्य खरोखरच थोर आहेत. ते पाचही शत्रु हचा तुझ्या नगराच्या वेशीवरून जात आहेत. ते एकटेच आहेत. सैन्य अश्व, गज, रथ, शस्त्र वगैरे त्याच्या जवळ कांहीच नाही फक्त त्यांची स्त्री सोबत आहे तिला तू पळवून आण म्हणजे ते अनायासे युध्दाला तयार होतील. त्वरा करशिल तर ते तुझ्या हाती लागतील नाहीतर हिमालयाच्या मार्गाने पुढे निघून जातील. तुझ्या हिताचे ते सांगायचे ते तुला सांगितले आता या उपर करायचे ते तू कर'. असे म्हणून नारदमुनि तेथून निघून गेले. मेघनाद तत्काळ सज्ज झाला. त्याने आपल्या सैनिकांना सज्ज राहाण्यास सांगून एकटाच गांवसीमेजवळ आला. पाहतो तो पाच जण पुढे जात आहेत आणी एक स्त्री त्याच्या मागोमाग जात आहे असे त्याला दिसले. त्याला खूप आनंद झाला. नारदाने सांगितल्याप्रमाणे हेच ते पांडव व त्यांची स्त्री त्रैलोक्यसुंदरी द्रौपदी असावी असा विचार करून तो त्यांच्या पाठोपाठ मोठमोठ्याने गर्जना करीत अद्वातद्वा बोलत, शिवीगाळ करीत करीत धावु लागला. मेघनादाची ती आरडाओरड एकून युधिष्ठिरादि पांडव चिंतातुर झाले व हे अपशकुनाचेच फळ आहे असे जाणून या भयानक प्रसंगातून सोडविण्यासाठी भगवंताची आराधना करू लागले. एक भयंकर अक्राळ विक्राळ राक्षस मोठमोठ्याने ओरडत शिवीगाळ करीत आपल्या बाजूने येत असलेला त्यांनी पाहिला. पाचही भावांनी मौन धारण केलेले असल्याने ते बोलत नव्हते. पण येणारे संकट निवारण्यासाठी काय करावे याची चिंता करीत होते. एकही उपाय त्यांना सुचत नव्हता. कारण स्वत: धर्मराजाने त्यांना नियम घालून दिलेला होता की जीवापाड जरी संकट आले तरी बोलायचे नाही, युध्द वगैरे करून जीवाहिंसा करायची नाही. काम, क्रोध, मोह यांच्या आहारी जायचे नाही. त्यामुळे आता काय करावे याच चिंतेत ते श्रीहरीचे स्मरण करू लागले. पाचही जण व द्रौपदी श्रीहरीचे स्मरणचिंतन करीत हिमालय चढत होते पाचही भाऊ जरी शूरवीर काटक होते तरी खाचखडग्यातून काट्याकुट्यांच्या मार्गाने अनवाणी चालण्याची त्यांना सवय कोठून असणार? आणि द्रौपदी अत्यंत सुकुमार सुकोमल. कितीही शोधून जरी चालले तरी कोपरीदगड कांटे वगैरे बोचून तिचे चरण रक्तबंबाळ झाले होते. पण त्याची पर्वा न करता जीद्दीने ते सर्व जण पुढे जात होते. फारच त्रास झाला असता द्रौपदीने चालवले जात नव्हते अशावेळी तिच्यामुळे आपल्याला अडथळा येऊ नये, विलंब होऊ नये म्हणून भीम तिला खांद्यावर उचलून घेई व झपझप पावले टाकीत आपल्या भावाजवळ घेऊन येई. अत्यंत भयंकर बिकट वनात सिंह व्याघ्र यांच्या डरकाळ्या ऐकून भयभीत झालेले अशाप्रकारे त्यांचा

प्रवास चालू असता हा मेघनादाचा भयानक प्रसंग ओढवला पांचही जण भगवंताचे स्मरण करीत करीत पुढे निघून गेलेले होते. द्रौपदीने त्यांच्याबरोबर चालवले जात नव्हते. ती त्यांच्या बरेच अंतर मागे राहिलेली होती. भगवान श्रीहरीचे स्मरण व त्याच्या अवतारलीलाचं चिंतन करीत ती हळूहळू चालत होती. एवढ्यात मेघनाद तेथे येऊन पोहोचला. (श्लोक ११७२-११८९)

पाचही बंधू मार्गाने चालत चालत पुढे निघून गेले.द्रौपदीने चालवले जात नसल्याने ती एकटीच बरीच मागे राहिली होती. एवढ्यात मेघनादाचा भयंकर कर्कश विक्राळ आवाज ऐकून द्रौपदी भयभीत झाली. अद्वातद्वा शिवीगळ करीत धावत येत असलेल्या त्या दानवास पाहताच वाघाच्या तावडीत सापडलेल्या हरणीप्रमाणे द्रौपदी थरथर कापू लागली. मेघनाद म्हणाला, 'अरे पाचही पांडवानो, उभे राहा तुम्ही सर्वजण वीर असून असे चोरासारखे पळून कोठे जात आहात. तुम्हाला तुमच्या वीरत्वाचा गर्व असेल तर माझ्याबरोबर युध्द करा. आताच तुमचा गर्व उतरवितो. तुम्ही खरे धनुर्विद्याधारी असाल तर माझ्याशी युध्द करा. माझ्या मामाला तुम्ही विनाकारण मारून माझ्याशी वैर जोडले आहे. त्याचे उट्टे काढल्याशिवाय मी तुम्हाला सहज कसा बरे जाऊ देईल. आतापर्यंत हसत खिदळत तुम्ही जीवन कंठले पण आता माझ्या रूपाने तुमचा प्रत्यक्ष कर्दनकाळ आलेला आहे. आधी माझ्याशी युध्द करा. तुम्हाला या हातांनी यमसदनास पाठविल्याशिवाय त्याच्या आत्म्याला शांति मिळणार नाही. म्हणून सावध व्हा कोठे आहेत ती तुमची शस्त्रे फारच अभिमान आहे तुम्हाला तुमच्या शस्त्रांचा! मला दाखवा तुमच्या शस्त्रास्त्रांचा पराक्रम. तुम्ही खरे क्षत्रीय आहात ना, मग असे भीत्र्याभागुबाई सारखे पळून का जात आहात. त्या कलंकी पापी कृष्णाने तुम्हाला चेतवून संपूर्ण सोमवंशाचा नाश करविला. त्याच्या सुध्दां कुळाचा नाश झाला अशा त्या काळ्या कृष्णाच्या नादाने तुम्ही भारतखंडात मोठा विनाश घडविला आणि आता तो कलंक धुण्यासाठी कां येथे आलेला आहांत? थांबा तुमचा समुळच कलंक मी उतरवितो. तुम्ही आता जीवंत माझ्या हातून सुटणार नाहीत जर माझ्याशी युध्द करण्याचे धैर्य नसेल तर माझ्या मामाला मारून वैर कां जोडले? अरे मुर्खांनो, पाप्यांनो आता काळे तोंड करून कोठे पळून जात आहांत. लौकर मागे वळा आणि माझ्याशी युध्द करा. विलंब लावू नका.' मेघनादाचा आरडाओरडा आणि अश्लिल बोलणे ऐकून भीमाला त्याचा खूप राग आला. चवताळून मागे वळून मोठ्याने आरोळी ठोकून तो कांही बोलणार तोच धर्माने त्याच्या तोंडावर हात ठेवून म्हटले भ्राता क्रोध आवर. प्रतिज्ञेचे स्मरण कर, पापकर्मास व जीव हिंसेस प्रवृत्त होऊ नकोस. शांत हो. या असल्या बऱ्याच प्रसंगातून आपल्या मनाचा

तोल सावरीत आपल्याला वाटचाल करायची आहे. धैर्य धारण कर आणि शांतचित्ताने माझ्याबरोबर चल. मागे पाहु नकोस. तो दानव जसा आला तसा आगंतुक निघून जाईल. जर त्याच्याशी दोन हात करण्याच्या नादास लागलास तर केलेली तपस्या योगसाधना सर्व व्यर्थ जाईल.' असे भीमास समजावून धर्मराजा व बाकीचे भाऊ पुढे जाऊ लागले. इकडे मेघनाद शिवीगाळ करीत व टोचुन बोलीत आपल्या राक्षसी लीला करीत त्यांच्या जवळजवळ जाऊ लागला. एकही पांडव मागे वळून पाहात नाही पुढेच जात आहे असे पाहुन त्याला अधिक जोर आला व त्याने एकाच टप्यात द्रौपदीस गाठले. द्रौपदी मोठमोठ्याने विलाप करीत असता गिधाडाप्रमाणे झेप घालून त्याने तिचा उजवा दंड धरून झपाट्याने उचलून आपल्या खांद्यावर आदळले व तसाच माघारी फिरून झपाझप पावले टाकीत आपल्या नगराकडे येऊ लागला. द्रौपदी मोठमोठ्याने विलाप करीत रडू ओरडू लागली आणि राक्षसापासून सोडविण्याकरीता आपल्या पतींना बोलावू लागली व राक्षसाच्या गयावया करून सोडून देण्याबद्दल त्याला विनवू लागली. पण पाषाणहृदयी राक्षसाला त्याचा काय विधिनिषेध होता. द्रौपदी विलाप करून मोठमोठ्याने ओरडून म्हणत होती. 'हे नाथ तुम्ही मला या दुष्टाच्या हाती सोडून कोठे जात आहांत. तुमच्या शिवाय माझे रक्षण कोणी करू शकणार नाही. मी निराधार अबला आज खरोखरच निराधार झालेली आहे. तेथे वैकुंठात जाऊन काय करणार आहांत. एका स्त्रीचं रक्षण तुमच्याने होऊ शकत नाही हे दूषण घेऊनच ना जाल किंवा आपल्या मार्गातून माझा काटा दूर करण्यासाठीच कां तुम्ही धावून येत नाही. काय करूं आता प्राण देण्याशिवाय गत्यंतर नाही. पाचही जण मौन व्रत धारण करून रस्त्याने पुढे जात होते. आपल्या सुटकेस कोणी येत नाही हे जाणून द्रौपदीला अत्यंत दुःख झाले. तिच्या डोळ्यातून एकसारखा अश्रुप्रवाह वाहू लागला. ती एकसारखी तडफडू लागली. अखेर मेघनादाने तिला आपल्या नगरात एका उंच माडीवर कोंडून ठेवले व आपल्या समाचाराकरितां कोणी येतो की काय याची वाट पाहू लागला. त्याला पूर्ण खात्री होती की द्रौपदीला सोडविण्यासाठी सर्वच धावून येतील परंतु तिकडून कोणतीच विरोधी प्रतिक्रिया होत नसलेली पाहून तो आश्चर्यचकित झाला. इकडे द्रौपदी एकसारखा विलाप करून आलेल्या या संकटातून वाचविण्यासाठी ती भगवंताचा धावा करू लागली. अत्यंत करूणार्द्रतेने ती म्हणाली, 'हे प्राणाधार भगवंता जगदीश्वरा, हे अनंत सचराचर व्यापी सर्वसाक्षी पुराणपुरुषोत्तमा या अबलेच्या साहाय्यार्थ धावून ये. हे नारायणा कृपाळू भगवंता या मेघनादाच्या तावडीतून मला सोडव. माझे सत्वरक्षण कर.' असे म्हणत

विलाप करीत द्रौपदी मेघनादाच्या माडीवर बसून अश्रु ढाळू लागली. ती अत्यंत शोक करू लागली. तिच्या दु:खाला कोणताही पारावार नव्हता. ( श्लोक ११९०-१२०६ )

द्रौपदी कळवळून भगवंताचा धावा करू लागली ' हे अनाथनाथा दीनबंधु, पतीतपावन अनंत विभो, या दिनहीन अबलेवर कृपा करा. हे करूणासागर माझे पति मला या घोर संकटात घालून निघून गेले. परमकरूणागारा या हीनदीन दासीवर वेळोवेळी आलेल्या संकटातून तुझ्याशिवाय कोणीही वाचविले नाही. पार्थाने मत्स्यवेध करून पण जिंकुन मला वरीले, पण पूर्व पुण्यप्रतापाने पाच पतींची सेवा करण्याचे सद्भाग्य मला लाभले. लोकविलक्षण जगावेगळा असा आमचा गृहस्थाश्रम सुरू झाला. पण त्यात कधीही वितुष्टता आली नाही हा केवळ तुझाच प्रताप होय. तु जर मला तसे बळ दिले नसते तर माझी जीवननौका कोठल्या कोठे आदळुन फुटली असती. पण हे दीनानाथ अनाथरक्षका तुझ्याच पुण्यप्रतापाने माझ्या पतींचे लाक्षागृहात रक्षण झाले, त्यातुन सुखरूपतेने सुरूंगमार्गाने त्यांना वनात जाता आले. विदूरजींना आणि मयदानवाला सत्प्रेरणा देऊन तू त्यांचे रक्षण केलेस. आमच्या जीवनात असे कितीतरी प्रंसग ओढवले की तुझे साहाय्य नसते तर एकही प्रसंगातून आम्ही सुटू शकलो नसतो. द्यूत सभेमध्ये पराजित झालेल्या माझ्या पाचही पतिसमोर आणि भीष्मद्रोणादि गुरुजनासमोर दुष्ट दु:शासनाने माझे वस्त्र फेडण्याचा प्रयत्न केला हे भगवंता माझे अबलेचे काय बळ चालणार होते त्याच्यासमोर. पण त्याठिकाणी माझा पाठीराखा होऊन तू अंतरिक्षातून वस्त्रे पुरवून माझी लज्जा रक्षण केलीस. तू त्याठिकाणी माझी पत राखली नसतीस तर तेथेच संपली असती पण तशा दुर्धर लज्जास्पद प्रसंगातून सुध्दां तू माझे सत्व कायम राखलेस. हे अंतर्यामी भक्तसख्या दुर्योधनाने आमचे सत्व हरण करण्यासाठी वनवासात दुर्वासांना आपल्या अठ्यायशी सहस्त्र शिष्यासह पाठविले होते. आमचे भोजन होऊन अक्षयपात्र धुवून स्वच्छ केले. तेव्हा दुर्वासांनी येऊन जेवण्याची इच्छा दर्शविली तो प्रसंग आठवताच माझा भीतीने थरकाप होतो. दुर्वासांना कसेबसे हो सांगून स्नानास तर पाठविले पण अतिशय बिकट प्रसंग आमच्यावर आलेला होता. माझ्या पतींनी तर या ब्रह्मशापापेक्षा अग्नीत उडी घेणे बरे असे समजून अग्नि' पेटविला पण माझ्या प्राणसख्या वनमाळीने माझी दिनवाणी हाक ऐकून धावत आला. भुकेचे निमित्त करून माझी कसोटी घेतली. पण केवळ भाजीच्या एका पानाच्या कणाने दुर्वासांची भक्तगणासह मिष्ठान्न भोजन देऊन तृप्तता केली व त्या महाभयंकर प्रसंगातून मला, माझ्या पतींना वाचविले. हे जगत्पित्या जगदीश्वरा केवढे तुझे गुण वर्णवू, माझी बुध्दीच-वाणीच चालत नाही. द्यूत सभेत हरल्यानंतर

वनवासात जातांना दुर्योधनाच्या भीतीने आम्हाला नगरात कोणी पाणी सुध्दां दिले नाही. अरण्यात जाऊनच आम्ही आमची तहान भागविली. विराट राजाच्या घरी अज्ञातवासाचे वर्ष काढण्यासाठी माझ्या पतींनी सेवेचे कार्य केले. त्याठिकाणी दुष्ट कीचकाच्या तावडीतून व त्या जीवघेण्या प्रसंगातून सोडविण्याकरितां माझ्या पतीला - भीमसेनाला प्रेरणा देऊन कीचकाचा समुळ वंशच्छेद करविला. एक ना दोन असे कितीतरी प्रसंग आमच्या जीवनात आले पण हे करूणासागर त्या साऱ्या प्रसंगातून आमच्या पाठीशी राहून अथवा प्रत्यक्ष येऊन आमचे सत्व व जीवीत रक्षण केलेस. तुझ्याच आज्ञेने हे हिमालयाचे आरोहण करण्यासाठी आज आम्ही येथे आलो पण या दुष्ट मेघनाद राक्षसाने आमचा वियोग घडवून आणला. माझ्या पतींनी प्रतिज्ञा केलेली आहे ते निश्चयाने पार पाडतील पण या अभागिनीला मात्र या मेघनादाच्या माडीवर खिचपत पडावे लागेल. भगवंता सहन होत नाही रे हे दुःख मला! आता हा दुष्ट दैत्य मला त्रास देईल. आता जीवीत राहण्यात कांहीही स्वास्थ्य नाही. मी प्राणत्याग केला तर जीवघेण्या दुःखातून सुटेन पण माझ्या पतिंना आणि हे परमप्रेमास्पद प्राणप्रीय तुला सुध्दा दोष लागेल, कारण माझा हीतकर्ता, रक्षणकर्ता, जीवनदाता केवळ तूच आहेस. माझ्या सर्वस्वाचा भार मी तुझ्यावर सोपविलेला आहे. तारणे अथवा मारणे सर्वस्वी तुझ्या स्वाधीन आहे. हे भक्त वत्सला तू गाय आहेस मी तुझे वासरू आहे. माझा सर्वस्वी सांभाळ करणे तुझ्याच स्वाधिन आहे. तू आपले ब्रीद सत्य कर. (श्लोक १२०७-१२२१)

मेघनादाच्या माडीवर द्रौपदी उभी राहून शोक करीत होती. समोरून आपल्या पतीपैकी सोडविण्यास कोणीही येत नाही हे पाहुन तिला अपार दुःख होत होते. अनन्यभावाने ती भगवंताचा धावा करीत होती. मागील एकएक अपार कसोटीचा दुःखद प्रसंग आठवून व त्या सर्वांमधून भगवान श्रीकृष्णाने साह्य करून वाचविले होते ते आठवून तिला निश्चित खात्री वाटत होती की माझा प्राणसखा सुहृद भ्राता जरी आता या अवनीतलावर देह रूपाने नसला तरी आत्मचैतन्य रूपाने तो सर्वत्र आहे. कोणालाही अंतर्प्रेरणा चेतना देऊन तो निश्चित या संकटातुन मला वाचविल पण आपल्या सोडवणूकीस अजून कोणी कसा बरे येत नाही. हे भक्तवत्सला, धर्मराजा तर नाही पण कदाचित भीमसेन येईल कां? किंवा अर्जुनाच्या मनात सोडविण्याविषयी सद्बुध्दि होईल. नकूल, सहदेव आपल्या वडिलभ्रात्यास सांगून मला सोडविण्यास येतील! छे कोणीही नाही धर्मराजाची त्यांना तशी आज्ञा होतच नसेल! धर्मराजाची

आज्ञा मोडून मला सोडविण्याचे धैर्य फक्त भीमसेनातच आहे! अहो भीमसेन महाराज तुम्हाला तरी या अबलेची करूणा येत नाही कां? आता कोठे गेला तुमचा क्रोध! भगवंता माझ्या भीमसेन महाराजांना क्रोध आणून-जागृत करून मला सोडविण्याकरिता तरी पाठव. आता हा दैत्य मेघनाद येथे येत आहे तो माझी अब्रु घेईल, त्याचा कीचकासारखा नाश होऊ दे. एवढ्यात मोठमोठ्याने शिवीगाळ आक्रोश करीत करीत मेघनाद जेथे द्रौपदी उभी होती तेथे आला. द्रौपदी भयाने अत्यंत थरथर कापू लागली व या दुष्टाच्या हाती लागण्यापेक्षा माडीवरून उडी घेऊन प्राण देण्यास सज्ज झाली. इकडे पांडव एक क्षणभरही मागे न पाहता मार्ग क्रमत होते. मेघनादाचा आरडाओरडा, शिवीगाळ व युध्दाचे आवाहन वगैरे सर्व त्यांना ऐकू येत होते. पण त्याच्याशी तोंड दिल्यास जीवहिंसेचे कर्म आणखी जोडले जाईल म्हणून धर्मराजा मागे न पाहता जोरजोराने पुढे जात होता व चारही भाऊ त्याचे अनुगमन करीत होते. त्या गडबडीत द्रौपदीकडे कोणाचेच लक्ष नव्हते. ती जरी मागे राहिली तरी ती सुध्दां पळत येईलच या उद्देश्याने कोणीही तिकडे लक्ष देईना. परंतु मेघनादाचा आवाज आता बंद पडला व द्रौपदी अजून आली नाही म्हणून भीमाला भयावह शंका येऊ लागली. क्षणभर थांबण्याचा त्याने प्रयत्न केला पण धर्मराजा ऐकेना. शेवटी भीमाचा पारा चढला. द्रौपदीची अस्पष्टशी आर्ततेची हाक त्याला ऐकू येऊ लागली. तो धर्मराजास म्हणाला, 'हे बंधू, तू आम्हाला प्रिय आहेस, पूज्य आहेस. तुझ्यापुढे आम्हाला मोक्षाचीही इच्छा नाही. आम्ही तुझे आज्ञाधारक दास आहोत. पण सती द्रौपदीला सोडून आपण जात आहोत हे योग्य नाही. हे मात्र नामुष्कीचे काम आहे. वास्तविक तिचा सांभाळ करणे आपले कर्तव्य आहे. तिला मागे टाकून आपण एवढे लांब आलो. तिची देखभाल विचारपूस केली नाही, मेघनादाने तिचे कांही तरी अनिष्ट केले असावे. ही तिची आर्त हाक ऐकू येत आहे आणि त्या दुष्ट मेघनादाचा आवाजसुध्दां बंद पडला आहे. द्रौपदीवरच हे काही तरी भयानक संकट कोसळले आहे. हे प्रिय बंधुंनो, वैकुंठात जाऊन काय करायचे आहे. आपल्या स्वत:च्या पत्नीचे जे रक्षण करू शकत नाही, त्यांत जे अपयशी झाले त्यांना वैकुंठ तरी कसला मिळणार? हे भ्रात्या तू स्वत: धर्म आहेस. आमचा वडिलभ्राता आहेस. धर्माची शिकवण देणारा आहेस. आम्हाला सत्यधर्माची शिकवण न देता गुणहीनतेची शिकवण देत आहेस हे तुला शोभत नाही. हे बंधू, तूं आम्हास जरी पूज्य असलास तरी आज मी तुला स्पष्ट सांगतो. तुझ्या या स्वभावामुळे आपल्याला हे दु:ख भोगावे लागले. तुझ्या भयामुळे आम्ही बोलू शकलो नाही, निमुटपणे सारे ऐकले सहन केले व

तुझी आज्ञा पालन केली त्याचा परिणाम धनसंपत्ति, राज्य, आप्तमित्र, बंधु वगैरे सर्वांवर पाणी सोडावे लागले. हा केवळ तुझ्या सहनशक्तीचा प्रताप आहे. तुला हीनवून दुःखी कष्टी करणे हे माझे कर्तव्य नाही पण आजचा प्रसंग केवळ तुझी भीती बाळगल्याने आपल्यावर ओढवला. वस्तुतः आपला प्राण खर्चून अबलांचे रक्षण करावे असे असूनही तू आपल्याच स्त्री विषयी इतका उदासिन कां? वैकुंठात गेल्यावर भगवान श्रीकृष्ण तुला विचारतील 'माझी प्राणप्रिय भगिनी कोठे आहे? तिचा कां त्याग केलास? तिचे संरक्षण सांभाळही तुम्हाला करता आले नाही. तर काय उत्तर द्याल! एका स्त्रीचे जे संरक्षण करू शकले नाही ते पाच वीर काय कामाचे? हे नामुष्कीचे लक्षण आहे. तू आता मला आज्ञा दे अगर देवू नकोस मी हा असाच जातो. कोण तो मेघनाद आहे ते पाहतो आकाशात पाताळात कोठेही तो दडलेला असला तरी त्याला खेचून त्याचा नाश करून सतीला त्याच्या तावडीतून सोडवितो. तुम्ही पुढे जा अगर येथेच थांबा. मी सतीला घेऊन येतो.' असे म्हणून भीमाने मोठ्याने आरोळी मारली व पवन वेगाने मेघपूर नगराकडे धाव घेतली तोच वरील करूणाजनक दृश्य त्याच्या नजरेस पडले. (श्लोक १२२२-१२३२)

मेघनादाच्या माडीवरून उडी घेऊन प्राणत्याग करण्याच्या तयारीत असलेल्या द्रौपदीस पाहून भीमसेन म्हणाला, 'थांब सती अशी प्राणावर उदार होऊ नकोस. जोपर्यंत हा भीम जीवंत आहे तोपर्यंत हा मेघनादच काय पण याचा बाप जरी असला तरी त्याला उभा चिरून तुझे रक्षण करीन. आता या मेघनादाचे आयुष्य पूर्ण झाले असे तू समज व दुःखाचा त्याग कर असे म्हणून प्रथम भीमाने द्रौपदीला उचलून दूर एका टेकडीवर सुरक्षित ठेवले व एक मोठी शिला उचलून नगर दरवाजावर आदळली त्यायोगे गावातून बाहेर येण्याजाण्याचाच मार्ग बंद पडला. सर्व राक्षस चवताळून भीमावर आपापले शस्त्र उगारू लागले. मेघनाद खवळून वाघाप्रमाणे डरकाळ्या फोडून भीमावर तुटून पडला. भीमाने त्याचे दोनही पाय हातात धरून उचलले व गरगर फिरवीत त्या नगरावरच आदळले. त्याच्या आघाताने बरेच लोक जागच्या जागीच चिरडून ठार झाले. भीमाने दोन तीन टेकड्या उचलून संपूर्ण नगरावर झाकण ठेवून दिले व जोरजोराने पदाघात करून त्यावर नृत्य केले. अशाप्रकारे सर्व नगरास नामशेष करून टाकले. द्रौपदीला उचलून खांद्यावर घेतले व वेगाने धावत आपल्या भावाजवळ येण्यास निघाला. द्रौपदीला अपरिमित आनंद झाला. ती म्हणाली, 'हे स्वामीनाथ आपण अपरिमीत पराक्रम करून त्या दुष्ट दैत्यांचा संहार करून त्याच्या

गुहेतून मला सोडविले नाहीतर आजच या दासीचा काळ संपला होता. क्षणभर उशीर झाला असता तर ह्या द्रौपदीचे कलेवरच नेण्याचा प्रसंग तुम्हावर आला असता, पण प्राणबंधू भगवंताची आपणावर खरोखरच कृपा आहे म्हणून आपण या दुर्धर प्रसंगातून सुटलो.' असे म्हणून द्रौपदीने भीमास कडकडून आलिंगन दिले. तिच्या नयनातून एकसारखे प्रेमाश्रु वाहू लागले. शेवटी भीमाने तिला भावाजवळ आणले. सर्वांना आनंद झाला. भीमाने घडलेला सारा वृत्तान्त त्यांना निवेदन केला. सर्वांनी त्याचा गौरव केला व सर्वजण आनंदाने पुढे मार्ग आक्रमू लागले. भगवान श्रीकृष्णाचे व बुध्दाचे नामस्मरण करीत, त्याचे गुणानुवाद गात गात पांडव पुढे चालू लागले. आता त्यांनी द्रौपदीला सर्वांच्या पुढे केले व पाचही भाऊ तिच्या पाठोपाठ चालू लागले. **( श्लोक १२३३-१२५२ )**

सहाही जण रस्त्याने पुढे पुढे जात आहेत. रस्ताही तेथे कोठून असणार? अरण्यातून जाणारी साधी पाऊलवाटही तेथे नव्हती. खाच खडग्यातून, दऱ्या खोऱ्यातून उंचच उंच उत्तुंग अपार अशी शिखरे चढून, नदीनाले ओलांडून, काटेरी झुडुपामधून, कोपरी खडकामधून कसातरी मार्ग काढीत ते जात आहेत, मनात कशाचेही चिंतन नाही, हृदयात केवळ एकच भाव भगवान श्रीकृष्णाच्या स्वरूप माधुर्याच्या दर्शनाची ओढ मुखातून आणि मनातून केवळ भगवान श्रीकृष्णाचे स्मरण चिंतन चालले आहे, नाही शरीराची शुध्द, नाही कामनांची आसक्ति, निरिच्छ, निस्पृह वृत्तीने ते आपला जीवन प्रवास निभावीत होते. रस्त्याने चालता चालता अनंत अडचणी अनंत आडफाटे, अनंत संकटे येत होती. कशाकडेच कोणाचेच लक्ष्य नव्हते. पायात काटा मोडला अणुकुचीदार दगड टोचला तरी तसेच लंगडत लंगडत चालायचे, द्रौपदीने चालवले जात नव्हते तेव्हा भीमसेन तिला खांद्यावर उचलून घेई. मार्ग चांगला आला म्हणजे द्रौपदी खाली उतरून चालू लागे. अशाप्रकारे अत्यंत खडतर असा त्यांचा प्रवास चालला होता. पांडवांना दैवच अनुकूल नव्हते. एकेकाळचे राजवैभव उपभोगलेले ते राजे होते पण आता जीवनाच्या संध्याकाळी भगवंतांच्या मिलनासांठी ते त्याच्या द्वारीचे भिक्षेकरी बनले होते. प्राप्त प्रसंगाला तोंड देऊन प्रतिकूल झालेले दैव अनुकूल बनविण्याचा प्रयत्न करीत होते. पण त्यांचे दुर्दैवही जीदीला पेटलेले होते. अरण्यातून जात असता दुर्योधनाचा मित्र असलेल्या एका अलमस्त दैत्याने द्रौपदीला हेरले ती सर्वांच्या मागेआहे आणि सर्व नजरेआड झालेले आहेत असे पाहून त्याने द्रौपदीला तिच्या लक्षात येण्याच्या आधिच अचानक उचलून खांद्यावर घेतले व पवनवेगाने तो पळू लागला. द्रौपदी मोठमोठ्याने विलाप करीत पांडवांना हाक मारू लागली.

'हे धर्मराज, महाबलवान भीमसेना, धनुर्धारी पार्था, महापराक्रमी नकुल, सहदेव हो धावा! या दैत्याने मला बळेच चलून पळवून लावले आहे. या नरपशुच्या तावडीतून मला सोडवा हो! अहो प्राणनाथ या अबलेमुळे आपल्यावर वेळोवेळी संकट येत आहे आपण महाबलशाली असून सामर्थ्यवान आहात. कीचक दुर्योधनादि दुष्टांचा संहार करून तुम्ही जमिनीवरचा भार उतरविला. आता या दुष्टाला मागे जीवंत सोडून जाऊ नका. नाहीतर हा व याचे साथीदार आपल्या बाळ परिक्षिताला पुढे त्रास देतील. म्हणून आताच यांना मिटवून टाका.' सती द्रौपदीची करूणार्द्रतेची हाक ऐकून भीमाच्या लक्षात आले की द्रौपदीवर आणखी काही संकट आलेले आहे. चारही भावांना पुढे जाऊ देऊन तो मागे राहिला. द्रौपदीला सोडून जाणे त्याला मुळीच पसंत नव्हते पण आताही द्रौपदी कोठे सापडेल या चिंतेत तो एका उंच झाडावर चढला व आजुबाजूस पाहू लागला. तो त्यास द्रौपदीला खांद्यावर घेऊन एक दैत्य वायुवेगाने पळत असलेला दिसला. त्याने तत्काळ खाली उडी घेतली व त्याच्या दुप्पट वेगाने धावू लागला. एका क्षणात त्याने दैत्यास गाठले व मागच्या बाजूने त्याचे केस धरून त्याला खाली पाडले. भीम अतिशय संतापाने त्याला म्हणाला, 'अरे पाप्याच्या पितरां! आता तू जीवंत तरी राहू शकशील कां? आता तुझ्या शंभर पापीपितरांची याद कर आणि मुकाट्याने मरण्यास तयार हो. महाभारत युध्दाच्या वेळी दुर्योधनाचा मित्र म्हणून तु युध्दास आलेला होतास पण भीमाचा पराक्रम पाहून भीतीने पळालास तो येथे येऊन दडलास काय? वास्तविक तुझ्यासारख्या नामर्द षंढास मारणे मला उचित वाटत नाही पण परस्त्रीची छळणूक केल्यास काय फळ मिळते हे एक कारण व दुसरे असे कीं तुझ्यासारख्या पापात्म्याला मागे जीवंत ठेवल्यास सामान्य लोकांना नसता उपद्रव होईल त्यापेक्षा तुला कायमचा संपविलेला बरा.' असे म्हणून भीमाने त्याच्यावर मल्लयुध्दाचा पेच टाकला. अलमस्तने त्याचा प्रतिकार केला तेहा भीमाने चिडून त्याचे दोन्ही पाय धरून डोक्यावरून गरगर फिरवून जोरजोराने पर्वत शिखरावर आदळू लागला. त्याच्या त्या प्रचंड आघाताने जमिन थरथर कापू लागली. स्फोट झाल्याप्रमाणे धडामधुम असे प्रचंड आवाज होऊन शिखरे तुटून पडली. अशाप्रकारे चांगला आदळून आपटून त्याच्या अंगातले सारे रक्त काढून टाकले व त्याचा प्राण सुध्दां चांगला धुऊन काढला तेव्हाच भीमाच्या मनाचे समाधान झाले. शांत झाल्यावर अतिशय आनंदाने भीमाने द्रौपदीला उचलून घेतले व वायुवेगाने भावाजवळ धावत आला द्रौपदीला खाली उतरून सर्व हकिकत भावांना सांगितली. सर्वांनी भीमसेनास धन्यवाद दिला व ते पुढे जाऊ लागले. (श्लोक १२५३-१२६६)

अलमसत दैत्यापासून द्रौपदीला सोडवून आणल्यानंतर पांडव तिच्याबद्दल जास्त चिंता करू लागले. ते तिला नेहमी आपल्यामध्ये घेऊन चालत होते. पण ती पाऊलवाट नव्हती की सारे जण सारखे चालू शकतील! ज्याला जिकडून सोईस्कर वाटेल तिकडून ते जाण्याचा प्रयत्न करीत. असेच एकदा टेकडी चढण्याच्या वळणावर जात असता पाचही जण नजरेआड होताच एका दुष्ट दैत्याने एक क्षणाचाही विलंब न करता द्रौपदीला अलगद उचलले व तिच्या लक्ष्यात येण्याच्या आंतच तो दैत्य गर्द झाडीत तिला घेऊन अदृष्य झाला इकडे पांडव ते पर्वतशिखर चढून वर गेले पण अजून द्रौपदी येत नाही म्हणून सर्व भीतियुक्त आश्चर्यचकित झाले. धर्मराजा म्हणाला, 'अरेरे काय आपले दुर्दैव हात धुवून पाठीशी लागले. पहा भीमा अरे या द्रौपदीला आणखी कोण्या दुष्टाने नेली अथवा तिच्याने चालवले गेले नसेल तर मध्येच कोठे विश्रांति घेत आहे किंवा एखाद्या क्रूर हिंस्त्र पशूने तिच्यावर झडप तर घातली नसेल. तिचा आवाजही ऐकू येत नाही व दुष्टीसही पडत नाही. पहा बरे काय झाले असावे ते. भीमाने खूप मोठमोठ्याने हाक मारली पण त्याच्या प्रतिसादाशिवाय दुसरे कोणतेही शब्द ऐकू आले नाही. तेव्हा नकुल व अर्जुन, सहदेवाला म्हणाले, 'सहदेवा ज्योतिष पाहून द्रौपदीचे काही बरे वाईट झाले की काय पहा बरे.' सहदेवाने ग्रहगती, प्राणगती वगैरे जाणून ज्योतिष पाहिले व भावांना सांगितले, 'प्रसंग अतिशय कठीण आहे. मोठ्या मायावी दैत्याशी झुंज द्यावी लागेल. अलकनंदा नदीच्या तिरावर असलेल्या श्रीनगरचा प्रमुख दैत्य तालकेतुच्या मुलाने द्रौपदीला उचलून तिचे तोंड बंद करून पळविले आहे. तो अतिशय बलवान व मायावी आहे.' हे ऐकून भीमाचा जणू तिसरा डोळाच उघडावा तसा क्रोधाने थरकाप झाला. त्याच्या डोळ्यातून अग्निज्वाळा पडू लागल्या. अतिशय चवताळून त्याने जोराने पाय जमिनीवर आदळताच मोठमोठ्या दगडांचे चूर्ण झाले. जमीन हादरली व कडे कोसळले ते पाहताच धर्मराजा म्हणाला, 'अरे एवढा क्रोध करून काय उपयोग? हा कडा कोसळल्याने त्याच्या खाली असंख्य जीवप्राणी चिरडून गेले असतील. बिचाऱ्या निरपराध प्राण्यांना कां म्हणून त्रास द्यावा. थोड्याशा हिंसेच्या पापक्षालनार्थ आज आपण इथे आलो आणि येथे परत तेच कर्म करीत बसलो तर गृहत्याग करण्यात अर्थ तो काय? क्रोधामुळे जीवप्राणिमात्रांचे अनिष्ट तर होतेच पण आपल्या देहाचा सुध्दा नाश होतो. पुत्र, कलत्र स्त्री वगैरे मायीक बंध सोडून आता प्राप्त परस्थितीला तोंड द्यावे. सांसारिक मायीक पाशात अडकून तोंडी आलेला स्वर्गीयसुखाचा घास व्यर्थ दवडू नये म्हणून भीमा ताबडतोब क्रोधाचा त्याग कर व पुढील मार्गास सिध्द हो.'

भीम म्हणाला, 'हे बंधू तुम्ही दिलेली शिकवण चांगली आहे पण मला तसे स्त्रीविरहीत स्वर्गसुख नको. एक क्षणभर तुम्ही येथे थांबा अथवा पुढे चला मी त्या दुष्ट दैत्याचा योग्य समाचार घेऊन सतीला सोडवून आणतो.' असे म्हणून भीम उत्तरेकडील टेकड्यावर चढून खाली अलकनंदा नदीच्या खोऱ्यात जेथे श्रीनगर बसलेले होते तेथे पवनवेगाने संचार करून क्षणात त्याने दुष्ट दैत्याला गाठले. दैत्याला भीमाची चाहूल लागताच त्याने मोठ्याने रणशिंग फुंकले व शंखाचा नाद केला. अलकनंदेच्या दऱ्याखोऱ्यातून तो नाद चौफेर घुमला व तो ऐकून कित्त्येक दैत्य नादाच्या अनुरोधाने सर्पाप्रमाणे धावून आले. ते पाहून भीमाला अधिकच स्फुरण चढले. अतिशय क्रोधाने भीमाने दैत्यास पकडण्याची शिकस्त केली पण तत्काळ अदृश्य होऊन दैत्य पुढे जाऊ लागला. भीमसुध्दां चपळाईने त्याच्यावर तुटून पडला व त्याच्याशी मल्लयुध्द करू लागला. दोघांचे बराच वेळ घनघोर युध्द झाले. कोणीही कोणास हार जाणारा नव्हता. शेवटी भीमाने एक पेच टाकून दैत्याचे पाय धरून वर केले व फिरविण्याचा प्रयत्न करताच दैत्य मुखाने म्हणाला, 'हे बळवंता तुझा पराक्रम अवर्णनीय आहे. मला सोड. मला तुझ्या चरणकमळांची सेवा करूं दे.' भीम मल्लयुध्दात पूर्ण निष्णात होता. गयावया करून हा दैत्य आपले पाय धरील व दुष्टबुध्दीने आपल्यासच पेचात पकडील हे भीम पूर्णपणे जाणून होता. दैत्याचा हा लाघवीपणा म्हणजे निव्वळ फसवणूक आहे हे तो जाणून होता. भीम त्यास म्हणाला, तुला या चरणांची सेवा करायची असल्यास हे तुझे शिरकमल आधी वाहावे लागेल. अरे पापी दुष्टा, दुरात्म्या परस्त्रीचा अभिलाष केल्याने, तिचा अपहार केल्याचे काय फळ मिळते ते तू आधी पहा. त्या दुष्टाचे रोमरोम नरकात तर पडतातच पण त्याचे पितरसुध्दां नरकात पडतात. पहा तुझे पितर आलेले आहेत किंवा नाही नरकात ते.' असे म्हणून भीमाने एक लत्ताप्रहार करून त्याचा प्राण घेतला व जोराने चेंडू सारखा उडवून श्रीनगरवर फेकून दिला. भीमाचा तो अमानुष पराक्रम पाहून सती द्रौपदीला अपरिमित आनंद झाला. ती त्याची स्तुती करू लागली. शेवटी भीमाने तिला उचलून वायुवेगाने धर्मराजाजवळ आणले. धर्मराजाने मोठ्या प्रेमभावाने भीमास आलिंगन देऊन हृदयाशी लावले व अनेक धन्यवाद दिले. पुढे अतिशय जलद गतीने चालत ते चारयोजन गेल्यावर केदारनाथाला जाऊन पाहोचले. (श्लोक १२६७-१२९७)

केदारनाथाच्या परिसरात जाऊन पाहोचल्यावर पांडवांनी मुखमार्जन केले स्नान, ध्यान, संध्यातर्पण करून पूर्वजांच्या नांवाने पिंडश्राध्द वगैरे केले. भगवान शंकराच्या

आच्छादलिंग, कलेश्वरलिंग वगैरे पंचलिंगाचा अभिषेक करून जप पूजाअर्चा केली. नंतर किंचीतकाळ तेथे थांबून त्यांनी जप ध्यान धारणा योगसाधना केली. मनाची प्रसन्नता झाल्यावर तेथून ते तुंगनाथला गेले. नंतर दुर्गेश्वर भुवनाला गेले. अतिसुंदर अशा कमलपुष्पांची भगवान शंकराची दुर्गामातेची पूजा अर्चा केली. निरनिराळे फुले, फळे, कंदमुळे यांचा नैवेद्य अर्पण करून थोडा फलाहार केला. पंच केदारच्या कुंडात स्नाने केली तेथील अमृतोपम शीतल जलप्राशन करून तनमनाची तृषा शांत केली. शीतलवायु, अतिशय जोराचा वहात होता, त्यायोगे पाणीही अतिशीतल होते. हिमवारा, हिमवृष्टी व हिमजल यांतून संरक्षणापुरती फक्त वल्कले धारण केलेले ते सद्भक्त पांडव श्रीहरीचे स्मरणचिंतन करीत करीत बदरिकाश्रमी जाऊन पोहोचले. बदरिकाश्रमाची अवर्णनीय शोभा पाहून व मुख्य म्हणजे आदिनारायणाचे ते स्वरूप माधुर्य पाहून पांडवांना अपरिमीत आनंद झाला. भगवंत स्वरूपाची त्यांनी मनोभावे पूजाअर्चा केली. कमलदलांनी युक्त व पानफूल फलादिकांचा नैवेद्य अर्पून भगवंताला प्रसन्न चित्ताने त्यांनी पूजिले. त्यांच्या त्या मनमोहक सुंदर छबीचे दर्शन घेऊन ते कृतकृत्य बनले.वाटेतले सारे श्रम, अनंत संकटे, अनंत दुःखे ते विसरले. भगवंताच्या दर्शनाने त्यांचा सारा श्रमपरिहार झाला. बरेच दिवसपर्यंत राहून त्यांनी तेथे योगसाधना ध्यानधारणा व तपश्चर्या केली. मनाची पूर्णशांति तृप्ती झाल्यावर मग ते पुढे जाण्यास निघाले. आता ते अतिशय उंच अशा मलयगिरी पर्वताच्या अनुरोधाने जाऊ लागले. बराच मार्ग चालून गेल्यावर म्हणजे सुमारे तीसयोजन अंतर गेल्यावर पर्वताचे शिखर त्यांना दिसू लागले. चढाव अतिशय उंच व सरळच होता. तलवारीच्या धारेप्रमाणे असलेल्या दगडामधून, खाचखळग्यातून मार्ग काढीत काढीत ते वर चढू लागले. धुके एवढे पसरले होते की दिवस अथवा उजेड सुध्दा दिसेना. रात्रीचा गडद अंध:कार व्यापल्याप्रमाणे तो संपूर्ण परिसर अंध:कारमय दिसत होता. पुढे पाऊल कोठे टाकावे व कोण कोठे उभा आहे हे सुध्दा धड दिसेना. त्यामुळे सारे जण तेथेच थबकले व पुढे काय करावे कसे जावे याची चिंता करू लागले. नकुल सहदेवाला म्हणाला, 'सहदेवा तुझ्या ज्योतिषविद्येने शोधून पुढचा मार्ग तरी सांग. तेहा सहदेव म्हणाला, माझे ज्योतिष सांगत आहे की पुढील मार्ग चढून जाणे अतिशय कठीण आणि धोक्याचे आहे. त्यास एकच उपाय आहे आणि तो म्हणजे खिंड तयार करून पार जाणे आणि ही खिंड सुध्दा भीमाशिवाय दुसऱ्याने होऊ शकणार नाही. सहदेवाच्या मुखातून वाणी निघताच भीमाचे दहाहजार हत्तींचे बळ जागृत झाले व त्याने भगवान श्रीकृष्णाचे-बुध्ददेवाचे व सवितानारायणाचे स्मरण करून जोराने पर्वत शिखराला लाथ

मारली तो काय आश्चर्य त्या लत्ताप्रहाराने सर्वत्र मोठा गडगडाट झाला व त्या पर्वत शिखराला मोठे भगदाड पडले. भीमसेनाने त्यामधील दगडमाती हाताने लोटत नेऊन मार्ग तयार केला व त्या भुयारातून ते पुढे जाऊन मलयगिरीच्या पलिकडे निघून गेले. (श्लोक १२९८-१३१७)

पांडव मनात श्रीजगदिशाचे नामस्मरण चिंतन ध्यान करीत करीत पुढे पंचवीस योजन निघून गेले. नंतर त्यांना लोपनमोहन नावाचा पर्वत लागला. तेथे भद्रकाळी देवीचे स्थान असून अत्यंत रमणीय असे ते ठिकाण आहे. त्याठिकाणी जागोजागी गणगंधर्व, यक्ष, किन्नर यांच्या वस्त्या आहेत. मधून मधून त्यांच्या गायन नृत्य वाद्यांचा मंजूळ मधुर सुर ऐकू येई. लावण्यकोटी सुंदरी सुमधूर कंठाने सुस्वर गायन नृत्य करणाऱ्या कन्या बाला तरूणी जिकडे तिकडे दिसत होत्या. सातयोजन विस्तीर्ण व पाचयोजन उंच असा तो पर्वत सुवर्णमय किरणांनी लखलखत होता. सर्वत्र सुवर्णच पसरलेले असावे असे वाटत होते. मधून मधून शंख, भेरी, मृदंग, टाळ, विणा, घंटे, शृंग, सनई, बासरी इ. वाद्ये वाजून मोठा सुमधूर नाद ऐकू येत होता. अशाप्रकारचा तो आदिअंबिका भद्रकाळी देवीचा संपूर्ण परिसर अतिशय सुशोभीत व रमणीय होता. तेथे छप्पन प्रकारचे भोग प्रसाद नैवेद्य देवीला चढवून नित्य पूजा आरती, छत्तीस रागांचे गायन किन्नरींचे- अप्सरांचे सुस्वर आलाप युक्त गायन व नृत्य वगैरे होऊन संगीताची आरास होत होती. अशा अत्यंत भोगविलास सौंदर्याने नटलेल्या त्या स्थानात पांडव येताच तेथील कित्येक सुंदर देवकन्या अप्सरा नानाप्रकारचे साजशृंगार करून, कामोद्दिपक हावभाव करून नटून थटून पांडवांच्या समोर आल्या. पांडवांना त्यांनी प्रणाम केला व हात जोडून म्हणाल्या, 'अहो कामदेव हो कित्त्येक दिवसापासून आम्ही आपली प्रतिक्षा करीत आहोत. मनात आपली सारखी आराधना करीत होतो व माता भद्रकालीला विनवीत होतो की आमची कामशांति करणारे आमचे पतिदेवांना म्ह. कामदेवांना येथे बोलावून आमचा काम शांत कर. वैभव सुखोपभोगविलासात येथे कोणत्याही प्रकारची उणीव नाही पण या साऱ्यांचा व आमच्या सेवेचा अंगिकार करणाऱ्या कामपुरुषाशिवाय साऱ्या शृंगारविलासाला अर्थ नाही. माता भद्रकाळीने ती आमची कित्त्येक वर्षांची आशा आज सफळ केली. धन्य धन्य आजचा दिवस की आज कित्त्येक दिवसांच्या कामना पूर्ण होतील. अहो स्वामी प्राणनाथ हो! आता आपण कायमचे येथेच वास्तव्य करावे. येथे जरा म्ह. म्हातारपण नाही, मृत्यू नाही. चिरतरूण राहून सर्व प्रकारचे सुख विलासभोग पदोपदी उपलब्ध आहेत. त्याचा

उपभोग घ्यावा. आपल्या सेवेकरिता आम्ही सर्वसखी रात्रंदिवस आपल्या चरणाजवळ हजर आहोत. आम्हास आपल्या सेवेची अनुज्ञा करावी.' अप्सरांचे वचन ऐकून धर्मराजा म्हणाला, 'हे मातांनो सत्यवचन आम्ही तुम्हाला सांगतो ते शांतचित्ताने श्रवण करा. सर्वप्रकारच्या सुखविलासभोगांचा त्याग करून, मायेचा निरास करून निग्रहाने पंचेन्द्रिये दमन केलेले आम्ही यति आहोत. घरादाराचा, राज्यवैभवाचा त्याग करून उदास मन करून, दृढवैराग्य धारण करून, दृढतेने केवळ आत्मचैतन्य स्वरूप भगवंताच्या प्राप्तीचा नियम ग्रहण करून आम्ही आलेलो आहोत. आम्हास केवळ आमचा प्राणसखा भगवान विष्णुच्या चरणाशी कर्तव्य आहे. बाकी साऱ्या गोष्टी तुच्छ व त्याज्य आहेत म्हणून हे मातांनो आमच्या मार्गातून बाजूला व्हा व आम्हास पुढे जाऊ देण्याची कृपा करा. युधिष्ठिराची ती धिरोदात्त वाणी ऐकताच सर्व अप्सरा निराश होऊन त्यांना अभिवादन करून बाजूस झाल्या व आपल्या स्थानी निघून गेल्या. वाटेवर आलेले विघ्न टळलेले पाहून पांडवांना अतिशय आनंद झाला व ते पुढील मार्गास लागले.

(श्लोक १३१८-१३३४)

निसर्गसौंदर्याची आरास पाहात, मनात अतिशय हर्षित होऊन पांडव पुढे उत्तरमार्गाने जात असता त्यांना नदी मंदाकिनी लागली. अतिशय निर्धाराने व उल्हसित अंत:करणाने भगवंताच्या नामाचा जयजयकार करीत मंदाकिनी तिरावर ते उतरले. मंदाकिनी परिसर अतिशय भव्य उदात्त निसर्गरम्य वनश्रीने नटलेला असा होता. मंदाकिनीजल अतिशय पुण्यपावक, पापहारक, दु:खव्याधी पीडानिवारक, जरामरण भयभंजक असे आहे. मंदाकिनी जलाच्या केवळ दर्शनाने सर्व श्रमपरिहार होऊन मनुष्यास स्वर्गीय आनंदाची प्राप्ती होते. अशा त्या मंदाकिनीतटावर हंस, सारस, चक्रवाक्, मयुर, चातक वगैरे पक्ष्यांच्या किलबिलाटाने अतिशय मनमोहक सुश्राव्य संगीत निनादत होते. सुवर्णाप्रमाणे चमकणारी शिवप्रतिमा तेथे झळकत होती. शुक, सारण, कोकिळा नानाविध पक्षांच्या कंठमधूर कलरवाने संगीतमय बनलेल्या त्या वनात चंदन, साग, मालती, चापा, मोगरा, गुलाब वगैरे सुगंधित पुष्पलतावृक्षांनी भर घालून अधिकच सुंदर रमणीय असे ते तपोवन तयार झालेले होते. त्यांत नारळ, केळी, सुपारी, नारिंगे, डाळिंब, आंबा, फणस, द्राक्षे, चिकू, सफरचंद, वगैरे फळझाडे ठिकठिकाणी बहरून आलेली होती. बिल्बवृक्ष, वड, पिंपळ, लिंब, नागवेल वगैरे घनदाट छायेची झाडे वगैरेमुळे त्या वनाला अधिकच शोभा आलेली होती. मधून मधून ताडमाड तलाम, सुरु,निलगीरी वगैरे वृक्ष उंच डोके करून वायुच्या झोतामुळे डोलत होती त्यामुळे ते स्थळ अधिक रमणीय दिसत होते. खाली खोल दरीत मंदाकिनी नदीचा खळाळणारा प्रवाह आपल्या नाद माधुर्याने

सारा वनप्रदेश भारून टाकीत होता. अशा त्या अत्यद्भूत निसर्गरम्य वनात कल्पवृक्ष, पारिजातवृक्ष वगैरेंच्या छायेत अनेक ऋषींची गुरुकुले वसलेली होती. त्यांचे पूर्वीचे प्राचार्य ध्यानमग्न अवस्थेत ब्रह्मानंदात तल्लीन झालेले अशा स्वरूपात त्यांच्या स्थापना करून त्यांचे वारस वंशज ते ते गुरुकुल परंपरा चालवून सच्छास्त्र शिकवून जिज्ञासु सद्भक्तांना योगसाधना, ध्यानयोग, ब्राह्मीस्थिती, समाधीयोग, राजयोग वगैरे अनेकानेक विद्यांचे प्रशिक्षण देत होते. कित्त्येक आपापल्या ध्यानधारणेत निमग्न, पूर्ण लीन झालेले होते. अशा त्या तापसारण्यात पराशर, व्यास, सूत, वैश्यंपायन, शूक, नारद, अंगिरस, शृंगी, वाल्मिक, काश्यप, दुर्वास, गालव, गौतम, भृगु, भारद्वाज, विश्वामित्र, वशिष्ठ, कौशिक, जमदग्नि, पुलस्त्य, अगस्त्य, उदासतामन प्रचिका, च्यवन लोमस, सुरत, मातंग, दत्तात्रेय, मांडव्य वगैरे ऋषिमुनि तपस्वी योगी मन विरक्त करून म्हणजे पूर्ण वैराग्य धारण करून एकमेव श्रीरंगाच्या ध्यान चिंतन स्मरणात मग्न झालेले होते. ऋषिमुनि, गण, गंधर्व, यक्ष, किन्नर वगैरे देवतांचे वास्तव्य तेथे जाणून पांडवांनी त्यांना प्रणाम केला. सर्वांनी पांडवांना व द्रौपदीला आशिर्वाद दिला. सर्वांचा आशिर्वाद घेऊन त्यांच्या आग्रहास्तव पांडव कांही दिवस तेथे त्यांच्या सत्संगात राहून आत्मज्ञान ग्रहण करू लागले. सर्वांनी आपापल्यापरीने पांडवांवर अनुग्रह करून सन्मार्गदर्शन केले.

(श्लोक १३३५-१३४७)

सर्व ऋषिवर मुनिवर्यांच्या सत्संगात बसलेले असतांना धर्मराजाला त्यांनी विचारले 'राजन सर्व प्रकारचे ऐश्वर्यभोग, धनधान्यसंपत्ति, संपन्न राज्य, श्री, किर्ती, वैभव वगैरे सर्व उपस्थित असतांना ते सर्व सोडून येथे येण्याचे कारण तरी काय घडले? त्या सर्वांचा त्याग करून कडकडीत वैराग्य धारण करून अन्न, वस्त्र, भोग वर्जित करून ही वल्कले कां धारण केलीत?' मुनिवर्यांचा हा प्रश्न ऐकून धर्मराजा म्हणाला, 'हे संतमहात्मा गण हो आता सांप्रत कलियुगाचा प्रस्ताव जगतात सुरु झाल्याने लोकस्थिती फारच बदललेली आहे. सर्व देव व आपण गुप्त होऊन येथे येऊन वसलेले आहात आणि त्यामुळे सन्मार्ग दर्शनाच्या अभावी व बदलत्या लोकस्थितीमुळे तेथे धर्माप्रमाणे राज्य करणे अतिशय कठीण झालेले आहे. शिवाय कलियुगाची स्थिती अशी विपरीत आहे की लंपट, चोर, पाखंडी, जुगारी यांना अतिशय महत्व येईल. त्यांचा आदर सत्कार मान मरातब राखला जाईल. सत्कृत्य आणि पूजा अर्चा सेवा हे कोणीही करणार नाहीत, स्वस्त्रीचा त्याग करून गणिकेला जवळ करून ऐश्वर्यभोग भोगतील. ब्राह्मण चारही वेद मुखपाठ करतील, पण मुठभर अन्नाकरितां

त्यांना नित्य घरोघर फिरावे लागेल. ब्रीद लोपवून, शीलवंतपणा जाणून दुसऱ्यांच्या पुढील ताट आपल्याकडे ओढण्याकरिता वाटेल तो अघोरी प्रयत्न करतील व तशा पापमय बुध्दिमुळे अत्यंत हाल अपेष्टा दुःख भोगतील. प्रथम दया दाखवून, दानधर्म करतील व नंतर दानीपणाचा गर्व करून दिलेले दान परत घेतील अथवा नाकबूल होतील. आईवडिल, कन्याविक्रय करतील, सेवक स्वामीनी व स्वामी सेविका दासी यांचे अनैतिक व्यवहार घडतील वगैरे ह्या सर्व कलियुग स्थितीचे वर्णन भगवान श्रीबुध्दांनी आम्हाला सांगितले म्हणून त्या अत्यंत भयानक अशा कलिकाळात जगण्यापेक्षा जेथे भगवान श्रीकृष्ण प्रत्यक्ष स्वयंसिध्द विराजमान आहे अशा वैकुंठधामातच गेलेले उत्तम असे जाणून आम्ही येथे आलेलो आहोत. तरी आम्हाला तो सन्मार्ग दाखववावा.' ऋषिवर म्हणाले, 'सद्भक्त हो तुम्ही हे केलेत हे फार चांगले झाले. कलिकाळ तुम्ही सांगतात तशाच प्रकारचा भयानक आहे म्हणून आता तुम्ही येथेच सुखाने राहा. सर्वजण मिळून आनंदाने या तपोवनात राज्य करा. तपश्चर्या करा आपण सर्व एकमेकांच्या आश्रयाने संरक्षणाने येथे राहून भगवंताची भक्ति व योगसाधना करू. येथे उत्तम प्रकारचे पुण्यकारक व पापशोक रोगनिवारक असे मंदाकिनी सुशितल अमृतोपम जल आहे. ही उत्तम प्रकारची रमणीय सदैव फुललेली फळलेली बहरलेली अशी सुंदर वनश्री आहे हे राजन येथे एकही प्राणी दुःखी कष्टी नाही. केवळ सुखाचे आनंदाचे साम्राज्य येथे आहे. म्हणून तुम्ही सर्वजण येथेच राहा.' धर्मराजा म्हणाला, 'हे ब्रह्मवृंद हो आपण आमच्यापेक्षा ज्ञानी तपस्वी संयमी आहात. आपले दर्शन घडताच आमचे जन्मोजन्मांचे पातक निवारण झाले. आपणाला सांगावे अशी आमची कांहीही पात्रता नाही. पण मी भगवंताशी तशी प्रतिज्ञा केलेली आहे. केवळ भगवंताच्या प्राप्तीकरीतां हा देह राहिलेला आहे. त्याला कोणत्याही प्रकारच्या ऐश्वर्य सुखाची आसक्ति नाही. हा देह आहे तोपर्यंत त्या आमच्या दयाघनप्रभुची प्राप्ती करून घ्यावी व त्याच्याच चरणी हा देह ठेवावा ही आमची वासना कामना आहे. ते ध्येय साध्य झाल्याशिवाय आम्हाला कोठेही थांबायचे नाही. आपण आम्हाला येथे राहण्याबद्दल आग्रह करू नये. लवकर आम्हाला पुढचा मार्ग सांगा व आमच्यावर अनुग्रह करा.' मुनिवर मनात समजून चुकले की पांडव तेथे राहणे मुळीच शक्य नाही व त्यांना आग्रह ही करणे योग्य नाही. म्हणून त्यांनी त्यांच्यावर अनुग्रह करून ईशप्राप्तीचा मार्ग व साधना सांगून पुढील मार्गास लाविले. मुनिवर्यांचा प्रेमाचा निरोप घेऊन पांडव कूर्म पर्वतावर जाऊन पोहोचले. कोट्यावधी सूर्य उगवावे अशाप्रकारचे अत्यंत प्रखर व सुशितल अशाप्रकारचे तेज सर्वत्र पसरलेले त्यांना दिसले. प्रत्यक्ष

वैकुंठच तेथे उदित होत आहे असे त्यांना वाटले. त्रिभुवनात तेथूनच तेज पसरले असावे असे त्यांना वाटले. त्या तेजामुळे त्यांना मार्गसुध्दां सुचत नव्हता. कसेतरी धडपडत ते जाऊ लागले व अत्यंत हर्षित होऊन भगवंताची आराधना करून मार्गदर्शनाकरिता विनवू लागले. भक्ताधीन भगवंताने दामोदराने आपले स्वरूप सगुण साकार करून भक्तांना दर्शन दिले व पुढे पुढे चालून त्यांना पाठोपाठ येण्याचा संकेत केला. भगवंताच्या त्या सगुण स्वरूपाचे अनुसरण करून पांडव उंच अशा त्या कूर्मपर्वताच्या शिखरावर चढू लागले. वर जाऊन पोहोचताच सद्भक्तांनी भगवंताच्या चरणावर शिर ठेविले तोच भगवंताने आपले स्वरूप गुप्त केले. केवळ एक तेजाचा गोल तेथे त्यांना दिसू लागला. त्या तेजस्वी अशा शिवलिंगाची पूजा करून ते पुढे उत्तर पंथाला लागले. (श्लोक १३४८-१३७०)

हिमालयातील उंचच उंच शिखरे चढत असतांना दाट धुक्यामुळे अगदीच दिसेनासे होई. मध्यरात्रीच्या काळोखाप्रमाणे सर्वत्र अंधार पसरलेला दिसत होता. कसेबसे ते सहाही जण तीन योजन पर्यंत जाताच त्यांना अतिशय सुंदर असे सरोवर दिसले. अत्यंत चकचकित नीलवर्णाचे ते सरोवराचे जल दृष्टीस पडताच पांडवांना अतिशय आनंद झाला. सरोवराच्या काठावर आजुबाजुस सुंदर सुगंधी फुलझाडे बहरलेली होती. सर्व सौंदर्यात विशेष भर सरोवरातील नीलकमलांची पडत होती. ती कमळे पाहाताच द्रौपदीचे मन मोहित झाले. ती भीमाला म्हणाली, 'महाराज ही पहा कमळे किती सुंदर मनमोहक फुललेली आहेत. अत्यंत नयनरम्य अशा या निलकमलांची माला करावी अशी मला फार इच्छा झाली आहे. म्हणून ती फुले मला आणून द्यावी. आपण मला नाराज न करता खात्रीने आणून द्याल म्हणून आपली विनंती करते.' द्रौपदीचे भाषण ऐकून भीमाला आश्चर्य वाटले. तो म्हणाला, 'सती तू त्या फुलांची आसक्ति कां म्हणून बाळगतेस. तुला कल्पना तरी आहे कां कोणाच्या मालकीची ही पुष्करिणी आहे ती! हे द्रौपदी प्रत्यक्ष देवराज इंद्राचे हे क्रिडास्थान आहे. त्याने या पुष्करिणीच्या रक्षणार्थ गंधर्व नेमलेले आहेत. ती कमळे काढली म्हणजे गंधर्वाशी युध्द करावे लागेल आणि शिवाय आसक्तिचा त्याग करून आपण मुक्तिमार्गाला लागलो आणि क्षुल्लक फुलांच्या आसक्तित बध्द झालो तर आपले सत्व जाईल.' भीमाच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून द्रौपदी म्हणाली, 'माझा प्रियबंधु श्रीकृष्ण माझ्या मनाच्या सर्व कामना पुरविणारा होता.' हे वज्रप्राय वचन ऐकून भीमाला अत्यंत वाईट वाटले. द्रौपदीच्या मनाची हौस पुरविण्याकरितां त्याने प्राप्त प्रसंगाशी मुकाबला

करण्याचा निर्धार केला. त्याने सरोवरात उडी घेऊन झपाट्याने कमल पुष्पे काढण्यास सुरुवात केली. गंधर्वांनी त्यास पाहाताच आपली शस्त्रास्त्रे उपसून त्याच्या अंगावर धावून गेले. गंधर्व भीमाला म्हणाले, 'बलवंत वीरा, तू उध्दटपणाने आम्हाला न विचारता फुलांना हात लावलास म्हणून देवेन्द्राचा गुन्हेगार झालेला आहेस. आता आधी आमच्याशी युध्द कर व मरणास तयार हो. ही फुले काही तुझ्या बापाची ठेव नव्हती. परवानगीशिवाय दुसऱ्याच्या वस्तूला हात लावण्याचा काय परिणाम असतो हे आता तुला लवकरच कळून येईल.' गंधर्वांचे ते उन्मत्तपणाचे बोलणे ऐकून भीमाला अत्यंत राग आला. तो तेथेच सरळ उभा राहिला व मोठ्याने हातवारे करून त्याने युध्दाकरितां दंड थोपटले. त्यांचे युध्द सुरु झाले. गंधर्वांनी आपली शस्त्रास्त्रे भीमावर फेकली पण वज्रदेही भीमावर त्यांचा काहीही परिणाम झाला नाही. गंधर्वांजवळची सर्व शस्त्रास्त्रे संपली. शेवटी भीमाने मोठ्याने आरोळी मारून मल्लयुध्दाचा पेच टाकताच गंधर्व भीतीने थरथर कापत पळत सुटले. इंद्राजवळ जाऊन त्यांनी सांगितलें हे सुरपति महाराज आपल्या सरोवरातील नील कमलांचे रक्षण करीत असता आमचे काही एक न ऐकता कुंतीपुत्र भीमाने उध्दटपणाने फुले तोडली. आम्ही त्याच्याशी युध्द केले पण त्याच्यापुढे आमचे काही बळ चालले नाही आता आम्ही कमलफुलांचे रक्षण तरी कसे करावे? सुरपतीने गंधर्वांची हकिकत ऐकून गंधर्वराज चित्रसेनाला बोलाविले व त्यास सांगितले. 'चित्रसेना तू स्वत: त्याठिकाणी जाऊन पांडवांना माझा संदेश कळव. आमच्याकडून आततायीपणा घडला म्हणून त्यांची क्षमा मागून आपणा सर्वांना सुरपतीने स्वर्गात बोलाविले असे सांगून येथे घेऊन ये.' इंद्राची आज्ञा ऐकताच चित्रसेन पांडवाजवळ गेला. झालेल्या कृत्याबद्दल क्षमा मागितली व इंद्राजाचा संदेश सांगितला. ते ऐकून धर्मराजा म्हणाला, 'हे चित्रसेना खरे पाहिले तर तुमचा आततायीपणा नसून आमच्याकडूनच हे अयोग्य कृत्य घडलेले आहे म्हणून तुम्हीच आम्हाला क्षमा करावी. देवराजांचा संदेश आम्हाला मिळाला. मन अत्यानंदाने भारावून गेले पण भगवान श्रीकृष्णचरणी वैकुंठात जावे असा आम्ही निश्चय केलेला असल्याने आम्हाला स्वर्गीय ऐश्वर्य भोगात राहायचे नाही. आपली आज्ञा व मर्यादा उल्लंघन केल्याबद्दल क्षमा करावी. इंद्रदेवांना आमचा प्रेमाचा प्रणाम सांगावा व अहर्निश आमच्यावर कृपादृष्टी असावी अशी प्रार्थना पोहोचवावी.' धर्मराजाचे करूणार्द्र हृदय जाणून चित्रसेनास गहिवरून आले तो धर्मराजाच्या चरणी लागून धन्यवाद देऊ लागला. देवराजाने पांडवांना देण्यासाठी जी अमुल्य भेट आणली होती ती चित्रसेनाने पांडवांच्या चरणी अर्पण केली. धर्मराजाने तिचा सहर्ष स्विकार करून शिरोधार्य मानून परत चित्रसेनाजवळ दिली व म्हणाला 'आम्हाला आता या बहुमुल्य

उपहाराचे कर्तव्य काय? हे आपण आमच्या पितृतुल्य देवराजांच्या संग्रही राहू द्यावे. चित्रसेन म्हणाला, 'ठीक आहे पण त्यांच्या प्रेमाची खूण म्हणून त्यांच्या ह्या स्नुषेला द्रौपदीला हा मणिरत्नांचा हार सौभाग्यलक्षण म्हणून अर्पण करीत आहोत त्याचा स्विकार करावा असे म्हणून त्याने तो हार द्रौपदीजवळ दिला व मागे परत फिरला. पांडव पुढे आपल्या मार्गाला लागले. ( श्लोक १३७१-१३८६ )

पांडव तेथून पुढे महागंधमाधन पर्वतावर चढू लागले. महागंधमाधन पर्वताची शोभा अत्यंत रमणीय होती. अठराभार वनस्पती त्या वनराईत वसल्या होत्या. नारळ, केळी, सुपारी, जांभुळ, उंबर वगैरे फळझाडांच्या जणू बागाच्या बागाच कोणी लावलेल्या असाव्या अशाप्रकारच्या घनदाट बागा जिकडे तिकडे पसरल्या होत्या. वाऱ्याच्या झोताने अनेक कच्ची पक्की फळे तुटून जमिनीवर फळांची वृष्टीच झालेली होती. डाळिंब, द्राक्ष, बदाम, खारीक, खजूर, आंबा, चिंच, चिकू वगैरे बहरलेली फळझाडे व पिकलेली फळे- सर्वत्र दिसून येत होती. या वनांची शोभा पाहात व वनफळांचा आहार करीत पांडव पुढे पुढे जात होते. पुढे आक्रोड, भीलावे, काजू, कमलकाकडी, फणस, पिस्ते वगैरे मेव्याच्या वृक्षांची वने लागली. तेथून थोडे पुढे गेल्यावर सुगंधी अशा चंदन पारिजात वगैरे सुगंधी वृक्षांची वने ओलांडून पांडव पुढे पुढे जाऊ लागले. पुढे त्यांना लवंग वेलची वेलदोडे, जायत्री, जायफळ, तमालपत्र, डमरोमरूओ वगैरे सुगंधी मसाल्याच्या झाडांची वने लागली. तेही ओलांडून गेल्यावर यांना नागरवेल, संत्री, मोसंबी, नारींग वगैरे वनस्पती बहरलेल्या फुललेल्या पाहून मनाला फार आनंद झाला. हरतऱ्हेच्या वनस्पती अत्यंत शोभायमान दिसत होत्या. कोकिळ, मोर, चातक, पोपट वगैरे पक्षांचे मधुर कूजन मनाला अतिशय उल्हसित करीत होते. ठिकठिकाणी सुमधूर अमृतोपम पाण्याची सरोवरे दिसत होती. त्यांच्या तिरावर हंस बगळे वगैरे पक्षी स्वच्छंदाने विहरत होते. ही सर्व वनश्रींची आरास पाहून सर्वांची हृदये पुलकित झाली. पाच दिवस पर्यंत थांबून पांडवांनी त्या गंधमादन पर्वताची शोभा अवलोकन केली. नंतर ते पर्वताच्या खाली उतरू लागले. गंधमाधन पर्वत उतरून गेल्यावर अतिशय उंचच उंच सरळ कड्याचा असा मेरू पर्वत त्यांना लागला. अत्यंत परिश्रमाने ते सहाही जण तो मेरू पर्वत चढून जाण्याकरितां सिध्द झाले. ( श्लोक १३८७-१३९६ )

अत्यंत उंच सरळ उभाट अशा मेरू शिखरावर पाचही जण पुढे व त्यांच्यामागे द्रौपदी असे वर वर चढू लागले. अत्यंत निर्धाराने संकटांशी मुकाबला करीत करीत तेचालले होते. दाट धुके पसरलेले, सूर्यकिरणांचा मागमुसही नाही, अत्यंत थंड बर्फाचे

वारे वाहात आहेत, हिमवर्षाव सतत होत आहे आणि त्या संकटामधून मार्ग काढीत परमेश्वराचे स्मरण करीत मनोमन त्याचे ध्यान चिंतन स्मरण करीत करीत पुढे चालले होते. त्या मेरू शिखरावर पूर्ण एक योजनभर चढून गेल्यावर मात्र द्रौपदीच्या शरीरात हुडहुडी भरली. तिच्याने एक पाऊलही पुढे टाकले जात नव्हते. अतिशय थंडीने थडथडत तिने आपला देह जमिनीवर ठेवला. आपल्या पाचही पतींना हाक मारून तिने जवळ बोलाविले. पाचही पतींना वंदन केले व भगवान श्रीकृष्णाचे स्मरण ध्यान करीत करीत तिची प्राणज्योत निजधामात निघून गेली. देह तेथेच पडलेला राहिला. पाचही भाऊ अत्यंत शोकातूर झाले. सती द्रौपदीच्या निस्तेज पण शांत वदनाकडे पाहून पाचही जण मोठमोठ्याने विलाप करून रडू लागले. धर्मराजा म्हणाला, 'हे सती ऊठ तुला हा मार्ग सहन होत नसेल तर आपण वेगळ्या रस्त्याने जाऊ पण येथे थांबू नको. येथपर्यंत आमच्या सोबत येऊन आता संग सोडून एकदमच कशी निघून गेलीस! भीम म्हणाला, 'हे द्रौपदी अर्जुनाने पण जिंकून तुला वरिले पण मातेची आज्ञा शिरसावंद्य मानून तू प्रेमाने पाचही पतींची सेवा करून जगावेगळे सत्व राखले. वनवासापासून तो आलमसत दैत्यापर्यंतचे सारे प्रसंग आठवून भीम मोठमोठ्याने विलाप करून सतीचे गुण गाऊ लागला. अर्जुन म्हणाला, 'हे सतीशिरोमणी अत्यंत प्रेमाने तू आम्हा सर्वांची सेवा केलीस व संपूर्ण सुखदु:खाच्या प्रसंगी छायेप्रमाणे सोबत राहून त्याचा भार तू सर्व सहन केलास आणि आज आम्हाला सोडून कशी निघून गेलीस आज आमच्यावरील प्रितीचे छत्र कां बरे काढून घेतलेस? नकुल. सहदेव हे सुध्दां अत्यंत शोकाकूल होऊन सती द्रौपदीचे गुण आठवून रडू लागले. हरपलेल्या एखाद्या अनाथ बालकाप्रमाणे ते शोक करीत होते. अशाप्रकारे सर्वजण अपार शोकसागरात बुडाले. बराच वेळ झाल्यावर शेवटी धर्मराजा भावांना समजावून म्हणाला, 'बंधूनो या जगतात अमर तर कोणीही नाही. जगताचा संग हा मिथ्या आहे. काळ कोणालाही सोडणार नाही. सर्व प्राणिमात्र कालगतीच्या चक्रात सापडलेले आहे. जोपर्यंत सतीचा व आपला ऋणानुबंध होता तोपर्यंत ती आपल्या संगतीत होती पण आज तो संग काळाच्या योगाने तुटला पण आत्मा तर अजर अमर आहे. तो नष्ट होणारा नाही. पण हे सहदेवा सती द्रौपदी आपल्या आधी काळाच्या स्वाधीन झाली याचे कारण तरी काय बरे असावे? सहदेव म्हणाला, 'द्रौपदी खरोखरच महासती होती. सर्वांशी तिचे प्रितीचे वर्तन होते पण अर्जुनाने तिला पणात जिंकले असल्याने अर्जुनावर तिची विशेष प्रीती होती. या पक्षपातीपणामुळे सतीला येथे आधी मरण पत्करावे लागले. भगवंतावर श्रीकृष्णावर तिचे अत्यंत उत्कृष्ट प्रेम होते म्हणून

ती त्यांच्या चरणी लीन झाली.' सहदेवाचे बचन ऐकून सर्वांना भडभडून आले. गहीवरून धर्मराजा म्हणाला, 'असो होणाऱ्या भावी घटनांना कोणी टाळू शकत नाही. महासती द्रौपदीच्या आत्म्याला शांति मिळावी म्हणून आपण सर्वांनी तिच्या हातून कळत नकळत झालेल्या दोष कर्माची क्षमा करावी व पुढील तजवीज करावी. (श्लोक १३९७-१४१२)

सती द्रौपदीच्या कलेवरासभोवती बसून पाचही जण शोक करीत हाते. त्राही त्राही करून भगवंताची आराधना करीत होते. युध्दांत पराजित झालेल्या एखाद्या दुर्दैवी वीराप्रमाणे हात झटकीत व शीर ताडन करीत हृदयविदारक असा ते शोक करीत होते. सती द्रौपदीचे गुण आठवून ते म्हणत, 'हे जगदीश्वरा आज तू जणू आमचा प्राणच हरण केलास. आम्ही चैतन्यशक्तिरहीत झालो. सती स्त्री विरहीत जो पुरुष आहे तो चैतन्यरहित कलेवराप्रमाणे जाणावा. स्त्रीशिवाय गृहस्थास सौख्य लाभत नाही. स्त्रीशिवाय घर शून्यवत वाटते. स्त्रीविरहीत मनुष्याचा कोणीही विश्वास बाळगत नाही. स्त्रीशिवाय गृहस्थाची आशा पूर्ण होत नाही. स्त्री असल्याशिवाय सोयरसंबंध जुळत नाही. स्त्रीविरहीत गृहस्थ जगताच्या दृष्टीने लंपट गणला जातो. स्त्रीशिवाय धर्म, अर्थ, काम, मोक्ष वगैरे कोणताही पुरुषार्थ साध्य करता येत नाही. स्त्री विरहीत गृहस्थाच्या हातून समाजात अपराध होण्याचा संभव असतो. समाजदृष्टीने तो गुन्हेगार ठरतो. स्त्रीशिवाय संसारात स्थैर्य नाही. कुटुंबात मातापिता सहोदर जरी असले तरी गृहस्थाच्या साऱ्या मनोकामना सतीसाध्वी स्वस्त्रीशिवाय पूर्ण तृप्त होऊ शकत नाही. स्त्री शिवाय कोणी पाणी सुध्दां देण्याचे सौजन्य दाखवीत नाही. सतिसाध्वी प्रेमळ स्त्रीच्या संगतीतच गृहस्थाचा संसारसुखाचा होतो. अविचारी विषयलंपट विकारी कामी लोभी नरपशूच स्त्रीची निंदा करतो. स्त्री हा गृहस्थधर्माचा अमुल्य असा दागिना आहे. स्त्रीविरहीत गृहस्थाश्रम म्हणजे कोरड्या वृक्षाप्रमाणे उदास भकास भेसूर व भयानक जाणावा. स्त्रीविरहीत गृहस्थ कंगाल दरिद्री जाणावा त्याचा कोणी आदरसत्कार मानमरातब सुध्दा करीत नाही. हे भगवंता आज आम्ही स्त्रीशिवाय असे पोरके झालेलो आहोत. हाय हाय आता आमची विचारपूस देखभाल कोण करील? सुखसु:खात सहभागी होऊन दु:खभार हलका कोण करील? भगवंता हे फार अघटीत झाले. आमचा कोणता अपराध होता की हे स्त्रीविरहाचे दु:ख आम्हाला भोगावे लागत आहे.' भीम म्हणाला, 'हे भ्रात्या आता काय करावे. भगवंताजवळ जाऊन हे तोंड कसे दाखवावे? आपण अनेक प्रसंगी युध्द करून सतीचे रक्षण केले पण आज

काळाने आपणास हरविले. सतीचे असे काय अदृष्ट असेल की तिला अकाली मरण यावे? युधिष्ठिर म्हणाला, 'भीमा प्रत्येक प्राणिमात्राला हा आपापला कर्मभोग प्राक्तनानुसार भोगावा लागतो. नियतीच्या या कारभारात कोणी ढवळाढवळ करण्यास समर्थ नाही. श्रीहरीचरण प्राप्तीशिवाय महासती द्रौपदीदेवीला मरण ओढवले म्हणून वाईट वाटते पण त्यास आपला इलाज नाही.' सतीच्या वियोगाने अत्यंत दुःखित होऊन सर्वजण हाय हाय करीत होते. शेवटी त्यांनी सती द्रौपदीच्या कलेवराला भूमीदाग देऊन स्नान केले. स्त्रीवियोगाचे महादुःख हृदयात ठेऊन ते पुढील मार्गास लागले. चुकल्याचुकल्यासारखे त्यांना वाटत होते. द्रौपदीचा विरह त्यांना सहनच होत नव्हता. या देहाने ते पुढे चालत होते पण जीव मात्र सती जवळच अडकला होता. शेवटी निर्धाराने ते पुढचा मार्ग चालू लागले. पुढे अधिकाधिक थंडी व्यापलेली होती. सत्वाचा आधार जातो की काय असे वाटत होते. मनात शोक सामावून पुढे चालत असतां पांडव किरातगिरीवर जाऊन पोहोचले. कैरातकेश्वराची पूजा करून पांडव पुढे जाऊ लागले. चन्द्रकिरणाप्रमाणे सुशितल व अत्यंत तेजस्वी असे त्या पर्वताचे शिखर चढत ते वर चालले. असंख्य चंद्रोदय व्हावे त्याप्रमाणे सर्वत्र त्या श्वेतशिखराचे तेज पसरलेले होते. त्या आधाराने चढत व भगवंताचे नामस्मरण चिंतन ध्यान करीत पाचही जण पुढे गेले.

(श्लोक १४१३-१४३५)

सुमारे पंचवीस योजन चालून गेल्यावर एकाएकी गार वाऱ्याचा झोत येऊन जोराने हिमवृष्टी होऊ लागली. जमिनीवर पाऊलसुध्दां स्थिर राहात नव्हते. कसाबसा तोल सावरीत पाचही जण चालत असतां नकुलाचा पाय घसरलात तो थेट हिमदरीत जाऊन पडला. खाली पडताबरोबर त्याचा प्राण जगदीश्वराचा शोध घेत घेत अनंतात विलीन झाला. चारही जणांनी खाली उतरून हिमदरीतून नकुलाला वर काढले व जमिनीवर टाकुन त्याच्यासभोवार बसुन शोक करू लागले. 'हे दिनानाथ आता मात्र उत्पात घडला. हे वीरा नकुला धीर धरून उठून बैस. भ्रात्या झोपू नकोस. तु अत्यंत पराक्रमी महारथी वीर असतांना आणि तुझा पराक्रम अवर्णनीय असता तू आम्हाला एकाकी सोडून कसा निघून गेलास. मातेचा अत्यंत लाडका, प्रेमळ, सुंदर, शूरवीर, रणधीर हे बंधू कोणकोणते तुझे गुण आठवावे. आमची मती कुंठीत होते. तुझे गुण आणि रूप सौंदर्य अनाकलनीय होते. आता तू या आमच्या नयनांना कधीरे दिसशील? आम्हा सर्वांना अपार शोक सागरात मागे टाकून एकटाच पुढे निघून गेलास? भ्रात्या कसारे शोक करावा. तुझा शोक करूनही तू परत येणार नाहीस हे कळत असूनही मन आवरले जात नाही.

भीम धर्मराजास म्हणाला, 'आपला हा लाडका बंधू कोणत्या दोषाने या हिमाचलात अर्ध्या मार्गावर मरण पावला असावा बरे? सर्वांशी प्रेमाने बोलणारा, वागणारा अत्यंत नम्र शीलवान गुणवान पराक्रमी व धर्मानुसरण करणाऱ्या अशा भ्रात्याकडून काही पाप कर्म घडले असावे असे मला मुळीच वाटत नाही. तरी हे बंधू धर्मराज माझ्या मनाची जिज्ञासा आपण पूर्ण करावी. कोणत्या दोषाने नकुल भ्राता आपल्या आधी मरणास शरण गेला?' धर्मराजा म्हणाला, 'भीमा नकुलाकडून या जन्मात कोणतेही पापकर्म घडले नाही पण पूर्वजन्मातील कर्मदोषामुळे व या जन्मातील त्याच्या सौंदर्याभिमानामुळे त्याला आपल्या आधी मरण ओढवले आहे. नकुल अत्यंत बलवान व गुणसंपन्न हुशार होता पण त्याने आपले हे गुण कधीच कसाला लावले नाही. या दोषामुळे तो काळपुरुषाच्या जाळ्यात लवकर घेरला गेला. असो. आता जास्त विचार करून वेळ व्यर्थ दवडण्यात अर्थ नाही. आपण सर्वांना सुध्दां मुकाट्याने या काळपुरुषालाच शरण जावे लागणार आहे म्हणून त्वरीत उठा बंधू नकुलाची अन्त्येष्टी करा व पुढील मार्गास लागा. धर्मराजाचे वचन शिरोधार्य मानून त्यांनी नकुलाला भूमीदाग दिला. त्याचे प्रेत संस्कार पींडश्राध्द उत्तरकार्य वगैरे मंत्रविधी करून ते पुढे जाण्यास सिध्द झाले. मनात परमेश्वराचे ध्यान चिंतन करीत व जीव्हेने नारायणाचे नामस्मरण करीत जयघोष करीत असता चारही भाऊ उत्तरापंथाला लागले. (श्लोक १४३६-१४५६)

आणखी पंधरा योजन उत्तरपंथ चढून गेल्यावर सहदेव थंडीने पछाडला गेला. त्याच्याने पुढे चालवत नव्हते. एका हिमवाताच्या झोताबरोबर तो सुध्दां जमिनीवर पालथा पडला. पडताबरोबर त्याने मोठमोठ्याने भगवंताचे नामस्मरण सुरु केले. नामस्मरणाच्या लयीत त्याची प्राणज्योत सुध्दां लयाला जाऊ लागली. एखादा दीप विझतांना जसा हळूहळू क्षीण होता होता शेवटी नाहिसा होतो. तद्वत सहदेवाची प्राणज्योत हळू हळू क्षीण होत होत भगवंताच्या नादबिंदूत विलय पावली. श्यामशरणाच्या चरणी त्याची चैतन्य शक्ति लीन झाली. त्याच्या हृदयातला तेजाचा झोत आत्मज्योत भगवंताच्या अव्याकृतनिर्गुण निरामय स्वरूपात सामावली गेली. भीम म्हणाला, 'अरेरे आता मात्र अनर्थ झाला. हे भगवंता माझ्या या ज्ञानविद्यासंपन्न भावाला सुध्दां आमच्या जवळून तू हिरावून नेलेस ना? ब्रह्मज्ञानी वेदशास्त्रसंपन्न ज्योतिषविद्या पारंगत अत्यंत पराक्रमी धनुर्धारी अशा आमच्या भावाला घेऊन जाऊन हे परमेश्वरा तू आम्हाला अगदीच हतबल केलेस. काय करूं हे बंधु धर्मराजा आपला प्रिय भ्राता एकाएकी आपणास सोडून कां बरे निघून गेला? कोणताही दोष नसतांना काळपुरुषाने त्याला कां बरे ओढून नेले?' धर्मराजा म्हणाला, 'भीमा मनुष्य जे कर्म करतो त्याची फळे देणारी

जी नियती आहे तिला विनाकारण दोष देण्यात काय अर्थ आहे. प्राक्तनाचे भोग मोठमोठ्या थोर ऋषिमुनींना देखिल सुटत नाहीत. तेथे आपल्या सारख्या यत्किंचित मानवाची काय कथा! आपला भ्राता सहदेव पूर्ण ज्ञानी ज्योतिर्विद होता. द्यूत खेळण्याचा परिणाम काय होईल? त्याचे पर्यवसान काय होईल हे सर्व तो जाणून होता; पण व्यसनाधिन झालेल्या आपल्या वडिलभावाला धर्ममर्यादेच्या योगाने तो निवारू शकला नाही. द्यूतक्रिडेत दुर्योधन-शकुनि कपटाने डाव टाकीत होते ते फासे जरासंधाच्या अस्थिंचे बनवून भारलेले होते हे जाणत असूनसुध्दां त्याविषयी माझ्याजवळ त्याने ब्र सुध्दां काढला नाही. जर त्याने मला तिथेच सुचविले असते तर मी द्यूत खेळलो नसतो व पुढे झालेला अनर्थ-सती द्रौपदीची भयंकर विटंबना झाली नसती. पण कांहीही विचारल्याशिवाय न सांगण्याचा त्याच्या तऱ्हेवाईकपणाने सतीला व आपणा सर्वांना आणि आपल्या प्रजेला सुध्दां अतोनात जीवापाड मनस्ताप दुःख कष्ट भोगावे लागले. ह्या सर्व दोषामुळे आज आपला हा ज्ञानी प्रेमी बंधू चिरविश्रांती घेत येथे पडला. ह्या दुःखाचा आवंढा गिळून सुध्दां आपणास पुढे जावे लागेल. भगवंताला दिलेले वचन निभवावे लागेल. याकरितां बंधूंनो, उठा तुम्ही शोक करू नका. शोक करून कोणतेच कार्य साध्य होणार नाही. धीर देऊन धर्मराजाने बंधूकरवी सहदेवाला भुमीदाग देऊन मूठमाती दिली. स्नान करून मनात भगवंतांच्या अपार लीला चरित्राचे स्मरण करीत आता तिघे भाऊ पुढे चालू लागले. अत्यंत दुस्तर असा मार्ग भगवंतांच्या स्मरणचिंतनाने सुकर करीत ते जाऊ लागले. (श्लोक १४५७-१४७१)

भयानक थंडगार सोसाट्याचा वारा वाहात होता. अंगावर जमिनीवर सर्वदूर बर्फच बर्फ पडत होता. पण सत्वशील जीवात्मे सत्वरूपी उब हृदयाशी बाळगून थंडीचा सर्व भार सहन करीत चालले होते. भीमाचे अंग वज्राचे असल्याने सुरक्षित वाटत होते. भक्तिभाव प्रेमाने भगवंताचे भजन करीत असतां नऊ योजन तर पार पडले. दहाव्या योजनाचे अनुसरण ते करीत होते तेव्हा अचानक अर्जुनाच्या अंगात हुडहुडी भरली. भयंकर थंडीमुळे त्याचे शरीर थरथरा कापू लागले. दहावे योजन पूर्ण चालून जाताच अर्जुन धाडकन जमिनीवर आदळला गेला. त्याबरोबर भगवान श्रीकृष्णाचे स्मरण करीत त्याचा प्राण कलेवरातून निघाला व भगवंताच्या सर्वव्यापी सर्वाधार स्वरूपात विलीन झाला. तो अत्यंत दुःखद प्रसंग पाहून युधिष्ठिर, भीम अत्यंत करूण विलापाने रडू लागले. अत्यंत बलवान धर्नुधारी वीरसुध्दां गेल्यामुळे त्यांना अपार शोक झाला. भीम म्हणाला, 'हे भगवंता आता हे दुःख आमच्या हृदयात साठवत नाहीरे. कोणाला सांगू आणि कसे सांगू आमच्याने आता धीर

धरवत नाही. तुझा प्राणसखा असल्याने तू त्याला घेऊन गेलास पण आम्हाला पूर्ण निराधार केलेस ना! कसे सांगू माझ्याने बोलवत सुध्दां नाही. हे भ्रात्या अर्जुना महाबळवंतवीरा आम्हाला अपार अशा दुःख सागरात लोटून एकटाच पुढे निघून जाणे शोभत नाहीरे. हा तुझा वियोग अगदी असह्य झाला आहे. तुझ्या गुणांचे काय वर्णन करावे, वाणी अपूर्ण पडते. द्रूपद सभेत मत्सवेध करून पण जिंकून अत्यंत प्रीतीने पांचाळीला वरले तेथे घडलेल्या युध्दप्रसंगी अरण्यात गंधर्वांशी; विराट्नगरात राहात असतांना कौरवांशी आणि महाभारत युध्दप्रसंगी अपार बळ खर्च करून सदैव आम्हाला विजय मिळवून दिलास. अत्यंत धैर्यवान महापराक्रमी असा तू वीर होतास. भक्तवत्सल भगवान श्रीकृष्ण तुझा प्राणसखा होता. तुझ्या सख्यभक्तिमुळे तो अनंत ब्रह्मांड नायक जगदीश्वर युध्दप्रसंगी तुझे घोडे हाकणारा सारथी झाला. तव्दत भवयुध्दात आपल्या जीवनरथाचासुध्दां सारथी होऊन येथपर्यंत आपनास आणले पण त्यातुन हे भ्रात्या तुम्ही - द्रौपदी, नकुल, सहदेव आणी आता तर तु सुध्दा पडलास आता आम्ही दोघेच पुढे जाऊन काय करूं? तुझ्या भक्तिभाव प्रेमामुळे भगवान तुझ्या अंकीत होता. द्वारकाधीशाला जिंकुन तू आपल्या हृदयात बंदिस्त केले होते रजसूययज्ञ, अश्वमेधयज्ञ वगैरे अनेक प्रसंगी केवळ तुझ्या पुण्यप्रतापाने आपण विजयी झालो आणी आज काळाची काय विपरीत गति. आम्हाला पूर्ण निराधार बनवून निमूटपणे तू काळाच्या स्वाधिन झालास. विराटराजाच्या दरबारात प्रसंगोपात्त कार्य करण्यास एवढा पराक्रमी महावीर नरसिंह नरपुंगव असून सुध्दां एका सामान्य क्षुल्लक नर्तक्याचे रूप धारण करून दुर्धर प्रसंग निभावून नेलास असा आमचा प्रेमळ भाऊ, आमचा सुखदुःखाचा साथीदार आज मात्र आम्हास शोकसागरात सोडून निघून गेला धनुर्विद्या अस्त्रशस्त्र शक्तिसंपन्नवीर, श्रीकृष्णभक्त, सखा, निर्मलचीत्त, सहृदयी बंधू अनंत जन्मातील संचिताने सुध्दां परत लाभणार नाही. अशा प्रकारे भीम विलाप करीत असता धर्मराजा त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करी पण भीमाची समजूत करता करताच धर्मराजा व्याकूळ व शोकाकूळ होई. अशाप्रकारे बराच वेळ निघून गेला. त्यांच्या दुःखाचा उमाळा ओसरत नव्हता. अर्जुनाच्या अंगचे सारे गुण आठवत ते शोक करीत बसले होते. (श्लोक १४७२-१४९२)

धर्मराजा युधिष्ठिर त्राही त्राही करून अर्जुनाचे गुणस्मरण करीत विलाप करू लागला. तो म्हणाला, 'हे सारंगधरा प्राणप्रीय भगवंता आता मी काय करू? माझा प्राणप्रीय भ्राता मला परत मिळेल कां? किती अपार गुणांचा सागर महापराक्रमी

माझा प्रिय बंधु, कौरवांचा संहार करून अधर्माचा उच्छेदच करण्यारिता जणू तो अवतरलेला होता आणि त्याच्याच साहाय्यासाठी भगवंतांनी सुध्दां अवतार धारण केलेला होता. सती पांचाळीही महायोगिनी तपस्विनी होती. तिला अर्जुन आणि श्रीकृष्णाचा मोठा आधार होता. हे तिघेही जण वृक्षाप्रमाणे परोपकारी सुशीतल सहृदय आणि सर्वांचे धारण पोषण करणारे असे कनवाळू होते. आज त्यातील अर्जुन हा शेवटचा तारा निखळून पडला. हे भगवंता आता खरोखर माझा प्राणच जणू निघून गेला असे मला वाटते. हे श्रीहरी जगदाधार आता आमचा सारा आधार मावळला. आम्ही काय करावे? केवळ तुझ्या नामाशिवाय अन्य काहीही आधार नाही.' भीम म्हणाला, 'हे धर्मराजा प्राणप्रीय भ्रात्या? शोक करू नको. आपल्याला पुढील लक्षावर दृष्टी ठेवून पुढें चालले पाहिजे. केवळ शोक करीत बसण्याने काहीही साध्य होणार नाही. अर्जुनासारखा महापराक्रमी महाबलवंत वीर सुध्दा येथे गळून पडला. याचे कारण तरी काय असावे? भीम असे विचारत आहे तोच शोकातिरेकाने धर्मराजास मुर्च्छा आली. ते पाहताच भीमसुध्दां विव्हळला. धर्मराजाची सुध्दां तशीच शोचनीय स्थिती होते की काय या अनामिक भीतीने भीम भांबावला. तो सुध्दां मोठमोठ्याने विलापकरून रडू लागला. पण आता त्या भयानक मेरू शिखरावर त्याच्याच प्रत्याघाताच्या आवाजाशिवाय दुसरा कोण त्याला साथ देणार? केवढा हा करूणप्रसंग! एवढे सत्वशील सद्भक्त पण त्यांच्या लल्लाटी केवढी ही कसोटी लिहिलेली होती. किती भयानक, शोचनीय ही त्यांची स्थिती! अखेर दोन घटकांनी धर्मराजा सावध झाला. भीमास करूण विलापाने रडत असलेला पाहून धर्मराजा त्यास धीर देऊ लागला. तो म्हणाला, 'भीमा, अरे तू मला धीर दिलास आणि आता तूच शोक करतोस! आता ही माया ममता आटोप श्रीकृष्णासारखा आपला परमपूज्य त्राता गेला, पितामह भीष्माचार्य गेले, गुरु द्रोण, कृपाचार्य गेले, महादानेश्वर कर्णासारखा भ्राता गेला, महासती द्रौपदी गेली, नरकेसरी नकुल, सहदेव गेले आणि त्यांच्या पाठोपाठ आपला आधार अर्जुन भ्राता सुध्दां गेला. आता कालांतराने आपली सुध्दां हीच गति होईल, म्हणून शोक आवर. श्रीहरीचे स्मरण कर. भीम म्हणाला, ' पण अर्जुन कोणत्या दोषामुळे आपल्या आधी गेला?' धर्मराजा म्हणाला, 'अर्जुन भगवान श्रीगोपालकृष्णाचा अत्यंत आवडता प्राणसखा होता. अनेक लहान मोठे परोपकाराची कामे तो करी पण आज तो धराशायी होण्यास केवळ त्याचा व्यक्तिगत अहंकारच कारणीभूत झाला. आपल्यासारखा पराक्रमी रणधुरंधर झुंजार वीर दुसरा नाहीच असे तो समजत असे. हाच अहंकार उरी बाळगल्याने आज त्याचे पतन झाले. असो! सोड आता ह्या साऱ्या गोष्टी.

अर्जुनासारखा भ्राता गेला; पण आपल्या आधी तो वैकुंठात जाऊन पोहोचला. आपल्याला अजून मार्ग आक्रमायचा आहे. कुबुध्दि, ममत्व आसक्तिचा त्याग करून ज्ञानवैराग्य संपन्न होऊन पुढे चल असे भीमास सांगून अर्जुनाच्या कलेवरास भूमीदाग देऊन कर्मविधी केल्यानंतर ते पुढील मार्गास लागले. ( श्लोक १४९३-१५१३ )

दु:खाचा उमाळा टाकून दोघं भाऊ उभे राहिले व पुढील मार्गाला लागले. परमेश्वराचे श्रीकृष्णाचे ध्यान स्मरण भजन करीत करीत पाच योजनपर्यंत ते गेले तोच भीम गलीतगात्र झाला व धाडकन जमीनीवर आदळला. त्याच्या वज्रमय शरीराच्या आघाताने मेरू शिखरसुध्दां हादरले व त्याचे विदारण होऊन कडे कोसळले. भीमाच्या शरीरावर वज्रकवच असल्याने त्यास थंडीची बाधा झाली नाही. पण मध्यंतरीच काळ खुंटल्याने त्याला निमुटपणे काळाच्या स्वाधिन व्हावेच लागले. खाली पडताबरोबर भीमाचा प्राण श्यामसुंदराच्या प्राणज्योतीत सामावण्यासाठी निघून गेला. अतुल धैर्य व बलशाली असून सुध्दा धर्मराजा एखाद्या अनाथ निराधार बालकाप्रमाणे करूण विलाप करून ढसढसा रडू लागला. अतिशय शोकाने त्याची शोचनीय स्थिती झाली. त्याच्या मनाचे धैर्य खचले. शरीराचा थरकाप झाला. बुध्दीभ्रंश झाला, संमोहित होऊन धर्मराजा तेथेच मूर्च्छांगत होऊन पडला. आता त्याला सावरणारा तेथे कोण आहे. पाठीराखा बंधू होता तो सुध्दां निघून गेला. काय ही काळाची क्रूर क्रिडा! जीवनभर सत्वापासून कधीही ढळले नाही; राज्यऐश्वर्य सुखोपभोग विषवत मानून केवळ अंतीम ध्येय मोक्षपद - चवथा पुरुषार्थ गाठण्यासाठी जे जीवनभर कष्टमय आयुष्य जगले, अनंत हालअपेष्टा सोसल्या त्या सद्भक्त पांडवांची काळपुरुषाने केलेली ही घृणास्पद स्थिती पाहून कोणत्या सहृदय जीवात्म्याला दु:खाचा करूणेचा पाझर फुटल्याशिवाय राहील बरे! त्रिभुवनावर त्यातील संपूर्ण चराचर वस्तूमात्रावर - जीवप्राणिमात्रावर तुझी अबाधित सत्ता आहे. पण तुला सुध्दां जिंकणारा या त्रिभुवनात एक शूरवीर नरपुंगव निघाला, तो म्हणजे धर्मराजा, महान सत्वशील राजा युधिष्ठिर! आपल्या सत्धर्म परिपालनाने कालपुरुषाला सुध्दां अंकित करू शकला. धन्य तो महामानव! धन्य तो कुल उध्दारक महान सत्वशील राजा धर्म!

प्रहरभराने राजा शुध्दीवर आला. समोर भीमाचे निष्प्राण कलेवर बघून तो अपार शोक सागरात बुडाला. 'अहाहा, हे प्राणप्रीय बंधू, शेवटी तू सुध्दां मला सोडून निघून गेलास ना! माझ्या हातून असा आपणा सर्वांच्या बाबतीत काय अन्याय घडला असावा बरे! तुम्ही सर्वजण मला या भीषण मेरू गिरीवर सोडून निघून

गेला. कां तुम्हाला माझी संगत आवडली नाही. माझ्यापासून दूर निघून जाण्यासारखे असे कोणते दुष्ट कृत्य माझ्या हातून घडले बरे? मला तर आता काहीच सुचेनासे झाले आहे. माझे संवेदनाशील मन संवेदनाशून्य झाले आहे. हे परमेश्वरा आता मलाच एकट्याला मागे कां सोडत आहेस? माझे चार भाऊ, सती स्त्री संगतीने जेथे गेले तेथेच मला सुध्दां घेऊन जा. कां आमचा वियोग घडविला? कां तूं अशी क्रूर थट्टा करीत आहेस? हे माझ्या हृदयातले दु:ख आता मी कोणाला सांगू. हा दु:खभार कोणाला विदीत करून हलका करू. एवढे हे हृदय भव्य दिव्य पण ते सुध्दां हा दु:खभार सहन करण्यास अगदीच असमर्थ ठरले.' राजा धर्म एकटाच त्या पर्वत घाटावर मोठ्या करूणार्द्रतेने विलाप करू लागला. एकेका भावाचे सती द्रौपदीचे गुण आठवून तो अत्यंत सदगतीत झाला. 'हे भगवंता आता खरोखर मी एकाकी झालो. अनाथ झालो. आता तूंच सांग, तुझ्याशिवाय मी कोणाला शरण जाऊ. आपला म्हणून तुझ्याशिवाय कोणाला जवळ करूं. तुझ्याशिवाय माझ्या सुखदु:खाच्या वार्ता आता कोणाला सांगू? हे पूर्णब्रह्म भगवंता नारायणा आता माझा बेली तूच आहेस. एकदा फक्त एकदाच आपले परमपावक चरण दाखव, ज्याच्या दर्शनाने मी माझ्या बांधवासह सती द्रौपदीजवळ जाऊन पोहोचेल. त्यांच्याप्रत जाणाऱ्या मार्गाचे तू मला दिग्दर्शन कर. (श्लोक १५१४-१५२६)

धर्मराजा युधिष्ठिर अत्यंत करूणार्द्रतेने विलाप करून म्हणत आहे, 'हे श्रीहरी आता केवळ तुझ्याशिवाय मी कोणाला तरी माझ्या दु:खाची वार्ता सांगू माझे हृदय या दु:खद वार्तांनी अगदी भरून गेलेलं आहे. जर तुझ्याजवळ खाली नाही केल तर आता हे हृदय अगदी फुटून जाण्याच्या बेतात आलेले आहे. माझे सारे बंधू, सती द्रौपदीच्याच मार्गाने माझ्याजवळून माझ्या डोळ्यासमोर मला एकट्याला मागे टाकून निघून गेले. या पर्वत शिखराच्या निरनिराळ्या घाटावर त्यांचे कलेवर पडले आणि चिरविश्रांती घेत ते तेथेच थंड झाले. हे भगवंता श्रीहरी तूच सांग. आता मला माझ्याने धीर तरी कसा धरवेल. सती पांचालीचा वाली प्रेमळ प्राणसखा भ्राता त्राता तो जगन्नियंता श्रीहरी होता. सर्वांच्या आधी अखंड सौभाग्याचं लेणं घेऊन ती महासती त्या परमेश्वरात सामावली गेली ते दु:ख माझ्या या हृदयात सुध्दां मावत नाही. वनवासात असतांना दुर्वासांच्या शापापासून मुक्त करणारी माझी प्राणप्रीय महासती पांचाली तिच्याच पुण्यप्रतापाने आम्ही जगलो वाचलो, नाही तर

अग्निकाष्ट भक्षण करून त्याच दिवशी भस्म झालो असतो. पतिव्रता व्रत पालन करूनही भगवान गोपाल कृष्णाची अत्यंत आवडीने सेवा पूजा भक्ति करी व आपल्या अंगच्या सद्गुणांनी तिने भगवंताला सुध्दां अंकीत वंश केले होते. संसार सांभाळून परमार्थ करणारी अशी माझी सती द्रौपदी होती. भगवंताच्या सेवेकरिता व स्वरूप साक्षात्काराकरिता अधिर होऊन ती आम्हां सर्वांच्या आधी निघून गेली. माझा कनिष्ठ भ्राता नकुल संग्रामजीत, ज्ञानवंत, चतुर, हुशार, बुध्दिवंत, पराक्रमी व सुंदर होता. तोही सतीच्या पाठोपाठ निघून गेला. त्याचे स्मरण होताच ह्या दोनही नेत्रातून गंगायमुना वाहू लागतात. भगवान कमलापति तू सर्वांचे हृदय जाणतच आहेस. सकळ कला गुणांनी युक्त, ज्ञानी, आगमनिगम जाणणारा, आमच्या पडतीच्या काळात धैर्याने पाठीशी उभा राहून साहाय्य करणारा माझा भ्राता सहदेव मंत्रविद्या शस्त्रास्त्रविद्या युध्दविद्याविशारद होता. असे किती गुण आठवावे माझ्या माद्रीसूत सहदेवाचे! रणांगणात कधीही कोणालाही हार न जाणारे हे माझे पराक्रमी वीर आज मात्र रस्त्यात मला एकट्याला मागे टाकून काळाच्या स्वाधिन झाले ही कर्मकथा हे भगवंता आता कोणाला सांगू? हे माझ्याने सहन होत नाही. ( श्लोक १५२७-१५३५ )

माझा परमप्रीय भ्राता महाधनुर्धारी अर्जुन सहस्त्रकळांनी उगणाऱ्या सूर्याप्रमाणे आपल्या कर्तृत्वशक्तिने तळपत होता पण आज त्याचे सुध्दां तेज लोपले, सर्व राजांनी वाखाणणी करावी अशाप्रकारे धैर्य, बल, शौर्य, त्याचे होते. त्याच्याच बळावर अश्वमेधाची उभारणी आम्ही केली होती. ती जबाबदारी त्यानेच पार पाडली. विप्रसेवा करून त्यांच्या आशिर्वादाने द्रुपदराजाच्या दरबारात मत्स्यवेध करून द्रौपदीचा पण त्याने जिंकला आणि त्याच्याच प्रतापाने सतीशिरोमणी पतिव्रता स्त्री मिळून आम्ही सुखी झालो. धन्य झालो. हे सारे श्रेय माझ्या या प्रीयबंधु अर्जुनाचेच आहे. कुरुक्षेत्रावर घनघोर युध्द करून सर्व बलाढ्य नृपतींना हार मानायला लावले. हा केवळ त्याचाच प्रताप होय. विराट राजाच्या मंदीरात उत्तराकुमारी जवळ बृहन्नडा वेष धारण करून तिला नृत्य गायनाचे शिक्षण दिले. उत्तरकुमाराला बरोबर घेऊन विराट राजाचे गोधन कौरवासारख्या कृतघ्न पापी राक्षसांच्या तावडीतून सोडविले तो पार्थ आज मार्गात असा अनाथ दीन होवून पडला ते दुःख माझ्या हृदयात मावत नाही हे करूणानंद जगदीश्वरा तुझ्याशिवाय आता मला कोणाचा आधार आहे? तुझ्या कृपेवाचून माझ्याने एक पाऊलही उचलत नाही.'

'महाबलवंत मल्लयोध्दा भीम पण प्राप्त परिस्थितीमुळे अज्ञातवासात भंडाऱ्याचे काम करू लागला. ज्याची त्रिभुवनात हाक ऐकू येत होती. अशा त्या महावीराने शंभर भावासह कीचकांचा चक्काचूर केला. भद्रावती नरेश जरासंध महाबलाढ्य होता, त्याला उभा चिरून टाकला, महामल्ल बलशाली दुर्योधन महान गदाधारी वीर होता. त्याला सुध्दां जिंकून विजय मिळविला. आमच्या साऱ्या दुःख प्रसंगी पाठीशी उभा राहून, पडेल ते कार्य करून साहाय्य केले. वनफळे, भक्ष्यभोज्य सारे उपलब्ध करून देई, दैत्यांना निरखून त्यांचा संहार करी. मेघनाद, तालकेतू, आलमसत वगैरे दुष्ट दैत्यांच्या तावडीतून द्रौपदीला सोडवून आणले. त्या अतुल पराक्रमी वीराच्या अंगचे एकेक गुण वाखाणण्यासारखे होते पण ही कर्मकथा मी आता कोणाला सांगू. हे बंधुंनो मला एकट्यालाच निराधार सोडून सतीशिरोमणी द्रौपदीबरोबर तुम्ही निघून गेलात. आता हे शून्यवत जीवन जगून तरी काय करूं? हे दुःख माझ्या हृदयात मावत नाही रे? यदुराया, केशवा, माधवा आता या दासाला - पामराला सुध्दां घेऊन चल. याला मागे सोडून आता काय दुर्दशा करायची राहिली आहे?' अशाप्रकारे धर्मराजा अत्यंत शोक करू लागला. (श्लोक १५३६-१५४५)

शोक टाकून धर्म राजा उठला. दाही दिशा आता शून्यवत दिसत होत्या. एवढ्या मोठ्या अंतराळात जिथे जीवप्राणिमात्रांचे अस्तित्व म्हणून नाही. अशा त्या भयाण भीषण गिरीशिखरावर एकटाच चिंताग्रस्त शोकमग्न अवस्थेत फिरत असता तो एका जलौघाजवळ आला. ते स्वच्छ सुशीतल निर्झर निर पाहून राजाने स्नान संध्यातर्पण केले. थोडे जल प्राशन करून क्षणभर स्वस्थ बसला. तोच त्यास दुःखाचा उमाळा आला. 'अहाहा, हे भीमा बांधवा, बळवंता तुझाच मला मोठा आधार वाटत होता पण आज तू सुध्दां मला या महादुःखसागरात एकटाच मागे सोडून गेलास. तुझे गुण आठवून माझे हृदय दुःखाच्या उमाळ्यांनी, तीळतीळ तुटत आहे. आपल्या अंगच्या पराक्रमाने तू आमचा लाक्षागृहातून सांभाळ करून वाचविले. हे बांधवा तुझे गुण किती वर्णवू. अरण्यात गेल्यावर हिडींबासूराच्या तावडीत आपण सांपडलो पण त्याचा संहार करून तू आम्हास सुखी केले. आज हे भ्रात्या हे वियोगाचे दुःख कां म्हणून देत आहेस? त्या बकासुराला मारून तूं त्या परिसरातील सर्व लोकांना सुखी केले होते जिमुत मल्लाला मारून विराट राजाची चिंता तूं दूर केली होतीस. महाभारत युध्दात अतुल पराक्रम गाजवून जय मिळवून दिलास पण तुमच्या या साऱ्या श्रमाचे चिज माझ्याकडून होऊ शकले नाही. हे भ्रात्यांनो,

हे महासति साध्वी देवी तुम्ही सर्वांनी माझ्याकरिता अपार दु:ख सोसले तुम्हा सर्वांचे गुण मला विसरता येत नाही. जीवनभर सत्व पालनाकरितां संग्राम करून अपार कष्ट सोसले पण आपणास मी सुखी करू शकलो नाही. धिक्कार असो माझ्या या जन्मास, माझे जीवन खरोखरच जीवनसौख्याच्या अभावाने धिक्कारास्पदच म्हटले पाहिजे. या जगतात सत्वपालन करणाऱ्या जीवात्म्यास सौख्य लाभत नाही हेच खरे. योग साधना करणाऱ्या जीवात्म्यास मिथ्या सांसारिक मायेने ज्याप्रमाणे घेरलेले असते तद्वत सत्वपालनाच्या क्षेत्रात दु:खाचे प्राबल्य असते. धर्मराजा याच विचारचक्रात गुरफटून जमिनीवर पडला. अतिशय भयानक अशा त्या मेरू शिखर घाटावर पडलेल्या भीमाच्या कलेवरास पाहून मोठ्याने चित्कार करीत करीत धर्मराजा शून्य मस्तक होऊन मूर्च्छागत पडला. चिंतातिरेकाने व महादु:खाने राजा हातपाय झाडू लागला. ती दु:खातिशयाची परिसीमा पाहून करूणाघन भगवान द्रवला. त्याच्या करूणेला पाझर फुटला भगवान परब्रह्म परमेश्वर सगुण साकार रूपाने प्रगट झाला व धर्मराजाजवळ येऊन त्याला उठवून बसवू लागला. हे भगवान! भगवंता, नारायणा, या पलिकडे धर्मराजाच्या मुखातून एक अक्षरही निघत नव्हते. तो स्वत:चे भान विसरला होता पण भगवंताच्या स्वरूप साक्षात दर्शनाने तो भानावर आला. हात जोडून धर्मराजा भगवंताच्या चरणी दंडवत पडला. त्याच्या नयनातून स्त्रवणाऱ्या गंगायमुनेने भगवंताचे चरण धुतले गेले. भगवंतांनी त्याला बाहुपाशात घेऊन हृदयाशी घट्ट धरले. त्याचे करूणार्द्र वदन अवलोकून भगवंताचे मन सुध्दा द्रवले. त्यांच्या नयनातून सुध्दा करूणता स्त्रवू लागली. एक घटिका तर नि:शब्द शांततेतच निघून गेली. कोणाच्याही मुखातून शब्द फुटत नव्हता. शेवटी भगवान म्हणाले, 'धर्मराजा कालगति मोठी विचित्र आहे. धन्य तू एकवीर या जगतात सत्व रक्षणाकरितां संसार मिथ्या जाणून येथवर चालून आलास धन्य तुझ्या धैर्याची व सहनशीलशक्तीची. राजा आता तुला कोणतेही जीवापाड कष्ट सोसावे लागणार नाही पण अजून तुजवर बरिचशी जबाबदारी असल्याने तुला याचमार्गाने पुढे जावे लागेल असे सांगून भगवान अंतर्धान पावले. भगवंताच्या आज्ञेनुसार धर्मराजाने शोक आवरला. भीमाला मागे टाकून धर्मराजा पुढे जाऊ लागला. (श्लोक १५४६-१५५९)

भीमाला मागे टाकून धर्मराजा आतां एकटाच पुढे जाऊ लागला. मनोमन भगवंताचे ध्यान करीत, पुढे जात असतां तो भुकेने फार व्याकुळ झाला. बर्फमय प्रदेश असल्याने तेथे झाडझूडूपच काय पण गवताचे एक पाते सुध्दां कोठे उगवलेले दिसत नव्हते. गतगोष्टी, दु:खांचे प्रसंग, भावांचा व सतिचा वियोग वगैरे प्रसंगाच्या स्मृतीने तर

त्यास सारखे भडभडून येत होते. त्या निर्जन, प्राणिमात्र विरहीत पर्वत शिखरावर कोण त्याच्या दु:खाचा उमाळा जाणून निवारू शकणार होते. त्या अतिशय भीषण परिस्थितीत धर्मराजा तहान भूक वगैरे सारे विसरून गेला होता. पण आता मात्र भुकेची त्याला तिव्रता जाणवू लागली. आजूबाजूला पाहतो तो त्या वैराण बर्फाळ प्रदेशात सुध्दा एक नारळाचे झाड त्यास दिसले. कसाबसा तो तिथे जाऊन त्याने श्रीफळाचा फलाहार केला. त्याच्या चित्ताला थोडी शांतता लाभली. नंतर थोडा वेळ विश्रांती घेऊन गतदु:ख आठवत धर्मराजा पुढे चालता चालता थेट मानससरोवरावर जाऊन पोहोचला. अतिशय रम्य निळसर असे ते जलाशय व तेथील हंसांच्या जलक्रिडा पाहून त्याचे मन अत्यंत पुलकित झाले. तेथील रेती, रेती कसली ती प्रत्यक्ष हिरे, माणिकमोती, सूर्याप्रमाणे चकचकित तेजस्वी असे रत्नांचे वाळू कण सरोवरात सरोवराबाहेर सर्वत्र पसरलेले होते. अत्यंत प्रसन्नतेने धर्मराजाने स्नान संध्यातर्पण केले व तृषाशमनार्थ आचमन करून एक घोट पाणी प्याला तोच एक चमत्कार झाला. कोणत्याही प्रकारचा त्रास न होता त्याच्या उजव्या पायाची अंगठीच खाली गळून पडली. त्याबरोबर स्वप्नातून जागा व्हावा त्याप्रमाणे धर्मराजा खळबळून शुध्दीवर आला. त्याचा ज्ञाननेत्र उघडला. त्यास वाटले ईश्वरीयोजना अंगदी तंतोतंत बरोबर आहे एक अणूरेणू इतका सुध्दां नियतीच्या न्यायात फेरफार नाही. जीवनात एकदा फक्त एकदाच मी अनिच्छेने असत्य भाषण केले होते. युध्दकाळात गुरु द्रोणाचार्यांना हतबल करण्यासाठी अश्वत्थामा मेल्याचे जाहीर झाले त्यांत नर कां हत्ती असा द्रोणाचार्यांनी सत्यवादी धर्मराजास प्रश्न करताच अनिच्छेने श्रीकृष्णांनी पढविल्यामुळे जाणून बुजून 'नरो वा कुंजरो वा' असा शब्द बोलल्यामुळे द्रोण हतबल झाले व अर्जुनाने तशा क्षीण अवस्थेत त्यांचा शिरच्छेद केला आणि त्याच पापाचे प्रायश्चित्त हे आता मला मिळाले. ही गोष्ट आठवून धर्मराजास अत्यंत गहिवरून आले. तो आपल्या मनाला वाचेला दोष देऊन म्हणाला, अरेरे सर्व अनर्थाला कारण मीच झालो. माझ्यामुळे सारे आप्त, ईष्ट, मित्र, बंधू, पुत्र, गुरु सारे सारे मारले गेले. त्याचे प्रायश्चित मला आता मिळाले. माझी स्त्री, माझे सर्व भ्राते मला एकट्याला या भवसागरात मागे टाकून निघून गेले आता मी सुध्दा राहून काय करू? हे सरोवर अत्यंत परम पवित्र पावक आहे. येथेच चिरविश्रांती घेऊन बंधूंच्या पाठोपाठ निघून जावे हेच मला श्रेयस्कर वाटत आहे. आता क्षणभर सुध्दा धीर धरवत नाही. बंधूशिवाय हे त्रिभुवनाचे सारे सौख्य शून्यवत आहे, बंधूशिवाय हे माझे जीवन आता धिक्कारयुक्त आहे, माझे बंधू अत्यंत बलशाली सामर्थ्य संपन्न होते म्हणून त्यांच्या बळावर मला जय

मिळाला. पण त्याच बंधूंना काळाच्या तडाख्यातून मला सोडविता आले नाही. त्रिवार धिक्कार असो मला. बंधूशिवाय पाठीराखा दुसरा कोणी नाही. बंधूशिवाय कोणी पाणीसुध्दां देत नाही, बंधूप्रीतीने जीवाला सौख्य लाभते. गेलेली लक्ष्मी परत मिळू शकेल पण गेलेले भाऊ परत मिळू शकणार नाही. बंधूंनो, कोठे आहांत रे तुम्ही सारेजण लपून कां बसलांत. मी त्रास दिला म्हणून मला सोडून गेलांत की काय? थांबा मला सुध्दां तुमच्या सोबत येऊ द्या. आता ही माझ्या पायाची फक्त अंगठी गळाली पण आता हा देहसुध्दां मला असह्य झाला. एकदाचा याचा अंत करून मी सुध्दां तुमच्या सोबत येतो. असा वारंवार विलाप करीत धर्मराजा अत्यंत करूणार्द्रतेने भगवंताची आराधना करीत तेथेच मानससरोवराच्या तीरावर मच्छींगत होऊन पडला.

(श्लोक १५६०-१५७९)

एक प्रहरभराने धर्मराज युधिष्ठिर शुध्दिवर आला असता त्यास आश्चर्याचा धक्काच बसला. जवळच् एक कुत्रा अत्यंत करूण दृष्टीने आपल्याकडे पाहात व आपल्या मस्तकास हुंगत उभा आहे असे त्यास दिसून आले. त्या श्वानाकडे पाहात धर्मराजा विचारमग्न झाला. एवढ्या निर्जन निष्प्राणीपर्वत शिखरावर हा कुत्रा येथे कसा बरे असावा. हा खरोखर कुत्राच आहे का आपली दिशाभूल करणारी कांही मायावी शक्ति आहे पण आता मायावी शक्तिचा प्रान्त तर बराच मागे गेलेला आहे. तेव्हा हा जो प्राणी येथे अचानक आला तो खरोखरच कुत्रा नसून कोणीतरी दिव्य शक्तिमान पुण्यात्मा महात्मा अथवा देवच असावा. अशी धर्मराजाची खात्री पटताच त्यास आकाशातून धीरगंभीर नाद ऐकू आला. अदृश्य रूपाने, विणानाद होऊन नारायणाचे नामस्मरण ऐकू आले व मंजूळ स्वरात ती वाणी म्हणाली, 'राजा युधिष्ठिरा तुझे नष्टचर्य आता संपले लवकरच तूं वैकुंठात प्रवेश करशील. तुला मार्गदर्शनाकरिता प्रत्यक्ष तुझा पिता भगवान यमधर्म श्वानाचे रूप घेऊन आलेला आहे. आता त्याच्या मार्गदर्शनानुसार मार्गक्रमीत तूं वैकुंठाला पोहोचशील. मध्ये कोणत्याच मोहांत अटकू नकोस!' दिव्य संदेश देऊन ती वाणी विलय पावली. युधिष्ठिराने श्वानरूप असलेल्या यमधर्मास (त्याच्या अपराधावरून दुर्वासांनी यमधर्मास शाप दिला होता की तुला तीन वेळेस चांडाळाचा जन्म घ्यावा लागेल, हरिश्चन्द्र सत्वपरिक्षेच्या वेळेस डोंब्या अंत्यजाच्या रूपाने, कुरुवंशात दासीपुत्र विदूर रूपाने व युधिष्ठिरास स्वर्गारोहणाच्या वेळेस मार्गदर्शनाकरिता श्वानरूपाने असे तीन जन्म यमधर्माने ऋषीश्रापाप्रमाणे धारण केले. श्वानरूप यमधर्मास) आलिंगन देऊन युधिष्ठिरास अत्यंत गहीवरून आले. एकसारख्या

गंगा यमुना त्याच्या नेत्रातून वाहू लागल्या. थोड्यावेळाने भानावर येऊन युधिष्ठिर श्वानाबरोबर पुढे जाऊ लागला. बरेच अंतर चालून गेल्यानंतर युधिष्ठिरास एक विमान समोरून येत असलेले दिसले. त्याच्या पुढ्यात आल्यावर विमान थांबले व त्यांतून अलौकिक दिव्य तेजस्वी पुरुष देवराज इंद्र उतरला. इंद्रास पाहताच युधिष्ठिराने त्याच्या चरणी लोटांगण घातले. 'हे नाथ देवाधिपती आज आपले प्रत्यक्ष दर्शन घडले. मी अगदी पुण्यवान पावन झालो माझ्या साऱ्या जन्मांच्या पातक राशी नष्ट झाल्या माझे संचित सारे जळून गेले. आतां मी मुक्त झालो.' इंद्र म्हणाला, 'भक्ता युधिष्ठिरा आतां संपले तुझे नष्टचर्य. आता तूं परम पावक पवित्र पुण्यवान झाला आहे. माझ्याबरोबर स्वर्गलोकात चल. बैस या विमानात आणि माझ्या समवेत या दिव्य स्वर्गलोकांचे अलौकिक सौख्य भोग. दिव्य स्वर्गीय सुखोपभोगात, दिव्यांगनांच्या सान्निध्यात यथेच्छ क्रिडा करीत येथेच तू दिव्यानंदाचा अनुभव घे.' भक्त युधिष्ठिर म्हणाला, 'महाराज आपले माझ्यावर मोठे उपकार झालेले आहेत. आपले दर्शन घडले मी कृतार्थ झालो. जगदीश्वराच्या कृपेने व आपल्या सहानुभुतीने मी परमपावन झालो. आपण माझ्यावर आणखी एक उपकार करावा. आपण पितृतुल्य आहांत मी आपला बालक एक आज्ञा मागत आहे कीं आपण मला या दिव्य स्वर्गीय सुखोपभोगाच्या मायेत बंधनांत मोहित करूं नका येथून पुढे जाण्याची भगवान जगदीशाप्रत जाण्याची मला अनुज्ञा करावी. जेथे माझा श्यामशरीर, गोविंदप्रभु आहे. केवळ त्याच्याच चरणाशी लीन व्हावे हीच एक अभिलाषा. म्हणून आपण कृपा करून या स्वर्गीय दिव्य सुखोपभोगांचा मायावी पाश काढून घ्या व आत्मिक प्रेमाने मला ध्येय गाठण्याचा आशिर्वाद द्या.' युधिष्ठिराची वाणी ऐकताच इंद्र खजिल होऊन युधिष्ठिरास अभिवादन करून आपल्या स्थानी परतला भक्त युधिष्ठिर श्वानाबरोबर पुढे जाऊ लागला.

(श्लोक १५८०-१५९२)

अत्यंत सुंदर परमपुण्यकारक रमणीय अशा देव भूमीवरून जात असतां धर्मराजाच्या मनाला खूप आनंद झाला. त्याचे मन प्रफुल्ल झाले. उत्स्फूर्त अंत:करणाने श्यामसुंदर गोविंदाचे स्मरण करीत जात असतां यमधर्माने सुध्दां आपले श्वानस्वरूप टाकून दिव्य कान्तिमान सौम्य ;पण धीर गंभीर स्वरूप धारण केले. भगवान यमधर्म म्हणाला, बाळा युधिष्ठिरा, मानव जीवनात येऊन तूं खरोखर धन्य धन्य झालास. माझे अंशापासून प्रगट होऊन जीवनभर धर्माचरण केलेस, अपारकष्ट कसोटी सहन करून अंतीम ध्येय

साध्य केलेस. मला सुध्दां धन्य केलेस. कृतार्थ केलेस. बाळा! या असार संसारात देहाच्या सुखाकरिता झटणारे बरेचसे आहेत, पण आत्मिकसुखाकरिता प्रयत्नशील असणाऱ्या मुठभर लोकांमध्ये तूच अग्रक्रम लाविला आहेस. सांसारीक सुख, देहाचे सुख अथवा स्वर्गीयसुख क्षणिक मर्यादित आहे पण आत्मिकसुख नि:सीम अमर्यादित आहे. केवळ सत् पालनानेच ते मिळू शकते अन्यथा नाही. हे भक्ता युधिष्ठिरा त्या सत् पालनाने तुझा हा मृत्तिकेचा देहसुध्दां कायम राहिला बाकीच्या साऱ्यांचे देह नष्ट झाले भंग पावले पण तुझा देह कायम राहिला यावरून तूं सत्चाच पुतळा आहेस. सर्वधर्म मर्यादेचे पालन करून सत्वाने वागलास म्हणून तुला हे अमर्यादित अमरपदाचे सुख लाभले. पूर्वकाळात भक्त रूख्मांगद, भक्तवर प्रल्हाद, महान सत्वशील राजा हरिश्चन्द्र वगैरे त्रिभुवन कीर्तिचे महान् सत्पुरुष याच देहाने अमरभूमीला आलेले होते. त्यांनी आपल्या सत्वपालनाने नियतीवर, सुध्दा मात केली होती. बाळा आता तूं सुध्दां त्यांच्या पाठोपाठ सदेहाने स्वर्गात अमरभूमीत आलेला आहेस. सुप्रसिध्द वेदवचन आहे की या सृष्टीच्या मुळाशी सत् हे एकमेव तत्व आहे कीं ते या सृष्टीची उत्पत्ति करते, स्थित्यंतर करते आणि लय करते. तेच ते सत् म्हणजे चैतन्यमय स्वयंप्रकाशित अमृततत्व आत्मा होय. त्या सत् शिवाय पंचमहाभूत अस्तित्वात येऊ शकत नाही. रविचंद्र त्याच सत्मुळे उदयास्त पावतात, तारामंडल प्रकाशते, मेरू दंड अचल अढळ राखला जातो. शेष धरेचा भार आपल्या शिरावर धारण करतो समुद्र मर्यादेत राहतो, मेघ पृथ्वीवर वृष्टी करतो वगैरे ह्या साऱ्या निसर्गक्रिया नियमीत सुरळीत अव्याहतपणे चालू राहतात. त्या केवळ सत् मुळेच. सत् मुळे सत्यवानांचे सत्व राखले जाते. सत्वशीलांना सत् अत्यंत प्रीय आहे. त्या सत्शिवाय जीवात्मा अत्यंत दु:ख भोगतो. सत्वपालनासाठी जी कसोटी सहन केली जाते ती कसोटी म्हणजे दु:ख नव्हे तर सत्प्राप्तीचा तो एक उज्वल मार्गच आहे. असे सद्भक्त जाणतात. सत्वशील राजा हरिश्चन्द्र, तारामति, रोहिदास कुमार हे याच कोटीतले सद्भक्त होते. भक्तवर प्रल्हाद सत्वशील कमलध्वज सत्वप्रीय कमलापति या महान लोकोत्तर दिव्य सत्पुरुषांनी त्याच एकमेव सत् वर पूर्ण निष्ठा ठेवून जीवनाचा तो उज्वल परमप्रकाशित दिव्य मार्ग अवलंबीला म्हणून ते सत्भक्त महात्म्ये आज दीपस्तंभरूप होऊन जगतातील अज्ञ जीवात्म्यांना सोज्वळ मार्गाचा प्रकाश देत आहेत. म्हणून हे बाळा तूं सुध्दां या अमर अजर परमउज्वल सत्चा अवलंब करून या अमरभूमीत आलेला आहेस तुझे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे.' (श्लोक १५९३-१६०४)

युधिष्ठिर यमधर्माबरोबर पुढे चालत असता एकदम त्यास सति द्रौपदी, नकुल, सहदेव, अर्जुन, भीम वगैरे सर्वांची आठवण झाली. अत्यंत करूण स्वराने गहीवरून तो म्हणाला, आज माझे भाऊ, माझी लाडकी सती द्रौपदी माझ्याबरोबर असते तर त्यांना व मला सुध्दां केवढा आनंद झाला असता. पण काळाने त्यांची हाडे खिळखिळी करून तेथे हिमालयातच टाकून दिली. काय झाले असेल माझ्या बांधवांचे? कोठे असेल माझी सती स्त्री? ते सारे कोठे येऊन मिळतील मला? आमचा पुनर्मिलाप होईल किंवा नाही? कोठे होईल? केव्हा होईल? विचारावे बरे आपल्या पितृतुल्य यमधर्म भगवंताला असा युधिष्ठिराच्या मनात विचार आला. तोच धीरगंभीर मेघगर्जनेप्रमाणे असलेल्या वाणीने यमधर्मराजा म्हणाला, 'बाळा युधिष्ठिरा तुझ्या साऱ्या इच्छा लवकरच पूर्ण होतील मज बरोबर चल हा मेरूचा कडा ओलांडला की आपोआप तुला साऱ्या घटना समजून येतील.' असे धर्मराजाचे भाषण ऐकून युधिष्ठिर त्यांच्याबरोबर जाऊ लागला. तोच त्यास दुरुन एक दृष्य दिसले. रक्तवर्णाचे अत्यंत तप्त तेजस्वी असे ते एक कूप होते. युधिष्ठिराने धर्मराजास त्या कुपाविषयी जिज्ञासेने विचारले. तेव्हा धर्मराजा म्हणाला, 'युधिष्ठिरा आज याठिकाणी मोठा महिमा आहे. आज पर्वणीचा दिवस असल्याने येथे स्नान केल्यास तुला मोठे प्राधान्य लाभेल.'

युधिष्ठिर म्हणाला, 'मर्म समजल्याशिवाय मी स्नान कसा बरे करणार! म्हणून आधी मला येथील माहात्म्य सांगा. ते सांगितल्याशिवाय मी स्नान करणार नाही.' धर्मराज म्हणाले, 'महात्म्य तुला नंतर कळून येईलच. पण आधी तुला सांगितल्यास येथील महिमा निघून जाईल म्हणून आधी तू स्नान कर.' कसाबसा युधिष्ठिर स्नानास तयार झाला व ते दोघे त्या कूपाजवळ जाऊ लागले. तो ते एक नरककुंड असून अग्निच्या योगाने धगधगत असल्याचे युधिष्ठिरास समजून आले. तेथील तिव्र दुर्गंध व धगधगत्या अग्नीची आंच युधिष्ठिरास सहन होईना. युधिष्ठिर पुढे जात नाही असे पाहून यमधर्म म्हणाला, 'युधिष्ठिरा विचार कसला करतोस अरे मार एकदम उडी त्या कूपात आणि मिळव सारे श्रेय येथील माहात्म्याचें, विचार करीत बसशिल तर आलेली संधी गमावशील.' युधिष्ठिर म्हणाला, 'महाराज मला क्षमा करा, माझ्यावर कृपा करा, माझ्याने येथील दुर्गंध व अग्नीची आंच सुध्दां सहन होत नाही आणि आपण अत्याग्रहाने या कूपात स्नान करायला सांगत आहांत. काय करावे या संभ्रमात मी सांपडलो. माझ्यावर अनुग्रह करून मला या संकटातून दुःखातून मुक्त करा. मी स्नान करूं शकत नाही.' धर्मराजा म्हणाला, 'अरे आजच तूं असे विपरीत

काय बोलतोस आतापर्यंत सारी संकटे सारे दुःख तू निमुटपणे सहन केलेस. आणि आजच तुझी अशी विपरीत मति कां झाली? तू जर प्रतिकार करशील तर श्रेय जाईल. त्यापेक्षा माझी एक गोष्ट ऐक. तुला स्नान करायचे नसल्यास नुसता एक चरण तरी या कूपात धू.' धर्मराजाच्या आज्ञेप्रमाणे युधिष्ठिराने चालता चालता भीत भीत एक पाय त्या कूपात घातला. अनामिक पण निराधार भीतीने राजा युधिष्ठिर थरथर कापू लागला. त्याने कूपात पाय घातला पण आंगठा बुडतो न बुडतो तोच त्याने पाय वर खेचला. तेवढ्याने त्याच्या शरीरात जणू प्रत्यक्ष अग्नीने प्रवेश केला असे त्यास वाटू लागले. त्याचे अंग धगधगूं लागले; अत्यंत तिव्र दाहाने तो पाय झाडू लागला तो त्याच्या पायाला कूपातून चिटकून आलेले जंतू खाली पडू लागले व जमिनीवर पडताच ते जंतू मानवी आकार घेऊ लागले. हे आश्चर्य पाहून युधिष्ठिर विस्मय चकित झाला. (श्लोक १६०५-१६१३)

युधिष्ठिराच्या अंगठ्याला चिटकून आलेल्या जंतूपासून एकेक असे नऊ कोटी जीवात्मे तेथे प्रगट झाले व हात जोडून युधिष्ठिरास विनवूं लागले. ते म्हणाले 'हे परमपावन धर्मात्मा तुझ्या संसर्गात आमचा सारा पाप परिमल नाहीसा झाला. दिर्घकाळापासून खिचपत पडलेल्या, नरकाग्नित तापलेल्या आम्हा पतित जीवात्म्यांना आपल्या सूक्ष्म स्पर्शाने परम सुशीतल शांत व पवित्र केलेले आहे. आम्हाला क्षणभर तुझ्या या पवित्र शांत सुशीतल सान्निध्यात राहू दे. युधिष्ठिर त्या जीवात्म्यांची केविलवाणी स्थिती व विनम्र प्रार्थना ऐकून विस्मयतेने त्यांच्याकडे पाहू लागला तो त्यास आपलीच पाच मुले (द्रौपदीपासून झालेली पांडवांची मुले) आपल्या पक्षाकडील कित्त्येक सैनिक, काशिनरेश, भोजपुत्र माळवा नरेश, महिपाल राजा वगैरे अनेक रथी महारथी राजे योध्दे, महायोध्दे, त्यास दिसून आले. ते पाहून युधिष्ठिराचे मन साशंक झाले. म्हणून त्याने धर्मराजास त्याचे कारण विचारले धर्मराजा म्हणाला, 'युधिष्ठिरा हे जीवात्मे दुष्ट कौरवांच्या हातून मारले गेले. म्हणून दुःखित होऊन ते या अवगतीला प्राप्त झाले.' राजा म्हणाला, 'पण शास्त्रवचन आहे कीं रणांगणात जो वीर पडतो तो स्वर्गात जातो मग या जीवात्म्यांना ही दुर्गति कां भोगावी लागली?' धर्मराज म्हणाला, 'तू म्हणतोस ते बरोबर आहे पण कौरवांच्या हातून मारले गेल्याने त्यांना आतापर्यंत हे दुःख भोगावे लागले. पण आता त्यांच्या दुःखाचा भोग संपला असून तुझ्या संसर्गाने ते कर्मबंधाच्या फेऱ्यातून मुक्त झालेले आहेत. रणांगणात जे जीवाच्या भीतिने भित्र्या भागुबाई प्रमाणे पळून जातात. त्यांना कायर असे म्हणतात. ते मृत्यूनंतर

इहलोकास व परलोकासही मुकतात त्यांना कायमचे नरकागारात खिचपत पडावे लागते. राजा तुझ्या पुण्यप्रतापाने आणि या जीवात्म्यांच्या सद्भावाने नऊ करोडी जीवमुक्त होतील पण अजून अठरा कोटी जीव त्या कुपात आहेस. हे युधिष्ठिरा तूं आता चांगल्या शुध्द शीतल पाण्याने पाय धुऊन टाक.' धर्मराजा युधिष्ठिराच्या पायास जणू आगच लागलेली होती. एवढे ते दुःख अपार होते. त्याच्याने तो दुःखभार मुळीच सहन होत नव्हता. तरी सुध्दां तो म्हणाला, 'हे महाराज अजून अठरा कोटी जीवात्मे जर या नरककुंडात असले तर त्यांच्या मुक्ततेसाठी मी या कुंडात स्नान करतो. हे स्वामी आपण मला आज्ञा द्यावी. मी या कूपात उडी घालतो. बिचाऱ्या साऱ्या जीवात्म्यांना तरी मुक्ती मिळेल. माझ्या जीवाचे कांहीही होवो. आता मी या जीवाचा मोह करणार नाही. मला जर हे आधीच कळले असते तर मी हे पुण्यकार्य टाळले नसते.' असे म्हणून युधिष्ठिर कूपात उडी घेण्यास सिध्द झाला. पण भगवान यमधर्म त्यास म्हणाले, 'थांब युधिष्ठिरा, आता विनाकारण आत्मनाश करून घेऊ नकोस. आता तूं कितीही प्रयत्न केलास तरी आंत राहिलेले जीवात्मे सुट्ट शकणार नाही. तो वेळ, तो महिमा आता निघून गेलेला आहे. ती पर्वणी आता राहिली नाही. वेळेलाच खरे महत्व असते. व्रत, उपवास, जप, तप वगैरे सर्व योग्य वेळीच फलप्रद होत असतात. ज्याप्रमाणे ऋतुशिवाय फलप्राप्ती नाही, तद्वत आता तो महिमा निघून गेल्याने विनाकारण पश्चात्ताप करण्यात काय अर्थ. मुकाट्याने आतां पाय धुवून काढ.' (श्लोक १६१४-१६२३)

युधिष्ठिर यमधर्मास म्हणाला, 'हे तात या तप्तकूपातून हे नऊकोटी जीवात्मे जे वर आले ते उध्दरले गेले असे आपण म्हणता ते कसे व कां या माझ्या शंकेचे आपण समाधान करून द्यावे.' तेव्हा धर्मराज म्हणाला, 'हे युधिष्ठिरा, त्रेता युग संपून द्वापारयुगास सुरुवात झाली तेव्हापासून श्रीकृष्ण अवताराचे प्राधान्य सुरु झाले. सतगुरु वेदमूर्ति व्यास हे या युगाचे सत्यधर्माचे युग प्रवर्तक होत, व्रत सोमवती अमावशा, दाग अग्नीदाग, दान कपिलादान, दक्षिणदिशा प्राधान्यभूत, सामवेद प्रमाण अशा प्रकारचा हा युगधर्म व्यासांनी द्वापारयुगात प्रचलित केला. त्या युगधर्मानुसार वेदव्यासांनी सत्तावीस कोटी जीवात्म्यांना सत्यधर्माची दिक्षा नियम धर्म दिला. त्यापैकी नवकोटी जीवात्मे पूर्णपणे नीतिनियमाने वागणारे होते. तरी कांही पूर्वसंचित दोषामुळे या संसारकूपात नरक यातना भोगीत पडलेले होते, तुझ्या चरण स्पर्शाने म्हणजे सद्भक्तांच्या पुण्यप्रतापाने त्या जीवात्म्यांचा आता उध्दार होत आहे. कारण त्यांचा

कर्मविपाक संपला आहे. तुझ्या पुण्यकारक सत्संगाने त्यांचे संचितकर्म असेल नसेल तेवढे संपले. कारण त्यांनी सद्भक्तिच्या व निष्कामकर्म योगाचरणाने नवीन असे कोणतेच कर्म जोडले नव्हते. म्हणून ते जीवात्मे पुण्यपापांच्या संमिश्र क्रियाचरणाने भवगतीचे म्ह. जन्ममृत्यूचे दुःख भोगीत आहे. या जन्ममृत्यूच्या भोवऱ्यातून सुटण्याची त्यांची इच्छा असूनही ते सुटू शकत नाहीत. कारण, जरी त्यांनी गुरुकडून अनुग्रह घेतलेला असला तरी गुरुबोध त्यांच्या चित्तात ठसलेला नसतो. कर्मफलाची आसक्ति ते सोडू शकत नाही. म्हणून ते जन्ममरणाच्या उपाधीतून सुटत नाही. आणि बाकी राहिलेले नऊकोटी जीवात्मे हे कल्पान्तकाळापर्यंत तिथे नरक कुंडातच खिचपत पडणारे आहेत. कारण त्यांची कर्मेच मूळ तामस प्रवृत्तिची पापमय असतात. त्यांच्या कर्माचरणात पुण्याचा लवलेश नसतो. सदैव चोरी, हिंसा व्यभिचार, अनाचार आणि पापकर्मात ते आकंठ बुडालेले असतात. त्यांना कृतकर्माचा पश्चात्तापही होत नाही व हा पापकर्मदोष निवारण्यासाठी कांही उपाय करावा अशी इच्छासुध्दां त्यांना नसते असे मुक्कर म्हणजे अशुध्द पापी जीवात्मे या संसारकूपात कायमचेच भवदुःख नरकयातना भोगत असतात. त्यांचा कधीही कशानेही उध्दार होत नाही. परंतु कदाचित त्यांच्या चित्तात आपला सुध्दां उध्दार व्हावा अशी प्रबळ इच्छा जागृत झाल्यास संत महात्म्यांना अनन्यरीतीने शरण जाऊन कृतकर्माचा पश्चाताप करून फिरून त्या पापमय कर्मदोषात न अटकता सत्संग करील तर तो जीवात्मा सुध्दा ज्ञानाग्नीच्या योगाने कर्मदग्ध करून मुक्त होऊ शकतो. त्यास आत्मबल व गुरूबलाची आवश्यकता असते. असो, हे युधिष्ठिरा आता तुझ्या या चरणस्पर्शाने हे जे नऊ कोटी जीव वर आलेले आहेत त्यांच्या समवेत तू वैकुंठास जाशील पण आता तूं तुझा चरण आधी धुऊन काढ. तेव्हा युधिष्ठिरास आपल्या पायास होत असलेल्या वेदनांची स्मृति झाली व त्याने पाय धुतला. नव्वाणु वेळेसही पाय धुतला पण त्याची वेदना तीव्रता कमी होत नव्हती. त्या पायाच्या ससंर्गाने ते पाणी सुध्दां तीक्ष्ण विषमय होत होते. शंभराव्यांदा जेव्हा युधिष्ठिराने पाय धुतला तेव्हा ते पाणी एवढे दाहक होते कीं विंचूदंश झाल्यानंतर मनुष्यास जशा वेदना होतात तशा प्रकारच्या वेदना अजून युधिष्ठिराच्या शरीरास होत होत्या. म्हणून यमधर्माने ते विष विंचवांच्या नांगीत ठेवले व युधिष्ठिराच्या वेदना कमी केल्या, अशाप्रकारे नरकदुःख अत्यंत तिव्र विषाक्त व दाहक असते. म्हणून संतमहात्मे, सद्गुरु हे जीवात्म्यांना सदुपदेश देऊन त्यांना या यमयातनेतून सोडविण्याचा प्रयत्न करतात. (श्लोक १६२४-१६३४)

श्रीयमधर्म म्हणाले, 'हे राजा युधिष्ठिरा, भगवान श्रीहरीची कळा अपरिमीत, अनाकलनीय, अवर्णनीय आहे. त्याने योजलेली प्रत्येक गोष्ट मानवी मनाच्या पलिकडील आहे.' युधिष्ठिर म्हणाला, 'हे तात, मी तर अबोध अज्ञान आहे. भगवंताच्या लीला जाणण्यास मी अगदी असमर्थ आहे. अमन होऊन मी आपणास शरण आलेलो आहे. आपण मला त्या अविनाशी परब्रह्माच्या धामाप्रत घेऊन चालावे. अशी अनन्य शरणागत प्रार्थना करून भगवान श्रीहरीचे स्मरण करीत करीत धर्मराजाबरोबर युधिष्ठिर वैकुंठात जाऊन पोहोचला. धर्मराजाने आपल्या पुत्रास युधिष्ठिरास आपल्याबरोबर वैकुंठात आणून दाखल केले व धर्म आपल्या स्थानाप्रत निघून गेला. इकडे वैकुंठात भगवान श्रीहरीच्या मंदिरात प्रवेश करताच युधिष्ठिरास अपरिमित आनंद झाला. वैकुंठधामाची स्थिती व अलौकिक रचना पाहून राजा विस्मयचकित झाला. अत्यंत उल्हसीत अंत:करणाने त्याने भगवंताच्या मुख्यदालनात प्रवेश करताच त्याला समोरच वैकुंठपति नारायणाची परम सोज्वल मूर्ति मुख्य आसनावर आरूढ झालेली दिसून आली. त्यांच्यासमोर सान्निध्यांत अनेकानेक थोर ऋषि मुनि संत महात्म्ये त्याचे एकाग्रचित्ताने ध्यान करीत असलेले त्यास दिसून आले. त्या अमरापुरीत वैकुंठधामात भगवान श्रीहरीच्या या भव्य दिव्य उदात्त धामात युधिष्ठिराला दिसले की महासती द्रौपदी अत्यंत दिव्य कांतिमान अशा सुवर्ण आसनावर बसलेली आहे. चन्द्रकांत मण्याप्रमाणेतिची अंगकांति चमकत आहे. दासींच्या परिवारात ती सुखाने आपल्या आसनावर स्थिरावलेली आहे. आपले चारही भाऊ भीम, अर्जुन, नकुल, सहदेव सुध्दां दिव्यकांतीनेयुक्त दासदासी परिवारसमवेत आपापल्या आसनावर विराजमान झालेले आहे. सर्वांच्या पुढे माता कुंती बसलेली आहे आणि हे काय हा कर्ण, हा द्रोणाचार्य, भिष्माचार्य, हा दुर्योधन हे सारे कौरव, हा सर्व कौरवपांडवांचा परिवार या अमरापुरात विराजमान झालेला आहे. हे सर्व पाहून धर्मराजा युधिष्ठिराला अपरिमीत आनंद झाला. ते सर्व जण कल्पवृक्षांच्या छायेत बसून मनईच्छित आहार विहार करून आनंदाने डोलत आहेत. अनेक दासदासी देवकन्या परिवार त्यांच्या सेवेकरीता उपस्थित आहे. ते दासदासी त्यांची सेवा करीत आहे आणि ते सर्व श्रीहरीची सेवा करीत आहेत ते पाहून धर्मराजाचे मन अत्यंत गहिवरून आले. अत्यंत करूणार्द्रतेने त्याच्या नयनातून एकसारख्या गंगायमुना वाहू लागल्या. हात जोडून तशाच अवस्थेत तो पुढे धावला. हस्तिनापुराधिपती युधिष्ठिर येत आहे असे जाणून भगवान नारायण आपल्या आसनावरून उठले व आपल्या चरणी लागलेल्या युधिष्ठिरास वर उठवून आपल्या बाहुपाशात घेऊन हृदयाशी

लावले. भगवान आणि युधिष्ठिर क्षणभर एकरूप होऊन गेले. अखेर भगवंतांनी युधिष्ठिरास जवळच्याच आसनावर बसवून सेवकाद्वारे त्याचे पूजन करविले नंतर त्यास कुशल क्षेम वृत्त विचारले. ( श्लोक १६३५-१६४७ )

भगवान श्रीहरी म्हणाले, 'राजा युधिष्ठिरा, स्वप्रयत्नाने सदेहाने चालत येऊन तू वैकुंठधामात येऊन पोहोचला आहेस. खरोखर तू आदरास योग्य व धन्यतेस पात्र आहेस. पण तूं ज्या मार्गाने येथवर आलास तो मार्ग कशाप्रकारचा आहे हे कथन कर. तेव्हा धर्मराजा म्हणाला, 'हे श्रीपति तूं सर्वान्तर्यामी आहेस. साऱ्या घटना तूच घडवितोस. सुत्रधार तूं आहेस. आम्ही सारे कळसुत्री बाहुली प्रमाणे आहोत, प्रेमसूत्रदोरीने तूं या साऱ्या प्राण्यांना बांधलेले आहे. ती दोरी तू जशी खेचशील तशा प्रकारे ती बाहुली नाचत असते. माझ्याबाबत विचारशील तर माझ्या अनुभवाने मी सांगतो कीं वैकुंठधामाचा मार्ग अतिशय दुस्तर कष्टमय आहे. जागोजाग दुःखाच्या दऱ्या अरण्ये आहेत. ते ओलांडता ओलांडता जीवात्मा घायाळ होत असतो. पण तुझ्या नामामृत शिंचनाने जीवात्म्यास पुनर्जीवन पुनर्चैतन्य प्राप्त होऊन तुजप्रत येण्याची ओढ लागलेली असते. चित्तात सतत तुझंच स्मरण चिंतन ध्यान असल्याने तशा पक्या साधकाला बाकीच्या शोक मायामोहाच्या जाळ्यात अडकण्याची शक्यता नसते. तुझी आंतरिक सत्प्रेरणा त्या जीवात्म्यास दुर्गतीपासून वाचविते. सुरवातीला आमच्या साधनेतसुध्दां अनेक संकटे दुःखे आली. सुखदुःखाचे सारे तडाखे बसले. मोहाचे क्रोधाचे बरेच प्रसंग आले. पण त्या साऱ्यांतून तुझ्या कृपेने सुटलो. पुढे उत्तरापंथाला लागल्यावर मात्र सती द्रौपदी, नकुल, सहदेव, अर्जुन, भीम हे क्रमाक्रमाने खाली पडून निष्प्राण झाल्याने अतोनात शोक संताप, मानसिक ताप आला. शेवटी मानससरोवरावर पायाची अंगठी गळताच माझ्या ठायी राहिलेला सारा अहंकार गळून पडला. अतिशय क्षीणतेमुळे मला मूर्च्छा आली. प्रत्यक्ष मृत्युदेवतेने मला मार्गदर्शन करून येथवर आपल्या चरणाजवळ आणलेले आहे. हे भगवंता आता आपल्या चरणस्पर्शाने दर्शनाने साधनेचे सारे कष्ट कसे चुटकीसरशी पळाले आणि मला आपल्या दर्शनाचा निर्वेध आनंद प्राप्त झाला. जोपर्यंत तुझे दर्शन नव्हते तोपर्यंत शोकमोह, संताप वगैरे सर्व कांही होते पण आतां केवळ तुझे अमृतमय दर्शन सौख्य लाभले मी धन्य झालो. कृतार्थ झालो असे म्हणत राजाचा कंठ गहिवरून आला. श्रीहरीचे मुखावलोकन करीत असता त्याच्या नयनातून सारखे प्रेमळ आनंदाश्रु ओसंडत होते. त्याच्या चित्तात अष्ट सात्विक भाव जागृत झाले. अत्यंत सद्गदित अंतकरणाने त्याने प्रभुची विनवणी स्तुति केली. त्यांच्या चरणी मस्तक ठेवून नमन केले. त्यास तेथून उठण्याची इच्छाच होत नव्हती. भगवंतांनी त्यास उचलून हृदयाशी लावले. परोपरीने त्याची समजूत घातली.

भगवान श्रीहरी भक्तवत्सल आहेत. दीनदयाळु करूणासिंधू अशा भगवंतानी धर्मराजाच्या मस्तकावर आपला परमसुखदायक प्रेमळ वरदहस्त ठेवला व भगवान म्हणाले, 'हे प्रीय सद्भक्तांनो परमदु:खाचा हिमालय ओलांडून आतां तूं परमसुख साम्राज्यात आलेला आहेस. आतां येथे कोणती चिंता नाही. क्लेश नाही, नरकप्राय दु:ख नाही, केवळ सुखाचे आनंदाचे साम्राज्य. कल्पान्त काळापर्यंत याच आनंदरसाचे अमृतपान करायचे असे सांगून भगवंतांनी युधिष्ठिरास एक भव्य दिव्य तेजस्वी मणिरत्नमाणिक्यांनी सुशोभित असा महाल निवासास दिला. तिथे पाचही पांडव, सती द्रौपदी, माता कुंतीसह वास्तव्य करून राहिले. हजारो दासदासी देवकन्या त्यांच्यासेवेत सदैव उपस्थित राहून त्यांची सेवा करीत व ते नित्य अहर्निश भगवंताची सेवापूजा ध्यान करीत त्यांच्या सान्निध्यात राहून वार्तालाप करीत. अशारितीने मृत्यूलोकांतील मानवी जीवनात सत्वपालनासाठी अपार कसोटी सहन करून सत्यधर्माप्रमाणे वागून, योग साधना करीत करीत शेवटी त्यांनी चिरंजीवीत्व प्राप्त केले. सद्भक्त पांडव अमर झाले. अमरधामांत नऊकोटी जीवात्म्यासोबत भगवंताच्या सायुज्य मुक्तिच्या आनंदात तल्लीन झाले.

(श्लोक १६४८-१६६५)

पाचही पांडव सुखाने आनंदाने वैकुंठधामात वास्तव्य करून राहिले. अमरापुरीच्या स्वर्गीय दिव्य सुखोपभोगात त्यांना कसलीच उणीव नव्हती पण या स्थूल देहाने चालत जाऊन धर्मराजा वैकुंठात पाहोचला होता. म्हणून त्याचा देह अजून मलीन म्ह. स्थूल मृत्तिकेचा होता. बाकीच्या साऱ्यांचा देह मृत्यूलोकातच गळाल्याने ते दिव्य देही कांतीमान तेजस्वी होते. म्हणून भगवंतांनी देवदूतास धर्मराजाचा स्थूल देह नष्ट करण्याची आज्ञा केली. एकदा राजा धर्म आळसावून क्षणभर झोपला असता देवदूतांनी त्याच्या स्थूल देहाची खोळ काढून टाकली. स्वप्नात एखादा फटका बसावा तसा धर्मराजा दचकून जागा झाला. पाहतो तो आपला देह अत्यंत तेजस्वी दिव्य कांतिमान झालेला असून सात्विकतेच्या दिव्य तेजाचा वर्षाव सर्वत्र होत असल्याचे धर्मराजास दिसून आले. तसाच उठून तो भगवंताच्या दर्शनासाठी आनंदाने धावला. हर्षातिरेकाने त्याने भगवंतचरणी मिठी घातली. कोट्यावधी सूर्य उदीत व्हावे त्याप्रमाणे भगवंताची दिव्य कांति झगमगत होती. त्या दिव्यज्योतीच्या स्वरूपदर्शनात धर्मराजा तद्रूप झाला. क्षणानंतर भगवंतांनी त्याला त्या दिव्य ज्योतिस्वरूप साक्षात्कारातून जागृत करून म्हटले, 'राजा आता तू सुखाने या अमरापुरीचे साम्राज्य वैभव भोग. हे सारे तुझे बंधू, सति वगैरे तुझ्या सेवेत तत्पर राहतील. तूं नऊकोटी जीवात्म्यांचा उध्दारक मुखी

म्हणून येथे राहशील. या रत्नखचित हिंदोळ्यावर बसून, कल्पवृक्षाच्या अमृतफळाचा आहार करून सुखाने आनंदसागरात तल्लीन होऊन राहा. कधीही ओसरणार नाहीत, आटणार नाहीत, अशाप्रकारची ही दिव्य सुखे आहेत. मृत्युलोकांत सत्‌धर्माने वागून इंद्रियदमन संयमन करून जो आत्मज्ञान संपादन करून योगसाधन करतो, तो मुमुक्षु जीवात्मा या स्थानाप्रत येऊन या आनंदसागरात वसतो. हाच मूळ सनातन मार्ग आहे. पूर्णतेचा मार्ग सत् पथ सत्पंथ आहे. येथून कधीही जिवात्म्याचे पुनरावर्तन होत नाही. जीवन्मुक्त विदेहमुक्त महात्म्यांचे हेच अंतिम स्थान वैकुंठधाम अमरधाम निजधाम होय. आतां तुम्ही सारे जण सुखाने या वैकुंठपुरीचे सुखोपभोग भोगा, मी मृत्यूलोकांत जाऊन पुढील मार्गाची सत्यधर्ममार्गाची तजवीज करतो. अनंत कोटी जीवात्मे मुक्तीची इच्छा मनात धरून माझी आर्ततेने आळवणी करून वाट पहात आहेत. त्यांच्या मुक्तीकरिता मला युगानुसार धर्ममार्ग आखून द्यायचा आहे.' भगवंताचे वचन ऐकून धर्मराजा म्हणाला, 'हे स्वामी नाथ, तुमच्याशिवाय आम्ही या वैकुंठधामात राहू शकणार नाही. गायीशिवाय वासरू राहूच शकत नाही. मातेशिवाय बालक राहू शकत नाही, तद्वत आपल्याशिवाय आम्ही येथे राहणार नाही. जिथे आपले नित्य दर्शन नाही, संभाषण नाही सान्निध्य नाही असा वैकुंठ लोक असला तरी काय पण तो आम्हाला नको. आम्हाला वैकुंठलोकाशी अमरापुरीशी कर्तव्य नाही. आपल्या चरणाशी कर्तव्य आहे. सोळा शृंगाराने युक्त अशी स्त्री असली पण मुख्यशृंगार असा पतिच तिला नसला तर तिच्या त्या शृंगाराला काय अर्थ? म्हणून आमचा मुख्य अलंकार आपले चरण आहे ते जिथे असतील तिथे आम्ही जाऊ. आपण आम्हालाही आपल्यासोबत मृत्युलोकात घेऊन चला. तुमच्याशिवाय आम्ही येथे राहणार नाही. आमचे हे मागणे आपण पूर्ण करावे. आम्हाला आपण सतत आपल्या सान्निध्यात ठेवावे. त्यासाठी जन्ममरणाचे दु:ख जरी भोगावे लागले तरी ते आम्ही पत्करू पण आपणापासून दूर लोटू नका. धर्मराजा व पांडवांची विनंती ऐकून भगवंताचा कंठ गहिवरून आला, ते म्हणाले, 'अहाहा, धन्य माझे भक्त! अशा या भक्तांनीच खरोखर मला प्राधान्य मिळवून दिले आहे. हे सद्भक्तांनो तुमची सारी मनोकामना पूर्ण होईल.' (श्लोक १६६६-१६७४)

कलियुगात भगवंतांनी सद्भक्तांच्या उध्दारासाठी मूळ सनातन धर्माचे युग परिवर्तनानुसार पुनर्रचना करण्याचे कार्य सुरु केले. त्यासाठी जगतात त्यांनी निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या देशात, राष्ट्रांत अनेकानेक संत महात्मा, सद्भक्त, सद्गुरु, अवतारी सत्पुरुष यांची गुप्ततेने योजना केली. त्या सत् ज्ञान सतधर्मप्रवर्तक, महात्म्यांनी देश, काल,

परिस्थिती अनुसार आत्मोन्नति करून सद्धर्माचा उपदेश करून सद्भक्तांना आत्मोन्नतिचे मार्गदर्शन केलेले आहे. तशा सद्भक्त महात्म्यांपैकी पांडवांना त्यांनी जी वास्तव्य भूमी दिली ती अनुक्रमे खालीलप्रमाणे आहे. भगवंतांनी धर्मराजाला सांगितले कीं 'हे धर्मराजा काश्मिरमध्ये वलोणी वंशात राघवराव व लोचनादेवी यांच्या घरी तूं अवतरशील तेच तुझे स्थानक आहे, तू काश्मिरमधील मोठा कार्यकर्ता, शासनकर्ता पुढारी होशील व माझ्या दहाव्या अवताराच्यावेळी मला मोठ्या सैन्यानिशी साहाय्य करशील. तसेच हे तुझे चारही भाऊसुध्दां त्या काळात म्ह. कलियुगाच्या शेवटच्या प्रहरात निरनिराळ्या ठिकाणी शासनकर्ते म्हणून प्रगट होऊन आपल्या सर्वांच्या संघटनेने विरोधी आसुरी शक्तिला नामशेष करतील. त्यांची स्थानके अशी उंच मुलतान म्हणजे पंजाबमध्ये पटवा कुळांत हिऱ्यांच्या व्यापाऱ्याच्या घरी उज्वल नेत्रांचा अर्जुन सुंदर तेजस्वी डोळ्यांनी युक्त प्रगट होईल. जालंदर देशात अमरकोट नगरात वलोणी आल वंशात उत्तम घराण्यात महाबळवंत शरीराचा भीम जाट रूपाने अवतरेल. त्याचे केस लांब व उलटे असतील अत्यंत बलभीम असा तो कुस्तीगीर मल्ल होईल. माळवा देशात उज्जैन नगरात दक्षिणेच्या बाजूस असलेल्या पट्टणपुरात शालऊ कुळात महागुणवान सत्वशील असा सहदेव प्रगट होईल. तसेच पूर्व बंगालमध्ये भोटनगरात कश्यप कुळात नकुल अवतरेल. अत्यंत सौंदर्यवान, कलाकौशल्याने युक्त धीर वीर पराक्रमी असा हा पंडू कूलनंदन नकुल प्रगट होऊन आपल्या साऱ्या शक्तिनिशी भगवान निकलंकी नारायणाला साहाय्य करील. भारतखंडाच्या नजिक पश्चिमेस असलेल्या भिलडी नगरांत माता कुंती आणि सती द्रौपदी अवतरून बालकुमारी बाल ब्रह्मचारिणी अशा त्या रणकार्य धुरंधर रणचंडिका देवीच जणू अवतरतील. भीलडीनगराच्या मुख्य शासनकर्त्या त्या होऊन स्त्री सैन्याच्या मुख्य त्या होतील व भगवान निकलंकी नारायणाला साहाय्य करतील.' अशाप्रकारे भगवंतांनी या प्रेमळ सद्भक्तांस त्यांची स्थाने नियुक्त करून आशिर्वाद दिला व सद्भक्त पांडव आपापल्या नियुक्त स्थानावर जाऊन गुप्तरूपाने वास्तव्य करून आपणास पोषक असे वातावरण निर्माण करण्यास उद्युक्त झाले. या साऱ्या सद्भक्तांचा अद्भूत रम्य असा मेळावा निकलंकी नारायणाच्या अवतारकार्यात सद्भक्तांना दिसून येईल. (श्लोक १६७५-१६८७)

सत्ययुगात सद्भक्त प्रल्हादासोबत पाच कोटी जीवात्म्ये अमरपदाला गेले, त्रेतायुगात सद्भक्त राजा हरिश्चन्द्र सात कोटी जीवात्म्यासमवेत वैकुंठास गेला. द्वापारयुगात सद्भक्त युधिष्ठिराबरोबर नऊ कोटी जीवात्म्यांचा उध्दार होऊन अमर झाले. तद्वत कलियुगात

ब्रह्मदर्शी अशा सद्गुरुंच्या मार्गदर्शनाने योग साधनेच्या आचरणाने बारा कोटी जीवात्मे देवगती पाऊन अमरभूमीचे निवासी झाले. हे चवथ्या करण कल्पातील सद्भक्त होत, पूर्वीच्या तीन कल्पात अनुक्रमें दशरायण कल्पात यक्ष, देवगुण कल्पात मेघा, पंखला कल्पात किन्नर असे जीवात्मे मुक्त झाले आता कलियुगाच्या शेवटच्या प्रहरात कल्पांत काळाच्या आधी हे अमरापुरीचे सारे जीवात्मे मुक्त गतीस जातील. त्यांची संख्या अगणित अशी राहील. करण कल्पाच्या शेवटी कलियुगाच्या अंति हा अनंत कोटींचा भरणा म्हणजे अनंत कोटी जीवात्म्यांच्या मुक्तीचा योग येईल. कल्पांतकाळात म्हणजे सर्गकाळात फक्त दोनच गति जीवात्म्यांच्या असतात. एक मुक्त गति आणि दुसरी बध्दगति. बध्दगति म्हणजे जे अपरिपक्व जीवात्म्ये संचित कर्मानुसार जन्ममरणाचे फेरे खात असतात. कल्पान्त काळात त्यांचे संचित शिल्लक असल्याने कर्मभोग भोगूनही शिल्लक राहिलेल्या संचित कर्माचे गाठोडे घेऊन जीवात्मा सूक्ष्म वासनात्मक बीज रूपाने परमेश्वराच्या व्यष्ठिस्वरूपात सामावला जातो. सर्गकाल संपल्यावर ते जीवात्मे पुन्हा प्रगट होऊन कर्मगतिची फळे उपभोगतात. अशाप्रकारे अनादिकाळापासून चालत आलेल्या या सनातन सत्पंथ मार्गाचे दिग्दर्शन करण्यासाठी या कलियुगात सद्गुरु महाराज ब्रह्मस्वरूपी इमामशाह रूपाने प्रगट होऊन त्यांनी सद्भक्तांना हे मार्गदर्शन केलेले आहे. कलियुगात शेवटचे प्रहरात भगवान शेषशाई नारायण निष्कलंकी नारायण नांवाने प्रगट होऊन दैत्यदुष्ट कालिंगाला मारून पृथ्वी निर्दानवी करून सद्भक्तांचा उध्दार करतील व नंतर वायु प्रलय, अग्नीप्रलय, जलप्रलय होऊन समष्टी नष्ट होईल. अशा या महाकठीण कल्पान्त काळात भगवान निकलंकी नारायण हा शेवटचा अवतार धारण करतील. भरतखंडातील जबुंद्विपात कुवारीका क्षेत्रावर साबरमती नदीतीरावर हिमपुरी अथवा इमामपुरी म्हणून सद्गुरु ब्रह्माची अखंड ज्योतिची स्थापना होऊन स्थान मांडले जाईल. तेथे हा निकलंकी अवतार येऊन तेथूनच राज्यकारभाराची सर्वसुत्रे चालतील. देशोदेशीच्या राज्यकर्त्या पुरुषांची संघटना येथेच घडून येईल व दानवी शक्ति असलेल्या चीनदेश व तेथील शासनकर्त्यांशीं जागतिक स्वरूपाचा लढा होईल. त्यात चीनदेश आपल्या आसुरी शक्तिनिशी पूर्णपणे नष्टप्राय होईल व साऱ्या जगतात एकमेव निष्कलंकी नारायणाची अखंडीत अबाधित सत्ता चालेल त्यांत मानवी जीवन उन्नतीच्या ऐहिक, लौकिक, पारमार्थिक, धार्मिक, मुक्तीप्रद अशा गोष्टींचा समावेश असेल. अशा त्या समृध्दीच्या काळात सत्यवान पुण्यवान जीवात्मे आपले अंतिम ध्येय साध्य करतील व अनंत सूर्य, असंख्य चंद्र ज्याच्या चरणी उदीत झालेले आहे अशा त्या परम तेजोमय निष्कलंकी नारायणाच्या तेजस्वी नूर स्वरूपात ते जीवात्मे लय पावतील.

सद्गुरु इमामशाह महाराज सांगतात हे सद्भक्तांनो सत्च्या उपासकांनो हे भगवंताच्या अवतारपात्राचे व आत्मोन्नतीचे संपूर्ण ज्ञान तुम्ही आपल्या चित्तात यथार्थतेने धारण करा. नवव्या बुध्द अवताराच्या अवतारक्षेत्रातील सद्भक्तांचे लीलाचरित्र येथे पूर्ण झाले. सद्गुरु वेद व्यासांनी द्वापार युगात सामवेदानुसार नियत केलेला युगधर्म येथे संपुष्टात आला. चार लाख बत्तीस हजार वर्षांचा बुध्द अवताराचा काळ एका क्षणात एका प्रहराभराप्रमाणे निघून गेला. आठ लाख चौसष्ट हजार वर्षे हे द्वापार युगाचे प्रमाण होते. त्याकाळात भगवंतांनी श्रीकृष्ण व श्रीबुध्द अवताराचा काळ एका क्षणात एका प्रहराभराप्रमाणे निघून गेला. आठ लाख चौसष्ट हजार वर्षे हे द्वापार युगाचे प्रमाण होते. त्याकाळात भगवंतांनी श्रीकृष्ण व श्रीबुध्द अवतार धारण करून अनंत लीलाचरित्र केले. आपल्या स्वत:च्या जीवनपध्दतीवरून पूर्णत्वास पोहोचलेल्या मानवाने कशारीतीने वागावे याबद्दल नीतीपाठ देऊन स्वत: भगवंतांनी आचरण करून जगतासमोर स्वत:चा आदर्श ठेवला. अनादिकाळापासून चालत आलेल्या सनातन ध्यान, योग, ज्ञानमार्गाचे दिग्दर्शन करून नवीन युगाला अनुरुप अशा ज्ञानाची शिकवण त्यांनी दिली. मानवी जीवन पूर्णावस्थेत जातांना ज्या अडचणी येतात, ज्या घटना घडतात, त्या साऱ्यांचे दिग्दर्शन भगवान श्रीकृष्णांच्या चरित्रातून उधृत झालेले आहे. आत्मज्ञान प्राप्तीनंतर येणाऱ्या समबुध्द अवस्थेचे दिग्दर्शन भगवानबुध्दांनी केलेल्या उपदेशाने आणि पांडवांच्या स्वर्गारोहण पर्वाने करून दिलेले आहे. जो हे संपूर्ण ज्ञान सद्सद्विवेक बुध्दीने ग्रहण करील तो जीवनांत अमरफल चाखेल. ज्यास सत्पंथ ज्ञान मार्गानुसार युगधर्माची जाणीव झाली व त्यानुसार वागून ज्याने आपले जीवन उन्नत करण्याचा प्रयत्न केला ते अमरापुरी पदाचे अधिकारी झाले असे समजावे. अशाप्रकारे भगवान श्रीहरीच्या नवव्याबुध्द अवताराचे वर्णन येथे पूर्ण झाले अशी सद्गुरु श्रीइमामशाह महाराजांनी ही दिव्य वाणीकथन केलेली आहे. (श्लोक १६८८-१७०२)

इति श्रीबुध्दअवतार समाप्त

।। ॐ तत् सत् परब्रह्मार्पणमस्तु ।।



# ॐ श्री निष्कलंकी नारायण अवतार



अधर्मनो नाश करवा अनंत करोडी जीवोने उध्दारवा ।
ॐ कारथी निष्कलंकी रूपे प्रगटसे सळगती पृथ्वीने उगारवा ।।

॥ श्रीमत्परब्रह्मपरमात्मने नमः ॥

# दशमो श्री निकलंकी अवतार प्रारंभ

वैशाख शुध्द बीज शुक्रवार या दिवशी कलियुगाला सुरुवात झाली. द्वापारयुगाच्या शेवटी सद्भक्त पांडवांनी बुध्दांच्या सागितल्याप्रमाणे स्वर्गारोहणास प्रयाण केले त्याच रात्री कलियुगाला सुरुवात झाली. बुधवारची पूर्ण अमावस्या गुरुवारच्या दिवशी सूर्यास्तापर्यंत पाडवा व शुक्रवारच्या दिवशी पूर्ण बीज असून चंद्रदर्शन असेल तर ते या कलियुगातील महान व्रत समजावे. त्याला अजवालीबीज, थोरबीज असे म्हणतात. अशा व्रताच्या दिवशी बारा प्रहराचा निरंकार, निर्जल, निराहार उपवास करून व्रत करतात. कारण कलियुगाचे मंड्याण म्हणजे मांडणी बुधवारच्या अमावस्येला मांडली जाऊन शुक्रवार चंद्रदर्शनाच्या दिवशी त्यास सुरुवात झाली. म्हणून हे अजवालीबीजेचे व्रत युगधर्मानुसार युगतिथीचे व्रत गणले गेले. प्रत्येक महिन्याच्या चंद्रदर्शनास चार प्रहराचा म्ह. चंद्रदर्शनाच्या दिवशीच फक्त निरंकार, निर्जल उपवास करायचा असतो त्यास बालेन्दु अथवा बालार्कदर्शन व्रत असे म्हणतात. कलियुगात अथर्ववेदाला प्राधान्य म्हणजे प्रधानपदी असल्याने अथर्ववेदानुसार ज्ञान, ध्यान, योग साधनेला प्रामाण्य आहे. संपूर्ण यज्ञकार्यात अथर्ववेद हा श्रेष्ठ असा ब्रह्मपदी असतो कारण तो ज्ञानाने व आत्मविद्येने श्रेष्ठ आहे. मानवी जीवन सुखी समृध्द व उन्नत करण्यासाठी विविध देवतार्चन आणि यज्ञयाग आदि विधींचे मंत्र वगैरे तीनही वेदामधून विस्तारलेले आहेत. पण मानवी जीवनाचे अंतीम ध्येय, मोक्ष साध्य करण्याची जी विद्या आहे, विधी आहे तिचा समावेश फक्त अथर्ववेदात ब्रह्मविद्या या उपविभागात झालेला आहे. अथर्ववेदाची सर्व उपनिषदे या ब्रह्मविद्येनेच ओतप्रोत भरलेली आहेत. त्या मूळ सनातन सत् मार्गाच्याच आचरणाने जीवात्मे जीवन्मुक्त होऊन विदेही झालेले आहेत. तोच मूळ सनातन सत् मार्ग-मुक्तीचा मार्ग, ब्रह्मानुभूति लाभलेले आधिकारीक महात्मा सद्गुरु इमामशाह महाराज यांनी सत्भक्तांना सतपंथ रूपाने दिग्दर्शित केलेला आहे. युगधर्मानुसार आणि अथर्ववेदाच्या तत्वप्रणालीनुसार कलियुगात मुक्तीचा हाच एक साधनसंपन्न व सहजसाध्य सोपा मार्ग आहे. अथर्ववेदातील ब्रह्मविद्या ही अष्टांग योगसाध्य आहे. त्याचे संपूर्ण विवरण सद्गुरु इमामशाह महाराजांनी निकलंकी गीता व मुळबंध या ग्रंथामधून विषद केलेले आहे. अथर्ववेदातील योग साधनेनुसार ब्रह्मानूभूति लाभलेल्या महात्मा सद्गुरु इमामशाहांनी कलशपूजा आराधनेकरितां एक अथर्ववेदीमंत्राचा ग्रंथ उपदेशिला. त्यानुसार कलश घटपाटपूजा विधीचा अवलंब करून अग्नी, वायु, वरूण, इंद्र, चंद्र, सूर्य, यमधर्म, अर्यमा,

गायत्री, सरस्वती, लक्ष्मी, आद्यशक्ति आदि संपूर्ण विश्वाच्या देवीदेवतांची आराधना करता येते व त्यांच्या कृपाशिर्वादाने व आत्मबळाने मानवी जीवन सुखी, समृध्द, शुध्दपवित्र व उन्नत करता येते. मानवाची दैविक शक्ति सात्विक तेज वृद्धिंगत करता येते. ती पूजा एकप्रकारचा वरूण यज्ञ, जलयज्ञच होय. यज्ञात अग्नीच्या माध्यमाने देवदेतांच्या आहुत्या अर्पण केल्या जातात. या घटपाट कलशपूजा विधीनुसार जलाच्या माध्यमातून देवदेवतांना पूजन, अर्चन, नैवेद्य समर्पण व आराधन केले जाते. ज्योतिस्वरूपातून परब्रह्म परमात्म्याचे ध्यान केल्यास चित्ताची एकाग्रता लवकर होऊन जीवात्म्यास परमात्मसाक्षात्कार होण्यास सुलभता होते. म्हणून पूजायज्ञाचे वेळी शुध्दघृताच्या ज्योति लावून त्याची ध्यानधारणा करावी. पूजेच्या वेळेस ॐ प्रणवब्रह्माच्या स्मरणाने गुरुमंत्राचा जाप करावा. जाप शक्यतो सुक्ष्मतेने म्हणजे केवळ स्मरणानेच करावा. श्वासोच्छवासानुसार जापाकडे लक्ष केंद्रित केल्यास तो अजंपाजापच विशेष प्राध्यान्यभूत व शिघ्र फलप्रद होतो. ईश्वराच्या निर्गुण निराकार स्वरूपाच्या दर्शन साक्षात्कारास हा वर वर्णन केलेला सुलभ मार्ग सद्गुरुंनी कथन केलेला आहे. पण सृष्टीकार्याकरितां ईश्वराचा जो सगुण साकार अवतार प्रगट होऊन अवतारलीलाचरित्र करील त्या निकलंकी नारायण अवतारांचे आगम चरित्र सद्गुरु महाराजांनी अंतर्ज्ञान दृष्टीने जाणून जे कथन केलेले आहे त्याचे आतां वर्णन केले जात आहे.

भगवान श्रीहरी विष्णु नारायण या कलियुगांत शेवटच्या प्रहरी म्ह. कलियुगाच्या अंतसमयी निकलंकी नारायण हे नाव धारण करून अवतरतील. प्रगट होतील. तोपर्यंत गुप्तरूपाने संत महात्म्यांच्या रूपाने प्रगट होऊन निरनिराळ्या देशांत, निरिनिराळ्या नावाने प्रगट होऊन सद्भक्तांना अध्यात्मज्ञानाचा व मुक्तिमार्गाचा उपदेश करतील. ब्रह्मदेव सुध्दां गुप्तरूपाने गुरु अथवा सतगुरु रूपाने अवनीतलावर निरनिराळ्या भूमीत जन्मधारण करून लोकोध्दाराचा व जनजागृतीचा प्रयत्न करतील. आधिकारीक जीवन्मुक्त महात्मे ठिकठिकाणी सतगुरु ब्रह्मा, ब्रह्मस्वरूपी संतमहात्मा रूपाने प्रगट होऊन सत्भक्तांना सत्धर्माचे दिग्दर्शन करून मुक्तीमार्गाचे अनुयायी करतील. मध्य आशियातील अहिराखंडात अशाच प्रकारचे एक आधिकाधिक सतगुरु ब्रह्मस्वरूपी महात्मा शमस या नांवाने प्रगट होऊन सनातन मुक्तीमार्गाचा उपदेश सद्भक्तांना करीत असत. वंशपरंपरागत अध्यात्म ज्ञान साधनेचा अवलंब करून ब्रह्मानुभूति प्राप्त झालेल्या या महात्म्याने दीपस्तंभाप्रमाणे जगतातील अज्ञानांध जीवात्म्यांना मुक्तीमार्गाचा प्रकाश दाखविला तो मार्ग म्हणजे मूळ सनातन सत्पंथ मार्ग होय. या सतधर्माचा प्रचार व प्रसार करण्याकरितां त्या महात्म्याने स्वत: अपार कष्ट सहन करून जगतातील मुख्य अशा चोवीस देशांचा

प्रवास केला. प्रत्येक देशांत त्या त्या देशातील लोकभाषेतून त्यांनी उपदेश केलेला आहे. जन्मोजन्मीची दृढ तपश्चर्या व जीवात्म्यांच्या आत्मोध्दाराची कळकळ या गोष्टींची शिदोरी पाठीशी बांधून लोककल्याण व जनजागृति करण्यासाठी त्यांनी एकदा चीनदेशात प्रयाण केले. चीन देशातील लोकस्थिती, सामाजिक दुरावस्था व लोकांचे अज्ञान पाहून त्यांना फार कळवळा आला. द्वापारयुगाच्या अंती व कलियुगाच्या सुरुवातीस दैत्याचे स्थानक चीनमहाचीन देशात नियुक्त झाले. चीनदेश दैत्य कालिंगाच्या अधिपत्याखाली आला. दैत्य कालिंगा आपले मुख्य पांच सेनानी व चोवीस मुख्य प्रचारक परदेशातील दूत आणि अगणित अशा आपल्या सैनिकामार्फत देशांतील शांतता सुव्यवस्था व सुरक्षा डावलून अन्याय, चोरी, हिंसाचार, आक्रमक धोरण वगैरेमुळे अराजकता पसरवू लागला. सर्व प्रजा त्रस्थ होऊन अन्यायाला हिंसेला त्याच्या बळजोरीला बळी पडली. सर्वत्र अशांत असुरक्षित वातावरण निर्माण होऊन प्रजाहीत धोक्यांत आले. अशा प्रकारचे दुष्ट शासन दैत्य कालिंगा चिनी प्रजेवर गाजवूं लागला. प्रजेला दुसरा कोणीही सुयोग्य शास्ता त्राता न मिळाल्याने नाईलाजाने दैत्य कालिंगाचे शासन त्यांना मान्य करावे लागले. आता त्याने जसजसा कलियुगाचा प्रहर विस्तारीत होऊ लागला तसतसा जगतावर आपला अंमल वाढवून पगडा बसविला आणि कालिंगा म्हणजे प्रत्यक्ष कलियुग असे लोक म्हणू लागले. धार्मिक पूजा अर्चा यज्ञयाग, ज्ञानश्रवण, कथन, सत्संग, भजन, पूजन, किर्तन वगैरेंचा विध्वंस त्याने सुरु केला. प्रजेला अन्याय चोरी, हिंसा, व्यभिचार, दंभ वगैरे दुर्गुणांनी ठकवून, लुटून आपल्या भजनी लावू लागला. काम, क्रोध, लोभ, अहंकार, मत्सर वगैरेंच्या आहारी जाऊन ठिकठिकाणचे सुराज्ये नष्टभ्रष्ट करून अराजकता पसरवूं लागला व जगात मीच एक महान शास्ता आणि त्राता आहे असा सर्वत्र दबदबा निर्माण करू लागला. म्हणून त्याच्या या पाशवी कृत्यांना आळा घालण्यासाठी, त्याच्या अमानुष कृत्यांवर नियंत्रण घालण्यासाठी दैवी शक्तीचा प्रादुर्भाव तेथे व्हावा म्हणून सतगुरु ब्रह्मस्वरूपी शमस महाराजांनी प्रयत्न केला. तेथे जाऊन तेथील परिस्थिती न्याहाळून त्यांनी ठरविले की दैत्य कालिंगाच्या अभेद्य अशा बालेकिल्ल्यात खिंडार पाडून आत प्रवेश केल्याशिवाय आपला हेतु सिध्दीस जाणार नाही. म्हणून आपल्या साऱ्या योजनेची गुप्तता राहावी यासाठी आपल्या सिध्दीच्या बळावर त्यांनी पोपटरूप धारण केले व आत राजवाड्यातील बागेत प्रवेश केला. दैत्य कालिंगाचा महाल सात मजली भव्य व सुशोभित होता. चारही बाजूस फिरता येईल. अशाप्रकारचे सज्जे, गवाक्षे, दरवाजे त्यास लावलेली होती. बगीच्यात निरनिराळ्या प्रकारची फुलझाडे, फळझाडे व शोभीवंत झाडे लावलेली होती. अत्यंत

नयनरम्य सुंदर सुगंधित अशा त्या बगिच्यातील एका कदंब वृक्षावर सतगुरु ब्रह्मा पोपटरूप धारण करून बसले. मध्यान्ह काळात तेथे बगीच्यात अनेक पक्षी विश्रांती साठी येऊन बसले. त्यांचा तो किलबिलाट अत्यंत श्रवणीय व आल्हाददायक होता. त्या पक्षात बहुशः सुडा म्ह. पोपटच होते व बहुतेक सर्व पक्षी निरनिराळे हेल आवाज काढून दैत्य कालिंगाचेच नामस्मरण करीत आहेत असा भास होत होता. एवढी दैत्य कालिंगाची चराचरसृष्टीवरसुध्दां व्यापक स्वरूपाची छाप पडलेली होती. दैत्य कालिंगाची स्त्री सुरजाराणी अत्यंत साध्वी व पतिसेवापरायण होती. दैत्याच्या आसुरी सत्तेचा प्रभाव तिच्यावर सुध्दां असल्याने तीही दैत्य कालिंगाचे स्मरण चिंतन करीत असे. त्यादिवशी सुरजाराणी आपल्या महालाच्या गवाक्षात मोत्यांचे वीणकाम करीत बसलेली असतांना पक्षांचा किलबिलाट व ते करीत असलेले दैत्य कालिंगाचे गायन तिच्या कानावर पडले. तिच्या चित्तात एकप्रकारचा अननुभूत आनंद झाला म्हणून ती कुतुहलाने बगिच्यातील कंदब वृक्षावरील त्या पक्षांना पाहू लागली. तो तीस एक नविन प्रकारचा पोपट दिसला. त्या पक्षाचे रूप सौंदर्य व तेज पाहून व त्याच्या मुखातून मंदमधुर अशाप्रणवाचा ॐ चा उच्चार ऐकून सुरजाराणीला अत्यंत आश्र्चर्य वाटले. अत्यंत कुतुहलबुध्दीने ती त्या पोपटाचे निरीक्षण करू लागली.

(श्लोक १-१३)

दैत्य कालिंगाच्या राजवाड्यातील बगिच्यात त्या कदंब वृक्षावर अनेक जातीचे पक्षी व त्यात विशेष पोपट मधूर कुजन करून दैत्य कालिंगाचे नामस्मरण करीत होते. त्यांच्यामध्ये सतगुरु ब्रह्मा हे सुध्दां पोपटरूप धारण करून राजमहालाच्या समोरच्या फांदीवर बसून ॐ प्रणव ब्रह्माचे स्मरण व स्पष्ट उच्चार करीत बसलेले होते. त्यांचा तो प्रणवोच्चार ऐकून व त्या पक्षाचे सौंदर्य, नादमाधुर्य पाहून विस्मित झालेली सुरजाराणी आपल्या मनात विचार करीत आहे. हा अतिशय सुंदर पक्षी आजपर्यंत आपल्या पाहण्यातच आलेला नाही. हा अत्यंत सुंदर आणि अलौकिक दिव्य कांतीमान व नादमधूर वाणीचा पक्षी आपल्या देशातीलच नाही? तो कोणी तरी अलौकिक महात्मा अथवा स्वर्गीय देव यक्ष वा गंधर्व असावा त्याची वाणी अत्यंत धीरगंभीर व ब्रह्मस्वरूपी आहे. हा पक्षी मला हवा आहे. हा पक्षी सदैव आपल्याजवळ राहावा व सतत त्याची वाणी ऐकत राहावेसे मला वाटते. अरे कोणी दास सेवक आहे का महालात? या पक्षाला पकडून माझ्यावळ आणू देईल असा कोणी सेवक येथे आहे कां? सुरजा राणीच्या मनात आतां एकसारखी चिंता वाटू लागली कीं

जर थोडा उशीर झाला तर हा पक्षीच येथून उडून जाईल व आपली मनोकामना अपूर्ण राहील म्हणून मोठा आटापिटा करून ती सेवकांना हाक मारू लागली. इकडे सुरजाराणीचे लक्ष आता पूर्णपणे आपल्याकडे वेधले आहे असे जाणून पोपटस्वरूप सद्गुरु महात्मा अमृतोपम वाणीने एक एक शब्द असे अमौलिक उच्चारू लागले कि ते सुरजा राणीच्या हृदयात जाऊन भिडले व तिची जिज्ञासा अधिकाधिक जागृत होऊ लागली. जसजसा वेळ जाऊ लागला तसतसा तिचा जीव खालीवर होऊ लागला व ती आपल्या नोकरांना हुकूम सोडू लागली कीं कांहीही प्रयत्न करून वाटल्यास झाडावर जाळे टाकून या पोपटास पकडून आणा. उडून जाऊ देवू नका. या पोपटास पकडून माझ्याजवळ घेऊन या. जो आणून देईल त्याला अमूक इनाम मिळेल अशाप्रकारे बक्षिसाची सुध्दा लालूच दाखवून सुरजा राणीने सेवकाकडून पोपटास पकडण्याचा प्रयत्न केला. सुरजा राणीची ती धडपड व नोकरचाकराची धावपळ पाहून सतगुरुंना क्षणभर मौज वाटली. नंतर राणीची अधिरता व केवीलवाणी झालेली स्थिती पाहून सद्गुरु महाराज मधुर वाणीने म्हणाले, 'हे सुरजा देवी, मी तर अनंतावकाशांत स्वच्छंद विहार करणारा मुक्त व स्वतंत्र पक्षी आहे. मला पकडून बंदीशाळेत अथवा पिंजऱ्यात अडकवून तुझे कोणते कार्य साध्य होणार आहे? केवळ मनाच्या रंजनाकरिता जर तू मला बंदीस्त करशील तर तुझ्या मनाचे रंजन होईलच हे निश्चित नाही. म्हणून मला पकडण्याचा व्यर्थ खटाटोप करू नकोस. स्वतंत्रमुक्त राहूनसुध्दां मनोरंजनच काय पण सारे मनोरथ पूर्ण करता येतील. मी उडून जाईन अशी तुला जी भिती वाटत आहे ती अनाठाई आहे. हे महाराणी सुरजादेवी, जर तुझी इच्छा असेल मनापासून तुला वाटत असेल तर मी तेथेसुध्दा येईन. मला पकडून बंदिस्त करण्याची काहीही आवश्यकता नाही. हे सुरजाराणी, अथर्ववेदी ब्रह्मज्ञानाचा उपदेश करण्याकरितां व तुझ्या जिवीताचे सार्थक घडविण्याकरीता म्हणजे संसार बंधातून मुक्त करून अमरपदाची प्राप्ती करविण्यासाठी मी आलेलो आहे व तुझी हरकत नसेल तर मी तेथे तुझ्याजवळ येत आहे.' असे म्हणून त्या पोपटाने झाडावरून उड्डाण केले व महालाच्या कट्ट्यावर जाऊन बसला. त्याच गवाक्षात सुरजा राणी उभी राहून हे सर्व पाहात व ऐकत होती. (श्लोक १४-२५)

सुरजाराणीच्या महालाच्या सज्याच्या भींतीवर बसून पोपटरूप सतगुरु ब्रह्मा म्हणाले, 'हे सुरजा राणी आज तूं काही पूर्वकर्मदोषामुळे या दैत्यकालिंगाच्या घरी स्त्रीरूपाने आलेली आहे. तुझे पूर्वपुण्य बलवत्तर असल्याने अनेक सुसंस्कार तुझे ठायी रूजलेले

आहेत. पण त्यांना या असूरभूमीत उन्नत होण्यास वाव नसल्याने तुझ्या चित्तात ते संस्कार असेच कुजत पडलेले आहेत. बाई तुझी त्या सुसंस्काराच्या अभावी उन्नति नच झाली तर तुझा जन्म व्यर्थच जाईल. तुझा जन्म व्यर्थ नाश पावू नये म्हणून तुझ्या उध्दारार्थ तुला सन्मार्गदर्शन करावे हा उद्देश मनात धारण करून आलेलो आहे.' पोपटाच्या मुखातून हे वचन ऐकताच सुसंस्कारी सुरजाराणीच्या चित्तात एकदम लख्ख प्रकाश पडला व तिला आश्चर्य वाटले. तिच्या चित्तात असलेले सारे संस्कार जागृत झाले व ती दोनही हात जोडून पोपट स्वरूप सद्‌गुरु ब्रह्माला नमन करू लागली. ती म्हणाली, 'हे पोपट स्वरूप महात्मन् आपण कोण आहात हे पूर्णपणे जाणण्यास मी असमर्थ आहे. पण ज्याअर्थी आपल्या मुखातून ही अमृततुल्य महद उपकारक वाणी स्त्रवत आहे त्याअर्थी आपण ब्रह्मस्वरूपी महात्मा आहात व काहीतरी विशिष्ट हेतू धरून याठिकाणी आलेला आहात म्हणून आपल्या चित्तातील हेतू प्रगट करावा. मी आपल्या सेवेस तत्पर आहे. या दासीकडून यथायोग्य सेवेचा लाभ घ्यावा अशी मी आपल्या चरणारविंदी विनम्र प्रार्थना करते. आपण माझ्या जन्मवृत्ताबद्दल कळकळीने निवेदन केले त्याचा उद्देश काय हे सर्व स्पष्ट अर्थाने सांगण्याची मजवर कृपा करावी.' तेव्हा सद्‌गुरु ब्रह्मा म्हणाले, 'हे राणी सुरजादेवी मी तुला दोन शब्द सांगतो ते तू आपल्या चित्ताच्या ठायी ग्रहण कर. आम्ही या सृष्टीच्या आधीपासून अंतापर्यंत आर्त अर्थार्थी जिज्ञासु आणि ज्ञानी अश्या सत्‌भक्तांचे उध्दारक आहोत. सृष्टीच्या अनादिकाळापासून निरनिराळ्या युगात निरनिराळ्या रूपाने प्रगट होऊन सद्‌भक्तांना सुसंस्कारी, जीवात्म्यांना सुयोग्य सन्मार्माचे दिग्दर्शन करून मुक्तीमार्गाचे पांथस्थ करावे हे आमचे कार्य आहे. आज या कलियुगात हे सुरजा राणी तुला योग्य अशी सुसंस्कारी जाणून मुक्तिप्रद अशा अथर्ववेदी मार्गाचा उपदेश करावा व मुक्तिपदाची अधिकारीण करावे हा माझा उद्देश आणि प्रयत्न आहे. म्हणून आगम भविष्य कथन करून ईश्वरी योजनेची व लोकस्थितीची जाणीव करून द्यावी अशी माझी इच्छा आहे. आज या कलियुगात भगवान श्रीहरीने निकलंकी नारायण असे नाव धारण करून जंबुद्विपात अवतार घेतलेला आहे. त्याची जर तू भक्ति, उपासना, पूजा करशील तर तुझ्या कोटी जन्मांचे कल्याण होईल. आज तूं मुक्तिपद अशा सतपंथ धर्माचे सार जाणून आचरण करशील तर फिरून तुला या भवरूपी भ्रमंतीत भटकावे लागणार नाही.' हे वचन ऐकून सुरजाराणी आश्चर्यचकित झाली व तिने श्रध्दा, भक्तिभावपूर्वक नमन करून पोपटस्वरूप महात्म्यास आंत बोलावून आतिथ्य सेवा स्विकारावी अशी आग्रहाची विनंती केली. सद्‌गुरु ब्रह्मांनी आत जाऊन आपले

मूळचे स्वरूप प्रगट केले. सुरजाराणीने त्यांना आसन वगैरे देवून त्यावर बसविले व यथायोग्य आदरातिथ्य केले. ती म्हणाली, 'हे महात्म्या सतगुरुनाथ आपण मला हा उपदेश करीत आहांत हे योग्य आहे किंवा नाही हे समजण्यास मी असमर्थ आहे. कारण मी दैत्य कुळात जन्मलेली व जागतिक किर्तीच्या एका दैत्याधिपतीची पतिव्रता स्त्री आहे. आज पतीसेवा, कुळाचार, कुळदैवत पूजा, परंपरागत व्रते, नियम वगैरे हे सर्व सोडून श्रीहरीच्या भक्तिस लागले तर त्रिभुवनात माझी लाज नाही कां जाणार? लोक माझी निंदा करायला लागतील व मला दुषण देतील म्हणून हे सद्‌गुरुनाथ माझी अवहेलना होऊ नये. कुचंबणा होऊ नये व जीवीताचे सार्थक होईल असा सुयोग्य मार्ग आपण मला दाखवावा.' सरजाराणीने दिलेल्या आसनावर बसून सद्‌गुरु महाराज म्हणाले, 'हे सुरजादेवी पतिव्रता धर्म पाळणे, पतीसेवा परायण राहणे, हे स्त्रीयांचे आद्यकर्तव्य आहे. त्याचबरोबर मुलाबाळांची सेवा-योग्यसंगोपन करणे, घरातील साऱ्या कुटुंबीयाची योग्य देखभाल भरणपोषण सेवा करणे. आप्तईष्टमित्र परिवारातील हितसंबंधास जपणे समाजसेवा, ग्रामसेवा, राष्ट्रसेवा, देशसेवा वगैरे सर्व क्षेत्रांतील सेवाकार्य करणे लक्ष पुरविणे ही सुध्दां स्त्रीयांची कर्तव्ये असतात. म्हणजे पुरुषांच्या बरोबरीने योग्य ती जबाबदारी सांभाळून जनसेवा करणे हे जसे सुशिक्षित समाजधुरीण स्त्रीयांचे कर्तव्य आहे तसेच आपल्या घरातील कुटुंबियांची व देशातील जनतेची सर्वांगीण अभिवृध्दि व्हावी म्हणून ईश्वराची उपासना सेवाभक्ति करणे हे सुध्दां कर्तव्यच आहे. ऐहिक व लौकिक लाभाबरोबर पारमार्थिक अलौकिक असा लाभ जोडणे हे सुध्दां तुझ्यासारख्या सर्व समर्थ स्त्रीयांचे कर्तव्य आहे. हे सुरजाराणी, तू पतिव्रता नियमधर्म पालन कर. त्याच्याने तुला पारलौकिक सुख मिळेल पण जीवीताचे ध्येय जे तत्व (मोक्ष) ते मात्र मिळू शकणार नाही. मोक्ष मिळवण्यासाठी तुला स्वतःलाच प्रयत्न करावा लागेल. जन्ममृत्युच्या भवबंधातून मुक्त होण्याकरितां तुला मुक्तिमार्गाचे स्वतःच आचरण करावे लागेल. कारण या क्षेत्रांत प्रत्येक व्यक्तिला स्वतंत्र रितीने साधना करून ध्येय गाठायचे असते. पती-पत्नी, आई-बाप, भाऊबहिण वगैरे संबंध कितीही जिव्हाळ्याचे, प्रेमाचे असले तरी मृत्युच्या द्वारात प्रत्येकाला स्वतंत्ररीतीनेच प्रवेश करायचा असतो. तसेच साधन मार्गात प्रत्येकाला स्वतंत्ररितीनेच प्रवेश करायचा असतो. तसेच साधन मार्गात प्रत्येकाला स्वतंत्र रितीनेच साधना, तपस्या करून ईष्ट, साध्य करायचेआहे. म्हणून हे सुरजा राणी अनादिकालापासून जीवात्मे ज्या मार्गाच्या आचरणाने मुक्त झाले तोच मुळ सनातन अथर्ववेदी ज्ञानसाधनेचा मार्ग मी तुला उपदेशीतो. तू श्रवण कर व तुला योग्य वाटेल तसे आचरण कर.' (श्लोक २६-३८)

हे महाराणी सुरजादेवी क्रतायुगामध्यें प्राधान्यभूत वेद ऋग्वेद होता. सतगुरु ब्रह्मदेवांनी नारद सनकादि ऋषीवरांनी ऋग्वेदी युगधर्माचा प्रचार प्रसार जगतात केला. त्या सत्‌धर्माप्रमाणें आचरण करून पाच कोटी जीवात्मे सद्भक्त प्रल्हादाबरोबर अमरापुरीला जाऊन पोहोचले, अमरपदाला गेले. त्याकाळात भगवंताने चार अवतार धारण करून चार दैत्यांचा संहार केला. युगधर्मानुसार काळाला अनुरुप अशा सत्‌धर्माची स्थापना करून चार सद्भक्तांचा उध्दार केला व पूर्वकाळात त्या सद्भक्तांना दिलेले वचन पूर्ण केले. त्रेतायुगात सतगुरुब्रह्मा हे वशिष्ठरूपाने प्रगट झाले. त्यांनी यजुरवेदानुसार युगधर्माचे दिग्दर्शन केले. योगवशिष्ठासारख्या अध्यात्मज्ञान प्रचूर योगमार्गाचे मार्गदर्शन केले. त्यांनी दर्शविलेल्या युगधर्मानुसार ज्यांनी सत्‌धर्माचे आचरण केलेअसे सात कोटी जीवात्मे सद्भक्त हरिश्चन्द्र राजाबरोबर उध्दरले जाऊन अमरापुरीला गेले. सुष्टांचे पालन संरक्षण, दुष्टाचे निर्दालन आणि सत्‌धर्माचे पुनरूज्जीवन करण्यासाठी भगवंताने तीन अवतार धारण केले. तीन दैत्यांचा संहार केला व तीन सद्भक्तांचा उध्दार केला. द्वापारयुगात आम्ही (सद्‌गुरब्रह्मा) वेदमूर्ति व्यासांच्या रूपाने प्रगट होऊन सामवेदाच्या प्राधान्यभूत युगधर्माचा प्रसार केला. श्रीमद्‌भागवत, भगवद्गीता आदि ग्रंथाद्वारा मानवजीवनाचे उत्थान करण्याच्या ज्ञानाचा उपदेश करून सद्भक्तांना उर्ध्वगतीचामार्ग सुलभ करवून दिला. त्यांनी उपदेशिलेल्या युगधर्मानुसार आचरण करून नऊकोटी जीवात्मे सद्भक्त युधिष्ठिर पांडवाबरोबर वैकुंठपदाला पोहोचले. भगवंतांनी श्रीकृष्ण आणि बुध्द अवतार धारण करून सद्भक्तांना भक्तिमार्गाचे व मुक्तिमार्गाचे मार्गदर्शन केले. मानवजीवन कल्याणाच्या आड येणाऱ्या दुष्टबुध्दी दैत्याचा कंस दुर्योधन कौरवांचा संहार करून भुमीवरील भार हलका केला. हे सुरजाराणी आज कलियुगात सतगुरुब्रह्मा हे इमामशाह रूपाने अवतरतील. अथर्ववेद या युगाला प्रमाणभूत असल्याने त्यानुसार युगधर्माचे दिग्दर्शन करतील. सतगुरुब्रह्माची ज्ञानरूपी जागती ज्योत अथवा अमरकळा आहे ती अमर व सर्वव्यापी असल्याने निरनिराळ्या देशात निरनिराळ्या व्यक्तींच्या रूपाने प्रगट होऊन सद्‌भक्तांना - मुमुक्षुंना अथवा सत्‌साधकांना ते अध्यात्मज्ञानाचा योगशास्त्रांचा उपदेश करवून मुक्तीमार्गाचे पांथस्थ करतील. तशा अधिकारी संत महात्मा सद्‌गुरुकडून अनुग्रह घेऊन जे या मार्गाचे आचरण करतील ते अमरापुरीला जातील असे बाराकोटी जीवात्मे या युगामध्यें सदगुरुब्रह्मांच्या मार्गदर्शनाने व त्यांच्या स्वरूप साक्षात्कार दर्शनाने अमर होतील. या कलियुगात भगवंताचा एक प्रगट अवतार निकलंकी नारायण होऊन तो तुझा जो भ्रतार दैत्यकलिंगा आहे त्याचा नाश करणार आहे. सतगुरु ब्रह्मा व निकलंकी नारायण ज्या सत्‌धर्माचे दिग्दर्शन करतील तो सतधर्म म्हणजे अथर्ववेदीय अध्यात्म ब्रह्मविद्येचा योगमार्ग होय.

त्याचा प्रसार व प्रचार जगतात ते सर्वत्र करतील. पण चिनदेशात तुझ्या पतिचा त्याला विरोध होऊन वितुष्ट होईल. असूरराज्याधिपतीच्या आसुरी मदोन्मत्त पणाने दैत्य कालिंगा भांडण उपस्थित करून शेवटी निकलंकी नारायण व दैत्य कालिंगा यांचे युध्दात पर्यवसान होईल. सूरशक्ति व असूरशक्तिचा हा शेवटचा महाभयंकर संघर्ष होईल. त्यांत असूरशक्ति संपूर्णत: नाश पावेल. सुरशक्तीचा सत्धर्माचा विजय होईल व मग संपूर्ण सृष्टीचा विलय होईल. वगैरे ही सर्व हकिकत आगम भविष्य सांगण्यासाठी आणि हे सत्वशील सद्भक्त सुरजाराणी तुला जागृति देण्यासाठी मी येथवर आलेलो आहे. कारण तूं तुसंस्कारी आणि सत्वपालन करणारी योग्य अशी अधिकारीणी आहे.' (श्लोक ३९-५०)

सद्गुरु ब्रह्मा शमस सुरजाराणीला म्हणाले, 'हे सुरजाराणी मी तुला निश्चयाने जे कांही सांगत आहे ते तूं लक्षपूर्वक ऐक, ज्या करितां मला पोपटरुप धारण करून येथवर यावे लागले, तो माझा हेतू फार उदात्त व श्रेष्ठ आहे आणि तो तुझ्या जीवीताच्या आणि तुझ्या देशातील सद्भक्तांच्या कल्याणाचा आहे. मी सद्गुरु ब्रह्माचा एक अंशावतार असून सद्भक्तांना सन्मार्गदर्शक करणे हे माझे कार्य आहे. तूं एक सुसंस्कारी तपश्चर्यावान साध्वी आणि जगदुध्दारक शक्तीची पाईक असल्याने तुला जागृति देण्यासाठी मी आलेलो आहे. तुझ्या पुण्योदयाने अतिशय भाग्यवान सद्भक्त पुत्र कमलाकुंवर तुझ्या उदरी जन्मला आहे. त्याच्या पुण्यप्रभावाने व सद्भाव प्रेमभक्तिच्या बळाने अनंत कोटी जीवात्म्यांना सद्गती लाभेल. ह्या साऱ्या घटनांची जाणिव देण्यासाठी मी आलेलो आहे.' सद्गुरुंचे वचन ऐकून सुरजाराणी आश्चर्यचकित झाली व दोनही हात जोडून मस्तक नमवून पदर पसरून सद्गुरुंच्या चरणी लागली. अत्यंत गदगद वाणीने सद्गुरु महाराजांना ती म्हणाली, 'हे परमपावक जगदुध्दारक सद्गुरुनाथ आपण आम्हाला मोक्षमुक्तीचा मार्ग दाखववावा. आपण दीपस्तंभरूप आहांत आमच्या सारख्या भवसागरात गटांगळ्या खाणाऱ्या, भुललेल्या, चुकलेल्या, अज्ञानी पामरांना आपल्या सदुपदेशाचा प्रकाश दाखववावाअशी आमची आपल्या चरणारविंदी नम्र प्रार्थना आहे.' सुरजाराणीची प्रार्थना ऐकून व तीची विनयशील नम्र वाणी ऐकून सदगुरु महाराज म्हणाले, 'हे सुरजादेवी अनादि काळापासून विश्व ब्रह्मांडाला व्यापून असलेले जे चैतन्यमय सत्तत्व आहे त्याला आपल्या सद्विवेक बुध्दीने जाणून त्याचा साक्षात्कार करवून घेण्याचा जो मार्ग आहे तो अजर अमर अविनाशी मूळ सनातन सतपंथ मार्ग होय. हा मार्ग गुरुगम्य असल्याने योग्य अशा सत्पात्र ब्रह्मस्वरूपी महात्म्याकडून

उपदेश ग्रहण करून, उपनिषदादि सत्शास्त्रांचे अध्ययन करून आत्मज्ञान संपादन करावे आणि या मार्गाच्या तत्वांचे यमनियमादिकांचे यथामति यथाशक्ति पालन करणेहीच महदतपश्चर्याआहे. गुरुकडून अनुग्रह घेऊन त्यांच्या मार्गदर्शनानुसार जप, तप, व्रत व तपसाधन करावे व ज्योतिस्वरूपाच्या माध्यमातून ईश्वराचे ध्यान आपल्या हृदयात करावे, मन सतत अभ्यासाने व वैराग्यविचाराने आणि प्राणायामादिक साधनानेएकाग्र स्थिर करावे. अजपाजप, षडचक्रभेद्न, अनहदनादश्रवण हे सारे सद्गुरुंच्या सान्निध्यात राहून साधन करावे. धैर्याने, चिकाटीने व श्रध्देने हळूहळू या साधनांचा अभ्यास करीत गेल्यास शेवटी ईश्वराच्या सगुणसाकार निर्गुण, निराकार स्वरूपाचा साक्षात्कार होऊन अद्वैत सिध्दीने जीवात्मा मिटून परमात्मस्वरूप अजर अमर होतो. अशा प्रकारचा हा योगसाधना मार्ग अनादिकाळापासून चालत आलेला आहे. हाच आमचा सद्गुरु ब्रह्माचा मूळ सनातन सत्पंथ मार्ग आहे. त्याचाच उपदेश करण्यासाठी हे सुरजाराणी मी आलेलो आहे. हे राणी सुरजादेवी तूं सुध्दां या मार्गाचे आचरण करून मुक्ति मिळव. तू सुयोग्य संस्कारी आणि सत्वशील आहेस म्हणून तूच या मार्गाचे अवलंबन करूं शकशील. तुला या दानव राज्यात या मार्गावलंबनाविषयी विरोध होण्याची शक्यता आहे. पण अत्यंत धैर्याने व गुप्ततेने यामार्गाचे आचरण करशील तर तुझा आणि तुझ्या बरोबर अनंत कोटी जीवात्म्यांचा उध्दार तू करूं शकशील.' सद्गुरु महाराजांची वाणी ऐकून सुरजाराणीचे मन गहिवरून आले ती म्हणाली. 'हे सद्गुरुस्वामी आमच्या जीवीताच्या उध्दाराची चिंता आपण वाहता हे खरोखर आमचे थोर भाग्य आहे. आपली कृपादृष्टी सतत याबालकावर राहून आमच्याकडून आपली चरणसेवा घडावी हीच आमची अभिलाषा आहे. आम्ही आठ जण या घरांत एकदिल एकविचाराचे असूनआपण दर्शवाल त्या सत्धर्माचे पालन करण्यास तत्पर आहोत म्हणून आपण आम्हाला सत्पंथाचे मार्गदर्शन करावे; आपल्या शिकवणुकीप्रमाणे ज्ञानश्रवण, मनन चर्चा व साधना आम्ही करूं म्हणून आमच्यावर कृपा करून अनुग्रह करावा. सुरजाराणी आणि कमलाकुंवर यांच्या विनंतीचे मर्म जाणून सद्गुरु महाराजांनी त्यांच्यावर कृपा केली व सतपंथाचे दिग्दर्शन केले. (श्लोक ५१-६१)

सुरजाराणी आणि तिच्या परिवारातील कमलाकुंवर आदि सात मुलें हात जोडून सद्गुरुसमोर नम्र भावाने उभे राहिले आणि ज्ञानोपदेश करण्यासाठी विनवू लागले. प्रत्यक्ष चंद्रकिरण अंगावर पडताच चन्द्रकान्त मणि जसा पाझरू लागतो. तद्वत अत्यंत विनयशील जिज्ञासु सद्भक्तांची ती ज्ञानग्रहण करण्याची तत्परता पाहून सद्गुरु महाराजांचे

हृदय प्रेमार्द्रतेने स्त्रवूं लागले. आपल्या धीरगंभीर तत्वप्रचूर वाणीने ते म्हणाले, 'हे परमप्रीय सद्भक्त सुहृदजनहो! या, असे माझ्यासमोर खाली बसा व मी तुम्हाला सत्पंथाची थोडक्यात रूपरेषा सांगतो, समज देतो, शिकवण सांगतो ते तुम्ही एकाग्रतेने श्रवण करून मनन व निदिध्यास करा. त्यासाठी मनाचा प्रथम एकान्त साधा ज्ञान ध्यान साधनेसाठी मनाची एकाग्रता, शांतता व स्थिरता हे फार महत्वाचे आहे. दररोज नित्य नियमाने आपल्या उपजीविकेस आवश्यक असा सचोटीने व्यवसाय कामकाज धंदा करा परंतु संध्याकाळी व रात्री मात्र परमेश्वराचे दास सेवक होऊन रहा. आरती, पूजा, अर्चा, सायंसंध्या वगैरे नित्यकर्मे करून परमेश्वराची आणि सद्गुरुंची सेवा म्हणजे नामस्मरण चिंतन करा. गुरु गतगंगेत अथवा सत्संगात कोणीही कोणाची निंदा, द्वेष करू नये. गुरु मेळाव्यात जाऊन सर्वांना अत्यंत नम्रभावाने प्रणाम करावा व गुरु महाराजांना साष्टांग नमस्कार करावा, सत्संगात तुम्ही गुरु मुखातून ज्ञान मिळविण्याचा प्रयत्नकरा. संध्याकाळचा वेळ सर्वांना सोयीस्कर व निवांत असल्यामुळे ज्ञानश्रवणास व संध्यादि साधनेस उत्तम असतो. दररोज नित्य नियमाने सकाळ, दुपार, संध्याकाळ व मध्यरात्र यावेळी संध्या विनंती प्रार्थना करा पण त्याआधी आपल्या मनात उद्भवणाऱ्या काम, अहंकारादि विकारांचा त्याग करा. माया ममत्वाविषयी मनाचे ठाई वैराग्य धारण करा. तिव्र वैराग्याने मनाचे उत्छृंखल भाव नाहिसे होतात व मायामोह ममत्वाचा सुध्दां लय होतो. मंदिरांना केवळ आरामगृहे करू नये. केवळ प्रेक्षणीय स्थळ म्हणून पाहू नये. तर मंदिरात ध्यान, धारणा, ईश्वरभक्ति, स्मरण, चिंतन करावे. मंदिरात कोणीही कोणाविषयी वादविवाद, निंदा, द्वेष, तिरस्कार, भांडणतंटा, उपस्थित करू नये. ज्ञानसंपादन ध्यानधारणा, योगसाधना करण्यासाठीच मंदिरे असतात. तेथील पावित्र्य, मांगल्य बिघडवूं न देता ते टिकविण्याचा प्रयत्न करावा. ज्यांना योगसाधना व ज्ञानार्जन करायचे आहे, त्यांनी आपल्या आहारावर सुध्दां नियंत्रण ठेवावे. आहार शुध्द, सात्विक व माफक असावा. भरपूर आहार केल्याने योगसाधना न होता रोगसाधना मात्र होते. भरपूर जेवण केल्याने शरीर जड होते. स्थुलता वाढते. बुध्दिजड व मंद होते. कोणतेही काम करण्याची इच्छाहोत नाही. आळस उत्पन्न होऊन कर्तव्यकर्मापासून मनुष्य दुरावतो. अति आहाराने झोप जास्त येते. व त्यायोगे शरीरात आणि स्वभावात दरिद्रीपणा, निष्काळजीपणा, निर्बुध्दता, निरूत्साहीपणा, निष्क्रियता येते. मग मनुष्यावर पश्चाताप करण्याची पाळी येते. म्हणून आहार व झोप यावर नियंत्रण ठेवावे. जेवण कमी केल्याने हलके तरल वाटते. कोणतेही काम करण्यास उत्साह वाटतो. शारीरिक, बौध्दिक, व्यायाम व श्रम सुलभतेने करता येतात. आरोग्य सुधारते, मनाची चंचलता

विषयाकडची धाव थोपविता येते. साधना, पूजा, अर्चा करण्यास मन समर्थ बनते. यासाठी आहार शुध्द, सात्विक व अल्प असण्याची गरज आहे. आपणापेक्षा ज्ञानाने, मानाने व वयाने वडील असलेल्या व्यक्तींना योग्य तो मान द्यावा. अदबीने नम्रतेने त्यांना प्रणाम करून त्यांच्या आज्ञा पालन कराव्यात. मोठ्या व्यक्तींचे अवगुण अथवा व्यंग शोधित बसू नये. त्यांचे ठायी असलेले गुण तेवढे घ्यावे अवगुण सोडून द्यावे. एक दिवस एका वर्षाप्रमाणे मानून चला. आपले एक पाऊल काळाच्या मुखात आहे याची जाणिव ठेवून सत्कृत्ये करा. सर्वांशी नम्रतेने, मृदूतेने, सत्यतेने बोलून सर्वांचे आंतरीक प्रेम संपादन करा. आपणापेक्षा लहान बहिणभावंडे अगर मित्र वगैरे असतील त्यांच्या मनावर आपल्या शुध्द प्रेमळ आचरणाची छाप पडेल असेच वर्तन त्यांच्याशी ठेवावे त्यांना सुध्दा योग्य तो मान देऊन सदाचाराची शिकवण द्यावी. त्यांना विनाकारण मारून मुटकून हीनवून नाऊमेद करूं नये. बोधपर गोष्टी शिकवून चांगले वळण लावावे. अशाप्रकारे सर्वांशी तुमचे आचरण नम्रतेचे, मृदूतेचे व सत्यतेचे असेल तर तुम्ही हिरे, माणिक, रत्न मोलाचे व्हाल. सद्गुरुंची कृपादृष्टी तुमच्यावर होईल. ज्यांना सद्गुरुची प्राप्ती झाली तो मनुष्य अन्य लोकांबरोबर कधीही तुच्छतेने वागत नाही. कोणाची निंदा, द्वेष, वैर, निषेद करीत नाही. सर्वांशी समानतेने एकरूपतेने व आत्मौपम्य बुध्दीने वागतो. याउलट जो ज्ञानश्रवण करुन विपरीत आचरण करील त्याचे अकल्याण होते. यासाठी सदाचारसंपन्न बुध्दीची सत्साधकाला अत्यंत गरज असते. (श्लोक ६२-७८)

वेळेचे महत्व समजल्यानंतर वारंवार जाणून बुजून आळस निंद्रा यात आपले मौलिक आयुष्य व्यर्थ घालवू नका. असत्य, दंभ, कुडकपट यांचा त्याग करून सत्य, सचोटी आणि ज्ञान दृष्टीचा सद्बुध्दीचा उपयोग करा. दररोज नियमीतपणे सकाळी व संध्याकाळी धर्मद्वारी मंदिरात अगर पूजास्थानी जावे. कुडकपट, दंभ, असत्य यांचा मनापासून त्याग करावा. धर्मद्वारी मन शांत, स्थिर व प्रसन्नतायुक्त उदार, परोपकार बुध्दिरत असावे. सकाळी देवदर्शन व ध्यानसाधन, संध्याकाळी, सायंसंध्या व रात्री पूजा अर्चा, कथा, किर्तन व ध्यान, स्मरण हे नियम लावून मनास भक्तिमार्गाकडे प्रवृत्त करावे, मंदीरात अथवा पूजा स्थानी जातांना खाली हाताने जाऊ नये. आपल्या घरात, शेतात ज्या वस्तू असतात. उदा. धनधान्य, फळें, भाजीपाला, दुध, मेवा, मिष्ठान्न वगैरे प्रसाद म्हणून घेवून जावे. पंचमुखात प्रेमाने अर्पण करावे. त्यायोगे जीवात्मा ईश्वराच्या ऋणातून मुक्त होऊन कृपेस पात्र होतो. मंदीराची अथवा पूजास्थानाची धनसंपत्ति चोरीने बळजोरीने बेईमानपणे हडप करूं नये. जे मुखी पूजा अर्चा करणारे

असतील अथवा गादिपति आचार्य असतील त्यांच्याशी विनाकारण वैरभाव, दावाफटका, निंदा, द्वेष, तिरस्कार, वगैरे करूं नये. दुनियेत मानमान्यता मिळविण्यासाठी व स्वार्थासाठी जरी दावा केला तरी तशा जीवात्म्यांची निश्चित अधोगति होते. तशा क्रियाभ्रष्टांना नीतिभ्रष्टांना ईश्वर प्राप्ति मुळीच होत नाही. उलट त्यास दारिद्र्य, रोगविकार जडून अपमृत्यू व अधोगती होते. जे अधर्मी उणियाचारी असतात ते धर्मशास्त्रांच्या विरूध्द आचरण करतात व आपण आचरतो तोचखरा धर्मअसा बडेजाव करतात. शास्त्रातलें व्यंग निवडून त्यावर वितंडवाद करून पांडित्य दाखवितात. धर्मशास्त्रातील तत्त्वे जाणून सुध्दां अज्ञानपणाचे पांघरूण घेऊन क्रियाभ्रष्ट होतात. जे खरेधर्मी असतात ते धर्माविषयी कोणताच धिंगाणा घालीत नाही. ढोंगीपणा अथवा वितंडवाद करीत नाहीत. अधर्मी लोकच कुडकपटी व निंदक क्रियाभ्रष्ट व कुटिल असतात. तेच लोक मानमरातब आढचता व आत्मश्लाघा करीत असतात. ज्ञानध्यानाच्या बाबतीत मनुष्याने चौकस राहावे. आपल्यापेक्षा ज्ञानी ध्यानी अनुभवी अशा व्यक्तिकडून गुरुकडून ज्ञानसंपादन करावे आपला आचारधर्म चांगला आहे अथवा कनिष्ठआहे हे श्रेष्ठ व्यक्तिकडून तपासून घ्यावे. आपल्या मनाचे ठायी शुध्द अंत:करणाने विचार करून हीन आचरण सोडून द्यावे व चांगले उन्नतिकारक नीतिनियम युक्त तत्वांचे आचरण करावे. सत्साधकाने मानसिक पावित्र्याकरितां व आत्मिक उन्नतिकरितां काही शुचिर्भूतेतेचे नियम पाळावेत. लाई, सुतक म्ह. जननाशौच, मरणसुतक व रजस्वला धर्म वगैरे बाबतीत जे नियम आपल्या धर्मशास्त्रांत सांगितलेले असतात. ते कटाक्षाने पाळावे ते जर न पाळले तर साधनेत कमकुवतपणा मनाचे मालिन्य हीनविचार आळस व लैंगिकता येते त्यामुळे साधनेत विकृति येते म्हणून मंदिरात अथवा पूजास्थानांत तशा मंत्रोपचाराने शुध्द पवित्र व्हावे. दररोज नियमीतपणाने देवदर्शनास व पूजेस जावे, मंत्रश्रवण ज्ञानचर्चा, मनोमन ईश्वराचे ध्यान, नामस्मरण सद्गुरूंचे ध्यान व प्रार्थना करावी. गुरु दीक्षा घेऊन जी व्यक्ति हे करीत नाही, ती सत्साधक संघातून वगळली जाईल. त्याच्यावर गुरु कृपा होणे दुरापास्त आहे. पूजेला येतेवेळेस जमल्यास स्नान करून धुतलेले स्वच्छ पांढरे कपडे घालून यावे. हातात जपमाळ घेऊन सतत नामस्मरण गुरु मंत्राचे ॐ कारयुक्त स्मरण करावे. ज्योतीचे ध्यान करावे, गुरु चरणामृत तीर्थ प्राशन करावे, गुरु मुखातून ज्ञानचर्चा श्रवण करावी. ज्या नितीनियमांचा आपल्यात अभाव असेल ते जाणून त्यांचे आचरण करावे. जे त्याज्य असेल त्यांचा त्याग करावा शारीरिक शुध्दता, मानसिक पावित्र्य आणि आत्मिक उन्नतिविषयी जे नियम सांगितलेले आहेत त्यांचे यथायोग्य यथामति पालन करावे. ( श्लोक ७९-९० )

प्रत्येक मानवाचे सर्वश्रेष्ठ आणि आद्य कर्तव्य हृदय शुध्दि हे आहे. आपल्या अंत:करणात वेळोवेळी जे दुष्ट भाव प्रगट होतात. निंदा, द्वेष, मत्सर, काम, क्रोध, मोह, चोरी, हिंसा, आसक्ति वगैरे भाव प्रगटतात त्याला कारण अंत:करणाचे मालिन्य. हे मालिन्य मनातून उद्भवते व मन आपल्या आहार विहाराने घडले जाते. यासाठी आहार व विहारावर नियंत्रण ठेवावे शुध्द सात्विक व अल्पाहार सेवन करावा व आसक्तीरहित विहार करावा म्हणजे हृदय शुध्द होते. निर्मल हृदयच ईश्वराचे वास्तव्यस्थान असते. मलिनहृदयांत दैत्यांचे वास्तव्य असते. दररोज नित्यनियमाने स्नान करावे. शरीरशुध्दि झाल्याने मनशुध्दि होते. मनाची व तनाची शुध्दि करून जेवणकेल्यास दिवसभर प्रसन्नता वाटते व कोणतेही काम करण्यास उत्साह स्फूर्ति येते. रात्रंदिवस सत्वाने वागण्याचा प्रयत्न करावा. सत्य वचन वदावे व सत्यपालन करावे. 'मी सत्य बोलतो आपल्याला असत्यआवडत नाही' अशी एकसारखी जपमाळा फिरवू नये. तर आपल्या वागणूकीने आचरणाने कृतीने सत्याचा अवलंब करावा. आपल्या हृदयात अन्य प्राणीमात्राविषयी दयाबुध्दि ठेवा. आपणापासून कोणालाही उपद्रव, त्रास होणार नाही याची काळजी घ्यावी. सुपात्र असेल त्यास दान करावे. ज्यास ज्या वस्तूची गरजअसेल ती वस्तू देऊन याचकाची गरज भागवावी. दिलेल्या वस्तूचा दुरुपयोग करणाऱ्या व्यक्तिस दान देऊ नये अथवा गरज नसलेल्या वस्तूचे दान देऊ नये. आपणास शक्य नसल्यास अथवा दान देण्याची ईच्छा नसल्यास दान देऊ नये पण याचकास अद्वा तद्वा बोलून हिनवूं नये. परदु:ख जाणून त्याच्या पाठीशी असावे. म्ह. त्याला योग्य तो हातभार लावून साहृय करावे. आपल्यापेक्षा वयाने ज्ञानाने अनुभवाने मोठा असेल त्यांना योग्य तो मान द्यावा. अदबीने त्यांना प्रणाम नमस्कार रामराम करून आदर करावा. मोठ्या व्यक्तिने आपल्या मोठेपणाचा गर्व करूं नये. इतर लोक आपल्याला मानतात आदर करतात म्हणून अभिमानाने, अहंकाराने फुलून जाऊं नये. तर कनिष्ठांना योग्य मार्गदर्शन करावे बरोबरीने वागवण्याचा प्रयत्न करावा. कोणावरही क्रोध करूं नये, शक्यतो क्रोध आवरण्याचा प्रयत्न करून चुकलेल्यास समज देऊन सुधारण्याचा प्रयत्न करावा. धर्मकृत्यांत पूजा, अर्चा, प्रार्थना, ध्यान, धारणा वगैरे बाबतीत आळस करूं नये. सकाळच्या प्रहरी अथवा आपणास निवांत वेळ मिळेल अशावेळी सृजनहार भगवंताचे ध्यान नामस्मरण चिंतन करावे. गुरुगतगंगेत सत्संगात नित्य जाऊन गुरु, संत, मुखी यांना प्रणाम करून आशिर्वाद मिळवावा. त्यांची भेट घेऊन आज्ञापालन करावी. यथायोग्य सेवेचा लाभ घ्यावा. नित्य दररोज गुरुचरणामृत प्राशन करून गुरुवचनामृत श्रवण करावे. तेच खरे धर्मी जाणावेत. ज्ञानश्रवण करून

जे अहंकार सोडत नाहीत ते कुकर्मी जाणावेत. जे ऋषिवर मुनिवर आहेत, जपतप, व्रतोपवास करणारे नियमधारी आहेत, त्यांनी व त्यांच्याशी अन्य लोकांनी खोटे बोलू नये. अतिथी अभ्यागताची यथायोग्य सेवा करून संतोषीत करावे. मातापिता, गुरु आणि अतिथी अभ्यागताची यथायोग्य सेवा करून संतोषीत करावे. मातापिता, गुरु आणि अतिथी हे चार मुख्य दैवत समजून त्यांची सेवाचाकरी पूजन करावे. त्यांचे मार्गदर्शन शिरोधार्थ मानून त्याप्रमाणे वागावे. भुकेलेल्यास अन्न देऊन संतोषीत करावे. तहानलेल्यास पाणी देऊन त्याची तृषा शांत करावी. नग्नास कापड देऊन त्याची लज्जा राखावी. अशा प्रकारे ज्यास ज्याची गरज असेल ती यथाशक्ति पुरविण्याचा प्रयत्न करावा. कुटुंबातील व्यक्तिंचा, सगे सोयरे, संबंधीयांचा यथायोग्य सांभाळ करावा. कुटूंबियाचे पालनपोषण संरक्षण उत्तम रीतीने संगोपन करून ते शीलवान, गुणवान आणि सुंसंस्कृत होतील याकडे अगत्याने लक्ष द्यावे. घरातील कुटूंब प्रमुखाचे हे आद्य व मुख्य कर्तव्य आहे. संसाराचे सर्व प्रकारचे व्यवहार उत्तम रीतीने सांभाळून नियमीतपणे ध्यानधारणा करावी. आपल्याच घरात अथवा मंदिरात एकान्तात, एकाग्रतेने, दृढनिश्चयाने, नियमाने ईश्वराचे ध्यान करावे. कोणी आपणास अवमानीत केले, द्वेष, निंदा, तिरस्कार केला, अवगुणाने आपल्याशी अवैध आचरण केले तरी त्याविषयी क्रोध, द्वेष न करतां गुणग्राह्य व्हावे. गुण घ्यावेत अवगुण सोडावेत. कोणाविषयीही आकसबुध्दि बाळगू नये. ( श्लोक ९१-१०२ )

कोणासही वस्तू मोजून देतांना मापाने अथवा वजनाने प्रमाणाच्या कमी देऊ नये, घेतांना अन्यायाने बळजोरीने अथवा फसवून जास्त घेऊ नये. परस्त्रीगमन, चिंतन, अवलोकन करूं नये, स्वस्त्रीशी सुध्दां संयमानेच वागावे, व्यर्थ कामचेष्टा, चाळे करूं नये. नियमीत ब्रह्मचर्य पालन करावे. कामचेष्टांनी नैतिक अध:पात, शारीरीक ऱ्हास, मनाची चंचलता व अधोगती होते. यासाठी कामविकारावर संयम बाळगून नियंत्रण ठेवावे. कोणत्याही व्यक्तिकडे स्त्री असो अथवा पुरुष कोणाकडेही वाईट नजरेने हीनबुध्दीने कामुकदृष्टीने पाहूं नये. आपल्या नयनात त्रिभुवनाचे पाप वसलेले असते. पण त्या नयनांना ज्ञानबुध्दिचा अंकुश लावल्यास पापापासून परावृत्त होऊन दृष्टी निर्मल होते. जाणून बुजून खोटी साक्ष देऊ नये, पैज मारून अथवा शपथ घेऊन असत्य बोलू नये. कुडकपट दंभ दर्पाने वागू नये. आपल्या मुखातून कोणाला मार असे सुध्दां म्हणू नये. व्याज, सवाई, दीढी, दुपटीचे व्याज घेऊन जो रकम देत असेल त्याच्या घरी जेवणसुध्दां करूं नये. हाडविक्रय करणे म्ह. स्वार्थाकरितां पशुपक्षांना

विकणे पापमूलक आहे. पशुंचे, गाय, बैल, म्हशी, इ. चे पालन पोषण संरक्षण करावे त्यांची विक्री करूं नये, जमीन ही माता आहे अन्नधान्य, भाजीपाला, फळे, फुले, कंदमुळे वगैरे देऊन ती आपले पालन पोषण करते तिची विक्री करूं नये. कन्येचे ठेवलेले द्रव्य हडप करूं नये. कन्येशी बेईमानीपणा करूं नये. कोणतेही कामकरतांना रतिभर सुध्दां लाच खाऊं नये. नैतिक अधःपात होतो. खोटे दस्तऐवज, पत्रके करारनामे, आश्वासन पत्रे वगैरे लिहू नये. खोटेनाटे कागदपत्र लिहून घेऊन लोकांना फसवूं नये. शौचास जावून आल्यानंतर माती लावून हात पाय स्वच्छ घासून धुवावे. पाच आचमन गुळणे करावे. शक्य असल्यास स्नान करावे. लघवीला जातांना सोबत पाणी घेऊन जावे. लघवी केल्यानंतर इंद्रिय स्वच्छ धुवावे. नंतर हातपाय धुवून तीन गुळणे करावे. न गाळलेले पाणी कधीही वापरू नये. नेहमी पाणी गाळूनच वापरावे. सूक्ष्म लहान सहान जीवप्राणीमात्रांची हिंसा करूं नये. हिंग, तंमाखु खाऊ नये त्यांच्यापासून तयार केलेल्या वस्तु पदार्थ सेवन करूं नये. त्यांचे सेवन केल्यास व्यसन लागते व कोणतेही व्यसन मनाची चंचलता वाढवीते. कांदा, लसूण, भांग, गांजा, मद्य, मांस यांचा सर्वस्वी त्याग करावा. राजस् तामस आहार वर्ज्य करावा. परमार्थमार्गापासून परावृत्त करणारी ही दुर्व्यसने आहेत. एकदाची ती व्यसने जडल्यास मनुष्य त्यापासून मुक्त होणे कठिण असते यासाठी सत्साधकाने आधीच त्यापासून लांब राहावे. दुनियेत बसून म्ह. हॉटेल्स, सिनेमागृहे, पाटर्या, वगैरेमध्ये बसून जेवण करूं नये. कारण तेथील दुष्ट भाव आपल्या मनात प्रतिबिंबीत होतात व मन दुष्प्रवृत्त होते. शिळे, नासके, कुजके, थंड व दूषीत अन्न सेवन करूं नये. त्यामध्यें रोगजंतूचा प्रादूर्भाव होतो. ते आरोग्यास घातक असते. गुळीच्या रंगाने रंगविलेले काळे वस्त्र परिधान करू नये. शक्यतो पांढऱ्या शुभ्र वस्त्रांचाच वापर करावा. पांढरा रंग हा उज्वलतेचा, प्रसन्नतेचा व उन्नतिचा द्योतक आहे. पांढरे वस्त्र परिधान केल्यास मन उल्हसीत प्रसन्न व उत्स्फूर्त बनते. रंगीबेरंगी अथवा काळे वस्त्र परिधान केल्यास मन चंचल, मलिन व विकारी बनते. म्हणून शुभ्र व नित्य धुतलेले वस्त्र वापरावे. नीच हलकट आचरणाच्या व्यक्तींची संगत धरूं नये. 'जशी संगत तसा असर' असे म्हणतात ते सत्य आहे. मनुष्याची संगत नीच असल्यास हीन विचार मनांत येऊन मनुष्य पापकर्मास प्रवृत्त होतो. म्हणून नीच संगत करूं नये. (श्लोक १०३-११६)

व्रतोपवास जप तप साधन करावे पण मनुष्याने त्याविषयीच्या फलप्राप्तीची आसक्ती धरू नये, व्रतोपवासाचे योग्य फळ ईश्वर आपणास देतोच हे निश्चितच आहे. केवळ

फलप्राप्तीची आशा केल्यानेच फळ मिळेल, असे नाही. फळप्राप्तीच्या आशेने पाणी फत्तराची पूजा करूं नये. तीर्थस्थळांची यात्रा-पूजा केवळ हौस म्हणून अथवा मनाची चैन म्हणून करूं नये. तीर्थयात्रा जपपूजा वगैरे परमशुध्द भावनेने कराव्यात. तीर्थ स्थळावर गेल्यावर तेथील मूर्ति अथवा जल वगैरेंना प्राधान्य न देता तेथे बसलेल्या अनाथ अपंग भिक्षुक भिकाऱ्यांना अन्नदान वस्त्रदान पात्र पाहून द्रव्यदान करा. त्यांची आत्मशांति झाल्यानंतर बाकीच्या पूजाअर्चेच्या बाह्य साधनांची कांहीच गरज नाही. तीर्थक्षेत्रांवर असलेल्या महात्म्यांच्या सान्निध्यांत राहून त्यांचे दर्शन सेवा व सत्संगाचा लाभ घ्यावा कोणी आपल्याजवळ विश्वासाने ठेव म्हणून ठेवलेली रकम, गहाण म्हणून ठेवलेल्या वस्तू योग्य काळी त्यास परत कराव्या. त्यांचा विश्वासघात करूं नये. संध्यासमय, ध्यानधारणा, पूजा अर्चा, वगैरे बाबतीत जो वेळ नेमलेला आहे तो कधीही चुकवू नये. अमर होण्यासाठी अजपाजप करावा. अजपजापाने जीवात्मा अजर अमर होतो. तो भीत नाही, जरा, शारिरीकविकार, दुःख, कष्ट यांना जुमानीत नाही. परवानगीशिवाय संमतिशिवाय, आणि घरांतील परीवारातील सर्व व्यक्तिंची चौकशी केल्याशिवाय खाऊ नये. योग्य विचारपूस व तरतूद केल्याशिवाय कांहीही भक्षण करणे दोषमूलक आहे. टोपी, पगडी अथवा फेटा तिरपी घालू नये. सरळ ठेवावी. टिळा, टोपी, पगडी केवळ आढ्यतेकरीता वापरूं नये. संरक्षणासाठी आणि अदब म्हणून त्याचा वापर करावा. आहार चोपूनचापून दाबून करूं नये. अल्पाहार व शुध्द सात्विक आहार सेवन करावा. लाचलुचपतीची अथवा लालसेची प्रीत करूं नये. वडिलभावांच्या स्त्रीशी मातेप्रमाणे वर्तन ठेवावे. कोणालाही अरे तुरे अव्दा तव्दा बोलून दुःखीत करूं नये शेजाऱ्यांना त्रास देऊन दुःखी करूं नये. आपल्याकडून शेजाऱ्यांना त्रास होऊ नये असे वर्तन ठेवावे. कोणाचाही विश्वासघात करूं नये. कोणाचीही पडलेली वस्तू आपली म्हणून उचलु नये. कोणासही आपल्याकडून त्रास होईल असे वागू नये. कोणाशीही आपापसात दुही भेद उपस्थित करू नये, कोणाजवळून उधार उसनवार आणलेली वस्तू अथवा रकम ताबडतोब परत करावी त्यास विलंब लावू नये अथवा विश्वासघात करू नये. अन्यायाने बळजोरीने चोरून अथवा विश्वासघात करून कोणाच्याही धनाचा उपभोग घेऊ नये. उपभोग घेतांना सुख लाभेल पण शेवटी महादुःख भोगावे लागेल. त्याच्या घरी बैल अथवा पशु होऊन अथवा त्याचा मुलगा मुलगी होऊन ते धन परत करावे लागेल. तेव्हांच बंधनातून सुटका होईल. कोणासही जाणून बुजून अथवा अजाणता शिवीगाळ देऊं नये. मुर्खपणात अंधश्रध्देत राहू नये. कोणत्याही गोष्टीचा ज्ञानदृष्टीने शोध घेऊन आचरण करा. साधक बाधक

विचार करून असत्याचा त्याग करून सत्यामार्गाचे अवलंबन करा. आपल्या मनाने कोणाशीही शत्रूत्व कल्पून वागू नका. त्याचा पूर्ण शोध घ्या. सारासार विचार करा आपल्याविषयी कोणाच्या मनात अथवा कोणाच्या विषयी आपल्या मनात कांही गैरसमज असल्यास दूर करण्याचा प्रयत्न करावा. शक्यतो मनाचा संयम साधून शत्रुत्व, वैरत्व मिटविण्याचा प्रयत्न करावा. सत्याचा किंवा असत्याचा वादविवाद करीत बसू नये. सर्वबाबतीत आपलाच हेका चालवू नये. मी सत्यवादी आहे आपल्याला असत्य खपत नाही केवळ असे म्हणून हेकेखोरपणा करू नये. जुवा सट्टा, पत्ता, मटका यांच्या खेळाच्या लालचेत लागू नये. नाच छंद, तमाशा पाहू नये. ऐकू नये. त्यामुळे मन चंचल बनते व ध्यानसाधनेपासून परावृत्त होते. तशा छलभेदाच्या नादी लागल्याने मनुष्य सद्गुरूंच्या ज्ञानमार्गास दुरावतो. त्यांच्यावर सद्गुरू महाराजांची कृपा होत नाही.

(श्लोक ११७-१२९)

जेवण करतांना अन्नास हिनवून खाऊ नये. हे तर खारटच आहे यात तर मीठच नाही अशा प्रकारे नांव ठेवू नये, आवडत नसल्यास निमूटपणे राहू द्यावे. अन्न हे ब्रह्म आहे. आपला पिंड अन्नमय आहे म्हणून अन्नाची वाखाणणी करावी पण निंदा करू नये. सकाळी सुर्योदयाच्या आंत उठून शौच, मुखामार्जन करून स्नान करावे. शुचिर्भूत होऊन मंदिरात अथवा गुरू महाराजांच्या दर्शनास जावे त्यायोगे आरोग्य चांगले राहते, मन स्थिर राहते. स्नान झाल्यानंतर परत आळसात लोळत पडू नये, विषयविकारचिंतन करीत बसू नये. त्यायोगे मनास घातक सवयी जडून आरोग्य बिघडते. सकाळचा प्रहर शांत सुशीतल आणि प्राणदायी असतो. तशा वेळेला केलेली ध्यानसाधना व ईश्वरप्रणिधान हे निश्चल आणि चिरफलदाई असते म्हणून तो अमूल्य वेळ सांसारिक चिंतनात व्यर्थ घालवू नये. जप तप तीर्थस्नान हे अवश्य करावे त्यायोगे शुचिर्भूतता होऊन मन सुविचारी व प्रगल्भ उन्नत बनते, निर्मलचित्त होऊन ईश्वराचे ज्योतिस्वरूपातून ध्यान करावे. आपण पाळलेल्या म्ह. आपल्यावर ज्यांचे पालन पोषणाची जबाबदारी आहे अशा प्राण्यांना दुखवू नये. त्यांची आबळ करू नये दरदिवाण म्हणजे वकील, सरकारी नोकर, वरिष्ठ अधिकारी यांच्याशी प्रीती करू नये. त्यांच्या संगतीत कामाशिवाय राहू नये, ओळखीचा चोर जीवानिशी मारणारा असतो. चालतांना फिरतांना कांहीही वस्तू खाऊ नये. एकाठिकाणी बसून खावी. असत्य दर्शनाच्या पूजनाच्या नादात पडू नये. ते स्वत: वादविवादांच्या गर्तेत सापडले असतात व आत्मज्ञान साधकास सुध्दां चंचल बनवून नास्तिक करतात. (खट दर्शन म्हणजे जारण, मारण, तारण, वशिकरण, करणी, कवटाळ, पिशाच्य, साधन, बीर

धगधगायला लागेल. पृथ्वीमधून अग्नीज्वाळा निघतील, मनुष्य जीव प्राणीमात्राला वास्तव्याकरितां सुध्दां जागा राहाणार नाही. पृथ्वीवरील प्राणीज सृष्टीचे सारे चैतन्यमय जीवन उध्वस्त होईल. भगवान निष्कलंकी नारायण आपल्या राज्यसिंहासनाच्या स्थानावर बसून सर्व जीवात्म्यांचा पापपुण्याचा हिसाब घेऊन जाब विचारतील. नगीना गोमटीजवळ लावलेल्या ताजव्याजवळ सर्वांच्या कर्मांचा निवाडा होईल. प्रत्येक जीवप्राणिमात्रांचा पाप पुण्यांचा निवाडा होऊन पापमय कर्मच अधिक असल्यामुळें त्या जीवात्म्यांना ते पापकर्म दोष त्या कल्पांत काळात भोगावे लागेल. आकाशांतून सूर्यकिरणांचा अत्यंत असह्य मार व खालून जमिनीवरील उष्णता - अग्नीची धग अशा कैचित सांपडून त्या जीवात्म्यास अपार-अगणित असह्य कष्ट - त्रास - दुःख भोगावे लागेल. त्यांच्या डोळ्यांतून एकसारख्या रक्तांच्या धारा वाहू लागतील. आता हे शेवटचेच युग व शेवटचाच प्रहर असल्याने कृतकर्माचा विपाक त्याला संपूर्ण भोगून टाकावा लागेल जे अपराधी असतील पापकर्मरत असतील त्यांना भगवान उलटे मस्तक करून खाली डोके वर पाय करून टांगतील. व त्याच्या एकेका गुन्ह्याचा जाब विचारतील तेव्हा सूर्याच्या उष्णतेने, जमिनीवरील धगधगीने व यमदूतांच्या असह्य माराने बेजार व बेभान झालेल्या जीवात्म्याच्या माथ्यातील मेंदूचेपाणी होऊन नाकातून, कानातून, व तोंडातून बाहेर वाहू लागेल, अपराधी जीवात्मे त्या असह्य दुःखभाराने रडतील, कळवळतील, मोठमोठ्याने हंबरडा फोडून आई, बाप, भाऊ, बहिण वगैरेंना हाक मारतील. पण तेथे त्यांच्या साह्याकरितां कोण धावून येईल? कोणीही येऊ शकणार नाही, कारण प्रत्येकाला आपापलाच कर्मविपाक भोगावा लागतो. ज्याने इथे मृत्यूलोकात गुरुगतगंगेत आपला गुन्हा चुकविला नाही म्हणजे अपराध माफ होण्याकरितां गुरु, मुखी आणि गतगंगेत विदीत केला नाही. त्यांच्या शिरावर त्या गुन्ह्यांचा भार राहिल्याने तो कर्मभोग त्यांना भोगावा लागेल. ज्याने धर्मदीक्षा घेतली, गुरुचे बंधन बांधले पण गुरुगतगंगेत कधीही मिसळला नाही. गुरुशी मनाने एकरूप न होता दुनियेच्या मिथ्या मोह मायेत गुरफटला व पापकर्मात बध्द झाला त्याला मार देऊन बारीक वातीप्रमाणे करतील व दिव्यात बत्ती ज्याप्रमाणे पेटवीतात तसे त्याला पेटवितील. आकाशातून लोहमय अग्नीचा तर वर्षाव होईलच. त्यायोगे त्या जीवात्म्यांचे स्थूल देह भस्मसात होतील, पण त्यांचे वासनात्मक लिंगदेह न जळता कर्मविपाक भोगतील. त्या जीवात्म्यांचे देह जरी नष्ट झाले तरी भगवान त्यांच्यावर अमृत वृष्टी करून जीवंत करतील व पापकर्मदोष भोगायला लावतील. जे मुनिवर व्रत ग्रहण करून दुसऱ्या मुनिवरांच्या निंदा अथवा परनिंदा करतील व स्वतः अहंकार मदयुक्त भाषण

करतील. त्यांच्या देहाचा चेंदामेंदा करून कागदाप्रमाणे बारीक चिपाटे करतील, सत्यधर्माप्रमाणे वागण्याचे व्रत धारण करून म्हणजे गुरु कडून अनुग्रह घेऊन भांग, गांजा, मद्यपान, मांशासन, तंबाखु, खानपान करतील, त्याची गती कशी होईल? हे मुनिवरा त्यांना पकडून उभे करतील व आजुबाजूने यमदूत उभे राहून त्याला जखडून बांधतील आणि कुदळ कोपीचे घाव त्याच्या शिरावर घालतील, घणाचे घाव घालून त्याचा लोळागोळा करतील ज्याप्रमाणे आकाशात ढगांची गर्जना होते, त्याप्रमाणे गर्जना करून त्यांच्या शिरावर घणांचे घाव घालतील. त्या जीवात्म्यांच्या शरीरावरील केस लोखंडाचे होऊन त्याच्या शरीरात खुपसले जातील व त्यांच्या कृतकर्माचा जाब विचारला जाईल. एवढे कठिण दु:ख भोग भोगून सुध्दां जीवात्म्याची असत्य प्रवृत्ति कमी होणार नाही. अेकेका अपराधाबद्दल शंभर शंभर वेळा जरी जाब विचारला जाईल तरी शंभर प्रकारची उत्तरे तो जीवात्मा देईल. अशा प्रकारे कर्महीन जीवात्म्यांना तेवढाच अधिक कर्म विपाक भोगावा लागेल. (श्लोक ७०८-७२४)

हा कल्पान्त काळाचा कर्मविपाक ज्यावेळेस जीवात्म्यांना भोगावा लागेल तेव्हा सूर्याच्या आणि पृथ्वीतील उष्णतेमुळे जमिनीवरील पाणी सुकले जाईल. वनस्पती जळून भस्म होतील. वनस्पतिच न राहिल्याने जीवात्म्यास विश्रांतीच घेता येणार नाही, वायु वाहणार नाही, त्यामुळे जीवात्म्यांचा दमकोंडा होऊन मरतील, अन्नपाणीच मिळणार नाही, सर्वत्र त्राही त्राही हाहा:कार होईल. सर्वत्र अशांतता, कर्णकर्कश आरोळ्या, किंचाळ्या व यमदूताच्या शस्त्रांच्या प्रहारांचे आवाज ऐकू येतील. जीवात्मा आपल्या साहाय्याकरितां मातापिता बहिण, भाऊ, पत्नि, पुत्र, पुत्री वगैरे यांना हाक मारेल पण कोणीही येऊ शकणार नाही. जो तो जीवात्मा आपापल्या कर्मानुसार गति भोगेल. तेथे अपराधी पापात्मे मोठमोठ्याने रडून आक्रोश करून यमदूतांच्या विनवण्या करतील. पण त्याचा कांही उपयोग होणार नाही. मोठमोठ्या प्रलयंकारी अग्नीत त्या जीवात्म्यांना टाकतील. तेव्हा त्यांच्या मुखातून सुध्दा अग्नीज्वाळा निघतील. शेवटी त्यांच्या नाकातून डोळ्यातून मुखातून रक्तबिंदू निघतील. तेव्हा पाठची बहिण भाऊ सुध्दां म्हणणार नाहीत, की हा माझा भाऊ आहे. ही माझी बहिण आहे. मी यांचा दु:खभार हलका करूं शकणार नाही. प्रत्येकालाच आपापला कर्मभोग भोगावा लागेल. कर्मभोग भोगतांना दिवस जा म्हणतां जाणार नाही, जीवात्म्यांची दु:खस्थिती अत्यंत असह्य होईल. प्रलयकाळचे हे दु:ख जीवात्म्यांना शेवटचे साडेतीन दिवस फक्त भोगावे लागेल. पण पन्नास हजार वर्षे एका दिवसात निघून जातील.

अशाप्रकारे कलियुगाच्या प्रमाणामधून पाऊणे दोन लाख वर्षे प्रलयकाळात आटले जातील. याकाळात जीवात्मे कर्मभोग भोगून अत्यंत क्षीण त्रस्त भयभीत होतील, वाघाच्या तावडीत सापडलेल्या गाईप्रमाणे त्या जीवात्म्यांची स्थिती होईल. हे माझ्या प्रीय मुनिवरा, या अत्यंत दुस्तर अशा कलिकाळाची हकिकत अत्यंत दुःखद आहे, माझ्याने ते वर्णनही करता येत नाही. हृदय अत्यंत कळवळून येते. वाणी कंपायमान होते, त्या दुःखद स्थितीचे वर्णन करणे अत्यंत कठिण आहे. यासाठी माझ्या प्रेमी सुहृद सद्भक्तांनो तुम्ही वेदवाणी वाचा, श्रवण करा व पापकर्मापासून परावृत्त होऊन सुयोग्य मार्गाचे व सत्कर्माचे आचरण करा, जीवनजगतांना सदसद्विवेक बुध्दिचा वापरकरून हुश्शार जागृत सचेतन राहून कर्मे करा. दोषयुक्त पापयुक्त कर्माचा त्याग करा. सत्मार्गगामी अशा महात्म्यास गुरु करा, त्यांचे मार्गदर्शन घेऊन सत्क्रियाचरण करा, गुरुशी बेइमानी करू नका, गुरुशी बेइमानी केल्यास शेवटी पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. गुरुवर, गुरुवचनावर, सत्शास्त्र वचनावर श्रध्दा ठेवा व आत्मोन्नति करून घ्या, गुरुशी बेइमानी केल्यास रडण्याची वेळ येईल, गुरुची प्राप्ति झालेली असून त्यांच्यावर श्रध्दा न ठेवता पाणी पथ्थर पूजण्यासाठी जो वनोपवनी भटकतो त्या तीर्थाटनापासून त्या जीवात्म्यास काय लाभणार? तुमचा कर्मदोष निवारण्यासाठी तुम्ही वनोवन भटकूं नका, संसाराचा त्याग करूं नका पण गरु सेवा करा. गुरूंचे वचन पालनकरून त्यांची कृपा संपादन करा संसारासक्तिचा त्याग करा, गुरुंनी शिकविलेल्या साधना करा. गुरुपदीष्टीत नामाचे स्मरण चिंतन निदीध्यासन करा, गुरु गतगंगेत सत्संगात हरहमेशा येऊन गतगंगेची सेवा करा. शास्त्रवचन श्रवण, मनन निदीध्यासन करा. दिवसभराचे अथवा आयुष्यभराचे आपल्या हातून घडलेल्या दोषयुक्त पापयुक्त कर्माचा प्रांजल मनाने गतगंगेत उल्लेख करून माफी मागा व दुसऱ्यांदा तसे कर्म आपल्या हातून घडू नये म्हणून गुरु गतगंगेची प्रार्थना करा, अशाप्रकारे गुरुगतगंगेत गुन्हा विदीत करून उतरविण्याचा विधी केलेला असल्यास त्या जीवात्म्यास हे कल्पांत काळाचे दुःख भोगावे लागत नाही तो जीवात्मा त्या कर्मदोषातून मुक्त होतो. युगधर्मानुसार युगायुगाचे ठायी असलेल्या युगतिर्थींचे व्रत उपवास, तप, दान केलेले असल्यास त्या जीवात्म्याचा कर्मदोष नाहीसा होतो. यासाठी हे मुनिवर सांप्रतकाळी प्रचलीत असलेल्या अजवाळी बीजेचे म्ह. शुक्रवारी असलेल्या चन्द्रदर्शनाचे व्रत करा गुरुवार शुक्रवार असा दोन दिवसांचा निरंकार, निर्जल उपास करा म्हणजे त्याचे फळ तुम्हाला या कल्पान्त काळात प्राप्त होईल. कल्पान्तकाळात कोणतेही दुःख तुम्हाला भोगावे लागणार नाही. युगायुगांतराचे ठायी युगगुरु ही चेतावणी जागृति तुम्हांला देत आलेले

आहेत. त्यासाठी त्यांनी निरनिराळ्या काळी निरनिराळ्या स्थळी निरनिराळ्या रूपाने प्रगट होऊन अवतार कार्य केलेले आहेत. हे मुनिवरा आपल्या जीवीताच्या उध्दाराची जिकीर करा, सद्गुरुंची सेवा करा, त्यांच्या आज्ञेप्रमाणे वागून कृपासंपादन करून अमरापुरीचे स्थान प्राप्त करून घ्या. म्हणजे तुम्हाला भगवंताचे साक्षात दर्शन होऊन जन्ममरणाचे फेरे मिटतील. ( श्लोक ७२५-७३८ )

हा अत्यंत भयानक स्वरूपाचा कल्पान्त काळ संपताच काळाच्या प्रवाहाबरोबरच संपूर्ण चराचर चैतन्यमय समष्टी म्हणजे जीवप्राणीमात्र स्थूलरूपाने नष्ट होतील. सूक्ष्मरूपाने ते अनंत अवकाशात रेणु त्रसरेणुप्रमाणे भ्रमण करतील. मग अत्यंत प्रलयंकारी सोसाट्याचे वारे वाहू लागतील. धरणीकंप ज्वालामुखी वगैरे अगणित होऊन पृथ्वीचे थर प्रस्थर भंग पावतील आकाशात बाराही महिने मेघ एकत्र जमून वीजांचा कडकडाट लखलखाट होईल. अत्यंत भयानक मेघगर्जना होऊन पृथ्वीतलावर सुध्दां भयानक स्वरूपाचे आघातकरून सर्वत्र उल्कापात, कवचभंग वगैरे होऊन खळबळ होईल व मग मुसळधार अखंड जलवृष्टी होईल संपूर्ण चराचर जगत पृथ्वी जयमय होऊन जाईल. पृथ्वी तलावर जमिनीचा भाग म्हणून कांहीही शिल्लक राहणार नाही. सर्वत्र पाणीच पाणी दिसेल. मुसळाप्रमाणे जलधारा अखंडपणे पडतील. व ध्रुवमंडळाप्रमाणे पाणी वृध्दींगत होईल, चार खाणी चौर्यायशी लक्ष जीवयोनी आधीच नष्ट होतील. अखंड जलवृष्टी सुध्दां विराम पावेल. भगवान श्री विष्णु नारायण अत्यंत सुंदर गोंडस असे बालरूपधारण करून जलपृष्ठावर एका वडाच्या पानावर शयन करून क्रिडा करीत आत्मस्वरूपात मग्न होतील. संपूर्ण समष्टी व त्यातील ते सूक्ष्म देहधारी अपरिपक्व जीवात्मे सूक्ष्म बीजरूपाने त्या भगवंताच्या स्वरूपात सामावले जातील. विलीन होणार नाहीत. पण वडाच्या फलातील बीजाप्रमाणे सूक्ष्मबीज रूपाने भगवंताच्या स्वरूपात सामावतील. भगवंताची क्रिडा संपल्यावर अनंत काळानंतर जेव्हा त्यांच्या मनात सृष्टयुत्पत्तिचा संकल्प जागृत होईल तेव्हा संपूर्ण समष्टी निर्माण झाल्यावर ते बीजरूपाने सामावलेले जीवात्मे त्या सृष्टीत निर्माण होतील व कर्मानुसार गती प्राप्त होऊन ते जीवात्मे चारखाणीतील चौर्यायशी लक्ष जीवयोनीचे भोग भोगतील. अशा प्रकारचे हे आगम निगम गतीचे ज्ञान ब्रह्मस्वरूपी अशा सद्गुरु इमामशाह महाराजांनी कथन केलेले आहे. हे संपूर्ण आगमनिगम ज्ञान सद्गुरु ब्रह्मांनी आधीच नियत केलेले आहे, सद्गुरु इमामशाह महाराजांनी त्या सद्गुरु ब्रह्माचे एक पाईक या दृष्टीने महान अशी योगसाधना करून ते ज्ञान आत्मसात केले व कलियुगातील मानवांच्या कल्याणासाठी त्यांनी हे संपूर्ण

ज्ञान कोणत्याही प्रकारचा आडपडदा न ठेवता - गुप्त न ठेवतां व कोणत्याही प्रकारचा अहंकार न करता कथन केलेले आहे. भगवंताच्या दशावतार लीलाचरित्राचे वर्णन येथे पूर्ण होत आहे. सद्भक्तांच्या सहाय्यासाठी दुष्ट दुर्जनांच्या निर्दालनासाठी व सत्धर्माचे मार्गदर्शन करण्यासाठी भगवंतांनी धारण केलेल्या अवतारांचे हे लीलाचरित्र आहे. कल्पसुरुवातीस भगवंतांनी सद्भक्तांस व दैत्यास दिलेल्या वचनपूर्तिचा इतिहास येथे पूर्ण झाला, सद्गुरु ब्रह्मांनी नियत केलेले व भगवान विष्णुंनी पूर्त केलेले हे आगम निगम ज्ञान सद्गुरु ब्रह्मस्वरूपी इमामशाह महाराजांनी अंतर्ज्ञानाने जाणून कथन केलेले आहे. जे लोक हे गुरुवचन सत्य जाणून त्याप्रमाणे वागण्याचा व निष्काम भक्तीमार्गाचा अवलंब करतील ते मुक्त होतील पण जे लोक हे वचन सत्य न मानता त्याचे उत्थापन करतील, त्या सत्यवचनांचा त्याग करून मिथ्या मोह मायेच्या असत्याचरणात काळ घालवितील त्यांना आवागमनाचे जन्ममृत्यूचे फेरे खावे लागतील. हे मुनिवरा आज कलियुगात अथर्ववेद हा प्रमाणभूत व प्राधान्यभूत मानतील, ते जीवात्मे अथर्ववेदीय अध्यात्मज्ञानध्यान साधनेनुसार वागतील ते अंती मुक्त होतील. अशाप्रकारे सद्गुरु इमामशाह महाराजांनी सांगितलेले आहे कीं सद्गुरु ब्रह्माच्या आगम निगम वचनानुसार जे सद्भक्त देवपूजा गाठी बांधतील ते निर्वाणपदास प्राप्त होतील. ( श्लोक ७३९-७५५ )

आज प्रचलित युगधर्मानुसार अथर्ववेदीय ब्रह्मविद्या सर्वश्रेष्ठ व अत्यंत महत्वाची आहे. अथर्ववेदीय उपनिषदादि सत्शास्त्रामधून व आधिकारीक महात्म्यांपासून ही विद्या थोडी थोडी ग्रहण करून अभ्यास करावा व आत्मोन्नति साधावी. भगवान निष्कलंकी नारायणाचे नित्य ध्यान, स्मरण, चिंतन करा. त्याचे स्वरूप अव्यक्त निरंजन, निराकार आहे. ज्योतिस्वरूपातून त्याचे ध्यान करावे. सगुण साकार रूपाने तो या भरतखंडात जंबुद्विपात कुवारीका क्षेत्रात प्रत्यक्ष प्रगट रूपाने वसलेला आहे. त्या भगवंताच्या सगुण साकार अवतार लीलांचे चरित्र सद्गुरु महाराजांनी वर्णन केलेले आहे. दिलमदेशातील वरजागढशहर हे त्या भगवंताचे स्वस्थान असून भरतखंडातील जंबुद्विपात असलेले पंचनदी मुलस्थान हे क्षेत्र आहे. चीन देशस्थ दैत्य कालिंगाचा व संपूर्ण दानवांचा संहार करून भगवान भक्त कमळाकुंवरचा उध्दार करील, सद्गुरु ब्रह्मा हे युगगुरु म्हणून इमामशाह नामरूपाने प्रगट होतील. अवताराची शक्ति ही स्वत: आद्यशक्तिच राहील. कारण भगवान आद्यनारायणाचाच तो प्रत्यक्ष प्रगट अवतार असेल चार लाख बत्तीस हजार वर्षे हे अवताराचे प्रमाण असेल व कलियुग प्रमाण सुध्दा चारलाख बत्तीस हजार वर्षेच राहील. अथर्ववेदान्तर्गत ब्रह्मविद्येचा अवलंब करून व आचरण करून सद्भक्त कमलाकुंवर सोबत अनंत कोटी जीवात्मे मुक्त होतील. भगवंताच्या

अव्यक्त निर्गुण निरव्यय स्वरूपात ज्योतिर्मय स्वरूपात पूर्णपणे विलय पावतील. अशाप्रकारचे हे दहाही अवतारांचे लीलाचरित्र थोडक्यात थोडके येथे वर्णन केलेले आहे. भगवंताचे संपूर्ण लीलाचरित्र वर्णन करण्यास कोणीही समर्थ नाही सर्व वेद शास्त्रे त्याच्या स्वरूपाचे वर्णन करतां करतां विराम पावले. पण यथार्थतेने ते स्वरूप समजण्यास कोणीही समर्थ नाही. पण येथे त्याच भगवंताच्या लीलाचरित्राची केवळ रूपरेषा सद्गुरु महाराजांनी कथन केलेली आहे. ती सत्य आणि प्रमाणभूत अशी आहे. जे सद्भक्त श्रध्दायुक्त अंत:करणाने पूर्णपणे एकाग्रतेने व निश्चलतेने वाचतील ऐकतील वा कथन करतील त्या जीवात्म्यांना फिरून जन्ममरणाचे फेरे खावे लागणार नाहीत. जे सद्भक्त निरभिमानाने गुरुगतगंगेत येऊन नित्य सत्संगात भगवंताच्या या निर्लेप निर्विषय व निष्काम लीलाचरित्रांचे वर्णन श्रवण करतील ते मुक्त होतील. विशेषत: अथर्ववेदीय ब्रह्मविद्येच्या श्रवणाने व क्रियाचरणाने ते जिज्ञासु जीवात्मे सन्मार्गदर्शक अशा सद्गुरुशी तादात्म्य पावून भगवंताच्या दर्शनाचे अधिकारी होतील. जे कोणी या दशावतार ग्रंथाचे लेखन, (उतारा करणे) वाचन व श्रवण करतील ते स्त्री असो वा पुरुष त्यांना अश्वमेध यज्ञ करण्याचे श्रेय लाभेल. जे कोणी एकमनाने, एकाग्रतेने हा ग्रंथ वाचतील त्याच्या पुण्याचा पार लागू शकणार नाही. भगवान नारायणाच्या या शेवटच्या दहाव्या निष्कलंकी अवताराचे वर्णन येथे पूर्ण होत आहे. शुध्द सत्वांश गुणाधिष्ठित आदि नारायणाच्या प्रेरणेने भगवान विष्णुंनी धारण केलेल्या दहाअवतारांच्या लीलाचरित्रांचे वर्णन असलेला हा ''दशावतार'' ग्रंथ येथे पूर्ण झालेला आहे. सद्गुरु पात्र ब्रह्मा, इंद्र, इमामशाह महाराज सांगतात की त्याच अनंत गुणाधिष्ठित भगवंताच्या अपरिमीत कृपाप्रसादाने त्याच्याच गुणांचे वर्णन करण्याचा मी यथामति प्रयत्न केलेला आहे. तो श्रोत्यांनी सत्य मानून श्रवण करावा व समजून घेण्याचा प्रयत्न करावा. भगवान अनंत विभु स्वयंज्योतीस्वरूप आत्मचैतन्य स्वरूप नारायण आपणा सर्वांवर स्नेहमय प्रेमळ कृपादृष्टी करून मुक्ति मार्गाचे अधिकारी करोत. सर्वांचे आत्मकल्याण होवो. सर्वांचा आत्मिक उत्कर्ष होवो. सर्व त्या आत्मज्योती स्वयंपूर्ण परब्रह्माच्या दर्शनाचे अधिकारी होवो. ही त्यांच्या चरणारविंदी विनम्र प्रार्थना. (श्लोक ७५६-७७१)

॥ श्रीमत्परिब्रह्मार्पणमस्तु ॥

॥ इति श्री निकलंकी अवतार समाप्त॥

॥ इति श्रीमद् दशावतार ग्रंथ समाप्त॥

**ॐ शांति: ! शांति: !! शांति: !!!**

# श्रीमद् दशावतार ग्रंथ प्रकाशनासाठी आर्थिक सहाय्य करणारे भाविक



श्री. सुभाष विश्वनाथ चौधरी
सौ. सुमनबाई सुभाष चौधरी
कु. भुषण सुभाष चौधरी
मु. विटवे, ता. रावेर



श्री. पंडीत टीकाराम महाजन
सौ. शारदाबाई पंडीत महाजन
कु. सचीन पंडीत महाजन
मु.पो. खडके, ता. भुसावळ



श्रीमती मंदोदरी कौतिक बोरोले
मु.पो. फैजपूर



श्री. उल्हास कौतिक बोरोले
सौ. चित्रलेखा उल्हास बोरोले
रा. फैजपूर, ह.मु. धुळे



श्रीमती प्रमिलाबाई वसंतराव सुपे
मु.पो. वाघोदा, ता. रावेर



स्व. तुकाराम मंगु पाटील
स्व. चमेलीबाई तुकाराम पाटील
मु. राजोरे, ता. यावल



श्री. मनोहर तुकाराम पाटील
सौ. छायाबाई मनोहर पाटील
मु.पो. जळगाव



स्व. धनंजय प्रमोद पाटील
मु. राजोरे, ता. यावल

श्री. राजुभाई रसवाला, खाटावाड (नवसारी)

स्व. नरहरी रघूनाथशेठ मोरे
श्रीमती सुमनबाई नरहरी मोरे, मु.पो. यावल

स्व. नारायण सुकलालशेठ मोरे
श्री. सुनील नारायणशेठ मोरे, मु.पो. यावल

श्री. नरहर अवचीत झांबरे (गुरुजी) मु.पो. फैजपूर

॥ ॐ ॥

# निष्कलंकी नारायण कवच

ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय। ॐ नमो भगवते निरंजन निष्कलंकी नारायणाय सर्वजनवशंकर्ताय सर्वदुष्टग्रह स्तंभिनाय नमो नमः। भगवन् कमलाकान्त करूणानिधे दीनबन्धोऽति दीनेश करूणासागर प्रभो मां (एनम्) रक्ष रक्ष।

ॐ नमो भगवन् वेद वेदाङ्ग संस्त्रष्टुर्विधातुश्च स्वयं विधे मृत्योर्मृत्यो कालकाल महाविष्णु तरोबीजं नीलवर्ण शंखचक्रगदाखड्गहस्तं शरणागत शोकार्त भयत्राण परायण भगवन् निष्कलंकी नारायण मां (एनम्) रक्ष रक्ष।

ॐ नमो भगवन् श्रीमन्नारायणं जनार्दनं सर्वेशं सर्वकारणं उष्णज्वर पित्तज्वर वातज्वर श्लेष्मज्वर कफज्वरालापज्वर सन्निपातज्वर कृत्रिमज्वर कृत्यादिज्वर पक्षज्वर मासज्वर सर्वांगज्वरान् नाशय नाशय हरहर जहिजहि दहदह पचपच ताडय ताडय आकर्षयाकर्षय विद्विषः स्तम्भय स्तम्भय मोहय मोहयोच्याटच्यात्चाटय।

ॐ नमो भगवन् श्रीमन्निष्कलंकी नारायण प्राणेश्वरः पद्मासनं श्वेताश्ववाहनं खड्गहस्तं परमंत्र परतंत्र परयंत्र भेदकं प्रतिपक्षविध्वंसक सकलदुष्टज्वर निवारकं भूतप्रेतपिशाच ब्रह्मराक्षसयक्षयमदूत शाकिनीडाकिनी कामिनी स्तम्भिनी मोहिनी वशंकर्ता कुक्षिरोग शिरोरोग नेत्ररोग क्षयापस्मार कुष्ठादिमहारोग निवारक प्रभो मम (अस्य) सर्वरोगान् नाशय नाशय। भगवन् मम (अस्य) शत्रून् नाशय नाशय (एनं) रक्ष रक्ष। जलरोगान् शोषय शोषय दुःखव्याधिन् स्फोटय स्फोटय, क्रुरानरिन् भंजय भंजय, मनोग्रंथीन् प्राणग्रंथीन् शीरोग्रंथीन् काटय काटय, निष्कलंकी मां (एनं) रक्ष रक्ष।

ॐ नमो भगवन् महेश्वरं महाचिंतामणि सकल सिध्देश्वरं सकल जन मनोहारिणं कालकाल रात्र्यनले अजिते अभये महाघोररूपं विश्वरूपं मधुसूदनं महाविष्णुस्वरूपं नेत्रशूल, कर्णशूल, कटिशूल, पक्षशूल पांडुरोग कमलादिन् नाशय नाशय निष्कलंकी नारायण शुक्लतेजस्वरूपं पूर्णतम प्रभो ब्रह्मास्त्रेण विष्णुचक्रेण रूद्रशूलेन यमदण्डेन वरूण पाशेन वासववज्रेण सर्वानरिन् भंजयभंजय। यक्षग्रह राक्षसग्रह स्कन्दग्रह विनायकग्रह बालग्रह चौरग्रह कुष्मांड ग्रहादिन निगृण्ह निगृण्ह। राजयक्ष्म क्षयरोग तापज्वर निवारक प्रभो मम (अस्य) सर्वज्वरान्नाशयनाशय सर्वग्रहानुच्चाटयोच्चाटय।

# श्रीनिष्कलंकी नारायण स्तोत्रम्

नमामिकमलाकान्तं शान्तं सर्वेशमच्युतम्। वयं यस्य कलाभेदा: कलांश कलया सुरा ।।
श्वेतद्विपे विष्णुरूपं पद्मया परिसेवितम्। कुत्रचित् स्वांशकलया ब्रह्माण्डे ब्रह्मरूपिणम्।
द्विभुजं निष्कलंक च किशोरं श्वेताश्ववाहनम्। शान्तं दिव्यखड्गहस्तं रत्नभूषणं भूषितम्।।
त्वं ब्रह्म सृष्टिकर्ता च त्वं विष्णु: परिपालक:। त्वं शिव: शिवदऽनन्त: सर्व संहारकारक: ।।
नानारूपविधाता त्वं भक्तानां ध्यान हेतवे। येषु रूपेशु यत्प्रीतीस्तत्तद्रूपं बिभर्षि च।।
सूर्यस्त्वं सृष्टिजनक: आधार: सर्वतेजसाम्। सोमस्त्वंशस्य पाता च सततं शीतरश्मीना ।।
वायुस्त्वं वरूणस्त्वं च त्वमग्नि: सर्वदाहक:। ईन्द्रस्त्वं देवराजश्च कालोमृत्युर्यमस्तथा ।।
त्राहि मां कलाकान्त त्राहि मां करूणानिधे। दिनबन्धोऽति दिनेश करूणासागर प्रभो ।।
स्वयं महाविराड्रूपं विश्वौघं यस्य लोमसु। स्वात्मन: षोडशांशेन सर्वाधारं परात्परम्।।
त्वमीश्वरो गुणातितो ज्योतिरूप: सनातन:। प्रकृति प्रकृतिशश्च प्राकृत: प्रकृते: पर: ।।
मृत्युञ्जयो महाकालो सर्वरोग निवारिणम्। निष्कलंकी सदाकालं शांतिमाशु करोतु मे।।

# श्रीनिष्कलंकी नारायण गायत्री मंत्र

ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय। भस्मायुधाय विद्महे दिव्यनेत्राय धीमहि
तन्नोज्वरहर: प्रचोदयात्। तन्नोज्वरहर: प्रचोदयात्।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

## फलश्रुती

एतत्स्तोत्रं जपेन्नित्यं सर्वव्याधिनिवारिणम्। रणे राजभये शौर्ये सर्वत्र विजयी भवेत्।
पुत्रार्थी लभते पुत्रं कन्यार्थी कन्यकां लभेत्। व्याधिग्रस्तो भवेन्मुक्त: स्तोत्रस्मरणमात्रत: ।।
कारागारे स्मशाने च शत्रुग्रस्तेऽस्ति संकटे। गंभीरेऽति जलाकीर्णे भग्नपोते विषादने।।
दस्युग्रस्ते महाभीते हिंस्त्रजंतु समन्विते। सर्वतो मुच्यते स्तुत्वा ईश्वरस्य प्रसादत: ।।
लभते सा दिव्य पुत्रं ज्ञानीनं चिरजीवीनम्। असौभाग्या च सौभाग्यं षण्मासश्रवणाल्लभेत्।।
गलत्कुष्ठी महाशुली वर्षमेकं श्रृणोति य:। अवश्यं मुच्यते रोगात् गुरुर्वाक्यमितिश्रुतम्।।
कर्मदु:खी दरिद्रश्च मासं भक्त्या श्रृणोति य:। ध्रुवं वित्तं भवेत्तस्य ईश्वरस्य प्रसादत: ।।
ज्वरं भूतज्वरं चैव शीतोष्णज्वरमेव च। ज्वरं ज्वरातिसारं च अतिसार ज्वरं हर:।।
एतत्स्तोत्रमिदं पुण्यं जपेदायुष्यवर्धनम्। विनाशाय च रोगाणामपमृत्युहराय च।।
मंगल्यं मंगलार्हं च मंगलं मंगलप्रदम्। समस्त मंगलाधारं तेजोरूपं नमाम्यहम्।।
ॐ नमो श्रीमन्निष्कलंकी नारायणाय जनार्दनाय नमो नम:

॥ ॐ ॥

# नवग्रह शांति ( नवग्रह स्त्रोत्रम् )

ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय। ॐ नो श्रीमन् आद्य नारायणाय भगवन कमलाकान्ताय नमः। श्रीमत्यै महालक्ष्मीः जगन्माता भगवत्यै आद्यशक्त्यै नमः। सृष्टिकर्ता चतुराननाय ब्रह्माय नमः। परिपालकाय भगवते विष्णवे नमः। सर्वसंहारकारकः शिवाय नीललोहिताय नमः। श्रीमत्स्याय नमः। श्री कूर्माय नमः। श्री वराहाय नमः। श्रीनृसिंहाय नमः। श्री वामनाय नमः। श्री भार्गवरामाय नमः। श्री रामाय नमः। श्री कृष्णाय नमः। श्री बौध्दाय नमः। श्रीनिष्कलंकी नारायणाय नमो नमः। नारायण जगद्गुरो नमस्तुभ्यं करूणामय सागरं जलरूपं अग्निरूपं आकाशरूपमीश्वरम्। वायुरूपं चंद्ररूपं सुर्यरूपं महत्प्रभुम्। यक्षाणांच कुबेरो यो दिक्पालानां महेन्द्रश्च शिल्पिनां विश्वकर्मा यः नानारूपं नमामि प्रभुम्। सर्व कर्माणां फलदातारं सर्वरूपं नानामूर्तिः कलांशेन यः तं नमामि जगत्पतिम्। सुर्यो यच्छतु भूपतां द्विजपतिः प्रीर्ती परां तत्वताम्। मांगल्यं विदधातु भूमितनयो बुध्दिं विधत्तां बुधः। गौरं गौरवमातनोतुच गुरुः शुक्रः स शुक्रार्थदः सौरिवैरिः विनाशनं वितनुते रोगक्षयं सैंहिकः॥

जपाकुसुमसंकाशं काश्यपेयं महद्द्युतिम्। तमोरि सर्व पापघ्नं प्रणतोऽस्मि दिवाकरम्॥
ॐ श्री आदित्यं नमाम्यहम्॥ ॐ र्‍हीं र्‍हीं सुर्याय नमः॥

दधिशंखतुषाराभं क्षिरोदार्णव संभवम्। नमामि शशिनं सोमं शंभोर्मुकुट भूषणम्॥
ॐ श्री शशिनं प्रणतोऽस्म्यहम्॥ ॐ ऐं क्लिं सोमायनमः॥

धरणीगर्भ संभूतं विद्युत्कांतिसमप्रभम्। कुमारं शक्तिहस्तं तं मंगलं प्रणमाम्यहम्॥
ॐ श्री मंगलं भजाम्यहम्॥ ॐ हूं श्रीं मंगलाय नमः॥

प्रियंगुकलिका श्यामं रूपेणा प्रतिमंबुधम्। सौम्यं सौम्यगुणोपेतं तं बुधं प्रणमाम्यहम्॥
ॐ श्री बुधं नमाम्यहम्॥ ॐ ऐं क्लिं श्रीं बुधाय नमः॥

देवानां च ऋषिणांच गुरुं कांचनसन्निभम्। बुध्दीभूतं त्रिलोकेशं तं नमामि बृहस्पतिम्॥
ॐ श्री गुरुं प्रणतोऽस्म्यहम्॥ ॐ ऐं क्लिं बृहस्पतये नमः॥

हिमकुंद मृणालाभं दैत्यानां परमं गुरुम्। सर्वशास्त्र प्रवक्तारं भार्गवं प्रणमाम्यहम्॥
ॐ श्री शुक्रं नमाम्यहम्॥ ॐ र्‍हीं श्रीं शुक्राय नमः॥

नीलाज्जनं समाभासं रविपुत्रं यमाग्रजम्। छाया मार्तण्डसंभूतं तं नमामि शनैश्वरम्।।

ॐ श्री शनैश्वराय वन्दयाम्यहम्।। ॐ ऐं ऱ्हीं श्रीं शनैश्वराय नमः।।

अर्धकायं महावीर्यं चंद्रादित्यं विमर्दनम्। सिंहीकागर्भसंभूतं तं राहुं प्रणमाम्यहम्।

ॐ श्री राहुं भजाम्यहम्।। ॐ ऐं ऱ्हीं राहवे नमः।।

पलाशपुष्प संकाशं तारका ग्रह मस्तकम्। रौद्रं रौद्रात्मकं घोरं तं केतुं प्रणमाम्यहम्।।

ॐ श्री केतुं वन्दयाम्यहम्।। ॐ ऱ्हीं केतवे नमः।।

ॐ शिरो मे पातु मार्तण्डः कपालं रोहिणीपतिः।

मुखमंगारकः पातु कष्ठं च शशिनन्दनः।।

बुध्दिं जीवः सदा पातु हृदयं भृगुनंदनः। जठरं च शनिः पातु जिव्हां मे दितिनंदनः।।

पादौ केतु सदा पातु बाराः सर्वांगमेवच। तिथयोऽष्टौ दिशः पांतु नक्षत्राणि वपुः सदा।।

इति श्री गुरु मुखोद्गीतः यः पठेत् सुसमाहितः। दिवा वा यदि वा रात्रौ विघ्नशांतिर्भविष्यति।।

नरनारी नृपाणां च भवेत् दुःस्वप्नप्राशनम्। ऐश्वर्यमतुलं तेषामारोग्यं पुष्टिवर्धनम्।।

अरोगी गुणवान् विद्वान पुत्रवान् धनवान् सदा।

मंत्र इदं महापुण्यं भक्त्या यो नरः पठेत्।।

गलत्कृष्टी महाशुली वर्षमेकं श्रुणोति यः। अवश्यं मुच्यते रोगात् गुरुर्वाक्यमितिश्रुतम्।।

कर्मदुःखी दरिद्रश्च मासं भक्त्या श्रृणोति यः। ध्रुवंवित्तं भवेत्तस्य ईश्वरस्य प्रसाद्तः।।

मुच्यते सर्व पापेभ्यो भयेभ्यश्च भवार्णवे। सुचिरायुः सुखी पुत्री युध्दे च विजयी भवेत्।।

श्रियं च लभते नित्यं रिष्टिस्तस्य न जायते। पठनात्कवचास्यास्य सर्वपापात्प्रमुच्यते।

ग्रहनक्षत्रजाः पीडाः तस्कराग्नीमुद्भवाः। ताः सर्वाः प्रशमं यांति सद्गुरु बृते न संशयः।।

ॐ नमो श्रीमन्निष्कलंकी नारायणाय जनार्दनाय नमो नमः।।



# श्री दशावताराची आरती

जयदेव जयदेव जय सद्गुरुस्वामी, गुरुजी जय जय सद्गुरुस्वामी
आरती कीजे निकलंकी देवनी, अक्षयपदधामी।। जयदेव. ।। धृ।।
प्रथम मच्छ अवतार, मार्यो शंखासुर पापी।। प्रभु मार्यो.
चार वेद लावीने दीधा, ब्रह्माने आपी। जयदेव. ।। १ ।।
बीजे कच्छ अवतार, पर्वत पीठ उपर धार्यो। प्रभु पर्वत
सात समुद्र मंथन करीने, चौद रत्न काढ्यो।। जयदेव ।। २ ।।
त्रीजे वराह अवतार, मार्यो हिरण्याक्ष पापी।। प्रभु मार्यो.।
दाढे ग्रही लइ आव्या वराह, अवनी उर स्थापी।। जयदेव ।। ३ ।।
चौथे नरसिंह अवतार, मार्यो हिरण्यकश्यप भूप।। प्रभु मार्यो.
नखे-वधारी मार्यो पापी, लइ नरसिंह रूप।। जयदेव ।। ४ ।।
पांचमे महाबलीराय, देखी सुरनर देव कांप्या।। प्रभु देखी
वामन रूप धरीने बलीने, पाताळे चांप्या। जयदेव ।। ५ ।।
छठ्ठे परशुरामअवतार, परशु हाथोमां लीधी।। प्रभु परशु.
सहस्त्रार्जुन मारीने पृथ्वी, नक्षत्री कीधी।। जयदेव ।। ६ ।।
सातमे राम अवतार, आनंद कौशल्या पामी।। प्रभु आनंद
दशमुख रावण मार्यो, सीताना स्वामी।। जयदेव ।। ७ ।।
आठमे मथुरामां अवतार, गोविंद गोकुळ गौचारी।। प्रभु गोविंद.
मामा कंसने मार्यो, गोवर्धनधारी।। जयदेव ।। ८ ।।
नवमे बुध्द अवतार, भार पृथ्वी पर वाध्यो।। प्रभु भार.
ध्यान धरी धरणीधर बेठा, योग युगत साध्यो।। जयदेव ।। ९ ।।
दशमे निकलंकी अवतार, पृथ्वी निकलंकी करशे।। प्रभु पृथ्वी
म्लेंच्छने मारीने हरिसुध, सेवकनी लेशे।। जयदेव ।। १० ।।
दश अवतारनी आरती, जे कोई गाशे।। प्रभु जे कोई.
आरती बोल्या सतगुरुब्रह्मा, मोक्षगति थाशे।। जयदेव ।। ११ ।।

# गोरनरनी आरती

गोरनरनी आरती ने चमरे ढोळाय। स्वामीजीने छतरे ढोळाय॥
चंदनने केशरना स्वामीजीने छांटणा छंटाय।
अत्तरने अबीरना स्वामीजीने छांटणा छंटाय ॥धृ॥

पहेला कर्ता जुगमां स्वामीजीने सोनाना छे घट।
स्वामीजीने सोनानां छे पाट।
सोनाने सिंहासन बेठा श्री नरसिंह भगवान ॥१॥

बीजा त्रेता जुगमां स्वामीजीने रूपाना छे घट।
स्वामीजीने रूपाना छे पाट॥
रूपाने सिंहासन बेठा श्री रामचंद्र भगवान ॥२॥

त्रीजा द्वापार जुगमां स्वामीजीने तांबानां छे घट।
स्वामीजीने तांबानां छे पाट॥
तांबाने सिंहासन बेठा श्री कृष्णचन्द्र भगवान ॥३॥

चोथा कलजुगमां स्वामीजीने माटीना छे घट।
स्वामीजीने माटीना छे पाट
माटीने सिंहासन बेठा श्री निकलंकी भगवान ॥४॥

आरे आरती गाये सतगुरु ब्रह्मा।
स्वामीजी सतगुरु ब्रह्मा॥
जंबु रे द्विपमां बेठा नरनकलंकी राय ॥५॥



# पुष्पांजली

हे परमेशा सदगुरुराया, सदभावे नमीतो।। गुरुजी.।।
पुष्पांजली ही दीनबंधु आम्ही, तुजला, अर्पितो ।।धृ।।
तन मन धन हे अर्पण करूनी, कृपाबळे आता ।।गुरुजी.।।
एकत्वाच्या सुधा समुद्री, राहीन बलवंता ।।१।।
स्वयं भास्करा जगत शंकरा, माया मलहरणा ।।गुरुजी।।
तव तेजाचे पूजन करीती, ही बांधवसेना ।।२।।
तू अस्नात स्नान घालु मग कवण्या उपचारे ।।गुरुजी.।।
शुध्द भावना चंदन लेपा करीन अलेपारे ।।३।।
विज्ञानाचा दीप प्रभाकर हृदयनभी आला ।।गुरुजी.।।
वैराग्याच्या अग्निवरी मग चूर्णधूप केला ।।४।।
सकल गुणाकृति ज्ञान दृष्टिचा लावी दीप हरि।। गुरुजी.।।
विशुध्द ज्या वासना तयांना तुज नैवेद्य करी ।।५।।
बंधुभगिनी नाना परीने सेविती भवभंगा।। गुरुजी.।।
संकटसमयी धैर्य दे करी समस्त गतगंगा ।।६।।
सर्वस्वाची ठेवी दक्षिणा सर्वसाक्षी माऊली।। गुरुजी.।।
चैतन्याची विद्युतज्योति नंतर पाजळली ।।७।।
चैतन्याची प्रभा मनोहर हीचतुझी मूर्ति।। गुरुजी.।।
अंतरीओतूनी बाहृयांतरी करी प्रगट सर्वदा ती ।।८।।
ऐसी स्थिती मज बंधुभगिनी सहजावी देवा।। गुरुजी.।।
पुष्पांजली ही करूनी मागणे प्रसाद स्वयमेवा ।।९।।
हे परमेशा सद्गुरुराया सद्भावे नमीतो।। गुरुजी.।।
पुष्पांजली ही दीनबंधु आम्ही तुजला अर्पीतो ।१०।।

❋❋❋❋❋
❋❋❋❋
❋❋❋
❋❋
❋

## प्रदक्षिणा

धन्य धन्य ही प्रदक्षिणा सद्‌गुरुरायाची।
सर्वही तीर्थे घडली आम्हा बहु पुण्य राशी॥
प्रदक्षिणा मी करूनी वंदीतो सद्‌गुरु तवचरणा।
हृदयपुष्प हे तुला वाहितो वरदहस्त शिरी ठेवा॥

## परमेश्वर नमन

अन्यथा शरण नास्ति त्वमेव शरणं मम। तस्मात्कारूण्य भावेन क्षमस्व परमेश्वर॥
त्वमेव माता च पिता त्वमेव, त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव, त्वमेव सर्वं मम देव देव॥
कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा, बुध्द्यात्मना वानुसृतस्वभावात्।
करोमि यद्यत्सकलं परस्मै, नारायणायेति समर्पयामि॥
श्री निष्कलंकी नारायण भगवान की जय!
श्री सद्‌गुरु ईमामशाह महाराज की जय!!
श्री सतपंथ सनातन धर्म की जय!!!




realpatidar.com
मलपृष्ठ परिचय
या सृष्टितलावर व्यक्ति व्यक्तित प्रेम भावाचा अभाव, अन्याय, हिंसाचार, बलात्कार, अधर्माचरण,आतंकवाद, अत्याचार, लुटमार, दूराचार, धर्मांधता, अंधश्रध्दा, रोगराई अकस्मात, अपघात, दुर्व्यसन नैसर्गिक आपत्ति, दारिद्र्य, दुःख, चिंता व अपमृत्यू अधोगतीचे प्रमाण बळावते, अनावृष्टी, अतिवष्टी, अपमृत्यू, महायुध्द, भूकंप, ज्वालामुखी ह्यांचे प्रमाण अतिशय वाढते. तेव्हा सर्व वर्ण, धर्म, आश्रम, जातीचे लोक त्राही त्राही होऊन भगवंताला अनन्यशरण जातात. तेव्हा भगवंत अवतार रूपाने या पृथ्वीतलावर अवतरतो.
realpatidar.com

साधन व नास्तिकता प्रदर्शन) या साऱ्या असत्य पूजनाने मनुष्यास हीनत्व येऊन पश्चाताप करण्याची पाळी येते. म्हणून त्या फंदात न पडता मनुष्याने वेदशास्त्राच्या आज्ञा पालन कराव्यात. वेदान्त उपनिषदादि सत्पंथ शास्त्रांतील ज्ञान वाचून योग्य अशा अधिकारी व्यक्तीच्या मुखातून ऐकून त्याचे मनन व निदिध्यासन करावे. त्यायोगे आपल्या मनावरील अविद्येचा मळ निघून बुध्दि सतेज व स्थिर होते. चतुराईने आणि पवित्रतेने राहून आत्मचिंतन करावे. व्यवहारात चतुराई हुशारी आणि चोखपणा असावा, विषप्राशन करून, गळफास लावून, स्वत:स जाळून घेऊन अथवा नदी, तलाव, विहीरीत उडी घेऊन आत्मघात करूं नये, तशा व्यक्तिस सद्गति मुळीच लाभत नाही. अपारदु:ख यमयातना नरकदु:ख भोगून अंती त्यांना जन्ममृत्यूच्या राहटगाडग्यात पडावे लागते. तारूण्य मदावर नियंत्रण ठेवावे. इंद्रिये वश करावीत. त्यांना उनाड जनावराप्रमाणे मोकाट सोडू नये. आपल्या सद्बुध्दिचा अंकुश इंद्रियावर व मनावर ठेवावा. परस्त्रीजवळ कोणतीच गुजगोष्ट अथवा गुप्त गोष्ट करू नये. परस्त्री लगट करू नये. अग्नीवर उष्टे खरगटे घाण पाणी टाकू नये. अग्नी ही देवता आहे. हिरवे ओले झाड उपटू नये मोडू तोडू नये. कारण त्यांत प्राणाचे वास्तव्य असते. झाडे ही परोपकारी असतात. जीवप्राणी मात्रास ते फळफूल अन्नछाया सर्पण देऊन घरादाराकरिता सुध्दा त्याची लाकडे उपयोगात येतात. सकाळच्या प्रहरी सूर्योदयाच्या समयी फुलेफळे तोडू नये. सजीव झाडाची फुले, पाने, फळे तोडून निर्जीव अशा पाणी पथ्थराला वाहून काय उपयोग, त्यापेक्षा त्या पान, फूलफलांनी एखाद्या संत महात्मा भक्ताचा गौरव केल्यास अधिक श्रेयस्कर आहे. निर्जिवांच्या पूजेपेक्षा सजीवाची पूजा ही अधिक फलदायी व श्रेष्ठ आहे. अवाचक पशुपक्षी प्राण्यावर विनाकारण आळ घेऊ नये. जीवप्राणी मात्रांची कायावाचा मनाने हिंसा करूं नये. जेवण करीत असतां क्षुल्लक कामासाठी उठबैस करूं नये. तो एकप्रकारे अन्नदेवतेचा अपमान असतो. उष्टे, खरगटे, नासके कुजके अन्न पशुला सुध्दां घालू नये. कोणाचीही उणिव, अयब, खोडी चारचौघात उघड करून हिनवूं नये. एकांतात त्यास समज देऊन चुकी सुधरविण्याचा प्रयत्न करावा केवळ दोष देऊ नये. कोणाशीही भानगड, भांडणतंटा, दावा, फटका करूं नये. समज देऊन सुधरविण्याचा प्रयत्न करावा. साम, काम, दंड, भेद या तत्वांचा अवलंब करावा. गुरुचे वचन लपविण्याचा प्रयत्न करू नये. गुरु महाराज जे ज्ञानोपदेश करतात मार्गदर्शन करतात प्रसन्नचित्ताने ते ग्रहण करून आत्मसात करावे. अनुभवी, अधिकारी, संत, महात्मा ज्या आज्ञा देतात त्या कोणत्याही प्रकारचा अवमान न करता पालन कराव्यात. त्यांचे वचन लोपवूं नये. त्याच्या वचनास काळिमा लावूं

नये. जो जिज्ञासु सत्साधक असतो, त्यास अधिकारी व जबाबदार महात्म्यांनी योग्य असे मार्गदर्शन करावे व उत्तरोत्तर त्याची उन्नति करण्याचा प्रयत्न करावा. हातात जपमाळ घेऊन एकांतात एकाग्रतेने गुरुमंत्राचे भगवंताचे सद्‌गुरु महाराजाचे नामस्मरण करावे.' अशाप्रकारे सतगुरुब्रह्मा चिनदेशातील दैत्य कालिंगाच्या स्त्रीला सुरजाराणीला आणि कमलाकुंवर आदि तिच्या मुलामुलींना उपदेश करीत असतां शारीरीक शुध्दी, मानसिक पावित्र्य व आत्मिक उन्नतीच्या नियमांचे त्यांनी मार्गदर्शन केले.

(श्लोक १३०-१४३)

ब्रह्मानुभूति संप्पन्न अशा सद्‌गुरुंची ज्यांना प्राप्ती झालेली आहे. त्यांनी नित्य गुरुचरणामृत प्राशन करून गुरुवचनामृत श्रवण करावे. सत्संगाच्या पवित्र जलाने आपला मनरूपी लोटा स्वच्छ निर्मळ शुध्द करावा म्हणजे त्यात सतपंथाचे क्रियाचरण रूपी अमृत चांगले राहू शकेल. जो या सतपंथरूपी परमार्थ मार्गात प्रथम प्रवेश करीत असेल त्याला योग्य असे मार्गदर्शन करावे आपणास माहित असलेल्या व आपण पाळत असलेल्या धर्मतत्वांची जाणिव त्याला करून द्यावी. आपणास माहित नसल्यास गप्प बसावे पण विकृत वा अयोग्य मार्गदर्शन करू नये. सतपंथाच्या या नीतीशतकाच्या आचरणाने मनुष्य खरा सत्साधक मुमुक्षु व ब्रह्मसाक्षात्कारी ब्राह्मण होतो. मौंजीबंधन करून ब्राह्मणकुमार ज्याप्रमाणे जानवे घालून ब्राह्मणत्व संपादन करतो तव्दत गुरु मुखी कडून सत्पंथाची दीक्षा घेऊन कांकण बांधून या नीतीशतकरूपी जानवे घालून मुनिवर ऋषीवर्यांनी खऱ्या अर्थाने ब्राह्मण व्हावे. ब्राह्मण खरा तोच जाणावा कीं ज्याला ब्रह्मस्वरूपी सद्‌गुरुंची प्राप्ती होऊन ब्रह्मानुभूती झालेले आहे, त्याचेच आवागमनाचे लक्ष चौर्यायशीचे फेरे मिटतात. यासाठी हे सद्भक्त ऋषीवर संत सज्जनहो तुम्ही नित्य नियमाने गुरुगतगंगेत जाऊन सत्संग रूपी जलाने स्नान करा. आत्मज्ञान संपादन करा. आत्मज्ञान संपन्न सत्साधकावर सद्‌गुरु माऊली विशेष कृपाळू असते. अडसष्ट तीर्थांचा महिमा श्रीसद्‌गुरूंच्या चरणी असतो. असे ज्ञानस्वरूप संपन्न सद्‌गुरु महाराज हे गतगंगेत गुप्त रूपाने वसलेले असतात. ज्यांचे सभ्दाग्य थोर असते त्यांना ते ज्ञानरूपी दिव्य दृष्टीने दिसतात. आत्मज्ञान व योगध्यानात सत्साधकाने चौळस राहावे. आपल्या योगसाधनेत प्रत्ययास आलेले अनुभव योग्य अशा महात्म्याकडून चांगले शोधून तपासून घ्यावेत. महात्म्यांचे अनुभव जाणून घेऊन आपल्या चित्तात त्याची अनुभूति घ्यावी. जगतात ईश्वरी तत्व सत्‌तत्व सर्वव्यापी असल्याने गुण रूपाने सुक्ष्मरूपाने ते सर्वत्र असते. ही जाणीव चित्तात सतत ठेवून ऋषीवराने निर्मल पवित्र होऊन

ध्यानधारणा योगाभ्यास करावा. आपल्या मनाची विषयसेवनाकडची धाव थोपवून तनमनाची कसोटी सहन करून प्राणपणाने साधना करावी. त्यासाठी हे सद्भक्त सुरजादेवी आणि बाळा कमलाकुंवर तुम्ही इमान, श्रध्दा, भक्ति दृढ ठेवून गतगंगेत येऊन सत्संग करा. महान तपस्वी असे जे ब्रह्मस्वरूपी महात्मा आहेत ते आज या कलियुगात सतगुरु रूपाने प्रगट झालेले आहेत. जंबुद्विपात भरतखंडात कुंवारीका क्षेत्रावर हे सतगुरु इमामशाह या नावाने प्रगट होऊन सतपंथाची अमर अखंडज्योत प्रगट करतील त्याठिकाणी हे सद्भक्तांनो तुम्हा साऱ्यांचा मिलाप सद्गुरुंशी होईल. भगवान निष्कलंकी नारायण दहाव्या अवतार रूपाने प्रगट होईल. दैत्यांचा संहार करून अवनीतलावरील अनंत कोटी सद्भक्तांचा आत्मस्वरूपात लय करील त्यांत तुम्ही आपल्या अनामिक तेजाने अधिक तळपाल. तोपर्यंत हे प्रीय भक्तांनो तुम्ही अमरापुरीच्या अमर धामांत सुखाने आनंदाने विश्राम करून तपश्चर्या करा. जोपर्यंत मानव जन्मांत आहांत तोपर्यंत सत्यवचन पाळून ब्रह्मज्ञान संपादन करा. एकांतात एकाग्रचित्ताने भगवंताचे तेजस्वी स्वरूपातून ध्यान नामस्मरण चिंतन करा. ब्रह्मनिष्ठ तपोनिधी सद्गुरुंचा अनुग्रह घेऊन त्यांच्या सान्निध्यात मार्गदर्शनानुसार योगसाधना अजपाजाप साध्य करा. सदैव नम्रतेने लीनतेने संत महात्मा सतगुरुंशी वागा, नियमीतपणे स्वाध्याय तप व ज्ञानश्रवण करा. अशाप्रकारे पूर्ण प्रेमाने तनमन प्राणाने धर्माचे आचरण कराल तर हे ऋषिवर मुनिवर हो तुम्ही अमरापुरीला जाल. अमरापुरीच्या दिव्य सुखाचा उपभोग घेत अनंत काळापर्यंत अमर होऊन राहाल व शेवटी भगवंताच्या अंतीम अवताराच्या लीलाचारित्र्यात समरस होऊन त्याच्या स्वरूपात तुमची आत्मज्योत विलीन होईल. हे सद्भक्तांनो अशाप्रकारची सतपंथाची ही जागृत ज्योति तुमच्यासमोर प्रज्वलित केलेली आहे. तिच्या तेजोकिरणांनी आपले जीवन उजळवून उज्वल करा.' (श्लोक १४४-१६३)

सद्गुरु ब्रह्मा सुरजाराणी आणि तिच्या परिवाराला सतपंथाचा उपदेश करीत असतां ते आठही जण अत्यंत जिज्ञासु बुध्दिने हात जोडून सद्गुरु महाराजांच्या समोर अत्यंत नम्रतेने उभे राहून सद्गुरुंच्या मुखातील एकेक अगम्य रत्नाप्रमाणे अमुल्य बोल आपल्या कर्णेन्द्रियांत साठवत होते. अमृतोपम उपदेश ऐकता ऐकताच त्यांना भावसमाधी लागली. ब्रह्मानंद सागरात बुडी मारून त्यांची मने यथेच्छ तृप्त झाली. त्यांची ती उत्कट भाव स्थिती पाहून सद्गुरुंचे मन सुध्दां उचंबळून आले. ते म्हणाले, 'हे अमरापुरीच्या जिज्ञासु पांथस्थहो आणखी मी तुम्हाला थोडे आगम भविष्य सांगतो ते ऐकून तुम्ही योग्य तो सारासार विचार करून कसे वागावे ते ठरवा. अनादिकाळापासून

अनंत युग कल्पापासून या सृष्टीत कालचक्राचा जो खेळ चालू आहे. त्यानुसार प्रत्येक चतुर्युगांच्या अंती प्रकृतीचा जो नीत्य प्रलय होत असतो, त्याला सर्गकाल म्हणतात. या कलियुगाच्या अंती चतुर्युग संपत असल्याने जीवप्राणीमात्रांचा संहार व जलप्रलय होईल तशा वेळेला जे अमरापुरीला पोहोचलेले वैकुंठभुवनात गेलेले पुण्यात्मे, भगवंताच्या अवतारसमयी भगवंताबरोबर अवतरून अनंतलीलाचरित्र करतील व अंती भगवंताच्या निर्गुण, निराकार, स्वयंज्योति, स्वरूपात विलीन होतील. सूक्ष्म वासनाबीज रूपाने सुध्दा ते अस्तित्वांत राहू शकणार नाहीत. कारण सतपंथाच्या सत्‌दर्शनाप्रमाणे जीवनभर वागून त्यांनी अध्यात्मिक तेज आत्मबळ संपादन केलेले असते. सत्‌मार्गाच्या ज्ञानध्यान योग साधनेनुसार साधना करून तपश्चर्या केलेली असते, जीवन्मुक्त होऊन विदेहमुक्त झालेले असतात म्हणून त्यांचे वासनाबीज समूळ नष्ट झालेले असते. ते परमेश्वराच्या तेज स्वरूपांत तेजरूपाने विलय पावतात. ते परमेश्वर रूप होतात. त्यांचे अस्तित्व मिटते. पण जे कर्मजंजाळात बध्द झालेले जीवात्मे असतात ते संसारसागरात जन्ममरणरूप कोलांट्या उड्या घेत घेत अनंत वासनांची बीजे उराशी बाळगून शेवटी त्या प्रलय काळापर्यंत येतात. कृतकर्माची आसक्ती सोडत नाहीत. गुरुसंग, सत्‌संग करीत नाहीत. ज्ञानप्राप्ती वा आत्मोन्नती करण्याची इच्छा करीत नाहीत, मायीक विकार व सांसारीक व्यवहारातच गुरफटलेले असतात. अशा जीवात्म्यांना सद्‌गती मुळीच लाभत नाही असे हे मायावी जीवात्मे तिर्यकयोनीत अथवा निकृष्ट पापाचारी मानवांच्या जन्मांत जाऊन रोगी दुःखी कष्टी होतात व वासना दुःख भोगतात. या कलियुगाच्या शेवटच्या प्रहरी प्रलय काळाच्या वेळी जेव्हा सूर्य नऊनेजावर येऊन सहस्त्रकळांनी तळपायला लागेल, पृथ्वी ताम्रवर्णी होऊन सूर्याच्या उष्णतेने धगधगायला लागेल, अशा वेळी त्या अपरिपक्व जीवात्म्यांना अनंत दुःख, कष्ट, हाल, अपेष्टा भोगाव्या लागतील. ज्यांनी कांहीही ज्ञानसाधना केली नाही आस्तिक बुध्दी ठेवून ईश्वराची भक्ती केली नाही ते मुक्कर नाठाल जीवात्मे जळायला लागतील. जे खरे सतपंथी असतील सतपंथाच्या नीतिशतकाप्रमाणे वागणारे असतील ते पार उतरतील पण जे असत् मार्गाला लागलेले पापात्मे असतील त्यांना घणाचे घाव सहन करावे लागतील, अपार कष्टदायक अशा यमयातना भोगाव्या लागतील. त्यावेळेस ते पश्चाताप करून आक्रोश करतील पण काय उपयोग? आत्मोध्दाराचा वेळ निघून गेलेला असतो. केवळ पश्चाताप करून काय उपयोग? यासाठी हे सद्भक्त गण हो हे भक्त कमलाकुंवरा हे सद्भक्त सुरजादेवी तुम्ही आताच जागृत व्हा केवळ या दानवांच्या आसुरी सुख संपदेत आनंद मानून राहू नका. जीवीताचं सार्थक करा

सतपंथ सत् दर्शनाची साधना करा, सद्गुरुंची सेवा स्मरण करा. आत्मज्ञान संपादन करा. आळसात राहू नका. भगवान निकलंकी नारायणाची उपासना भक्ती आराधना करा. गतगंगेत जाऊन पूजाअर्चा करून आत्मबळ संपादन करा. सत्संगात सदैव राहून आत्मज्ञानी व्हा. ब्रह्मज्ञानाच्या योगाने वासनात्मक कर्मबीजे नष्ट करा. वैराग्यवृत्ती धारण करून सांसारिक मायिक विकारापासून मनाला परावृत्त करून सत्चित् आनंदघन परब्रह्म तत्वांशी ध्यानयोगाने एकरूप तद्रूप व्हा. अनंतकोटी जीवात्मे त्यांच्या उध्दारार्थ तुमची वाट पहात आहेत.' सद्गुरुब्रह्मांचे ते वचन ऐकून, आपल्या आत्मोध्दाराबद्दल त्यांना वाटत असलेली कळकळ पाहून त्या सर्व सद्भक्तांचे हृदय उचंबळून आले. त्यांच्या नयनात कृतज्ञतेने अश्रु तरारले. अत्यंत नम्रतेने लीनतेने ते सद्गुरुंना म्हणाले, 'गुरुमहाराज आपले आम्हां अज्ञजीवात्म्यांवर केवढे मोठे उपकार झाले. त्याचे वर्णन आमच्याने करवत नाही. आतां आमच्याने धीर धरवत नाही. हे प्रलयकाळचे दु:ख भोग नष्ट व्हावेत व आम्हाला सद्गती लाभावी यासांठी आपण आम्हाला सतपंथ सत्धर्माची दीक्षा द्यावी, आम्ही अपराधी, नादान अज्ञ जीव आहोत आपली स्तुति कशी करावी, पूजा कशी करावी हे सुध्दां आम्हाला कळत नाही. आपण या जगतातील अज्ञ जीवात्म्यांना मायाविकारात बध्द झालेल्यांना, अहंकाररूप अंध:कारात चाचपडत असलेल्या जीवात्म्यांना दीपस्तंभरूप होऊन सत्यज्ञान प्रकाश देऊन उज्वल मार्गाने घेऊन जाणारे महान उपकारक महात्मा आहात. हे स्वामी आम्ही अज्ञ नादान जीवात्मे पूर्वकर्मदोषामुळे या असूर योनीत येऊन आसुरी संपदेत लोळत होतो. पण आपण आम्हाला जीवनसार्थक्याची पूर्ण जाणीव देऊन जागृत केले. हे सद्गुरु नाथ ज्याप्रमाणे बत्तीस दातांच्या खडद्या पाहाऱ्यात आपण जीभेला पूर्णपणे सुरक्षित ठेवलेले आहे तसे आम्हाला आपल्या कृपा छत्राखाली सुरक्षीत ठेवावे. आम्हाला आपल्या छायेपासून दूर करू नका.'

(श्लोक १६४-१७६)

सुरजा राणी आणि कमलाकुंवर म्हणाले, 'हे सद्गुरुनाथा दयाळू कृपामूर्ति आज या जन्मात आमचे वास्तव्य दैत्य कुळात झालेले आहे. पण आम्हा बालकावर कृपादृष्टी करून आपण आमचे सारथी झालेले आहात, आम्हा अज्ञ विषयी सांसारिक मायिक जीवात्म्यांचे उध्दारक मार्गदर्शक आहात हा केवढा मोठा उपकार आमच्यावर आपला झालेला आहे. आमच्या जीवीताच्या सार्थक्याकरितां आपण दैत्य दरबारातसुध्दां धावून आलात. केवढे आमचे भाग्य थोर! आज आपल्या सत्संगाने आम्ही कृतार्थ झालो. परम पावन झालो. आता आणखी एक कृपादृष्टी करून आम्हाला या सत्धर्माची

दीक्षा द्या. अशी आमची आपल्या चरणारविंदी अत्यंत नम्र प्रार्थना विनंती आहे. असे म्हणून सद्‌गुरचरणी अनन्य भावाने त्या आठही जणांनी साष्टांग प्रणिपात केला, सुरजाराणीने पदर पसरून सतपंथ धर्मदीक्षेची मागणी केली. अत्यंत कृपावंत होऊन सद्‌गुरु महाराजांनी कलश घटपाट पुजेची मांडणी करून ज्योत प्रज्वलित केली. पुष्प, अक्षता, गंध, उदधूप, प्रसाद यांनी युक्त अशी पूजा करून मंत्रोपचारे ब्रह्मा, विष्णु, महेश, आदिनारायण, आद्यशक्तिचे नैवेद्य समर्पित केले. विश्वचालक, सर्व देवीदेवतांना नमन करून विश्व शक्ति अेकवटण्याकरितां त्यांची विनंती प्रार्थना केली. नंतर अजीया, वीजीया, बेनी, अलकाकुंवर, रंगारूप, केवळभाई, कमलाकुंवर आणि महाराणी देवी सुरजामाता यांना सतपंथ सत्‌धर्माची दीक्षा दिली, गुरुमंत्र देऊन भगवान निष्कलंकी नारायणाचा जाप ॐ प्रणव ब्रह्म युक्त उपदेशिला, कलितारक असा तो षोडश कलायुकत मंत्राचा उच्चार करून 'ॐ नमो निष्कलंकी नारायण जनार्दनाय' अशा त्या मंत्राचा उच्चार त्यांच्याकडून करविला नंतर उपदेश करतांना सद्‌गुरु महाराज त्यांना म्हणाले, 'हे सद्भक्त प्रेमी शिष्यवृंद हो हा सतपंथाचा नियम धर्म मी तुम्हाला सांगितलेला आहे त्याप्रमाणे सदैव आपले आचरण ठेवा. अथर्ववेदातील ज्ञान, ध्यान साधनेनुसार ब्रह्मविद्या संपन्न व्हा. सतपंथाच्या संपूर्ण नीतीशतकाचे आचरण करा व आपली आत्मोन्नति करून घ्या. आपणास कोणत्या ना कोणत्याही वेळेस आमचे म्हणजे सतगुरु ब्रह्माचे मार्गदर्शन राहील. भगवान निष्कलंकी नारायणाच्या कृपा छत्राखाली तुमचे संरक्षण होईल. निश्चिंत मनाने एकाग्रतेने एकांतात ही ध्यानसाधना योगाभ्यास आचरा. बाह्य जगतात आपण आचरीत असलेल्या मार्गाचा प्रपोगांडा बडेजाव डामडौल न दाखवता एकांत भक्ति करा. दैत्य कालिंगाच्या आसुरी भावापासून सावध राहा. दैत्य घरांतच राहून तुम्हाला ही ऊपासना करायची असल्याने सावध राहा. तुमच्या साधना मार्गात व्यत्यय येऊ नये म्हणून जागृत राहा. आपल्या सचोटीच्या स्वकष्टार्जित सत्पात्र अशा याचकास अर्पण करा. पूजा अर्चा करून मंत्रोपचाराने अर्पण केलेली दान दक्षिणा आम्हालाच मिळते. मग ती समुद्रात जरी पडली तरी आम्हालाच पोहोचते कारण आम्ही तुमच्या धनसंपत्तिचे भोक्ते नाही पण तुमच्या भावभक्ति श्रध्दा प्रेमाचे भोक्ते आहोत या दानदसवंत प्रमाणेंच आपल्या जीवीताची सुध्दां दसवंत ईश्वरचरणी समर्पित करून त्यांना गर्भवासात दिलेल्या वचनातून मुक्त व्हा. जीवीताची दसवंत म्हणजे दिवसाचा २४ तासाचा दहावा भाग, दोन अडीच तास तरी कमीतकमी ईश्वरस्मरण, गुरुसेवा, गतगंगासेवा, सत्संग, नामस्मरण, जप, पूजा, ध्यान, संकीर्तन यात खर्च करा. बाळा भक्ता कमलाकुंवरा तुला मी ही अथर्ववेदीय घटपाट कलश पूजा यज्ञविधीचा

मंत्रोपदेश करून मुखी म्हणून तुझी योजना करीत आहे. मुखीच्या क्रियाचरणाप्रमाणे वागून तूं हा योगाभ्यास करून तपश्चर्या कर. तुझी ही तपश्चर्या पूर्णपणे सिध्दीस जाऊन तूं अनंतकोटी जीवात्म्यांचा उध्दारक होशील असा माझा तुला आशिर्वाद आहे. (श्लोक १७७-१८८)

सद्गुरू महाराजांचा आशिर्वाद लाभताच कमलाकुंवरला अत्यंत आनंद झाला. सद्गुरू महाराजांच्या चरणी लागून तो वारंवार नम्रतेने नमन करूं लागला. अत्यंत हर्षभरीत चित्ताने तो सद्गुरू महाराजांना म्हणाला, 'हे सद्गुरूनाथा त्रिभुवनाचे स्वामी, लोकोत्तर दिव्यानुभूतीचे दिग्दर्शक आपण आहांत, जीवनाचे सार्थक्याचा मार्ग विसरलेल्यांना जागृति देण्यासाठीच केवळ आपले आगमन व संचार असतो. स्वामी आम्हां अज्ञ जनांचे आपण आधारस्तंभ आहात. आपल्या परमार्थ मार्गात नुकतेच पहिले पाऊल मी टाकले. जरी दीपस्तंभ रूपाने आपण आमच्या जीवन तारूचे सुकाणू झाला आहात पण प्रत्यक्ष हे तारू पैलतीराला न्यावे कसे या मुखीपदांचे आचरण करावे. कसे याचे ज्ञान तर मला कांहीच नाही म्हणून आपण मला मुखी गतगंगाप्रमुखाचे गुरूचे आचरण कसे असावे याबद्दल माहिती द्यावी.' त्याचा तो प्रश्न ऐकून व जिज्ञासा जाणून सद्गुरू म्हणाले, 'बाळा कमळाकुंवरा मुखीचे अथवा गुरूचे आचरण कसे असावे याबद्दल मी तुला सांगतो ऐक. पहिल्या प्रथम जेव्हां सृष्टी पंचमहाभूत वगैरे कांही नव्हते तेव्हा परमेश्वराचे स्वरूप अलक्ष होते. निर्गुण निराकार अनंतकोटी सूर्याप्रमाणे तेजस्वी निरंजन निरामय सतरूप होते. संकल्प मात्राने त्या सत् मधून ॐ प्रणवब्रह्माचे प्राकट्य होऊन त्यास सगुण साकारत्व आले. त्यापासून योगमाया व पंचमहाभूत निर्माण झाले. योगमायेपासून त्रिगुणात्मक प्रकृति व जीव प्रगट झाले. त्या सतमधून प्रणवोच्चारासहित सगुण ब्रह्माचे, चैतन्य स्वरूप आत्म्याचे प्राकट्य झाले. चैतन्यस्वरूप सगुण ब्रह्म म्हणजेच ब्रह्मदेव होत. रजोगुणाधिष्ठित प्रकृतिच्या अधिष्ठात्या त्या ब्रह्मदेवाने प्रथम ८ लाख करण वर्षे तपश्चर्या केली. प्रणव ब्रह्मस्वरूप भगवान आदिनारायणाच्या प्रेरणेने ब्रह्मलोकापर्यंतच्या संपूर्ण दिव्य स्वर्गलोकांची किल्ली ब्रह्मदेवाला प्राप्त झाली. नरकलोकाची किल्ली भगवंतांनी यमराज देवतेच्या स्वाधिन केली आणि मृत्यूलोकाची किल्ली भगवतांनी निर्माण केलेल्या नानाविध प्राणिमात्रामधून विचार करून मानवाला दिलेली आहे. अशाप्रकारचे हे अधिकार भगवंतानी प्रत्येक अधिकारी जीवात्म्यांकडे सुपूर्द केलेले आहेत. जे कोणी आपापल्या नियुक्त क्रीयाचरण धर्माप्रमाणे वागतील ते अमरापुरीला जाऊन अमर होतील. तेथे त्यांना नित्य सद्गुरू ब्रह्माचे दर्शन होऊन चौदाभुवनांचे ज्ञान प्राप्त होईल. स्वर्ग मृत्यू पाताळ व चौदा भुवनांत

व्याप्त असलेले चैतन्य ब्रह्म तत्व ज्ञानदृष्टीने जाणून प्रत्यक्ष ज्याने त्याची अनुभूति घेतलेली असते आणि शेवटी समस्त समष्टीतील आत्मचैतन्य तत्व व्यष्टीत दाखवितात म्हणजे ब्रह्मांडी ते पींडी व्यापलेल्या आत्मतत्वाचा साक्षात्कार अधिकारी साधकास दर्शवितात तेच सतगुरूब्रह्मा समजावेत. जगतात गुरू सद्गुरू बरेचसे म्हणवितात पण ब्रह्मस्वरूपी लीन झालेले अनंत चैतन्य तत्वांत विलय पावलेले महात्मे फारच विरल असतात त्याचा भेद आपल्या ज्ञानदृष्टीने जो जाणतो तो मुनिवर होय. ब्रह्मस्वरूपी गुरूनर महात्मा हे या जगतात सर्वत्र व्याप्त पण अलोप असतात. गुप्त रूपाने ते सर्वत्र संचार करतात. कित्येक महात्मे उन्मन होऊन आत्मस्वरूपातच लीन झालेले असतात. बाह्य जगताची जाणिवही ते विसरलेले असतात. बाप, भाऊ, भगिनी, माता, बंधूजन आप्त वगैरे कशाचीही त्यांना शुध्द नसते. स्वत:च्या देहाचे भान सुध्दां हरपलेले असते. अशा उन्मन महात्म्याकडून आपल्या स्वत:च्या सांसारीक गरजा पूर्ण करण्याच्या उद्देशाने त्यांची सेवा करणारा मूर्ख सांसारीक कीडाच समजावा. शेवटी त्याला हात घासून पश्चात्ताप करण्याचीच पाळी येते. यासाठी हे मुनिवरा सद्भक्ता आपल्या ब्रह्मस्वरूपी सद्गुरूजवळ नम्रतेने लीनतेने आत्मोन्नतीच्या साधनांची याचना करा. ते अंतर्यामी तुमची मनोकामना पूर्ण करतील. पण आपमतलबी पणाने सांसारीक कामना पूर्ण करण्याची याचना केल्यास अनंत हालअपेष्टांचीच फक्त प्राप्ती होईल यासाठी आपले मन सांसारीक विकारापासून हटवून गुरूगतगंगेत सत्संगात वळवा. सत्संगच तुम्हाला तारणारा पार उतरविणारा आहे. नित्य नियमीतपणे सद्गुरू चरणामृत व वचनामृत सेवन करा ब्रह्मस्वरूपी संत महात्मा सद्गुरूमहाराजांचा कृपाशिर्वाद मिळवा.

(श्लोक १८९-२०१)

मुखी अथवा गुरू कोणास म्हणावे अथवा कसे असावे याबद्दल सद्गुरू ब्रह्मा कमलाकुंवर आणि इतर सद्भक्तांना सांगत आहे कीं ते स्वत: आत्मज्ञानी असावे, स्वत:च्या जीवास आत्मज्ञानाने मुक्त करणारे आणि अन्य जीवात्म्यास मुक्तीमार्गाचे दर्शन घडविणारे असावे. मुखी अथवा गुरू कोणाच्या घरी गेले तर त्या घरातील जीवात्म्यांचे कल्याण घडवून उन्नती करायला हवी. स्वत: असत्याच्या मार्गाने न जाता नीतिनियमांचे उल्लंघन न करता सत्यमार्गाचा बोध सर्वांना करावा, कोण्या एखाद्याच्या मागे कांही पीडा असली - रोगराई भूतबाधा करणीकवटाळ वगैरे पीडा असली तर आपल्या तपोबलाने ते निवारण करण्याचा प्रयत्न करावा, सद्भक्तांना शुध्दभक्तीचा मार्ग दाखवून त्यांची लक्षचौर्यायर्शीची बंधने तोडावीत, मुखी अथवा गुरुंनी मेलेली माणसे जीवंत करावीत म्हणजे भवसागरातील असत्यरूप जलचरांनी

काम, क्रोध, लोभ, मोहरूपी जलचरांनी ज्यांना गिळंकृत करून मृतप्राय केलेले आहे अशा जीवात्म्यांना ज्ञानामृत शिंचनाने जागृत करून सन्मार्गाला लावावे. प्रत्येकाचे मनोगत शोधून योग्य असे मार्गदर्शन करवून सन्मार्ग दाखवावा. मुखी अथवा गुरूंनी गांवोगावच्या सेवकांची योग्य ती बडदास्त ठेवून पूजेअर्चेकरीतां त्यांनी मनोभावे जे कांही पान, फूल, प्रसाद, धनधान्य आणलेले असेल, अर्पण केले असेल ते मंत्रोपचाराने परब्रह्मार्पण करून पावन करावे व त्याची पूजापात्री स्वीकारण्यास गुरुमहाराजांची व भगवान श्रीनिकलंकी नारायणाची आराधना करावी. मुखी अथवा गुरू स्वत: ज्ञानी पंडित असावे सर्व जीवात्म्यांना वैकुंठपदाचे अधिकारी करावे. त्यांनी स्वत: मृत्यूंजय भेद जाणावा अगम्य असे आगम भविष्य व निगम म्ह. वेदगतीचे भेद जाणण्याचा प्रयत्न करावा. निसर्गाचा भेद जाणून हवामानाचा अंदाज शोधून लोकांना तशी जागृति द्यावी. वृष्टीविचाराचा भेद जाणावा. सर्वांच्या वागणुकीचा भेद जाणून त्यांचे गुण शोधून घ्यावे व अवगुण असल्यास पर्यायाने त्यास उपदेश करून ते अवगुण कमी करण्याचा प्रयत्न करावा. मुखी अथवा गुरूंनी सद्गुरूब्रह्माचा भेद जाणून साधना करून साक्षात्कार करून घ्यावा व जन्ममृत्यूच्या जंजाळातून स्वत:ची आणि अन्य भाविक भक्तांची सुटका करून घ्यावी. सत्याला अपार कसोटी सहन करावी लागते पण शेवटी त्याचाच विजय होत असतो हे जाणून स्वत: सत्याचरण करावे व अन्य सद्भक्तांना तशी शिकवण द्यावी. स्वप्रयत्नाने कष्ट करून सचोटीने धनोपार्जन करावे. त्याच धन संपदेतून देवतार्चन दानधर्म व स्वत:चे आणि कुटुंबाचे भरणपोषण करावे. अशाप्रकारे सचोटीच्याच मार्गाने धनसंपत्तीचे उपार्जन व विनीयोग जो करतो त्याच मुखीची अथवा गुरूची सेवा अमर होत असते. त्यांचेच मार्गदर्शन सद्भक्त शिरोधार्य मानून आचरण करतात. सत्य, धैर्य आणि यथालाभ संतोष हे गुण ज्याच्या अंगी बाणलेले आहेत तोच खरा मुखी गुरू अथवा सत्पंथी समजावा. हे गुण अंगी बाणवून सत्पंथाच्या साधना करीत गेल्यास मनुष्य अमर होऊन जीवन्मुक्त होतो. दानधर्म दसवंत आणि निष्काम भावनेने पूजा अर्चादि सुकृत करून जीवात्मा एकचित्ताने एकमनाने सत् तत्वांचे अनुसंधान करील तर या एकाच मानव जन्मांत तो अमरापुरीला जाऊन अमर होईल. याकरिता हे ऋषीवर्य हो तुम्ही नित्यनित्य सत्संग करा. सत्संगच तुम्हाला तारणारा आहे. (श्लोक २०२-२१७)

हे सद्भक्तांनो सतपंथाच्या आचारणाने तुम्ही अमरापुरीलाच जाऊन पोहोचाल. अन्यत्र कोठेही भटकण्याची व भूल पडण्याची वेळ येणार नाही. सन्मार्ग सोडून असत्याचे आचरण करणारा मायोपाधीत पडून विकारवश होतो व भ्रांतिच्या योगाने -

अधोगतीस जातो. खरा ऋषिवर आपल्या सत्यतेच्या योगाने पूर्णत्वास पावतो. जे खरे तपस्वी सत्यवान ऋषिवर असतील ते भगवान निष्कलंकी नारायणाच्या सैन्यात मेळाव्यात येऊन मिळतील. अत्यंत तेजस्वी चपळ चतूर अशा कुदरती घोड्यावर स्वार होण्याचे सद्भाग्य त्यांना लाभेल. गुरू ब्रह्मा आणि नर निष्कलंकी नारायणाच्या सान्निध्यांत राहून त्यांच्या दर्शनाचे कृपेचे अधिकारी ते जीवात्मे होतील, गुरू नर गतगंगेत ते महात्म्ये जीवन्मुक्त होऊन भगवंताच्या सामीप्य सारूप्य सायुज्य मुक्तीचा सोहळा भोगतील. यासाठी हे सद्भक्तांनो आपले सर्व प्रकारचे दुःख आपल्या हृदयस्थ सद्गुरूला निवेदन करा. आपले भवदुःख त्यांच्याशिवाय दुसरा कोणीही निवारण करण्यासारखा नाही. नित्य गतगंगेत सद्गुरूंच्या सेवेला हजर राहा. मुखी अथवा गुरूंनी गतगंगेत पूजाअर्चा सेवेकरितां स्नान करून शुध्द व पवित्र होऊन यावे. सदरा, धोतर, कोट, टोपी व उपरणे अशी पाचही वस्त्रे, स्वच्छ धुतलेले व पांढरे असावे. गतगंगेत आल्यावर नम्रभावाने सर्वांना प्रमाण करावा. कलशपूजेकरितां आसन मांडावे. शुध्द तुपाच्या दोन ज्योति आसनाच्या एका बाजूस व दुसऱ्या बाजूस तीन ज्योति अशा एकूण पाच ज्योति प्रगट कराव्यात. आदिनारायण, आद्यशक्ति, ब्रह्मा, विष्णू, महेश अशाप्रकारे हे सत्पंथाचे मुख्य पंचायतन दैवत आहे. सतपंथ घटपाट पूजाविधी मंत्रानुसार घटपाट कलशाची स्थापना करून गंध, अक्षता, फुले, फुलहार, अत्तर, चंदन, केशर, कस्तुरी वगैरे पूजा साहित्याने मंत्रोपचाराने ज्योत व कलशाची पूजा करावी. उद, धूप दीप, नैवेद्य समर्पण करून सर्व देवी देवदेवतांना नमस्कार करून आवाहन करावे. सर्वांचा कृपाशिर्वाद घ्यावा. नंतर आरती, पुष्पांजली करून पुजेची समाप्ती करावी. सद्गुरूमहाराजांचे चरणामृत व कृपाप्रसाद ग्रहण करून पूजेज्या शेवटी जेवढा वेळ शक्य होईल, तेवढा वेळ एकाग्र निश्चल मन करून ज्योति स्वरूपांतून भगवंताचे ध्यान व स्मरण करावे. एकाट्याने अथवा सामुहिक ध्यान करावे. मुखी अथवा गुरूंनी गतगंगेचा भार उतरून आपल्या तपोबलाने वाहून न्यावा. गुरू गतगंगेतील एखाद्या व्यक्तिने कांही व्यक्तीगत अथवा सामाजीक गुन्हा केलेला असला, पाप केलेले असले आणि त्या कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन त्याने जर पूजेमध्ये त्याबद्दल माफी मागितली तर मुखी गुरू अथवा गतगंगेने त्याचा तो दोष आपल्या तपोबलाने दूर करावा व त्याला पावन करून त्याच्या हृदयातील दुःखाचा भार हलका करावा. मुखी अथवा गुरू यांनी मनाच्या उच्छृंखल वृत्तीस जिंकले पाहिजे. मनाचे लाडकोड न पुरविता, वैराग्य युक्त विचाराने ध्यानाने व सत्य संकल्पाने मनास आवर घालावा. आपल्या मुखातून कोणासही काहीही वाईट शब्द बोलू नये. दररोजच्या दैनंदिन व्यवहारात आपल्या हातून दोष

युक्त कामे घडलेली असतील तर पूजेच्या आधी गतगंगेजवळ क्षमा मागून प्रणव मंत्रोपचाराने पापकर्माची निष्कृति करावी, गतगंगेतील जीवात्म्यांचा मंत्रोपचाराने कर्मदोष निवारण करून शुध्द अंत:करणाने त्याला कृपाशिर्वाद द्यावा. गतगंगेला क्रियाआचार धर्माची जाणीव देऊन उपदेश करावा. जो मुखी अथवा गुरु सत्यवचन बोलतो व पालन करतो. व्रत, जप, तप व युगधर्मानुसार युगतीथीचे आचरण करतो. कलियुगाचे युगतीथीचे अजवाळी बीजेचे व्रत, उपवास, तप, दानधर्म करतो आणि वर सांगितलेल्या क्रियाचारधर्माचे पालन निर्भयतेने करतो, त्यास सद्‌गुरु ब्रह्माचे व ईश्वराचे नित्य दर्शन होते. हे कमलाकुंवर सद्भक्ता हे निर्मल ज्ञान तू आपल्या हृदयात धारण कर व सत्व पालन करून अनंत कोटी जीवात्म्यांचा मार्गदर्शक तारक उध्दारक हो.'

(श्लोक २१८-२३५)

महाचीन देशातील सद्‌भक्तांना सतपंथ सनातन धर्माचे दिग्दर्शन व उपदेश करून सद्‌गुरु ब्रह्मा श्रमस त्यांचा निरोप घेण्याकरितां उठून उभे राहिले व म्हणाले, 'हे सद्‌भक्तांनो माझे येथील कार्य संपले दुसरीकडे धर्मप्रचारार्थ मला जायचे आहे. आता मी सांगितल्याप्रमाणे तुम्ही साधना करा व शक्यतो याच जन्मात सायुज्यता मिळवा. ते नच जमल्यास तुम्हास दुसरे जन्म घ्यावे लागल्यास भगवंताच्या कृपेने तुम्हास हे संपूर्ण ज्ञान स्मरण राहील व तुम्ही अमरपदाला जाल. मुक्तीच्या वेळेस तुम्ही याच ठिकाणी प्रगट होऊन सतपंथ सनातन सद्धर्माचे आचरण कराल व सद्‌गुरुब्रह्मा आणि निकलंकी नारायणाच्या अंतीम स्वरूपात विराम पावाल.' अशा प्रकारे प्रेमळ कृपाशिर्वाद देऊन त्यांनी भक्त कमलाकुंवरच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवला. तेव्हा सर्वजण सद्‌गुरुंची विनवणी करूं लागले कीं हे स्वामीन् जेव्हा भगवान निष्कलंकी नारायण स्वार होऊन युध्दाकरिता सज्ज होतील. अशा समयी आपण आमच्यावर अनुग्रह करून दर्शन द्यावे. सद्‌गुरु म्हणाले, 'हे परमश्रध्दाळू भक्तजन हो सद्भक्तांना दर्शन देण्यास त्यांच्यावरील जीवापाड संकटातून त्यांचे संरक्षण करण्यास व योग्य मार्गदर्शन करण्यास आम्ही वाटेल त्याठिकाणी व वाटेल तेव्हा प्रगट होत असतो. ते आमचे ब्रीद आहे. ते पूर्ण करण्यास आम्ही अनंतरूपाने अनंत नामाने प्रगट होतो. सद्भक्तांचा नाश कधीही होऊ देत नाही. तुम्ही ज्याठिकाणी ज्यावेळेस आमचे स्मरण कराल तेथे त्यावेळेस आम्ही प्रत्यक्ष हजर होऊ. आज या कलियुगांत ही आमची सद्‌गुरु ब्रह्माची जागृत ज्योत गुरु इमामशाहांच्या ठायी प्रदीप्त झालेली आहे. या कलियुगांत सद्‌गुरु ब्रह्मा इमामशाह रूपाने व भगवान नारायण निष्कलंकी नारायण रूपाने प्रत्यक्ष प्रगट जागृत आहेत. जे गुरुमार्ग गामी आहेत तेच अंतर्यामी ह्यांना

ओळखून जाणू शकतील. कलियुगांत सद्‌गुरुंनी अनंत कोटी जीवात्म्यांना आत्मबोध दिलेला आहे पण त्यातील जे खरे ईमानी निष्ठावान ध्येयनिष्ठ सद्भक्त आहेत तेच निर्वाण पदाला पोहोचतात. अश्रध्दावान बेइमानी, कधीच मुक्त होत नाही. आज या कलियुगात भरतखंडातील जंबुद्विपात साबरमती नदीतिरावर इमामपुरी नगरी ज्याठिकाणी बसलेली आहे ते कुवारीका क्षेत्र महान तीर्थक्षेत्र आहे. आता ते क्षेत्र गुप्त आहे पण भगवंताचा दहावा अवतार निकलंकी नारायण प्रगट रूपधारण करून या क्षेत्रावर येईल, तेव्हाच या क्षेत्राचा महिमा सुध्दा प्रगट होईल. पृथ्वीवरील मुख्य चोवीस देशातील राजप्रतिनिधी आपापल्या सैनिकगणासह भगवंताबरोबर याठिकाणी संगठीत होतील, ते म्हणजे आजपर्यंत जे सद्भक्त आपापल्या भक्तगणासह अमरापुरीला पोहोचलेले होते त्या साऱ्यांचा हा मेळावा असेल त्यांत सद्गुरूब्रह्मा भक्त कमळाकुंवरला मुखी नेमून त्याच्या करवी घटपाट कलशपूजाविधी करायला लावतील. संपूर्ण जगतांतील संत, महंत, महात्मे, ऋषीवर, मुनिवर निरनिराळ्या रूपांनी प्रगट होऊन या ईशभक्तीच्या सांघीक मेळाव्यात आपापल्यापरीने भाग घेऊन सक्रीय साहाय्य करतील. चतुर्युगातील हा शेवटचा महायज्ञ राहील. या महायज्ञास नव खंडातील देवलोक सत्पुरुष सद्भक्त देवी देवदेवता प्रत्यक्ष प्रगटरूपाने उपस्थित राहून भगवंताची सांघिक उपासना करून त्यांना ज्यापासून हे अध्यात्मबळ प्राप्त झाले होते. अशा त्या नारायणाच्या अनंत कळांमध्ये त्यांच्या आत्मिक कळा विलय पावतील. सर्व जीवात्मे भगवंताच्या सगुण साकार अखंड तेजोराशीत विलीन होतील. भक्त आणि भगवान हे द्वंद मिटून सर्व सद्भक्त भगवंत रूपच होऊन जातील. अशाप्रकारचा हा विलययोग हे सद्भक्तांनो जेव्हा प्राप्त होईल तेव्हां आम्ही, आपण सर्व त्या अविनाशी, अखंड, अनादी, सत्‌चित ब्रह्मात विलय पावू.' असे सांगून सद्भक्तांना कृपाशिर्वाद व आश्वासन वचन देऊन सद्‌गुरु महाराज तेथून अंतर्धान पावले.

सद्‌गुरु इमामशाह महाराज सांगत आहेत की, 'चीन महाचीन देशात जाऊन सद्‌गुरुब्रह्मस्वरूपी शमसदीन महाराजांनी भक्त कमलाकुंवर आणि महाराणी सुरजादेवी व इतर अन्य सद्भक्तांना जो सत्‌बोध दिला त्याच्या आचरणाने ते सद्भक्त अजरामर झाले. देहरूपाने तर ते केव्हांच नष्ट झाले. पण आत्मरूपाने आजही ते जीवंत आहेत व या सृष्टीच्या लयापर्यंत कायम अविनाशी राहणार आहेत. कशासाठी! तर सद्‌गुरु ब्रह्मांनी त्यांना उपदेशिलेल्या महान सत्य सनातन धर्माचा प्रचार करण्यासाठी ही कर्तव्याची धुरा धर्मप्रचार व आचरणाची धुरा आपल्याकरवी संपूर्ण जगतातील

मानवांच्या समोर मांडण्यासाठी - त्या मानव समाजातून सद्भक्त निर्माण करवून त्यांच्याकडून सत् धर्माचे आचरण करवून व मानवसमाजाची उन्नती करवून सद्गतीचा लाभ घडविण्यासाठी ते संपूर्ण जगतात निरनिराळ्या सद्भक्तांच्या संतमहात्म्यांच्या रूपाने प्रगट झालेले आहेत. जगदुध्दाराचे महान कार्य शिरावर घेऊन स्वत: अनंत हाल अपेष्टा सहन करीत. अज्ञ कुसंस्कारी मानवांच्या शिव्याशाप द्वेष, निंदा, मत्सर अवहेलना सारे सारे कांही सहन करीत त्याच मानव समाजामधून सत्धर्माचे सत्मार्गाचे बीजारोपण करीत आहे. ज्यांचे पूर्वकर्म शुभ आहे, संस्कारी आहे जे कृतकर्माविषयी पश्चाताप दग्ध आहे, ज्यांचे विचार वैराग्ययुक्त आहे, ज्यांची बुध्दि सत्संग रत आहे, अशा मानवात ही भक्तीची बीजे रूजल्यानंतर दिवसानुदिवस ते वृध्दींगत होत आहेत व सुसंस्काराच्या मोठमोठ्या शाखा काढून आज मानव समाजात सत्भक्तीचा मोठा वृक्ष फोफावत आहे ही सारी त्या अचिंत्य अर्तक्य भगवंताचीच लीला आहे. आपण सर्व त्याचे एक पाईक आहोत. म्हणून हे सद्भक्त हो आपल्या शिरावर सुध्दां या सत् धर्म पालनाची, आत्मज्ञान संपादन करून आत्मोध्दार व जगदुध्दार करण्याची मोठी जबाबदारी आहे. आपण भगवंताजवळ तसे वचन दिलेले आहे. त्या वचनाच्या पूर्ततेसाठी ही जबाबदारी अंगिकारून आपण धर्माचरण व यथामति प्रचार केला पाहिजे. सतपंथाची शिकवण प्रथम आपण स्वत: आचरणात आणावी त्यायोगे आपल्या सान्निध्यांत असलेल्या घरातील व्यक्तिवर त्याचा प्रभाव पडेल. आपले घर सुधारल्यानंतर त्याचा प्रभाव समाजावर पडेल, समाज सुधारल्यानंतर मानवाची प्रगति होऊन उन्नती होत जाईल. मानवाच्या उन्नतिकरितां आपण आपापल्या परीने हातभार लावावा.' (श्लोक २३६-२४७)

सद्गुरु इमामशाह महाराज या कलियुगाचे स्वरूप वर्णन करतांना सांगतात कीं, कलियुगात अंतीम समयी नित्य अविनाशी, निर्गुण, निरामय, सच्चिदब्रह्म, सगुण साकार रूपाने प्रगट होऊन अवतारलीला करील. त्याआधी कलीचे साम्राज्य संपूर्ण जगतात प्रसृत होईल. जगतात सर्वत्र अनाचार, अंधाधुंदी, अराजकता होईल समाजाची नितीनियमांची धर्माची घडी सारी विस्कटली जाईल. अधर्म बळावेल व पापी, दुष्ट, चोर, दरवडेखोर, समाजकंटक लोकांचा सर्वत्र सुळसुळाट होईल आणि त्यांच्या अन्यायामुळें, अत्याचारामुळें पुण्यकृत्ये धर्मकृत्ये लोप पावतील धार्मिक लोकांची सत्पुरुषांची मुस्कटदाबी होईल तशा वेळेला भगवान निकलंकी नारायण प्रगट होतील. पापाचारांच्या. अत्याचारांच्या साधारणत: शंभर खुणा पूर्ण झाल्यावर म्हणजे शंभर टक्के पापाचरण झाल्यावर भगवान

या सृष्टीचा भार उतरविण्याकरितां स्वत: स्वयंसिध्द रूप पगट करून कार्य करतील सुष्टांचे परिपालन, दुष्टांचे संहारण, धर्माची स्थापना व मुक्तीमार्गाचे दिग्दर्शन करतील. दोघे सख्खे भाऊ एकाच आईवडिलांचे संतान धनसंपत्तिच्या वारसासाठी आपापसात लढतील. कोणाच्याही हृदयांत कोणाविषयीही दयाभाव राहणार नाही. मुले आपल्या आईवडिलांना सुध्दा मारतील, भाऊबहिणीला अश्लिल शिव्या देतील, कलियुगात सर्वत्र कपट व्यापेल. सत्यवान, शीलवान, दयावान वगैरे धार्मिक सत्प्रवृत्त लोकांचा अनन्वीत अवहेलना छळ होईल. त्यांना आपले सत्व, शील सोडून देण्याची पाळी येईल. जमिनीत अन्न धान्य अगदीच अल्प प्रमाणात पिकेल जमीन नापेर होईल. वृष्टी पडून सुध्दां पिके चांगली येणार नाहीत, दुष्काळ पडतील. दासीपुत्र राज्य करतील. सुखचैन आरामभोग भोगतील आणि औरस संतती अन्नान दशा पावून देशोधडीला लागतील. ब्राह्मणांचे जानवे तुटेल त्यांत म्हणजे केवळ जानवे घातलेल्या ब्राह्मण्यांत काहीही त्राण राहणार नाही. ब्राह्मणतत्वाचे सर्व संस्कार लोप पावतील. क्षत्रीयांचे शौर्य, धैर्य, लोप पावेल, स्त्रैण बनून पापाचरण करतील. विश्वासघात अति करतील. स्वकर्तृत्वाच्या गप्पा मारून ब्रडेजाव व डामडौल दाखवून लोकांना विश्वासात घेतील व शेवटी त्यांना लुबाडून भोंदून फसवितील. जीवप्राणीमात्राविषयीं दया, प्रेम, सेवाभाव राहणार नाही. लोक जीवहिंसा अती करतील. कुडकपट, दंभ, असत्याचरण करून धनसंपत्ति अपार जमवतील. त्या धनाचा लोकांसाठी तर नव्हेच पण स्वत:च्या सुखासाठी सुध्दा न वापरता जमिनीत गाडतील व त्यांत वासना अटकल्यामुळे मोठे मोठे सर्प होऊन त्याची रखवाली करतील. अशाप्रकारे कुड कपटाचरणास ऊत येऊन अखेर एकमेकांचे शिर फोडून नष्ट भ्रष्ट होऊन दुर्गती पावतील. सत्य, धर्म, न्याय, नीती कोणीही जाणणार नाहीत. मानणार नाहीत. (श्लोक २४८-२५७)

हलकट आचरणाचे लोक अनन्वीत पापाचरण करतील, व तेच सर्वावर वर्चस्व गाजवितील. सत्प्रवृत्त व सुसंस्कृत अशा लोकांचे कोणीही काही वचन पाळणार नाही. शूद्र ब्राह्मणाला जुमानणार नाही. अठरा वर्ण एकच होतील. संपूर्ण एकाकार भ्रष्टाचार होईल कोणत्याही एकाच वर्णाला श्रेष्ठत्व राहणार नाही. वर्णसंकर होईल सर्व समानतेच्या एकतेच्या विचाराने पछाडलेली जनता मानवसमाजाची तळापासून वरपर्यंतची क्रियाचरणाची घडी विस्कटून टाकतील. त्यापापाचरणाचा परिणाम वातावरणावर घडून जाईल. पाताळातील पाणी खुंटेल म्हणजे तलाव, विहीरी, धरणे यांचे सुध्दां पाणी आटले जाईल, वनस्पती फळणार फुलणार नाहीत. स्त्रिया निस्तेज, पंगु, आंधळी,

अपंग, अशी संतती निर्माण करतील. प्रजेत लैंगिकता, व्यभिचार अतिशय वाढेल. विवाहासारख्या शुभकार्यात सुध्दां मांगल्य राहणार नाही. ब्राह्मण पुरुष शुद्रकन्येशी व शुद्र ब्राह्मण कन्येशी विवाह करतील. पुरुष कुलवान, शीलवान स्वस्त्रीचा त्याग करून बाजारबसव्यांशी व्यभिचार करतील, नऊवर्षांची कुमारी गर्भधारणा करील व अपार कष्ट भोगील. गाईला एकदाच दोन वासरे होतील, एका स्त्रीला एकदाच तीन तीन चिंदे होतील विकृत गर्भधारणेमुळे विचित्र अवयव आकृतिची मुलं जन्मतील. पृथ्वीवर पापाचा भार अतिशय वाढेल. लोक विश्वासघात अति करतील म्हणून कोणीही कोणावरही विश्वास ठेवणार नाही. राजा वचन पालन करणार नाही. लोभाच्या, स्वार्थाच्या योगाने सर्वत्र कपटाचरण व्यापेल. लहानव्यक्ति ज्ञानाने, वयाने व मानाने व अनुभवाने मोठ्यास मान देणार नाही, सर्व खाद्य पदार्थातील सत्व, रस, कस निघून जाईल व नि:सत्व अन्नधान्य खाद्यपदार्थ खावे लागतील. रासायनिक खतामुळे कांही वातावरणाच्या प्रदुषणामुळे नि:सत्व अन्नावर उदरनिर्वाह करावा लागेल. दही, दुध सुध्दां नि:सत्व होतील. दह्यावर लोणी अथवा साय सुध्दां येणार नाही. रिध्दी, सिध्दी सर्व आटल्या जातील. त्यासुध्दां कांही काम करू शकणार नाही. गुरुला शिष्य कांहीच मानणार नाहीत, शिष्य गुरुवर खोटे दावे करून त्यांना कोर्टात खेचतील व त्यांचा अपमान करतील, धर्मी म्हणवले जातील. गुरुकडून दीक्षा घेतील पण सारे अधर्माचरण करतील, गुरुचा उपदेश कोणी ऐकणार नाहीत. सत्शास्त्रांचे अध्ययन श्रवण करणार नाही.

रहस्यकता, कल्पित कादंबऱ्या, अश्लिल वाङ्मयाचे वाचनात जास्त रस घेतील आणि तसे कुसंस्कार स्वत:वर व आपल्या संततीवर घडवितील. बहिण, मुलगी यांचा पैसा मिळविण्याकरिता विक्रय करतील. व्यभिचारास लावतील. आई आणि मुलगी दोन्ही सवती सवतीप्रमाणे वागून पैशाकरीता व स्वत:च्या विलास सुख चैनीकरितां आपापसात लढतील. क्षुल्लक कारणावरून सासवा सुनेचे झगडे होऊन एकमेकांचे केस धरून झगडतील. सुना सासवांना मारतील. त्यांच्याकडून घरातला सर्व हिशेब घेऊन स्वत: व्यवहार करतील. सासवांना पाणी भरायला लावून सुना मेवामिठाईची चंगळ उडवतील. अशा प्रकारचे हे दुर्वर्तन सर्रास आढळून येईल. (श्लोक २५८-२६५)

या कलियुगात जो खरा सत्वशील असेल त्यास कोणत्याही प्रकारचे मानाचे स्थान मिळणार नाही. कोणत्याही पदाला लायक अशी व्यक्ति टिकू शकणार नाही. नालायक, लाचखाऊ व स्वार्थसाधु अधिकाऱ्यांचाच सर्वत्र सुळसुळाट होईल. सत्वशील

माणसाचे जीणे अत्यंत दुस्तर खडतर होईल, कमशील लोक सुख, चैन, आराम भोगतील. अशा प्रकारची सामाजिक स्थिती पाहून सत्वशील लोक सुध्दां सत्व सोडून वागतील. चांगले चांगले कुलवान शिलवान लोक असत्याचरण करतील. वातावरणांत संपूर्ण आमुलाग्र बदल घडून येईल जमिनीच्या पोटात अतिशय उष्णता निर्माण होईल. सूर्याची उष्णता सुध्दा दिवसेंदिवस वाढत जाईल. फळे झाडावरच सुकले जातील. फळासहित झाडे कोरडे होतील. आकाशातून वृष्टीच होणार नाही. अन्न, धान्य, फळे पिकणार नाही. धरणीकंप, ज्वालामुखी, जोरजोराची वादळे, चक्री वादळे, उल्कापात, विद्युतपात होऊन महलमाडद्या, कोट, किल्ले सारे कोसळून उध्वस्त होतील. पर्वतशिखरे कडे कोसळतील. सर्वत्र उध्वस्त जंगल माळरान होईल. खंडभंग होतील, अणुबॉम वगैरे सारखे घातक बॉंब वर्षाव होऊन वातावरण दूषित होईल. रोगराई, अपमृत्यु, प्रचंड आगी, वगैरे मुळे अतोनात प्राण हानी होईल. बारा बारा कोसांच्या अंतराने वस्ती विरल होईल. मनीमानशी कल्पना नसतांना एकाएकी महाभयंकर आगी लागतील. शेतीमाल, कारखाने, अन्नधान्य यांचे अपरिमीत नुकसान होईल. अत्यंत सोसाट्याचे वारे, चक्रीवादळे होतील व त्यायोगे पर्वत शिखरे सुध्दां उडू लागतील. मानवाला जीवन जगणे दुरापास्त होईल. अशा अत्यंत कठीण समयी जो तो जीवात्मा आपल्या हीताचा तेवढा विचार करील. कुंटुंबीयाचे कीतिही हाल झाले तरी तिकडे दुर्लक्ष करील. आपापसातील प्रेभवान नाहीसा होईल. स्वत:च्या उदर निर्वाहाकरीतां व स्वार्थाकरीतां आईस्वत:च्या मुलीला कूकर्म करायला लावील. कुटुंबात कलह निर्माण होतील. सत्वशील माणसे सुध्दां सत्व सोडून आपापसात भांडणे उपस्थित करतील. दैत्यलोक देवतातुल्य सात्वीक लोकांवर वैरदावे उपस्थित करतील. त्या जाचाला कंटाळून देवता सुध्दां बळी पडतील. देवपूजा, मंदिरे, ओस पडतील, भूतभक्ति, मूंजा, पिशाच्यसाधन, वीरसाधन अशाप्रकारच्या भक्त्या घरोघर वाढत जाऊन रस्त्यातून घरातून स्त्री वा पुरुष भगत भगतिणी घुमत फिरतील. ईश्वराचे भजन पूजन कीर्तन नामस्मरण बंद पडून असत्याची दंभयुक्त पूजा होईल. विवाह मंगलकार्ये, सामुदायीक भोजनप्रयोजन वगैरे कार्यात एका व्यक्तिस जरी आमंत्रण दिले तरी त्याठिकाणी घरादारातील सर्वजण उपस्थित होतील. मदिरापान करून रंगाचा भंग करतील. मंगलकार्यांचे संपूर्ण अमंगल करतील व कोर्टात जाऊन कार्यकरणाऱ्या व्यक्तीवर मानभंग केल्याचा आरोप करून दावे रचतील. स्त्रीयांना एकेका वेळेस पाच पाच मुले होतील. संततिनियमनाचे कितीही प्रयोग केले तरी लोकसंख्या वाढत जाईल. रजस्वला धर्म, स्पर्शास्पर्श, वृध्दी, सुतक, जननाशौच कोणीही पाळणार नाही आणि त्यामुळे रजोगुण जनतेत अधिक बोकाळून

सर्वत्र लैंगीकता अराजकता, अनाचार, व्यभिचार, बलात्कार वगैरे विकार जास्त प्रमाणात वाढतील. पाच वर्षाच्या मुलीला ऋतुप्राप्त होऊन ती गर्भधारणा करील. अतिथी अभ्यागत यांचा आदरसत्कार कोणी करणार नाही. चांगल्या प्रसिध्द पवित्र अशा ठिकाणी देवमंदिरात सुध्दां कोणी सत्वशील गुणवंत असे मुखी गुरुसुध्दां राहणार नाहीत, कोणीही कोणाचा विश्वास धरणार नाही. कोणीही परदुःख निवारण करणारा पाठीराखा राहणार नाही. सर्वजण जनमनाची लज्जा सोडून निर्लज्जासारखे वागतील. कोणी गुप्त रीतीने प्रगट रीतीने सुध्दा देवमंदिरात जाणार नाही. ते ओस पडतील. खरी सत्वशील भक्ति कोणी करणार नाही. सर्वत्र असत्याचरण अधर्माचरण दंभ व पोटभरू भक्ती चालेल. कोणीही दिलेले वचन पाळणार नाहीत. (श्लोक २६६-२७५)

राज्याचे रक्षण करणारेच राज्य लुटून घेतील. प्रजासुध्दां राजाचे हुकूम पाळणार नाही. राजेलोक अथवा राज्यकर्ते राक्षसी प्रवृत्तीचे होतील. प्रजा सुध्दा चोर, लुटारू आणि मतलबी ढोंगी होईल. राणी दासांची सेवा करील आणि दासी राजाची सेवा करील. उधार उसनवार घेतलेल्या वस्तू रकमा परत देणार नाही. कलियुगात राजे देवधर्म कांहीही मानणार नाही, राजा विश्वासघातकी, संधीसाधू होईल. प्रजेला योग्य असा त्राता शास्ता मिळणार नाही. भक्तलोकसुध्दा देवाची ब्रह्माची निंदा करतील. शुभ अशुभ असा कोणताही विचार मानणार नाहीत. राजा प्रजेला लुटेल व पिता परिवाराला लुटेल. पिता आपल्या कन्येचेच द्रव्य हडप करील. माता मुलाबाळांना विकेल, मानसन्मानाने भोजनास न जाता अपमानीत झाल्यावर जेवणास जातील. वेदशास्त्रे पुराणे वाचले जातील पण त्यातील मर्मभेद जाणणार नाहीत. एखाद्या गोष्टीचे आश्वासन देतील, पण त्याप्रमाणे वागणार नाहीत. सकाळी बोलतील कांहीच व संध्याकाळी करतील सर्व उलट. सर्वत्र दंभ, कुड, कपट, अनाचार चालेल, आप इमान कोणीही पाळणार नाही. बेईमानी गैरविश्वास जास्त वाढेल. पंडित आपस्वार्थाकरितां मतलबाचे तेवढे पुराण वाचतील आणि ते पुराण ऐकणारे श्रोते सुध्दां लंपटी लटपटी व मतलबी राहतील. युध्द समयी हजारो लोकांमधून एखादा योध्दा होईल व तशा हजारोमधून एखादाच सन्मुख होऊन लढाई करेल. लाखो लोकामधून एखादा दानशूर होईल, कोट्यावधी लोकामधून एखादा योगी, यति, संन्यासी ब्रह्मचारी होईल. सत्कुलातील स्त्रीया निर्लज्जाप्रमाणे समाजात वावरतील, स्त्रीया भृणहत्या, बालहत्या, व गर्भपात करतील, ब्राह्मण, वाणी, जैन, बौध्द वगैरे अहिंसावादी लोक जीवहिंसा करून अभक्ष्यभक्ष्यण अपेयपान करतील. बली दिला जाणाऱ्या देवीदेवतांची पूजा केली जाईल व देवाचा

प्रसाद म्हणून मांशासन व मदिरापान केले जाईल. गाईची विक्री होईल ब्राह्मण कन्याविक्रय करतील. दिवसेंदिवस सुस्थिती लोपली जाईल, दु:स्थिती वाढत जाईल. अति कठिण, सामान्य जीवन जगण्यास सुध्दां कठिण अशी परिस्थिती निर्माण होईल. मोठमोठी नगरे, लोकवस्तीने गजबजलेली रहदारी, कारखाने, वगैरेंनी विस्तारलेली नगरे, उध्वस्त होतील, सर्वत्र उजाड उदास वातावरण होईल. उदरनिर्वाहाकरिता, पोटभरण्याच्या स्वार्थापोटी लोक अनन्वीत कृत्ये, चोऱ्या, खून, दरवडे करतील कुळगोत्राला शिवीगाळ करतील. कुलधर्म गोत्रधर्माला कलंक लावतील. सत्यवान, शीलवान कुळातील स्त्रीया सुध्दां पतिव्रता राहणार नाहीत. स्त्रीयांत स्त्रीत्व व पुरुषात पुरुषत्व राहणार नाही. स्पर्शास्पर्शविचार करणार नाही. शास्त्रोक्त कामसेवन न करता पशुवत कामक्रीडा करतील. परदु:ख निवारण करणारा कोणीही सांपडणार नाही. उलट सर्वांना दु:खीत पीडीत करणारेच विपुल होतील. घरातील, कुटूंबातील, समाजातील, आपापसातील प्रेमभाव कमी होईल. दया, धर्म, प्रेम आपुलकी सर्व नाहीशी होईल. धर्मी लोक आपापसात निंदा करतील व पापकर्म जोडतील. माणसाचे आयुष्य दिवसेंदिवस कमी कमी होत जाईल आणि राहिलेले अल्प आयुष्यसुध्दां पापाचरणात जाईल. जगतातील सर्व मोठमोठ्या नद्या सुध्दां आटल्या जातील. पापाच्या भाराने धवलधोरी पृथ्वीचा भार स्थिर ठेवू शकणार नाही म्हणजे अतिशय भूकंप ज्वालामुखी होत जातील. प्रचंड आगी लागतील. सृष्टीतील वनस्पति संपूर्ण नष्ट होतील व वातावरणात धूरच धूर होवून श्वासोच्छवास करणे सुध्दां मुष्कील होईल. हवेच्या प्रदुषणाने, आवाज, ध्वनी, प्रकाश वगैरेच्या प्रदुषणाने जीव प्राणिमात्र गुदमरतील. अंध, बधिर, मुके, वेडसर, असमाधानी असे होतील सर्वत्र हाहा:कार होईल, संपूर्ण जीवामात्र त्राही त्राही करून हालहाल भोगतील.

(श्लोक २७६-२९१)

भारताच्या उत्तरेस असलेल्या चीनमहाचीन देशात आसुरी संपदा बळावून तेथील अधिपति दैत्य कालिंगा, कलियुगातील प्रत्यक्ष कालपुरुष, संपूर्ण जगतावर आपली सत्ता गाजवू पाहील. अतिशय कुडकपट, दंभाचार करून लोकांना तो स्वधर्मकर्मापासून भ्रष्ट करील. दुष्काळग्रस्त रोगपीडीत आणि भौतिक संकटांनी त्रस्थ झालेली जनता, आर्थिक सामाजिक विषमतेने पीडलेल्या जनतेस, सांसारीक, शारीरीक, मानसिक शांतिचा खरा सत्यमार्ग न आकलन झाल्यामुळे अज्ञान, अशान्त अविद्याग्रस्त जीवात्म्यांचे मानसिक व्यंग लक्षात घेऊन दैत्य कालिंगा व त्याचे आसुरी मताचे प्रचारक त्यांच्या चित्तात आपल्या असूर धर्माची बीजे पेरतील. आपण मोठे ऋध्दिसिध्दीपति तिर्थवासी महामानव आहोत अशाप्रकारचे दंभाचरण ते लोकांना दाखवितील आपल्या आसुरी तपश्चर्येच्या

बळावर पिशाच्चसाधन, मोहिनीविद्या यांच्या साहृयाने भाविक भोळ्या जनतेला भुलवून लुबाडतील. पाणी मंत्रून तूप तयार करतील. वाळू मंत्रून साखर तयार करतील. अतिशय कर्णमधूर असे नाद वाजवून लोकांना मोहीत करतील व लोकांचे चित्त आपल्याकडे आकृष्ट करतील. कालिंगा दैत्य स्वत: अंतरीक्षातून येऊन अत्रंगी आसनावर बसून भवदु:खाने पीडलेल्या जनतेची मनोकामना पूर्ण करील. लाकडी घोड्यास दान खाऊ घालतील, निर्जीवास सजीव करून दाखवतील. नदीचे पात्र पलटवून उगमाकडे नेऊन दाखवतील. लोकांना त्यांच्या त्यांच्या सात पिढ्यांचा आईबापांचा चित्रपट दाखवतील एवढेच नव्हे तर त्यांच्या सगे सोयऱ्यांचा सुध्दां सात सात पीढीचा चित्रपट दाखवून त्यांच्या मानसिक श्रध्देवर आपला आसुरी ताबा गाजवतील. अशा रीतीने लोकांची सत्यधर्मावरील श्रध्दा डळमळीत करून स्वत:कडे त्यांची मनशक्ति आकृष्ट करतील. आपल्या आसुरी धर्माचा अनाचार, अत्याचार, बलात्कार, व्यभिचारास प्रबोध देऊन लोकांना असत्य मार्गास लावतील निरनिराळ्या देवीदेवतांच्या विकृत स्वरूपाच्या भाकडकथा रचून व त्यांचा लोकांमध्ये मोठ्या प्रमाणात प्रचार करून लैंगिकता व विषयासक्ति वाढवतील. जयभोले, जयशंकर, काशिविश्वनाथ वगैरे नांवे उच्चारून दुर्व्यसने करतील. गांजा, भांग, तंबाखु, मदिरा, मांशासन, स्त्रीलंपटपणा वगैरे दुर्व्यसनांना ऊत येईल व शीवशंकराच्या नांवाने धर्माशी त्यांचा संबंध जोडतील. अशाप्रकारे दैत्य कालिंगा व त्याचे प्रचारक शिष्य अनाचार करून खोट्या करामती करून दाखवितील म्हणून चांगल्या सत्यवान, शीलवान लोकांचे सुध्दां धैर्य खचेल. सच्छिल पुण्यवान लोकांचा मनोभंग करून सत्यधर्मापासून परावृत्त करणे हे त्यांचे मुख्य काम राहील. आपली आसुरी शक्ति बलवान व समर्थ करण्यासाठी वाटेल ती प्रलोभने लोकांना दाखवून लोकांची सत्‌धर्माकडची प्रवृत्ति कमी करतील. अशाप्रकारच्या ह्या असत्य, दंभी, आसुरी कलाकृति करीत करीत उत्तरेकडून ते सरस्वती नदीपर्यंत चाल करून येतील. सती लोकांचे सत् चुकविण्याकरीतां, लोकांचा इमान, श्रध्दा, धर्मनिष्ठा डळमळीत करण्याकरितां त्यांनी कीतीही प्रयत्नकेला तरी सुरशक्ति ही कांही स्वस्थ बसणारी नाही. ती दैवीशक्ति बलसंपन्न करण्यासाठी तिचे सामर्थ्य संगठीत करण्यासाठी भगवान शेषशाई नारायण स्वत: या अवनीतलावर प्रगट होऊन आपल्या निरनिराळ्या देवतारूपी घटकांना निरनिराळ्या ठिकाणी प्रगट करून दैवी संपत्तिचा प्रसार प्रगट होऊन भगवंताच्या मूळ सनातन सद्‌धर्माचे दिग्दर्शन व प्रचार करून दैवी संपदा संगठीत करतील. योग्य समय येताच चिलोत्र संवत्सर चैत्र मास पौर्णिमा गुरुवार या दिवशी भगवान निकलंकी नारायण प्रगट होऊन दैत्य कालिंगाचा प्रतिकार करण्यासाठी त्यांच्यावर जाहिररीतीने स्वारी करतील. (श्लोक २९२-३०९)

दैत्य कालिंगानिर्मित दुःस्थिती संपूर्ण जगतात जेव्हा व्यापक होईल तेव्हा खऱ्या सद्गुरुला कोणी मानणार नाही. या कलियुगाच्या अंतीम समयी सर्व प्रकारचे आचारधर्म लोकव्यवहार बिघडतील. स्वैराचार सुरु होतील. असत्यपणाला जास्त प्राधान्य मिळेल. सत्य लोप पावेल. देवस्थापना, देवतार्चन, पूजा यांचे भेद कोणी जाणणार नाही, गुरु मुखी गतगंगेतील लोकांशी मिथ्या वादविवाद करून झगडे दावे उपस्थित करतील, सत्संग, कथा, किर्तने कंटाळवाणे वाटतील, लोकसंगतीत, नाटके, तमाशे जास्त लोकप्रिय होतील. अनुयायी लोक सुध्दां गुरुमुखी गतगंगेत वर्ष सहा महिन्यातून एकदा येतील. सतगुरुंचे वचन पालन करणार नाहीत. गुरु मेळाव्यात सत्संगात मान बढाईचा विचार करतील, गुरु काय उपदेशितात, गुरु माऊली आपल्या हिताचे काय सांगते तिकडे दुर्लक्ष करून मी लक्षाधीश, कोटयाधीश, माझ्याकरिता उच्चासन हवे, माझे हुकमतीप्रमाणे सर्वांनी वागले पाहिजे. वगैरे मान मान्यतेचा बडेजाव डामडौल दाखवतील. गुरूबद्दल, शास्त्रग्रंथाबद्दल, कोणताही आदरभाव बाळगणार नाही. भगवंतांनी जे अवतार धारण केलेले आहेत. त्यातील तत्व न जाणता रामच खरा देव होता. कृष्ण संधीसाधू धूर्त होता. बौध्द झालाच नाही. वराह अवतारच नव्हता. नृसिंह ही केवळ गप्पा आहे वगैरे अशाप्रकारचे वादविवाद करून अश्रध्दा निर्माण करतील. भगवंताच्या अवतारपात्रात जे भेद मानतील ते आपल्या शीरावर मोठेच पापाचे ओझे घेतील. वर वर्णिलेली कलियुगाची संपूर्ण निशाणी जेव्हा घडून येईल तेव्हा संपूर्ण पृथ्वीत एकंकार होईल. वर्णसंकर व अनाचार होईल. अतिशय विकृत अशी कलियुग स्थिती प्रत्ययास येईल, दयाभाव आणि धर्म दुनियेतून उठून जातील. एक पृथ्वी व दुसरा सत्धर्म आत्मधर्म हेच फक्त अविकृत राहतील. सद्गुरुकडून आत्मज्ञान ग्रहण करून त्यानुसार ध्यान धारणा साधना करून आत्मोन्नति साधलेले महात्मेच अविचल सुस्थिर आणि निश्चल राहतील. बाकी सारे जीवात्मे आपापल्या कर्मजंजाळाप्रमाणे अतोनात दुःख कष्ट भोगतील. हत्तीणीला दुध प्रगट होईल. समुद्र गोड करावा लागेल. त्यावर उदरनिर्वाह करावा लागेल, वड पिंपळाला फुलें येतील, नागवेलीला फळे येतील वगैरे अशक्य गोष्टी शक्य होऊ लागतील. पृथ्वीवर पापाचा भार वाढून दहा दिवसात एक वर्ष संपेल एका रात्रीत साठ महिने म्ह. पाच वर्षे संपतील अशाप्रकारे कलियुगाची वर्षप्रमाणाची गणती कमी होईल. शेवटी चंद्र आणि सूर्य दोन्हीही अन्धुक होतील. पश्चिमेकडे सूर्य उगवलेला दिसेल. चैत्रमहिन्यात आश्विन नक्षत्र पौर्णिमा शुक्रवार या दिवशी भगवान श्रीनिकलंकी नारायण नित्य अविनाशी अखंड अभंग असा भगवंत अवतार रूपाने प्रगट होईल. (श्लोक ३१०-३२१)

भगवान श्री निकलंकी नारायण अवतार प्रगट होतील त्यावेळेस ब्रह्मीभूत झालेले सद्गुरु इमामशाह महाराज सुध्दां प्रगट होऊन वेदमंत्रांनी युक्त भगवंताचे स्तुतीगायन करतील. हजारो देव देवता मानव रूपाने प्रगट होऊन भगवंताच्या सगुण साकार रूपाची स्तुति प्रार्थना करतील हा भगवंताचा व सद्गुरु ब्रह्माचा आगम भविष्य भेद हे सद्भक्तांनो तुम्ही समजून घ्या. भगवान निकलंकी नारायण निरंजन निराकार अजन्मा, अव्यय, अखंड, अनादि आहे. जन्मकर्म त्याला नाही. तो सामान्य मानव कोटीतला नाही. सर्व व्यापी व सर्वदर्शी आहे तरी सुध्दां भक्ताकरिता सगुणत्व साकार रूपाने तो अव्यक्त व्यक्त होतो. तो अयोनीज आहे. मानवाप्रमाणे सामान्य दृष्टीकोनातून त्याच्या दिव्य जन्मकर्माबद्दल विचार करणे युक्त नाही. मानव पशु पक्षादि चित् व वृक्षपाषाणादि जड योनी ज्याच्या एकमात्र संकल्प बलाने निर्माण झाल्या. तो संपूर्ण विश्वाचा सृजक स्वत: स्वयंसिध्द संकल्प बलानेच प्रगट होईल. अनंत कोटी चन्द्रसूर्याप्रमाणे अपार दिव्य त्याचे तेज असेल. दिलम देशातील वरजागडशहरी तो आपले अवतार कार्य करण्याकरितां स्थिर होईल. मागील तीन युगात भगवंतानी नऊ प्रगट अवतार धारण करून नऊ दैत्यांचा संहार केलेला आहे. आता आज या कलियुगांत दैत्य कालिंगाचा संहार करण्याकरिता शेषशाई नारायण भगवान निकलंकी नारायण अवतार प्रगट होईल. त्याच्या अवतार कार्याची जाणीव-निशाणी सद्गुरु महाराजांनी कथन केलेली आहे. चीन देशामधील महाबलाढ्य दैत्य कालिंगा आपल्या भारत देशावर अनेक प्रकारे छुपे आक्रमण करील व भारतीय मवाळ जनतेला अनेक प्रकारे फसवून लुबाडेल त्राही त्राही करून सोडील. या जनतेला या दैत्याच्या जाचापासून सोडवू शकेल असा एकही लोकनेता मिळणार नाही. पण भारतभूमीच्या पुण्योदयाने भगवंतानी त्या भूमीत अनेक ठिकाणी अनेक गुप्त व प्रगट अवतार धारण केलेले असल्याने आणि भारतीय जनतेचे सहीष्णुतेचे धोरण असल्याने भारतभूमी संपूर्ण जगताचे लक्ष आपल्याकडे वेधून घेईल व या जागतिक संघटनेचे केन्द्रस्थान दिलमदेशातील वरजागड शहरात अवतरलेले भगवान निकलंकी नारायण हेच राहतील. त्याठिकाणी संपूर्ण जागतिक शक्ति संगठीत राहील. वायुपुत्र हनुमान चिरंजीव असल्याने तो सुध्दा त्या जागतीक शक्तित सहभागी होईल. त्याला भगवान निकलंकी नारायण प्रथम चीनदेशात दूत म्हणून पाठवून दैत्य कालिंगाला त्याच्या आततायी व आक्रमक धोरणाबाबत जाणीव देवून जागृत करतील. हनुमान चीन नगराच्या पश्चिम द्वारात उभा राहून मोठमोठ्याने बुभु:कार करील त्याच्या त्या आवाजाने नगराच्या चौफेर बांधलेल्या कोटाचे चार बुरुज ढासळतील. हनुमान दैत्य कालिंगास मोठ्याने हाक मारून संबोधून भगवंताचा

सन्देश त्याला कळवील. हनुमान म्हणेल, 'हे दैत्याधिपति कालिंगा! आजपर्यंत आमच्या भारतभूमीवर तू चोराप्रमाणे छुपे आक्रमण केलेले आहे. आमच्या प्रजेला तू अनेक रितीने पीडीले आहे. पण आतां तुझा काळ जवळच आलेला आहे असे तू नक्की समज. कारण तुला मारण्याकरितां व तुमच्या आसुरी संघटनेचा संहार करण्यासाठी माझा स्वामी निकलंकी नारायण अवतार रूपाने प्रगट झालेला आहे. तरी तू जाहीर युध्दाची तयारी कर. तुला जागृत करून वीराप्रमाणे सन्मुख युध्द करण्याचे आव्हान आम्ही देत आहोत. अशाप्रकारे द्वाही देऊन हनुमान परत फिरेल. हनुमानाचे ते आव्हाव व अवसान पाहून दैत्य कालिंगा क्रोधातिशयाने जळफळू लागेल. त्याला पकडून ठार मारण्यासाठी तो बराच प्रयत्न करील. पण तो व्यर्थ जाईल. हनुमान आपले दूतकार्य आटोपून घडलेला सारा वृत्तांत सांगण्यासाठी भगवान निकलंकी नारायणाजवळ वरजागडला निघून जाईल. इकडे दैत्य कालिंगा व त्याचे इतर असूर सहकारी यांना हनुमानाचे दूताचे वचन ऐकून चुटपुट लागेल व सर्वजण मिळून युध्दाचा विचार विनिमय करू लागतील. (श्लोक ३२२-३३५)

हनुमंताने सन्देश दिल्यानंतर दैत्य कालिंगा आपल्या प्रमुख सेनानींची आणि सहकाऱ्यांची सभा भरविल. त्या सभेत तो भारताची, हनुमानाची आणि निकलंकी नारायणाची निर्भत्सना करील व आपल्या सभासदांसमोर भाषण करतांना आपल्या देशाची, देशबांधवांची, सैनिकांची आणि सभेत असलेल्या अमीर उमराव सेनापतीची वाहवा करून गौरव करील. आपल्या स्वत:चे आसूरी ध्येय धोरण आणि सत्तेचे प्रदर्शन करील व म्हणेल कीं आपले एवढे सहासष्ट कोटी योध्दयांचे सैन्यबळ असल्याने त्या निकलंकी नारायणाला किंवा त्यांच्या यत्किंचित सैनिकांना भिण्याचे काहीच कारण नाही. असे म्हणून क्रोधातिशयाने त्याचे अंग फुलेल व थरथरू लागेल. मग सिंह गर्जना करीत सारे सभासद चीनदेशाचा आणि दैत्याधिपति कालिंगाचा जयघोष करतील. आपल्या आसुरी ध्येय धोरणांचा जाहीर रीतीने घोष करून आनंद व्यक्त करतील. नंतर ते सर्व जाहीर रीतीने युध्द करण्याच्या तयारीला लागतील. सर्व सैनिकांना चिलखत, टोप, संरक्षक शस्त्रास्त्रे, युध्दोपयोगी साधन सामुग्री देण्याच्या तयारीला लागतील. सर्व योध्दयांच्या तयारील एक महिना सोळा दिवस लागतील. प्रत्येक सैनिकास सेला, चिलखत, टोप, शस्त्रास्त्रे व घोडा, उंट, खेचर वगैरे वाहने देऊन झाल्यानंतर दैत्य कालिंगा आपल्या सेनाप्रमुखांची देशातील मोठमोठ्या अमीर उमरावांची आणखी एक मोठी जाहीर सभा घेईल. त्या सभेत तो सर्वांना परत आपल्या ध्येय

धोरणाची जाणीव व शिकवण देईल. नंतर कोणत्या मार्गाने कोणी कशारीतीने आक्रमण अतिक्रमण करीत भारतावर चालून जायचे याचे संपूर्ण आराखडे तो आपल्या सहकाऱ्यांना समजावून सांगेल. अशा रीतीने संपूर्ण युध्दाची तयारी झाल्यावर आपल्या सैनिकांना, देशबांधवांना आपल्या युध्दबलाची संपूर्ण जाणीव यावी म्हणून त्या सभेत तो आपल्या सेनानींना पान विडा देऊन त्यांच्या कडून शपथ घेईल व त्या प्रत्येकाकडून आपण कोणाशी कसे युध्द करणार यांची प्रतिज्ञा करायला लावील. तो सर्वांना सांगेल की माझ्या प्राणप्रिय सहकाऱ्यांनो संपूर्ण जगतात आपला देश युध्दात आणि इतर अन्य क्षेत्रातही समृध्द आणि निपूण आहे. आपण एवढे बलवान व समर्थ आहोत कीं संपूर्ण जगतावर आपली सत्ता आहे. मी अखिल जगताचा स्वामी असून तुम्ही माझे सारे सहकारी अत्यंत बलवान व सर्वसमर्थ आहात. असे असून आपल्या या सत्तेला विरोध करणारा हा कोण निकलंकी नारायण प्रगट झाला आहे. त्याला व त्याच्या साऱ्या सहकाऱ्यांचा बीमोड आपण केला पाहिजे व आपल्या अजोड अद्वितीय सत्तेचे बळ त्यांना दाखवून दिले पाहिजे. म्हणून त्यांच्याशी लढतांना कोणीही कोणत्याही प्रकारचा आळस, अंगराखीवपणा करता कामा नये. जीव गेला तरी मागे परत फिरायचे नाही, युध्द करता करता मरण येणे, धारातीर्थी पडणे, अतिशय भाग्याचे, आपल्या देशाच्या कल्याणाचे आहे. पण प्राणभयाने युध्दांतून पळून जाणे नामुष्कीचे, नामर्दपणाचे लक्षण आहे. यासाठी प्राणपणाने लढा व आपल्या विरोधी शक्तिची सारी पाळेमुळे खोदून काढून छिन्नभिन्न करा.' दैत्य कालिंगाचे हे विरश्रीचे अभिभाषण ऐकून विरश्री उत्पन्न झालेले त्याचे सेनानी पुढे होऊन एकेक जण प्रतिज्ञा घेऊ लागला. (श्लोक ३३६-३४४)

पहिला दैत्य सेनापती मल्लकेसर हात वर करून मोठ्याने प्रतिज्ञा करूं लागतो की मल्लयुध्दांत अत्यंत निष्णात असा मी जागतीक कीर्तीचा योध्दा आहे. निकलंकी नारायणाच्या सैन्यात त्याचे सहकारी असलेल्या पाचही पांडवांशी युध्द करून मी त्यांचा संहार करीन बाकीचे योध्दे तर माझ्या मताने कचऱ्याप्रमाणे आहेत. दुसरा महाबलाढ्य गजकेसरी दैत्य म्हणेल की, शत्रू सैन्यातील साडेतीन कोटी भूतगणांचा मी एका सरशी संहार करीन. (भूतगण म्हणजे नेपाळ भूतान मधील सैनिक गण) तिसरा रणधुरंधर महायोध्दा रणकेसर म्हणेल की ब्याण्णवूलाख सैनिक गण असलेले पेसावलांचा मी संहार करीन (पेसावल म्हणजे पिशाच्यगण अथवा पेशावर भागातले सैनिक) चौथा दैत्य रक्तकेसर मोठ्याने गर्जना करून म्हणाला नवकुळ नाग सैन्याचा मी संहार करीन अशी प्रतिज्ञा करतो. (नवकुळ नाग म्हणजे नागजातीचे प्रमुख

सैनिकगण होत) पाचवा दैत्य नागकेसर म्हणेल हे माझ्या चीनदेशस्थ बांधव हो आणि हे दैत्य सम्राट कालिंगा स्वामी, शत्रु सैन्यात असलेल्या चौसष्ट लाख जोगणी सैन्याच्या संहाराची जबाबदारी मी शिरावर घेतो. शत्रुपक्षाने आपल्या पक्षातील योध्द्यांना नामोहराम करून मोहात टाकण्यासांठीच ही जोगणी रूपाने स्त्री सैन्याची योजना केलेली आहे. पण ती मुळासकट उपटून टाकण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. याप्रमाणेच आणखी अनेकानेक नामवंत दैत्यांनी आपापल्या जबाबदारीनुसार प्रतिज्ञा घेतली. प्रत्येकाने आपापल्या पराक्रमाची वल्गना केली. तेव्हा त्याच सभेमध्ये हजर असलेला दैत्य कालिंगाचा मुलगा भक्त कमलाकुंवर उठून उभा राहिला व धीटपणे म्हणाला, 'प्रीय योध्दागण हो, मी विनंती करून दोन शब्द आपणास सांगण्याचे धाडस करीत आहे ते शांत चित्ताने ऐकून घ्यावे. तुम्ही सारे योध्दा गण अत्यंत कुशल आणि शूरवीर पराक्रमी आहात. आज तुमचे क्षेत्र, स्थान, मान व पद अत्यंत श्रेष्ठ आणि आपल्या देशाच्या दृष्टीने महत्वाचे आहे. पण युध्दामुळे देशाचा लाभ न होता नुकसान होण्याचाच जास्त संभव आहे. कारण विरोधी पक्ष अत्यंत बलवान आणि सर्वसमर्थ आहे. त्यांच्यापुढे आपला टिकाव लागणे शक्य नाही. म्हणून तुम्ही युध्द न करतां त्यांच्याशी समझोता करण्याचा प्रयत्न करावा. युध्द म्हणजे ऐरणघनाशी गांठ आहे. घणाचे घाव सहन करण्याची ऐरणीप्रमाणे आपली शक्ति असल्यास पुढे पाऊल टाकावे. अर्थात खरा क्षत्रीय पराक्रमी तेथे प्रत्यक्ष युध्दात अंगचुकारपणा करणार नाही पण विरोधी पक्षांचे बळ अजमावून कार्य करा. नुसत्या वल्गना करून घोषणा करून कार्य सिध्दीस जाणार नाही आपल्या देशाच्या पुढील भवितव्याचा विचार करून समझोता करण्याचा प्रयत्न करावा हे माझे आपणास नम्र निवेदन आहे. भक्त कमलाकुंवरचे वचन मानणारा त्या सभेत कोणीही नव्हता. उलट त्या सर्व सभासदांनी व खुद्द कालिंगाने त्याचा उपहास करून खाली बसविले व तो म्हणाला, 'बाळा, अजून तू लहान आहेस. तुला हे युध्दाचे डावपेच समजणे शक्य नाही. आम्ही सर्व श्रेष्ठ व ज्येष्ठ नेते आपल्या देशाचे भवितव्य जाणूनच या कार्यास उद्युक्त झालो आहोत.' असे म्हणून त्यांनी सभा बरखास्त केली व सर्व योध्दे आपापल्या तयारीस लागले. (श्लोक ३४५-३५४)

दैत्य कालिंगा आपल्या पवनवेगी चंचल अश्वावर स्वार होण्यासाठी त्याच्या अंगावर शृंगार चढवील. दैत्य कालिंगाचे धनुष्य साडेबारा मणाचे राहील आणि त्याला साडेबावीस शेर वजनाचा बाण लावून त्या आयुधानिशी तो भगवंताशी युध्द करील. वज्रप्राय अशा त्या शस्त्राने वज्राची सुध्दां भींत फाटली जाईल अशा प्रकारचे तीक्ष्ण

आणि मजबूत ते शस्त्र असेल, दुसरे अनेक शस्त्रास्त्रे तो धारण करील. त्यांत मुख्य छुरी, कटचारी, मुग्दल, तलवार असे राहतील. या शस्त्रास्त्रांनी सज्ज झाल्यावर सहा महिन्यापर्यंत ती शस्त्रास्त्रे चालविण्याचे अनुभव घेतील, युध्दाचे प्रात्यक्षिक घेण्यासाठी त्यांना सहा महिने लागतील. नंतर दैत्य कालिंगा व इतर सर्व सेना आपापल्या सैनिकानिशी आपापली वाहने शृंगारतील. दैत्य कालिंगा आपल्या चंचल अश्वावर खोगीर (पाखर) घालून झुल किनखाप पडदे घुंगरांच्या फिरत्या माळा बांधील. अतिशय मौल्यवान रत्नमाणिक्यांनी शृंगारून त्या घोड्यावर स्वार होऊन दैत्य कालिंगा आपल्या सैनिकांचे संचालन करील. प्रत्यक्ष स्वारीवर जाण्याच्या वेळेस जेव्हा तो घरून निघून प्रयाण करील. तेव्हा त्याच्या समोरून एक रंडकी विधवा स्त्री रडत रडत व मोठमोठ्याने कर्कश आवाजाने ओरडत येईल. आजुबाजुला, घरदारावर, कोरड्या लाकडावर कावळे बसून कर्कश आवाजाने आक्रोश करतील. थोडे पुढे गेल्यानंतर अजिबात नाक नसलेली एक नकटी महाकुष्ट रोगी स्त्री समोर आडवी येईल. अशा प्रकारचे अत्यंत अशुभ सुचक असे हे अपशकून घडून ही दैत्य कालिंगा पुढेच प्रयाण करील. वरील अपशकून घडल्यावर मात्र त्याचे मन खचेल पण वरून मोठ्या अभिमानाने अतिशय क्रोधाने व आढ्यतेने आपल्या पराक्रमाची तारीफ करीत करीत पुढे चालू लागेल. हे सर्व दृश्य पाहून व दैत्य कालिंगाच्या आततायी पणाच्या वल्गना ऐकून व त्यास झालेले अपशकून जाणून सुरजाराणी व कमळाकुंवर यांची मने कळवळतील. ते एकान्तात कालिंगा जवळ जातील व त्यास युध्द न करण्याबद्दल विनवितील. ते म्हणतील कीं, 'हे स्वामी, तात तुम्ही त्या अभंग अविनाशी अशा निकलंकी नारायणाबरोबर युध्द करू नका. तो त्रिभुवनपति अंभग असा देव आहे. त्याच्याबरोबर युध्दात आपला टिकाव लागणार नाही.' हे वचन ऐकताच कालिंगाच्या अंगाची संतापातिशयाने लाही झाली. अत्यंत अहंकाराने तो राणीला म्हणाला, 'हे राणी तू काय बोलत आहेस माझ्या पराक्रमाची तुला जाणीव तरी आहे काय आमचे सैन्य बळ शस्त्रास्त्र बळ केवढे मोठे अगाध आहे हे तुला माहित नाही. म्हणून तुम्ही असे बोलत आहात पण माझा एकेक सैनिक योध्दा असा बलवान पराक्रमी आहे कीं जो अभंग आहे असे तुम्ही म्हणता त्याचा पार धुव्वा उडवून सैन्यासहीत संहार करील.' अशा प्रकारे दर्पोक्ति करून दैत्य कालिंगा नगराबाहेर प्रयाण करील आणि नगराच्या वेशीच्या उत्तर दरवाजावर जाऊन पाहोचेल.

(श्लोक ३५५-३६७)

दैत्य कालिंगाच्या राजधानीस चौफेर कोट असून उत्तरेकडून एक एक योजन अंतरावर एकवीस दरवाजे, बुरुज, चौकीपहारे बसविलेले असतील. अशा रीतीने सुरक्षित अशा त्या मार्गाने संपूर्ण सैन्य चौसष्ट प्रहर म्हणजे आठ दिवस पर्यंत जाईल, एवढी मोठी अफाट सेना त्याची राहील. शेवटच्या द्वारातून बाहेर पडल्यानंतर पश्चिमेकडे वळून थेट भारताच्या रोखाने ते प्रयाण करतील. चीन मधून निघण्यापूर्वी दैत्य कालिंगा आपल्या अनुपस्थितीत देशाचा कारभार उत्तम चालू राहावा म्हणून अधिकारपदाची सुत्रे कमलाकुंवरच्या हाती सुपूर्द करील. कमलाकुंवरला चीन देशाच्या सिंहासनावर बसवून सुरजाराणीला त्याच्या साहाय्यासाठी नेमेल. अशारीतीने सर्व राज्यकारभाराची व्यवस्था नीट लावील. धन, अर्थभांडार, राज्यसुत्रे, न्यायदान वगैरे सर्व अधिकार कमलाकुंवरकडे सोपवून तो युध्दास प्रयाण करील. आता स्वत: दैत्य कालिंगा त्याचे सर्व अक्राळविक्राळ असे सेनानी तसेच संपूर्ण सैन्य युध्दास निघून गेल्यानंतर इकडे चीनदेशात जी जनता राहील त्यांना भक्त कमलाकुंवर सन्मार्गाची योजना दर्शवील व त्यांच्या मनावर धार्मिक संस्कार घडावे म्हणून ठिकठिकाणी धर्मपीठे देवमंदिरे उभारून तेथे पूजाअर्चा, सत्संग, कथाकिर्तने सुरु करील. सर्व प्रजाजनामध्यें धार्मिक संस्कार रूजावे म्हणून स्वत:च्या अध्यक्षतेखाली निरनिराळी मंडळे योजून सर्वत्र ईश्वरध्यान पूजा नामस्मरण यांचा प्रचार करील. सुसंस्कारी प्रजा आपापल्या परीने सर्व कार्यक्रमात भाग घेऊन आपला लोकनेता, धर्मनेता भक्त कमलाकुंवरच्या धर्मकार्यात सक्रीय सहभागी होतील. कमलाकुंवर आपल्या भक्तीच्या बळाने सर्व देवसभा पूजा आपल्या घरीच भरवील. स्वत: कमलाकुंवर मुखी होऊन जपमाळा हातात घेऊन पूजा सत्संग करील. संपूर्ण गतगंगा पूजेसाठी भक्त कमलाकुंवरच्या घरी एकत्रीत येऊन एकांतात एकाग्रचित्ताने जिकीरीने भगवंताची आराधना करील. 'भगवंता तुझी इच्छा सर्वसमर्थ आहे, तूं बलवान धैर्यवान व सत्वशील सत्यवान आहेस आम्ही गरीब प्रजा सारे तुझेच अनुग्रहीत आहोत. ही संपूर्ण मुखीगत जमात एकच विनंती करीत आहे की आपले एक वेळ दर्शन घडावे. आपल्या स्वरूप साक्षात्काराचा लाभ आम्हा पतीत जीवांना घडावा हीच आमची इच्छा कामना आहे. आम्हाला हे राज्य, धन, अर्थ, पद वगैरे कांहीही नको केवळ तुझे दर्शन, तुझा सहवास आम्हाल नित्य हवा आहे.' मुखी व गतगंगेची प्रार्थना ऐकून सद्‌गुरु ब्रह्मा त्याठिकाणी प्रगट झाले. तेव्हा कमळाकुंवर सुरजामाई व इतर सारी गतजमात उठून उभे राहिले व सर्वांनी त्यांची पूजा अर्चा आरती करून सिंहासनावर बसविले व सर्व जण नम्रपणाने हात जोडून त्यांच्या समोर उभे राहिले. सद्‌गुरु ब्रह्माचे ते अलौकिक स्वरूप, सौंदर्य व ब्रह्मतेज पाहून सर्वजण थक्क झाले. भक्त कमलाकुंवर पुढे होऊन त्यांना विनवू लागला. (श्लोक ३६८-३७८)

भक्त कमलाकुंवर व सुरजाराणी आणि संपूर्ण गतगंगा सद्गुरु महाराजांना हात जोडून नम्रभावाने विनवूं लागले कीं 'हे नाथ आम्हां अनाथांची विनंती कानी धरावी. आपण मागे सुचविलेल्याप्रमाणे अतिकठिण अशा त्या प्रलय काळाचे दर्शन आम्हाला घडू नये अशी आमची आग्रहाची विनंती आहे. त्या महाभयानक कलिकालात आपल्या कृपाछत्राखाली आम्हाला ठेवावे. आम्ही अपराधी आहोत. आम्ही सर्वजण आपल्या चरणारविंदी शरण आलेलो आहोंत. आम्ही अपराधी, आचारहीन असलो तरी आपले दास, आज्ञांकीत सेवक, आपलीच प्रजा आहोत. हे सद्गुरुनाथ आमच्या अज्ञानास पारावार नाही आपण कृपा करून आमचे अज्ञान दूर करावे, आमचे अविद्येचे मायावी पटल दूर करून आपल्या सत्ज्ञान रूप, धर्म सूर्याचा उज्वल प्रकाशझोत आमच्यावर टाकावा अशी विनम्रभावे आम्ही प्रार्थना करीत आहोत.' सद्भक्तांची ही कळकळीची प्रार्थना ऐकून सद्गुरुनाथ म्हणाले, 'अहो सद्भक्त ऋषिवरहो तुमची भक्ति जाणून तुमचे निर्मल विशुध्द अंत:करण जाणून मी सन्मार्गदर्शनासाठी आलेलो आहे. तुम्ही सर्व जण आता एक क्षणभरसुध्दां इथे चीननगरीत राहू नका. कारण श्री निष्कलंकी नाथ दैत्य कालिंगाचा संहार करून संपूर्ण पृथ्वी निर्दानवी करतील. या पृथ्वीवर पापमयभूमीचा लवलेश राहू नये म्हणून भगवान हे संपूर्ण चीननगर सागरात जलमय करतील म्हणून आपण सर्वजण आपल्या पूजापाठ व देवसभेकरिता हे स्थान सोडून जंबुद्विपात कुंवारीकाक्षेत्र धामावर भगवान निष्कलंकीच्या आखाड्यात येऊन दाखल व्हावे. त्याठिकाणी तुमच्या जीवीताचे सार्थक होईल. तुमचा प्रमुख हा सद्भक्त कमलाकुंवर आहे. त्याचे छायाछत्र तुमच्यावर अखंडीत रितीने राहील. एकदिल, एकचित्ताने तुम्ही त्याच्या संघात मेळाव्यात सहभागी व्हा. लवकरच तुम्ही मुक्त व्हाल.' असे आश्वासन देऊन सद्गुरु महाराज त्यांचा निरोप घेऊन स्वस्थानी जाण्यास निघाले. तेव्हा सर्वजणांनी अधिरतेने त्यांच्या चरणी लोटांगण घातले. सुरजाराणी म्हणाली, 'हे सद्गुरुनाथ अंत:काळ समयी तुझे सतत स्मरण आमच्या अंत:करणात राहील अशाप्रकारची कृपा आमच्यावर करावी. एकक्षणही तुझ्या स्मरणचिंतनावाचून जाऊ नये. सदैव अहर्निश अखंडीतपणे आपण आमच्या हृदयसिंहासनावर विराजमान व्हावे अशी आमची आत्मकळकळीची आपल्या चरणकमली नम्र प्रार्थना आहे.' सुरजाराणी कमळाकुंवर व इतर सर्व सद्भक्तजनांची प्रार्थना ऐकून सद्गुरु महाराज अत्यंत आनंदीत झाले. हर्षभरीत अंत:करणाने व स्नेहार्द्र दृष्टीने सर्वांची मनोकामना पूर्ण करणारे ब्रह्म चैतन्य स्वरूप अंतर्यामी सद्गुरु महाराजांनी त्यांना कृपाशिर्वाद व वरदान दिले व ते अंतर्धान पावले. नंतर सर्वांनी देव सभेसह चीननगर सोडून जंबुद्वीपाकडे प्रयाण केले. इमामपुरी नगरीला भगवान निकलंकी नारायणाच्या

निवासस्थानी आल्यावर सर्वांनी भगवंताला हात जोडून नम्रभावाने प्रणाम केला. भगवंतांनी त्यांचा तो प्रेमभावाचा प्रणाम स्विकारून त्यांची योग्य ती दखल घेतली. त्यांचा आदर सत्कार करून आपल्या अनंत कोटी सैन्याच्या मेळाव्यात त्यांना जोडून घेतले. भक्त कमलाकुंवर व सुरजामाई भगवान निकलंकी नारायणाच्या व सद्‌गुरु ब्रह्माच्या चरणी लागून अनन्यभावाने त्यांची स्तुती गाऊ लागले. ( श्लोक ३७९-३८९ )

भगवान श्री निकलंकी नारायणाच्या प्राकट्याचे वर्णन करतांना सद्‌गुरु महाराज सांगतात की, योग्य अनुकुल काळ प्राप्त होताच भगवान निकलंकी नारायण पूर्व क्षितीजावर ज्याप्रमाणे सूर्यनारायण उदित होतो तद्वत भूगर्भातून जमीन विदारण करीत आपल्या श्वेत अश्वावर स्वार झालेल्या स्थितीत प्रगट होईल. त्या सगुणसाकार स्वरूप सुंदर मनोहर मूर्तिचे स्वरूप, अत्यंत तेजस्वी, सोज्वळ, भव्य आणि दिव्य असेल. दैत्यांच्या संहारासाठी त्याने विद्युल्लतेप्रमाणे लखलखीत अशी तीन धारेची तलवार धारण केलेली असेल. भगवंताच्या श्वेत अश्वाचे भव्य, दिव्य तेजस्वी स्वरूपाचे वर्णन करता येणे सर्वस्वी अशक्य आहे. प्रत्यक्ष भगवंताचे वाहन असा तो अश्व म्हणजे शेषाचा अवतार होय. त्याच्या शृंगाराची व प्रभेची वाखाणणी करणे अवर्णनीय आहे. रत्न माणिक्यांनी जडविलेला असा सुवर्णाचा खोगीर त्याच्या पाठीवर झळकत आहे. त्याच्याखाली एक अत्यंत मृदु अशी रंगीबेरंगी रेशमी शाल असून तीच्यावर कलाबतूचे कलाकुसरीचे नक्षीकाम केलेले आहे. तिला हिरे, माणिक, मोत्यांच्या झालरी लावलेल्या आहेत. सुवर्णाच्या तारात सुवर्ण व रूपेरी फुलें ओवून त्यावर रत्न जडविलेले असे गोफ त्याच्या गळ्यात बांधलेले आहेत. अशाप्रकारे नानाविध प्रकारांनी त्या श्वेत अश्वास शृंगारलेले असून उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणे त्याची स्वरूपशोभा दिसत होती, सहस्त्रकळांनी युक्त असा सूर्योदय व्हावा त्याप्रमाणे तो अश्व अत्यंत तेजस्वी व सुंदर दिसत होता. अशा त्या अश्वाच्या आयाळावर व माथ्यावर ममतेने हात फिरवत भगवान निकलंकी नारायण अमृतोपम मधूर हास्याने व प्रेमाने त्याच्याशी काही बोलत आहेत असा भास होत आहे. आपल्या प्रिय अश्वाच्या शृंगाराची संयोजना चांगली झालेली आहे किंवा नाही याचे ते निरीक्षण करीत आहेत. भगवंतांनी आपल्या पायात सुवर्णकांतीचा जोडा घातला असून त्यावर ठिकठिकाणी माणिक, रत्न जडविलेले आहे. त्यांनी अंगावर धारण केलेली वस्त्रे, बहुमुल्य व बहुरंगी आहेत. त्यांनी आपल्या मस्तकावर एक पटका बांधलेल्या असून त्यावर सुवर्ण मुकुट घातलेले आहे. त्यांच्या कानावर मुकुटाशीच जडविलेले असे मकराकार कुंडले झळकत आहेत

त्यांनी गळ्यात निरनिराळ्या प्रकारचे सुवर्णाचे मोत्यांचे गोफ, कंठा, माळा घातलेल्या आहेत. त्यांच्या स्वरूपाची शोभा केवळ अवर्णनीय आहे. त्यांच्या समोर मुखारविंदाकडे पाहवले सुध्दां जात नाही. भगवंतानी आपल्या अंगावर निरनिराळी अनेकविध शस्त्रे धारण केलेली आहेत. सुरी, कट्यारी, ढाल तलवार, धनुष्यबाण, मुगदल, गदा, शंख वगैरे अनेक शस्त्रे यांच्याजवळ असून एक अत्यंत अद्भूत, तेजस्वी असे त्रिधारी खड्ग त्यांनी एका हातात घेतलेले आहे व दुसऱ्या हातात विविध रंगी चाबुक घेतलेला आहे. अशा प्रकारचे अद्भूत सुंदर तेजस्वी स्वरूप पाहून सर्वजण हर्षित, आनंदीत, पुलकीत होत आहेत. वरजागड शहरात भगवान आपल्या सर्व सैन्याची जमवाजमव व संगठन करीत आहेत. तेथे हनुमान मोठ्याने बुभु:कार करीत त्रिभुवनातील सैन्याला हाक मारून एकत्रीत जमवीत आहे. हनुमंताच्या हाकेला प्रतिसाद देत सर्व सैन्य तेथे दाखल होत आहे. त्यांत कोणकोणते सैनिक दाखल झाले ते सद्गरु महाराज वर्णन करून सांगत आहेत. ( श्लोक ३९०-४०५ )

भगवान श्रीनिकलंकी नारायणाच्या सैन्याच्या मेळाव्यात जगतातील प्रमुख प्रमुख राष्ट्रात जन्म धारण करून अभ्युदयास आलेले सर्व देवगण राहतील. सर्व देवगण आपापल्या दूतगणासह मृत्यूलोकात निरनिराळ्या ठिकाणी जन्म धारण करतील व हनुमंताची हाक ऐकताच भगवान निकलंकी नारायणाच्या छत्राखाली एकत्रीत जमा होतील. त्यांत सर्व प्रथम चौसष्ट लाख योगिणी हातात डमरू व शस्त्रे धारण करून भगवान निकलंकी नारायणाचा जयजयकार करीत येतील नंतर साडेतीन कोटी भूतगण (भूतानी) येतील. त्यापैकी ब्याण्णवू लाख पेसावल जातीचं सैन्य राहील. योगिणी, भूत व पिशाच हे भगवान शंकराचे दूतगण असून भगवंताच्या सहाय्यासाठी ते मृत्यूलोकांत अवतरतील व भगवंताच्या सैन्यापुढे चालत जाऊन सैन्याचा मार्ग मोकळा करीत चालतील. भगवंताच्या सैनिकांची उत्तम प्रकारे सेवाचाकरी करतील. अनादिकालापासून सतगुरु ब्रह्माद्वारा जे जीवात्मे अमरापुरीला पोहोचलेले आहेत ते संपूर्ण जीवात्मे मुक्ती करीतां मृत्यूलोकांत मानव रूपाने जन्मधारण करतील व भगवंताच्या सैन्यात दाखल होतील. प्रथम दशरायण कल्पात नव्वाणु करोडी यक्ष जीवात्मे अमर झालेले होते, द्वितीय देवगुण कल्पता छपन्न कोटी मेघदेवता अमर झालेल्या होत्या, तृतीय पंखला कल्पात बत्तीस कोटी किन्नर गण अमर झालेले होते. ते सर्व आपापल्या प्रमुख अधिकाऱ्यांसह अवतरतील व देवदूत हनुमंताची हाक ऐकताच भगवंताच्या सहाय्यासाठी आपापल्या शस्त्रास्त्रानिशी धावून येतील. चौथ्या करण कल्पातील चार युगात तेहतीस

कोटी जीवात्मे अमर झाले. ते अनुक्रमे सत्ययुगात भक्त प्रल्हादासोबत पाच कोटी, त्रेतायुगात भक्त हरिश्चन्द्रा सोबत सात कोटी, द्वापारयुगात भक्त युधिष्ठिरासोबत नऊ कोटी व कलियुगात ब्रह्मस्वरूपी सद्गुरुच्या अनुग्रहाने अमर झालेले बारा कोटी जीवात्मे असे एकूण तेहतीस कोटी मुनिवर निरनिराळ्या देशात अवतरतील व योग्य असा वेळ येताच भगवंताच्या ध्वजा छत्राखाली आपापल्या सैनिकासह दाखल होतील. अशा प्रकारची अगणित मेदिनी दिलम देशांत जमा होईल. या संपूर्ण सैन्यामध्ये पाचही पांडवांचे सैन्य अत्यंत शूरवीर धैर्य व बलसंपन्न तेजस्वी असेल. पांडव जंबुद्विपात भरतखंडातच निरनिराळ्या राज्यात प्रगट होतील व त्यांचे प्रत्येकाचे स्वतंत्र सैन्य राहील त्याची हकिकत अशी. (श्लोक ४०६-४१९)

काश्मिर देशात सद्भक्त राजा युधिष्ठिर प्रगट होऊन अठरालाख खड्गधारी सैन्यासह तो भगवंताच्या सैन्यात हजर होईल. उज्जैन शहरात सहदेव जोशी प्रगट होऊन चौदा लाख चक्रधारी सैन्यासह तोही भगवंताच्या सैन्यात दाखल होईल. जालंदर देशात अमरकोट नगरात महाबली भीमसेन प्रगट होईल तो आपल्या चाळीसलाख गदाधारी सैन्यासह उपस्थित होईल. उंचमुलतान पंजाबदेशात अर्जुन अवतरेल तो सुध्दा छत्तीस लाख धनुर्धारी सैन्यासह हजर होईल. पूर्वबंगालात पंचावल नगरात नकुल प्रगट होईल व तो पन्नास लाख नेजाधारी सैनिकासह भगवंताच्या मेळाव्यात दाखल होईल. हे पाचही भाऊ आपापल्या सैन्यासह भगवंताच्या संकेतानुसार एकत्रीत येतील तेव्हा त्यांची गणती करणे, वर्णन करणे केवळ अशक्य होईल. सैनिकांची वाहने व शस्त्रास्त्र वाहतुकी करिता घोडे, उंट, गाढवे, खेचरे, सांबर वगैरे पशुंची संख्या सुध्दां अगणित राहील. भगवंताच्या सैन्य छावणीत जमलेल्या निरनिराळ्या देशातील निरनिराळ्या जातीच्या अश्वांचे वर्णन करणे केवळ अशक्य आहे. त्या अश्वात हरण, हंसला, अरबी, तेजी, तुर्की, तोखार, जरद, भम्मर, मंजीठ, बहुवर, कच्छी, कुमेद, कल्याणी, सोरठी, काळा, काटवा, काबरा, कोकिला, कटक, जटर, अबलखीया, केरडा, काहडा, कलोल, इराकी वगैरे अनेक जातीचे नामवंत रंगरूपाने अद्वितीय असे अनेकविध घोडे असतील. युध्दाची तालीम दिलेले खास असे ते अश्व असतील. त्यांच्यावर स्वार होणारे योध्दे सुध्दा अनुपमेय शुरवीर महारणधुरंधर असतील. पांडवांचे सैन्य चालत असतां चंद्र सूर्य सुध्दां झाकले जातील. धुळीचे लोटचे लोट उठून आकाश सर्व अभ्राच्छादित होईल दिवस आहे किंवा रात्र आहे हे सुध्दां समजून येणार नाही. सागराला भरती येऊन नद्यांना महापूर यावा किंवा पृथ्वीवरील नऊशे नव्वाणु नद्या एकत्र याव्यात त्याप्रमाणे भगवान निकलंकी नारायणाच्या ध्वजा निशाणाखाली पांडव सैन्याची भरती येईल. (श्लोक ४२०-४३७)

भगवान श्रीनिकलंकी नारायणाच्या सैन्याचा अद्भूत असा मेळावा होईल. सर्व देव आणि ऋषिवर रणसंग्रामाच्या उद्देशाने भूतलावर अवतरून भगवान निकलंकी नारायणाच्या ध्वजा छत्राखाली एकत्रीत येतील. त्या सैन्यात नगारा, ढोल वगैरे मोठमोठी रणवाद्ये वाजतील. निशाणध्वजा पताकांचा पार लागणार नाही. गंगेचा प्रवाह जसा अलोट असतो तसा सैन्यप्रवाह अलोट अतूट राहील. त्या संपूर्ण सैन्यावर सूर्यनारायण नानाविध रंगांची छत्रे धारण करील. मजल दरमजल प्रयाण करीत करीत सर्व सैन्य भगवान निकलंकी नारायणाच्या छावणीत येऊन दाखल होईल व त्यांच्या चरणी लागून आपली सेवा स्विकारल्याची विनंती करतील. तेव्हा भगवान प्रत्येकाशी हसून पुलकीत अंत:करणाने प्रत्येकाचे कुशल क्षेम विचारतील. सद्भक्त पांडवांना अग्रगण्याचा मान देतील व त्यांच्याच सैन्याची सर्वांच्या पुढे योजना करतील. पाताळलोकांतील सुप्रसिध्द महाबलवान नागराज वासुकी आपल्या सहस्त्रफणांनी युक्त प्रगट होऊन भगवंताची भेट घेऊन सहाय्यार्थ येण्याची आपली सदिच्छा प्रगट करील. त्याचे बरोबर नवकुळ नागांचे अपरिमित अगणीत सैन्य राहील. त्या प्रत्येक वीराच्या मस्तकावर टिळा व रत्नमणि राहील. अत्यंत चकचकीत, लखलखीत प्रकाशयुक्त तो मणी असेल. अशाप्रकारचे हे नागसैन्य सुध्दां आपल्या संपूर्ण पाच लाख सेकवगणासह प्रगट होऊन येतील व शृंगनाद करून संपूर्ण सैन्यात विरश्री व उत्साह जागृत करतील. इंद्रस्वर्गातील गणगंधर्व पितृ वगैरे देव सुध्दा प्रगट होऊन शंखनाद, दुंदुभी, वीणा, टाळ, मृदंग नाद करून संपूर्ण वातावरण नादमय करून सैनिकास उत्तेजीत करतील. एक लाख ऐंषी हजार पैगंबरवासी संतमहात्मे सुध्दा प्रगट होऊन आपापल्या परीने भगवंतांच्या सेवेत दाखल होतील. त्यात सत्तर हजार हुसेनी कुळातील सैनिक जवान प्रथम भाग घेतील. महाबलवान असे प्रमुख सात देवदूत व यमदूत आपल्या संपूर्ण दूतगणासह प्रगट होऊन भगवंताच्या सैनिकावर छत्र चामरे उभारतील. विविध रसांनी फळपुष्पपानांनी युक्त असलेल्या अठराभार वनस्पति भगवंताच्या सेवेत उपस्थित होतील. आपल्या फलपुष्पांनी, सुखद छायेने व औषधोपचाराने साऱ्या सैनिकांना संतुष्ट करतील. सातही महासागर आपले उग्र महाभयंकर स्वरूप टाकून सौम्य, शांत, सुशीतल, मधूर स्वरूप धारण करून भगवंताची व सैनिकांची त्यांच्या वाहनांची जलसेवा करतील. त्यांच्या मदतीस नऊशेनव्वाणु प्रमुख नद्या उपस्थित राहतील. सागर व नद्या यांचे मुख्य अधिष्ठाते वरूण, वायू व सूर्य हे सर्व प्रगट होऊन भगवंताच्या सेवेस उपस्थित राहतील. पूर्व कल्पात व पूर्व युगात जे मुनिवर सद्भक्त सद्गुरुंच्या वचनानुसार वागून आत्मज्ञानसंपन्न व आत्मबलसंपन्न झाले ते सर्व मुक्तीलाभासाठी भगवंताच्या सेवेत

दाखल होतील. अनादि कालापासूनचे जे सद्भक्त, ऋषि, मुनि, तपस्वी, योगी, यति, देव संत, महात्मा, सिध्दपुरुष, ज्ञानी, आत्मज्ञानी सत्पुरुष, सतपंथी, वैकुंठ अमरधाम निवासी असतील ते सर्व या अनंत करोडीच्या सैन्यमेळाव्यात प्रगट होतील व आपापल्या परिने भगवंताची सेवा करतील. सर्व सैनिकांत अग्रगण्य असा महाबलवीर हनुमान आपले उग्र तेजस्वी स्वरूप धारण करून उपस्थित होईल. त्याच्याबरोबर अगणित असे वानर सैन्य असेल. एकंदरीत या पृथ्वीतलावर अनादि कालापासून जे शूरवीर देव सद्भक्त होऊन अमरगतीस गेले. ज्यांनी मृत्यूवर विजय मिळवून अमृतत्व प्राप्त करवून घेतले त्या सर्वांच्या मुक्ततेचा हा अंतीम काळ असल्याने ते सर्व भगवंताच्या सेवेत उपस्थित होतील व आपापल्या परीने सेवा करून अंती भगवंताच्या आत्मचैतन्य ज्योतिस्वरूपात विलीन होतील. (श्लोक ४३८-४५९)

जेव्हा सर्व देवऋषीवर येऊन भगवंताच्या चरणी लागले तेव्हा अत्यंत हर्षभराने, प्रेमपूर्वक सर्वांचे कुशलक्षेम भगवंताने विचारले आणि सर्वांनी रथावर आरूढ होऊन प्रयाण करावे अशी सर्वांना सुचना दिली. एकेक मुनिवराबरोबर ऐंशी लाख उंट शस्त्रास्त्र दाणापाणी व युध्दोपयोगी सामान वाहून नेण्यासाठी योजले जातील. एकेक ऋषिवरासोबत चार लाख उंट असून त्यांचे जवळ तंबू, निशाण, तीर, कमान, सेलाचिलखत, टोप, नगारे, युध्दवाद्ये वगैरे वाहून नेण्यासाठी नेमलेले असतील. एकेक मुनिवराबरोबर एवढा दळभार राहून सात लाख याचक त्यांच्यावर ध्वजा, छत्र, निशाण धारण करतील. भगवंतापुढे अगणित रणवाद्ये वाजतील, शंख, भेरी, तुताऱ्या वाजवून सर्व वातावरण नादमय करतील. रणशिंगं, वेणुनाद, नगारे, ढोलक, भेरी यांच्या अतिनादाने संपूर्ण पृथ्वी थरथरायला लागेल एवढा महाभयंकर असा तो रणवाद्यांचा नाद असेल, रणशिंगे, सनया, मोठमोठे भोंगे, ब्युगुल, मृदंग नाल, ढोलकी मोठमोठे ढोल अशा भयकारी, अंगावर रोमांच आणणारे नाद ऐकून त्रिभुवनातील प्राणिमात्र भयकंपीत होतील. तर टाळ, विणा, मृदंग, सारंगी, बासरी, तंतूवाद्य, जलतरंग, घंटातरंग, चिपळ्या वगैरे नाजूक मोह स्वरवाद्यांनी सर्वांची मने मोहित होतील व कित्त्येक विरांच्या अंगात त्या नादाने विरश्री संचारेल. तो अमृतोपम अनहद नाद ऐकून त्रिभुवनातील जीवात्मे धन्य धन्य व कृतकृत्य होतील. भगवंताच्या त्या अगणित अपरिमीत सैन्याची गणती ब्रह्मदेवाने सुध्दा करविणार नाही. संपूर्ण पृथ्वीतळ त्यांना अपूर्ण पडेल. ब्रह्मा, विष्णू, महेश्वर प्रत्यक्ष प्रगट होऊन भगवंताच्या सोबत रथावर आरूढ होतील. त्यांच्या पाठोपाठ नवग्रह सुध्दा आपापल्या वाहनावर स्वार होऊन चालू लागतील. उत्तर, दक्षिण, पूर्व

आणि पश्चिम दिशेकडे वास्तव्य केलेले सर्व देव धावत येऊन भगवंताच्या सैन्यात येऊन मिळतील. अशाप्रकारे अनंत, अपार, अनुपमेय सैन्य भगवंताच्या सेवेस दाखल होईल. ते संपूर्ण सैन्य पाहून व एकेक मुनिवराचे भक्तिप्रेम पाहून भगवान अत्यंत हर्षित होतील. एकेक मुनिवराची वाखाणणी करता येणार नाही. अशा प्रकारचे दिव्य तेज साज शृंगार व धैर्य, वीर्य, शौर्य त्यांचे राहिल. प्रत्येक मुनिवराच्या घोड्याच्या पाठीवरील चादर व खोगिर अत्यंत चकचकीत रत्नमण्यांनी गुंफलेला असेल. भगवंताच्या मस्तकावरील मुकुट अत्यंत नाविन्यपूर्ण घडोघडी बदलत्या रंगाच्या रत्न माणिक्यांनी गुंफलेला बहुरंगी असेल. भगवंताच्या हातात दहामणाचे धनुष्य असेल. हातात, अठरा शेरांचा चन्द्राकृति तरकस महातीर झळकेल. ज्यायोगे दैत्याचे शिरकमलाचे छेदन करतील. भगवंताजवळ कट्यार, छूरी, मुग्दल, तलवार अशा प्रकारची आयुधे असतील. सर्व देवदेवता गण हातात शस्त्रास्त्रे धारण करून युध्दास सज्ज होतील. प्रत्यक्ष कृतान्त काळाप्रमाणे ते यमपाश धारण करून संपूर्ण दैत्यांचा नाश, संहार करतील. शस्त्रास्त्रांनी युक्त झाल्यावर-ते सर्वजण सतगुरु ब्रह्मा निकलंकी नारायणाच्या चरणी लागतील.

( श्लोक ४६०-४८१ )

चारयुगातील ऋषिवरांचे अलग अलग रंगाचे गणवेष धारण केलेल्या त्या सैन्याचे वर्णन करतांना सद्‌गुरु महाराज सांगतात की लाल, पिवळा, घननिळा आणि पांढरा अशाप्रकारच्या चार रंगाचा त्यांचा गणवेश होईल. जे क्रतायुगात मुनिवर उध्दरले गेले होते अशा भक्त प्रल्हादाबरोबरच्या पाच कोटी सैनिकांचा गणवेश लाल रंगाचा असेल. ऋग्वेदाचा वर्ण लाल असल्यामुळे व ऋग्वेद क्रतायुगातील प्राधान्यभूत वेद असल्याने त्या प्रचलित काळी ऋग्वेदाच्या युगधर्मानुसार वागून जे लोक अमर झाले, या फलंत्रवेळेला ते प्रगट झाले म्हणून त्यांचा गणवेष लाल राहिल. त्यांचे घोडे लाल राहतील, त्यावरील चादर व खोगीर लाल असेल, त्या सैनिकांनी धारण केलेली सारी वस्त्रे लालच असतील. त्यांच्या शिरावरील फेटा, पटकाव उपवस्त्र लाल राहिल. त्यांच्या पायातील पादत्राणे सुध्दां लाल राहतील. त्यांच्या जवळील धनुष्य बाण सारी शस्त्रास्त्रे लाल रंगाचीच असतील. त्यांची ध्वजानिशाणे सारी लाल रंगाची असतील.

त्रेतायुगात जे सद्‌भक्त उध्दरले गेले होते. अशा भक्त हरिश्चन्द्राबरोबरच्या सात कोटी सैनिकांचा गणवेश पिवळ्या रंगाचा असेल. यजुर्वेदाचा वर्ण पिवळा असल्यामुळे व यजुर्वेदाचा युगधर्म त्रेतायुगात प्रचलित असल्याने प्राधान्यभूत वेद म्हणून युगधर्मानुसार वागून जे लोक अमर झाले, या शेवटच्या वेळेला ते प्रगट झाले म्हणून त्यांचा

गणवेश पिवळा राहिल. त्यांचे घोडे पितवर्णाचे, त्यावरील चादर खोगिर वगैरे पितवर्णाचे असेल त्या सैनिकांनी धारण केलेली सारी वस्त्रे पितवर्णच असतील. त्यांच्या माथ्यावरील फेटा, पटका व उपवस्त्र देखिल पिवळेच राहिल. त्यांच्या पायातील पादत्राणे पिवळेच राहतील. त्यांच्या जवळील शस्त्रास्त्रे पितवर्णाची असतील. त्यांची ध्वजा निशाणे सारी पिवळ्या रंगाचीच असतील.

द्वापार युगात जे ऋषिवर मुनिवर सद्भक्त युधिष्ठिरा बरोबरच्या नऊकोटी सैनिकांचा गणवेष गर्द निळ्या रंगाचा - शामवर्णाचा असेल सामवेदाचा वर्ण शाम असल्यामुळे व सामवेद द्वापारयुगातील प्राधान्यभूत वेद असल्याने त्याकाळी सामवेदाच्या युगधर्मानुसार वागून जे लोक अमर झाले ते या कलियुगाच्या शेवटच्या प्रहरी प्रगट झाले म्हणून त्यांचा गणवेश शामवर्ण असेल. त्या सैनिकांनी धारण केलेली सारी वस्त्रे शामवर्णाचीच असतील त्यांच्या डोक्यावरील फेटा, पटका व उपवस्त्र शामवर्णाचा असेल, त्यांच्या पायातील पादत्राणे सुध्दां शाम राहतील. त्यांची शस्त्रास्त्रे, ध्वजा व निशाणे सारी शामवर्णाचीच असतील.

या कलियुगात जे सद्भक्त उध्दरले गेले व उध्दरले जातील असे सद्गुरु ब्रह्माचे अनुग्रही ऋषिवर मुनिवर बारा कोटी जिवात्मे सैनिक रूपाने अवतरतील, त्यांचा गणवेश संपूर्ण पांढरा शुभ्र असेल. अथर्ववेदाचा वर्ण श्वेत असून अथर्ववेद हा कलियुगाचा प्राधान्यभूत वेद आहे. म्हणून प्रचलित समयी ब्रह्मस्वरूपी महात्म्याकडून सद्गुरुब्रह्मा कडून अनुग्रह घेऊन त्यांनी सांगितलेल्या साधनेनुसार व युगधर्मानुसार आचरण करून जे जीवात्मे अमर झाले व होतील ते सारे या कलियुगाच्या अंतसमयी प्रगट होतील. म्हणून त्यांचा गणवेश श्वेत राहिल. त्यांचे घोडे श्वेत, त्यावरील चादर, खोगीर श्वेतवर्णाचे असतील. त्या सैनिकांनी धारण केलेली सारी वस्त्रे श्वेतवर्णच असतील. त्यांचे फेटे, पटके, उपवस्त्र व पादत्राणे देखिल श्वेतवर्णाची असतील. त्यांची शस्त्रास्त्रे ध्वजा निशाणे सुध्दां श्वेतवर्णच असतील.

अशाप्रकारे चतुर्वर्णाची ही चतुरंग सेना मोठी चित्रविचित्र व नयनमनोहारी दिसेल. सद्गुरु महाराज सांगतात त्या भगवंताच्या अपार अतुल पराक्रमी अशा सेनेचे वर्णन करणे शब्दापलिकडिल आहे. हे सर्व चौरंगी सैन्य पाहून भगवान निकलंकी नारायण अत्यंत पुलकित होतील. अत्यंत हर्षोत्फुल अंतःकरणाने ते साऱ्यांचे अभिनंदन करून आभार मानतील व आपल्या प्रमुख सेनापतींना जंबुद्विपाकडे प्रयाण करण्याचा संदेश देतील. ( श्लोक ४८२-५१४ )

भगवान श्री निकलंकी नारायणाच्या स्वारीचे वर्णन सद्गुरु महाराज करीत आहेत कीं, 'चिलोत्र संवत्सराच्या चैत्र महिन्यातील पौर्णिमेच्या गुरुवारी शुभ मुहूर्त पाहून भगवान निकलंकी नारायण युध्दाकरिता सैन्य सिध्द करून वरजागडहून जंबुद्विपाकडे प्रयाण करतील. भगवान स्वत: सर्व प्रथम आपल्या श्वेत अश्वावर स्वार होऊन आपल्या मुक्कामापासून चार पाऊले प्रयाण करतील तोच त्यांच्या समोरून एक सुंदर सौभाग्यवती स्त्री येईल. सोळा शृंगार व संपूर्ण सौभाग्यलंकारांनी युक्त अशी ती स्त्री सुवर्णाचा उदककुंभ माथ्यावर घेऊन येईल आणि त्या कुंभावर सुवर्ण थालीत अमृतोपम पंच पक्वान्नाचे भोजन असेल. तो अत्यंत शुभ शकून झालेला पाहून सतगुरु ब्रह्मा अत्यंत हर्षित होऊन भगवंताला इशारा करतील व म्हणतील, 'स्वामीजी आज आपणास हा अत्यंत शुभ, यशोदायी व महाबलशाली शकुन झालेला आहे. दैत्यांचे संपूर्ण दळ आताच पूर्णपणे नष्ट झाले असे निश्चित समजा.'' तेथून मजल दर मजल प्रयाण करीत ते सर्व सैन्य जंबुद्विपाकडे येऊ लागेल. ज्या पर्वतशिखरावरून गढ पर्वतातून सैन्य प्रयाण करतील, ती पर्वत शिखरे सपाट होत जातील. जणू हवेने धुळीचे लोट उडावेत त्याप्रमाणे सैन्य प्रवाहामुळे पर्वतशिखरे उडत जातील. भगवंताचे हे एवढे मोठे देवऋषि सैन्य असेल की त्याची गणना सुध्दा करता येणार नाही. त्यांत उंट, घोडे अगणित असतील. सातही समुद्र व सर्व नद्या त्यांच्या सेवेकरितां धावून येतील व प्रत्येक प्राण्यांची सैनिकांची ते सेवा करतील. मेरू शिखरावरून खाली उतरून वाट काढीत ते सैन्य प्रयाण करील. मेरू पर्वत सुध्दा त्या सैन्यास अपुरा पडेल. दक्षिणेकडे थेट लंकेपर्यंत सैन्याचे प्रयाण होईल. सैन्य ज्या मार्गाने जाईल त्यामार्गावर घोडे, उंटाच्या लीदचा सवागज उंच थर होईल. चालतांना धुळ एवढी उडेल की आकाश जणू मेघांनी आच्छादित व्हावे त्याप्रमाणे सर्वत्र अंधार पडेल. त्या धुळीच्या लोडाने सूर्य, चंद्र सुध्दा झाकले जातील. भाद्रपदाच्या रात्रीप्रमाणे सर्वत्र गडद अंधार पडेल. पायाखाली दगड वगैरे सुध्दां दिसणार नाही. तेव्हा भगवान निकलंकी नारायण आपले तीनधारेचे शस्त्र हातात उंच धारण करून सैन्याला ईशारा करतील. हजार कळांनी सूर्य तळपावा त्याप्रमाणे ते खड्ग तळपेल व त्या उजेडाच्या अनुरोधाने सैन्य चालायला लागेल. अशाप्रकारे ते संपूर्ण सैन्य जंबुद्विपात येऊन ठेपेल. जंबुद्विपाच्या भूमीवर पाय ठेवताच भगवंताचा श्वेतघोडा मोठ्याने फुरफुरत खिंकाळेल आणि सर्व घोडे त्याचे अनुकरण करतील त्यांची ती गर्जना ऐकून जमिन थरथरायला लागेल, आकाशातील नक्षत्रे थरथरतील व धवलधोरी आपल्या शिरावर पृथ्वीचा भार सहन करण्यास अगदीच असमर्थ झाला आहे अशा प्रकारे पृथ्वी डोलायमान होईल.

अशाप्रकारे पश्चिम दिशेकडून भगवंताचे सैन्य प्रयाण करीत भरत खंडातील जांबुद्विपातील कुवारीका भूमीवर येऊन थडकेल व सर्व सैन्याचा तेथे मुख्य तळ पडून मेळावा होईल. हे कुवारीका क्षेत्र साबरमती नदी तीराजवळ असून तेथे भगवान शामसुंदर निकलंकी अवतार धारण करून प्रत्यक्ष प्रगट लीलाचरित्र करतील. पूर्णा, तापी, रेवा, महीसागर, कावेरी व नेत्रवती या नद्यांच्या परिसरात ठिकठिकाणी भगवान निकलंकी आपल्या सैनिकांच्या तुकड्या ठेवतील. गंगा, यमुना, सरस्वती या परिसरात ह्या सैन्याचा तळ देतील व मुख्य स्थान साबरमती जवळ स्थापतील. आज साबरमतीजवळ काकरीया जवळ इमामपुरी नगरी हेच कुवारीका क्षेत्र असून सद्गुरु ब्रह्माचे ते स्थानक आहे हे मागे आलेलेच आहे. अशा या पवित्र भुमीत भगवान श्री निकलंकी नारायण आपलें आसन स्थिर करतील. (श्लोक ५१५-५३८)

भगवान श्री निकलंकी नारायण आपल्या सर्व सैन्याच्या छावण्यांची योजना व व्यवस्था उत्तम प्रकारे लावून आपल्या मुख्य कचेरीत येतील तेव्हा सद्गुरु श्री इमामशाहांच्या रोजाला त्यांचा चरणस्पर्श होताच तो संपूर्ण सुवर्णमय होईल. अत्यंत लखलखीत तेजस्वी सुंदर असा तो महाल दिसायला लागेल भगवंताच्या परमपावक स्पर्शाने त्या महालाचे स्थित्यंतर होऊन नविन उत्साह चैतन्य त्याला प्राप्त होईल. नगिनागोमटी जवळ रत्नखचित सिंहासनावर बसून शेजारीच बसलेल्या सद्गुरु ब्रह्मस्वरूपी इमामशाहांशी ते काही गोष्टींचा विचारविनिमय करतील. त्यांच्या बैठकीच्या समोरच एक भव्य तराजू काटा टागलेला असून त्याठिकाणी मुख्य न्यायालयाची स्थापना होईल. त्याठिकाणी जीवात्म्यांच्या कृतकर्माचा निवाडा होईल. पापपुण्याचा निर्णय घेतला जाऊन जसे जीवात्म्याचे कर्म तशाप्रकारचे फळ त्याला प्राप्त होईल. जे जीवात्मे सत्कृत्यवान पुण्यवान असतील. त्यांना जवळ ठेवून असत्याचरण, दंभाचरण, पापकृत्ये करणारांना त्यांच्या कर्माची फळे भोगण्यासाठी प्रलयगर्तेत फेकले जाईल. जंबुद्विपात कुवारीका क्षेत्रात इमामपुरी नगरीला भगवान श्रीनिकलंकी नारायणाचा डंका वाजविला जाईल व नवखंडात त्याचा प्रतिसाद उमटेल. विश्वातील संपूर्ण देवलोक भगवंताच्या छत्राखाली एकत्रीत येतील. संपूर्ण विश्वातील देवशक्ति तेथे संगठीत होईल.

भारत देशाच्या उत्तरपूर्वेस असलेल्या चीन देशामधील दैत्य कालिंगा महासामर्थ्यवान बलशाली पण दुष्ट प्रवृत्तीचा दानव होईल. त्याच्याजवळ सुध्दां अगणित सैन्यबळ राहील. तो आपले असंख्य अपार असे सैन्यदळ बरोबर घेऊन भारतावर चालून येईल। त्याचे योध्दे अनंत अपार बलसंपन्न महाझुंजार असे असतील. त्याचे मुख्य

सेनापति संरक्षक असे चोवीस मुख्य पुढारी अधिकारी असतील. सर्व देशात राजदूत म्हणून ते जाऊन ते आपल्या आसूरी दानवी कृत्यांनी संपूर्ण जगतावर मोहपाश टाकतील व आपल्या दानवी आसुरी मताचे समर्थन करून आपले प्रभुत्व दाखविण्याचा प्रयत्न करतील. निरनिराळे चमत्कार करीत करीत संगठित झालेले ते चीनचे सैनिक ललपुरी सीतपुर या मार्गाने भारतावर आक्रमण करीत करीत व भारताचे लहान मोठे संरक्षक ठाणे उध्वस्त करीत करीत सतलज नदीजवळ असलेल्या सरस्वती नदीतीरापर्यंत उत्तर मार्गाने ते येऊन थडकतील व सरस्वती तिरावर त्यांचा सर्वात मोठा पाडाव राहिल. तेथून ते आपल्या निरनिराळ्या गुप्तचरांना निरनिराळ्या ठिकाणी पाठवून भगवान निकलंकी नारायणाच्या छावण्यांची व युध्दबलांची गुप्त माहिती जमवितील. त्यांच्या सैन्यात अगणित ध्वज निशाण राहतील. ढोल, नगारे, तुताऱ्या, रणशिंगे, शंख वगैरे सर्व रणवाद्ये, असंख्य अपार राहतील. भगवंताच्या अवतार कृत्यावर, नामावर ज्यांची श्रध्दा नाही, जे बेईमानी, भौतिक सुखात रममाण होणारे असतील, सद्‌गुरू वचनावर ज्यांचा इमान अढळ नसेल असे अज्ञ मूर्ख पापी लोक दैत्यांच्या चाळ्यांना व भुलावणीला बळी पडून त्यांना जाऊन मिळतील. पण जो खरा ऋषिवर असेल तो कधीच सन्मार्गावरील आपली श्रध्दा ढळू देणार नाही. दैत्य कालिंगाचे सैन्य सरस्वती नदीतीरापर्यंत आलेले आहे असे समजताच निकलंकी नारायण आपल्या सैनिकांच्या तुकड्या तिकडे पाठवितील व सरस्वतीच्या दक्षिणतीरावर आपल्या सैन्याच्या छावण्या मांडतील. अशा प्रकारे देव दानवांचे सैन्य समोरासमोर येईल. युध्दाच्या उद्देश्याने एकत्रित झालेली ती दोनही दळे युध्दाच्या आज्ञेची वाट पाहात एकमेकाकडे तीव्र दृष्टीक्षेप करतील. दैत्याच्या सैनिकांची अन्नपाण्याची अत्यंत आबाळ होईल त्यांना अन्न मिळू शकणार नाही. भगवंताच्या बाजूकडिल सैन्याच्या अन्नपाण्याची अत्यंत काळजी घेतली जाईल. सोन्यामोत्याप्रमाणे अमुल्य अशी एकेका सैनिकाची गणना करून त्यांची अन्नपाणी, वस्त्र, निवारा यांची अत्यंत बारकाईने देखभाल होईल. दोन्हीही सैन्य जेव्हा सामोरे येतील तेव्हा त्यांच्यामध्ये नारदमुनी इकडून तिकडे व तिकडून इकडे अशा फेऱ्या घालून संधी घडवून आणण्याचा प्रयत्न करतील. पण दानवाकडिल अथवा देवाकडिल कोणीही पुढारी त्या गोष्टीस तयार होणार नाही. उलट अभय पक्षाकडून लढाईचीच भाषा वापरली जाईल. शेवटी नारद मुनींचे संधीचे प्रयत्न निष्फळ होतील म्हणून ते दोघांना युध्द करण्याकरितां चेतवतील व भगवान श्रीनिकलंकी नारायण युध्दांकरिता प्रवृत्त होऊन आपल्या श्वेत अश्वावर स्वार होतील. (श्लोक ५३९-५६८)

सद्गुरु इमामशाह महाराज देव दानवांच्या आगम होणाऱ्या अद्‌भुत युध्दांचे वर्णन करतांना म्हणतात की हे मुनिवरा त्या युध्दाचे साग्र वर्णन करणे केवळ अशक्य आहे. शब्द सृष्टीच्या पलिकडचे ते वर्णन आहे. पण त्या भगवंताच्या अंतर्प्रेरणेने यथामति वर्णन करण्याचा प्रयत्न करीत आहे आपण श्रवण करावे. समोरासमोर युध्दांकरितां सज्ज असलेल्या त्या उभय सेनेमधील मोठमोठे शूरवीर योध्दे आपल्या संघप्रमुखाच्या आज्ञेची वाट पहात उभे आहेत. तेवढ्यात ध्वजा छत्रधारी हनुमान मोठ्याने गर्जना करीत जेथे भगवान निकलंकी नारायण उभे होते तेथे आला व भगवंतास म्हणाला, 'हे स्वामीन् आपण मला दैत्याशी युध्द करण्याची परवानगी द्यावी. मी आपल्या हाकेने सारे त्रिभुवन दणाणून सोडविन आणि खरोखर हनुमंताच्या हाकेने सारे दैत्य भयकंपित झाले. एवढ्यात चौसष्टलाख योगिणी भगवंताच्या समोर आल्या व हात जोडून म्हणाल्या, 'हे स्वामीनाथ आपण आम्हाला युध्दाची आज्ञा करावी. आम्ही दैत्यांना मोहवून भुलवून त्यांचा प्राणच शोषून आणतो.' तेवढ्यात वायुदेव साक्षात प्रगट होऊन भगवंताजवळ आले व म्हणाले, 'हे त्रिभुवनपते आपण मला युध्दाची परवानगी द्यावी म्हणजे आपल्या कृपेने मी साऱ्या दानव सैन्याला पतंगाप्रमाणे उडवून लावीन.' नंतर भीमसेन हात जोडून पुढे झाला व म्हणाला, 'स्वामी आपण मला दैत्यांशी युध्द करण्याची परवानगी द्यावी अशी माझी विनंती आहे. आपण आज्ञा दिल्यास आपल्या प्रेरणेने मी सारे स्वर्गभुवनच काय पण त्रिभुवनसुध्दां पालथे करून टाकीन. तुम्ही आज्ञा केल्यास दैत्य कालिंगाला जीवंत पकडून आपल्या सेवेस हजर करीन.' तेव्हा भगवान निकलंकी नारायण म्हणतात, 'हे शूरवीर रणधीरांनो तुमचा साऱ्यांचा व सद्भक्त पांडवाचा पराक्रम अपार, अनंत, अगणित आहे. मला तुमच्या सर्वांच्या पराक्रमाची संपूर्ण जाणिव आणि खात्री आहे. योग्य वेळ आल्यावर मी आपणास तशी आज्ञा करीन. असा वार्तालाप होत आहे तोच सद्भक्त कमलाकुंवर आपल्या मातेसह भगवंताजवळ आला. सुरजादेवी आणि कमळाकुंवर सद्गुरु ब्रह्माजवळ जाऊन त्यांना प्रदक्षिणा करून विनंती करू लागले. ते म्हणाले, 'हे सद्गुरुनाथा, भगवंता दिनदयाळा, आपल्या दर्शनाने आमचे पूर्वभवाचे जन्मोजन्मींचे दुष्कृत्य दग्ध झाले व जन्मोजन्मीचे सुकृत उदयास आले. आम्ही अधम जीवात्मे आपल्या परमपावक दर्शनाने पावन झालो. आमचे जन्ममरणाचे भवदुःख दारिद्र्य नाहीसे झाले. आपली स्तुति कशी करावी हे सुध्दां आम्हाला कळत नाही. आम्हाला तशी आंतरिक प्रेरणा, भक्तिभाव, प्रेम व ज्ञान देण्याची कृपा करावी. आमचे सारे अपराध आपले बालक जाणून पोटात घालावे. तेव्हा अत्यंत प्रेमभावाने भगवान निकलंकी नारायण त्यांना

म्हणाले, हे सुरजादेवी सद्भक्त कमलाकुंवर मी तुम्हाला तुमच्या हिताची गोष्ट सांगतो ती ऐकावी. 'या अवनीतलावर प्रत्येक प्राणिमात्राला स्वतंत्ररित्या जगण्याचा हक्क आहे. आपले स्वत:चे जीवन उन्नतरितीने जगून आपल्याबरोबरच अन्य प्राणिमात्रांचे सुध्दां जीवन उन्नत करण्याचा प्रयत्न करावा. तसे होण्यासारखे नसले तरी आपल्याकडून दुसऱ्या कोणाचे अनहित होणार नाही याची दखल घ्यावयास हवी. यासाठी सदाचार, सत्कृत्य व सज्ञानाची अत्यंत गरज आहे. भूमितलावर या सत्धर्माची स्थापना करून त्या द्वारे जनजागृति करून मानवसमाजाची सामाजिक, धार्मिक, राजकीय, आर्थिक, वैज्ञानिक व अध्यात्मिक उन्नति घडविण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहोत. आमच्या या लोकहिताच्या कार्यास तुमच्या चीनदेशाच्या शासनकर्त्याचा विरोध होत आहे. सामाजिक अन्याय, अत्याचार, हिंसाचार, दडपशाही आणि मदांधपणाने उन्मत्त होऊन दैत्य कालिंगा सर्वत्र अधर्म करीत आहे. दैत्य कालिंगा व त्याचे दुष्ट साहाय्यकर्ते उन्मत्तपणाने आपल्या सतधर्मास सुरुंग लावून आपल्या मायावी व लाघवीपणाने गरीब जनतेस फसवीत आहेत. पीडत आहे, लुबाडत आहेत, नाईलाजाने या अन्यायाविरूध्द हातात शस्त्र धारण करून युध्दास प्रवृत्त व्हावे लागत आहे.

मानव समाजाचे युध्दापासून मुळीच हित होत नसते. पण त्यांच्यावर होत असलेला जुलुम अन्याय अधर्म यांचे उन्मूलन करणे व त्या समाजघातक शक्तिचा हिरमोड करणे आपले कर्तव्य आहे. दैत्य कालिंगा व त्याचे साथीदार या दुष्ट व घातक कार्यामुळे तर मरतीलच पण त्यांच्याबरोबर बाकीच्या निष्पाप निर्दोष जीवात्म्यांचा व्यर्थ नाश होऊ नये म्हणून शक्य तो युध्द टाळण्याचा आमचा विचार आहे. साम, दाम, दंड आणि भेद या न्यायाने आम्ही हनुमान, नारदमुनी आदि सदाचारसंपन्न समाज धुरीणांना कालिंगाकडे शिष्टाईसाठी पाठविले पण याचा कांही एक उपयोग झाला नाही. म्हणून हे सुरजादेवी आपले सौभाग्य कायम राहावे. देवांचे आणि दानवांचेही हित व्हावे, युध्दप्रसंग टळून दानवांनी सुध्दा समाजहित व मानवउन्नतीकडे लक्ष द्यावे यासाठी आमची अशी इच्छा आहे कीं, आपण उभयता मातापुत्र आपल्या गोटात जाऊन कालिंगाला व त्यांच्या साथीदारांना सदाचार, सद्धर्माची समज द्यावी व युध्द टाळण्याचा प्रयत्न करावा. कालिंगाच्या आणि आमच्या सर्व प्रकारच्या संधी संपलेल्या आहेत. सर्व प्रयत्न फसलेले आहेत. केवळ शेवटचा हा प्रयत्न करायचा आहे. कदाचित तोही उपाय फसला तर आपणास आमचे पूर्ण संरक्षण व अभय आहे. त्याबद्दल चिंता करूं नये. आपल्या व आपल्या गरीब निर्दोष प्रजेची संरक्षणाची

जबाबदारी आम्ही घेऊ. पण त्यासाठी ओढवलेल्या प्रसंगाशी निर्धाराने व धैर्याने तोंड देण्यास सज्ज असावे.' भगवंताचे निवेदन ऐकून भक्त कमलाकुंवर व सुरजामाई यांनी भगवंताला प्रणाम केला व आपले कर्तव्य पार पाडण्यासाठी दैत्यांच्या छावणीत त्यांनी प्रवेश केला. (श्लोक ५६९-५८४)

साध्वी सती सुरजाराणी आणि पुत्र कमलाकुंवर भावी घटना साऱ्या जाणत होते. पण केवळ भगवंताची आज्ञा व कर्तव्य करण्याच्या हेतुने ते दैत्याच्या गोटात गेले. दुतांनी सुचना दिल्यावर व प्रत्यक्ष दैत्य कालिंगाने त्या उभयतांना पाहून आश्चर्य व्यक्त केले. समोर आपल्या मुलाला व पत्निला पाहून तो त्यांना म्हणाला, 'बाळा कमळाकुंवरा तुझ्या जबाबदारीवर मी साऱ्या चीन देशाच्या राज्यशासनाची भीस्त ठेवून युध्दासाठी इकडे आलो. पण तुम्ही उभयता मातापुत्रांनी ते सोडून इकडे येण्याचे कारण काय बरे घडले? असे काय कारण उपस्थित झाले की तुम्हाला देश सोडून यावे लागले.' तेव्हा कमळाकुंवर व सुरजादेवी म्हणाले, 'हे तात देश सोडून येण्याचे एकच कारण घडले ते असे की आपल्या देशाच्या संरक्षणासाठी आणि गरीब प्रजेच्या हितासाठी आपण आमची एकच विनंती मान्य करावी की युध्दाची माघार घेऊन त्या अभंग नारायणाशी समझोता करावा. कारण आपले सैन्यबळ त्या भगवंताच्या सैन्यबळापेक्षा कीतीतरी पटीने कमी आहे शिवाय त्यांच्याजवळ आपल्यापेक्षा अधिक सुधारलेली प्रगतीशील शस्त्रास्त्रे आहेत. तो भगवान त्रिभुवनपति, प्रत्यक्ष सृष्टीकर्ता, नियामक आणि संहर्ता असा आहे. तो अभंग, अविनाशी, अनादि अनंत आहे. त्याच्याशी युध्द करू नका. अनादिकाळापासून त्यांची संस्कृति, धर्माचरणपध्दति व समाजोन्नतीकारक विचारशक्ति मानव कल्याण व उत्कर्षाचीच आहे आणि आजपर्यंत त्यांच्या या संस्कृतीशी टक्कर देऊन आपल्या असूर संस्कृतीने तिला नामशेष करण्याचा प्रयत्न केला. पण आपला कोणताच प्रयत्न आजपर्यंत सफळ झालेला नाही. प्रत्येक वेळेला आपल्या रक्षसंस्कृतीला हार तर खावी लागलीच पण त्यायोगे असंख्य प्राणहानी, वित्तहानीचे तडाखे खावे लागले. अनादिकाळापासून हा देव दानवांचा झगडा चालू आहे. त्या भगवंताने पहिल्या मच्छ अवताराच्या वेळेस शंखासूराला ठार मारून वेदांचे संगोपन केले. भक्त रूख्मांगदाच्या सत्वाचे रक्षण केले. वेदोक्त धर्माचा सर्वत्र प्रसार प्रकाश केला. म्हणजेच वैदिक सनातन सतपंथाची स्थापना केली. पुढे दुसऱ्या कूर्म अवतारात समुद्रमंथन घडवून अमृतत्व प्राप्त करवून दिले. त्यासाठी कासवाचे रूप घेऊन मेरूमंदार पर्वत पाठीवर तोलून धरला व मधुकिंटक दैत्याचा संहार केला.

भक्त अंबरीषाच्या व्रताचरणाचे सत्व पालन करून त्याला अमर केले. तिसऱ्या वराह अवताराच्या वेळेस मोरध्वज अथवा हिरण्याक्षाचा संहार करून रसातळास जात असलेल्या पृथ्वीचे उध्दरण केले. ध्रुवभक्ताला अढळपदाचे स्थान देऊन त्याला अविंचल अविनाशी बनविले. चौथ्या नृसिंह अवताराच्या कारकिर्दित हिरण्यकश्यपु दैत्याचा संहार करून मानव समाजास लागू पाहणाऱ्या दुष्ट आणि घातक वळणापासून वाचविले. भक्त प्रल्हादाच्या जीवापाड कसोटीत वेळोवेळी सहाय्य करून त्याचे संरक्षण केले. पाच कोटी भक्तांचा सद्भक्त प्रल्हादाबरोबर उध्दार केला.

भगवंताने त्रेतायुगात पाचव्या वामन अवताराचे वेळेस बळीराजाचा गर्वहरण करून भक्त कमळाधेनचा उध्दार केला. सहाव्या परशुराम अवताराचे वेळेस सहस्त्रार्जुनाचा संहार केला. जगतात सर्वत्र व्यापलेल्या क्षात्रबलाशी ब्राह्मतेजाने संघर्ष करून तेजस्वी अशा सनातन धर्माला उजाळा दिला. शेतजमिनींचा विकास घडवून अन्नधान्याचे उत्पादन व वृद्धि केली. भक्त कमळापतीचा उध्दार केला त्या जगन्नियंत्या भगवान नारायणाने पुढे सातवा श्रीरामअवतार धारण करून लंकापती रावणाचा संहार केला. त्याने स्थापन केलेल्या रक्षसंस्कृतीचा पार धुव्वा उडविला व मानवी जीवनाचा विकास व चतुर्पुरूषार्थ साध्य करण्याच्या मार्गाचा स्वतः अवलंब करून आदर्श जीवनाचा धडा जनतेस शिकविला. भक्त हरिश्चन्द्राच्या सत्वकसोटीत त्याला आत्मबळ देऊन सातकोटी जीवात्म्यांच्या बरोबर त्यास अमरपदाचा अधिकारी बनविला.

द्वापारयुगात श्रीकृष्ण अवताराच्या वेळेस त्या भगवंताने कंस चाणूरादि अनेक दुष्ट दैत्याचा संहार केला. चौदा भुवने आपल्या मुखात दाखवून आपले विश्वव्यापी स्वरूप व्यक्त केले. अनेक सद्भक्तांचा उध्दार करून गीताधर्म विश्वधर्माचा उपदेश केला. स्वतः त्याप्रमाणे जीवन जगून मानवास आदर्श बनविण्याचा प्रयत्न केला. उन्मत्त बनलेल्या यादवकुळाचा संहार घडवून पृथ्वीवरील भूभार उतरविला. त्याच भगवंताने पुढे बुध्द अवतार धारण करून सद्भक्त पांडवांना अध्यात्म ज्ञानाचा उपदेश केला. त्यांच्याकडून जीवन्मुक्त अवस्थेच्या निरनिराळ्या साधना घडवून त्यांना पूर्णत्वास नेले. दुष्ट दुर्योधनासही या ज्ञानाचा उपदेश केला पण त्याने ते न मानल्याने अत्यंत हालअपेष्टेत त्याला मरण प्राप्त झाले. नऊकोटी जीवात्म्याबरोबर सद्भक्त पांडवांचा उध्दार झाला.

सांप्रत कलियुगात भक्तवत्सल दिनदयाळू भगवान निकलंकी नारायण प्रगट झालेले असून त्यांनी व सद्‌गुरु ब्रह्मस्वरूप महात्म्यांनी दिग्दर्शीत केलेल्या वैदिक सनातन

सतपंथाचा प्रकाश ते जगताला देत आहेत. मानवसमाजाच्या उन्नतिचा व आत्मोध्दाराचा दिव्य संदेश ते देत असून त्यांच्या ध्येयाप्रमाणे प्रत्येकाने वागल्यास त्याचा उत्कर्ष होईल म्हणून स्वामीनाथ आमची हात जोडून आपणास विनंती आहे की आपण त्या भगवंताच्या महदकार्यास सहकार्य करून सांप्रतचा युध्द प्रसंग टाळावा आपल्या गरीब प्रजेची जीवीतहानी व वित्तहानी वाचवावी.' सुरजाराणी व कमलाकुंवरचे हे वचन ऐकून दैत्य कालिंगा अत्यंत संतप्त झाला. एकदम त्यांच्या अंगावर उसळून तो ओरडला. 'महामूर्खांनो हेच सांगण्यासाठी तुम्ही येथे आले काय! मूर्ख शिरोमण्यांनो भगवान भगवान काय करीत बसले आहांत, खरा भगवान कोण हे आताच मी तुम्हाला दाखवितो! आपली सर्वोत्कृष्ट रक्षसंस्कृति सोडून दैववादि, आळशी आणि गुलामगिरी शिकवणारी अशी दैवी संस्कृतीची तुम्हाला कशी काय आवड निर्माण झाली? सतत आकाशाकडे पाहून हरी हरी करीत बसणे तुम्हाला आवडते तरी कसे? खुशाल खावे प्यावे मजामौज करावी. समोर आलेल्या कोणात्याच भोगांचा त्याग न करता आपला पुरुषार्थ म्हणून त्याचा यथेच्छ उपभोग घ्यावा हे सोडून, मृत्यूनंतर आपल्याला यमराजासमोर जबाब द्यावा लागेल अशा प्रकारचा भ्याड विचार तुमच्या मनात शिरलाच कसा? अरे मुर्खांनो, अशा महामुर्खांचा तर मी आताच जबाब घेणार आहे, वर जाण्याची गरजच नाही. जेवढा आनंद लुटून घ्यायचा असेल तो यथेच्छ लुटा त्यातच जीवनाचे सार्थक आहे. भगवत् शक्ति नावाची चिजच जगतात नाही आणि मला त्याचा धाक दाखविता काय? माझे अन्न खातात आणि निमकहराम होऊन माझ्या शत्रुची वाखाणणी करतात. आतापर्यंत मला तुमच्या या भरभेदीपणाची जाणिव नव्हती नाहीतर यापूर्वीच तुम्हाला मृत्यूच्या स्वाधिन केले असते. पण हे राणी आता तरी लक्षात ठेव की ज्याचे ध्यानी, मनी चरणी तू लागली आहेस तो कितीही अभंग असला तरी त्याचा प्रत्यक्ष कर्दनकाळ असा मी महाबळवंत सर्वसमर्थ आहे. माझा एकेक सैनिक असा बळवान आहे की तशा कित्येक अभंगांना मोडून त्यांचा चुरा करतील.' दैत्य कालिंगाची गर्वोक्ति ऐकून सती सुरजाराणीला फार वाईट वाटले. तिला त्याचा फार राग आला पण प्रत्यक्ष पतीपुढे ती काय करू शकणार. मन शांत करून ती म्हणाली, 'स्वामीनाथ आपले पुढील सारे भवितव्य स्पष्ट दिसत आहे. आपणास शकून तशाच प्रकारचा वाईट घडलेला आहे आणि मला स्वप्नही अत्यंत वाईट भयानक पडले. पण आपण यापैकी एकही गोष्ट मानत नाहीत हे आमचे व आमच्या गरीब प्रजेचे दुदैव आहे. आपले अनहित व्हावे असा कोणताच दुष्ट हेतू आमचा नाही पण आपण ऐकतच नसाल तर या दासीची एक

शेवटची मनोकामना पूर्ण करावी. सौभाग्यलेण्याने युक्त अशा या दासीची पूजा आपण स्विकारावी व आम्हास जाण्याची आज्ञा असावी. असे म्हणून सुरजाराणीने मनोमन भगवंताची आराधना करून पतीच्या कल्याणाची कामना करून पुष्पांजली त्याच्या मस्तकावर वाहिली व हात जोडून ती लीनतेने नम्रतेने प्रणाम करूं लागली, तोच एक मोठा चमत्कार त्याठिकार्णी घडला. सुरजाराणीच्या हातातील फुले दैत्य कालिंगाच्या मस्तकावर पडताच सुदर्शन चक्र फिरावे त्याप्रमाणे ती फुले भयानक वेगाने चक्राकार फिरू लागली व त्यांचा कोमलपणा जाऊन वज्राप्रमाणे कठिण व ती तीक्ष्ण बनली व दैत्य कालिंगाच्या मस्तकावर मानेवर गरगरा फिरू लागली. एका क्षणात दैत्य कालिंगाचे शिर भयानक आवाज करीत जमिनीवर आदळळे. हे दृश्य पाहताच सती सुरजाराणीला अत्यंत दुःख झाले. ती शोकविलाप करू लागली व दुसऱ्याच क्षणी ती सुध्दां मूच्छींगत होऊन जमिनीवर पडली. सर्वत्र हाहा:कार झाला. सर्वदूर एकच हलकल्लोळ झाला. सुरजाराणीने आपल्या पतीला दैत्य कालिंगाला भगवंताच्या सांगितल्यावरून ठार मारले. सत्यघटना कळून येण्याच्या आधीच हा अपप्रचार सर्वत्र पसरला. सर्व दैत्य सैन्यात भयाचे वातावरण पसरले. (श्लोक ५८५-६२१)

दैत्य कालिंगाचा युध्दाचे अगोदरच अंत झाला. सर्वत्र हाहा:कार पसरला. कालिंगाची राणी व मुलगाच प्रत्यक्ष तेथे हजर असल्यावर सर्व सेनापतींना काय करावे हे सुचेना. ते अत्यंत संभ्रमात पडले. शेवटी ते महाबलाढ्य अक्राळ विक्राळ देहधारी राक्षस एकदम उसळून अतिशय रागाने म्हणाले, 'या राणीचे, राजकुमाराचे म्हणणे मुळीच ऐकायचे नाही. आपण लढाईच्याच तयारीने आलेलो आहोत व आपले सर्व सैनिक शस्त्रास्त्राने सज्ज आहे म्हणून विलंब न करता पुढे मोर्चा बांधा. जेथे तो हरी असेल तेथेच त्याच्यावर तुटून पडा व आजच त्या अभंगाचे शिर कापून छिन्नभिन्न करून टाका आणि ज्या श्रीहरीच्या सांगण्यावरून राणीने आपल्या पतीचा शिरच्छेद केला त्या राणीला व राजकुमाराला पकडून बंदीशाळेत टाका. राजप्रमुखांचे ते आततायीपणाचे म्हणणे ऐकून साऱ्या सैनिकात उत्साह आला व सर्वत्र हलकल्लोळ होऊन युध्दांकरितां सज्ज झाले भगवान निकलंकी नारायणाच्या दूतांनी सुरजाराणी व कमलाकुंवरचे संरक्षण करून काय प्रकार घडतो हे दैत्यांना कळून येण्याच्या आधीच ते त्यांना दैत्यांच्या गोटातून सुरक्षितपणे घेऊन गेले.

दुसऱ्या दिवशी सकाळी सुर्योदयाबरोबर उभय सैन्यात जिकडे तिकडे रणशिंगे फुंकली गेली. सर्व सैन्य जय्यत तयारीनिशी रणसंग्रामावर चढून आले. अनंत निशाणे उभारली गेली. रणवाद्ये, नगारे, ढोल, तुताऱ्या, शिंगे, शंख यांच्या आवाजाने सर्व

वातावरण दणाणून गेले. दोनही सैन्यामधून सेनाग्रणी पुढे झाले व एकमेकावर चाल करून आले. मारू अथवा मरू या जिद्दीने ते एकमेकाशी भिडले. दैत्य मल्लकेशर भीमावर चालून आला. दोघेही मल्लविद्याकुशल वीरधीर आणि वज्रदेही असल्याने बराच वेळपर्यंत त्यांचे युध्द चालले. कोणीही कोणास हार खात नव्हते. शेवटी दोघांचे अत्यंत तुमुल असे गदायुध्द झाले. गदेच्या घावाने दोघेही अत्यंत जर्जर झाले. त्या दोघांनी एकमेकांच्या देहास असे काही विलक्षण विळखे घातले कीं ते दुसऱ्या कोणासच काय पण त्यांना स्वत:ला सुध्दां सोडविता येत नव्हते. तुल्यबळ हत्तीची ज्याप्रमाणे झोंबी व्हावी. त्याप्रमाणे ते भयानक दिसत होते. सर्वजण ते युध्द पाहून भयभीत झाले. शेवटी भगवंताचे स्मरण करून भीमाने एक गदेचा घाव मल्लकेशरवर असा केला की रक्त ओकत तो महाबलवान दैत्य तेथेच निपचित पडला. भीमाचा जय झाला. देव सैन्यात सर्वत्र आनंदीआनंद व जयजयकार झाला.

दुसरा दैत्य सेनापति रक्तकेशर नकुल सैन्यावर तुटून पडला. नेजाधारी नकुल सैन्याने त्याच्या बऱ्याचशा सैन्याचा संहार केला. याने सुध्दां नकुल सैन्यांचा बराच फडशा पाडला. शेवटी युध्द करीत करीत ते दोघे एकमेकास भिडले व शस्त्रास्त्रांनी एकमेकांचा संहार करण्यास उद्युक्त झाले. बराच वेळपर्यंत त्यांचे युध्द चालले पण नकुलापुढे त्याचे बळ काही चालू शकले नाही. नकुलाच्या नेजाने दैत्य रक्तकेशर घायाळ होऊन जमिनीवर पडला तो उठूच शकला नाही.

तिसरा दैत्य सेनानी रणधुरंधर असा रणकेशर संपूर्ण भूतगणावर तुटून पडला. भगवान शंकराच्या त्या दूतांनी रणकेसरीस चांगलाच चारही बाजूंनी घेरला व आपल्या मायावी तामस पाशांनी बांधला. त्यांच्या साहाय्यासाठी योगिणी यक्षिणींचे स्त्रीसैन्य सुध्दां धावून आले व या साऱ्यांनी रणकेसरीची चांगलीज फजिती केली. रणांगणातून त्याने पळ काढला पण भूतगण त्याला तसे पळूसुध्दां देत नव्हते. शेवटी सर्व बाजूंनी दमकोंडा झालेल्या त्या दुष्ट दैत्याने रणांगणातच देह ठेवला. अशा रितीने त्याचा सुध्दां अंत झाला.

चौथा दैत्य गजकेसरी हा नावाप्रमाणेच गजदेही व महापराक्रमी होता. त्याच्या बरोबरीने युध्द करू शकणारा वीर देव सैन्यात फक्त हनुमानच होता. म्हणून दैत्य गजकेसरी युध्दाकरिता समोर येताच हनुमान हातात एक पर्वतप्राय मोठा दगड घेवून पुढे आला व त्याने तो पर्वत गजकेसरीवर टाकला. तो त्याने मोठ्या कौशल्याने चुकविला व तो हनुमंतावर धावून गेला. दोघांचे बराच वेळ शस्त्रास्त्रांचे युध्द झाले.

पण कोणीही कोणास हार जात नव्हते. हनुमंताने एकामागून एक पर्वत त्याच्या अंगावर टाकण्याचा सपाटा सुरु केला पण गजकेसरीने त्या सार्‍या पर्वताचे चूर्ण केले व आपल्या हातातील वज्रप्राय शस्त्र हनुमंतावर फेकले त्या आघाताने हनुमान घायाळ होऊन क्षणभर निपचित पडला पण दुसर्‍याच क्षणी त्याच शस्त्राने गजकेसरीवर आघात करताच रक्तओकीत दैत्य गजकेशरी धाडकन जमिनीवर पडला व पडताबरोबरच त्याचा प्राण गेला. त्याच्या जमिनीवर आदळण्याने प्रचंड आवाज झाला व धरणीकंप व्हावा त्याप्रमाणे लोक भयभीत होऊन त्याच्या प्रेताखाली चेंगरून गेले.

रणधुरंधर असा गजकेसरी जमिनीवर पडताच पाचवा दैत्य सेनाधिपती नागकेसरी अत्यंत क्रोधायमान झाला व अत्यंत निकराचे युध्द करून त्याने हनुमंताला निपचित पाडले. देवपक्षाकडिल अनेक सैनिक त्याने घायाळ केले. सर्वत्र दानवांची सरशी होऊ लागली. दानव अत्यंत हर्षित होऊन इर्षेने व प्राणपणाने लढू लागले. प्रल्हाद, हरिश्चन्द्र, युधिष्ठिर, भीम, अर्जुनादि एकेक सेनापति नागकेसरीशी लढू लागले पण तो कोणाशीही हार खात नव्हता. उलट एकेकाला घायाळ करूनच त्याने परतवून लावले. ते पाहून भगवान निकलंकी नारायण आपल्या श्वेत अश्वावर स्वार झाले. त्यांनी हातात तीन धारेचे ते दिव्य खड्ग धारण केले. भगवंताजवळ असतांना ते खडग साडेतीन हात लांबीचे होते. युध्दाकरीता हातात धारण करताच ते अत्यंत लखलखीत तेजस्वी शस्त्र सात हात लांबीचे झाले व प्रत्यक्ष दैत्यांशी युध्द करू लागले. तेव्हा शंभर शंभर हात लांबून त्या शस्त्राने भगवान नागकेसरीशी युध्द करू लागले. मनोवेगाने शस्त्र फिरवून भगवंतानी संपूर्ण दैत्याचा संहार सुरु केला. त्या दिव्य खड्गापासून एकही दैत्य आपला बचाव करू शकत नव्हता. नागकेसरी सुध्दां त्या अस्त्रास बळी पडला. दानव सैन्यात आता कोणीही सेनापती राहिला नाही. दैत्यांच्या रक्ताने चारयुगापासून कोरडी असलेली सरस्वतीनदी दुथडी वाहू लागली. दैत्य कालिंगाच्या सेनाधिपतींच्या व सैनिकांच्या रक्ताने सरस्वती नदीस पूर आला. त्या रक्ताने अर्धाघट भरला गेला. पूर्वकाळांत भगवंताने महाकाली शक्तिदेवीस दिलेले वचन पूर्ण केले. सर्व देव सैन्यात भगवंताचा जयजयकार झाला. संपूर्ण दानववंश नष्टप्राय झाला. दानवी संस्कृतीचा संपूर्ण लय होऊन देव संस्कृतीचा प्रभाव सर्वत्र पसरला. भगवंताचे सारे सैन्य एकत्रीत संगठित झाले. भगवान निकलंकी नारायणाच्या दिव्य अश्वाच्या खुराशी दैत्य कालिंगाचे शिर अडथळू लागले. तेव्हा भगवंतानी त्या अश्वास आज्ञा केली की तू हे शिर घेऊन चीनमध्ये या कालिंगाच्या राजधानीत टाकून दे. चीनचा शिल्लक राहिलेला सारा कोट पाडून टाक व असा जोरात पाय

आदळ की जमीन दुभंगून समुद्राचा अलोट प्रवाह वर उसळेल व पाहता पाहता सारे नगर व देश जलमय होऊन जाईल. अशा प्रकारची आज्ञा होताच श्वेत अश्व चीननगर नष्टभ्रष्ट व जलमय करून परत भगवंताजवळ येईल. अशाप्रकारे दैत्य निर्वंश होतील. भगवंताचा जय होईल व भक्त कमलाकुंवर बरोबर अनंत कोटी जीवात्म्यांची मुक्तता होईल. तोच अनंतकोटीचा भरणा म्हणजे कलियुगात अंतसमयी अनादिकाळापासून अमरपदास प्राप्त झालेल्या सद्भक्तांचा भगवंताच्या निर्गुण निराकार ज्योतिर्मय स्वरूपाशी लय पावणे होय. (श्लोक ६२२-६४८)

अशा प्रकारे अत्यंत भयानक स्वरूपाची वेळ येईल तेव्हा भगवान श्री निकलंकी नारायण श्वेत अश्वावर स्वार होऊन सर्व दुष्ट दैत्यांचा संहार करतील. जगतातून दुष्ट प्रवृत्तींच्या लोकांचा समूळ नाश करतील नास्तिक व भोगपरायण अशा दुष्ट संस्कृत्यांचा समूळ उच्छेद केल्यावर सत्प्रवृत्त अशा निरामय निर्विवाद विशुध्द वैदिक सनातन संस्कृतीचा सर्वत्र प्रसार प्रचार करतील. ठिकठिकाणी तशा संस्था उभारून मानवाला सुसंस्कृत रीतीने जीवन जगता यावे याकरिता नेटाने प्रयत्न करतील. संपूर्ण पृथ्वी निर्दानवी करतील. सर्वत्र भगवंताच्या नावाचा जयजयकार होईल संपूर्ण पृथ्वीवर नऊखंडात भगवंताच्या नावाची द्वाही फिरेल. नवखंडात एकमेव भगवान श्री निकलंकी नारायण राजसिंहासनावर बसून राज्यशासन करतील. ऋषिवर, मुनिवर, तपस्वी, सद्भक्त असतील त्यांना ऋध्दिसिध्दी अर्पण करतील. त्यांची सर्वतोपरीची मनोकामना पूर्ण होईल तेव्हा मूर्खलोक हात घासून मनात चुरमुरुतील. भाद्रपद शुध्द पौर्णिमा गुरुवारच्या दिवशी भगवान श्री निकलंकी नारायणाच्या लग्नाचा वाङ्‌निश्चय ब्रह्मकन्या वसमकुंवारीशी होईल. तिच्याशी भगवंतांनी पहिल्या क्रतायुगात वाक्‌दान केलेले होते. त्या वचनपूर्तीकरिता हा विवाह संबंध घडून येईल. सद्‌गुरु ब्रह्मा हे कन्यादान भगवंताला स्वहस्ते करतील. जलकुंभ भरले जातील. कुंभकलशपूजन होऊन सर्वत्र आनंदी आनंदाचे वातावरण पसरेल सती देवी सीता, कुंता, द्रौपदी आणि तारामती चारही वेदांचे मंगल गायन करतील. सर्वत्र नवचैतन्य प्रगट होऊन उत्साहाने स्वयंस्फूर्तीने सर्वजण उत्सवमंगल गायन करून भगवंताचा जयजयकार करतील. तेव्हा भगवंताच्या नावाने एकछत्री अंमल साऱ्या दुनियेत सुरु होईल.

अशा रीतीने सर्व विश्वातील कारभाराची घडी नीट बसल्यावर भगवान नविन अशा धर्माची समज सर्वांना देतील. त्याचा प्रचार व प्रसार आणि अंमलबजावणी सर्वत्र केली जाईल. भगवान आपल्या परमप्रीय सद्भक्त पांडवांना सत्यवादी ऋषिवरांना समोर बोलावून त्यांच्याजवळ राजदंड सोपवितील व त्यांना सांगतील की, 'हे सद्भक्त

ऋषिवर्यांनो द्वापारयुगात अपार कसोटी सहन करून तुम्ही राज्यछत्र सिंहासन मिळविले. अतुल पराक्रम करून दुष्ट घातकी कौरवांचा म्हणजेच अधर्माचा उच्छेद केला पण धर्मराज्य कांही करू शकले नाही कारण द्वापारयुग संपून कलियुगाला सुरुवात झाली म्हणून राज्यशासन सोडून तुम्हाला हिमालयात जावे लागले. त्यावेळेस अपूर्ण राहिलेली तुमची धर्मशासन करण्याची इच्छा मी आता तुम्हाला हा राजदंड देऊन पूर्ण करतो. हा राजदंड घेऊन नीतीधर्माप्रमाणे राज्यशासन करा. सवालाख वर्षपर्यंत तुमचे हे धर्मशासन चालेल नंतर त्या धर्मआचरणाने अनंत करोडी जीवात्म्यांची सद्गती होईल. तेव्हा तुमचे शासन संपुष्टात येईल व मग कल्पान्तकाळ सुरु होईल. कलिकाळ संपेल. संपूर्ण पृथ्वी, जीवप्राणिमात्रांचा व्यवहार आटोपेल. सर्वत्र जलप्रलय होईल. अशाप्रकारे सांगून भगवान राजदंड ऋषिवरांना सोपवतील व अंतर्धान होतील. ऋषिवर सवालाख वर्षपर्यंत धर्मशासन करतील पण तो काल एक दिवसाप्रमाणे निघून जाईल. त्यानंतर अनंतकोटी जीवात्म्यांच्या सद्गतीचा प्रसंग उपस्थित होईल. ( श्लोक ६४९-६६१ )

अनादिकाळापासून जे जीवात्मे अमरापुरीत गढले गेले, अमृतत्व प्राप्त करून निरभिमानी झाले. आत्मलाभामुळे ज्यांची वृत्ति सम झाली असे जीवन्मुक्त व विदेहमुक्त सद्भक्त या कलियुगाच्या अंतसमयी प्रगट होतील. हे अमरपद त्याच मनुष्यास प्राप्त होते कीं जे तपस्वी सद्गुरुंची एकाग्र मनाने दृढचित्ताने सेवा करतात, मानव जन्मात येऊन सद्गुरु मुखातील वचन वेदवचनाप्रमाणे प्रमाण मानून, दृढनिश्चयाने त्याप्रमाणे आचरण करतात ते जीवात्मे वैकुंठात, अमरापुरीस प्रवेश करतात. जे नित्यनियमाने अमी म्हणजे सद्गुरु चरणामृत प्राशन करतात आणि सद्गुरुंनी कथन केलेल्या नीतीनियम क्रियाकर्मकांडाचे आचरण करतात, सचोटीची स्वकष्टार्जित दसवंत सुक्रित सद्गुरुंना दानधर्माद्वारे अर्पण करतात. पंचेंद्रिये दमन करून पंचभूत आत्मवश करतात, मन स्थिर ठेऊन एकाग्रचित्ताने आपल्या हृदयात भगवंताच्या निर्गुण निरामय स्वयं तेजस्वी ज्योतिस्वरूपाचे ध्यान व ॐ प्रणवब्रह्माचे नामस्मरण चिंतन निदिध्यासन करतात. ते जीवात्मे मृत्यूनंतर अमरापुरीला प्राप्त होतात. भगवंतांनी सृष्टीकार्य करण्याकरितां वेळोवेळी जे अवतार धारण केले, त्यांचे रहस्य जाणून त्यांची सेवा पूजा उपासना करणारा जीवात्मा अमरापुरीला जातो. युगधर्मानुसार प्राधान्यभूत असलेल्या सनातन वैदिक मार्गानुसार क्रिया कर्मकांड यज्ञाच्या होमहवन पूजाअर्चा करून देवीदेवदेवतांचे पूजन अर्चन करतात, व्रत, दान, दाग वगैरे युगधर्मानुसार आचरण करतात ते जीवात्मे मृत्युनंतर वैकुंठात प्रवेश करतात. जे ऋषिवर आपल्या आत्मतपोबलाने तुटलेली हृदये सुध्दां प्रेमभक्तिद्रवाने

सांधतात, नास्तिकांना सुध्दां आस्तिक करून सोडतात, भवाटवीत, भवारण्यात भरकटलेल्या जीवात्म्यांना सुयोग्य मार्गदर्शन करून मुळस्थानावर आणून सोडतात, स्वतः मुक्ति मार्गाचे आचरण करून सद्भतांना त्यामार्गाचे अवलंबन करवितात, ते सद्भक्त जीवन्मुक्त महात्मे ऋषिवर अमरापुरीला जातात. कल्पांत काळापर्यंत ते जीवात्में तेथे स्वर्गीय सुख उपभोगितात. त्यांच्या वृत्त्याच मुळ निरिच्छ असल्याने सर्वप्रकारची दिव्यसुखे भोगूनही ते अलिप्त असतात कसलीच आसक्ती भोगवासना त्यांना नसतात. सद्गुरुंच्या कृपाशिर्वादाने व संत महंत सद्भक्तांच्या पुण्यप्रभावाने ते जीवात्मे अजर, अमर, पूर्णतृप्त असतात. आठ लाख करण वर्षात सद्गुरु ब्रह्मांनी केलेल्या तपश्चर्येच्या पुण्यप्रभावाने ही चराचर प्रकृति समष्टी निर्माण होते. जीवप्राणिमात्र सृष्टी विकास पावते व शेवटी सर्गकालात आपल्या मूल निर्गुण निराकार स्वरूपात लय पावते. त्या सद्गुरु ब्रह्माच्या निरंजन, निर्विकार, सगुण, साकार स्वरूपाशी अत्यंत दृढप्रेमभावाने अविंचल दृढ प्रीती जोडली ते जीवात्मे देवगतीस जातात अमर होतात. (श्लोक ६६२-६७५)

प्रथम दशरायण कल्पात तपस्वी सतगुरु ब्रह्मा प्रगट होऊन त्यांनी उपदेशिलेल्या जीवनसाधनेनुसार आचरण करून नव्वाणु कोटी यक्ष देव निर्वाण पदास प्राप्त झाले. दुसऱ्या देवगुण कल्पामध्यें महातपस्वी सतगुरु ब्रह्मा स्वरूपाने प्रगट झाले व त्यांनी दिग्दर्शीत केलेल्या युगधर्मानुसार साधना करून छपन्न कोटी मेघगण मुक्त झाले. पुढे तिसऱ्या पंखला नावाच्या कल्पात तेच सतगुरुब्रह्मा महान तेजोरूप सनातन ब्रह्मरूपाने प्रगट होऊन त्यांच्या मार्गदर्शनानुसार वागून बत्तीस कोटी किन्नरगण अमरगतीस गेले. चौथ्या करण कल्पात अथवा श्वेतवाराह कल्पात तेच सतगुरु ब्रह्मा अमरतेज रूपाने प्रगट होऊन त्यांनी या करण कल्पाचे चार युग निर्माण केले. चारही युगात निरनिराळ्या रूपाने प्रगट होऊन त्यांनी युगायुगाचे ठायी ज्या मुक्तिमार्गाचे दिग्दर्शन केले. त्या मार्गानुसार योगसाधना करून तेहतीस कोटी देव अमर झाले. त्यापैकी पहिल्या क्रतायुगात सतगुरु ब्रह्माच्या योग मार्गाचेआचरण करून पाच कोटी जीवात्मे सद्भक्त प्रल्हादासमवेत अमरापुरीला प्राप्त झाले. त्रेतायुगात सतगुरु ब्रह्मा, वशिष्ठ रूपाने प्रगट होऊन त्यांनी उपदेशिलेल्या योगधर्मानुसार, सत्यधर्मानुसार आचरण करून सात कोटी जीवात्मे सद्भक्त हरिश्चन्द्रासह अमरापुरीस जाऊन पोहोचले. पुढे तेच सतगुरु ब्रह्मा वेदमूर्ति व्यासमुनीच्या रूपाने प्रगट होऊन त्यांनी सहाशास्त्रे, चारवेद, अठरा पुराणे व अनेकानेक सद्ग्रंथाचे मंथन करून निष्काम कर्मयोगाचरणाचा उपदेश केला. त्यानुसार जीवनसाधनेच्या आचरणाने नऊ कोटी जीवात्मे सद्भक्त युधिष्ठिराबरोबर अमगरतीस प्राप्त झाले. तेच महान तपस्वी परमज्ञानघन तेजोमूर्ति या कलियुगात सद्गुरु इमामशाह रूपाने प्रगट होऊन त्यांनी

दर्शविलेल्या परमपावक सनातन मानवताधर्माचा उपदेश करून जीवनसाफल्याचे जे मार्गदर्शन केले, त्यानुसार आचरण करून अमृतत्वास प्राप्त झालेले बारा कोटी जीवात्मे वैकुंठ धामात जाऊन अमर झाले. हे सतगुरु ब्रह्मा सांप्रत इमामशाह रूपाने जरी प्रगट झाले असले तरी त्याआधी व त्यानंतरही कल्पांत काळापर्यंत कोणत्याही स्थळी, कोणत्याही वेळी, कोणत्याही रूपाने प्रगट होऊन आत्मज्ञानाचा आत्मोन्नतिचा उपदेश करीत आलेले आहेत. अनादिकाळापासून अंतकालापर्यंत जे अनंत कोटी जीवात्मे अमरापुरीस गेलेले आहेत. ते सर्व या कलियुगाच्या अंती कल्पान्तसमयी प्रगट होतील. मानवरूपाने जन्मास येऊन भगवान निकलंकी नारायणाची आराधना उपासना भक्ती करतील. सत्भक्त कमलाकुंवरच्या सान्निध्यात राहून सत्संग योगसाधना करतील व निरिच्छ, निरहंकार, निर्मम होऊन भगवंताच्या तशा निरंजन, निराकार, ज्योतिर्मय तेजोस्वरूपात विलय पावतील. त्यांचे स्थूल, देह मात्र चैतन्यघन परब्रह्माच्या सच्चिदानन्द स्वरूपात विलीन होतील. त्यांचे सर्वप्रकारचे सुखदुःख जन्ममरणाचे भोग मिटतील. त्यांच्या आशाआकांक्षा वासना इच्छा वगैरे सर्व विलय पावतील. ज्यांनी या मानव जीवनात येऊन सद्गुरुच्या आदेशानुसार वागून आत्मोन्नती केली. अशा सत्यवान सद्भक्तालाच सद्गती लाभते. आपमति अज्ञान अभक्ताला कधीच गति लाभत नाही. सद्गुरुंच्या वचनानुसार वागून त्याची अनंत अपार कसोटी ज्यांनी सहन केली तेच जीवात्मे मुक्त होऊन निर्वाण पदास प्राप्त झाले. पण जे या पदास पोहोचू शकले नाहीत असे अपरिपक्व जीवात्मे कर्मगतीचे फेरे खात जावून कोणत्या गतीस प्राप्त होतात त्यांचे वर्णन सद्गुरु महाराज करीत आहेत. (श्लोक ६७६-६९३)

जे जीवात्मे मानव जन्मात येऊन परब्रह्मास जाणत नाहीत व सतगुरुस शरण जात नाहीत, सद्गुरुंचा संग करीत नाहीत ते नरपशु पापकर्मरत राहून आपापला कर्मदोष भोगीत असतात. जे जीवात्मे वेदशास्त्र वचन ऐकत नाहीत वाचीत नाहीत वा त्यानुसार आचरण करीत नाहीत. त्या अपराधी जीवात्म्यांना स्वेदज, अंडज, उद्भीज आणि जारज् याचारही खाणींचे फेरे खावे लागतात. ज्यांनी गुरु अथवा सद्गुरुकडून अनुग्रह घेतला पण त्यांच्या वचनावर श्रध्दा न ठेवता आपमतीप्रमाणे आचरण केले, भगवंताच्या अवतारपात्रातील तत्व न जाणता अश्रध्देने त्यांचे दोष काढून दूषण देऊ लागले, जे पाप पुण्याचा कोणताही विचार न करतां अंधपणे पशुवत जीवन जगले त्या जीवात्म्यांना आपला कर्मविपाक भोगण्यासाठी वारंवार मृत्यूलोकाच्या फेऱ्या कराव्या लागतात. जो मुनिवर असून म्हणजे गुरुकडून अनुग्रह घेतलेला जो असेल त्याने परनिंदा केल्यास अनंत कष्टकारक असे नरकदुःख त्या जीवात्म्याला भोगावे लागेल. या मायावी विलोभनीय जगताच्या भुलभुलावणीस गुरफटून जो जीवात्मा दुनियेत बध्द

झाला तो वारंवार या दुनियेतील नश्वर भोग भोगण्यास जन्ममरणाच्या खस्ता खात असतो. जे सद्गुरूंची सेवा करीत नाही, त्यांना दिलेले वचन पाळत नाही, आपल्या धनदौलतीचा दशांश सुक्रित रूपाने दानधर्म न करतां म्हणजे परमेश्वराच्या व सद्गुरूच्या ऋणातून मुक्त न होता आपल्या संसारभोगाकडेच फक्त त्याचा विनियोग करतो. तो जीवात्मा कर्मगतीचे फेरे खात खात कल्पान्त काळापर्यंत येऊन पोहोचतो. जे मदिरा, भांग, गांजा, चरस, तंबाखु वगैरे खातात पितात व वर अहंकाराच्या मदाने धुंद होऊन अद्वातद्वा बोलतात ते सर्वांच्या आधी नरकयातना भोगतात. ज्यांनी धर्मदीक्षा घेऊन धर्माप्रमाणे आचरण करण्याचे कांकण बांधले आहे, त्या धर्माच्या नियमाप्रमाणे न वागता अधर्माचरण करतात; धर्माचे मर्म न जाणता, सूक्ष्म विचार न जाणता अधर्म, अंधश्रध्दा, अज्ञान, अनिष्ट रूढ्या अवास्तव स्तोम, दंभ यांनाच धर्म समजून समाजात घोळ घालतात असे दंभी, ढोंगी, लुच्चे लोक आवागमनाच्या फेऱ्यात पडतील. त्यांचा तो कर्मबंध कोणीही सोडवू शकणार नाही. जे कुडकपट असत्याचरण अधर्माचरण करतील ते बेईमानी अंध अपराधी जीवात्मे आवागमनाच्या फंदात पडतील व जन्ममरणाचे फेरे खात खात लक्षचौर्यायशी जीवयोनीतील कर्मबंधाचे भोग भोगीत कलीयुगाच्या अंती कल्पांत काळात प्रगट होतील. अशाप्रकारे अनादि काळात प्रगट रूपाने राहतील. जे सद्भक्त असतील ते तर आधीच सद्भक्त कमलाकुंवरच्या समवेत भगवंताच्या आत्म ज्योतिस्वरूपात सामावले जातील. विलय पावतील पण जे त्या दशेस प्राप्त झाले नाही ते अपरिपक्व जीवात्मे या कल्पान्त काळात प्रगट होऊन कल्पान्ताचे दु:खभोग भोगतील. (श्लोक ६९४-७०७)

या विश्व ब्रह्मांडात मुख्य दहा असमान कल्पिलेले आहेत. सांप्रत काळी सूर्यनारायण दहाव्या असमानाच्या बऱ्याच लांब असून आपल्या १६ कलांनी आकाशात तळपत आहे. पण कल्पान्त काळाच्या वेळी मात्र तो नवव्या असमानात येऊन आपल्या सहस्त्र कलांनी तळपायला लागेल तेव्हा आकाशातून नुसतां अग्नीचा वर्षाव होईल. पाऊस पडणार नाही, मुसळधार असा लोखंडी अग्नीचा वर्षाव होईल, आणि त्यायोगे जमिनीमधून धुराचे लोळचे लोळ निघतील. अठराभार वनस्पती, पर्वत वगैरे सर्व जळून भस्म होतील. नद्या, नाले, पर्वत, शिखरे, वगैरे काहीही न राहता संपूर्ण पृथ्वी सपाट होईल. पाणी संपूर्ण आटले जाईल, वनस्पती सुकल्या जाऊन जळून करपून जातील, धरणीकंप ज्वालामुखी भयंकर प्रमाणात व भयानक स्वरूपाचे होतील. सातव्या असमानावर सूर्य येऊन तळपायला लागेल तेव्हा संपूर्ण पृथ्वी ताम्रवर्णाप्रमाणे होऊन